

प्रकाशक—सदाशिव विनायक बापट, ५९६ नारायण पेठ, पुणें.

मुद्रक—केशव रावजी गोंधळेकर,
'जगद्धितेच्छु' प्रेस, ९०७ शनवार, पुणें शहर.



# प्रस्तावना

**येषां स्वैरकथालापा उपदेशा भवन्ति च ।**

—श्रीमद्भागवत.



श्रीयुत सदाशिवराव बापट यांनीं गतवर्षीं कै० लोकमान्य टिळकांच्या 'आठवणी व आख्यायिका'चा प्रथम खंड प्रसिद्ध केला. आणि आतां हा दुसरा व जाहिरातींत प्रसिद्ध केल्या प्रमाणें तूर्त तरी शेवटचा खंड ते प्रसिद्ध करीत आहेत. पहिल्या खंडांत त्यांनीं जो आत्मनिवेदन-पर लेख लिहिला आहे त्यावरून त्यांना हे सत्कार्य करण्याचे कामीं काय काय अडचणी आल्या याची वाचकांस सहज कल्पना येईल. संक-ल्पित कार्य सिद्धीस जाईपर्यंत उद्योग सोडा-वयाचा नाहीं या त्यांच्या निर्धारामुळेंच वाचकांस लोकमान्यांच्या संबधीं दुर्मिळ व दुर्लभ पण अत्यंत मनोरंजक व उद्बोधक अशा माहितीनें भरलेले दोन अमूल्य ग्रंथ वाचावयास मिळत आहेत. त्यांच्या या दीर्घोद्योगाचा फायदा कै० लोकमान्यांच्या प्रस्तुत व भावी चरित्रकारास तर मिळेलच; परंतु या त्यांच्या कृतीनें लोकमान्यांच्या सर्व महाराष्ट्रभर पसरलेल्या लक्षावधि भाविक अनुयायांवर त्यांनीं एक प्रकारचा मोठा अनुग्रह केला आहे असें आम्हांस वाटते.

लोकमान्यांच्या हातून जी या भरतखंडाची व भारतीय संस्कृतीची सेवा सतत चाळीस वर्षेंपर्यंत झाली, तीमुळें त्यांचा यशोदुंदुभि या भरतभूमींत दीर्घकालपर्यंत दुमदुमत राहील यांत कांहीं शंका नाहीं. "नास्ति तेषां यशःकाये जरामरणजं भयम्" या कोटींतील श्रेष्ठ विभूतींत त्यांची गणना होत असल्यामुळे त्यांनीं मर्त्यदेहाचा त्याग केल्यानंतरहि त्यांचा यशःकाय भारतीय जनतेच्या अंतश्चक्षु-समोर कित्येक शतकेंपर्यंत सारखा उभा राहाणार व त्यांना त्यांच्या कर्तव्याची जागृति देणार असा आमचा दृढ विश्वास आहे. इतकेंच नाहीं तर भरतखंडांतील प्रस्तुत व भावी पिढ्यांच्या अंतश्चक्षूंस जितक्या स्पष्टतेनें त्यांची यशोरूप मूर्ति अधिक प्रतीत होईल तितक्याच प्रमाणांत त्यांची दृष्टि उज्वलित होऊन पुढील कर्तव्याचा मार्ग अधिक स्पष्टपणें आंखलेला त्यांच्या दृष्टीस पडेल, असेंहि आमचें

ठाम मत आहे. आणि एवढ्याचसाठीं श्रीयुत बापट यांनीं हा प्रचंड उद्योग करून व हे दोन बहुमोल ग्रंथ प्रसिद्ध करून सर्व महाराष्ट्रास किंबहुना अखिल भरतखंडास उपकृत केलें आहे असें आम्ही म्हणतों.

हें 'आठवणी व आख्यायिका'चें ग्रंथयुग्म म्हणजे लोकमान्यांसंबंधीं त्यांच्या अनेक अनुयायी, सहकारी, मित्र व प्रेमी गृहस्थांच्या अंतःकरणगुहेंतील खोल भागांत दडून बसलेल्या ज्ञानाच्या लहानमोठ्या खाणींच होत. त्या सर्व खाणी त्यांतील व्यक्तींच्या ऐहिक अस्तित्वाचें अवसान झाल्याबरोबर कालाच्या अफाट समुद्रावर उठणाऱ्या विस्मरणरूप लाटांच्या आंत कायमच्या गडप होऊन जाणाऱ्या आहेत ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे श्री० बापट यांच्या प्रचंड उद्योगाच्या उपकारक स्वरूपाची यथार्थ कल्पना उभी राहून वाचकांचीं अंतःकरणें कृतज्ञतेनें उचंबळून आल्याशिवाय राहाणार नाहींत. शंखासुरानें वेद समुद्रांत नेऊन बुडविले तेव्हां वेदप्रवर्तक ऋषींनीं भगवान् विष्णूची आराधना करून त्याला अवतार घेण्यास भाग पाडलें व आपले वेद परत मिळविले. परंतु कालसमुद्रांतील नक्रांनीं गिळलेलें लोकमान्य टिळकासंबंधींचें ज्ञान पुनश्च प्रकट होण्याचें कोणतेंहि साधन प्राचीन ऋषींच्या अर्वाचीन हीनश्रद्ध संततीस उपलब्ध झालें असतें असें आम्हास वाटत नाहीं. श्रीयुत बापट यांनीं या सर्व अंतःकरणांतील गूढ गुहांतून युक्तिप्रयुक्तीनें प्रवेश करून त्यांतून अनेकविध रत्नें बाहेर प्रकाशांत आणलीं व निसर्गप्रलयांत सांपडून तीं कायमचीं नष्ट होऊं न देतां भावी भारतीयांच्या हातांतील नित्य स्मरणींत तीं ओंवतां येतील अशी योजना केली. या त्यांच्या भगीरथ प्रयत्नाबद्दल व दुर्लभ योजकतेबद्दल त्यांची करावी तेवढी प्रशंसा थोडीच होणार आहे.

इतर देशांच्या मानानें भारतीय संस्कृति ही अत्यंत प्राचीन आहे असें आपण मोठ्या अभिमानानें व यथार्थ अभिमानानें म्हणत असतों. त्याचप्रमाणें सत्पुरुष व श्रेष्ठ विभूति यांची अत्यंत देदीप्यमान व दीर्घ परिणालिकाहि मुखानें उच्चारून दाखवीत असतों. परंतु वसिष्ठ-वामदेवापासून तों श्रीसमर्थ रामदासस्वामींपर्यंतच्या या दीर्घ कालांत होऊन गेलेल्या ऋषींची, मुनींची, शास्त्रकलाप्रवर्तक आचार्यांची, पुण्यश्लोक नृपावलींची, कारस्थानी मुत्सद्यांची धुरंधर सेनानींची आपणास केवळ नामापलीकडे काय माहिती आहे ! आकाशांत दुरून चमकणाऱ्या व आपल्या नयनांस लोभविणाऱ्या असंख्य नक्षत्रतारकादिकांप्रमाणेंच त्यांचीं नावें हीं आपल्या स्मृतिपटलरूप क्षितिजावर नित्य चमकतात, पण त्यांच्यासंबंधींचें आपलें ज्ञान वरील तारकासंबंधींच्या ज्ञानापेक्षा यत्किंचित् अधिक नाहीं असें म्हटल्यास खात्रीनें आमच्यावर कोणी अतिशयोक्तीचा आरोप करणार नाहींत. आर्यसंस्कृतीस अपूर्व वैभव प्राप्त करून देण्यास ज्यांनीं आपल्या अजस्र बुद्धिमत्तेचा व्यय केला त्यांच्यासंबंधीं अत्यंत गाढ असलेल्या आपल्या अज्ञानामुळें

त्या संस्कृतीवर प्रस्तुतकाली येऊ पाहाणाऱ्या विघ्नांचें निवारण करण्याचे कार्य हें एक प्रकारे अधिक दुर्घट झाले आहे असे आम्हांस वाटतें. वरील आचार्यादिकांचीं नांवे व तत्कृत ग्रंथ यांचे जे वाचिक ज्ञान हल्लींच्या पिढींत दृष्टीस पडतें, तें, त्यांच्यासंबधीं व त्यांनीं उत्कर्षास नेऊन पोचविलेल्या संस्कृतीसंबधीं योग्य अभिमान जागृत ठेवण्यास अपुरे पडूं पाहात आहे. त्यांनीं आपल्या अपूर्व बुद्धिमत्तेनें शोधून काढलेले किंवा प्रतिपादन केलेले सिद्धांत आजच्या व्यवहारांत देखील बव्हंशानें लागू पडतात व त्यांच्याच आश्रयाने आपल्या उद्धाराचा मार्ग सुकर होईल ही विचारसरणी प्रस्तुत पिढीस मान्य न होण्याचे एक प्रमुख कारण म्हणजे ऋषिकालीन अथवा आचार्यकालीन परिस्थितीची योग्य कल्पना जनतेसमोर मांडण्याची पुरेशी सामग्री आज उपलब्ध नाहीं, हें होय. कोणत्याहि प्राचीन भारतीय श्रेष्ठ विभूतींची नांवापलीकडे कांहींच माहिती नसल्यामुळें त्यांच्या कालाचा निर्णय होत नाहीं व तत्कालीन परिस्थितीविषयीं कांहीं बोध होत नाहीं. त्यामुळे त्यांच्या नांवावर मोडणाऱ्या सिद्धांतांची युक्तता पटविण्याचे एक प्रबल साधन आपणास आज दुर्लभ होऊन बसलेलें आहे. ज्या परिवाराचे साह्यानें सहस्रावधि प्रयत्न करून प्राचीन ऋषींनीं परिस्थितीच्या चक्रास इष्ट अशी गति दिली आणि भारतीय संस्कृतीचा उत्कर्ष केला व कित्येक शतकेंपर्यंत ती जगतास आदर्शभूत करून ठेविली तो परिवार, ते प्रयत्न आणि ती परिस्थिति हीं आज निवळ कल्पनांचे किंवा अनियंत्रित तर्कांचे विषय बनून गेलीं आहेत. व अशा रीतीनें सभ्रमधूम्राच्या अफाट जालातूनच त्यांचा येणारा प्रकाश जरी आपल्या हृदयास कांहीं अशीं आनंद देणारा होत असला तरी प्रस्तुत स्थितींत तो मार्गदर्शक होईनासा झाला आहे. वरील विवेचनाचा इत्यर्थ इतकाच कीं, कोणत्याहि विभूतींनीं भारतीय संततीच्या हिताकरितां अमूल्य ज्ञाननिधि ग्रंथरूपाने ठेवले असले तरी त्यावर तत्कालीन परिस्थितीरूप ज्ञानाचा प्रकाश पडल्याशिवाय त्यांच्या योग्यतेचे परीक्षण आजच्या पारखी लोकांकडून होत नाहीं. तें ज्ञान गाडून ठेवलेल्या धनाप्रमाणे जवळ जवळ जागच्या जागींच पडून राहाते, पण प्रसृत व प्रवहित होऊन आणि जगाच्या चलनी नाण्यांत शिरून व्यवहारसौकर्य वाढविण्यास साह्यभूत होत नाहीं. हा सिद्धांत लक्षात आल्याशिवाय श्री० बापटांच्या कृतीचें व उद्योगाचे खरें स्वारस्य वाचकाच्या लक्षांत येणें शक्य नाहीं.

श्रेष्ठ विभूति व सामान्य व्यक्ति यांतील मोठा भेद हा कीं, सामान्य व्यक्ति ही आपणांस कालवश समजते आणि परिस्थितीस अनुकूल असा कार्यक्रम आंखून गोडीगुलाबीनें आपली इहलोकींची यात्रा आक्रमण्यांतच स्वतःची कृतार्थता आहे असे मानून घेते. परंतु श्रेष्ठ अथवा लोकोत्तर विभूतींचे सर्व कर्तृत्व एका अनिष्ट वाहाणाऱ्या परिस्थितीचा नाश करून दुसरी परिस्थिति निर्माण करण्यातच प्रकट झालेलें दृष्टीस पडतें. म्हणजे श्रेष्ठ विभूति व प्रचलित परिस्थिति यांमधील संबंध

शत्रुत्वाचा असतो व श्रेष्ठ विभूतीचा प्रधान व्यवहार म्हणजे तत्कालिन् परिस्थितीशीं सुरू केलेला कलह असेंहि म्हणतां येईल. तेव्हा एका प्राचीन सुभाषितकारानें म्हटल्याप्रमाणे रावणाच्या बलाची यथार्थ कल्पना आल्याशिवाय रामाच्या पराक्रमाची यथावत् कल्पना करता येणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणे एखाद्या श्रेष्ठ विभूतीचें माहात्म्य देखील ज्या परिस्थितीविरुद्ध त्यांनीं कलह माटला व जीवर त्यांनीं पूर्णांशानें अथवा अंशतः विजय मिळवून यश संपादन केलें, तिचें पूर्ण साकल्यानें ज्ञान झाल्याशिवाय विभूतिकालीन पिढी नष्ट झाल्यानंतर भावी पिढीस व्यवहार्य म्हणून आकलन होणें कठीण जातें. त्याच्या पराक्रमाचा अवशिष्ट परिणाम म्हणजे विस्मय व आश्चर्य या रूपानें अंतःकरणास दृग्गोचर होणारा अंधुक प्रकाश. परंतु या प्रकाशामुळे विचारशक्तीचीं कमलें विकसित होऊन त्यांत अडून बसलेल्या व कर्तव्यगीताचा गुंजारव करणाऱ्या भ्रमराची सुटका होऊन त्याच्या बाहेरील वातावरणात स्वैरसंचार होऊं शकत नाहीं. तेव्हा श्रेष्ठ विभूतीचें संपूर्ण चित्र वाचकासमोर दाखविताना प्राचीन चित्रकार ज्याप्रमाणे दशावताराचें चित्र काढीत, त्याचप्रमाणे तें काढणें अवश्य आहे. नारसिंहाचें चित्रातच त्याचे मांडीवर नखाग्रानीं ज्याचें उदर विदीर्ण झालेलें आहे असें हिरण्यकश्यपूचें चित्र हेंहि असतेंच. वामनाचे चित्रात त्याच्या लत्ताप्रहारामुळें बळी हा पाताळातील खोल गर्तेत जात आहे हें नेहमीं दृष्टीस पडते. प्रभु रामचंद्रांचे चित्रात रामबाणानें दशकंठ रावणाच्या शिरकमलांचें दाही दिशांस बलिदान केलेलें आहे हें पाहाण्यात येतें. भगवान् श्रीकृष्णाचे प्रतिमेंत कंसाची शेंडी हातात धरून कराल करवालानें त्याचा भगवान् शिरच्छेद करीत आहेत हा देखावा दाखविण्यांत येतो. किंवा धनुर्धर पार्थाचें चित्र म्हटलें म्हणजे रथारूढ होऊन कौरवसेनेवर शस्त्रसंपात सुरू आहे हें आलेख्य काढलेलें आढळतें. चित्रकलेंतील या संप्रदायपरंपरेवरून देखील हीच गोष्ट सिद्ध होतें कीं, ज्या परिस्थितीचें निर्दालन करण्यांत एखाद्या श्रेष्ठ विभूतीचें कर्तृत्व प्रकट झालें तिचें चित्र डोळ्यासमोर आल्याशिवाय अवतारी पुरुषाचे चित्राची पूर्तताच होत नाहीं. इतकेंच नव्हे तर तें चित्र प्रेक्षकास कोणत्याहि प्रकारें उद्बोधक, उत्साहवर्धक आणि कर्तव्यप्रेरक होऊं शकत नाहीं. चरित्रलेखनाचा चित्रकलेशीं सहोदरसंबंध नसला तरी सगोत्र व सपिंडसंबंध खास आहे असें प्रत्येकास कबूल करावें लागेल. उभयताचा उद्देश एकच. एकाला आपलें कार्य रंगादिसामुग्रीचे साह्यानें करावें लागलें तर दुसऱ्याला तेंच कार्य शब्दसामुग्रीचे साह्यानें करावें लागतें. परंतु चरित्रनायकाचें उत्साहवर्धक व उद्बोधक शब्दचित्र काढणें हाच चरित्रलेखनाचा मूळ हेतु असतो. त्यासाठीं तत्कालीन परिस्थिति-निदर्शक असें शब्दचित्र त्याला पूर्णत्वानें काढून दाखविता आलें नाहीं व त्यावर विजय मिळविण्याकरिता चरित्रनायकानें योजलेल्या निरनिराळ्या शस्त्रास्त्रप्रहाराचें दिग्दर्शन करतां आलें नाहीं तर तें चित्र इतर दृष्टीनें कितीहि

नयनमनोहर व रम्य असें दिसत असले तरी त्यांत सत्प्रेरणा व उद्बोधन या दृष्टीनें भयकर वैगुण्य राहिल्यामुळें गतभर्तृका युवतीप्रमाणें निष्फल व निष्प्रयोजन आहे असेंच म्हणणे प्राप्त होते. विभूतींचा उत्कर्ष अथवा प्रभाव याचाच अर्थ विशिष्ट परिस्थितीचा अपकर्ष व तिरोभाव यामुळे तत्कालीन परिस्थितीच्या यथार्थ स्वरूपाचे आणि तन्निरसनार्थ योजण्यात आलेल्या प्रयत्नांचें साकल्याने ज्ञान होण्याचीं जितकीं साधने उपलब्ध होतील तितका विभूतींच्या कार्यक्षेत्राची संपूर्णत्वानें कल्पना येण्यास अधिक उपयोग होईल. विभूतिसमकालीन लोकांस या प्रयत्नांचे कदाचित् विशेष महत्त्व वाटणार नाहीं; परंतु भावी पिढीस त्याचा फार मोठा उपयोग आहे यात बिलकुल संशय नाहीं.

प्रस्तुत आठवणींच्या ग्रंथाकडे लक्षपूर्वक अवलोकन केले तर कै० लोकमान्यांचे चरित्राच्या साधारणतः अज्ञात असलेल्या बऱ्याच मोठ्या भागावर यामुळे प्रकाश पडलेला आहे असें वाचकास दिसून येईल. कै० लोकमान्य टिळक हे निःसीम देशभक्त, अहोरात्र राजकारणांत पडलेले आणि सदासर्वदा नोकरशाहीशीं झुंजत असलेले; त्यांचा नुसता नामनिर्देश झाल्याबरोबर 'केसरीं'तील लेख, व्याख्यानें, प्रवचने, सभा, परिषदा यांची रांगची रांग डोळ्यांसमोर उभी राहाते व त्यांतून लोकमान्यांच्या असामान्य बुद्धिमत्तेमुळें व कर्तृत्वामुळें लक्षावधि लोकांच्या झुंडी त्यांच्याकडे आदरानें पाहात आहेत, त्यांचे शब्द श्रवण करण्यास किंवा पठण करण्यास उत्सुक झालेले आहेत असें एक दुसरे चित्र डोळ्यांसमोर येते. नोकरशाही किंवा प्रतिपक्षी यांजवर कोटिक्रमाचा भडिमार करीत विजयी मुद्रेनें ते आपल्या अनुयायांस पुढे चाल करून जाण्यास उत्तेजित करीत आहेत असा एक भव्य देखावा अतश्चक्षूसमोर उभा राहातो. लोकमान्यांचे चरित्रलेखक याच देखाव्याचे भपकेदार रंगीत चित्र वाचकाचे डोळ्यांसमोर उभे करण्यांत आपलें लेखनकौशल्य प्रकट करतील. त्यांच्या आयुष्यातील बहुतेक काळ अशा भीषण कलहांत गेला हें जरी खरें असलें तरी त्या काळांतील प्रत्येक दिवशीं त्यांना विश्रांति घेण्याकरिता कांहीं तरी वेळ काढावा लागत होताच. या विश्रांतीच्या काळांत लोकमान्य आपल्या मनाची करमणूक कशी करून घेत होते, याची योग्य कल्पना या 'आठवणी व आख्यायिका'चे वाचनानें वाचकांस येईल. जुन्या पिढींतील सुखी व सुबुद्ध माणसे विश्रांतीच्या वेळांत सोंगट्या, दशावतारी गंजिफा, बुद्धिबळें इत्यादिकांचे डाव खेळून अथवा गाणे बजावणे यासारख्या ललितकलांस आश्रय देऊन आपलीं थकलेलीं मनें रिझवून ताजींतवानीं व कार्यक्षम करण्याचा प्रयत्न करीत. आधुनिक पिढींतील सुशिक्षित व प्रबुद्ध गृहस्थ टेनिस, क्रिकेट, बिलियर्ड, ब्रिजिस, वगैरे खेळ खेळून अथवा नाटक, सिनेमा वगैरेंस जाऊन आपल्या मनाची करमणूक करून घेताना दृष्टीस पडतात. वरील करमणुकीचीं साधनें कांहीं कारणामुळे उपलब्ध नसलीं तर निदान फोनोग्राफच्या प्लेटी लावून मृत गीत

ऐकण्यांत तरी आपला काळ घालवितात. वरीलपैकीं एखाद दुसऱ्या मार्गानें आपली करमणूक करून घेतल्याशिवाय त्याच्या शरीराचा व मनाचा थकवा नाहींसा होत नाहीं व उदरनिर्वाहार्थ अथवा सार्वजनिक कार्यार्थ झिजविलेल्या मन, बुद्धि व देह यांच्या ठिकाणीं आलेल्या क्षीणाचा परिहार होत नाहीं. हा सर्वत्र दृष्टीस पडणारा आणि विशेषतः प्रौढ व प्रबुद्ध माणसात रूढ झालेला प्रकार लक्षात ठेवून जर वाचक लोकमान्याच्या आठवणींचें परिशीलन करतील तर त्यांना लोकमान्यांचें लोकोत्तरत्व जितकें संग्रामक्षेत्रावर प्रसिद्ध आहे तितकेंच विश्रांतिस्थानीं देखील आहे असें आढळल्याशिवाय राहाणार नाहीं. या आठवणी म्हणजे लोकमान्यांशीं त्यांच्या फुरसतीच्या वेळीं त्यांना भेटण्यास गेलेल्या व्यक्तींपैकीं कांहीं थोडया लोकांनीं आपआपल्या भेटीच्या प्रसंगांचीं स्मरण करून लिहिलेलीं टिपणें आहेत. यात लोकमान्य आपल्या वाहनावर आरूढ होऊन व शस्त्रास्त्रें सज्ज करून बसलेले दिसत नसून ते क्षणभर विश्रांति घेण्याकरितां पागोटें खुटींवर ठेवून व अंगरख्याचे बंद सोडून एखाद्या तक्याचे आश्रयास बसले आहेत अथवा आराम खुर्चीवर पडले आहेत आणि येणाऱ्याजाणाऱ्या प्रेक्षकांशीं प्रश्नोत्तररूपानें ते यदृच्छेनें संवाद करीत आहेत, असें आपल्या दृष्टीस पडतें, ही गोष्ट वाचकांनीं अवश्य लक्षात ठेवावी. तात्पर्य, या आठवणींतील प्रसंग म्हणजे लोकमान्याचे 'स्वैरकथालाप' आहेत. सामान्य मनुष्याचे स्वैरकथालाप जेव्हा कांहीं निमित्तानें आपल्या कानांवर येतात तेव्हां त्यांतून कोणत्या विषयांची चर्चा होत असलेली आपणास दृष्टीस पडते ? आपणाहून भिन्न मत असलेल्या थोर व्यक्तींची कुचेष्टा ही तर विनोद या प्रतिष्ठित नांवाखालीं अग्रपूजेस पात्र समजली जाते. परतु याहीपेक्षा अधिक गर्हणीय अशा अनेक विषयाची अत्यत मुक्तलज्ज स्थितींत चर्चा होत असलेली आपल्या नित्य अवलोकनात येते. परतु लोकमान्यांच्या या विश्रांतिस्थानीं होत असलेल्या चर्चाचें स्वरूप किती उदात्त व उद्दीपक होतें याची पुढील 'आठवणी व आख्यायिका'त ग्रथित झालेल्या प्रसगांवरून वाचकांस थोडीशी तरी कल्पना होईल. व तें वाचन चाललें असता असल्या लोकोत्तर पुरुषाशीं ज्यांना अल्पकाल देखील सान्निध्य प्राप्त झालें असेल ते पुरुष दैवाचे व महाभाग्यशाली आहेत असेंच त्याना वाटल्यावांचून राहाणार नाहीं असा आमचा तर्क आहे.

नोकरशाहीशीं झगडण्याकरिता लोकमान्यांनीं चालविलेलें व चाळीस वर्षेपर्यंत अव्याहत सुरू ठेवलेले रणकर्कश कर्म व त्यामुळें मधून मधून होत असलेल्या व मुद्दाम कराव्या लागणाऱ्या अनेक लहानमोठ्या झटापटी व चकमकी, यांतून त्याची सुटका अखेरपर्यंत झाली नाहीं. त्यामुळें दिवसां रणांगणावर शत्रूशीं युद्ध करणाऱ्या भारती वीराप्रमाणेंच त्यांचा आयुःक्रम होता असें म्हणाव लागतें. आणि त्यामुळेंच ते विश्रांतिस्थानीं येऊन बसले म्हणजे प्रसिद्ध भारती योद्धे पितामह भीष्म

किंवा नरमणी अर्जुन हे दिवसा भीषण युद्ध करून सायंकाळीं आपल्या शिबिरांत जात, या महाभारतांतील प्रसंगाचें प्रत्यक्ष चित्र डोळ्यासमोर उभें राहातें. व शिबिरांत गेल्यानंतर प्रत्यक्ष निद्रावश होण्यापूर्वीचा काल ज्याप्रमाणें भीष्माचार्य हे विदुरादिकांशीं गहन उपनिषच्चर्चा करण्यांत किंवा आपद्ग्रस्त लोकांचे दुःखनिवारण करण्यांत अथवा संशयग्रस्त जिज्ञासूचे संशयनिरसन करण्यांत घालवीत त्याचप्रमाणें विश्रांतिस्थानीं प्राप्त झाल्यानंतर लोकमान्यांचा काल जात होता हा विचार पुढील आठवणींचें नुसतें वर वर अवलोकन केलें तरी त्यांच्या मनांत उत्पन्न झाल्याशिवाय राहाणार नाहीं. कधीं आपल्या अनुयायांनीं विचारलेल्या अनेक शंकांचे ते मोठ्या मार्मिक उत्तरांनीं सहज समाधान करीत आहेत, तर कधीं एखाद्या अडचणींत सांपडलेल्या विधवेची एखादी अर्जी तयार करून देण्यांत ते गुंतलेले आहेत असे आपणांस आढळून येतें. सार्वजनिक कार्यक्षेत्रावर त्यांनीं प्रत्यक्षरीत्या केलेली कामगिरी अत्यंत तेजस्वी आहे यांत शंका नाहीं. परंतु त्या कार्यक्षेत्राचें क्षेत्रफळ त्यांच्या सहकारी व अनुयायी यांच्या पूर्ण परिचयाचें आहे. त्यांच्या असामान्य नेतृत्वाखालीं जे पराक्रम करण्यांत आले ते जरी आज त्यांच्या हातून होण्याची कित्येकांस शंका येत असली तरी लोकमान्यांनीं ठरविलेल्या क्षेत्रांत कोणत्या धोरणानें पुढील चढाईचा उठाव केला असता, याची स्पष्ट कल्पना त्यांना करतां येते व योग्य अवसर मिळाल्यास आपापल्या शक्त्यनुरूप त्यांनीं करून दाखविलेल्या व पुढील कालाकरिता योजून ठेवलेल्या लहानमोठ्या चळवळी उत्पन्न करण्याची त्यांना एक प्रकारची धमकहि वाटते. परंतु युद्धभूमीवरून परत शिबिरात आल्यानंतर त्यांजकडून जे असंख्य उद्योग व व्यवसाय अत्यंत शांत वित्तानें अव्याहत होत होते त्या अवाढव्य व्यापाची नुसती कल्पना करणें देखील कठीण आहे. ते रणभूमीवर सिंहासारखा पराक्रम करीत यांत शंका नाहीं. परंतु ही 'केसरी'ची अजिंक्य व दुर्दमनीय शक्ति त्यांनीं कशी हस्तगत केली याची मीमांसा त्यांच्या शिबिरस्थानीं चाललेल्या उद्योगांचे यथावत् आलोचन केल्याशिवाय करता येणे शक्य नाहीं.

या दृष्टीनें पाहिले असतां श्री० बापट यांनीं प्रसिद्ध केलेल्या या दोन ग्रंथांचे महत्त्व फारच मोठें आहे, हें थोड्या विचारांतीं प्रत्येकांस कबूल करावें लागेल. विश्रांतिस्थानीं परत आल्यानंतर त्यांच्या हातून जी लोकाराधना व विद्याराधना निरनिराळ्या प्रकारांनीं होत होती तीच त्यांची खरी तपश्चर्या होती. त्याच दीर्घकाल एकनिष्ठपणें चालविलेल्या तपश्चर्येचे फळ म्हणून जनतात्मा परमेश्वरानें प्रसन्न होऊन 'न चारिहिंसा विजयश्च हस्ते' अशा अपूर्व शक्तीने संपन्न असलेले 'लोकमता'चें दिव्य अस्त्र त्यांना अर्पण केले असेच आम्हास वाटते. आणि म्हणूनच त्यांचा विश्रांतिकालीन कार्यक्रम म्हणजे या अस्त्राची दिव्य शक्ति जागृत राहाण्याकरितां त्यांनीं चालविलेले नित्यानुष्ठान होय असें आम्हीं म्हणतो.

या त्यांच्या मतांचें वैषम्य वाटून आणि त्यांच्या हातातील लोकमताचें दिव्यास्त्र हतबल व्हावें हा हेतू धरून त्यांच्या पुरश्चरणास अनेक तऱ्हेनें विघ्न करण्यास कित्येक लोक कसे पुढें आले, परंतु लोकमान्याच्या पुढें गलिताभिमान होऊन त्याना कसें परत जावें लागलें हें मार्मिक वाचकास या आख्यायिकांतील कांहीं प्रसंगावरून दिसून येण्यासारखें आहे. शुकापुढें ज्याप्रमाणें रंभेचें सौन्दर्य निरर्थक ठरलें किंवा अर्जुनापुढें ज्याप्रमाणें उर्वशी हतगर्व झाली त्याप्रमाणें लोकमान्याच्या निश्चयापुढें सर्व लहानमोठ्या प्रलोभिकाना व विरोधिकाना हात टेकावे लागले. त्यांचे अनुष्ठान देहावसान होईपर्यंत सुरू होतें आणि म्हणूनच त्यांनीं चालविलेल्या झगड्यात त्यांची मुत्सद्देगिरी, धैर्य, पराक्रम, बुद्धिमत्ता व संघटनसामर्थ्य यांचं तेज उत्तरोत्तर अधिकाधिक तीव्रतेनें प्रकट होत होत.

या 'आठवणी व आख्यायिका'कडे आणखीहि एका दृष्टीनें पाहिलें तर मनास अत्यंत उत्तेजक असें चित्र डोळ्यांसमोर येतें. कै० लोकमान्य टिळक हे जनतात्म्या परमेश्वराचे निःसीम भक्त होते. परमेश्वराचे अनंत अवतार पूर्व युगांत होऊन गेले, त्यांच्याकडे फक्त त्यांच्या अवतारकृत्यातील प्रकृत परिस्थितीस उपयुक्त भागाश काय हें पाहाण्यासाठींच त्यांची दृष्टि जात होती. परंतु परमेश्वराचा साक्षात् जनतारूप विग्रह जो दृष्टीस नित्य प्रतीत होतो त्याचें सगुणरूपानें आराधन हें ब्रह्मप्राप्तीचें साधन म्हणून त्यांनीं स्वीकृत केलें होतें. यामुळेंच आराध्यदेवतेच्या उपासकांचा परिवार त्यांच्या भोंवतीं गोळा झाला होता. थकून आल्यानंतर हा परिवार त्यांच्या जवळ येऊन बसला म्हणजे थकलेल्या देहाला व शिणलेल्या मनाला एक प्रकारचा उल्हास येत असे. आणि पुष्कळदा त्यांच्या मनावर कांहीं अकल्पित रीतीनें घडून आलेल्या एखाद्या विपरीत प्रसंगामुळें थोडीशी निराशेची छाया आली असली तरी ती पार निघून जात असे. ज्याप्रमाणें एखाद्या युद्धात कांहीं आकस्मिक कारणामुळें सैन्याची वाताहत होऊन एखाद्या सेनापतीस निराशाग्रस्त अंतःकरणानें परत यावें लागल्यानंतर त्याच्याच अस्ताव्यस्त झालेल्या सैन्यातील लहानमोठे सरदार त्याच्यापुढें येऊन उभे राहिले असता निराशा क्षणात लयास जाऊन नवीन पराक्रमाची आशा त्याच्या अंतःकरणात उद्भुत होते आणि पुनश्च नवीन व्यूह रचण्याचे उद्योगात तो पुनः निमग्न होतो, त्याचप्रमाणें कांहीं विशिष्ट प्रसंगीं लोकमान्यांचीहि परिस्थिति झाली असता त्यांच्या अनुयायी व सहकारी मित्रांचा संघ त्यांच्या दृष्टीसमोर येताच नवीन कारस्थानें व तत्सिद्ध्यर्थ नवीन प्रयत्न करण्याचा हुरूप त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होत असे. या आठवणींच्या अध्ययनानें मनावर जो संस्कार दृढ होतो तो हा कीं, लोकमान्यांच्या दर्शनानें त्यांच्या अनुयायात नवीन चैतन्याचा संचार होत होता, आणि त्याचप्रमाणें अनुयायांच्या सान्निध्यानें लोकमान्यांचें तेज अधिकाधिक प्रखर होत जाऊन सर्व

निराशामय तृण क्षणांत जळून भस्म होऊन जात होतें. या उभयतांचा हा अन्योन्यपोषक संबंध लोकमान्यांचे चरित्रासारखा निदान अलीकडील काळांत तरी दुसऱ्या कोणत्याहि श्रेष्ठ व्यक्तीचे चरित्रांत आम्हांस आढळून येत नाहीं. याचें खरें कारण म्हणजे समानतेच्या तत्त्वाचे यथावत् परिपालन त्यांच्याकडून जितक्या दक्षतेने आणि स्वाभाविकपणानें होत होतें इतके दुसऱ्या कोणत्याहि व्यक्तींकडून होणें अवघड आहे हे होय. लोकमान्यांचे वर्णन करीत असतांना महात्मा गांधी यांनीं त्यांना 'democrat of democrats' असे विशेषण दिलें होते. याचा अर्थ तरी हाच. आपणासमोर येणाऱ्या प्रत्येक सार्व-जनिक कार्याची हौस बाळगणाऱ्या व्यक्तीचे परीक्षण दुसऱ्या कोणत्याहि बाह्य उपचारानीं न करतां किंवा त्याला न बोलताच, संकोच उत्पन्न होऊन त्याच्या ठिकाणीं सार्वजनिक कार्य करण्याचा जो अंकुर उत्पन्न झाला तो करपून जाण्या-सारख्या निष्ठुर तात्त्विक सिद्धांताचे उष्ण वातावरणाचा उपसर्ग त्याला न पोंचविता उलट तद्‌वृद्धीस अनुकूल अशी दृष्टि ठेवून त्यांच्या मार्गदर्शकाचें काम करण्यास ते सदैव तयार असत. खरी साम्यबुद्धि उत्पन्न झाली म्हणजे दुसऱ्याकडे पाहाण्याची कृत्रिम दृष्टि नष्ट होते. असल्या कृत्रिम दृष्टि कांहीं विशिष्ट सिद्धांतांचे अभिनिवेशामुळें गेल्या पांच वर्षांत उत्पन्न होऊन त्यामुळें अनेक कार्यकर्त्या लोकांस निराश होऊन सार्वजनिक चळवळीतून आपलें अंग काढून घ्यावे लागले आणि जनतेचें बळ संघटित व राष्ट्रीयसभेचे व्यासपीठाचे ठिकाणीं केंद्रित करण्याचा लखनौ येथे सुरू झालेला प्रयत्न एकाएकीं कुंठित झाला. हा प्रकार लक्षात आला म्हणजे लोकमान्यांच्या ठिकाणीं दृष्टीस पड-णाऱ्या साम्यबुद्धीचें महत्त्व काय हें आपोआप कळून येण्यासारखें आहे. प्रस्तुत आठवणींचा ग्रंथ हा त्यांच्या साम्यबुद्धीचें एक मोठें प्रदर्शन आहे असें म्हटलें तरी चालेल. ही साम्यदृष्टि हाच त्यांचा लोकसंग्रहकारक धर्म. त्यांच्याशीं त्यांचे भेटीचे प्रसंग झालेले यात वर्णिलेले आढळतात, त्यांतील कित्येक व्यक्तींशीं त्यांचा अनेक बाबींत विरोध होता. तथापि लोकमान्यांकडे अमुक कामाकरितां गेलो असतां आपणास संकोच वाटण्यासारखा कोणताहि प्रकार न होतां आपल्या अपेक्षित कार्यास त्यांच्याकडून होण्यासारखी असेल ती मदत केल्या-शिवाय ते राहाणार नाहींत अशा तऱ्हेचा दृढ विश्वास त्यांच्या अंतःकरणांत होता. निःपांडवी पृथ्वी करीन अशी प्रतिज्ञा भीष्माचार्यांनीं केली असतांसुद्धां श्रीकृष्णानें द्रौपदीस भीष्माचार्यांच्या शिबिरांत जाऊन त्यांचे दर्शन घेण्यास सांगितलें. हे करण्यांत भीष्माचार्यांसंबधीं ज्या तऱ्हेचा विश्वास श्रीकृष्णाचे मनांत होता हें आपणास भारतीय वर्णनावरून दृष्टीस पडतें, तशाच प्रकारचा विश्वास सर्व भरतखंडांतील जनतेंत लोकमान्यांसंबधानें होता. योग्य संधि प्राप्त झाली असतां धर्मभेद, पक्षभेद, मतभेद, तत्त्वभेद या सर्वांस तिलांजलि देऊन राष्ट्-

कार्यार्थ वाटेल त्यांशीं सहचर्य करण्याची त्याची तयारी होती याचें कारण तरी हेंच. साम्यदृष्टि व ध्येयैकनिष्ठ आचरण हीं लोकमान्यांच्या चरित्रातील व त्यांच्या गीतारहस्यप्रतिपादित लोकसंग्रहधर्माचीं आद्य व अबाधित तत्त्वें आहेत. त्या तत्त्वांचा विविध विलास या आठवणींच्या व आख्यायिकांच्या रूपानें प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या स्वैरकथालापात मनसोक्त पहावयास मिळतो. व आमचा विश्वास आहे कीं, या कथालाघवापासून उत्पन्न होणारें उपदेशामृत सर्व भरत-खंडांतील तरुणांकडून जेव्हां मनमुराद व आकंठ प्राशन करण्यांत येईल तेव्हांच त्यांच्या ठिकाणीं आज दृष्टीस पडणारी निराशामय मन:स्थिति नष्ट होईल, सत्कर्म-प्रचोदनेचा संचार होईल व भरतभूमीचा भाग्योदयकाल समीप येईल.

प्रस्तावनालेखनाचे मिषानें राष्ट्रगुरूचें या टिळकसप्ताहांत गुणसंकीर्तन करण्याचा सुमंगल प्रसंग श्रीयुत बापट यांच्यामुळेंच मला प्राप्त झाला याबद्दल त्यांचे मन:पूर्वक आभार मानून व वाचकांनीं आठवणी वाचण्यास एकदम सुरवात करावी अशी नम्रपणें त्यांची प्रार्थना करून मी हा प्रस्तावनालेख संपवितो व वाचकांचा निरोप घेतो.

आपला बंधु

यवतमाळ.
ता० १०–७–२५.

# अभिनंदन



लोकमान्य टिळकांच्या 'आठवणी व आख्यायिका' या ग्रंथाच्या पहिल्या खंडाची प्रस्तावना लिहिण्याचें काम मजकडे आलें होतें. हल्लींच्या या दुसऱ्या खंडाची प्रस्तावना लिहिण्याचें काम माझे मित्र श्री० माधवरावजी अणे यांनीं पत्करल्यामुळें मी त्यांतून मोकळा झालों आहें. तथापि दुसरा खंड प्रसिद्ध होऊन हा ग्रंथ पुरा झाला याबद्दल मला जो आनंद होतो तो व्यक्त करण्याकरितांच या दोन ओळी लिहीत आहें.

हा ग्रंथ पुरा करण्याला श्रीयुत बापट याना जे अचाट परिश्रम करावे लागले, त्याची कल्पना त्यांच्या 'आत्मनिवेदना'नें वाचकांना येईलच. तथापि हे परिश्रम घडत असतांनाच ते मला प्रत्यक्ष दिसत होते; यामुळें त्याचें सार्थक झाल्याबद्दल बापट यांचें अभिनंदन केल्याशिवाय माझ्याच्यानें राहावत नाहीं. हे परिश्रम पडण्याचीं कारणें बापट यांनीं अनुमानिलीं तीं खरींच आहेत. तथापि त्यांतल्यात्यांत माझ्या मतें मुख्य कारण हेंच कीं, आठवणी स्मरणांत ठेवणें व त्यांचें महत्त्व मनाला पटून त्या लिहिणें हा वाङ्मयव्यासंगाचा प्रकार आपल्या इकडे अद्यापि नवा असून लोकांच्या आंगवळणीं पडलेला नाहीं. या ग्रंथापूर्वीहि कै० रानडे यांच्यासारख्या एखाददुसऱ्या लोकोत्तर व सादरस्मरणीय अशा गृहस्थाच्या थोड्याबहुत आठवणी 'विविधज्ञानविस्तारा'सारख्या मासिकांतून प्रसिद्ध झाल्या होत्या. पण तो प्रयत्न एकांगी होता. बापटांचा हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानंतर दुसऱ्याहि एकदोन थोर व्यक्तींच्या आठवणी प्रसिद्ध करण्याचा उपक्रम दृष्टीस पडला. तो मात्र स्पष्टपणें अनुकरणात्मक असून त्याला मिळालेली स्फूर्ति बापट यांच्या प्रस्तुत ग्रंथापासूनच मिळाली असावी असें अनुमान काढण्यास जागा आहे. कसेंहि असो; वाङ्मयलेखनाचा हा

नवा प्रकार यानंतर रूढ होऊन वाढतच जाईल, व पुढें येणाऱ्या अशा प्रकारच्या ग्रंथकारास तरी इतके श्रम पडणार नाहींत, अशी आशा वाटते.

'आठवणी व आख्यायिका' यांना तुटक स्फुट लेखांचें स्वरूप असतांहि सामान्य वाचकांस त्या वाचाव्याशा वाटतात, याचें कारण तरी हेंच कीं, समग्र चरित्राच्या मानानें जरी त्या अपूर्ण वाटल्या, तरी त्यांत वर्णिलेल्या विषयापुरत्या त्या पूर्णच असतात. अपूर्णांताहि जें पूर्णत्व म्हणून असतें तें प्रतीत होण्याचीं उदाहरणें वाङ्मयक्षेत्राच्या बाहेर देखील आपणास आढळतात. फूल हें अनेक पाकळ्यांनीं पूर्ण होत असलें तरी प्रत्येक पाकळी रंग, रस, सुवास यांच्या दृष्टीनें इतर कोणत्याहि पाकळ्या किंवा समग्र फूल याच्या तोडीचीच असते. संपूर्ण फुलाचें रूप मात्र कोणत्याहि एक किंवा अनेक पाकळ्यांहून वेगळें असतें. पण संपूर्ण गुलाबाचें फूल नयनमनोहर असलें तरी त्याच्या सुट्या पाकळ्याहि कौतुकास्पद असतात; त्या आपण हुंगतों व न्याहाळतोंहि. किंबहुना सबंध गुलाबाचें फूल कोणी तोंडांत घालीत नाहीं, पण सुट्या पाकळ्या असल्या तर त्या आपण खातोंहि! हा फायदाच नव्हे काय? पैलूदार स्फटिकाचीहि गोष्ट अशीच आहे. सगळे पैलू मिळून स्फटिक होत असला तरी प्रत्येक पैलू देखील अनेक गुणांनीं तत्समच असतो. कित्येक वेळां अपूर्ण हेंहि विशिष्ट कारणाकरिता पूर्णाइतकेंच ग्राह्य होऊं शकतें. बांधीव फुलाचा गुच्छ प्रियच असतो; पण ओंजळभर फुलें नुसतीं सुटीं घेऊन या हातांतून त्या हातावर उधळीत वास घेण्याचीहि एक प्रकारची मौज असतेच कीं नाहीं? समग्र चरित्र हें बांधीव गुच्छाप्रमाणें असलें तर 'आठवणी व आख्यायिका' या सुट्या फुलाप्रमाणेंच होत. समग्र चरित्रग्रंथ हातीं असला तरी काय झालें? तो हप्त्याहप्त्यानें व वायद्यावायद्यानें वाचणारे वाचक किती तरी असतात! त्यांचें खुणेचें पान किंवा दोरा एका प्रकरणांतून दुसऱ्या प्रकरणांत जाण्याला अनेक दिवस लागतात. अशा आळशी किंवा मिजासी वाचकांना तर अशा 'आठवणी व आख्यायिका' फारच उपयोगी पडतील. 'यथा यक्षस्तथा बलि:!' एका वेळची भूक चार दोन घासांची, मग अशा भुकेला एकदम ताटभर साखरभातापेक्षां एक लहानशी सुटसुटीत लाडवाची गोळीच अधिक बरी नव्हे काय?

असो; सामान्य वाचकांना अशा खंडसंग्रहात्मक पुस्तकापासून होणाऱ्या फायद्याची ही गोष्ट तर झालीच. पण एखाद्या चरित्रकाराला—व विशेषतः एकाच चरित्रविषयाचे अनेक चरित्रकार होऊं शकतात, त्या सर्वांना— अशा 'आठवणी व आख्यायिका' यांचा विशेष उपयोग असतो. अशा प्रत्येक आठवणींत व आख्यायिकेंत थोडी तरी माहिती म्हणून असते हें तर झालेंच, पण एकाच मुद्याला लागू अशी माहिती निरनिराळ्या आठवणींत किंवा आख्यायिकांत निरनिराळ्या परिस्थितीच्या कोंदणांत बसलेली आढळल्यानें चरित्रविषयाचे विवक्षित गुण किंवा दोष 'सिद्ध झाले' असें मानतां येतें. दहांनीं दहा प्रकारांनीं एकच गोष्ट सांगितली असतां, ती शास्त्रीयदृष्ट्या निःसंशय सिद्ध म्हणून सहजच ठरते. एखाद्याची दृष्टि किंवा अनुमान चुकेल, दोघांचें चुकेल. पण तीच गोष्ट किंवा अनुभव सांगणारे जितके अधिक लोक भेटतील तितकें तिच्या सत्यतेविषयीं अनुमान अधिक सुदृढच होणार !

या पुस्तकांत 'आठवणी व आख्यायिका' या एकाच नांवाखालीं आलेल्या मजकुरांत प्रत्यक्ष, ऐकीव, अनुमानिक ( काल्पनिक मात्र नव्हे ) अशा विविध प्रकारच्या मजकुराची सरमिसळ सहजच झालेली आहे. शास्त्रीयदृष्ट्या त्यांतील ग्राह्य कोणतें, अग्राह्य कोणतें, हें ठरविणें अर्थातच सूक्ष्म व सराइत नजरेचें काम आहे. या 'आठवणी व आख्यायिका' गोळा करणारानें, मजकुरावरून आपली संपादकीय लेखणी फिरवितांना, ही दृष्टि थोडीबहुत ठेवलेली असेलच. तथापि प्रत्येक आठवण किंवा आख्यायिका ही प्रत्यक्ष लेखकाच्या नांवानेंच प्रसिद्ध होत असल्यामुळें संपादकाची एतद्विषयक जबाबदारी पुष्कळशी आपोआप कमी होते. असला ग्रंथ लिहिणाराचा पेशाच मुळीं हा असतो, कीं त्याच्या हातीं येणारा मजकूर तो स्वतः फक्त घासून पुसून सुटसुटीत किंवा आटपशीर करून वाचकांपुढें मांडीत असतो. त्याचें महत्त्व, त्याची विश्वसनीयता किंवा त्यावरून निघणारीं अनुमानें यांविषयीं त्यानें मुग्धच राहावयाचें असतें. ती सर्व कामगिरी वाचकांकडेच राहाते. अशांपैकीं ज्यांचा आपल्या जुन्या शास्त्राशीं किंवा आधुनिक पुराव्याच्या शास्त्राशीं परिचय असेल, त्यांना या ग्रंथातील मजकूर वाचीत असतां प्रथम ग्राह्याग्राह्य व नंतर सारासार विचार चाल-

विण्याचें हौसेचें काम कितीतरी मिळणारें आहे. कातींव रेखींव सत्य कोणचें असेल, दाक्षिण्यामुळें स्पष्टोक्तीला आळीवजा मुरड कोठें पडलेली असेल, अतिशयोक्तीची भर नकळत कोठें पडलेली असेल, प्रेमानें लेखकाचा हात कोठें सढळ झाला असेल, मनाच्या आढीमुळें उल्लेखाला कोठें कार्पण्य आलें असेल, आंतल्या गांठीचा कोणाचा विनोद कोठें साधला असेल, कोठें फसला असेल, हें सूक्ष्म नजरेनें न्याहाळण्याइतका मार्मिक विषय चिकित्सकबुद्धीला दुसरा कोणता असणार? तात्पर्य, या स्फुट व त्रुटित चरित्रखंडांतील मजकुरावरून लो० टिळकांचा स्वभाव जसा प्रगट होत आहे, तसाच लेखनपद्धतीवरून लेखकांचा स्वभावहि दिसून येणारा असल्या-मुळें, मनुष्यस्वभावाची परीक्षा व परिचय यांची या ग्रंथांत वाचकाला मेजवानीच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

असो. बापट याच्या परिश्रमामुळें दोन खंड मिळून सुमारें हजार बाराशें पानाचा हा ग्रंथ प्रसिद्ध होऊन हातावेगळा झाल्याबद्दल सामान्य वाचकवर्ग आणि विशेषत: विद्यमान व भावी टिळकचरित्रकार यांच्यातर्फें श्रीयुत बापट यांचें साभार अभिनंदन करून हा लेख पुरा करतो.

पुणें,
११-७-२९

नरसिंह चिंतामण केळकर

# आ त्म नि वे द न

आपुलिया स्वानुभवें । आपणांस निवेदावें ।
आत्मनिवेदन जाणावें । ऐसें असे ॥

—श्रीसमर्थ

केले 'राष्ट्रसूत्रधार' लोकमान्य लोकश्री बाळ गंगाधर टिळक यांच्या 'आठवणी व आख्यायिका' यांचा प्रथम खंड गेल्या वर्षी मी टिळकजयन्तीच्या दिवशीं प्रसिद्ध केला. सदर ग्रंथाच्या आत्मनिवेदनांत मी असे म्हटलें होतें कीं, 'ईशकृपेनें योग आल्यास लोकमान्यांच्या आणखी अधिक आठवणी द्वितीय खंडांत प्रसिद्ध करण्याचा माझा विचार आहे.' संकेतार्थी एकीकडे असे विधान करून लगेच दुसरीकडे त्याचवेळीं त्याच ग्रंथावर 'प्रथम खंड' असे निश्चितपणें लिहिण्यास मी प्रवृत्त झालों; यावरूनच द्वितीय खंडाचा संकल्प मी त्याचवेळीं मनांत करून ठेविला होता हें उघड होईल. आणि त्या संकल्पाप्रमाणे लोकमान्यांच्या 'आठवणी व आख्यायिका' यांचा हा द्वितीय खंड आज वाचकांच्या हातीं देण्यास मला फार आनंद होत आहे.

चरित्रग्रंथाच्या इमारतीस मराठी भाषेमध्यें 'आठवणीं'च्या ह्या एका नवीन दालनाची जोड देण्यांत येत आहे असे क्षणभर कल्पिल्यास, लोकमान्यांच्या चरित्रग्रंथाच्या या दालनाचा एक भाग प्रस्तावनारूपाने गतवर्षी श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांच्या हस्ते उघडण्यांत आला, तर यंदाचे वर्षी तशाच रीतीनें त्याच्या दुसऱ्या भागाचें उद्‌घाटन लोकमान्यांचे भक्त व वऱ्हाडचे सुप्रसिद्ध विद्वान् पुढारी श्रीयुत माधवरावजी अणे यांच्या हस्तें करण्यांत येत आहे हे पाहून सर्व वाचकवृंदास आनंद झाल्याखेरीज राहणार नाहीं.

गतवर्षी तयार झालेलें तें अर्धेच काम करण्यास किती व कसकसे श्रम पडले, काय काय अडचणी आल्या, कोणकोणते अनुभव मिळाले वगैरेंचा वृत्तांत त्यावेळीं निवेदन करण्यांत आलाच आहे. त्यानंतर पुढील कामास लागण्यापूर्वी, माझ्या मनाची स्वाभाविकपणेंच अशी एक समजूत होती कीं, आतां सदरहू कामाचा बोलबाला बराच झाल्यामुळें लोकमान्यांच्या वाङ्मयस्मारक-मंदिराच्या इमारतीचा हा दुसरा मजला चढविण्याचें काम बरेंच सोपें जाईल व कदाचित् कल्पनेबाहेरहि यशःप्राप्ति होईल, आणि या बाबतींत माझ्याप्रमाणें इतरांसहि असेंच वाटणें स्वाभाविक होतें. धुळ्याच्या 'श्रीरामदास आणि रामदासी' या मासिकाच्या संपादकांनीं तर त्यावेळीं जाहीरपणें अशी इच्छा प्रगट केली होती कीं, 'आतां यापुढें रा० बापट यांना इतका त्रास पडणार नाहीं; आणि ईश्वराची

आम्ही अशी प्रार्थना करतों कीं, असे आणखी निदान दोनतीन खंड प्रकाशित करण्याचें भाग्य त्यांच्या वांट्यास येवो." परंतु दुर्दैवानें नमूद करणें प्राप्त आहे कीं, हा सर्वांचाच अदमास अगदीं चुकीचा ठरला व मला अनुभव मात्र अगदीं उलट आला. पण याचें कारण कदाचित् असेंहि असू शकेल कीं, आठवणींच्या फुलबागेंतील चटकन् प्रथम हाताशीं येण्यासारखीं जेवढीं म्हणून आठवणींचीं उमललेलीं फुलें होतीं तेवढीं सर्व गतवर्षी निःशेष रीतीनें खुडून झाल्यामुळें आतां राहिलेलीं फार अडचणींत व क्वचित् काट्याकुट्यांतहि असल्यामुळें तीं संपादन करण्यास तसेंच श्रम पडावे हें अगदीं स्वाभाविक आहे. आणि खरोखरच गेले नऊदहा महिने म्हणजे जवळजवळ सर्व ऋतूंत हीं सर्व तऱ्हेचीं स्मृति-सुमनें पैदा करण्याच्या नादांत अहोरात्र मी आठवणींच्या फुलबागेतून अविरतपणें संचार करीत असता, कांहीं विश्वासाच्या ठिकाणीं मला ठेंचा लागल्या, कांहीं ठिकाणीं अतिसात्त्विकपणाच्या निसरड्यांत पाय घसरला, कांहीं ठराविक ठिकाणीं पायांत अपमानाचे कांटे बोंचले, आणि कांहीं ठिकाणीं तर आशेच्या हिरव्यागार तृणाच्छादित खळग्यांत पडून अखेर मुखच्छेदनापर्यंत पाळी आली! तथापि खिन्न व निराश न होतां, केवळ लोकमान्यांविषयींच्या भक्तिप्रेमातिशयानें मोहित होऊन, कोठें तीं उत्कृष्ट स्मृतिकुसुमें दिसतांच, अगदीं अडचणीच्या जागेतहि हात घालून तीं प्राप्त करून घेण्याचा मी छंद घेतला होता. कारण अशा प्रयत्नाच्या अभावींच Full many a flower is born to blush unseen अशीच त्यांचीहि अवस्था झालेली असते असा माझा अनुभव असल्यामुळें, तीं मिळविण्याकरितां मी विशेष आग्रह धरीत असें. अर्थात् अशा प्रयत्नांत चार ओरखडे निघणें अपरिहार्य असतें!

प्रथम खंडाच्या पहिल्या व दुसऱ्या आवृत्तींत प्रारंभींच एक जाहीर विनतीचें जोड कार्ड जोडण्यांत येऊन, त्यांत ज्यांना लोकमान्यांच्या आठवणी माहीत असतील, त्या त्यांनीं स्वतः पाठविण्याबद्दल व ज्या दुसऱ्या कोणांस त्या ठाऊक असतील त्यांचें नांव व गांव कळविण्याबद्दल मी विनंति केली होती. त्या तीन-साडेतीन हजार कार्डांपैकीं फक्त सतरा कार्डें भरून आलीं; व त्यांपैकीं आठवणी पाठविण्याच्या अभिवचनाचीं नऊ असून, दुसऱ्यांकडे बोट दाखविण्यांत आलेलीं पांच होतीं; राहिलेलीं बाकीचीं तीन निव्वळ औपचारिक अशींच होतीं. या चौदा गृहस्थांना वेळोवेळीं विनंति केल्यावरून अखेर सात जणांकडून मजकूर मिळाला. बाकीच्या गृहस्थांकडून नकारात्मक उत्तर मिळेपर्यंत मला प्रत्येकास चार पांच वेळां लिहावें लागलें! प्रथम खंडाच्या वेळीं लोकमान्यांशीं परिचित असलेल्या अशा तीनशें गृहस्थांना आपल्या आठवणी देण्याबद्दल मीं विनंति केली होती. पैकीं सुमारें दीडशें लोकांकडून मजकूर मिळाला व बाकीच्या बहुतेक सर्वांकडून त्याच वेळीं नकार मिळाला होता. येणेंप्रमाणें आठवणी मिळविण्याचें हें प्रकरण त्याचवेळीं

निकालांत निघाल्यावर व लोकमान्यांविषयीं कांहीं विशेष सांगूं शकतील अशा सर्व लोकांची यादी संपल्यावर, आतां दुसऱ्या खंडांत देण्यासारख्या आठवणी तुम्ही कोणाकडून मिळविणार व हें होणार तरी कसें, असें काळजीच्या कांहीं जिवलग मित्रांनीं सहानुभूतिपूर्वक मला विचारून शेवटीं दुसऱ्या खंडाची नाद अजिबात सोडण्याबद्दल त्यांनीं मला आग्रहानें सांगितलें. परंतु पाश्चात्य राष्ट्रांतील साधारण प्रतीच्या गुणी माणसासंबंधानें जरें ग्रंथावर ग्रंथ निर्माण होतात, तर लोकमान्यांसारख्या शतकास ललामभूत होणाऱ्या महाविभूतीच्या संबंधाची माहिती, नांव घेण्यासारखा एक चरित्रग्रंथ वगळल्यास, अवघ्या एक-दोन पुस्तकांपलीकडे जाऊं नयें ही गोष्ट मनास फार लागून राहिली; व आपण नेटानें, सतत, आस्थापूर्वक व दीर्घ परिश्रम करीत राहिल्यास या महापुरुषाच्या आणखी कित्येक गोष्टी प्रसिद्ध करण्याचे भाग्य आपल्या वांट्यास आल्याखेरीज राहाणार नाहीं अशा श्रद्धेनें व आत्मविश्वासानें मी ह्या द्वितीय खंडास हात घातला. आठवणी देण्यासारख्या लोकमान्यांच्या बहुतेक सर्व परिचित लोकांचा परामर्ष निःशेष रीतीनें प्रथम खंडाचे वेळींच घेतला गेल्यावर आतां माझ्या स्नेह्यांच्या काळजीप्रमाणे नवीन कोणत्या लोकांस आठवणींबद्दल मी विनंति करावी अशी मला मुळींच कधीं चिंता पडली नाहीं. कारण वर-संशोधनार्थ मुलीचा बाप ज्याप्रमाणें कांहीं एका विशिष्ट दृष्टीनेच सर्व जगाकडे पाहात राहातो तद्वत् गेले आठनऊ महिने मी प्रत्येकाकडे 'यांचा कांहीं लोकमान्यांशीं संबंध येऊन, हे कांहीं त्यांचेसंबंधीं आपणांस विशेष सांगूं शकतील काय?' यांच लोभी दृष्टीनें मी पाहात असें. किंवा अत्यंत तिखट घ्राणेंद्रियांचा प्राणी ज्या बाजू-कडून भक्ष्य वस्तूचा नुसता वास येईल त्या दिशेकडे लोभावून एकसारखा हुंगीत जातो, त्याप्रमाणे अमक्यास आठवणी ठाऊक आहेत असें नुसते कानां-वर येतांच गल्लोगल्लीं व रस्तोरस्तीं फिरत राहून, त्यांचा छडा लावून, व नाहीं त्या ठिकाणीं पत्रे पाठवून मी मजकूर मिळविण्याचा उद्योग केलेला आहे. आणि लिहिण्यास आनंद वाटतो कीं, अशा तऱ्हेनें सुमारें साडेसहाशें सद्-गृहस्थांशीं माझा संबंध येऊन त्यांजकडून आठवणी मिळविण्याचा मी प्रयत्न केला. फार काय, पण इंग्लंडचे राजे व हिंदुस्थानचे बादशहा पंचम जॉर्ज यांचेशीं लोकमान्यांचा संबंध आल्याचें कळल्यावरून खुद्द त्यांचेपासून तों थेट गायकवाड-वाड्याच्या देवडीवर बसणाऱ्या भय्यापर्यंत आठवणी मिळविण्याचा मी प्रयत्न केला आहे. पण यापैकीं हातांच्या बोटावर मोजण्याइतक्या व्यक्तींकडून आपण होऊन किंवा माझ्या पहिल्याच विनंतीवरून मजकूर मिळाल्याचें सोडून दिल्यास बाकीच्या सर्वांकडून तो मिळविणें म्हणजे एक प्रकारचें दिव्यच करावें लागलें असें मी क्षणभर म्हटल्यास, वाचकांस ही अतिशयोक्ति वाटून तिच्या दर्पानें कदाचित् ते जरा नाकेंहि मुरडतील; पण काय करावें? मला तसा प्रत्यक्ष

अनुभव आला खरा! या शाहेसहाशें टिळकप्रेमी सज्जनांना आपलें टिळक-प्रेम—टिळकस्मृति—व्यक्त करण्याबद्दल मी एकंदर अठ्ठावीसशें बहात्तर पत्रें लिहिलीं; व कित्येकांच्या अनेक वेळीं समक्ष गाठीभेटी घेतल्या त्या वेगळ्याच! छापील पत्रानें अगत्य वाटत नाहीं म्हणून एक घोटभरहि छापील मजकुराचें पत्र न पाठविता व अर्थात् प्रत्येकाचा मजकूर वेगवेगळा असल्यानें, तीं सर्व पत्रें मी जातीनें हातानेंच लिहिलीं होतीं. लोकमान्यासबंधानें आपण काहीं सांगू शकू असें एकदा एखाद्यानें म्हटल्यावर मग त्याजकडून एक मजकूर तरी मिळविणें किंवा अखेर त्याजकडून नकार मिळेपर्यंत तरी त्याच्यामागें लागणें मला जरूर वाटे, त्याशिवाय मला चैनच पडत नसे. कित्येकाकडून मजकूर देण्याचें अभिवचन मिळाल्यामुळें पण शेवटपर्यंत तो हातीं येत नाहीं असें दिसल्यावरून त्यास एकसारखीं रजिस्टर पत्रें व तारा पाठवाव्या लागल्या, तेव्हां कोठें काहींचेकडून तो हातात पडला. याशिवाय मजकूर मिळविण्याकरता स्थानिक मंडळीकडे तर किती खेपा घालाव्या लागल्या असतील याला कांहीं सीमाच नाहीं. आणि म्हणूनच कीं काय, एका प्रसिद्ध पुढाऱ्यानें मला 'आठवणींचें बोअरिंग मशीन' असें विनोदानें आपल्या पत्रात म्हटलेलें दिसतें! असो.

या वरील सर्व निरूपणावरून कोणाजवळ आठवणी नाहींत किंवा त्या देण्याची कोणाची इच्छा नाहीं असें कोणी अनुमान काढील तर मात्र ती मोठी चूक होईल. मग जें कार्य सहज व्हावें त्यास इतके कष्ट का पडावे? याला उत्तर लोकांची अनास्था असें कोणी दिल्यास, 'तोतयाचें—बंड' या नाटकांत नाटक-कारानीं नाना फडणविसाच्या तोंडांत घातलेल्या शब्दानें मी असेंच म्हणणार कीं, 'सर्व जगावर हा अनास्थेचा आरोप, मी कसा करूं?' पण येवढें मात्र म्हणतों कीं, अशा प्रकारच्या पाश्चात्य धर्तीच्या नवीन वळणाची आम्हांस संवय नाहीं हेंहि पण याचें एक निःसंशय कारण आहे. आणि हें माझें विधान पाश्चात्य देशातील नमुन्यादाखल खालीं दिलेल्या एका गोष्टीवरून वाचकांस पटल्याखेरीज राहाणार नाहीं अशी उमेद वाटते.

एडिंबरो येथें रॉबर्ट लुईस स्टीव्हन्सन्-क्लबमध्यें १९२१ च्या नोव्हेंबरांत स्टीव्ह-न्सन्च्या वार्षिक पुण्यतिथीच्या निमित्तानें झालेल्या जेवणावळीनंतर त्याच्या एका रोझेलाइन मॅसन् या भक्ताच्या मनांत आलें कीं, रॉबर्ट लुईस स्टीव्हन्सन्, याच्या-विषयींच्या आठवणी सर्वांकडून गोळा करून त्यांचा एक ग्रंथ प्रसिद्ध करावा. त्याप्रमाणें त्यानें वर्षभर प्रयत्न करून पुढील सालीं म्हणजे सन १९२२ मध्यें 'I can Remember Robert Louis Stevenson' या नावाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. आठवणींचा नायक हा एक चांगला पण निवळ कादंबरीकार असून व तो मृत्यू पावून पंचवीस वर्षांपेक्षां अधिक काल होऊन गेला असतांहि, त्याच्या आठवणीसंग्राहकानें मिळविलेलें यश लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तो आपल्या आत्मनिवेदनांत म्हणतो,

'During the whole of this last year, these contributions have been arriving, from Scotland and England, from Australia and America and the South Seas, each one giving some fresh, intimate, living glimpse of Stevenson, or throwing a flash-light on some otherwise forgotten moment of his life, or recapturing some impression once received of him, ......My first thanks are due to all these contributors who thus materialised the idea, by *immediately* sending to me their personal memories to form this combined tribute from so many relatives, intimate friends, chance acquintances, schoolfellows, companions of early years, comrades of latter days,—all of whom can say 'I can remember Robert Louis Stevenson' अशा प्रकारचे उद्गार वास्तविक त्याच्या ग्रंथनायकापेक्षां शेंकडो पटीनें अधिक श्रेष्ठ असलेल्या लोकमान्यांसारख्या पुरुषाच्या ग्रंथाचे बाबतींत काढण्याचें आमचें भाग्य आम्हालाहि कां लाभू नये ? पण 'The large, quick and cordial response which came in reply to my editorial letters, requesting Contributions was a delightful encouragement' असें मॅसननें स्वतःविषयीं आपल्या आत्मनिवेदनांत म्हटले आहे, याच्या अगदीं उलट अशी आमची स्थिति झाली. लो० टिळकांसारख्या अनेक विषयांत तज्ञ म्हणून त्यांचे कार्यक्षेत्रहि विस्तृत असल्यानें हरतऱ्हेच्या अनंत लोकांशीं संबंध आलेल्या व नुकत्याच दिवंगत झालेल्या अत्यंत लोकप्रिय अशा या पुरुषाच्या आठवणींच्या प्रथमखंडाचे वेळीं गेल्या वर्षी मी तीनशे लोकांना हजार अकराशे पत्रे पाठविलीं तेव्हां त्यांपैकीं सुमारे दीडशें लोकाकडून आठवणी मिळाल्या; आणि एकतारीप्रमाणें निवळ वाङ्मयाची तेवढीच तार छेडणाऱ्या व दोहोंहून अधिक तपांपूर्वी होऊन गेलेल्या स्टिव्हन्सनसारख्यांच्या आठवणी मिळविण्याकरितां रोझेलाइन मॅसन् यांनींहि जगभर पत्रव्यवहार केला; पण तो तीनशें पत्रें पाठवून दीडशें लोकांच्या आठवणी मिळवून ! ! आणि शिवाय ज्यांस आठवणी असून त्यांस विचारतां आले नाहीं असे अजून कितीतरी लोक शिल्लक असतील ! कारण या बाबतींत ते म्हणतातः "I am regretfully aware that although nearly three hundred editorial letters of request have been sent, addressed to all who were known to remember Stevenson, or who were thought to possibly remember Stevenson, yet that there must be many more who do remember him and have not been reached."

असो; तात्पर्य आपल्या मराठी भाषेमध्यें वाङ्मयांतील या एका नवीन तऱ्हेच्या वळणाचा नूतन प्रवेश होत असतांना असें होणें अगदीं स्वाभाविक आहे. व त्याबद्दल कोणाची तक्रारहि असू शकणार नाहीं, हें उघड आहे. तथापि नेहमीं माझ्या असेंहि मनांत येतें कीं, आपल्यापेक्षां अधिक योग्यतेच्या व सर्व दृष्टीनें अधिकारी अशा कोणी प्रसिद्ध पुरुषानें जर या कार्यास हात घातला असता तर हें कार्य अधिक यशस्वितेनें होऊन माझ्यापेक्षा अगदीं उलट अनुभव त्यास लोकास निवेदन करतां आला असता; पण असें म्हणावें तर लोकमान्याच्या चरित्राकरितां साधनसामुग्री पुरविण्याबद्दल चरित्र प्रसिद्ध होण्यापूर्वी, श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांनीं केसरीद्वारें दोन वेळा जाहीर विनंति केली असताहि तिचा कसा परामर्ष घेतला गेला हेंहि विसरून चालणार नाहीं !

तथापि, यावर असा आक्षेप घेतला जाईल कीं, कांहीं नाहीं म्हटलें तरी इतक्या लोकांनीं तुम्हास अखेर मजकूर दिलाच कीं नाहीं ? होय, तो त्यांनीं देण्याची कृपा केली याबद्दल खरोखरच मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें हें येथें कृतज्ञतापूर्वक नमूद करणें माझें कर्तव्य आहे. व असेंहि म्हटल्याखेरीज मला राहावत नाहीं कीं, त्या सर्वांनीं आपला बहुमोल वेळ खर्च करून, श्रम घेऊन व स्वार्थत्यागपूर्वक आपआपल्या आठवणींची बहुमोल सामुग्री देऊन हें सार्वजनिक टुमजली तिलक-स्मृतिमंदिर बांधण्याचें मनात आणिलें नसते तर लोकमान्याच्या वाङ्मयस्मारकाची ही मूळ कल्पना गर्भावस्थेंतच लुप्त झाली असती यांत विकल्प शका नाहीं. पण तात्त्विक रीतीने बोलावयाचें तर अशा प्रकारचें कार्य तोलास तोल मिळून सुलभ रीतीनें व यशस्वीपणें तडीस जाणे निराळें, आणि त्यासाठीं आग्रह, मीड किंबहुना खुषांची सक्ति करावी लागून तें पूर्ण होणें हें निराळें. यापैकीं पहिला प्रकार पाश्चात्य देशामधून बहुशः आढळून येतो. हाच पौर्वात्य व पाश्चात्य यांच्यामधील वाङ्मयसेवेंतील फरक होय एवढें नमूद करणें भाग आहे. प्रथम खंडाच्या आत्मनिवेदनांतील या असल्याच विचारसरणीचा माझ्या कांहीं रसिक व विद्वान् मित्रास राग येऊन त्यांनीं त्याबद्दल त्यावेळीं माझी हजेरीहि घेतली ! त्याचें म्हणणें इतकेंच कीं, तुम्ही आपल्या प्रांजलपणाच्या व सत्यनिरीक्षणाच्या नादात आपल्याच लोकाचें दैन्य, मांद्य, अनास्था व विचारदारिद्र्य यांचें प्रदर्शन करून अप्रत्यक्षपणें तुम्हीच टिळकाची किंमत हलकी करीत आहांत, हे तुमच्या लक्षात येत नाहीं ! याबद्दल मला इतकेंच म्हणावयाचें कीं, छत्रपति श्रीशिवाजीमहाराज यांच्यासारख्या अवतारी पुरुषाचें स्मारक पूर्वकाळीं होऊ शकले नाहीं म्हणून जर त्या विभूतीस कांहीं कमीपणा येत नाहीं, तर लोकमान्याच्या आठवणी आपल्या लोकास ही नवीन तऱ्हा आगवळणी नसल्यामुळे त्यांचेकडून मिळवितांना कसे अनुभव आले ही वस्तुस्थिति मोकळेपणानें सांगताच त्यावरून लोकमान्यास कमीपणा कसा येतो, हेंच मला समजत

नाहीं. नभोमंडळांतील चंद्रसूर्यांस मेघांनीं आच्छादून टाकलें म्हणून त्यांचें तेज लुप्त झालें असें कोणी म्हणेल काय?

उपरि निर्दिष्ट केल्याप्रमाणें, साडेसहाशे सद्गृहस्थांपैकीं सुमारें पावणेतीनशें लोकांकडून एकंदर मजकूर आला. वास्तविक प्रथम सर्वांस मजकूर मागतांना जर पराकाष्ठेच्या आग्रहानें तो त्यांजपाशीं मागावयाचा तर प्रत्येकाचा तो प्रसिद्ध करणें हें शिष्टाचारास धरून आहे हे अगदीं खरें; पण ज्यांच्या आठवणी अगदींच सामान्य स्वरूपाच्या, फक्त ज्यांच्या त्याच्या स्वतःपुरतेंच त्यांचे खरोखर महत्त्व, ज्या लौकिक स्वरूपाच्या नसून वैशिष्ट्यविहीन, काहीं केवळ आत्मगौरवपरच, काहीं लोकमान्यांच्या निवळ सार्वजनिक उद्‌गारांनींच भर-लेल्या, काहीं केवळ ऐकीव व काहीं निरनिराळ्या रीतींनें तीच तीच हकी-कत पुनःपुन्हा निवेदन करणाऱ्या इत्यादि स्वरूपाचा सुमारें पंचवीस तीस लोकांचा मजकूर अजिबात बाजूस ठेवणें प्राप्त झालें. व बाकीच्यांच्या मजकुरापैकीं जो अप्रस्तुत भाग वाटला त्यास निरुपायानें कात्री लावावी लागली याबद्दल वरील सर्वांनीं मला क्षमा केली पाहिजे. या बाबतींत प्रथम खंडाच्या आत्मनिवेदनांत मी काढलेले उद्गार येथें पुनरुक्त करणें जरूर वाटतें. "लेखकाकडून जसा मजकूर आला तसा तो तारतम्य-बुद्धि व विवेचकपणा न चालविता सर्वच्यासर्वच, जसाचातसाच मी छापला असता तर त्यास खास हजार बाराशें ( आता तर दोन अडीच हजार ) पानेंहि पुरलीं नसतीं व तो एक नवलकथाचा अद्भुत अजबखाना किंवा गोपाळकालाच बनला असता!" पण असें करण्यानें काहीं विशिष्ट लोकांच्या मजकुरास मुकावें लागतें असा मला अनुभव आला. कारण त्यांच्या मजकुरास हात लावणें हा त्यांना अपमान वाटतो. एका थोर सन्मान्य वाङ्मयभक्तानें मला कळविलें कीं, "पूर्वी प्रथम खंडाकरितां पाठविलेल्या आठवणींतील माझ्या तीन आठवणी तुम्ही गाळल्या व बाकीच्यानाहि थोडीफार कात्री लागलेली आहे. खुद्द लोकमान्यांनीं माझ्या लेखांना कातर कधीं लावली नाहीं ती आपण लावलीत, हें तुम्हास पुनः आठवणी न पाठविण्याचे खरें कारण होय." पण सुदैवानें अगदीं याच्या उलट दुसऱ्या एका विद्वानानें कळविलें कीं, "दीर्घसूत्री, आत्मवर्णनपर व अप्रस्तुत असा मजकूर आम्हां सर्व लेखकांच्या लिखाणांतून कमी करून लांकडांच्या मोठ्या दुळवटापैकीं पाहिजे तेवढाच भाग कापून वेंकून त्याचा प्रमाणशीर सुंदर देव्हारा बनविणाऱ्या चतुर सुताराप्रमाणें सर्व लेखकांच्या लेखांतील अवश्य तेवढाच भाग वेंकून त्याचा अति मनोहर संग्रह बनविणाऱ्या तुमच्या कौशल्याबद्दल आपलें अनःपूर्वक अभिनंदन करतो." याबाबतीनें टीकात्मक एक अक्षराहि अधिकउणें

न लिहितां, स्तुति-निंदा-निरपेक्ष मनानेंच आपण आपलें कार्य करीत राहावें हा यापासून बोध घेण्यासारखा आहे अशी मी मनाश खूणगांठ घातली.

पहिल्या खडांत ज्याच्या आठवणी आल्या आहेत अशा लोकांचीं कांहीं थोडीं नांवें पुन्हा या ग्रंथांत आलेलीं पाहून आक्षेपकांस आक्षेपास भांडवल मिळाल्यासारखें होईल; पण त्यांस मला एवढेंच सांगावयाचें कीं, आठवण सांगणारा जुना झाला तरी त्याची आठवण नवी आहे ना? पात्र जुनें असलें तरी त्यांतून वाढावयाचीं पक्वान्नें ताजीं व मिष्ट आहेतना? झालें तर मग; ऐन पक्वान्न सोडून पात्राची व्यर्थ चर्चा करीत बसणें केव्हांहि अरसिकपणाचेंच होईल!

प्रथम खडांत माझे नांवावर सुमारें शभर पानांचा मजकूर आलेला आहे. याचें कारण अनेकांकडे मी जाऊन, त्यांनीं सांगितलेल्या आठवणी मी लिहून काढून त्या सर्व माझ्या स्वतःच्या आठवणींस जोडूनच त्यावेळीं दिल्या गेल्या; पण या खेपेस मी तसे न करता, ज्यानीं त्या लिहून न देतां तोंडींच सांगितल्या त्या मी घरीं येऊन लिहून काढून पुन्हा त्यांचेकडे जाऊन, त्या त्यांस दाखवून, जरूर तर त्याची सही घेऊन, त्या ज्याच्या त्याच्या नांवाखालींच छापण्याचा अट्टाहास केला आहे. व या अशा मजकुराचीं पाने सहज शें दोनशें होतील यांत शका नाहीं. असें करण्याने या खेपेस फार त्रास पडला खरा, पण त्या ज्याच्या त्यांच्या नावावर प्रसिद्ध होण्याच्या औचित्यानदानें तो त्रास भरून निघाला असे म्हणण्यास हरकत नाहीं. व या रीतीनें ज्यांचा मजकूर देता आला नाहीं अशाचाच तेवढा माझ्या आठवणींस जोडून दिला आहे. तसेंच परगावाहून आलेलीं मोडी लिपीचीं बाडें बाळबोध करणें, कित्येकामध्यें सन, तारखा भरणें, काहीं सक्षिप्त व त्रुटित मजकुरानें लिहून पाठविलेल्या मजकुरांचीं बाडें पूर्ण लिहून काढून पुन्हा तीं सर्व ज्याची त्याच्याकडे पसतीकरितां पाठवून परत मिळविणें, अत्यत दुर्वाच्य असलेला मजकूर खिळे जुळविणाऱ्याच्या सोयीकरितां पुन्हा सर्व सुवाच्य लिहून काढणें वगैरे वगैरे जिकिरीचीं कामे, काय कारण असेल न कळे, गेल्या खेपेपेक्षा या खेपेस फार करावीं लागलीं.

हें सर्व येथें सागण्याचें कारण इतकेंच कीं, लोकमान्यांच्या आठवणींचा सग्रह करणें हें मी माझें खाजगी काम समजत नसून तें एक मोठ्या जबाबदारीचें, पवित्र व सार्वजनिक काम असेंच मानतों आणि म्हणून त्या कामाचा सक्षेपानें कां होईना, अहवाल जनतेस सागणें हें माझें कर्तव्य समजतों.

सपादक या नात्यानें वास्तविक हातीं पडलेल्या लोकमान्यांच्या या सर्व आठवणींच्या साधनसामुग्रीचा योग्य रीतीनें, सूक्ष्म दृष्टीनें व चिकित्सकपणाने अभ्यास करून, त्याची संगति लावून व शेवटीं त्यांतून निघणाऱ्या प्रमेयांवरून त्यांच्या चारित्र्यासबधानें कांहीं सिद्धांत बांधून त्याचें तात्त्विक व सोपपत्तिक विवरण एखाद्या स्वतंत्र अध्यायांत विस्तरशः करणें अगदीं अवश्यक होतें; पण ग्रंथ-

प्रकाशनाच्या व शेवटपर्यंत सामुग्री मिळविण्याच्या बाबतींत मनास असावी तशी स्वस्थता नसल्यामुळें व मर्यादित काळाच्या नियंत्रणामुळें हें काम मला करितां आलें नाहीं याबद्दल मनास फार खेद होतो. तसेंच एकंदर मजकुराची विषयवार निवड न करितां किंवा दुसरी कोणती एखादी स्वतंत्र पद्धत न स्वीकारितां अगर कांहीं एका विशिष्ट तऱ्हेचें कलम हातांत घेऊन त्यांची सजावट न करितां आला त्या क्रमानें मजकूर मुद्रित केला हें सुमार झालें, असेंहि कोणास वाटणें स्वाभाविक आहे. प्रथम खंडावर अभिप्राय देतांना एका पत्राचे विद्वान् संपादक म्हणतात, "लोकमान्यांचीं धार्मिक, राजकीय, सामाजिक वगैरे बाबींसंबधाचीं मतें विषयवारीनें न देतां अगर साकल्येंकरून त्यांचें स्वरूपाविष्करण न करितां, लोकांनीं पाठविला तसा मजकूर छापून टाकला हें बरें झालें नाहीं;" तर दुसऱ्या एका प्रसिद्ध मासिकाचे संपादक लिहितात, "...... लिहून आलेलीं स्फुट प्रकरणें संपादकांनीं विषयवार लावलीं नाहींत हें फार चांगलें केलें आहे. किंबहुना हें पुस्तक इतकें चित्ताकर्षक होण्याचें हेंच आद्य कारण आहे. ग्रंथ कोठेंहि उघडावा, त्या प्रकरणापुरता रस तेथे तेथें उभा आहे. स्फुटपणामुळे अचानकपणा व अचानकपणामुळे रसाविर्भाव हा या ग्रथांत विशेष आहे." येणंप्रमाणें परस्परविरोधी मतांस परस्परांचा सक्षेप देऊन अखेर आपणांस जें योग्य दिसेल तेंच करीत असावें हेंच इष्ट वाटतें. तथापि एवढे खरें कीं, लोकमान्यांच्या या सार्वजनिक चरित्र-लेखकांची वर्गवारी केली असती तर कांहीं गोष्टींवर विशेष प्रकाश पडला असता व त्यापासून कांहीं बोधहि घेतां आला असता. पण विस्तारभयास्तव आतां त्याचा निव्वळ उल्लेख करण्यापलीकडे आपण कांहींच न करणें अधिक बरें !

सदर खंडांतील इंग्रजी मजकुरासंबंधानें येवढेंच म्हणावयाचें कीं, त्यांपैकीं कांहीं भाग फारसा आठवणीदाखल नसून तो निव्वळ गुणवर्णनपर ( appreciation) असतांहि घेतला आहे याचें कारण माझ्या इंग्रजी आठवणींच्या पुस्तकाचे प्रस्तावनालेखक श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांनीं लिहिलेल्या प्रस्तावनेतील त्यांच्याच शब्दांत सांगतों म्हणजे झालें. ते म्हणतात, "The reminiscences contained in this book are mostly by those who came into contact with Lok. Tilak, but comparatively at a distance; and therefore they may look more like appreciations than reminiscences. But even these have their own value as coming from illustrious men and women, who were his contemporary judges and in a few cases also his co-workers."

श्रीयुत केळकरकृत लोकमान्यांच्या चरित्रप्रासादाचे अपूर्ण राहिलेले मजले व त्यावरील शिखर पूर्ण होण्यापूर्वी लोकमान्यांच्या सर्व भक्तांनीं आपापल्या जवळची

'आठवणी-व आख्यायिकां'ची- सामग्रीसुग्री--त्यांस वेळेवर नजर केली तर, उत्कृष्ट कसबी शिल्पकाराप्रमाणेंच त्याचा ते उपयोग करून घेतील व महा-राष्ट्रास-अभिमान बाळगण्यासारखें व चिरकाल टिकणारें लोकमान्यांचें हें एक देदीप्यमान व अतिमनोहर वाङ्मयस्मारक त्याचे हातून पूर्ण यशस्वी होईल अशी कोणीहि अपेक्षा करणें स्वाभाविक आहे; आणि त्याकरितां आठवणींचा आणखी तिसरा खंड प्रसिद्ध केल्यास, त्याचा 'अधिकस्याधिकं फलम्' या न्यायानें अधिक उपयोग होईल असें कोणी म्हटल्यास तें अगदींच अयथार्थ आहे असेंहि नाहीं; तरी पण अशा प्रकारच्या व्यासंगासहि कांहीं स्वाभाविकच मर्यादा असते व सर्व वस्तु प्रमाणबद्ध असण्यातच जें औचित्य व सौंदर्य असतें तें ओळखूनच आतां या पुढें आठवणींचा तिसरा खंड न काढण्याचें ठरविलें आहे व तें योग्य आहे असेंच सर्वांस वाटेल अशी माझी समजूत आहे. कारण बोलून चालून आठ-वणी ह्या राजाच्या स्वारीच्या सैन्यांतील पायदळाप्रमाणें होत; किंवा फार तर असेंहि म्हणतां येईल कीं, चंद्रहारांतील जशा टिकल्या, झाडाचीं जशीं पानें, मधुरी पेढ्यावरील जशा चारोळ्या किंवा नाण्यामध्यें जसा खुर्दा तद्वत्च आठवणी ह्या मुख्य चरित्रग्रंथाच्या पूरक होत. आणि म्हणूनच पूरक वस्तु प्रमाणशीर अस-ण्यांतच खरें स्वारस्य आहे हें ओळखून येथेंच आपण तूर्त तरी पूर्णविराम करणें अवश्य आहे.

शेवटचें काम म्हणजे आभारप्रदर्शनाचें. हरिकीर्तन संपल्यावर शेवटीं खिरा-पत वाटतांना व ती ग्रहण करतांना जो आनंद होतो, तसाच याहि वेळीं होणें अगदीं स्वाभाविक आहे. प्रथम, हा ग्रंथ वाचकांचे हातीं देण्यास प्रामुख्येंकरून जे कारणीभूत झाले, त्या सर्व आठवणीलेखकाचे मी पुन्हा एकवार मनापासून आभार मानतो. तसेंच ज्या सहृदय स्वकीयांनीं हस्तें परहस्तें आठवणी मिळवून देण्याची मला मदत केली त्या अनेक परोपकारी सज्जनाचे उपकार मी विसरणें अशक्य आहे. अर्वाचीन काळच्या वाङ्मययुगांतील ग्रंथरचनेंत पुस्तकाची 'सूची' हे ग्रंथाचे डोळे समजण्यात येऊन त्यास लिहिण्यात येणारी प्रस्तावना हें त्या ग्रंथाचें नाक मानलें जातें. एतदर्थ सौंदर्याच्या ह्या अधिष्ठानाची सदर्हु ग्रंथास सोन्या आणे जोड करून देणारे वऱ्हाडचे सुप्रसिद्ध विद्वान् पुढारी व लोकमान्यांचे अनुयायी श्रीयुत माधव श्रीहरि ऊर्फ बापूजी अणे यांनीं कार्यबाहुल्य असताहि या ग्रंथास प्रस्तावना लिहिण्याची कृपा केली याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें. तसेंच ज्यांचा उल्लेख केल्याशिवाय माझ्यानें राहवणार नाहीं असे केसरी-मराठा पत्रांचे मॅनेजर व ट्रस्टी श्री० बाबासाहेब विद्वांस व माझे मित्र श्रीयुत वासुदेव कृष्ण भावे, बी. ए. उपसंपादक केसरी, कवि व वाङ्मयविशारद् यशवंत नरसिंह केळकर ( संपादक, गीत-द्विदल ), श्रीयुत गोपाळ हरि घारप, असिस्टंट मॅनेजर केसरी-मराठा, प्रस्तुत ग्रंथाच्या योजनेच्या बाबतींत उपक्रमापासून माझे सहकारी

असलेले प्रेमळ मित्र श्रीयुत काशीनाथ नरसिंह ऊर्फ बापूराव केळकर, बी. ए. (टिळक म० विद्यापीठ) यांचें मला अनेक प्रकारें साहाय्य झालें आहे व त्याबद्दल मी त्यांचा उपकृत आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या दोन्ही खडांचें कामीं मला कायमचे उपकारबद्ध करणारे 'गीता-बीज'कर्ते श्रीयुत गजानन विश्वनाथ केतकर, बी. ए., एल्एल्. बी., उपसंपादक केसरी-मराठा हे होत. श्रीयुत गजाननराव यांनीं हें पुस्तक आपलेंच समजून तें वेळेवर प्रसिद्ध करण्याच्या बाबतींत कळकळीनें व निरपेक्षपणानें जी अहर्निश मेहनत केली त्याबद्दल त्यांचे योग्य शब्दांनीं उतराई होणें कठीण आहे. तथापि माझ्या शाब्दिक आभारापेक्षा आपले परमपूज्य मातामह लोकमान्य टिळक यांची ही सेवा आपले हातून घडली याच कल्पनेनें ते आपले समाधान करून घेतील अशी मला आशा आहे.

'जगद्धितेच्छु' छापखान्याचे सौजन्यशील मालक श्रीयुत केशव रावजी गोंधळेकर यांस वेळोवेळीं दिलेल्या तसदीबद्दल त्यांची क्षमा मागून त्यांनीं टिळक जयंतीस नाहीं तरी टिळक पुण्यतिथीस पुस्तक तयार करून दिल्याबद्दल व 'विजय' प्रेसचे उत्साही मालक श्रीयुत अप्पासाहेब गोखले यांच्या सर्वसाधारण मुद्रणविषयक सल्ल्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

सर्वांत शेवटचे पण अत्यंत आदरयुक्त व कृतज्ञतापूर्वक आभार मानावयाचे ते गुरुवर्य तात्यासाहेब केळकर यांचे होत. लोकमान्य टिळक यांच्या आठवणींच्या ग्रंथाचे दोन्ही खंड हें केवळ तात्यासाहेबांच्याच कृपेचें व प्रोत्साहनाचें फळ आहे एवढें सांगितलें म्हणजे त्यांच्या उपकारांची कल्पना होणार आहे.

टिळक पुण्यतिथि,<br>केसरी ऑफिस, पुणें.

सर्वांचा नम्र सेवक<br>सदाशिव विनायक बापट.

# अर्पणपत्रिका

सन १८१८ ! ते सन १९१८

म्हणजे

ज्या अभागी शतकाचा प्रारंभ हिंदवी-स्वराज्यसूर्यास्तांत
होऊन ज्याचा शेवट लोकशाहीच्या अरुणोदयांत झाला,
अशा त्या निशामय, परवश, व नैराश्यगर्भ दीर्घ
काळांत ज्या लहान थोर निःसीम व ज्वलत्
हिंदी देशभक्तांनीं, अनेक प्रसंगीं, अनेक
दिशांनीं, केवळ स्वदेशस्वातंत्र्यार्थ,
परमोच्च कर्तव्याच्या स्थंडिलावर
आपल्या प्राणांची आहुति
दिली, त्या सर्व ज्ञात--
अज्ञात पुण्यात्म्यांच्या
पवित्र चरणीं ही
बहुरंगी तिलक--
स्मृतिसुमन-
माला
कृतज्ञतापूर्वक विनम्रभावानें अर्पण केली आहे.

म. वि. आपटे.

# लोकमान्य टिळक
यांच्या
# आठवणी व आख्यायिका
खंड २ रा

## अनुक्रमणिका

लेखक — पृष्ठे

लेखक पृष्ठ

लेखक पृष्ठें

व



भ

लो० टिळक यांच्या

आठवणी व आख्यायिका, खंड २



बाळ गंगाधर टिळक.



# लोकमान्य–तिलक–प्रशस्तिः

[लोकमान्यांचे नाशिकचे बालमित्र व सहाध्यायी
श्री० त्र्यंबक रामचंद्र ऊर्फ बाबा
कुळकर्णीकृत.]

बंदीगृहेऽपि निजसद्मसमानवासः
येन त्वया स्थिरधिया सुखवत् सुसोढः
लोकेष्टहेतुकरणार्थधृतात्मनस्ते
काष्ठांगता ननु परां समता सुबुद्धेः ॥ १

मानपमानसमता सुखदुःखसाम्यम्
इष्टोपपत्तिरथवा विपरीतता च
कारागृहाधिवसतिर्निजवेश्मशय्या
सर्वं समानमिति येन भृशं व्यदर्शि ॥ २

बंदीकृतेन विधियंत्रितकर्मणाऽपि
येन त्वया दृढधिया बुधमान्यलेखः
बंदीगृहेऽप्यरचि तस्य तवात्मदार्ढ्यम्
संश्लाघितुं मितमतिः प्रभवेज्जनः कः ॥ ३

उत्पत्स्यते यदि पुनर्भुवि कोपि धन्यः
स्तोता कविस्तव गुणस्य समानधर्मा
शक्तो भविष्यति न वा स्तवनानि कर्तुम्
योग्यानि ते गुणनिधेऽल्पमतिर्न जाने ॥ ४

गीतारहस्यसुविवेचननामधेयो
योऽयं त्वया व्यरचि लेख इहातिरम्यः
प्राचीनवाङ्मयसमुद्रविलोडनोत्थम्
रत्नं नु सूरिवरकंठविभूषणं नु ॥ ५

अंतर्गताऽप्रतिमता बहिरंगता च
ग्रंथस्य ते विशदता च सुबोधता च
धर्मस्य तत्त्वविनिवेधनकौशलं च
प्रत्येकमप्यतिमनोहरमेव नूनम् ॥ ६

निःपक्षपाताश्रयबुद्धियोगात्
प्रामाण्यसंशोधनपाटवाच्च
सृष्टस्त्वया यः सुविशालयत्नैः
पात्रं स्तुतीनां भविता न कस्य ॥ ७

अक्षय्याऽमलशरदच्छमेघपंक्तिः
निर्दोषाऽमलशरदिंदुकांतिकांता
कीर्तिस्ते लसतु दिगंतरालधाम्नि
सार्धं सा हतरिपुभिर्विनष्टकामैः ॥ ८



# लोकमान्य टिळक
## यांच्या
# आठवणी व आख्यायिका

## खंड २ रा.

### श्री. विरूपाक्षशास्त्री

[ ब्रह्मश्री ६, पूज्यपाद, महामहोपाध्याय, शंकरमठ, बेंगलोर. ]

श्रीमद्बापटसदाशिवाख्येभ्योऽनेकाशिषः । यच्च श्रीमद्भिर्व्यलेखि लोकमान्यतिलकान्वयसंजाततिलकाख्यगंगाधरात्मजबालशर्मणां वृत्तं स्मरणपथागतं किंचिद्विलिख्य प्रहीयतामिति । तच्चाद्य प्रहिणुमो यच्च किंचित्स्मरामः ।

तत्रभवतां लोकहितैकव्यवसायव्यापृतान्तःकरणानां, राजकीयचातुरीचतुराणां समागमः समभूत् किल वाराणसीयात्रासमये, तदानीं साक्षात्तैरेव श्रीमहाराजपटवर्धनप्रासादं समागत्योपनिषद्भूतभगवद्गीतागोचरं परमात्मान संवादयामासुः । गीताविषयविषयकं स्वमतं च प्रत्यपादि, आसीच्च केषुचिद्विषयेषु प्राचीनानां तेषां च विषयप्रतिपादनशैल्यां भेदः परं मोमोत्ति मे स्वान्तमिदं लिखितुं यदा-पुण्यपत्तनाद्बहिर्गमन तैः सर्वोऽपि वाग्यशो गैर्वाणवाण्यामेव न्युपापादि ।

तदानीं च तैः श्रीमद्भगवतः कृष्णमंदिरे वैदिकधर्मविषये महतीं सभामाहूय व्याख्यानाद्यपि कारितम् । अहो चित्रीयते नश्चेतः, ऐहिकबहुकार्यव्यापृतानामामुष्मिके कर्मण्यपि व्यवसायमालोचयताम् । केसरिवृत्तपत्रमुद्रणालयप्रभृति व्यवसायागाराणि सामोद प्रदर्शयामासुः । नूनं वदामो यत्तेषां सारस्वतागारं दृष्ट्वा साश्चर्या अभूम, कियन्ति पुस्तकानि, कोनामाय व्यवसायः, किं नामेदं केसर्याख्यं पत्रं यच्च असंख्यातजनैरहोरात्र पारायणीक्रियते यदीयेन मृगराजनादेनास्मदीया राजानोऽपि भाय भायं यापयन्तिस्म कतिपयान्यहोरात्राणि । तदानीं आत्मनो जन्मवृत्तमपि तैर्याथार्थ्येन न्यवेदि । संमानोऽपि विदुषां करणीयरीत्यैवाकारि तदेतत्सर्वं स्मार स्मारमैतिह्यं पुण्यपत्तनीयं ब्राह्मणानां वेदविद्या जीवत्यद्यापीति नूनं मे निश्चयः समभूत् । देशान्तरादागतानां विदुषां संमानः विद्यापक्षपात औदार्य

चेत्येतदवलोक्य महान्तोषः ममजनि, हन्त च द्रागेव स्थूलसूक्ष्मकारणादिशरीरत्रितयमपि युगपदेव परित्यज्य परे ब्रह्मणि लीना इति ।

---

## वासुदेवशास्त्री अभ्यंकर

[महामहोपाध्याय, फर्ग्युसन कॉलेजातील संस्कृत विषयाचे आचार्य, ( प्रोफेसर ) पुणें.]

श्रीमच्छालिवाहनशकीये रसाब्धिधृतिमिते ( १८२६ ) संवत्सरेऽस्मद्गुरुचरणा अनवरतछात्रगणाध्यापनप्रवर्तितज्ञानसत्रसतोषितोभारमणाः कुशाग्रधिषणैरपि वन्दितचरणाः कदाचित्सतार्पिपुरान्निर्गत्य सह शिष्यवृन्देरमु प्रदेशं स्वागमनेनालंकृत्य द्वित्राण्यहान्यस्मत्सदन स्वनिवासेन पवित्रीकृत्य चरणदर्शनेन परिचर्यावसरप्रदानेन चास्मादृशेष्वनुग्रहमकार्षुः । एतस्मिन्नवसरे श्रीमद्गुरुचरणपरिदिदृक्षयाऽस्मद्गृहे समागता लोकमान्या जगत्प्रसिद्धास्तिलकोपनामानो वलवन्तराया मुहूर्तमात्र स्थित्वा श्रीमद्गुरुचरणकृपाकटाक्षमात समादयामासुः । अत्रान्तरे च लोकमान्यास्तृतीयमण्डलस्थां काचिदृचमधिकृत्य सायणाचार्योदितार्थातिरेकेणार्थान्तरेण योजयामासुः । तेन च निमित्तेन तत्र संनिहितानां छात्राणा लोकमान्याना च क्षणमिव मिथो विवादः संप्रवृत्तोऽभूत् । तत्र बृहस्पतिप्रतिमबुद्धय एत इति गुरुचरणैरुक्तम् । ततश्च लोकमान्याः श्रीमत्सायणाचार्याणा स्थलत्रये प्रमाद इत्यवोचन् । तां च तदीयां गिरमसमीचीनां मन्यमानास्तामसहमानाश्च गुरुचरणप्रभृतयः सर्वे तत्रत्यास्तटस्था आसन् । मया त्वेवमुक्त यत्कस्यापि शास्त्रीयग्रन्थस्य प्रथमावलोकनवेलायां यत्रार्थवैशद्य न भवति तत्र प्रायो वाचकः स्वाज्ञान ग्रन्थकर्तर्यारोपयति ग्रन्थकर्तुरत्र प्रमाद इति । एतादृशि स्थलानि प्रथमवाचनावसरे दश द्वादश वा स्युश्चेत् द्वितीयवाचनवेलायां सस्कारसाचिव्यादर्थवैशद्य भवतीति पञ्चषाण्येवावशिष्यन्ते, तृतीयवाचनवेलायां तु तादृशि स्थलानि द्वित्राण्येवावशिष्टानि स्युर्नैव वा स्युरिति मदीयोऽनुभवस्तथैवैतत्स्यादिति । तत् श्रुत्वा भवेदेवं कदाचिदिति गिरम् गिरन् ततोऽन्यां वाचमवोचन् । ततः क्षणमिव स्थित्वा गुरुचरणाशिष गृहीत्वा स्वगृहमगच्छन् । गतेषु च गुरुचरणाशिष गृहीत्वा लोकमान्येषु श्रीगुरुचरणमुखान्निर्गतैषा वाणी—

' अङ्गीकृतं सुकृतिनः परिपालयन्ति '

इत्यस्य मूर्धाभिषिक्तमुदाहरणमिदमिति । मन्ये च तत्र कदाचित्पद श्रुत्वा स्यादस्या निर्गम इति ।

---

## नागेशशास्त्री बेटगेरी

[ आचार्य, श्री० शं० संस्कृत पाठशाला, धारवाड. ]

(१) अघटिष्ट मे कौमार एव वयसि विद्यमानस्य १९०७ खैस्ताब्दे धारवाड-पुरे श्रीलोकमान्यचरणानां प्रथमो दर्शनमहोत्सवः । तदात्वे च यन्मे प्रास्फुरत्तेषां प्रत्युत्पन्नमतित्व तदत्र मनागुदाह्रियते:—

'प्रावर्तिष्ट तदा निसर्गगंभीरः श्रीशिवरामपंत परांजपे महाशयानां उपन्यास इहत्ये प्रधानन्यायाधिकरणस्य ( जजकोर्ट ) विसृत्वरे चत्वरे, यत्राध्यग्राहि श्री-लोकमान्यचरणैरध्यक्षपदम् । अहंपूर्विकया चानुधावद्भिः श्रोतृव्यूहैर्नीरन्ध्रितं समां-गणं, अतींद्रियगतिकाय भगवते पवनायापि न प्रायच्छदवकाशमिति परा किलेयं काष्ठा जनतायाः कौतुकस्य । अवसिते चोपन्यासे श्रवणविवर बधिरयता रोदो-मडल निरुधानेन तालारवेण समाव्हयमाना, उपन्याससारं सग्रहीतुं वक्तृपीठमध्यरु-क्षत् शामलमनोहरा श्रीलोकमान्यचरणानां मूर्तिः । उपन्यस्य सुधारसस्यदिना वाग्विसर्गेण कंचित्समयं कवचपेशिकांतर्वर्तिनि घटीयत्रे निधाय दृष्टिं " अतीतः कालः " इति व्याहार्षुः श्रीलोकमान्यपादाः । सदैव श्रोतृवृदात् " अस्त्यद्यापि " इति निरगात् वाक्यम् । तदेतदाकर्ण्यैव श्रीलोकमान्यचरणाः प्रावोचन्—

" किमद्यापीति ? अनतो ह्यसौ कालः । न खल्वस्य विद्यते अंतो नाम जात्वपि । तथापि तु व्यवहारे परिच्छिन्न एषः 'शयनकालः भोजनकालः' इत्यादिना " इति ।

( २ ) मदाल्यात् ( मडाले ) प्रतिनिवृत्तेषु श्रीलोकमान्यचरणेषु द्वितीयः पुण्यपुरे गायकवाटहर्म्ये समागमः समपद्यत । हर्म्ये अतर्गंतु परिपृष्टे अभ्यनुज्ञाने, झटित्येव समागतः प्रवेशाय प्रतिसदेशः । आक्रांत किल बलीयसा साध्वसेन हृदयं यत् श्रीलोकमान्यसदृक्षस्य लोकोत्तरमहिमसपन्नस्य पुरस्तात् पिपृच्छिषितं प्रष्टुं ओष्ठयुगं प्रचलेद्वा नो वेति । यतो ह्येष एव प्रथमोऽवसरः तैः सह संलापस्य । विहिते पुनरंतः पदविन्यासे, निरतिशयतेजोभासुरमपि नितांतशीतलं तदीयं वदन-

वरोचं कामप्यात्मीयतामिव प्रकटयत् परमं विश्रम्भमेव ममोदपादयत् । अस्मार्थे च " अहो दीप्तिमतोऽपि विश्वसनीयताऽस्य × × वपुषः " इति कविकुलगुरोर्वचनम् ।

निर्वृत्ते कुशलप्रश्नादिसमुदाचारे " कुतो नाद्यापि गीतारहस्ये स्वमाशयमाविष्कुर्वते वस्तीर्थपादाः (कृष्णशास्त्रिणः) " इति तैः सस्नेहमनुयुक्तः " अनुवाच्याऽऽपादचूड अभिप्रायमाविष्किकीर्षन्ति " इति सगौरव व्याहृत्य चिराय मनसि घूर्णमान संदेहं न्यवीविद यथाः—

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।
आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥

इत्यनेन भगवता सुस्पष्टमेव ज्ञानिनः कर्माभावोद्घोषणात्, कथमिद हठादाकृष्य उपवर्ण्यते ' ज्ञानिना कर्तव्यमेव कर्म ' इति पूज्यैः " इति ।

श्रुत्वेदं स्मयंत एव विश्रामकूर्चपीठात् ( आरामखुर्ची ) ईषदुच्चलितगात्राःऽऽहुः—"नात्र मात्रयाऽपि मया बलादुन्नीतोऽर्थः । निक्षिप्यता चक्षुरस्मिमे श्लोके—

' तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ ' इति ।

( पद्यमिदं पठद्भिः श्रीलोकमान्यचरणैः अत्रत्य ' तस्मात् ' इति पदं साधारमुच्चारितम् )

अत्र विमृश्यतां तस्मात् पदस्यार्थः । तस्मात् पूर्वोक्तकारणकलापात् असक्तः सन् कार्यं कर्म कुरु इति योजना । अत्र पूर्वोक्तकारणसद्भावात् ' कर्म कुरु ' इति वदता भगवता अर्थत एव इतः प्राक्तनेषु पद्येषु कर्मकरणे कारणान्युपनिबद्धानि इति प्रतीयते । ततश्च " यस्त्वात्मरतिः " इति श्लोकेऽपि कर्माचरणकथनमेव भगवतोऽभिप्रेतमित्यनिच्छताऽपि अभ्युपेतव्यम् । तदन्यथानुपपत्त्या पद्येऽस्मिन् ' तस्य कार्यं ' इत्यस्य तस्य कार्यं आवश्यक न विद्यते इति वा, स्वार्थाय तस्य कार्यं नास्तीति वा, कार्यत्वप्रयोजकफलेच्छा नास्तीति वा, ' यद्यपि ' पदाध्याहारेण वा, अर्थो वर्णनीय इत्येष एव न्याय्यः पथाः " इति अमुमेव विषयं होरार्धे विविच्य तथा किलोपन्यास्यन्, यथा तदा मे प्रशांतसंदेह चेतः क्षणे कामपि निर्वृतिमापन्नम् ।

एतावता च संलपनेन विगताशेषसाध्वसः सप्रणयं भूयोऽप्यप्राक्षम्—"आर्याः दृश्यन्ते किल सर्वत्र अत्रभवन्तो यशोदुंदुभिः ' संस्कृतभाषाकोविदा ' इति । तत्कथमयमुपनिबध्यते गीतारहस्यस्यावरणपृष्ठे ( मुखपृष्ठे ) ' पौर्वात्य ' इति अवे-

व्याकरणः शब्दः" । ' दक्षिणापश्चात्पुरसस्त्यक् ' इत्यनेन 'पौरस्त्य' इति साधी-यसि प्रयोगे भवितव्ये ' पौर्वात्य ' इति कथं ननु प्रायोजि तत्रभवद्भिः" इति ।

वचनमिदमाकर्ण्य सस्मितं सानुरागं चावादिषुः—" कुतो हि नाम शब्दोऽयं संस्कृत इति विज्ञायते युष्माभिः । महाराष्ट्रीय एवैष इति प्रयुक्तोऽस्माभिः । पौरस्त्य-शब्दस्यैवाय महाराष्ट्रभाषायां अपभ्रंशः 'पौर्वात्य' इति । संति चैवंविधा अपभ्रंशाः भूयांस एव महाराष्ट्रग्रंथकारैः प्रयुक्ताः । हितमिन्नं अहितं, अहितं यत्न भवति तदनहित, हितमेवेत्यर्थः । अहितरूपार्थे अनाहितपद प्रयुक्त श्रीज्ञानेश्वरमहाराजैः" इति । ( समयेऽस्मिन् किमपि ज्ञानेश्वरीग्रंथगत ओवीछंद उदाहृत श्रीलोक-मान्यपादैः । )

( ३ ) एकदा रामदुर्गपुरीयैः पंडितप्रकांडैः श्रीगोडखिंडीकृष्णशास्त्रिभिः सह, गुर्लहोसूरपुरे कश्चित् श्लोकमधिकृत्य श्रीलोकमान्यचरणानां प्रस्तुते श्री-मदाद्यभगवत्पादाचार्याणां कालनिर्णयविचारे—

श्रीलोकमान्यः—श्लोकेऽस्मिन् तिष्यपदस्य कोऽर्थोऽभिप्रेयते श्रीमद्भिः ?

कृष्णशास्त्रिणः—पुष्यनक्षत्रमिति ।

श्रीलोकमान्यः—आम् ! तत एव चैषाऽनुपपत्तिः ! ' तिष्यः पुष्ये कलि-युगे ' इति अमरानुरोधेन कलियुग इत्यर्थो विवक्ष्यताम् । द्रक्ष्यामः कथ वा अर्थः संपद्यत इति ।

कृष्णशास्त्रिणः—( सप्रमोदम् ) साधु उपपन्नं साधु ।

---

## श्रीमंत भवानराव श्रीनिवासराव ऊर्फ बाळासाहेब पंडित

[ बी. ए., पंतप्रतिनिधी, संस्थानाधिपति, औंध. ]

बरोबर ३० वर्षांपूर्वीची गोष्ट. सन १८९५ साली पुणें येथे श्रीशिवाजी-महाराजाच्या स्मारकाप्रीत्यर्थ ता. २१ डिसेंबर रोजीं रे मार्केटांत प्रचंड जाहीर सभा भरली होती. त्याचे अगोदर एके दिवशीं कै. टिळक आमच्याकडे आमच्या पुणें येथील वाड्यांत आम्हास भेटण्यास आले होते. प्रथम थोडेसें औपचारिक भाषण झाल्यावर बळवंतरावजींनी आम्हास श्रीशिवाजीमहाराजाच्या स्मारकाच्या सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल विनंति केली. त्यात आम्ही तरुण असल्या-कारणानें एवढ्या मोठ्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याची जबाबदारी आमचे हातून पार पडणार नाहीं असें आम्ही त्यास सांगितलें. परंतु हें त्यास न पटून ते आम्हास म्हणाले, " आपले वडील अशाच एका सभेचे अध्यक्ष झाले होते. करितां त्याच परंपरेस अनुसरून आपणच ह्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारणें इष्ट आहे." टिळकाच्या ह्या प्रेमळ आग्रहावरून आम्हास त्यांची विनंति मान्य करणें भाग पडलें. पुढें सभास्थानीं जाऊन आमची रीतसर निवडणूक झाल्यावर अध्यक्षपदावरून आम्ही एवढेंच म्हणालों की, आम्हास जे काय बोलावयाचें आहे तें सर्व बळवंतरावजी टिळक आपणास सांगतील. तेव्हां थोडे प्रास्ताविक भाषण करून खणखणीत आवाजांत टिळक म्हणाले, " आपणा सर्वांस आम्ही जे येथें बोलावलें आहे ते श्रीशिवाजीमहाराजाच्या स्मारकास आपण काहीं द्यावें ह्या हेतूनें बोलावलें नाहीं; तर आजपर्यंत यासंबधानें काय काय काम झालें हें आपणास समजावें म्हणून बोलावलें आहे. आजच्या अध्यक्षाच्या वडिलांच्या अध्यक्षतेखालीं एकदां ह्या समाधीसंबधाची पुण्याच्या लोकाची सभा भरलेली होती. त्यानंतर लॉर्ड रे साहेबाच्या अमदानींत कुलाबा कलेक्टरच्या तिजोरींतून--निराळी नव्हे--परंतु मामलेदाराच्या खर्चांतून चार रुपयाची लड्ड रकम सरकारानें वर्षास समाधीच्या दुरुस्तीस देण्याचे ठरविलें ! ! उलट लोकाकडून आम्ही पै--पैसा करून पंधरा हजाराची रक्कम कशी जमविली हे आपणास माहीत आहेच ! आपल्या राष्ट्राच्या ह्या अजिंक्य योद्ध्याबद्दल आपणांस योग्य अभिमान वाटला पाहिजे, व त्यांनीं आपणावर करून ठेवलेल्या उपकाराबद्दल आपल्या हातून होईल तितकें आपण उतराई झालें पाहिजे." त्यावेळीं नामदार असलेल्या टिळकांचे हे भाषण झाल्यावर बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी व पंडित मदनमोहन-मालवीय यांचीं भाषणें झालीं.

---

# श्रीमंत सर गंगाधरराव ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन

[ संस्थानाधिपति, संस्थान मिरज. ]

थोर पुरुषांच्या आठवणींची गोष्टच अशी आहे की, त्यांच्या अवतारसमाप्ती-नंतर त्यांच्याविषयीच्या लहानसहान गोष्टींसहि जे महत्त्व व जी किंमत येते ती ते विद्यमान असतांना असत नाहीं. कै. लोकमान्य बळवंतरावजी टिळक या पुरुषाचीहि अशीच गोष्ट आहे. बारीकसारीक गोष्टींचे त्या त्या वेळीं महत्त्व वाटत नाहीं. पण पुढे प्रसगानें त्या गोष्टी आठवल्या म्हणजे मात्र जो आनंद होतो तो वर्णन करितां येत नाहीं.

आमच्यासारख्या विशिष्ट परिस्थितीमधील लोकांस आपल्या ससर्गानें उपद्रव होऊ नये म्हणून, स्वतःची भेटण्याची उत्कट इच्छा असताहि, लोकमान्य बळ-वंतरावजी आम्हास वरचेवर भेटण्याचे मुद्दाम टाळीत, हे त्याच्या पुढे दिलेल्या उद्गारावरून स्पष्ट दिसून येईल. या कारणामुळे आम्हास त्याच्या ‘ विशेष आठवणी ’ सागतां येणे कठीण आहे. तथापि आठवून आठविलेल्या दोन सामान्य आठवणी पाठवीत आहे. प्रसगानुसार सहज जशा गोष्टी आठवतात तशा मुद्दाम आठवू म्हटल्यास आठवत नाहीत.

(१) श्रीमत बाबासाहेब घुस्कुटे यांचेकडे एके प्रसगीं आम्ही त्याच्या समाचारास गेलों होतो. तिकडून परत येताना वाटेत पुणे येथे बळवतरावजींच्या घरी जेवण करून मग मिरजेस जावे असे ठरवून आम्ही त्याचेकडेच उतरण्यास गेलो. इकडील तिकडील गप्पा गोष्टी बोलत असता, आपण आम्हास वरचेवर न भेटण्याचे कारण त्यांस विचारतां ते म्हणाले, “ आम्ही लोकसेवेचा पेशा घेत-लेला आहे, केवळ लोकसेवेचाच विडा आम्ही उचलला आहे. सरकार आणि लोक याचा विरोध आहे हे स्पष्ट आहे. ह्यामुळे आमच्या ससर्गानें आपणा-सारख्यास त्रास पोहोचू नये म्हणून आम्ही तुमच्याकडे येण्याजाण्याचें मुद्दामच टाळतो. नाहींतर तुम्हांस भेटूं नये असें मला कधी तरी वाटेल काय ! पूर्वी कधी वाटले नाहीं व यापुढेंहि, वरील कारणाखेरीज कधीहि वाटावयाचें नाहीं. तुम्ही होऊन इतका स्नेह ठेवितां हे काय थोडे झाले ! ”

(२) केवळ कार्यावर दृष्टि देऊन वागणाऱ्या या पुरुषाची साधी पण चटका लावणारी एक गोष्ट मुद्दाम येथें देतो. एकदां महाबळेश्वरीं आम्ही असतां राय-गडासबधीं कांहीं कामाकरितां लोकमान्य टिळक तेथें आले होते; अर्थात् ते आमच्याकडेच उतरावयास आले. लांबून येणाऱ्या टांग्यांत पुढे ठेविलेली प्रवासी पाकिटे व डोक्यास असलेली तांबडी पगडी पाहून या येणाऱ्या पाहुण्यांच्या स्वागतार्थ आम्ही बंगल्याच्या पुढील पायरीवर जाऊन उभे राहिलों, व पहातो

तों लोकमान्यांची स्वारी टांग्यांत असलेली दिसली. आम्ही त्यांस अगत्यपूर्वक खालीं उतरून घेऊन त्यांचें सामानसुमान त्यांच्याकरितां तयार केलेल्या एका खोलींत ठेविलें. थोड्या गप्पागोष्टी होऊन चहापाणी झाल्यावर लोकमान्य आम्हास म्हणाले, " तुम्ही तुमच्या कामास लागा. आमचेकरितां थांबूं नका. तुम्हास आज कामाकरितां बाहेर जाणें आहे, खुशाल जा. आम्ही न सांगतां आपलेकडे आलों आहों तेव्हां गैरसोय न सोसतां आम्ही आमची सर्व सोय करून घेऊं. " सदर दिवशीं आम्हास निकडीचें काम असल्यामुळें आम्हांस पाहुण्यांचे अगोदर जेवण करावे लागलें. बाहेर जातेवेळीं ' मला परत येण्यास थोडा उशीर होईल, तोंपर्यंत झोंप वगैरे होऊं द्या, आल्यावर मग स्वस्थपणें गप्पागोष्टी बोलू.' असें आम्ही म्हणालों. तेव्हा बळवंतरावजी म्हणाले, " अहो, आम्ही लोकांचे नोकर ! सरकारी नोकर हा एकट्या वरिष्ठासच बांधलेला, आम्ही सर्व जनतेस बांधलेले. तेव्हां आमचें येथील काम आटोपल्यावर आम्हांस उगाच येथें कालक्षेप करितां येत नाहीं. माझें काम होताच मी येथून चालता होणार. थांबण्यास वेळ नाहीं. आपला आमचा हाच नमस्कार ! "

आलेल्या पाहुण्यांच्या आदरसत्कारार्थ आम्ही आपलीं कामे घाईघाईनें आटोपून बंगल्यावर आलों तों समजले कीं, ' आमचें काम आटोपल्यामुळें आम्ही चालते झालों, ' असा निरोप आम्हास सांगावयास बंगल्यावरील नोकरास लोकमान्यांनीं कळवून स्वारी सडक निघून गेली !

---

## रामकृष्ण गोपाळ भांडारकर

[ सर, डॉक्टर, संगमाश्रम पुणें ]

[ टीपः—सपूज्य डॉक्टरसाहेब यास लोकमान्यांच्या आठवणींचा पहिला खंड मी अत्यादरपूर्वक नजर केला होता. सदर ग्रंथ, मधून मधून, ते आपल्या वाचकाकडून आगत्यपूर्वक वाचवून घेत, व पसंतीचे उद्गारहि काढीत ! त्यांच्याकडून आठवणी मिळाव्यात ही माझी अति उत्कट इच्छा; व तदनुसार ते शरपंजरीं पडले असतांहि त्यांनीं थोडा प्रयत्न करून पाहिला. कागदावर कांहीं लिहूनहि काढलें. पण वयोमानानें व स्मृतिविकलतेनें सदर मजकुराचा संदर्भ नीट न जुळल्यामुळें तें सर्व तसेंच बाजूस ठेवून; पुढील एकाच आठवणीवर समाधान मानून घ्यावें लागत आहे. संपादक ]

एकदां पैसाफंडाचे स्वयंसेवक पैसाफंड मागण्याकरितां आमचेकडे आले

होते. हे स्वयंसेवक लहान मुलें असल्यामुळें त्यांस दिलेल्या पैशाचा कसा काय विनियोग होतो याची आम्हांस शंका आली, म्हणून आम्हांस त्यांस नकार देणें युक्त वाटलें. सदर मुले पुढें रा. टिळक यांजकडे गेलीं. त्यांनीं त्यांस हें वर्तमान सांगितलें; पण आमची नीट समजूत पटल्यावर अगर खात्री झाल्यावर आमचे हातून असें खचित होणार नाहीं, असे आमच्याविषयीं टिळक यांस वाटल्यावरून ते आमचेकडे आले. टिळक हे आमचेकडे मधून मधून येत. विशेषतः त्यांस दुर्मिळ पुस्तकांची जरूर लागली म्हणजे हमखास येत. पण सदर दिवशीं ते आल्याबरोबर त्यांनीं एकदम पैसाफंडासंबंधाने आमचें मत विचारलें. तें पाहून मला पैसाफंड मागण्याकरितां आज हे आलेले दिसतात असें वाटतांच मी उठलो व आंतून पांच रुपये आणून त्यांस दिले, व म्हटले ' पैसाफंडाकडे हे जमा करा.' त्यांनींहि आपल्या आंगरख्याच्या खिशांतून पावतीपुस्तक काढून व्हालंटिअर म्हणून आपली सही करून आम्हांस पावती दिली ! व पैसाफंडाच्या चोख कामाबद्दल त्यांनीं आमची खात्री पटविली.

---

## दाजी नागेश आपटे

[ बी. एल्. एल्. बी. हायकोर्ट वकील, बडोदें. ]

(१) सन १९०२ सालीं लो. टिळकांचे थोरले चिरंजीव विश्वनाथराव व मी फर्ग्युसन कॉलेजांत प्रीव्हियस्च्या वर्गांत होतों, त्यामुळें त्यांचा व माझा पुष्कळ परिचय झाला व त्या निमित्तानें टिळकांचे घरीं माझे जाणेंयेणें होऊं लागलें. त्याच वर्षी प्रिन्सिपाल परांजपे विलायतेहून रँग्लर होऊन आले व ते कॉलेजांत आमच्या क्लासाला गणित विषय शिकवूं लागले. एके दिवशीं शिकवितांना एक कठिण गणित रा. परांजप्यांना तावडतोब सुटेना. तेव्हां ' उद्यां तें मी तुम्हांस सोडवून आणून समजावून देईन,' असें त्यांनीं क्लासांत सांगितलें. दुसऱ्या दिवशीं क्लासांत येण्यापूर्वीं रा. विश्वनाथराव टिळकांनीं आपल्या वडिलांना तें गणित विचारलें, तेव्हां त्यांनीं दोन तीन पायऱ्यांतच ते सोडवून दिलें. विश्वनाथरावांचा गणित विषय कच्चा असल्यामुळें वडिलांनीं सांगितलेलें गणित त्यांना समजलें नाहींच, पण त्यांनीं तें जसेंच्या तसें वहीवर उतरून घेतलें. दुसरे दिवशीं प्रिन्सिपाल परांजप्यांनीं तें गणित स्वतः फळ्यावर सोडवून दाखविलें. परंतु तें सोडविण्यास त्यांना दहा बारा पायऱ्या घ्याव्या लागल्या.

नंतर त्यांनी वर्गातील मुलांपैकीं कोणीं तें सोडविलें किंवा काय म्हणून विचारिलें. तेव्हां विश्वनाथरावानें आपल्या वहीवरून तें फळ्यावर उतरून दाखविलें. तेव्हां इतक्या सोप्या रीतीनें तें गणित सुटूं शकतें हें पाहून परांजप्यांना फार आश्चर्य व आनंद वाटला. व त्यांनीं विश्वनाथरावांस विचारिलें कीं, हे तुम्ही स्वतः सोडविलें किंवा तुम्हांस कोणी मदत केली ? तेव्हां विश्वनाथरावांनीं खरी हकीगत सांगितली. मग परांजपे उद्गारले " बरोबर आहे. दुसरे कोणी हें इतक्या सोप्या रीतीनें सोडवील असें मला वाटतच नाहीं. "

( २ ) सन १९०५ सालीं स्वदेशी चळवळीची जी लाट उसळली होती, तिच्याच बरोबर म्युनिसिपालीटीविषयी जागृति होऊन त्यातील जागा पटकावण्याचें पुण्याच्या राष्ट्रीय पक्षाने ठरविलें. त्याच वर्षी म्युनिसिपालिटीची नवी निवडणूक होणार होती, व त्यासाठीं मतें मिळविण्याकरितां सर्वत्र खटपट व धडपड सुरू झाली होती. याच सुमारास पुण्याच्या सार्वजनिक सभेतहि नवें चैतन्य येऊन तिच्या दाणेआळेंतील जोशीहॉल म्हणून प्रसिद्ध असलेल्या जागेत मंडळी रोज सायकाळीं जमून सार्वजनिक प्रश्नांची चर्चा करू लागली होती. तेव्हां अर्थात्च लवकरच होणाऱ्या निवडणुकीबद्दलची चर्चा तेथें रोज होत असे. तेथे जमणारे लोक अनेक प्रकारच्या स्वभावांचे असल्यामुळें जो तो आपल्या आवडत्या व्यापांतच अधिक भाग घेई. पत्ते, गावगप्पा, एकमेकाच्या निंदा, कुटाळक्या वगैरे सर्व गोष्टी तेथें चालत. त्या दिवसात लो. टिळक बहुशः रोज तेथें जात असत. परंतु तेथे त्यांचा उद्योग निराळाच असे. बसल्या बसल्या म्युनिसिपालिटीचें कर्तव्य काय व तें व्यवस्थितपणानें कसे करावे याची चमत्कारिक व नमुनेदार माहिती गप्पांच्या रूपानें सांगण्याचा त्यांचा क्रम होता. उदाहरणार्थ, ते म्हणत आपल्या शहराचा एक नकाशा तयार करावा. त्यांत दरवर्षी दुरुस्त करण्याच्या सडका लाल शाईनें आंखाव्या; एक वर्षाआड दुरुस्तीच्या पिंवळ्या पेन्सिलीनें; नवीन करण्याच्या आणखीच एखाद्या रंगानें; वगैरे वगैरे. याचप्रमाणें स्थानिक स्वराज्याच्या इतर बाबतींची हसता खेळतां त्यांनीं इतकी माहिती पाचचार दिवसात मिळवून दिली कीं, पांचपन्नास ग्रंथ वाचून सुद्धां ती मिळणें दुरापास्त होतें. अर्थात्च तिकडे लक्ष देऊन तिचें मनन करणारे तेथें जमलेल्या मंडळींत फारच थोडे असत. त्या प्रसंगावरून मला मात्र एका संस्कृत सुभाषिताची खात्री पटली कीं, अशा विद्वान् पुरुषांच्या ज्या स्वैरकथा तोच जिज्ञासूचा शास्त्राभ्यास होय.

( ३ ) पुष्कळ लोक लो. टिळकांची इतर कांहीं पुढाऱ्यांशी तुलना करून असें म्हणतात कीं, इतरांनीं जसे आपल्या हाताखालीं शिकवून विद्यार्थी अथवा अनुयायी तयार केले तसें लो. टिळकांनीं केले नाहींत, हा त्यांच्यांतील उणेपणा होय. हाच प्रश्न मीं लोकमान्याना एके प्रसगीं केला असतां त्यांच्या

कडक शिस्तीला कटाळून यःपलाय केलेल्या माझ्या कांहीं सहाध्यायांचा दाखला देऊन ते म्हणाले, " माझ्या येथे येऊन काम करणें म्हणजे कांहीं लाडू खाणें नाहीं; येथे सक्तमजूरी केली पाहिजे व ती करण्यास तर अलीकडील मंडळी नाखूष असतात. तुम्हीच पहा + ++ त्यांना कांहीं मी माझ्या येथून जा म्हणून सांगितलें होतें ? पण त्यांना मेहनत करावयास नको व पुढारीपणा मात्र एकदम 'पी हळद हो गोरी' असा मिळावयास हवा; तें कसें जुळणार ?"

(४) पंजाबांत वीरनवाली नांवाच्या बाईवर मूर नांवाच्या युरेशिअनानें बलात्कार केल्याबद्दलच्या प्रसंगावरून लो. टिळकांची एक आख्यायिका पहिल्या खडांत आलेलीच आहे. पण त्याच प्रसंगावरुन घडलेली आणखी माझ्या स्मरणांत आहे. बलात्कारानतर वीरनवालीच्या नवऱ्यानें मूरवर कोर्टांत खटला केला. त्याबद्दलची कांही हकीगत वर्तमानपत्रांत आलेली तांबड्या पेन्सिलीने खूण करून एके दिवशीं सायंकाळीं मीं त्यांना दाखविली. त्याबरोबर अति संतापाने त्यांचे डोळे लाल होऊन ते म्हणाले, "स्त्रीवर जुलूम झाल्याचे कळल्यावर जो षंढ कोर्टांत फिर्याद करण्यास जाण्याइतका शांत राहातो, त्याच्या देशाची उन्नति अजून फार दूर आहे !"

(५) लो. टिळकांच्या बुद्धीप्रमाणेच त्यांच्या वाचनाची पद्धतीहि चमत्कारिक असे. कोणतेंहि गंभीर विषयावरचें नवीन पुस्तक बाहेर पडतांच ते आणून फारच अल्प वेळांत वाचून पार करीत. एकदां 'रशियांतील राज्य-क्रांतिचे प्रयत्न' या नांवाचें एक सातशे आठशें पानाचे पुस्तक त्यांनीं सुरवात केल्यापासून एकदीड कलाकांत पुरें केले. मला वाटले कीं, त्यांनीं ते वरवर उडत उडत पाहिले असेल ! त्यावरून त्यासंबधीं मी त्याना लगेच विचारतां त्यांनीं मला सांगितले "मीं ते पुस्तक संपूर्ण वाचले !" एवढेच बोलून ते स्वस्थ बसले नाहींत, तर त्यातील मजकुराची रूपरेषा त्यांनीं मला सागून 'अमक्या एका प्रकारचा मजकूर अमक्या पानाच्या मध्याच्या सुमारास आहे; काढून पहा' असें मला सांगितले. मी त्याप्रमाणें पहातांच खरोखर अगदीं त्याच सुमारास तो मला आढळला. यावरून 'इतकें सूक्ष्म कसें सागतां आले' असा प्रश्न मीं करिताच ते म्हणाले "यांत आश्चर्य करण्यासारखें कांही नाहीं. पुष्कळ वाचनाने व मननाने साधारणतः कोणत्याहि प्रश्नाचे विवेचन ग्रथकार अमुक तऱ्हेनें करतो आहे हे समजूं शकतें. मग एकदां त्या ग्रंथकाराची ही दिशा व धोरण समजले म्हणजे त्या विचाराच्या सांखळींतील सगळेच दुवे स्वतः पहावे लागत नाहींत, ते तर्कानें ताडतां येतात. व तर्क अनेक वेळां चालविल्याने त्यांत कौशल्य येते." तेव्हां 'योगः कर्मसु कौशलम्' हे वचन मला बरोबर समजून लो. टिळकांच्या वाचनयोगाचे रहस्य माझ्या ध्यानांत

आलें व इतकीं असंख्य पुस्तकें ते वाचतात तरी कसे व वाचलीं तरी तीं ध्यानांत ठेवितात तरी कसे याचें गूढ मला उकललें !

( ६ ) लो. टिळकांचें मी ऐकलेलें अगदीं पहिलें भाषण म्हणजे ते पहिल्यानें सन १८९६।९७ चे सुमारास ब्रह्मदेशाहून जाऊन आले त्यावेळीं पुण्याच्या जोशी हॉलमध्यें झालेलें होय. ब्रह्मदेशाचें वर्णन व आपला अनुभव त्यांनीं त्या भाषणांत सांगितला. त्यावेळीं मराठींतच भाषण करितांना ते इतके अडत असत कीं, एकंदर भाषणाच्या वेळेपैकीं बराचसा अंश अडखळण्याच्या वेळेंतच गेला असावा. अर्थात् मुळापासून त्यांना वक्तृत्वकला साध्य नव्हती. परंतु केवळ सतत अभ्यासानें व प्रयत्नानें पुढें पुढें ते इतकीं स्फूर्तिमय भाषणें करूं लागले कीं, ऐकणारा श्रोतृवर्ग स्तब्ध होत असे. अखेरपर्यंतहि वक्तृत्व असें त्याना आलेंच नाहीं; परतु ओघ मात्र चांगला साधला होता. व त्यांतच विषयाची भरींव माहिती व वक्त्याचा अधिकार याची भर पडल्यामुळें तीं भाषणें फार परिणामकारक होत हे सर्वांस विदितच आहे;

( ७ ) लो. टिळकांचें मत आपल्याविषयीं चांगलें असावें असें त्यांच्या सह-वासाला असलेल्या सहकारी मंडळींना तर अर्थात् वाटेच; परंतु त्यांच्या परिच-याच्या सरकारी नोकरींत असलेल्या अधिकाऱ्यांनाहि वाटे. अशांपैकीं एक गृहस्थ मामलेदारीच्या हुद्यावर असत. सरकारी मर्जी संपादन करण्यासाठीं वाटेल तीं नीच कृत्ये करण्याला ते तयार असत व त्याप्रमाणें करीत असत. विशेषतः स्वदेशीच्या काळांत तर स्वदेशी चळवळींत भाग घेणारावर आग पाखडण्यांत तर ते अग्रगण्य असत. व त्याचें बक्षिस म्हणून सरकारतर्फे पुढें त्यांना हुद्दा व अधिकारहि मिळाला ! असें असूनहि मी लोकपक्षाचाच आहें व सरकारी नोकरींतहि प्रजाहितच करतों अशा थापा ते मारीत असत. अशीच गोष्ट एका प्रसंगीं उघडकीला आल्यावरून विषय निघाला असतां रा. बाबासाहेब पेंडसे असिस्टंट रेव्हेन्यु कमिशनर तेथें बसले होते ते म्हणाले, 'किती हा गृहस्थ लुच्चा आहे !' त्यावर लोकमान्य म्हणाले ' मी त्याला ओळखून आहें. अहो प्रेताच्या टाळूवरचें लोणी चाखून खाणारेहि जगांत असतातच कीं नाहीं ! ! ! '

( ८ ) एकदा एका कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं कांहीं कारणामुळें संप केला असतां त्या विद्यार्थ्यांना कॉलेजांतून हांकून देण्याची धमकी कॉलेजांतील युरोपिअन प्रिन्सिपालनें मुलांना दिली. त्यावरून तीं मुले लो. टिळकांचा सल्ला घ्यावयास गेलीं असता त्यांनीं स्वतःच्या विद्यार्थीदशेंतलि एक आख्यायिका सांगितली. ते म्हणाले "मी बी. ए. च्या वर्गात असतांना आम्हाला डॉ. कीलहॉर्न संस्कृत शिकवीत. परंतु त्यांना संस्कृत मुळींच शिकवितां येत नसे. यामुळे आम्हीं कांहीं विद्यार्थी त्यांच्या तासाला जातच नसू. त्यावरून अतिशय रागावून एके दिवशीं दुपारीं रेसिडेन्सींत आम्हीं आपआपल्या खोल्यांतून बसलों असता डॉ. कीलहॉर्नं

आमच्या खोल्यांत आले, व आम्हांला क्लासांत न येण्याबद्दल शिक्षा देण्याची धमकी देऊं लागले, त्यामुळें कोणीच कांहीं बोलेना. तेव्हां मीं डॉ. कीलहॉर्न यांना सांगितलें कीं, 'आम्हाला तुमच्या तासाला येण्याची आवश्यकता वाटत नाहीं.' यावर डॉ. साहेबांनीं कां म्हणून विचारतां मीं सांगितलें कीं 'तुम्ही हा विषय शिकविण्यास लायख नाहीं म्हणून!' या उत्तरानें चिडून जाऊन डॉ. साहेब उद्गारले, 'ठीक आहे. तुम्हाला एक वर्ष परीक्षेला बसूं न देण्याची शिक्षा मी करीत आहें.' त्यावर मीहि त्यांना सांगितले कीं 'ठीक आहे; आम्ही पुढल्या वर्षी अधिक चांगल्या तयारीनें बसूं; व त्याप्रमाणें खरोखरीच आम्हीं दुसऱ्या वर्षी बसलों व पास झालों."

---

## माधव श्रीहरि अणे

[बी ए. बी. एल्. वकील, टिळकस्वराज्यसंघाचे उपाध्यक्ष,
टिळक स्व. सं. स्मारकाचे एक ट्रस्टी, वऱ्हाडांतील
स्वराज्यपक्षाचे पुढारी, खासदार, यवतमाळ.]

(१) प्रथमदर्शन:—लहानपणापासून लोकमान्यांच्या कर्तृत्वाच्या लहानमोठ्या गोष्टी पुणेकर किंवा पुण्याहून जाऊन आलेल्या मंडळींचे तोंडून ऐकण्यांत मला आनंद वाटत असे, व या अशा कथा नेहमीं ऐकतां ऐकतां लोकमान्यांचें केव्हां तरी प्रत्यक्ष दर्शन व्हावें अशी प्रबल इच्छा मनांत उत्पन्न झाली. परंतु १९०२ सालापर्यंत हा योग जुळून आला नाहीं. या वर्षी ते कलकत्ता येथील राष्ट्रीयसभेच्या अधिवेशनास हजर राहण्याकरितां नागपूर मार्गानें जाणार अशी बातमी आमचे कॉलेजमधील विद्यार्थ्यांना मिळतांच त्यांनीं लोकमान्यांना नागपूरला एक दिवसाकरितां उतरून घेऊन त्यांचा जाहीर सन्मान करण्याचा निश्चय केला. या कामाकरितां विद्यार्थ्यांची जी कमेटी नेमण्यांत आली तिच्यावर माझी नेमणूक करण्यांत आली. या कमिटीच्या तर्फे मीं, लोकमान्यांनीं जातेवेळीं अगर परत येतेवेळीं नागपूर येथें एक मुक्काम करावा, अशी लोकमान्यांना विनंति करण्याकरितां नागपूर स्टेशनवर मुंबईची डाकगाडी येण्याचे पूर्वी थोडा वेळ अगोदर येऊन दाखल झालों. माझेबरोबर कमिटीचे दुसरे सभासद रा. नारायणराव अळेकर, नीळकंठराव भवाळकर व कै. सदाशिवराव भावे हे हजर होते. गाडी स्टेशनवर येतांच आम्ही सर्वांनीं लोकमान्य टिळक ज्या डब्यांत होते त्याचा शोध केला. त्यांना नमस्कार केल्यानंतर विद्यार्थ्यांच्या

वतीनें एक दिवस नागपूरला मुक्काम करावा अशी विनति केली. कलकत्त्याहून परत येतांना एक दिवस मुक्काम करण्याची इच्छा आहे असें त्यांनीं आश्वासन दिलें. गाडी जाण्यास वेळ असल्यामुळें त्यांनीं जी चौकशी केली त्यांत येथील कॉलेजांतून विद्यार्थी विशेषतः कोणत्या विषयांचा अभ्यास करून बी. ए. च्या व एम्. ए. च्या परीक्षेस बसतात असा एक प्रश्न विचारल्याचें मला स्मरतें. संस्कृत भाषा आणि पाश्चात्य तत्त्वज्ञान या विषयाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांचीच संख्या मॉरिस कॉलेजमधून जास्त आहे असें सांगितल्यानंतर व्याख्यानाचा विषय त्यांच्या अध्ययनाशीं जुळता असल्यास विद्यार्थ्यांना अधिक उपयुक्त होईल अशा अर्थाचे उद्गार त्यांनीं काढले. त्याच वेळीं हे दोन्ही विषय शिकविणाऱ्या अध्यापकासंबधानें त्यांनीं विचारपूस केली.

यानंतर ते कलकत्त्याहून परत येतांना एक दिवस नागपूरला मुक्काम करून राहिले. राजाराम तुळसीराम नाटकगृहांत नागपूर येथील कॉलेजातील विद्यार्थ्यांच्या वतीनें प्रिन्सिपाल महामहोपाध्याय केशव रावजी ताम्हन यांचे अध्यक्षतेखालीं त्यांना मानपत्र अर्पण करण्यांत आलें. त्यांत शेवटीं " Lead kindly light, lead thou us on " अशी प्रार्थना करण्यांत आली होती. मानपत्रास उत्तर म्हणून त्यांनीं जें भाषण केलें त्यांतच सूत्ररूपानें जगद्विख्यात गीतारहस्य प्रथमतः प्रकट झालें ही गोष्ट गीतारहस्याचे प्रस्तावनेंत लोकमान्यांनींच लिहून ठेवलेली आहे.

व्याख्यान संपून ते खुर्चीवर बसले तो त्यांच्या दृष्टीस मी पडलों. तेव्हा स्टेशनावरील आश्वासनाची आठवण देऊन त्यांनीं मला जो प्रश्न केला तो माझ्या अजून स्मरणांत आहे. 'संस्कृत वाङ्मय आणि पाश्चात्य तत्त्वज्ञान या दोन्ही विषयांना धरूनच आजचें व्याख्यान झाले ना ?' व्याख्यानांत पाश्चात्य व पौर्वात्य तत्त्वज्ञान यांची योग्य मांडणी केली कीं नाहीं, हें केशवराव व प्रो० रॉय या दोघांशीं वादविवाद केल्याशिवाय मला निश्चयानें सांगतां येणार नाहीं. त्यावेळीं प्रिन्सिपॉल ताम्हन व प्रो० रॉय हे दोघेहि त्यांच्या जवळच बसलेले होते. त्यांनीं व्याख्यानातून प्रतिपादिलेला सिद्धांत व तत्पुष्टयर्थ स्वीकारलेली विचारसरणी हीं अभिनव असलीं तरी सर्वस्वी निर्दोष आहेत असा आपला अभिप्राय त्यावेळीं व्यक्त केला. त्यानंतर लोकमान्यांनीं विनोदानें " आपरितोषात् विदुषाम् न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम् । बलवदपि शिक्षितानाम् प्रायेणात्मन्यप्रत्ययम् चेतः " या कालिदासोक्तीचा उच्चार केला. लोकमान्यांची ही शालीनता पाहून प्रि० ताम्हन यांचें अंतःकरण गहिंवरून आलें. वरील हकीगत आज २२ वर्षांनंतर जशी आठवली तशी लिहून पाठविली आहे.

(२) वरील प्रसंगीं लोकमान्यांचा मुक्काम सीताबर्डीवरील श्रीमंत गोपाळराव बुटी यांचे वाड्यांत होता. कै० गोपाळराव बुटी हे लोकमान्यांचे मोठे

वहाते होते. त्यांनीं लोकमान्यांचे आगमनानिमित्त रात्री गायनसमारंभ करण्याचें ठरविले, व नागपूर येथील सुप्रसिद्ध गवई कै० बापूजी जोशी यांना गाण्याकरितां बोलवण्यांत आलें. लोकमान्यांना गाणेबजावणे वगैरे ललितकलांचा फारसा नाद नव्हता. तेव्हां गाणे ऐन रगांत आल्यानंतर मजलसींतील इतर मंडळी रंगून जेव्हां सम देत किंवा शाबास, बहुत अच्छे वगैरे उद्गार काढीत तेव्हां लोकमान्य तक्क्याशीं स्वस्थ बसून सुपारी तेवढी कातरीत. हा प्रकार पाहून मजलसींतील एका प्रौढ व लोकमान्यांशीं समवयस्क असणाऱ्या गृहस्थाने त्यांना सवाल केला, "महाराज! आपणाला गाण्याची फारशी अभिरुचि दिसत नाहीं. एवढीच कला आपल्या हातून हस्तगत व्हावयाची कशी राहिली?" लोकमान्यांनीं खालील उत्तर देऊन त्या गृहस्थाची समजूत घातली. "(भगवद्गीत) भगवंताच्या मुखानें गाइलेले गाणे ऐकल्यामुळें मानवगीत रुचेनासें झालें. अमृत प्यायाला मिळाल्यानतर थंडगार सरबत पिण्याची इच्छा होत नाहीं." असे म्हणून ते थोडेसें हसले व सदरहू गृहस्थच नव्हे तर प्रत्यक्ष गवई देखील या उत्तराने क्षणभर चकित झाला व तेवढी चीज संपतांच बापूजी जोशी यांनीं तंबोरा खालीं ठेवून लोकमान्यांच्या चरणावर आपलें मस्तक ठेविलें.

(३) बेळगांव येथील प्रांतिक परिषदेस मी हजर होतो. स्वराज्यसघाची स्थापना बेळगांव येथेच करण्यांत आली होती. नेमस्तांशीं समेट करून राष्ट्रीयसभेंत राष्ट्रीयपक्षानें प्रवेश करणे जरूर आहे असा लोकमान्यांचा आग्रह होता आणि तोच योग्य होता ही गोष्ट पुढील परिणामावरून सर्वांच्याच प्रत्ययास आली. या परिषदेंत विषयनियामक कमिटींतून समेटाचे ठरावावर बरीच चर्चा झाली व त्यासंबधीं बरीचशी विकृत हकीकत दैनिक पत्रांतून आली व राष्ट्रीयपक्षाचे एका मुंबईंतील मराठी दैनिकांतून तर लोकमान्यांचे धोरणावर भडिमार करणारी लेखमालाहि सुरूं करण्यांत आली होती. त्यांनीं या परिषदेतील भाषण मुद्दाम इंग्रजींतून दिले, याचा हेतु देखील विपर्यासाला जागा राहूं नये असाच होता. या भाषणाचें महत्त्व फार आहे याची त्यांना पूर्ण जाणीव असल्यामुळे भाषण करण्याचे पूर्वीं कांहीं वेळ ते राहावयाचे बंगल्यांतील विस्तीर्ण पटांगणांतून एकटेच फिरून सारखे विचार करीत आहेत असें माझ्या दृष्टीस पडलें, म्हणून मीहि त्यांचेबरोबर फिरूं लागलों व त्यांनीं मला कागदपेन्सिल आणण्यास सांगून व्याख्यानांत यावयाच्या मुख्य मुद्द्यांचे टिपण करण्यास सांगितलें. नंतर फिरतां फिरतांच त्यांनीं आपले सर्व मुद्दे मला सांगितल्याप्रमाणें मीं टिपून घेतले व कागद त्यांचेजवळ दिला. प्रत्यक्ष व्याख्यानाचे वेळीं त्यांनीं मला जवळ बोलावून तो कागद मला परत दिला. आणि व्याख्यान देतेवेळीं जें कांहीं कमी अधिक बोलण्यांत येईल त्यांचें टिपण करण्यास सांगितले. त्याप्रमाणें व्याख्यान सुरूं झाल्यानंतर त्या मुद्द्यांचे मूळ कागदावरच मी भाषणांत नवीन

आलेल्या मुद्द्यांचें टिपण करावयास लागलों. व्याख्यान संपल्यानंतर त्यांनीं सर्व टिपण तपासलें. या टिपणानुसार सर्व भाषण लिहून काढून तें आजचे आज तारेनें प्रसिद्धीकरितां रवाना करावयाचें आहे, असें त्यांनीं मला सांगितल्यावरून मी सभामंडप सोडून बंगल्याकडे परत आलों. तेथें आल्यानंतर भाषण लिहावयास सुरवात करण्याऐवजीं पानसुपारी खाण्याकरितां तबकाचा शोध करीत बसलो. तबक मिळालें परंतु तें जवळ जवळ रिकामेंच असल्यामुळें मला अर्थातच विडा खातां आला नाहीं. कोणीतरी मनुष्य लवकर परत येईल व नंतर विडा खाऊन लिहिण्यास सुरवात करूं अशा विचारांत मी खुर्चीवर स्वस्थ बसलों होतों. इतक्यांत एका मनुष्यानें मजसमोरील तबक उचलून नेलें, व त्यांत सर्व सामान घालून तें परत आणून ठेवलें. अर्थात् मी विडा तयार करून खाऊं लागलों, हें सांगणें नकोच. इतक्यांत लोकमान्य माझ्या खोलींत आले व सहज म्हणाले, " कां आतां सर्व व्यवस्था नीट आहेना ! आतां तर लिहावयास सुरवात करण्यास कांहीं व्यत्यय नाहींना ! " हें ऐकल्याबरोबर मी किती खजील झालों असेन याची वाचकांनींच कल्पना करावी. यानंतर भाषण लिहून काढून त्यांना वाचून दाखविलें व त्यांनीं पसंत केल्यानंतर तारेनें पाठविण्यांत आलें. लोकमान्य तारेची रसीद मागण्यास विसरले नाहींत हेंहि सांगणें मला अवश्य वाटतें.

( ४ ) वऱ्हाडांतून लोकमान्यांचा जो दौरा झाला त्यांतच ते वणीहून पांढरकवड्यास गेले. वणीस लोकमान्यांचा मुक्काम संतशिरोमणि सद्गुरु आप्पाजी महाराज यांचे बिऱ्हाडीं होता. परंतु महाराज त्यावेळीं तेथें नसल्यामुळें त्यांचें दर्शन होण्याचा लाभ त्यांना मिळाला नाहीं. सुदैवानें पांढरकवडा मुक्कामीं लोकमान्यांचे दर्शनाकरिता आप्पाजी महाराज हे मुद्दाम पाटणबोरी मुक्कामाहून आले होते. त्यावेळीं उभयतांची गांठ पडल्यानंतर क्षेमकुशल वगैरे विचारण्यांत आलें. नंतर मीं लोकमान्यांना महाराजांच्या दिनचर्येची माहिती थोडक्यांत सांगितली. भागवत सप्ताह जसा अखंडित ३०–४० वर्षांपासून सुरूं आहे तितक्याच नियमितपणें गुरुवारीं केसरीचा पाठहि सुरूं आहे, असे उद्गार मीं काढले. त्यावेळीं उत्तरादाखल परोपकारी वृत्ति ही निरनिराळ्या प्रकृतीच्या मानानें कशी निरनिराळ्या रूपानें प्रकट होत असते याचें अत्यंत शास्त्रीय व हृदयंगम विवेचन त्यांनीं केलें. मला यावेळीं ते त्यांचे शब्द जसेच्या तसे देतां येणें शक्य नाहीं. परंतु त्याचा सारांश असा. " जर या परोपकारी वृत्तीच्या मनुष्याने देशाच्या सांप्रतच्या विपन्नावस्थेचा विचार करावयास सुरवात केली तर त्याच्या प्रकृतिमानाप्रमाणें तो तीन मार्गांपैकीं एका मार्गाचा स्वीकार करतो. दया, करुणा, श्रद्धा इत्यादि गुण ज्याचे ठिकाणीं निसर्गतः विशेषत्वानें आहेत व प्रापंचिक सुखाविषयीं तो स्वभावतः उदासीन आहे तो साधुत्वाचे मार्गाचा

लागतो व देशावरील संकटपरिहारार्थ परमेश्वरी कृपेची याचना करतो. ज्यांच्या स्वभावांत क्रोधादिकांचा अविर्भाव विशेष असे लोक अराजक मार्गानें आपला कार्यभाग साधण्याचे उद्योगास लागतात. परंतु ज्यांच्या ठिकाणीं या-पैकीं सर्वच वृत्ति कांहीं प्रमाणबद्ध अतएव व्यवहारसन्मुख स्थितींत असतात अशीं माणसें सद्यःप्राप्त साधनांनींच प्रस्तुत संकट निवारण्याचा प्रयत्न करतात. या सर्वांचा हेतु एकच असल्यामुळें मध्यम मार्गानें जाणाऱ्या माणसांवर दोन्ही बाजूंच्या प्रमुख व्यक्तींचा प्रसंगविशेषीं रोष होतो. परंतु कार्याची गति जशी वेगवान् होत जाते तशी सर्वांचीच आक्रमणकक्षाहि कमी कमी दूर होत जाते व एक काळ असा येतो कीं, त्यांत या तिन्ही मार्गांचे लोक मध्यम मार्गाला प्रामुख्य देऊन त्याच्याच आश्रयानें व नेतृत्वाखालीं आपापले उद्योग त्या मार्गाला पोषक होतील अशा रीतीनें करावयास लागतात, तेव्हांच हिंदुस्थानाच्या यशाचा खरा दिवस उजाडेल."

---

## गंगाधर बाळकृष्ण देशपांडे

[ बी. ए. एलूएल्. बी., लोकमान्यांचे स्नेही व कर्नाटकाचे
प्रसिद्ध पुढारी, बेळगाव. ]

( १ ) १९०५ सालीं मी मुंबईस १९०४ सालच्या राष्ट्रीय सभेचे प्रदर्शन पाहण्याकरितां गेलो होतों. त्या वेळीं स्वदेशी वस्तूंचें एक दुकान काढावे अशी कल्पना आली. माझ्या एकदोन स्नेह्यांच्या मनांत हीच कल्पना आल्यामुळें त्यांनीं व मीं मिळून हा उद्योग करण्याचें ठरविलें. त्यावेळीं बंगालची ' इंडियन स्टोअर्स ' या नांवाची एक स्वदेशी व्यापार करणारी मंडळी होती. तिची एक शाखा मुंबईस सीताराम बिल्डिंगमध्यें होती. या शाखेच्या मार्फत चाललेले मुंबईंत एक दुकान होते. त्या दुकानांतील माल विकत घेऊन त्याच जागीं दुकान चालवावें असें मीं व माझ्या स्नेह्यांनीं ठरविलें. सरदारगृह त्या वेळीं सीताराम बिल्डिंग्जमध्येंच होतें. मी तेथेंच राहत होतो. लोकमान्य मुंबईस आले होते व सरदारगृहांतच उतरले होते. माझ्या मनांत मीं हातीं घेतलेल्या उद्योगासंबंधानें त्यांचा सल्ला घ्यावा असें आलें. म्हणून मी त्यांना भेटण्यास गेलों. माझे भागीदार व स्नेही कोण आहेत याची त्यांनीं विचार-पूस केली. माझे एक स्नेही एका प्रसिद्ध सरकारी नोकराचे चिरंजीव अस-ल्याचें मीं त्यांना सांगितलें. त्या सरकारी नोकर गृहस्थाची लोकमान्यांना

पूर्ण माहिती असल्यामुळें मला लोकमान्यानीं लगेच सांगितलें कीं, 'असल्या कामांत समानशील भागीदार असणें जरूर आहे; कारण आज जरी धद्याच्या दृष्टीनें उद्योगाचा आरंभ असला तरी चळवळीला राजकीय स्वरूप आहे, तेव्हां विचार करा.' पुढें तें दुकान आम्हीं विकत घेतलें व मी स्वतः त्या दुकानावर बसून व्यापार सुरू केला. दुकानाचें नांव 'इंडियन स्टोअर्स' बदलून 'डेक्कन स्टोअर्स' असें ठेविलें. व्यापार प्रथम प्रथम रोजीं दोन-चार आण्याचा होत असे. खर्च दरमहा ३०० । ४०० रुपयाचा होता. लोकमान्यानीं चिकाटी धरण्याचा उपदेश केला. पुढें लोकमान्यांनीं बहिष्काराची चळवळ उचलून धरली. मीहि स्वदेशीच्या चळवळींत भाग घेऊं लागलों. आमच्या दुकानाचा व्यापार वाढत चालला, दुसरे आणखी भागीदार येऊन मिळाले. पण ऐन भरांत आमच्या उपरिनिर्दिष्ट भागीदाराला भागीदारी सोडावी लागली व त्याच्याबरोबर मींहि सोडली. पुढें लोकमान्य भेटले त्या वेळीं त्यांनीं मला दुकानच्या भरभराटीबद्दल विचारलें. मला संबंध सोडावा लागल्याचें मीं त्यांना कळविलें. तेव्हां त्यांनीं चटकन् मला प्रारंभीं दिलेल्या सल्ल्याची आठवण दिली व ते म्हणाले "कोणत्याहि संस्थेंत एकाच विचाराचीं व एकाच धोरणाचीं माणसें असण्याबद्दल खबरदारी घ्यावी म्हणजे असे प्रसंग येत नाहींत."

(२) १९०६ सालीं इतर ठिकाणाप्रमाणें बेळगावासहि स्वदेशी-बहिष्काराच्या चळवळीची लाट जोरात उसळली होती व लोकात अपूर्व उत्साह उत्पन्न झाला होता. येथील व्यापारी मडळींच्या मनातून लोकमान्याना गणपतीच्या उत्सवाच्या वेळीं आमत्रण देण्याचें आलें. काहीं वकीलमडळींकडे त्यांनीं गोष्ट काढली, पण या कल्पनेला उत्तेजन मिळालें नाहीं. पुढें व्यापारी मंडळींनीं आपल्या जबाबदारीवर आमत्रण देण्याचें ठरविलें, व आमत्रण देण्याकरतां पुण्यास जाण्याचें ठरवून मला लोकमान्य पुण्यास आहेत किंवा नाहींत याबद्दल चौकशी करण्यास सांगितलें. मी लोकमान्याना तार करून त्याचा मुक्काम दोनचार दिवस कोठें असणार याबद्दल विचारपूस केली. तारेखालीं सही 'देशपांडे वकील' अशी केली. 'पुण्यास मुक्काम आहे' अशी उत्तरादाखल तार आली. मी व काहीं व्यापारीमंडळी मिळून पुण्यास गेलों. पुण्यास मोरोबादादा फडणीस यांच्या वाड्याजवळ लोकमान्य गार्डीतून जाताना भेटले. दे. भ. भोपटकर त्याच दिवशीं तुरुंगांतून सुटून येणार होते, त्यांना आणण्यासाठीं लोकमान्य स्टेशनावर जात होते. आम्हाला दोन प्रहरीं घरीं येण्यास सांगून गाडी पुढें गेली. आम्ही दोन प्रहरीं घरीं गेलों. बरोबर आमच्या कर्नाटकी पद्धतीप्रमाणें मोठमोठाले रुमाल बाधलेली व्यापारी मडळी होती. गेल्याबरोबर लोकमान्यांनीं मला 'कोठें आहेत तुमचे कागदपत्र ? काढा पाहू.'

असे विचारलें. मी थोडा वेळ स्तब्ध होतो. माझें लक्ष नसेल अशा समजुतीनें मला पुनः तोच प्रश्न केला. मीं म्हटलें ' कसले कागदपत्र ! आम्ही बेळगांवास येण्याबद्दल आमंत्रण देण्यासाठीं आलों आहो. ' त्याबरोबर ते म्हणाले 'असें काय ! अशी मंडळी घेऊन प्रायः वकील लोक माझ्याकडे कायद्याचा सल्ला घेण्याकरिताच येत असतात, सार्वजनिक कामाकरितां येत नाहींत, म्हणून तुम्हांस असा प्रश्न केला.' असे म्हणून हंसत हंसत पुढें बोलण्यास प्रारंभ करून आमंत्रण स्वीकारून तारखा निश्चित केल्या व ज्या प्रसंगाबद्दल आमच्या येथील पुढारी मंडळीला यात पडावें किंवा नाहीं याबद्दल शंका होती तो प्रसंग स्वतःच्या आगमनानें पवित्र करून बेळगांवांत व पर्यायानें कर्नाटकात राजकीय चळवळीचें बीज पेरलें.

( ३ ) बेळगांवास १९०६ सालीं गणपतीच्या उत्सवाकरिता पहिल्यांदाच लोकमान्याची स्वारी येणार होती. लोकांत अपूर्व उत्साह होता. स्टेशनावर मिरवणुकीसाठीं अतोनात गर्दी जमली होती. तथापि माझे मित्र गोविंदराव याळगी यानी उत्तम व्यवस्था ठेविलेली लोकमान्यांच्या दृष्टीस पडली. गोविंदरावांच्या बरोबर १००|२०० उत्साही व तालीमबाज असलेले तरुण त्यांच्या दृष्टीस पडले. मिरवणूक संपल्यानंतर लोकमान्यांनीं मला एकीकडे म्हटलें, " मी नाशकाहून आतां नुकताच आलों आहे. तेथेंहि मला अशीच तरुण मंडळी दिसली व कांहीं मला भेटली. त्यांचा उत्साह व महत्त्वाकांक्षा अपूर्व आहे, पण त्याच्यामध्यें थोडा मूर्खपणा आहे. तुमच्या तरुणांना संभाळा. अशा मूर्खपणामुळें कार्यहानि होते. "

( ४ ) बेळगावास भाद्रपदमासीं येऊन गेल्यानंतर जिल्ह्यांतहि त्यांचा दौरा होणें जरूर आहे असें माझ्या कित्येक मित्रांना वाटूं लागलें. त्यांत गुर्लेहोसूरचे कै. अण्णासाहेब किर्लोस्कर याचे बंधु रा. गणपतराव किर्लोस्कर प्रमुख होते. त्यानीं लोकमान्यांना गुर्लेहोसूरास श्री. चिदंबरेश्वराच्या उत्सवाच्या प्रसंगी आणण्याबद्दल माझ्या मागे सारखा लकडा लाविला. मी पत्रें लिहिलीं, तारा केल्या पण ' वेळ नाही ' अशीं उत्तरे आलीं. रा. गणपतरावांचे समाधान झालें नाहीं. त्यानीं स्वतः पुण्यास जाऊन धरणे धरले व उत्सवाचें आमंत्रण देऊन लोकमान्यांकडून ते मान्य करून घेऊन ते परत आले. मला लोकमान्याचें याबद्दल पत्र आले त्यांत " गणपतरावांचा उतार वयातील उत्साह पाहून आमंत्रण अमान्य करणे अशक्य झाले. अशा माणसाचा उत्साहभंग करणे माझ्या हातून कधींहि होणार नाहीं, " असा मजकूर होता.

( ५ ) लोकमान्यांची स्वारी गुर्लेहोसूरला धारवाड मार्गानें आली. मी पूर्वतयारीकरितां आधींच गेलो होतो. धारवाडास व्याख्याने वगैरे देऊन रस्त्यानें टांग्यांतून प्रवास करीत करीत लोकमान्य गुर्लेहोसूरहून जवळच असलेल्या सौंदत्ती

या तालुक्याच्या ठिकाणीं येण्याला बराच वेळ लागला. वाटेंत पानसुपाऱ्या, मिरवणुकी वगैरे समारंभ होत होते, म्हणून उशीर झाला. गुर्लहोसूरला येण्याची वेळ सकाळची ठरविलेली होती. दोन प्रहरीं दोन वाजले तरी स्वारी आली नाहीं म्हणून हजारों लोक उत्कंठेनें वाट पहात लांबवर सामोरे गेले होते. शेवटीं तपास करण्यासाठीं मीच एका चांगल्या घोड्यावर बसून रस्त्यानें गेलों. तों सौंदत्तीला गांठ पडली. तेथून निघतांना माझ्या बरोबर २५।३० लोक घोड्यावर स्वार होऊन लोकमान्यांच्या टांग्याबरोबर आले. हा स्वारांचा ताफा पाहून लोकमान्य हंसत म्हणाले, "गुर्लहोसूरला बापू गोखल्याची स्वारी आपले गुरु दीक्षित यांच्या दर्शनास व भेटीस येत असे तेव्हांप्रमाणेंच हा देखावा दिसत आहे." "स्वराज्यासाठीं धारातीर्थी देह ठेवणारा बापू गोखले आजहि आहे, पण परिवारात रावबाजीच अद्यापि पुष्कळ आहेत" असें मी त्यांना उत्तर दिलें.

(६) गुर्लहोसूरला मेल्याबरोबर स्नान वगैरे वाटेंत झाले होतें, तरी गांवाला नदी आहे असें कळल्याबरोबर पोहण्याचा मोह न आवरल्यामुळें नदीवर स्नानास जाण्याचें ठरलें. स्वारी नदीवर स्नानाला जाणार असा पुकारा होताच हजारों लोक नदीवरच स्नानास आले. आधींच गुर्लहोसूर पुण्यक्षेत्र, त्यांतून लोकमान्य नदींत स्नान करणार, त्यामुळें लोकांना अधिकच पवित्रपणा वाटून लोकमान्यांनीं डोकें बुडविलें म्हणजे सर्वांनीं त्याच वेळीं बुडी घ्यावी अशी योजना केल्यामुळें हजारों लोकांना लोकमान्यांच्या अंगावरील पाणी आपल्या अंगावरून गेलें म्हणून धन्यता वाटली व त्याप्रमाणें उद्गार काढणारे हजारों लोक तेथें होते. तास दीडतासपर्यंत लोकमान्य निरनिराळ्या प्रकारानें पोहण्याचा आनंद घेत असल्याचें पाहून पुष्कळांना मौजहि वाटली.

(७) गुर्लहोसूरला त्या दिवशीं रात्रीं व्याख्यान झालें. व्याख्यानास १५।२० हजार लोक जमले होते. हा गांव बेळगांवाच्या पूर्वेस ४०।५० मैलावर असून ब्राह्मणांखेरीज इतरांना कानडी भाषेखेरीज दुसरी भाषा समजत नव्हती. अशा स्थितींत लोकमान्यांचें एक तास व्याख्यान मराठींत झालें तरी कोणत्याहि प्रकारची गडबड झाली नाहीं. पण लोकमान्यानाच वाईट वाटून आपल्या भाषणाचा सारांश कानडींत सांगण्यास त्यांनीं मला सांगितलें. मला चांगलें कानडी येत नसल्यामुळें तें काम माझ्या दुसऱ्या एका मित्रानें केलें. सभा संपल्यानंतर रात्रीं १ वाजतां मला त्यांनीं खालील प्रश्न केले.

लोक०—कोणत्या जातींच्या लोकांचा आजच्या सभेंत विशेष भरणा होता ?

उ०—लिंगायत लोकांचा.

प्र०—तुमच्या मनातून कोणत्या प्रांतांत सार्वजनिक चळवळ करावयाची आहे ?

उ०—अर्थात् याच कर्नाटक प्रांतांत.

लो०—तर मग तुम्हाला दोन गोष्टी केल्याच पाहिजेत. पहिली गोष्ट, लिंगायत लोकांच्या धर्मग्रंथांचा चांगला परिचय करून घेऊन त्या धर्माच्या उदार तत्त्वांचा आदरपूर्वक अभ्यास करा. म्हणजे त्या धर्मांतील लोकांसंबंधाने आपला आदर वाढून आपल्याला त्यांची सहानुभूति मिळते. नाहींतर विनाकारण गैरसमज उत्पन्न होतो. रा. पाठक यांना जैनधर्माची माहिती चांगली असल्याकारणानें जैन लोकांत त्यांच्याबद्दल पूज्यबुद्धि आहे हे मला माहीत आहे. दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे तुम्ही कानडींत बोललें पाहिजे. ज्या लोकांत काम करावयाचें आहे त्यांची भाषा येणे अत्यंत जरूरीचें आहे.

या दोन्हीहि गोष्टी माझ्याकडून झाल्या नाहींत; पण यांतील पहिली गोष्ट हल्लीं चालूं असलेल्या हिंदुमुसलमानांच्या बाबतींत किती लागू पडते हें विचार करण्यासारखे आहे.

(८) गुर्लहोसूरास असतांना लोकमान्य वेळांत वेळ काढून बापू गोखल्यांचा वाडा पाहून आले. तेथील दीक्षितांचे एक घराणे 'वडली' म्हणून जवळच एक गाव आहे तेथें आहे. त्यांच्याजवळ बापू गोखल्यांनीं आपल्या गुरूंना लिहिलेलीं कांहीं पत्रें त्यांच्याच हस्ताक्षराचीं आहेत असे वाटलें, म्हणून उशीर झाला होता तरी आडवाटेनें बैलगाडीचा प्रवास करून लोकमान्य त्या गांवीं गेले व दोन तास घालवून त्यांनीं त्या पत्रांची वांचणी केली.

(९) गुर्लहोसूरहून आम्ही बैलहोंगलास गेलो. तेथेहि रात्रीं सभा झाली. तेथेही कानडी जाणणारांचाच जमाव होता. लोकमान्यांनीं अर्ध्या तासांत आपलें भाषण संपविले व मला कानडींत बोलण्यास सांगितलें. सभेंत कानडी बोलण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग. "सारांश बरोबर सांगतां येणार नाहीं," असे मीं लोकमान्यांना कळविलें. "तुमच्या मर्जीला येईल त्याप्रमाणें बोला, कमीजास्त झाल्यास मी आहेच. दुसऱ्याच्या लेखाबद्दल तुरुंगांत तर मी गेलोच आहे. माझें भाषण तुम्ही सांगतांना तसा प्रसंग आल्यास पाहून घेईन." असे लोकमान्य म्हणाले. या उत्तरामुळें मला बरेंच धैर्य आलें, व त्या भरांत जवळ जवळ एक तास मीं कानडींत भाषण केलें. लोकमान्यांना भाषा मुळींच समजत नव्हती. तरी माझा आवेश व लोकांची उत्सुकता पाहून त्यांना मौज वाटली. आपल्या मंदस्मितानें व लोकांनीं टाळ्या वाजविल्या म्हणजे आपणहि टाळ्या वाजवून ते मला सारखे उत्तेजन देत होते.

(१०) या दौऱ्यांत लोकमान्यांबरोबर देशभक्त अण्णासाहेब परांजपेहि होते. पण ते येतीलच असें निश्चित माहीत नव्हते. त्यामुळें बैलहोंगलच्या नागरिकांनीं लोकमान्यांनाच एक मानपत्र देण्याचें ठरविलें होतें. मानपत्राची नकल सभेपूर्वी मीं लोकमान्यांना दाखविली. "मला एकट्यालाच मानपत्र आहे कीं काय?" असें त्यांनीं मला विचारलें. चूक माझ्या लक्ष्यांत आली व दे

म. परांजपे यांनाहि मानपत्र देण्यांत आलें. यावरून पुढील सार्वजनिक कामांत मीं पुष्कळ बोध घेतला.

( ११ ) बैलहोंगलहून रात्रीं बैलगाडींतून बेळगांवास येण्याकरितां निघालों. लोकमान्यांना झोंप मिळावी म्हणून त्यांच्यासाठीं एक स्वतंत्र गाडी ठेविली होती. बाकीची मडळी दुसऱ्या गाड्यांत होती. गाडी निघाल्या बरोबर मला व दे. म. परांजपे याना त्यांनीं आपल्या गाडींत बोलाविलें, व उजाडे-पर्यंत पंजाबांत वीरनवाली नावाच्या स्त्रीवर एका क्रूर नांवाच्या अँग्लोइंडिय-नानें केलेल्या अत्याचाराबद्दल व आमच्या नामर्दुमकीबद्दल ते सारखे बोलत होते. ही गोष्ट त्यांना अत्यत असह्य झाली असावी असे त्यांच्या बोलण्यावरून व चर्येवरून स्पष्ट दिसत होतें. आपल्या हिंदु स्त्रियाचा अशा प्रकारे किंवा इतर कोणत्याही प्रकारें अधःपात झाल्याचें त्यांना सहन होत नसे असें त्यांच्या शेवटच्या दुखण्यांत त्याना वात झालेल्या स्थितींतील बडबडीवरूनहि सिद्ध होतें. शेवटच्या दुखण्यातील बेशुद्ध स्थितींत, उत्तरहिंदुस्थानांतील एका प्रसिद्ध ब्राह्मण गृहस्थाच्या मुलीशीं एका मुससमान गृहस्थाचा विवाह होणार होता ही जी गोष्ट त्याना अमृतसर कॉंग्रेसहून आल्यानतर समजली होती, ती गोष्ट ते नावें घेऊन काय बडबडत असत हें जवळ असलेल्या मंडळींना आठवत असेलच.

( १२ ) बैलहोगलहून श्रीचिदंबर दीक्षितांची समाधि असलेल्या मुर-गोड या गांवीं लोकमान्य गेले होते. जवळच बेळगांव जिल्ह्याचे कलेक्टर मि. ब्रेंडन याचा मुक्काम होता. हें लोकमान्यांना समजले तेव्हां मि. ब्रेंडन यांना भेटण्याची लोकमान्यांनीं इच्छा दर्शविली. त्याप्रमाणें मीं त्याना चिठ्ठी लिहिली. मि. ब्रेडन हे मोठे कडक अंमलदार असून राजकीय चळवळींत पडणाऱ्या लोकाबद्दल त्याची वृत्ति अत्यत सशयी असे. बेळगांवांत दुत कट असून त्यांचा माझ्यासारख्यांशीं संबंध होता असें त्यांना वाटत होतें व त्यामुळें त्यांनीं माझें देशपांडेगिरीचें वतन खालसा केलें होतें. ( ते अद्यापि त्याच स्थितींत आहे ). चिठ्ठी लिहितेवेळीं मी लोकमान्यांना असले प्रकार कळविले होते. "लिहा तरी, लिहा, काय करतो पाहूं" असें लोकमान्य म्हणाले. चिठ्ठीला अनुकूल उत्तर येईल अशी मला अपेक्षा नव्हती, पण आश्चर्य हें कीं, लोकमान्याची अटकळ खरी ठरली व अत्यंत आदरयुक्त शब्दांत त्यांचे उत्तर आलें. भेटीची वेळ दोनप्रहरची ठरली. लोकमान्य, दे. म. परांजपे व मी असे तिघे-जण नेमिल्या वेळीं गेलो. साहेबांच्या तंबूच्या आजुबाजूला पोलीस व इतर शिपाई वगैरे होते. त्यांनीं लोकमान्यांना खडी सलामी दिली. तबूत साहेबाची स्वारी उत्तम पोषाख करून लोकमान्यांचें स्वागत करण्यास सज्ज होती. टेबलावर लोकमान्यांचीं 'The Orion' व 'The Arctic Home in the Vedas' हीं दोन पुस्तकें होतीं. ओळख करून दिल्यावर मि. ब्रेंडन यांनीं

लोकमान्यांना "You are making a regular raid through my district" असा प्रश्न विनोदानें केला. लोकमान्यांनीं "It is not your sole monopoly only' असे उत्तर हांसतच दिलें. पुढें लोकमान्यांच्या पुस्तकांसबंधानें बोलणे निघालें. 'आपण पुष्कळ प्रयत्न केला तरी आपणांस पुस्तकांत चांगली गति होत नाहीं' असे मि. ब्रेडन यांनीं म्हटले. तेव्हां लोकमान्यांनीं त्यांना सांगितलें, "जवळ जवळ १२ वर्षांच्या श्रमाचीं हीं पुस्तकें आहेत. थोडेबहुत संस्कृताचे, ज्योतिषाचें ज्ञान असल्याखेरीज हा विषय समजणें कठीण आहे" राजकारणासंबंधानें अगर चालू असलेल्या चळवळीसंबंधानें एक शब्दहि मि. ब्रेडन यांनीं काढिला नाहीं. भेट संपल्यानंतर साहेब बाहेर पोचविण्यासाठीं आले व लोकमान्यांना त्यांनीं अत्यंत आदरपूर्वक निरोप दिला. साहेबांनीं एक मिनिट मला एकीकडे बोलाविलें त्यावेळीं 'Really he is a great man' असे उद्गार काढले. लोकमान्यांनींहि "वस्ताद आहे, इतका वेळ बोलत होता, पण राजकारणाच्या बाबतींत एक अ सुद्धां त्याच्या तोंडून निघाला नाहीं! फक्त मला आवडणाऱ्या विषयासंबंधानेंच बोलून भेटीचा वेळ कसा आनंदांत घालवावा याचाच विचार करीत होता!" असें साहेबांसंबंधानें सर्टिफिकीट दिले.

मुरगोड येथें रंगीत जाजमें, चिटें वगैरे वस्तूंचे कारखाने होते ते तेव्हां मोडकळीस येऊं लागले होते. पण त्यांपैकीं जे दोनचार चालू होते ते पाहण्यास लोकमान्य मुद्दाम गेले होते.

( १३ ) याच सालीं कॉंग्रेस कलकत्त्यास भरली होती. लोकमान्यांच्या प्रसिद्ध चतुःसूत्रीसंबंधानें कडाक्याचा वाद माजला होता. महाराष्ट्र, कर्नाटक वगैरे प्रांतांतील मंडळी भवानीपूरमध्यें असलेल्या एका शाळेत उतली होती. त्यांत दोनहि पक्षांचे लोक होते. लोकमान्य रस्सारोडवरील दे. दासबाबूंच्या बंगल्यांत होते. उलट पक्षांतील मंडळी आमच्या कॅंपमध्ये येऊन आमचीं मतें फिरविण्याचा प्रयत्न करीत असत, व त्याचा परिणामहि होत आहेसे मला दिसू लागले. म्हणून मी गडबडीनें लोकमान्यांकडे गेलों. व "आपण आमच्या कॅंपाबद्दल इतके बेफिकीर कां? उलट पक्षांतील मंडळींनीं जोरांत Canvassing चालू केलें आहे. आतांच चला." असे आग्रहपूर्वक सांगितलें. लोकमान्य हसले व म्हणाले, "घाबरूं नका. माझ्या लोकांची नाडी मी ओळखतों. उद्यां सकाळीं मी येतों व त्यांचे कॅन्व्हासिंग कसें काय आहे हें पाहतों." दुसरे दिवशीं सकाळीं लोकमान्य पालबाबूसहित कॅंपमध्ये आले व उलट पक्षानें २।३ दिवस मेहनत करून केलेलें काम एका अर्ध्या तासांत विघडवून माझ्याकडे हंसत हंसत पहात निघून गेले. उलट पक्षाचा प्रयत्न तेव्हांपासून बंद झाला हें सांगणें नकोच.

(१४) सुरतेच्या कॉंग्रेसच्या प्रसंगाची हकीकत प्रसिद्ध असून त्यावेळच्या आठवणीहि पाहिल्या खंडांत प्रसिद्ध झाल्या आहेत. पण माझीहि एक आठवण महत्त्वाची वाटल्यावरून देत आहें. सुरतेला कॉंग्रेस मोडण्याचा प्रसंग येऊ नये असें लोकमान्यांच्या मनातून असावें असें मला वाटतें, व त्याला कारण आपली शक्ति कमी आहे असें त्यांना वाटत असलें पाहिजे, म्हणून त्यांनीं आम्हाला आमचीं माणसें किती आहेत याचा अदाज करण्यास सांगितलें. मीं व माझे कांहीं मित्रानीं कॅम्पमर हिंडून लोकमान्यांच्या पक्षातील मंडळींच्या सह्या आणिल्या. संख्येनें आम्ही नेमस्तापेक्षां कमी भरलों. तरी आमची सख्या अगदींच टाकाऊ होती असें आढळून आलें नाहीं. लोकमान्यांनीं सह्यांचा कागद पाहिला व शेवटची बेरीज पाहिली आणि ते म्हणाले " ठीक आहे, कांहीं हरकत नाहीं. ठरवा आतां काय करावयाचें तें." वाटाघाटींत अध्यक्षांच्या निवडणुकीला विरोध करण्याचें ठरले. प्रतिपक्षानें गुंड वगैरे ठेवून धक्काबुक्कीचा मामला ठरविल्याचें आमच्या कानीं आले होतें, म्हणून भयंकर थराला गोष्टि जातील या भीतीनें मीं व कांहीं मंडळींनीं लोकमान्यांनीं विरोध करूं नये असें ठरवून, आम्ही त्यांच्याकडे गेलों. व " अध्यक्षाच्या सूचनेस विरोध करण्याचे जरी ठरलें तरी ते काम आपण न करितां आमच्यासारख्या कोणाकडून करविल्यास बरें, विरुद्ध पक्षाची तयारी निराळ्या प्रकारची दिसते." वगैरे गोष्टी सांगितल्या. लोकमान्य थोडा वेळ स्तब्ध होते, व नतर गंभीर मुद्रेने म्हणाले, " तुम्हीं विरोध करण्याचेंच ठरविलें आहे तर तें काम मींच केले पाहिजे; दुसऱ्याकडून निभावणार नाहीं." श्रीशंकरांनींच हालाहल विषाचें प्राशन केल्याची पौराणिक कथा व तिचें मर्म माझ्या लक्षात आलें. पुढील प्रकार प्रसिद्धच आहे.

( १५ ) सुरतेच्या कॉंग्रेसमधील दंगा संपल्यानंतर याचा पुढे परिणाम काय होईल, याचा विचार करीत कांहीं मडळी बसली असतां लोकमान्य म्हणाले, " परिणाम काय ! आमच्यांत बखेडा माजला म्हणजे त्याचा फायदा सरकार घेणारच. आम्हाला लवकरच तुरुंगांत जाण्याची तयारी करावी लागणार ! " पुढें ५।७ महिन्यांत त्याचा अनुभव आलाच.

( १६ ) १९०८ सालीं खटल्याचें काम चालल्या वेळीं हायकोर्टांत मी भेटावयास गेलों होतो. पांचचार मिनिटें इकडील तिकडील गोष्टी झाल्यावर ते म्हणाले, " कसें काय ! माझ्या भाषणाचा व माझ्या वर्तनाचा परिणाम लोकांत कसा काय होत आहे ! मला माझ्या शिक्षेपेक्षा त्यापासून होणारा परिणाम किती तरी जास्ती महत्त्वाचा वाटतो ! "

( १७ ) १९०८ सालचा खटला झाला त्यावेळीं त्यांच्याच प्रेरणेनें मुंबईस ' राष्ट्रमत ' दैनिक जन्माला आलें होतें. त्यांना पकडलें त्याच्या आधींच त्यांनीं

स्वतः प्रेस बसविण्याची मेहनत घेतली होती, व वारंट बजावल्याबरोबर 'राष्ट्रमत' ठरल्याप्रमाणें निघालेंच पाहिजे असे सांगूनहि ठेविलें होतें. पुढें मी भेटण्याला गेल्यावेळीं मलाहि 'राष्ट्रमता-'संबंधाने त्यांनीं सांगितलें. माझा व राष्ट्रमताचा पुढे जो संबंध आला त्याला अनेक कारणें झालीं. पण त्यांपैकीं लोकमान्यांचें माझ्याशीं झालेलें बोलणे हें मुख्य कारण होतें. ते मंडालेहून परत येईपर्यंत 'राष्ट्रमत' जिवंत राहावें अशी माझी व माझे मित्र वीर वामनराव जोशी वगैरे मंडळींची फार इच्छा होती, व त्या इच्छेनुरूप सर्व मंडळींनीं अत्यंत हालअपेष्टा सहन करून पत्र निकराने चालविले होतें. पण गरिबी हे आमचें मर्मस्थान आहे हे सरकाराने जाणून मोठी रक्कम जामीनादाखल मागितली व आम्हाला पत्र बंद करावें लागले.

(१८) लोकमान्य मंडालेहून परत पुण्याला आले, त्याच रात्रीं त्यांनीं माझ्यासबधाने विचारपूस केली. त्यावेळीं मला एका खुनी खटल्यांत गोवल्याची हकीगत त्यांना कळली. मी जामीनावर खुला होतो व सेशनकोर्टांत दुसरे दिवशींच चौकशीची तारीख होती. सकाळीं स्नान वगैरे आटोपून मी बाहेर येतो न येतो तोंच तारेचा शिपाई एक तार घेऊन आला व आनंदित मुद्रेनें त्यानें तार हातांतच ठेविली, व थोड्या वेळाने ती तार माझ्याकडे दिली. माझ्यावर त्याच दिवशीं खुनी खटला चालवयाचा असतांना तारवाला माझ्यासमोर आनंदांत कां अशी शंका आली. तार उघडून वाचतांच आनंदाच्या भरांत माझ्या खटल्याचें विस्मरण होऊन कंठ सद्गदित झाला. तारवाल्याला बक्षीस देऊन रवाना केला. "मी मुक्त होऊन रात्रीं घरीं आलो. तुझ्या खटल्याची हकीगत कळीव." हा तारेतील मजकूर ! गांवांत जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला. पण माझ्यावरच भयंकर तोहमत असल्याकारणानें माझ्या अगदींच जवळच्या आप्तेष्टांच्या आनंदात काळजीची छटा दिसत होती. मी त्या दिवशीं आईला घरीं पोळी करण्यास सांगितले. माझ्या मनांतील माझ्यासबधाची काळजी एकदम दूर झाली. मनाची हुरहुर नाहींशी होऊन ते शांत स्थितींत होतें. जेवण वगैरे आटोपून कोर्टाला गेलो. आमच्या तर्फे काम चालविण्यास प्रसिद्ध बॅरिस्टर नॉर्टन आले होते. त्यांना लोकमान्यांच्या मुक्ततेची बातमी कळविली. त्यांच्या चर्येवरून त्यांना विशेष बरे वाटले असेल असे मला वाटले नाहीं. कोर्टांत कामाला सुरुवात झाली. जामीनावर खुले नसलेल्या आरोपीबरोबर–त्यांत तीन बेरड होते–मींहि आरोपीच्या पिंजऱ्यांत उभा राहिलो. सरकारतर्फे काम चालविण्यास मि. बिनिंग बॅरिस्टर आले होते. त्यांनीं प्रारंभींच पुराव्याच्या अभावीं माझ्यावरील खटला काढून मला दोषमुक्त करण्याबद्दल कोर्टाला विनंति केली. ती कोर्टानें मान्य करून मला पिंजऱ्याबाहेर येण्यास हुकूम झाला. या खटल्यांत मी पूर्वी आरोपितांतर्फे वकील

होतों. पोलीसांना काय वाटलें असेल तें असो. वकीलाच्या खुर्चीवरून मला त्याच खटल्यांत आरोपिताच्या पिंजऱ्यांत जावें लागलें होतें, व पुनः पिंजऱ्यांतून वकीलाच्या खुर्चीवर बसून नॉर्टनला माहिती देण्याचे कामहि सुरू कर-ण्याचा योग आला. दैवयोग म्हणतात तो यालाच. माझी मुक्तता होतांच मीं प्रथम ही हकीकत लोकमान्याना Express तार करुन कळविली. त्याच दिवशीं लोकमान्याकडून आलेली अभिनंदनपर तार कोर्टातच मिळाली. पुढे संध्याकाळीं किंवा दुसरे दिवशीं केसरी स्टाफकडून मला दुसरी तार आली. या खटल्यांत माझ्या एका स्नेह्याचे जवळचे आप्त एक आरोपी होते. म्हणून खटला संपेपर्यंत मला लोकमान्याचें दर्शन घेणें लांबणीवर टाकावें लागलें. खटल्याचा निकाल होऊन सर्व आरोपी दोषमुक्त ठरल्यानंतर मी लोकमान्यांना भेटण्यास गेलों. त्यावेळीं बोलण्याबोलण्यात, " आपल्याकडून एक व केसरी-कडून एक अशा दोन तारा का आल्या ? " असा मी सहज प्रश्न केला. तेव्हा "केसरी ही एक संस्था आहे व संस्थेला माझीं माणसं कोण व त्याच्या बाबतींत या संस्थेचें कर्तव्य काय हें कळलें पाहिजे म्हणून असें करावें लागलें. " असें उत्तर मिळालें.

( १९ ) वरील खटला संपल्यानंतर मी प्रथम लोकमान्याना भेटावयास गेलों, त्यावेळीं माझे मित्र कै. गोविंदराव याळगी मजबरोबर होते. त्याची ही पहिलीच भेट होती. त्याच्या स्वभावाप्रमाणें त्यानीं लोकमान्याच्या पायावर डोकें ठेविलें व आमच्यापासून दूर अंतरावर ते उभे राहिले. आमचें कांहीं वेळ बोलणें झाल्यानंतर लोकमान्यांचें लक्ष गोविंदरावांकडे गेले, व " अरे गोविंदा, असा दूर कां उभा ? ये जवळ बैस. " असे प्रेमाचे उद्गार लोकमान्याच्या तोंडून निघाले. १९०६ सालीं लोकमान्य बेळगावास आल्यावेळीं एक स्वयंसेवक म्हणून गोविंदरावाची व लोकमान्यांची चारपांच दिवसाची माहिती; पण तो एक कर्तबगार मनुष्य आहे अशी लोकमान्याची त्यावेळीं समजूत झालेली. म्हणून सातआठ वर्षांनंतर देखील नावासहित लोकमान्याना गोविंदरावांची आठवण राहिली होती. ' आपणांस गोविंदरावाचें इतकें कसें स्मरण राहिलें ? ' असें विचारताच ते मला म्हणाले " अशा प्रकारचीं माणसें मी कसा विसरू ? " पुढें लोकमान्याच्या गैरहजेरींतील गोविंदरावांची कामगिरी लोकमान्याच्या कानावर गेली. त्यामुळें त्याच्याबद्दल लोकमान्यांचें प्रेम जास्तच झालें. शेवटच्या दुखण्यापूर्वी गोविंदराव मुंबईत सरदारगृहांतच रहात असत. लोकमान्यांच्याकडे ते वारवार भेटण्यास जात. त्याचा परिणाम गोविंदरावावर इतका झाला कीं, लोकमान्यांचें देहावसान झालें त्याच रात्रीं त्यांनीं आपला अत्यंत फायद्याचा धंदा सोडून सर्वस्वी सार्वजनिक कामाकरितांच आपल्यास वाहून घेण्याचा निश्चय केला व गेल्या वर्षी त्यांच्या निधनापर्यंत तो त्यांनीं टिकविला होता.

( २० ) लोकमान्य मंडळींत असतांनाच माझा व हल्लीं " मराठा " पत्राचे संपादक असलेले श्री. दामोदर विश्वनाथ उर्फ बाबुराव गोखले यांच्याशीं स्नेहसंबंध जडला होता. त्यांची एल्‌एल्. बी. ची परीक्षा पास झाल्यानंतर त्यांनीं ठाण्यास वकीली करण्यास सुरवात केली. पण माझी इच्छा व त्यांचीहि इच्छा त्यांनीं सर्वस्वी सार्वजनिक कामांतच पडावें अशी होती. त्या इच्छेनुसार केसरी ऑफीसात त्याचा प्रवेश होऊन त्यांनीं वकिलीला रामराम ठोकला. माझा व बाबुरावांचा विशेष जिव्हाळा असल्यामुळें व ते नवीनच केसरी संस्थेला मिळाल्याने त्यांच्याबद्दल मला काळजी वाटणें साहजिक होते. लोकमान्यांचें मत त्यांच्या संबधानें कसें काय होत चाललें आहे हें प्रत्यक्ष विचारून पहाण्याची मला एकदां जिज्ञासा उत्पन्न झाली व त्याप्रमाणें " बाबुरावाचे लिहिणें वगैरे कसें काय पसंत पडते ? " असा मीं लोकमान्यांकडे सहज प्रश्न केला. " अहो, लिहिणे वगैरे सवयीनें सुधारता येते; उद्योग व आस्था असली म्हणजे झालें. पण मला विश्वासाचा एक मनुष्य पाहिजे होता, तो मिळाला झाले. " असें उत्तर मिळालें.

( २१ ) १९१५ सालीं पुण्यास लोकमान्यांनीं प्रांतिक परिषद भरविली होती. त्या परिषदेला लोकमान्यांच्या पक्षांतील बहुतेक मंडळी आली होती. विषयनियामक कमिटींत बॅ. विनायकराव सावरकर व इतर राजकीय कैदी यांच्या बंधमुक्ततेसंबधानें ठराव आला होता. मीं त्या ठरावास पाठिंबा दिला होता; पण आमच्याच प्रांतातील कांहीं प्रमुख मंडळींनीं या ठरावास विरोध केला होता. कोणी असें म्हणत कीं, ' राजकीय कैदी याचा अर्थच आपणास समजत नाहीं,' तर कोणी म्हणे कीं, 'असा ठराव मान्य केला तर सरकार काय म्हणेल ? 'वाद विकोपास जाऊं लागला. एकाने तर 'विषयनियामकमंडळांत हा ठराव मान्य झाला तरी भर कान्फरन्समध्ये आपण विरोध करू' अशी धमकी दिली. मींहि हट्ट धरिला. तेव्हां लोकमान्यानीं मला एकीकडे नेले व सांगितलें कीं, " तुमचें सर्व म्हणणें मला कबूल आहे. माझ्या गैरहजेरींत सर्व घडी विघडली आहे, म्हणून मीं ही कान्फरन्स भरविली आहे. यात जे ठराव करावयाचे ते सर्व एकमतानें झाले पाहिजेत. अशा लोकांना पळून जाण्याला निमित्त देऊं नका. एकदां आमच्या गोटांतले असे होऊं द्या, मग पाहू. " असें सांगितल्यावर वाद मिटला व ठराव गाळला गेला.

( २२ ) याच कान्फरन्समध्ये १९१६ सालची कान्फरन्स कोठे भरवावी याचा विचार चालू झाला. कांहीं ठिकाणची मंडळी आमंत्रण देण्यास तयार होती; पण लोकमान्यांचे समाधान होईना. तेव्हां त्यांनीं मला बोलावून स्पष्टपणें बजाविलें कीं, " पुढच्या कान्फरन्समध्यें मला होमरूल लीग स्थापावयाचा आहे. तोंपर्यंत मी यबद्दल लोकमत तयार करणार. कान्फरन्स अशा ठिकाणीं

झाली पाहिजे कीं, तेथें या विषयाबद्दल खात्रीने अनुकूल लोकमत असेल. असें ठिकाण म्हणजे मला एक पुणें किंवा बेळगांव दिसतें. तेव्हां तुम्ही बेळगांवाचें आमन्त्रण द्या." वरील आठवणींत नमूद केलेल्या ठरावासंबंधानें जो वाद-विवाद झाला होता त्यामुळें मला बेळगांवसंबंधाने तितकी खात्री वाटत नव्हती. पण लोकमान्यांनीं त्याबद्दल आपण काळजी घेण्याचें आश्वासन देऊन बेळगांवचेंच आमन्त्रण निश्चित केलें व मला जी भीति वाटत होती ती त्यांनीं आपल्या वर्तनानें समूळ नाहींशी केली, व १९१६ सालीं बेळगांव येथेंच होमरूलहीग एकमतानें स्थापन झाला. कान्फरन्सचें काम उत्तम प्रकारें व लोकमान्यांच्या मनाजोगें झालें. नंतर लोकमान्यांनीं, "कां तुमची भीति आतां तरी गेली कीं नाहीं." असें मला हंसत हसत विचारलें.

(२३) १९१६ सालीं बेळगांवला कान्फरन्स होण्यापूर्वी कांहीं दिवस कॉंग्रेसमध्ये क्रीडवर सही करून जावें किंवा नाहीं हा प्रश्न उद्भवला होता व त्याबद्दल वाटाघाट करण्याकरितां लोकमान्यांनीं आपल्या कांहीं मंडळींस पुण्यास बोलाविलें होतें. वाड्यात सकाळपासून वाटाघाट चालू झाली. वाद जोरांत चालला. लोकमान्य कांहीं वेळ वादांत भाग घेत व कांहीं वेळ आपल्या माडीवर जाऊन बसत. मला वादाचा कंटाळा आला. मी लोकमान्यांना त्यांच्या माडीवर जाऊन विचारलें, "विनाकारण काथ्याकूट कां? आपल्या मनांत काय आहे ते स्पष्ट सांगा. असल्या प्रसंगीं माझ्या समजुतीप्रमाणे आमचीं वैयक्तिक मतें बाजूला सारून आपल्याच बुद्धीला शरण जाणें योग्य आहे. अशा वेळीं Personality म्हणजेच Principle असें समजणाऱ्यांपैकीं मी आहे." तेव्हां लोकमान्यांनीं उत्तर दिलें, "सर्वांनाच असें कोठें वाटतें! खल झालेला बरा. पण माझ्या मनांत क्रीडवर सही करून कॉंग्रेसमध्यें जावें असें आहे. कॉंग्रेसच्या बाहेर राहून कांहीं काम झालें नाहीं." मीं त्यांना इतकेंच सांगितलें कीं, "बेळगाव जिल्ह्याचें मत तुमच्याच बाजूचे आहे असें समजा. बाकी तुम्ही संभाळा." बेळगांवास कांग्रेसमध्यें शिरण्याचे ठरलें हें प्रसिद्धच आहे.

(२४) १९१६ सालीं महात्मा गांधींच्या संबधानें हिंदुस्थानांत बरीच माहिती झाली होती, व ते हिंदुस्थानच्या राजकीय क्षितिजावर लवकरच चमक-तील अशीं चिन्हें दिसत होतीं. त्यानीं 'Servants of India Society' या संस्थेला मिळावें अशी कित्येकांची खटपट चालली होती. स्वतः त्यानीं अद्यापि आपलें धोरण निश्चितपणें ठरविलें नव्हतें. त्यानीं बेळगांवला कान्फरन्सला यावें व टिळकपक्षाची त्यांना माहिती व्हावी अशी माझी इच्छा होती. त्यांना माझे मित्र श्री. दत्तात्रय बाळकृष्ण ऊर्फ काका कालेलकर यांच्या मार्फत मी आमंत्रण दिले होतें, व तें महात्मा गांधींनीं स्वीकारलेंहि. बेळगांवच्या कान्फ-

रन्सला महात्मा गांधींच्या आगमनाने महत्त्व येईल म्हणून कांहीं नेमस्तांनीं त्यांनीं कान्फरन्सला येऊं नये अशी खटपट केल्याचें माझ्या कानीं आलें. म्हणून म. गांधींना मीं पुनः पत्र लिहिले. त्याचें उत्तर ' Nothing but death will prevent me from going to Belgaum ' असें आलें. असो; म. गांधी कॉन्फरन्सला आले. लोकमान्यांची व त्यांची भेट व्हावी अशी माझी मनापासून इच्छा होती. त्याप्रमाणे त्यांची गांठ पडली. त्यावेळीं त्यांच्याबरोबर श्रीमंत दादासाहेब खापर्डे होते. तिथे बराच वेळपर्यंत बोलत बसले होते. भेट संपल्यानंतर मीं लोकमान्यांना विचारलें " कसे काय ? " याचें उत्तर लोकमान्यांनीं देण्यापूर्वीच खापर्डे साहेबानीं ' आमचा नव्हे ' असें उत्तर दिले. त्यानंतर लोकमान्य मुळींच कांहीं बोलले नाहींत; पण त्यांना श्री. खापर्डे यांचें उत्तर पटले नाहीं, असा माझा ग्रह झाला.

( २५ ) वॉर-कॉन्फरन्सच्या वेळीं लोकमान्यांची व महात्माजींची सरदार-गृहांत गांठ पडली होती. 'रिक्रूट मिळविण्याकरितां सरकाराला मदत करावी असा एक ठराव कॉन्फरन्सपुढें येणार होता. म. गांधी त्या ठरावावर अनुकूल बोलणार होते. ' पण सरकाराकडून स्वराज्याला पाठिंबा मिळत असल्यास आपण सरकारास मदत करण्यास तयार व्हावे' असा विचार कॉन्फरन्सपुढें मांडण्याचे लोकमान्यांचे ठरलें होते. त्याला गांधींनीं पुष्टि द्यावी अशी लोकमान्यांची इच्छा होती, व त्याप्रमाणे ते महात्माजींचें मन वळविण्याचा प्रयत्न करीत होते. त्या वेळीं म. गांधींच्या पाठीवरून हात फिरवून ते म्हणाले " My good friend, you have not burnt your fingers as yet while playing with this Government. During the last forty years my fiingers have burnt more than once. When you will get your fingers burnt I am sure you will go ahead of me." म. गांधी हसले व आपण ठरावाविरुद्ध बोलण्यापेक्षां न बोलण्याचेंच त्यांनीं ठरविले. कार्यक्रमपत्रिकेत मूळ ठरावाला पुष्टि देणारामध्यें महात्माजींचे नांव होते ते त्यांनीं कमी करून घेतले. अशाप्रकारें नांवांत खोडाखोड झाल्याने म. गांधी पुष्टि देत नाहींत असा कान्फरन्समध्यें गवगवा झाला. म. गांधी आपल्याप्रमाणे बोलले नाहींत हे एकापरीनें बरें; ते सरकारी ठरावाला पुष्टि देणार होते, असे प्रसिद्ध झाल्यानंतर म. गांधी तसें करण्यास तयार नाहींत याचाच परिणाम जास्त चांगला होईल असे लोकमान्यांना वाटून' " तृतीयपंथी खरा. पण याला सोडून उपयोगाचें नाहीं." असे उद्गार लोकमान्यांच्या तोंडून बाहेर पडले.

---

## सौ० पार्वतीबाई केतकर

[ लोकमान्याची ज्येष्ठ कन्या, यांना माहेरी 'ताई' म्हणतात. श्रीयुत विश्वनाथ गंगाधर केतकर, बी. ए. एल्‌एल्. बी. वकील, नाशीक याच्या पत्नी. ]

रा. रा. बापट याच्या विनतीवरून मी लोकमान्याच्या आठवणी लिहिण्याचा प्रयत्न करीत आहें. ती० दादाची घटका दोन घटका ज्याच्याशीं गाठ पडली, त्यांनीं त्यांचे शब्द लक्षांत ठेवून आठवणी लिहिल्या. पण नेहमींच्या सहवासाच्या त्याच्याच माणसांनीं लिहावयाचें काय व वगळावयाचें काय तेंच समजत नाहीं. तथापि मी यथाशक्ति लिहिण्याचा यत्न करीत आहें.

( १ ) आम्ही श्री० सरदार विंचूरकर यांचे वाड्यांत रहावयास गेलों. तेव्हा-पासून काहीं गोष्टी आठवतात. तेव्हा मी फीमेल हायस्कूलमध्ये जात होतें व माझ्या पाठचा भाऊ विश्वनाथ हा पण शाळेंत जात होता. आम्हाला वाचनाचा नाद होता, पण ती० दादा आम्हाला नाटकें व कादंबऱ्या बिलकूल वाचून देत नसत. आमच्या हातात जर एखादें नाटकाचें पुस्तक ती० दादानीं पाहिलें तर ते लागलींच तें आमच्यापासून घेत व आम्हाला रागे भरत असत. लहान मुलानीं नाटकें वाचू नयेत असे म्हणत. आम्हाला वर्तमानपत्रेंहि फारशीं वाचू देत नसत; पण केव्हा केव्हा 'केसरी' व 'सुधारक' आम्ही वाचीत होतों. सुधारकात त्या वेळेस सामाजिक सुधारणेबद्दल काहीं लेख येत असत. मीं एकदा त्यातले कांहीं लेख वाचले. मी ती० दादाना म्हणाले कीं, 'याचें म्हणणें मला खरें वाटतें.' तेव्हा ती० दादा म्हणाले 'तें खरेंच आहे. एवढे सुशिक्षित लोक खोटें कसं लिहितील?' मी म्हणाले 'दादा, मग तुम्हीं याच्या विरुद्ध का हो लिहिता?' तेव्हा ते म्हणाले 'मला रानात जाऊन रहावयाचे नाहीं. लोकांत राहूनच काम करावयाचे आहे.' मला त्या वेळेस काहीं त्याचा बरोबर अर्थ कळला नाहीं.

(२) मी फीमेल हायस्कूलमध्यें जात होतें, तेथे मराठी चवथ्या इयत्तेबरोबर इंग्लिश पहिली याप्रमाणें शिकवीत असत. १२ वर्षांनतर मुलींचें लग्न होतें व तोंपर्यंत मराठीहि पुरतें होत नाहीं व इंग्लिशहि अर्धवटच होतें. करिता अगोदर मराठी पूर्ण झाल्याखेरीज इंग्लिश शिकवू नये असे ती. दादाचें मत होतें. ती० दादानीं शाळेत जाऊन इंग्लिश तासाचे वेळीं मी दुसऱ्या एखाद्या वर्गांत गणित अगर संस्कृत तासाला जावें अशी व्यवस्था केली होती. याबद्दल त्या वेळची शाळेतली काहीं मंडळी ती० दादाना विक्षिप्त म्हणत व टीका करीत.

(३) मी शाळेंत जात होते, त्या वेळेस मला शाळेतून घरीं आल्यावर साडी बदलावी लागे. म्हणून मी ती० दादाना म्हणाले कीं, 'मला नेसावयाला चिटें द्या.' तेव्हां ती० दादा म्हणाले 'चिटें कांहीं मी तुला घेणार नाहीं, तीं विलायती

असतात;' व त्यांनीं मला स्वदेशीचें महत्त्व समजावून सांगितलें. तेव्हां मला समजले कीं, शाळेंतल्या मुलींचे कपडे चागल्या तऱ्हेतऱ्हेच्या कापडाचे असतात, ते कापड विलायती असते. आमचे कपडे ठाणा क्लाथचे व परदेशी बुलनच्या कापडाऐवजीं धाबळीचे असत.

( ४ ) घरात रोज दोन वेळां चहा होत असे. पण आम्हाला कांहीं ती० सौ. आई चहा देत नसे. आम्ही दूध घेत असू. एक दिवस चहाच्या वेळेस आम्ही ती० दादांना म्हणालों 'तुम्ही कसा रोज चहा घेतां?' तेव्हां ती० दादा म्हणाले "बाप दारूबाज असला तरी मुलांनी दारू पिऊं नये. आम्हाला आता सवय लागली; तुम्ही लावून घेऊ नका." पुण्यांत चहा—प्रकरण झाले होतें त्यावेळची एक गोष्ट मला आठवते. एकदां माझ्याकडे काहीं मुलीं खेळावयास आल्या होत्या. एका मुलीला तहान लागली, मीं तिला पाणी आणून दिलें; पण ते न पितां, दुसऱ्या मुलीच्या कानात कायसे सांगून ती घरीं गेली. दुसऱ्या मुलीला मी विचारलें, 'ती गेली कां? आणि तिने तुझ्या कानात काय सागितले?' ती मुलगी म्हणाली 'तिने सांगितलें कीं, तुझ्या दादानीं मुसलमानाच्या हातचा भात खाल्ला म्हणून तुमच्या घरचें पाणी प्यायचें नाहीं!' तेव्हां मीं सौ० आईला सागितलें कीं, 'मुली असें म्हणत होत्या.' "लोक कांहींतरी खोटे उटवतात झाले' असें म्हणून सौ. आईने माझी समजूत केली. "बोलणे फोल झालें" या लेखावरून सुशिक्षितांचा गैरसमज दूर झाला तरी सर्वसाधारण समाजांत त्यावेळेस ती० दादाच्याबद्दल लोकमत कसे होतें तें या गोष्टीवरून दिसून येतें. पुढें विश्वनाथ याची मुंज झाली. त्याच्याकडून ती० दादा नेहमीं संध्या करून घेत, व एखादे वेळेस संध्या केली नाहीं तर रागे भरत. एक दिवस त्याने विचारलें 'दादा, तुम्ही का नाहीं संध्या करीत?' तेव्हां ते म्हणाले "मी तुझ्याएवढा होतों तेव्हा रोज संध्या करीत होतों. आतां मी रोज वेद वाचतो म्हणून संध्या करीत नाहीं." आम्हाला हें खरे वाटेना तेव्हां त्यानीं आम्हाला मॅक्समूलर साहेबानी केलेलीं वेदाच्या भाषांतराचीं जाडजाड पुस्तकें दाखविलीं. व म्हणाले 'पूर्वी दैत्यानीं वेद चोरून नेले होते, आतां जर्मनांनीं भाषांतर करून राजरोस नेले आहेत.'

( ५ ) केसरीकरता मजकूर ती० दादा नेहमीं सोमवारीं दुपारीं मोठ्याने सांगत व कोणीतरी कारकून लिहीत असे. एखादे वेळेस आम्ही जवळच्या खोलींत ऐकत बसत असू. त्यावेळेस ती० दादा आम्हाला थट्टेने म्हणत 'स्वयंपाक करतां करतां त्याची चव घ्यायची नसते. केसरी छापून आल्यावर वाचा.'

( ६ ) ती० दादांना एकदां मी जेवावयास बोलावण्याकरतां त्यांच्या माडीवर गेले. त्या वेळेस ती० दादा लिहीत होते. मी म्हणाले दादा, जेवायचे झाले आहे, आघोळीला चला. पहिल्यानें त्यांना माझे बोलणे ऐकू गेले नाहीं.

ते लिहिण्यात गढून गेले होते; पण थोड्या वेळानें ते मला म्हणाले " अन्नदेव चुकला." मीं म्हटलें 'काय?' तेव्हां ते म्हणाले. " पोटाच्या पिशवीला एक भोक पाहिजे होतें, म्हणजे त्यात अन्नरस भरला कीं. झालें काम. जेवणाकरिता वेळ मोडावयास नको."

( ७ ) १९०४ सालीं मे महिन्यांत आम्ही सिंहगडावर होतों. तीं० दादा कांहीं कामाकरिता पुण्यास गेले होते व दुसरे दिवशीं रात्रीं परत येणार होते. तेव्हां त्यांचा गुडघा दुखत होता. गडाच्या पायथ्याशीं खुर्ची त्याना वर येण्याकरतां सांगून ठेवली होती. दुसरे दिवशीं तीं० दादा टांग्यानें पुण्याहून सिंहगडाच्या पायथ्याशीं आले, पण घर येण्यास खुर्ची कांहीं मिळेना. सध्याकाळ झाली, वाटेत झाडी, वाघाची भीति, गुडघा दुखत होता, चालवत नव्हतें, गडावर चढावयाचें कसें ? पण तसेंच एक मनुष्य बरोबर घेऊन व काठी हातात घेऊन मोठ्या कष्टानें गड चढून आले. आम्हीं गडावर त्यांची वाट पहात होतों. दिवे लागले, ७ वाजले तेव्हां आम्हाला वाटलें, तीं० दादा कांहीं आज येत नाहींत. पहातों तों ८ वाजता तीं० दादा काठी टेकीत आले व म्हणाले " मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम्, हें आज खरें झालें. मी पांगळा आज गिरी चढून आलों." पुढे त्यांचा पाय जास्त सुजला व पायाचें दुखणें बरेच दिवस पुरलें.

( ८ ) १९१७ सालीं तीं० दादा मंडालेहून आल्यानतर उन्हाळ्यात आम्ही सर्व मडळी सिंहगडावर होतों. आम्ही तिघी बहिणी, चि. रामभाऊ व बापू, चि० गणपती व मुलें अशीं सर्व एकत्र जमलों होतों. तीं० सौ० आई नव्हती म्हणून मात्र आम्हाला वाईट वाटत असे. मडळींची गर्दी नसे म्हणून तीं० दादाजवळ पुष्कळ बोलावयास सांपडत असे. एक दिवस तीं० दादा, चि० गणपतीशीं कांहीं बोलत होते, तितक्यांत मी तेथें गेलें, तेव्हां ते म्हणाले "ऐकलेस का? मी चि० गणपतीला केसरीचा एडीटर करणार आहे." मीं म्हटलें 'करा.' तेव्हां ते म्हणाले " त्याला तुरुंगांत जावें लागेल; आहे कां तुझी तयारी ? "

त्यानतर तीं० दादा जेव्हा विलायतेहून आले तेव्हा मुंबईस आम्ही भेटण्यास गेलों होतों. ते म्हणाले 'चि० गणपती आतां एलूएल्. बी. झाला म्हणजे मी त्याला माझा प्रायव्हेट सेक्रेटरी करणार आहें.' परतु असा सुयोग येण्याचे आमच्या दैवीं नव्हते. ईश्वरी सकेत वेगळाच होता.

---

# रामचंद्र दत्तात्रय रानडे

[ एम्. ए. ( चॅन्सेलर-मेडॅलिस्ट ), माजी प्रोफेसर फर्ग्युसन कॉलेज,
हल्लीं अध्यात्मविद्यापीठ, निंबाळ, जि० विजापूर ]

(१) लो. टिळकांच्या बुद्धिमत्तेचें तेज मी १९०६ सालीं डेकन कॉलेजमध्यें बी. ए. क्लासमध्यें वेदाचा अभ्यास करीत असतां प्रथम माझ्या नजरेस आलें. बेन साहेबांच्या मतें टिळकांनीं काढिलेला आर्यांच्या आर्क्टिक् प्रदेशांतील वसतिस्थानाबद्दलचा सिद्धांत चुकीचा असल्यानें व प्रस्तुत लेखकाच्या मतें तरी लो. टिळकांनीं आपला सिद्धांत उत्तम प्रमाणें दाखवून दृढमूल केला असल्याकारणानें बेन साहेबास तो सिद्धांत समजून देण्याकरितां कॉलेजांत मी एक व्याख्यान द्यावें असें ठरलें होतें. पण कांहीं कारणामुळें तें रहित झालें. तथापि लो. टिळकांच्या पुस्तकाच्या वाचनानें त्यांच्या बुद्धीबद्दल विशेष प्रकारचा आदर मनामध्यें उत्पन्न होऊन त्यांची एकदां भेट घ्यावी अशी प्रबल इच्छा मनांत उत्पन्न झाली. या इच्छेचें साफल्य सन १९०८ सालीं मी डे. कॉलेजांत फेलो असतांना कांहीं मित्रमंडळीसहवर्तमान मी लोकमान्यांस भेटण्यास गेलों, त्यांत झालें. त्यावेळीं राजकारणाची धांदल बरीच चालली असल्यानें लोकमान्यांशीं आर्क्टिक् होम या विषयावर बोलण्यास फारशी फुरसत सांपडली नाहीं.

(२) त्यानंतर लो. टिळकांस सहा वर्षांची शिक्षा होऊन ते मंडालेस गेले. ते इकडे परत येण्याच्या अवधींत माझींहि स्थित्यंतरें बरींच झालीं. गणित व वाङ्मय यांच्या आवडीऐवजीं तत्त्वज्ञानाबद्दल आवड उत्पन्न होऊन मी फर्ग्युसन कॉलेजमध्ये तत्त्वज्ञानाच्या प्रोफेसरचें काम पत्करलें होतें. लो. टिळक मंडालेहून परत आल्यावर त्यांच्या भेटीस मी कांहीं मित्रमंडळींसह गेलों. त्यावेळीं लो. टिळकांनीं मंडाले येथें तुरुंगांत लिहिलेली गीतारहस्याची हस्तलिखित प्रत आम्हांस दाखविली. त्यानंतर ज्यावेळेस "गीतारहस्य" प्रसिद्ध झालें त्यावेळीं श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांनीं गीतारहस्याबद्दल दोनतीन लेख तुम्हीं लिहिल्यास आम्हीं ते केसरींत छापूं असे मजला सांगितलें होतें. गीतारहस्य प्रसिद्ध झाल्यानंतर आठ दिवसांत जरी तें पुस्तक मीं वाचून काढलें, तथापि एकंदरींत मी त्यावेळीं त्याच्या परीक्षणाची घाई केली नाहीं हें एका अर्थी बरेंच झालें. कारण त्यावेळीं जरी मी १।२ वर्षें तत्त्वज्ञानाच्या प्रोफेसरचें काम करीत आलों होतों, तथापि त्या विषयावर अभिप्राय देण्याइतकी माझी बुद्धि परिपक्व झाली नव्हती, हें कबूल केलें पाहिजे.

(३) सन १९१६ सालीं मी टिळकांस त्यांचे पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर भेटण्यास गेलों असतां त्यांनीं 'गीतारहस्यांतील विशेष तुम्हांस कोणता वाटतो' असा मला प्रश्न केला. त्यावर मी त्यांस उत्तर दिलें कीं, 'गीतारहस्यांतील

मोठा विशेष म्हटला म्हणजे महाभारतांतील कथांचा आणि नीति व राजकारणोक्तींचा उल्लेख ठिकठिकाणीं जो गीतारहस्यात आला आहे, तोच होय.' मीं लो. टिळकांस असेंहि सांगितलें कीं, 'गीतारहस्यासारखा तुलनात्मक तात्त्विक ग्रंथ एखादे वेळेस कदाचित् कोणास लिहितां आला असता, परतु गीतारहस्यामध्यें महाभारताचा अत्यंत निकट परिचय जो ठिकठिकाणीं दृग्गोचर होतो तो मात्र कोणासहि करितां आला नसतां.' दुसरा विशेष म्हटला म्हणजे लो. टिळकांनीं तत्त्वज्ञानाची महाराष्ट्रभाषेमध्यें उत्कृष्ट परिभाषा उत्पन्न केली व शुद्ध रीतीनें महाराष्ट्रभाषेंतहि तात्त्विक प्रश्नांचा सांगोपांग उहापोह करण्याची पद्धत घालून दिली हा होय. लो. टिळकांनीं या दोन्ही गोष्टी कबूल केल्या.

(४) सन १९१७ सालीं मी लो. टिळकांच्या भेटीस गेलों असता एक महत्त्वाचें संभाषण झालें. मीं राजकारणांत शिरावें अशी लोकमान्यांची इच्छा असल्याचें त्यांनीं माझ्या दोघां स्नेह्यांजवळ बोलून दाखविलें होतें. त्या बरहुकूम मी जेव्हां त्यांस भेटण्यास गेलों तेव्हां त्यांनीं मला असा प्रश्न केला कीं, 'मी अगोदरच तुमच्या दोघा स्नेह्यांजवळ तुम्हीं राजकारणांत शिरावे अशी इच्छा प्रदर्शित केली आहे. त्याप्रमाणें तुम्हीं राजकारणात शिरण्यास तयार आहां काय ?' तेव्हां मीं त्यांस सांगितलें कीं, 'डेक्कन एज्युकेशन सोसायटीमध्यें लाईफ मेंबर होऊन मला तीनच वर्षें झालीं आहेत व अद्याप असें कोणतेंहि कारण उद्भवलें नाहीं कीं ज्यामुळें मीं डेक्कन एज्युकेशन सोसायटी सोडावी. शिवाय राजकारणापेक्षां धर्मज्ञानाकडे माझी जास्त प्रवृत्ति असल्यामुळें तिकडेच मीं परिश्रम केल्यास जास्त बरें होईल. शिवाय लोकमान्यांच्याच मताप्रमाणें उत्तम प्रकारें राजकारण करण्यास मनुष्य अगोदर स्थितप्रज्ञ झाला पाहिजे, व ही स्थितप्रज्ञता आपल्या आंगीं बाणली आहे किंवा नाहीं हें जाणूनच मनुष्यानें राजकारणाच्या आखाड्यांत पाय घातला पाहिजे.' हें ऐकून लो. टिळक हसले व म्हणाले कीं, "अरविंदबाबूहि असाच Mystic आहे" त्यानंतर माझी धर्म व तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासाकडे ज्यास्त प्रवृत्ति पाहून लो. टिळक असेंहि म्हणाले कीं, 'तुम्हांस मुंबई युनिव्हर्सिटीनें 'प्रोफेसर ऑफ हिंदु रिलिजन' नेमावें अशाबद्दल एक लक्ष रुपये जमवून मी मुंबई युनिव्हर्सिटीच्या स्वाधीन करू शकेन.' त्यावर मीं त्यांस सांगितलें कीं, 'तुम्हीं ही रक्कम युनिव्हर्सिटीच्या स्वाधीन करूं शकाल, पण त्यांच्या अनेक भानगडी असल्याकारणानें ते मला युनिव्हर्सिटीमध्ये 'प्रोफेसर ऑफ हिंदु रिलिजन' करूं शकतील कीं नाहीं याची शंकाच आहे.' त्यानंतर या विषयासबंधानें लो. टिळकांचें व माझें फारसें बोलणें झालें नाहीं.

(५) सन १९१८ सालीं सप्टेंबर महिन्यांत माझे स्नेही डॉ. बेलवलकर व डॉ. सरदेसाई यांजसह मी लो. टिळकांस किमये यांच्या बंगल्यांत भेटावयास

गेलों होतो. डॉ. बेलवलकर व मी उभयतांनीं मिळून हिंदी तत्त्वज्ञानाचा इतिहास १०।१२ भागांमध्यें लिहिण्यासंबंधाची एक योजना तयार केली होती. ती लो. टिळकांसारख्या राष्ट्रनेत्या व विद्वान् पुढाऱ्याच्या नजरेस आणावी व त्यांचा त्या विषयाबद्दल काय अभिप्राय आहे तो समजून घ्यावा या उद्देशानें आम्हीं तिवर्ग लो. टिळकांकडे गेलो होतों. लो. टिळक त्यावेळीं आपल्या खटल्यासंबधानें विलायतेस जाण्याच्या जारीनें तयारीस लागले होते. तथापि लो. टिळकांची आम्हाविषयीं व या विषयासंबंधीं कळकळ इतकी अवर्णनीय होती कीं, त्यांनीं त्यावेळींहि वेळांत वेळ काढून आपले अमूल्य सहा तास आम्हांस दिले, व हिंदी तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचे जे आम्हीं भाग केले होते त्या सर्व भागांची पूर्णपणें चर्चा करून त्यांनीं "हे काम तडीस न्या" असें आग्रहानें आम्हांस सांगितलें. 'हिंदी तत्त्वज्ञानाचा इतिहास लिहिणें हें एक मोठें राष्ट्रीय काम आहे व हे काम तुम्हीं पार पाडू शकाल' असाहि त्यांनीं आम्हांस आशीर्वाद दिला. मी राजकारणांत पडलो नसतों तर अशाप्रकारचें प्रचंड कार्य मी स्वतःच अंगावर घेतले असतें असेंहि त्यांनीं आम्हांस सांगितलें. हिंदी तत्त्वज्ञानाच्या इतिहासाच्या आमच्या योजनेवर त्यांचा अभिप्राय घेऊन आम्हीं परत आलों.

(६) त्यानंतर एकदां मी लो. टिळकांस सरदारगृहांमध्यें रात्रीं साडेनऊ वाजण्याच्या सुमारास भेटण्यास गेलों असतां गीतारहस्याच्या इंग्रजी भाषांतराबद्दलची गोष्ट त्यांनीं मजजवळ काढली. 'गीतारहस्याचें भाषांतर करणें हे अत्यंत कठीण काम आहे व भाषांतरापेक्षां त्या ग्रंथाचें adaptation च करणें फार चांगलें होईल' असें मी त्यांस सांगितलें. तेव्हां लो. टिळक म्हणाले कीं, 'माझी इच्छाहि तशीच आहे. ग्रंथाचे भाषांतर करण्याऐवजीं त्याचें adaptation च इंग्रजी भाषेमध्यें झालें पाहिजे, व त्यांत गीतारहस्यामध्यें नसलेल्या आधुनिक तत्त्वज्ञांच्या मतांचा विचारहि झाला पाहिजे' असें ते म्हणाले. नंतर तें बोलणें तसेंच राहून टिळकांनीं मला असा प्रश्न केला कीं, "मी तुम्हांस नास्तिक वाटतो काय ?" त्यावर मीं त्यांस असें उत्तर दिलें कीं, ज्यांची गीतेच्या तत्त्वज्ञानावर इतकी निस्सीम श्रद्धा आहे त्यांस नास्तिक म्हणणें हें फारच आश्चर्याचें काम होईल.

---

# रघुनाथ पांडुरंग ऊर्फ दादासाहेब करंदीकर

[ नामदार, हायकोर्ट वकील, लोकमान्यांचे स्नेही, सातारा ]

( १ ) लोकमान्यांचें एकंदर भाग्य खरोखरच फार थोर होतें, यांत संशय नाहीं. त्यांचें वैभव, थाट व राहणी एखाद्या बादशहास शोभेल असाच योग जुळून येत असे. मग त्याचीं कारणें कोणतींहि असोत. ऐन युद्धाचे वेळीं लोकमान्य विलायतेस गेले होते. त्यावेळीं समुद्रांत पाणसुरुंगाची भीति फार असे. आसपास जवळ जवळ एकवीस जहाजें होतीं. व मधोमध लोकमान्यांचें जहाज असे. त्यामुळें आसपासच्या बंदरावरील लोकांस साहाजिकच आश्चर्य वाटावें कीं, एवढ्या मोठ्या लव्याजम्यानिशीं ज्याची स्वारी येत आहे तो एखादा संस्थानिक किंवा राजा तरी असला पाहिजे.

( २ ) लोकमान्यांचा स्वभाव मूळपासूनच अति धीट व धाडशी असे. कोणत्याहि धाडसाच्या कामांत त्यांचा पाय पुढें असे. जहाजास पाणसुरुंग लागला तर लाइफबोटीवरून कसें उतरावें याचा एकदा प्रयोग करून पाहण्याचे लोकमान्यांच्या मनांत आलें. पण हा प्रयोग करून पाहणार कोण ? कोणीच या गोष्टीस तयार होईना. तेव्हा कोणी पुढें येत नाहीं असें पाहून लोकमान्यांनीं स्वतः हातानें दोर सोडून लाइफ बोट सोडली व त्यांत उडी टाकून ती वल्हवीत जहाजापासून ते दूर गेले व पुन्हा परत येऊन बरोबरच्या लोकांकडून ती गोष्ट त्यांनीं करवून घेतली !

(३) लंडन येथें रहात असतांना लोकमान्यांना पायीं चालत जाण्याचा प्रसंग येत असे. लंडनच्या रस्त्यावर रहदारी विशेष व त्यामुळें लोकांची, गाड्याघोड्यांची व मोटारींची गर्दी फारच असावयाची. अशा वेळीं रस्त्यातून पायीं चालत जावयाचें म्हणजे मोठाच त्रास. रस्त्याच्या दोन्ही बाजूस मुद्दाम तयार केलेल्या फुटपाथ्यांवरून जावयाचें असलें तर कांहीं एवढी भीति वाटत नसे. पण रस्ता ओलांडून जावयाचें असलें म्हणजे मात्र मोठीच भीति असावयाची. कारण कोणत्या वेळीं कसा अपघात होईल याचा कांहींच नेम नसे. त्यातून लोकमान्यांचा पाय दुखावला असल्यामुळें आम्हांला त्यांची मोठीच भीति वाटत असे व आम्हीं त्यांस एकटें असें कोठेंच बाहेर जाऊं देत नव्हतों. नेहमीं एकदोन माणसें तरी बरोबर असावयाचींच. आम्हीं आमची भीति प्रदर्शित केली म्हणजे लोकमान्यांनीं म्हणावें, " अहो, एवढें घाबरता का ? गाडीखालीं चेंगरून मरण्यासाठीं कांहीं मी जन्मास आलों नाहीं ! "

( ४ ) याप्रमाणें पायीं चालत असतांना रस्ता ओलांडून जाण्याची वेळ आली तर मनांत कुठल्याहि तऱ्हेची भीति न बाळगतां लोकमान्यांनीं आपल्या

विचारतंद्रींतच बेधडक रस्ता ओलांडून जावें ! बरोबरच्या मंडळीस त्याबद्दल भीति वाटावी; पण त्यांच्या गांवींहि ही गोष्ट नसे. कांहीं वेळां असाहि प्रसंग येत असे कीं, लोकमान्यांस रस्ता ओलांडून जाणे अशक्य होई. पण अशा वेळीं आपण स्वतः न थांबतां आपणच हात वर करून मोटारीस थांबवावें व मोटार थांबली कीं आपण रस्ता ओलांडून निघून जावें ! लंडन येथील शिस्त वाखाणण्यासारखी असल्यामुळें हात वर केला कीं मोटार थांबत असे. मोटार थांबली कीं, लोकमान्यांनीं खुशाल रस्ता ओलांडून जावें ! लोकमान्यांची ही समयसूचकता व धाडस पाहून बॅ. बॅप्टिस्टा लोकमान्यांस विनोदाने म्हणत, 'दादा, इंडियन पोलिसांना तुमचा त्रास तर असेलच. पण लंडन पोलिसांसहि त्रास देण्यास तुम्ही कमी करीत नाहीं अं ?' त्यावर लोकमान्य उत्तर देत 'अहो, आम्हीं कुठेंहि गेलों तरी आमचें हें असेंच चालावयाचें.'

---

## नारायण रामलिंग वामणगांवकर

[ प्रसिद्ध नाटककार, स्वराज्य पक्षाचे प्रमुख सभासद, उमरावती.]

(१) ताई महाराज—प्रकरणांत लोकमान्य कमिशनकरतां अमरावतीस आले होते. त्यांचा मुक्काम कै० प्रल्हादराव जोग वकील यांचेकडे होता. टिळक अमरावतींत आले ही बातमी चोहोंकडे पसरली. विद्यार्थी व खेड्यापाड्यांतील लोक त्यांच्या दर्शनास येऊं लागले. या प्रसंगीं एके दिवशीं ते कोर्टांतून आले व नित्याप्रमाणें वर्तमानपत्रें वाचावयास बसले. इतक्यांत एक मळें मोठें वऱ्हाडी पागोटें घातलेला शेतकरी त्यांच्या भेटीस आला, आणि दारावरील स्वयंसेवकास म्हणूं लागला कीं, मला टिळक महाराजांस भेटावयाचें आहे. खेड्यांतील कुणबी माणूस भेटून काय करणार म्हणून त्या स्वयंसेवकानें उडवाउडवीचीं उत्तरे देऊन सदरहु शेतकऱ्यास परत पाठविण्याचा बराच प्रयत्न केला. हा प्रकार लोकमान्यांनीं ऐकला कीं काय नकळे; पण ते सुपारी फोडीत बाहेर आले. टिळक बाहेर आलेले पाहतांच शेतकऱ्यास फार आनंद झाला. तो पायावर डोकें ठेवून म्हणाला 'मुद्दाम आपल्या दर्शनास आलों. आपण मला ओळखत असाल. मी आपल्या केसरी पत्राचा वर्गणीदार आहें.' लोकमान्य हांसून म्हणाले, "आपण कोठले राहणारे ? आपली शेती किती आहे ? पिकें कशीं आली ? उत्पन्न काय होतें ? किती माणसांचा शेतीवर आपणास प्रपंच करावा लागतो ?" लोकमान्यांच्या सर्व प्रश्नांस शेतकऱ्यानें गाहिंवरून उत्तरें दिलीं. शेवटीं शेतकरी व सरकार यांचे अन्योन्य संबंध

काय हे लोकमान्यांनीं त्याच्या मनावर बिंबविले. केसरीपत्र आपणास वाचतां येतें काय हाहि एक प्रश्न होता. शेतकरी म्हणाला 'आमच्या पाडेवोबाकडून ( पटवाऱ्याकडून ) मी सर्व वाचून घेत असतों.' असा संवाद चालला असतां कांहीं बडी मंडळी भेटीस आली. शेतकरी 'खरा हजाराचा पोशिंदा' असे म्हणून निघून गेला. तरी टिळक तेथेंच उभे. ते स्वयंसेवकाकडे वळून म्हणाले. "हिंदुस्थानांत शेतकरी हा राष्ट्राचा आत्मा आहे. याच्यावरील मालिन्याचा पडदा जर दूर सारता आला तरच हिंदुस्थानचा उद्धार होईल. याकरिता शेतकरी आपला व आपण शेतकऱ्याचे असें आपणास वाटावयाला हवें."

(२) सुरतकाँग्रेस आटोपल्यावर शिक्षा होण्यापूर्वी लोकमान्य टिळक आकोल्यास आले होते. त्यांचा मुक्काम कै. व्यंकटराव देसाई यांचेकडे होता. तेथें एके दिवशीं तरुण मंडळी त्यांच्या सभोंवती जमली व सुरतेचा बखेडा हा विषय चर्चेला निघाला. "राष्ट्रीयसभा ही लोकजागृति करणारी संस्था व्हावी हे तत्त्वच हल्लींच्या नेमस्तांना पटत नाहीं. आणि तिच्या मागें प्रचंड लोकमताचा पाठिंबा असल्यावांचून ती कार्यकारी होणेंहि शक्य नाहीं. राष्ट्रीयसभा जर अहर्निश लोकजागृति करणारी संस्था बनली तर तिच्यावर म्हणजे तिच्या चालकावर सरकारची इतराजी होईल हें खरें; पण ती इतराजी सहन करूनच पुढें पाऊल टाकले पाहिजे. मेथाकपूला वाटते कीं, सरकार व लोक यांच्या मध्यवर्तीच ती संस्था असावी. हाच मुख्य आमच्यांत व त्यांच्यात मतभेद आहे. आपल्या कार्याला लोकजागृतीचा पाठींबा घेतल्यावाचून सरकार आपल्याला किंमत देत नाहीं ही गोष्ट आज यांच्या नाहीं तरी यांच्या पुढील पिढीच्या तरी नजरेला आल्यावांचून राहणार नाहीं." असा लोकमान्यांनीं सुरतेच्या बखेड्याचा निष्कर्ष काढला होता. शेवटीं तरुण पिढीला उद्देशून ते असें म्हणाले कीं, "आमची मदार सर्वस्वी तुमच्यावर आहे. पण तारुण्यांतील उत्साहांत व कल्पनांच्या रंगांत दंग होऊन उगीच घोडें पुढे दामटीत बसू नका. पुरेशी तयारी झाल्यावाचून लढाईला तयार होणारे सेनापति आरंभीं स्वतः धैर्याचे पुतळे ठरतील, पण त्यांना त्या लढाईत अपयश आल्यास राष्ट्राला मागे खेंचण्याच्या पापाचे धनी होऊन बसावें लागते हे विसरू नका! म्हणून ताणावें; पण तुटणार नाही हें पहात असावें. प्रतापसिंहापेक्षां शिवाजीचा हाच विशेष होता."

(३) लोकमान्य कैदेंतून सुटल्यावर महायुद्धाला सुरवात झाली. त्यांनीं हिंदी स्वराज्य संघाची चळवळ हातांत घेतली होती व राष्ट्रीयसभा लोकजागृतिकारक करण्याचे प्रयत्न चालू होते, आणि सरकार वॉरलोन काढण्याच्या व रिक्रूट जमविण्याच्या खटपटींत होतें. सरकारच्या अडचणीचा फायदा घेऊन त्याला शह कसा द्यावा हे विचार रात्रंदिवस त्यांच्या मनांत घोळत होते. पुणे येथे मीं प्रथमच लिहिलेल्या घडुभंग नाटकाचे प्रयोग सुरू होते. यांनी नाटकाला यावे म्हणून मी त्यांचेकडे गेलो.

होतों. मला पाहतांच 'व्याख्यानांतून काय प्रतिपादन करीत असतोस' म्हणून पहिला प्रश्न केला. त्यावरून विषय निघतां निघतां ते म्हणाले कीं, "काय करावें? लजपतराय येथे नाहींत. अरविंद बाबू पाँदिचरींत बसले. राष्ट्रांत कर्त्या लोकांचा तुटवडा आहे. प्रत्येक प्रांतांत जर मला एक एक लजपतराय व एक एक अरविंद बाबू लाभला असता तर वॉरलोन मिळणार नाही व रिक्रूट-भरती होणार नाहीं नाहीं अशी व्यवस्था संघटितपणें सर्व प्रांतांतून करतां आली असती व सरकारास नमवितां आलें असतें. पण आमच्यांतील शहाण्या व कर्त्या लोकांना सरकारच्या अडचणीचा फायदा घ्यावा, हें कळत नाहीं. व ज्यांना कळतो त्यांना स्वतःवर देशांत येणारीं संकटें देशांतच सहन करावीं व संकटांतून मुक्त झाल्यावर पुन्हां देशांतच कार्याला लागावें हें कळत नाहीं. राज्यक्रांतीचे इतिहास वाचतात व त्यांतील नायक होण्याचें ध्येय डोळ्यापुढें ठेवतात. पण तोच इतिहास आपल्या देशाची परिस्थिति ओळखून अमलांत कसा आणावा याचें मात्र तारतम्य ज्ञान नाहीं. राष्ट्रांत गुण आहेत व ते उत्पन्नहि होतात. पण ते अद्याप मातीमोल होतात, याला काय करावें?" या वेळीं त्यांच्या ठिकाणीं जी तळमळ दिसली ती पाहून 'आज नाटकाला येतां काय' हें विचारण्याची मला लाज वाटली, आणि या वेळीं तरी नाटकाची गोष्ट न बोलतां मी तसाच निघून गेलों.

(४) १९१७ सालांतील प्रसंग. जातवार प्रतिनिधींची मागणी सुरू झाली होती व ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद भराला आला होता. अथणी येथे बेळगांव जिल्हा परिषदेला लोकमान्य हजर होते. तेथें खाजगी बैठकींत कोणी लोकमान्यांना प्रश्न केला कीं, 'ब्राह्मणेतरांचा आपल्यावरच फार राग दिसतो.' तेव्हां ते म्हणाले कीं, "त्यानीं आमच्यावर कां रागावू नये? लखनौ येथे मुसलमानांचे प्रातिनिधिक प्रमाण कबूल करून कॉंग्रेसच्या मागणीला आम्हीं मुसलमानांचा पाठिंबा घेतला, हे कॉंग्रेसच्या शत्रूला बरें दिसत असेल काय? एक दुही मिटली तर त्यांनीं दुसरी उत्पन्न केली. पण मला एक आनंद होतो कीं, या प्रयत्नाने कां होईना कांहीं मोठ्या लोकांत स्वाभिमान जागृत होऊन कोणत्या ना कोणत्या तरी निमित्तानें, आमच्यावरील रागाच्या मिषानें कां होईना, पण सरकारपाशीं ते कांहीं मागणे मागूं लागले. सरकार दुहीच्या बिजारोपणापुरती कदाचित् ही मागणी पुरवीलहि, नाहीं असें नाहीं. पण मागणी वाढू लागेल आणि शेवटीं सरकार त्यांना निराश करील, आणि ही निराशाच त्यांना आमच्यांत अंतर्भूत व्हावयाला कारणीभूत होईल. आपण या विरोधाला न जुमानतां जर प्रामाणिकपणे बहुजन समाजाच्या सरकाराशीं येणाऱ्या हितसबधांत त्यांच्यातर्फे झगडत आहो हे जर त्यांना प्रत्यक्ष दिसत राहिले तर माझी खात्री आहे कीं, सामाजिक विषमतेवर उभारलेली ही चळवळ सरकाराशीं चाललेल्या झगड्यांत आपल्याशीं सहकार्यच करील व करावेंच लागेल. त्यावांचून या चळवळीला फार काळ जगतांच येणार नाहीं."

यावर एक धार्मिक श्रद्धेचे गृहस्थ म्हणाले कीं, 'सगळ्या जाती एक व्हाव्यात व ब्राह्मण नष्ट व्हावेत असें त्याना वाटतें याला काय उपाय?' तेव्हां लोकमान्य म्हणाले कीं, " खरा ब्राह्मण असेल तो नष्ट होणार नाहीं. निदान हा आघात खरें ब्राह्मण निर्माण करावयाला कारणीभूत होईल. आणि सर्व जाती एक होणें शक्य नाहीं. पण विषमता शास्त्रीनें दुरावेल. तेव्हां या चळवळींतील अतिरेकाशीं झगडणें हें जसें आपलें काम आहे तद्वतच आपल्यांतील दोष नाहींसे करणेंहि आपलें काम आहे "

(५) कलकत्यास बिझान्टबाईच्या अध्यक्षतेखालीं कॉंग्रेस झाली. या कॉंग्रेसमध्यें मुख्य विषय इंग्लंडमध्यें डेप्युटेशन पाठवावें हा होता. विषयनियामकमंडळांत डेप्युटेशन पाठविण्याबद्दल मतभेद नव्हता. पण तें डेप्युटेशन कोणाच्या नेतृत्वा-खालीं पाठवावें हाच वादग्रस्त प्रश्न होता. डेप्युटेशनमध्यें टिळक नकोत ही खटपट शास्त्री—मालवीय मंडळींची होती. महात्मा गांधी विषयनियामकमंडळांत हजर होते. त्यांनीं या डेप्युटेशनचें नेतृत्व पत्करावें असा उद्योग पंडित मालवीय व ना. शास्त्री यांनीं चालविला होता. महात्माजींना डेप्युटेशनचें महत्त्व पटवावें म्हणून शास्त्री व पंडितजी यांनीं फार लांबलचक भाषणें केलीं. टिळक हसत होते. शेवटीं महात्माजींनीं डेप्युटेशनचें महत्त्व मला पटत नाहीं असें वाक्य हळूच पण शांततेनें उच्चारलें. पुढें उपहाराच्या प्रसंगीं ना. शास्त्री याना टिळक म्हणाले " महात्माजींना आपल्या हातात खेळविण्याचा तुम्हीं प्रयत्न केला, पण फसला म्हणायचा. महात्माजींची ओळख तुम्हास पटली असती तर निराशा अखेर पदरांत आली नसती. महात्माजींजवळ एकच ' मेथड ' आहे; ती ज्याना पटेल त्यांचेच ते! हा शिवाय कोणाच्या हातात ते खेळावयाचे नाहींत व कोणाला खेळविण्याच्या व्यर्थ उद्योगांत लागावयाचे नाहींत." शास्त्रिबुवांना हें म्हणणें त्या वेळीं तरी पटलें होतें असें त्यांच्या चेहऱ्यावरून दिसलें नाहीं.

(६) हिंदी स्वराज्यसंघाच्या चळवळीच्या वेळीं वऱ्हाडचा दौरा संपवून ते पुण्यास आले. त्यानंतर पुणें येथे आम्हीं कांहीं मंडळी गेलों असता आमच्यापैकीं एकानें त्यांना काहीं प्रश्न विचारले. त्यात दोन प्रश्न महत्त्वाचे होते. पहिला प्रश्न 'कोऑपरे-टिव्ह सोसायटींत राष्ट्रीय पक्षाच्या माणसानें काम करावें कीं न करावें' हा होता. टिळक म्हणाले, " खेड्यापाड्यांतील लोकांशीं संबंध येऊन दहा माणसें आपलीशीं करण्याला उद्योग चांगला आहे; पण नेहमीं सरकारी अधिकाऱ्याशीं संबंध येणाऱ्या या संस्थेंत असा प्रकार घडतो कीं, आरंभीं काम करताना जी दृष्टि किंवा जें ध्येय डोळ्यापुढें असते तें अधिकाऱ्याच्या संसर्गानें फार काळ टिकत नसतें. अधिकाऱ्याच्या प्रेमाचा व लोभाचा विचार मनात न येऊ देता तींत काम करणारे तेजस्वी लोक निघाले तर मी देशाचा भाग्योदय जवळ आला असें

समजेल. काम कोठें करावें व करू नये हा महत्त्वाचा प्रश्न नसून काम करणारा कसा आहे हाच मुख्य प्रश्न आहे."

दुसरा प्रश्न 'कै. ना. गोखले यांच्या सर्व्हंन्ट ऑफ इंडिया सोसायटीप्रमाणे आपल्या पक्षाची एक सोसायटी आपण कां स्थापन करीत नाहीं' असा होता. त्या संबंधानें ते म्हणाले कीं, "संस्था काढली कीं, संस्थेंतील लोक पुढे मागें तिच्या कार्याच्या वा उद्दिष्टाच्या अभिमानापेक्षां संस्थेचेच अधिक अभिमानी बनतात. पारतन्त्र्यांतून राष्ट्र वर आणू पाहणाऱ्या संस्थांवर कार्य करतांना संकटें हीं यावयाचींच. अशा प्रसगीं संस्थांचा अभिमान हा सहजगत्या कार्यनाश करणारा होतो. म्हणून संस्थेच्या बंधनावांचून कार्यकर्त्यांचा संघ बनणेंच अधिक अवश्य आहे, पण तो बनविल्यानें बनत नाहीं, काम करीत असताच बनतो. देशाच्या सद्यस्थितींत राजकारणाचा काळ हा भरतीचा व ओहटीचा असणार. याकरितां राजकाणाला वाहून घेणाऱ्या लोकांनीं राजकारणाखेरीज आपली गति चालेल अशा एकाद्या विषयाचा व्यासंग अवश्य केला पाहिजे. तसें झालें म्हणजे ओहटीचा काळ निराशेंत जात नाहीं आणि आपणाला अवगत असलेल्या विषयातील तज्ञाशीं आपलें सहकार्य अधिक होतें. अशा रीतीनें कार्याची व्याप्ति वाढते. तेव्हां अशा लोकाकरितां नित्याची संस्था काढून उपयोग काय?"

(७) १९२० सालीं मुंबई इलाख्याची प्रांतिक परिषद सोलापूर येथे श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. त्यावेळीं सोलापुरांत लोकमान्यांचीं जाहीर व्याख्यानें झालीं होतीं. एका व्याख्यानांत ते असे म्हणाले कीं, "अमृतसर कॉंग्रेसचें धोरण मान्य असलेल्या प्रतिनिधींचें जर कौन्सिलांत मताधिक्य झाले तर स्वराज्य जवळ आहे असें समजा." या वाक्याचा मला त्यावेळीं बोध झाला नव्हता. म्हणून सोलापुराहून परत येतांना आगगाडींत वरील वाक्याचा खुलासा विचारला. तेव्हां ते म्हणाले कीं, "हिंदुस्थानसरकार व प्रांतिक सरकार यांचे खर्च वाढले आहेत. नवीन कराची त्यांना गरज आहे व हीच त्यांची नाक दाबण्याची वेळ आहे. आपण म्हणूं ती काटकसर मान्य झाल्यावांचून नवीन करास संमति न देणे ही चळवळ जर या वेळीं आपणास हिंदुस्थानांत करतां आली आणि इंग्लंडांत मजूरपक्षाला बलवत्तर होण्याकरतां जर आपणास थोडीबहुत मदत करतां आली तर या कात्रीपुढें सध्यांचे इंग्लंडचें प्रधानमंडळ नमेल किंवा डळमळीत होईल आणि आमचा स्वयनिर्णयाचा हक्क येत्या तीन किंवा पांच वर्षांत मान्य होईल. कारण इंग्लंडांत यानतर मजूरपक्ष व हुजुरपक्ष असे दोनच पक्ष राहण्याचा काल येईल. मजूरपक्षाला हिंदुस्थान आहे तसाच ठेवतो म्हणण्यांत यश नाहीं. याकरितां इंग्लंडमध्ये शक्य तितक्या लवकर भेद कसा पाडतां येईल व हिंदुस्थानांत नवीन करें बसविण्याला संमति

द्यावयाची नाहीं या दोन गोष्टींच्या यशस्वितेवरच आपलें पाऊल पुढे पडणार आहे." पण कौन्सिलांत बहुमत झालें नाहीं व सरकारच्या वाढत्या खर्चाला पोषक असे नवे कर बसविण्यात आले तर ? असा मीं त्यांना प्रश्न केला. त्यावर ते म्हणाले कीं, "सहकार्याच्या नावाखालीं नवीन करांना यावेळीं संमति देणें व तसे कर लादून घेणें म्हणजे स्वराज्य लांबणीवरच टाकणें होय. लादले गेलेले कर कमी करणें कठीण जाईल, पण अमुक झालें तर तमुक होईल असा विचार अगोदरच करण्यापेक्षां आपणास जें काहीं करावयाचें तें अगोदर करावें आणि पुढें जशी वेळ येईल तसें वागावें"

(८) मीं लिहिलेल्या 'आत्मतेज' नाटकाच्या पहिल्या प्रयोगाला (१९२० जुलै) लोकमान्य आले होते. त्यावेळीं त्याना जेव्हा बोलावू गेलों होतों, तेव्हा थट्टेनें ते म्हणाले कीं, 'मला नाटकाला नेतोस तेव्हां नाटकाला आलेल्या लोकांनी तुझें नाटक पाहूं नये अशीच तुझी इच्छा दिसते." मी म्हटलें याचा अर्थ मला समजला नाहीं. तेव्हा ते म्हणाले, 'मला कानांनी ऐकू येत नाहीं व डोळ्यांनीं दिसत नाहीं. तेव्हां निदान माझ्यापुरतें तरी तुझें नाटक सिनेमाप्रमाणे होणार! शिवाय डोळ्यांनीं न पाहणारा, कानानीं न ऐकणारा व पायांनीं न चालणारा माझ्यासारखा म्हातारा आमच्या अतुकाकाच्या हातांत हात घालून नाटकगृहात आल्यावर सारे प्रेक्षक आमचेंच सोंग पाहण्यात गुततील, मग ते तुझें नाटक केव्हां पाहतील ?"

याच वेळीं स्वतःच्या थकलेल्या शरीराचें वर्णन करतांना ते म्हणाले कीं, "चालताना जरी माझे पाय कांपतात तरी मी हातात काठी घेऊन तीन मैल जाईन व येईन."

(९) १९०६ मधील कलकत्याच्या राष्ट्रीय सभेत बहिष्काराचा ठराव पास होताच मेथासाहेब टिळकांना म्हणाले कीं, 'कलकत्यात तू मला जिंकू शकलास; पण मुंबईत या सिंहापुढें तुझें कांहीं चालले नसतें.' त्यावर टिळक म्हणाले होते कीं, "सिंहाच्या गुहेंत शिरूनहि त्याच्या दाढेंत हात देऊन त्याची शिकार केली असती." अशा प्रकारें एकमेकावर चवताळणारे हे दोन वीर आंतून एकमेकाला पोषक कसे व्हावें याचा विचार करीत असतील ही कल्पनाच पक्षाभिमानी दृष्टीला चमत्कारिक वाटणारी आहे. पण प्रसंग असा कीं, सर मेथा यांनी क्रॉनिकल पत्र नुकतेंच सुरू केले होतें आणि हॉर्निमन साहेब त्याचे संपादक म्हणून नुकतेच मुंबईस आले होते. महात्मा गांधींची सत्याग्रहाची चळवळ दक्षिण आफ्रिकेंत चालू होती. कै. ना. गोखले शिष्टाईकरितां तिकडेच गेले होते. आणि सर मेथा यानीं हिंदुस्थानातून महात्माजींना पैशाची मदत पाठविण्याकरितां एक फंड सुरू केला होता. या फंडाला आमच्या वऱ्हाडच्या तरुण मंडळींनीं कित्येक हजारांची मदत स्वतःच्या मेहनतीने केली होती. ही मदत

आलेली पाहून मेथासाहेबांनीं या तरुण मंडळींला एक अभिनंदनपर पण उत्ते-जक असें पत्र लिहिले होते. पण या आम्हा तरुण मंडळींपैकीं कोणीहि मेथा-साहेबांच्या नुसत्या गोड शब्दांना भुलणारा नव्हता. त्यांना असे वाटत होते कीं, मेथासाहेब आपल्याला उत्तेजन द्यावयाला तयार आहेत, तर मग आपणाला सुरू करावयाच्या एकाद्या चळवळीचे नेतृत्व पत्करावयाला ते तयार आहेत काय हें पाहिले पाहिजे.

या वेळीं लोकमान्य टिळक मंडालेच्या किल्ल्यांत बादशाही पाहुणचार घेत घेत गीतारहस्य आकलन करण्याच्या आनंदांत होते आणि इकडे राष्ट्रीयपक्षाची चोहोंकडे पांगापांग झालेली होती. अशा स्थितींत एकादा पुढारी पुढे येऊन एकादी नवी चळवळ जोरांत पुढें ढकलील तर बरे असें आम्हा तरुण मंडळीला वाटत होतें. मेथासाहेबांनीं अभिनंदनपर म्हणून जे पत्र पाठविलें होतें त्या पत्रांतून तरुण मंडळीच्या कर्तबगारीवर त्यांचा विश्वास असावा असें वाटत होतें. याकरितां प्रत्यक्ष सरसाहेबांची गांठ घेऊन बोलणे करावे असा विचार मंडळींत निश्चित झाला. आणि सध्या जर्मनींत असलेले आमचे मित्र श्री. रामभाऊ सप्रे यांना पुढारीपण देऊन त्यांच्या मार्फत मेथासाहेबांशीं पत्रव्यवहार करून मुलाखतीचा दिवस मुक्रर झाला आणि त्याप्रमाणे त्यांच्या चेंबरमध्ये ठरलेल्या वेळीं आम्ही भेटावयास गेलो. तपस्वी बाबासाहेब परांजपे, वीर वामनराव जोशी, बेळगांवचे बाबासाहेब सोमण, रामभाऊ सप्रे व मी असें आम्ही पांचजण प्रथम भेटावयास गेलो होतो. पण आम्हाला दिलेल्या वेळेला दुसरेच कांहीं महत्त्वाचें काम मेथा-साहेबाना आल्यामुळें 'उदईक भेटाल तर फार चांगले होईल' असें त्यानी मोठ्या आस्थेवाईक शब्दात आम्हास सांगितलें. मेथासाहेबाचा जो लौकिक आमच्या कानावर होता त्यावरून ते भाषा तरी प्रेमळ बोलू शकतील अशी देखील आमची कल्पना नव्हती. पण ते गोड शब्दात बोललेले पाहून आम्हाला जसा आश्चर्य वाटला तसेंच मोठी माणसें लहानाशीं मिठास बोलूनच मोह पाडतात अशी खूणगांठहि आम्हीं मनांत बांधली.

दुसरे दिवशी ठरलेल्या वेळीं रामभाऊ सप्रे व मी असे आम्ही दोघेच मेथा यांना भेटावयाला गेलो; बाकीचे कांही कारणामुळे येऊ शकले नाहीत. यावेळीं त्यांच्या चेंबरमध्ये सर दि. वाच्छा व मि. हॉर्निमन बसले होते. प्रथम दक्षिण-आफ्रिकेंतील चळवळ व कै. ना. गोखल्यांची तेथील कर्तबगारी यावर ते आमच्याशीं बोलले. या बोलण्यावरून त्यांच्या पक्षातील प्रमुख लोकांवर त्यांचा विश्वास नव्हता असें दिसून आले. पण ती गोष्ट येथे अप्रस्तुत आहे. हिन्दी राजकारणांतील व्यवहार्य नेमस्त वृत्ति म्हणजे काय याचे त्यांनी विवेचन केले आणि त्याप्रमाणे आमचे लोक नाहींत म्हणून त्यांनी खेद प्रदर्शित केला. या खेदांत कांहीं अर्थ आहे की काय म्हणून पाहण्याकरितां आम्ही त्यांना

'आम्हा तरुणांचें आपण पुढारीपण स्वीकारता काय' असा प्रश्न केला, आणि कोणत्या धोरणानें चळवळ सुरू करावी याबद्दल जो आम्हीं विचार केला होता तो विचार आम्हीं त्यांच्यापुढें ठेवला. तो आमच्या विचारांतील सौम्यता ऐकून ते एकदम म्हणाले कीं, 'चूप. काहीं मलतेंच बोलूं नका. माझ्या चेंबरच्या प्रत्येक भिंतीला सरकारचे कान लागले आहेत. ते कान मी म्हातारा असल्यामुळें मला नाहीं, पण तुम्हाला तरी शकटात लोटल्यावाचून राहणार नाहींत.' असें म्हणून त्यांनीं आपली दृष्टि वाच्छा व हॉर्निमन यांच्याकडे वळविली आणि थोडें स्मितहास्य केलें. ही आम्हाला भीति घालण्याची युक्ति आहे असं आम्हास वाटलें आणि आम्ही आपला प्रश्न पुढेंच रेटला. आमच्या विचारात बेहनदशीरपणा जसा नव्हता तसाच कोणता अत्याचारहि नव्हता. फक्त त्या वेळचें शैथिल्य जाऊन राष्ट्रांत चैतन्य कसें उत्पन्न होईल याबद्दल जी आमची विचारसरणी होती तीच आम्हीं त्यांच्यापुढें ठेवली होती, आणि पुढारीपण स्वीकारण्याविषयीं विनंति केली होती. ती विचारसरणी चांगली होती कीं वाईट होती याबद्दल ते कांहींच बोलले नाहींत. पण वाच्छा व हॉर्निमनकडे वळून ते इतकेंच म्हणाले कीं, " पहा हें महाराष्ट्राचें रक्त ! बुद्धि आणि धाडस याचें तरी कौतुक कराल कीं नाहीं ! शिवाजी आणि टिळक जोंपर्यंत महाराष्ट्राच्या तरुणात जागृत आहेत तोंपर्यंत महाराष्ट्रच हिंदी स्वराज्याचा प्रश्न सोडवील. "

नतर ते आमच्याकडे वळून म्हणाले कीं, 'तुमचें पुढारीपण स्वीकारावयाला टिळकच लायक, मी नाहीं. आम्ही जाणते आहों; पण कुटाला सर्वस्वी दूर लोटून देशसेवा करण्याइतकं तेज आमच्या अगात नाहीं हें मी कबूल करतों. असें जरी आहे तरी देशसेवा घडावी अशी माझी इच्छा आहे. टिळकांसारखे लोक धैर्यानें व त्यागाने परिस्थिति निर्माण करू शकतात, तर आम्ही लोक त्या परिस्थितीचा फायदा घेऊन देशाच्या पदरात टाकतो. अशा रीतीनें टिळकांचें व आमचें परिणामाच्या दृष्टीनें सहकार्य सहज घडतें. टिळकांनीं निर्माण केलेल्या परिस्थितीचा फायदा राष्ट्राच्या पदरांत आम्हाला टाकतां यावा म्हणूनच काँग्रेसहि आम्हाला पाहिजे. आम्ही ती टिळकाना देणार नाहीं. कोंग्रेस जर आम्हाला नसली तर आमच्या अस्तित्वाला वाव नाहीं व आमच्यासारख्या सुखी पण देशाभिमानी लोकांचा राष्ट्रालाहि फायदा होणार नाहीं.' यावर आम्ही असा प्रश्न केला कीं, 'टिळक परिस्थितीचे जसे जनक आहेत तसेंच उत्पन्न झालेल्या परिस्थितीचा फायदा घेण्याइतके चतुरहि आहेत, पण टिळकाना काँग्रेसच्या बाहेर ठेवण्याच्या तुमच्या वृत्तीमुळें सरकार टिळकांना चिरडतें; व अशा रीतीनें न कळत का होईना पण परिस्थिति निर्माण करणारे देशभक्त चिरडून काढावयाला मदत केल्याचं पाप तुमच्या माथीं येतें, याला उपाय काय ? हें पापहि तुम्ही खुशाल पत्करावें असं आम्हीं म्हटलें असतें: पण त्यामुळे परिस्थिति

निर्माण करण्याचें कार्य मदावतें आणि परिस्थितीचा फायदा घेऊन राष्ट्रकार्य करण्याची आपली आवडहि जागच्या जागींच राहते ! '

या विधानांपैकीं, टिळक परिस्थिति निर्माण करणारे जसे आहेत तसेच परिस्थितीचा फायदा घेणारेहि आहेत हें आमचें विधान मेथासाहेबांना खरें वाटले नाहीं. हे दोनहि गुण जर टिळकांत असते तर मीं त्यांना पूर्ण पुरुष म्हटले असते, एवढेंच त्यांचें म्हणणें पडले. पण मेथासाहेबांना जर देवानें आणखी थोडें आयुष्य दिलें असते तर त्यांच्या दृष्टीला टिळक पूर्ण पुरुष आहेत असें पटलें असतें. पण टिळकांना कांग्रेसबाहेर ठेवले तर सरकार चिरडते, या विधानाला त्यांनीं जें उत्तर दिले ते मोठें मनन करण्यासारखें होतें. मेथासाहेब म्हणाले कीं, ' आम्ही टिळकांना कॉंग्रेसबाहेर ठेवतों म्हणून सरकार त्याच्यावर कायद्याचें हत्यार उचलते ही गोष्ट सर्वस्वी चुकीची आहे असें मी म्हणत नाहीं. पण अशा प्रसगीं ' शांतता आणि सुव्यवस्था ' राखण्याच्या सरकारी सोंगाला आम्ही मदत करतां कामा नये. ही मदत नाकारण्याचें काम आमच्या पक्षाला शिस्तींत करतां येत नाहीं, हा आमच्या पक्षांत आज दोष आहे. पण मी स्वतः असल्या कामीं मदत न करणारा आहें. सरकार जेव्हां टिळकासारख्या पुरुषाविरुद्ध दडपशाहीचें धोरण पत्करतें तेव्हां त्याचे होणारे परिणाम सरकारच्या कानावर घालून सरकारला सावधगिरीचा इषारा देणें एवढेंच आमचे काम. पण यापलीकडे जाऊन, सरकारच्या दडपशाहीचे लोकांवर परिणाम होऊन लोक जे प्रसगीं तीव्र स्वरूप प्रगट करतात ते नाहींसे व्हावे म्हणून जर आम्ही प्रयत्न करू लागलों, तर त्या प्रयत्नांत आमच्या बरोबरच सर्वस्वाचा नाश आहे. राजनिष्ठा व्यक्त करणे, टिळकांजवळून दूर राहणे, त्यांचें व आमचे पटत नाहीं असें तीव्रतेनें सरकारला भासविणें आणि आमचें म्हणणें सरकार मान्य करीत नाहीं म्हणून टिळकाचें विनाशक असें राजकारणाचें धोरण लोकप्रिय होतें, असें उठल्या बसल्या सरकारच्या कानीकपाळीं ओरडणें एवढेंच आमचे धोरण. हें धोरण जर आमच्याकडून शिस्तीनें अमलांत आले तर टिळकांना दडपून टाकण्याचें पाप करावयाला सरकारहि धजणार नाहीं. अशा रीतीनें एकाने परिस्थिति निर्माण करावयाची व दुसऱ्याने तिच्यापासून निघेल तितका फायदा घ्यावयाचा, असें झालें तर देशाचें हित होईल. '

---

## मुनि जिनविजय

[ आचार्य गुजराथ पुरातत्त्वमंदिर, अहमदाबाद ]

लोकमान्य विलायतेस जाण्यापूर्वी कांहीं दिवस फर्ग्युसन कॉलेज रस्त्यावरील लिमयांच्या बंगल्यांत रहात होते. आमचे 'भारत जैन विद्यालय' त्यावेळीं त्याच रस्त्यावर 'तारा मॅनशन्'च्या समोर रहातेकरांचे बगल्यात होतें. बहुतकरून तो महिना एप्रिलचा होता. सकाळचे वेळीं ६॥–७ वाजणेचे सुमारास लोकमान्य गणेशखिंडीच्या रस्त्यावर फिरावयास जात असत. एखादे दिवशीं त्याच्या बरोबर येण्यास कोणी मनुष्य नसल्यास ते एकटेच जात असत. मी पण त्याच रस्त्यावर नेहमीं सकाळीं फिरावयास जात असे. मीं यापूर्वी लोकमान्याना कधींहि पाहिलें नसल्यामुळें एकदोन वेळां तर आमची ही रस्त्यावरील भेट परस्परांचे चेहरे पाहण्यापर्यंतच झाली. पण नतर, तिसऱ्या कीं चवथ्या दिवशीं मला ओळख पटली.

या नंतर दुसरे दिवशीं, जेव्हां मी फिरावयास निघालों तेव्हां मनामध्यें हा सकल्प धरूनच बाहेर पडलों कीं, आज जर लोकमान्य दृष्टीस पडतील तर त्यांना भेटावयाचें व त्यांच्याशीं चार शब्द बोलावयाचे. मी रोजच्यापेक्षां आज थोडा लवकर निघालों होतों. गव्हर्मेंटहाउसच्या दरवाज्यापर्यंत जाऊन मी परत फिरलों. रस्त्यात जेथें अॅग्रिकल्चर कॉलेजकडे जाण्याकरितां वाट फुटते, तेथेंच लोकमान्यांची गाठ पडली. त्यांना दुरून पाहण्याबरोबर मी जलदी जलदी पाय उचलण्यास सुरुवात केली व अगदीं त्याच्याजवळ जाऊन बोलण्यास सुरुवात करणार तों त्यानींच प्रथम 'नमस्कार महाराज!' म्हणून मला बोलावलें. मीहि उलट नमस्कार करून त्यांच्याजवळ जाऊन उभा राहिलों; तेव्हां त्यांनीं मला प्रश्न केला, "आपण कुठें रहातां? आपलें नांव काय?" वगैरे. उत्तर देताना मी माझें नांव व राहण्याचें ठिकाण 'भारत जैन विद्यालय' सागितलें; आणखी 'मी एक जैन संप्रदायाचा साधु असून, येथें डेक्कन कॉलेजात हस्तलिखित ग्रथांचा जो मोठा सग्रह आहे तो पाहण्याकरितां मुद्दाम मुंबईहून येथें आलों' असें सांगितलें; तें ऐकून लोकमान्य म्हणाले, "मग आपण तो ग्रथसंग्रह पाहिला काय?" 'मी तो एकवेळ पाहून आलों' वगैरे मीं सांगितलें. त्यानंतर लोकमान्य म्हणाले, "चला तर आपण बोलत बोलत परत जाऊ मी सुद्धां तुमच्या ठिकाणापाशीं एका घरांत हल्लीं रहातो आहें." असें म्हणून ते परत फिरले.

रस्त्यांत भांडारकर इन्स्टिटयूटबद्दल गोष्ट निघाली, तेव्हां 'ह्या संस्थेला जैन समाजातर्फे काहीं आर्थिक मदत करावयाचा माझा विचार आहे' असें मी म्हणालों. हें ऐकून ते फार संतुष्ट झाले व म्हणाले "जैन समाजाची सांपत्तिक स्थिति

फारच उत्तम आहे; तो समाज अशा रीतीनें देशाच्या ज्ञानप्रसारक व शिक्षण-प्रसारक संस्थांना मदत करून सहानुभूति दाखवील तर देशकार्यात फार बहुमोल मदत होईल. माझाहि जैन समाजाशीं थोडाबहुत परिचय आहे., बडोद्यास भरलेल्या एका जैन परिषदेंत मी स्वतः जैन संस्कृतीविषयीं आणि विशेषतः अहिंसेच्या बाबतींत कित्येक विचार जाहीर केले होते." अशा रीतीने बोलत बोलत आम्ही आमच्या ठिकाणाजवळ आलों. तेव्हां मी म्हणालों 'ह्या ठिकाणीं मी रहातों.' हें ऐकून लोकमान्य म्हणाले, "ओहो! आपण तर आपल्या घरापर्यंत आलों. गोष्टीच्या भरांत माझें लक्षच गेले नाहीं. चला तर, आपण आंत चला. मीहि आपली जागा पाहून घेतों." असे म्हणून लोकमान्य रहातेकरांच्या बंगल्याच्या कपाउन्डात शिरले. मी पुढें झालो आणि माझ्या खोलींत खुर्ची टाकून थोडा वेळ विश्रांति घ्यावयाची मी त्यांस विनंति केली. ते बसले व माझ्या पुस्तकांच्या शेल्फकडे त्यांची दृष्टि वळली. "हे सर्व जैन ग्रंथ काय?" असे त्यांनीं विचारले. मी म्हणालो 'होय' यानंतर माझ्या टेबलावर प्राचीन ताडपत्रावर लिहिलेला एक ग्रंथ पडला होता. त्याकडे पाहून त्यांनीं त्यासंबधीं प्रश्न केला; तेव्हा मी त्यांना हा प्राकृत भाषेत लिहिलेला, गुजरायचा चालुक्य राजा कुमारपाळ याच्या जीवनचरित्रासंबंधींचा एक ग्रन्थ आहे व गायकवाड ओरिएण्टल सिरीजमध्यें तो छापत आहे, व त्याचें संशोधन मी करीत आहे.' असें सांगितलें. त्या ग्रंथाचे कांहीं छापील फर्मे माझ्या जवळ होते ते मीं त्यांना पहावयास दिले. त्यांनीं ते हातांत घेतले, त्यातील एक-दोन श्लोक वाचले आणि म्हणाले, "ही तर प्राकृत-महाराष्ट्री भाषा आहे. बहुतेक जैन ग्रंथ ह्याच भाषेंत आहेत. जैन साहित्य विशाल आहे. संस्कृत व प्राकृतशिवाय कानडी व तामीलसारख्या द्रविड भाषेंतहि जैनांनीं पुष्कळ साहित्य निर्माण केलें, परंतु अद्याप असावें तसें जैन साहित्य प्रसिद्ध झालें नाहीं. आणि म्हणून लोकांना जैनधर्मासंबंधीं खरी माहिती मिळत नाहीं. गीतारहस्य लिहितांना मला जैन ग्रंथ पाहण्याची फार इच्छा होती, पण ग्रंथच न मिळाल्याने माझ्या पुस्तकांत जैन धर्मासंबंधीं फारशी माहिती मी देऊ शकलों नाही. जैन ग्रंथ प्रसिद्ध व्हावेत म्हणून जैन साधूंनीं खास प्रयत्न केले पाहिजेत. ज्याप्रमाणे बौद्धधर्माचे पाली ग्रंथ प्रकाशित करण्याचे काम लंडनची पाली टेक्स्ट सोसायटी करीत आहे, त्याचप्रमाणें जैन ग्रंथाच्या बाबतींतहि झालें पाहिजे." अशा रीतीनें गोष्टी झाल्यावर वेळ झाल्यानें त्या दिवशीं "आपण पुन्हां भेटूं" असें म्हणून लोकमान्य घरीं गेले.

यानंतर आमची पुष्कळ वेळां गणेशखिंडीच्या रस्त्यावर गांठ पडली. पुष्कळ वेळां आम्ही फिरावयास बरोबर जात होतों व परत बरोबर येत होतों. राजकीय विषयांत मला विशेष गोडी नसल्यानें त्या बाबतींत मी त्यांच्याशीं कांहीं बोलत नसे. आमच्या बोलण्याचे विषय विशेषेंकरून जैन धर्म, जैन साहित्य वगैरे असत. लोक-

मान्याचें गीतारहस्य मी त्यावेळीं नुकतेंच वाचिले होतें. तेव्हां त्याविषयी आमची खूप चर्चा होई. रहस्यात जैन व बौद्ध धर्मांत कर्मयोगाबद्दल कोणते विचार प्रतिपादिले आहेत त्याचें विवेचन केलें आहे आणि त्याचप्रमाणें जैनांचा निवृत्तिमार्ग कशा रीतीनें लोककल्याणकारक आहे ह्याविषयीं आमची जास्त चर्चा झाली. पण त्यासंबंधीं विस्तारानें लिहिणें आतां निरुपयोगी आहे. जैन-धर्माच्या प्राचीनतेसंबंधीं लोकमान्यांनीं बराच विचार केला होता असें माझ्या एका प्रश्नाला त्यांनीं दिलेल्या उत्तरावरून कळून आलें. ते म्हणाले "त्या आदि-नाथ ऋषभदेवाना जैन धर्मांचे मूळ प्रवर्तक मानण्यांत येतें ते एक ऐतिहासिक पुरुष असावेत असें मला वाटतें; आणि कर्मांत कमी सांख्यमताइतकें जुनें जैन मत आहे असें दिसतें." यानंतर सांख्यमताविषयीं आमची चर्चा झाली. प्रचलित सांख्यमताहून प्राचीनकालच्या सांख्यमताचा तत्त्वविचार कांहींसा निराळा होता, असें त्यांच्या बोलण्यात आल्यावरून मी म्हणालों आपलें म्हणणें बरोबर आहे. ह्याबद्दलचे उल्लेख जुन्या जैन ग्रंथांतहि सांपडतात. हें ऐकतांच लोकमान्य उत्सुकतेनें मजकडे पाहून म्हणाले, " हं ! तें कसें ? " मी म्हणालों हरिभद्र नांवाचे एक मोठे समर्थ जैन विद्वान् शंकराचार्यांपूर्वी होऊन गेले, त्यांनीं भारतीय दर्शनशास्त्रावर अनेक ग्रंथ लिहिले आहेत; त्यात एके ठिकाणीं अर्वाचीन सांख्य आणि मौलिक ( प्राचीन ) सांख्य यांतील भेद दाखविणारा उल्लेख त्यांनीं केलेला माझ्या पाहण्यांत आला आहे." हे ऐकून लोकमान्यांनीं तीव्र जिज्ञासेनें मला विचारलें "कोठें आहे तो उल्लेख ! मला तो पहायची इच्छा आहे." मी म्हटलें ' तपास करून पुस्तकातून काढून मीं आपणांस दाखवीन. '

एकदोन दिवसात मीं तो उल्लेख शोधून काढला. एके दिवशीं आमची माझ्या बंगल्यासमोरच गाठ पडली, कारण मी त्या दिवशीं फिरायला लवकर गेलो होतो, व लोकमान्यांना उशीर झाला होता. नमस्कार वगैरे झाल्यावर मीं त्या उल्लेखाची गोष्ट काढली. तेव्हा "चला तर मग आज फिरण्याचे ऐवजीं बसण्याचाच व्यायाम करू " असें लोकमान्य हंसत हसत म्हणाले व आमच्या बंगल्याकडे वळले. मी बाहेर बागेंत त्यांचेकरितां खुर्ची ठेवून त्याना बसविलें. आंतून पुस्तक घेऊन आलों व त्याना तो उल्लेख दाखविला. यानंतर जवळ जवळ अर्धा तास आमची चर्चा चालली. सांख्यकारिकेंतील गहाळ झालेल्या कारिकेवर 'संस्कृत रिसर्च' मध्यें त्यांचा एक लेख आला होता, त्यासंबंधींहि आमचें बोलणें झालें. नंतर त्या उल्लेखाचें टांचण मला करावयाला सांगून त्यांनीं माझा निरोप घेतला. यानंतर लवकरच त्यांनीं विलायतेला प्रयाण केलें. त्यामुळे पुन्हां भेटण्याचा योग आला नाहीं., नाहीं म्हणायला चिंचवडच्या अनाथविद्यार्थीगृहांत वर्ध्यांचे देशभक्त जमनालाल बजाज यांनीं बांधून दिलेल्या इमारतीचा उद्घाटन

समारंभ होता, त्या प्रसंगीं लोकमान्य तेथे गेले होते व मीहि गेलो होतों, पण नमस्कार व कुशलप्रश्न यापलीकडे त्यांचा त्यावेळी समागम झाला नाहीं.

---

## सौ० दुर्गाबाई वैद्य

[ लो० टिळकांची मधली मुलगी, याना माहेरी ' माई ' म्हणतात. रा. रा. पांडुरंग रामचंद्र वैद्य, बी. ए., एल्. सी. ई. इंजिनियर P. W. D. यांच्या पत्नी, हल्लीं मु० शहापूर, जि० ठाणें ]

( १ ) ते दिवस प्लेगचे होते. आमचे वडील बंधु विश्वनाथपंत ( तात्या ) प्लेगला बळी पडल्यानतर पुढें कायसे निमित्त होऊन तीं० दादांचा गुडघा लचकला. तो बरा होण्यासाठीं म्हणून त्यावर विब्वा घातला. परतु दुखणे बरे होण्याऐवजीं विब्वा उतून मधुमेहाचे विकारामुळे गुडघ्यांत पू झाला व माडींतल्यामाडींतहि दादाना चालवेनासें झाले. विश्रांतीसाठीं सिंहगडावरील बगल्यांत रहावयास जाण्याचे ठरले. घरांतील सामानसुमान बांधाबांधी करून बैलगाड्यांतून पुढे पाठवून दिले व तिसरे प्रहरीं गाड्या ठरवून दादांबरोबर आम्ही सर्व मडळी निघालो. सिंहगडाचे पायथ्याशी पोहोंचण्यास फार संध्याकाळ झाली. किल्ल्यावर खुर्च्यांत बसून जावें लागते हे सर्वांना माहीतच आहे. तीं० दादा दरसाल पायानेंच वर चढून येत. परतु गुडघ्याचे दुखण्यामुळें या खेपेस त्यांना परावलबी होण्याखेरीज गत्यतर नव्हते. कर्मधर्मसयोगाने त्या दिवशी खुर्च्या अगदीं कमी आल्या. म्हणून बायकांमुलांना दिवसाउजेडीं सुरक्षित वर पोहोंचवून दुसरी खेप करण्यासाठीं खुर्च्या माघारी घेऊन येण्याबद्दल गड्यांस बजावून पायथ्यालगतच्या फणशीचे झाडाखालीं खुर्च्या परत येण्याची वाट पहात बसण्याचे तीं० दादांनीं ठरविले. अर्थात् तीं० बाबाहि ( धोंडोपंत विद्वांस ) त्यांचे सोबतीसाठीं खालींच थांबले. आई व आम्ही बहीणभावडे खुर्च्यांतून वर पोहोंचलो तों सूर्यास्त होऊन काळोख पडला. आम्हांस बगल्यांत सोडून खुर्च्या ठरल्याप्रमाणे परत वळल्या. तीं० दादांना व बाबांना घेऊन खुर्च्या आतां येतील, घटकाभरानें येतील अशी वाट पहात आम्ही बसलो. तास लोटला, दीड तास लोटला तरी खुर्च्यांचा पत्ता नाहीं. रात्रीच्या काळोखाबरोबर आमची काळजीहि वाढू लागली. बंगल्यापासून किल्ल्याचा पहिला दरवाजा फार तर एक फर्लांगभर दूर असेल. कदील व काठी घेऊन तेथपर्यंत जाऊन कोणी तरी पाहून यावें असे अखेर ठरले.

मुलांमध्यें वयानें अम्मळ मोठी मीच होत्यें. तेव्हां मनांतून भीति वाटत होती, तरी देखील काळोखांतून कदील हातांत घेऊन बंगल्याबाहेर पडण्यास मी तयार झालें. धाकटी बहीण आकाहि मजबरोबर दरवाज्यापर्यंत येण्यास सिद्ध झाली. आम्ही दोघीजणी बंगल्याबाहेर पडणार इतक्यांत अंधारातून लांब किल्ल्याचे दरवाज्यापाशीं एक कंदील दिसू लागला व त्याचे उजेडांत ती० दादा यांचे खांद्याचा आधार घेऊन हळु हळु लंगडत लंगडत बंगल्याचे रोखानें येताना दृष्टीस पडले. सर्वांना अत्यानंद झाला. थोड्याच वेळात ती० दादा बंगल्यापर्यंत येऊन ठेपले. त्याबरोबर आश्चर्यानें आम्ही सर्व मुलामुलींनीं एकदम प्रश्न केला, "दादा, खुर्च्या कोठें दिसत नाहींत ! गुडघा एवढा सुजून पाय दुखत असताहि खुर्ची-वांचून तुम्ही गड चढून आला तरी कसें ! " त्यावर दादांनीं खड्या सुरात मोठ्यानें एकच श्लोक म्हटलाः—

मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् ।
यत्कृपा तमहं वन्दे परमानन्द माधवम् ॥

एवढें म्हणून त्यांनीं व्हरांड्यातील आरामखुर्चीवर आंग टाकलें. चौकशीअंतीं पुढे असें समजलें कीं, रात्र काळोखी असल्यामुळें खुर्चीवाले गडी परत तळावर गेलेच नाहींत, मधल्याच मेट्यावर झोंपून राहिले. अर्थात् स्वतःचे पायाने गड चढून वर येण्याखेरीज ती० दादाना त्या प्रसंगी दुसरा मार्गच नव्हता.

( २ ) विलायतेहून परत आल्यानंतर अखेरचे सालांत एके दिवशीं एक स्नेही ती० दादांना भेटण्यासाठीं आले असतां उभयतांच्या बराच वेळ राजकीय विषयांवर गोष्टी चालू होत्या. भोजनाची वेळ झाल्यामुळें त्यांचे ताट करून मी वर घेऊन आलें व त्याबद्दल वर्दी दिली. तेव्हां जेवतां जेवताहि गप्पागोष्टी करतां याव्या म्हणून त्यांना आंतील माडींत बोलावून दादा भोजनास बसले. दरम्यान उभयतांचें बोलणें चालूच होतें. व त्यांत दादांनीं त्यास एक गोष्ट सांगितली, ती पुढीलप्रमाणें—"एक होता बादशहा. त्याचे दरबारांत अनेक नामांकित ज्योतिषी होते. त्यांपैकीं एकास हात दाखवून बादशहानें भविष्य कथन करण्यास सांगितलें असतां तो म्हणाला, " महाराज ! मोठी दुःखांची गोष्ट कीं, आपल्या घराण्यांतील एकूण एक इसम आपल्या ह्यातींत मृत्युमुखीं पडून आपला निर्वंश होईल; आणि हें सर्व उघड्या डोळ्यानें पहात आपणास कालक्रमण करावे लागेल. " हें अशुभ व अनिष्ट भविष्य ऐकून बादशहाचा क्रोध अनावर झाला व त्यानें त्या ज्योतिषास एकदम फांशीची शिक्षा फर्माविली. पुढे कांहीं काळ लोटल्यावर दुसरा एक नामांकित ज्योतिषी दरबारांत आल्यावरून त्याचे तोंडून भविष्य-कथन ऐकण्याची बादशहास पुनः लहर आली. त्याप्रमाणें हुकूम होताच सरकार-स्वारीचा हात पाहून ज्योतिषीबोवा म्हणाले, " आपणांसारखें दीर्घायुष्य खरोखर फारच थोड्यांच्या नशिबीं असतें. आपले कुलांत आपण पुण्यवान् म्हणूनच

सर्वांत अधिक काल राज्योपभोग घेऊन अखिल प्रजाजनांचे, तोडून आपण धन्यवाद घ्याल," हे शब्द ऐकून बादशहा फार खूष झाला व मोठें इनाम देऊन त्याने ज्योतिषीबोवांची योग्य संभावना केली. आतां वास्तविक पहातां दोघांच्याहि भविष्यकथनाचा निष्कर्ष किंवा मतलब एकच; फरक काय तो भाषेचा. पहिला जितका निस्पृह व सडेतोड तितकाच दुसरा चाणाक्ष व मतलबी. आपलेकडील दोन राजकीय-पक्षांतहि हाच फरक आहे. दोघांनाहि मनांतून नोकरशाहीचें राज्य नको आहे. पण एक व्याख्यानांतून सरळ सरळ सांगतो कीं, "नोकरशाहीचे दिवस भरले. त्यांनीं आतां आपले चंबूगबाळें आटोपून विलायतचा रस्ता सुधारावा"—म्हणून त्याच्या नशिबीं तुरुंगवास! दुसऱ्याच्या लिहिण्याबोलण्यांत मधून मधून हाच ध्वनि निघतो, पण त्याची भाषा वेगळी. एवढ्याचसाठीं त्यांचे वांटणीस पदव्यांची खैरात!"

(३) तीο दादा, विलायतेहून परत आल्यावर एकदां म्हणाले "इकडे 'साहेब' म्हटला म्हणजे त्यांस फार मोठा समजून मान देण्याचा प्रघात आहे. कारण आपल्या लोकांस 'साहेब' म्हणजे कोणी तरी वडा मनुष्य वाटतो. परंतु आम्ही विलायतेंत होतों तेथें काय मजूर, धोबी, गाडीवाला सर्वच साहेब. एक दोनदां असें झालें कीं, मी निजलों असतां मला मध्येंच उठविण्यांत आलें. कारण काय तर एक साहेब बाहेर भेटण्यासाठीं उभा होता. मीं पाहिलें तों तो एक सामान्य हमाल होता. एकदा एक प्रतिष्ठित भिकारी आला, तेव्हां मला माझे काम टाकून त्यास वाटेस लावण्यांत असाच निष्कारण वेळ मोडावा लागला. त्यावेळीं मी जवळील मंडळीस बजावलें—"अरे हें कांहीं हिंदुस्थान नव्हे कीं, 'साहेब' आल्याबरोबर झोपेतून उठून देखील त्यास खडी ताजीम दिली पाहिजे. येथे गवंडी, पोष्टमन, हमाल जो येईल तो साहेबच असणार! तेव्हां कोणी आल्यास प्रथम नीट चौकशी करून जरूरीचें काम असल्यासच फक्त माझ्याकडे पाठवीत चला."

(४) एकदां विलायतेंतील स्त्रियांसंबंधीं ते म्हणाले "तिकडे मध्यम स्थितींतील कुटुंबांतील स्त्रियांस सामान्यतः सर्व कामें स्वतःच करावीं लागतात. स्वयंपाकपाण्याची सर्व व्यवस्था, घर साफ ठेवणे, कपडे धुणें वगैरे कामें त्या फार दक्षतेने व नीटनेटकीं करतात. आपल्या बायकांस इकडे आलेल्या युरोपियन स्त्रियांची वागणूक पाहून वाटते कीं, गाणे—बजावणें, सभांस अगर खेळावयास जाणें, मोटारींतून हवा खाण्यास जाणें इ० व्यवसायाशिवाय त्या कांहीं करीत नाहींत. परंतु ही समजूत अगदीं चुकीची आहे. इकडे येणाऱ्या सिव्हिल—सर्व्हन्टांना हजारांनीं पगार व भरपूर भत्ता मिळत असल्यामुळें ते वाटेल तशी चैन करतात व बायकांची हौस पुरवितात. परंतु तिकडे राहणाऱ्या चांगल्या सुखवस्तु कुटुंबांतील स्त्रियांस सुद्धां तसें राहतां येत नाहीं. स्वतःच्या घरांतील कामें त्यांनीं

त्यांसच कराव्यीं लागतात. आमच्याकडील सुशिक्षित म्हणविणाऱ्या स्त्रियांचें मात्र खोट्या समजुतीने व अंध अनुकरणानें नुकसान होत आहे. नुसता पोषाखी डामडौल म्हणजे खरें गृहशिक्षण नव्हे!"

( ५ ) दी० दादांस घरचे मंडळीशी नेहमी थट्टेने बोलण्याची सवय होती. आम्हीं कोणी माहेरीं असलो म्हणजे त्यांचे पथ्य-पाण्याचें काम आमच्याचकडे असें. त्याचे स्नान झाले की, ताट तयार करून माडीवर न्यावयाचे. एकदां त्यांच्या फराळाच्या भाज्यांत वाट्या, चमचे वगैरे मिळून चार दोन चांदीच्यीं भांडीं होतीं. तीं पाहून ते म्हणाले "तुम्ही काय मला महाराज बनविण्याचा विचार केला आहे वाटते! हीं चांदीची भांडीं आज काय म्हणून आणिलीं आहेत?" घरात सणवार असला म्हणजे साहजिकच कांहीं अधिक पदार्थ करून आम्ही त्याचे-साठीं नेत होतो. बराच आग्रह केला म्हणजे ते त्यातील थोडा खाऊनहि पहात; परंतु त्यांच्या पथ्याच्या पदार्थांशिवाय ते बहुदां कांहीं खात नसत. जेवणाचे वेळीं ते बहुतेक विचारांत गढून गेलेले असत, व ठरीव पदार्थ जसा एका-मागून एक पुढे यावा त्याप्रमाणें खात असत. जेवण हें केवळ शरीररक्षणा-करिता अवश्य म्हणूनच ते जेवीत असत. चवीकडे त्यांचे फारसें लक्ष नसे.

( ६ ) एके दिवशीं आम्ही बहीणभावंडे गप्पा-गोष्टीमध्ये अगदी गर्क झालों होतो. मुलांपैकीं एकजण इतरांस आपल्या एका स्वप्नाची हकिगत सांगत होता. त्याचे वर्णन चालू होतें:—"पुढे रस्त्याने जाता जातां मला एक चवली सापडली व ती मीं उचलून खिशात टाकली." इतक्यात तेथे दादा आल्यामुळे त्या स्वप्न-कथनापैकीं नेमकें हे वाक्य त्याचे कानीं पडलें. त्यावरोबर ते म्हणाले "जेथें सर्वच कल्पनासृष्टीचा खेळ अशा स्वप्नातहि तुला हिऱ्या-माणकाच्या खाणी न लागतां फक्त एवढीशी चवलीच सापडावी ना? जेथे वास्तविक कांहींच निर्बंध असू नयेत अशा स्वप्नसृष्टींतहि तुझी ही अशी दरिद्री महत्त्वाकांक्षा मग खऱ्याखुऱ्या आयुष्यात पुढे काय दिवे लावणार?"

---

# कृष्णाजी नारायण भणगे

[ न्यू इं. स्कूलमधील माजी विद्यार्थी, बी. ए. एलएल्.बी. वकील, मंडलेश्वर ]

लोकमान्यांचे जिवलग मित्र रा. सा. उपासनी यांचा मी एक जवळचा आप्त असून माझे सगळे दुय्यम शिक्षण व थोडेसें उच्च शिक्षण डे. ए. सोसायटीच्या पहिल्या अमदानींत व तिच्याच न्यू इंग्लिश स्कूल आणि फर्ग्युसन कॉलेजांत झाले असल्याकारणानें, मी माझ्या आठवणी येथें सादर करीत आहें.

(१) लोकमान्य टिळक, प्रिन्सिपाल आपटे, गुरुवर्य आगरकर, व देशाभिमानी गोखले, त्याचप्रमाणे कै. वासुदेवराव केळकर व कै. महादेव शिवराम गोळे एकमेकांची उणीव भरून काढून, विद्यार्थ्यांच्या हिताकडे मुद्दाम लक्ष देत. विद्यार्थ्यांच्या हिताचे, शिक्षणाच्या बाबतींत साधारणपणे दोन भाग पडतात. एक अध्यापन व दुसरा शीलवर्धन. अध्यापनात वामनराव आपट्यांचा हातखंडा सगळ्यांत मोठा. ठराविक वेळांत ठराविक अभ्यास झालाच पाहिजे हा आपट्यांचा बाणा. ठराविक वेळ व ठराविक अभ्यास इकडे दुर्लक्ष करणारे आगरकर; व टिळक आपट्यांच्या शिस्तीचे असत. पण त्यांचे अध्यापन नेहमीं उच्च दर्जाचें असे. त्यांच्याकडे गणित असे. त्यांच्या बाबतींत असा एक प्रकार होत असे कीं, कॉलेजांतला तास घेतला कीं, तावडतोब दुसराच तास त्यांना शाळेतला घ्यावा लागे. त्यामुळे म्हणा कीं. अन्य कारणांनीं म्हणा. त्यांचें अध्यापन फक्त हुशार व मेहनती विद्यार्थ्यांनाच समजे. बरे आम्हांस आपले शिकवणें समजत नाहीं हें म्हणण्याची सोय नाहीं. कारण टिळक भारी गंभीर असत. त्यांनीं एकाहि मुलाला त्याचे नांव विचारले नाहीं. घंटा होतांच वर्गांत पाऊल टाकावयाचे व तासाचा टोल होतांच खडू खालीं ठेवून मुकाट्याने बाहेर जावयाचे, हे त्यांना माहीत. उदाहरण समजले किंवा कसे याची चौकशी ते कधींच करीत नसत. मुद्रा गंभीर व किंचित् करारी म्हणून सामान्य विद्यार्थी बोलावयाला धजत नसे. झोंपीं जाणे किंवा खोड्या करणें हें त्यांच्या तासांत शक्यच नव्हतें. उलट टिळक कधींहि कोणावर रागावलेले मला आठवत नाहीं. त्यांना राग आला तर ते तो मनांतच जिरवीत असावे, अशी माझी कल्पना आहे. कारण एकदां अशी मौज झाली कीं, विषयाच्या शिक्षकानेंच आपापल्या विषयांत विद्यार्थ्यांची परीक्षा घ्यावी असे ठरलें होतें. त्याप्रमाणें टिळकांनी परीक्षा घेतांच, मला आठवते कीं, एक कीं दोनच जण पास झाले. तेव्हां त्यांना वाईट वाटले, व तेव्हां मात्र ते आम्हाला म्हणाले, " आता मी तुम्हाला शिकवीतच नाहीं म्हणजे झाले."

(२) टिळकांची विषयाची तयारी करण्याची पद्धति विद्यार्थ्यांना माहीत नव्हती. पण मला माहीत आहे. ते कोणत्याहि विषयाची सांगोपांग माहिती करून घेत.

दर विषयावरले लहानमोठे असे पाचपचवीस ग्रंथ त्यांच्या टेबलावर किंवा जवळपास, कागदाच्या खुणा घालून पडलेले दिसावयाचेच. मी स्वतः मोठा उलाढाल्या करणारा विद्यार्थी असे. टिळकांचें वाचन नेहमीं घरींच होई. ते घरीं नसले म्हणजे मी त्यांचीं पुस्तकें चाळीत असे. मला एकाहि पुस्तकावर एकहि खूण दिसली नाहीं किंवा एकाहि कागदावर एकहि ओळ लिहिलेली आढळली नाहीं. त्यांची स्मरणशक्ति फार दांडगी असे. ते घरीं इतरांशीं वादविवाद करितांना मीं दोनचार वेळां ऐकिले होते. त्यांत अमका ग्रंथकार अमकें म्हणतो व तमका तमकें म्हणतो असें क्वचितच त्याच्या तोंडचे मीं ऐकिलें. गोखल्यांना मात्र नेहमीं आधार लागे.

(३) एकदां प्रि० गोळ्यांनीं बलून (विमान) उडविण्याचा प्रयोग आरंभिला. तो त्यांना कांहीं केल्या साधेना. गोखले, आगरकर, आपटे व केळकर यांनीं आपापले शास्त्रकक्षेबाहेरचे उपाय सुचविले. अर्थातच ते व्यर्थ गेले. पण टिळकांनीं बलून दोन मिनिटांत उडविलें! तेव्हां आगरकर म्हणाले, "खरेंच बुवा, शास्त्रज्ञानाची शक्ति फारच मोठी!" टिळक म्हणाले, "या पाश्चात्यांना शास्त्रानेंच जिंकणें शक्य आहे. इतर उपाय दुय्यम दर्जाचे होत!"

---

## पांडुरंग गोपाळ बाळ, महाजन

[ लोकमान्यांच्या कुटुंबाचे भाचे, मु. लाडघर, ता. दापोली, जि. रत्नागिरी ]

सुमारें ४० वर्षांमागें लो० टिळक कोंकणात आमच्या वडिलांना भेटण्यास आल्यावेळीं मला उनाड गुरेंराख्या व कांहींहि येत नाहीं, असें पाहून माझ्या वडिलांजवळ ते म्हणाले, "याला आमचेकडे पाठवून द्या. असा येथे ठेऊं नका" असें म्हणून मला त्यांनीं पुण्यास आपलेकडे नेलें व तेथें न्यू इंग्लिश स्कूलमध्यें थोडेसें शिक्षण त्यांच्या देखरेखीखालीं, त्यांच्याच घरीं राहून मिळालें. पण माझ्या दुर्दैवामुळें लो० टिळकांपासून जितका फायदा होण्याजोगा होता तितका मी करून घेतला नाहीं.

(१) लो. टिळक हे शाळेंतील शिक्षकाचें काम आटोपून राहिल्या वेळांत वर्तमानपत्रांत मजकूर लिहीत. सुटीच्या दिवशीं जेवणाची वेळ झाली व जेवणाला वेळ असला म्हणजे कधीं कधीं ते इझी चेअरवर (आरामखुर्चीवर) पडले असतांना मजला हाक मारून वर्तमानपत्राकरितां कांहीं मजकूर तोंडीं सांगून तेथेंच बसून मजकडून लिहून घेत असत. लिहिणें आटोपल्यावर मी त्यांस म्हणे,

'तुम्हांला असें पटापट सांगतां कसें येतें ?' त्यावर त्यांनीं उत्तर दिलें, "जात्यावर बसलें म्हणजे ओंवी सुचते." हें वाक्य माझ्या पक्कें लक्षांत राहिल्यानें पुढील वयांत आपणहि कांहीं लिहून पाहावे, असें मनांत आलें व त्याप्रमाणे ४।५ पुस्तकें मीं लिहिलीं आहेत. ह्या फायदा " जात्यावर बसले म्हणजे ओंवी सुचते " ह्या लो. टिळकांच्या सांगण्याचा मला झाला.

(२) वामन म्हणून दादांचा एक लहान मुलगा होता. तो एक दिवस तांव्यांच्या वाड्यांतील जिन्यावरून गडगडून अगदीं तळांत गेला. अगोदरच हगवणीनें तो बेजार होता. तो नेहमीं आगगाडीची शिटी झाली म्हणजे म्हणे, " दादा, गाडी कोकली." त्यावरून गाडी कोकली हे शब्द सर्वांच्या तोंडीं झाले होते. दादा बाहेरून आले म्हणजे गाडी कोकली म्हणत असत. गाडीची तब्येत कशी काय आहे म्हणून विचारीत. एक दिवस तो मुलगा फार बेजार झाला. एकदोन अहोरात्र जाग्रण झाली होती. मी जेव्हां त्याच्याजवळ जागत बसलों होतो, तेव्हां तो मुलगा माझ्या खांद्याशीं असतां व दालनांत फेऱ्या घालीत असतां त्यानें शेवटला श्वास टाकला. तेव्हां मी दादांना हळुच उठवून सांगितलें, मुलाला बघा. ते उठले व म्हणाले, " त्याची आई निजली आहे तेथे बाजूला हातरुणावर हळुच त्याला टेव व कांहीं बोलूं नको." आई जागी होऊन पाहते तों, तो निजला आहे असें वाटून ती म्हणूं लागली, " मुलाला चांगली नीज आली आहे." दादा म्हणतात, " पण इच्छा असल्यास पुन्हां जन्मास येण्याकरिता ही नीज असेल !" तेव्हां त्या माउलीच्या डोक्यात लख्ख प्रकाश पडला !

(३) दादांचा व आमचाहि एक नातेवाईक इसम मुंबईत जे. जे. हॉस्पिटलमध्यें आजारी पडून मेला. त्या इसमाची व्यवस्था लावण्याचें काम मला करावे लागले. त्याची हकीकत दादांनीं विचारली त्यावरून मुंबईच्या ठिकाणीं प्रेतसंस्कारासंबंधानें बराच त्रास पडतो वगैरे हकीकतीला स्वाभाविक सुरवात करून मी त्याच्या प्रश्नांचें उत्तर सांगूं लागलों. त्यावरून ते म्हणाले, " मेल्यावर पुष्कळ खर्च तूं केला असशील, तें मला सांगूं नको; जिवत असतां काय काय केले तेवढें मला सांग."

(४) दादा मंडालेहून आल्यावर एका घराण्याची हकीकत विचारलेली सांगतांना त्या घराण्यात सावत्रपणाचीं माणसें असल्याने कांहीं बाबतींत एकमेकांचें पटेना. त्याचा भोगावा लागणारा परिणाम सांगत असतां ते म्हणाले, " सावत्र याचा अर्थ तुला माहीत आहे काय ? संस्कृत डिक्शनरी काढून पहा. सावत्र ह्याचा अर्थ शत्रु. शत्रु जर शत्रूसारखा वागला तर त्यांत आश्चर्य कसले ? तें स्वाभाविक आहे. तो मित्रासारखा वागला तर आश्चर्य." सावत्र याचा अर्थ तेव्हां मला कळला.

(५) दादांचा एक नातेवाईक कोकणांत आजारी होता. तो इसम दादांचे ३०० रुपये दस्तऐवजीं देणे होता व लेखाशिवाय तोंडींहि ३०० रुपये देणे होता. ताईमहाराजांच्या केसमुळें लो. टिळकांस अतिशय देणे झाले होतें. वर लिहिलेला आजारी इसम मरणाच्या स्थितींत असता, दादांच्या देण्याबद्दल पुनः पुनः गोष्ट काढी व देणें न देववल्यामुळें त्यास वाईट वाटे. ही गोष्ट मी दादांना पुण्यास कळविली. तेव्हा ते म्हणाले, " त्याच्या नांवाचा जो दस्तऐवज आहे तो घेऊन ये. आमचे आकाश फाटलेलेंच आहे व त्यास किती जरी ठिगळें लावलीं तरी ते साधावयाचें नाहीं. मात्र प्रीव्हिकौंसिलचा निकाल अनुकूल झाला व तो दत्तकानें मानला तरच मी ऋणमुक्त मरेन." कारण दत्तकासबंधीं दादांनीं स्वतःच्या अगावर केलेले देणें दत्तकानें नाकबूल केलें तर तें दादांच्याच अंगावर पडावयाचें हे ते जाणून होते. तरी " त्या आजारी इसमास देणे नाहीं असे समजून सुखाने मरू दे." असे म्हणून त्यांनीं त्याच्या दस्तऐवजावर देण्याची पोंच झाली असा शेरा मारून दिला व तो दस्तऐवज मीं त्या आजारी मनुष्यास दाखविला, तेव्हा तो इसम त्यावेळीं त्या दुखण्यांतून बरा झाला.

( ६ ) लोकमान्य टिळकांची चिखलगांव येथील इस्टेट त्यांच्या एका भाऊबदाकडे किंवा भाऊबदामार्फत कुळाकडे आहे व ते भाऊबद जे काय उत्पन्न येतें त्या उत्पन्नाच्या दुप्पट उत्पन्न त्याचाच एक नातेवाईक देण्यास कबूल होऊन, ही गोष्ट त्यानें मला दादास कळवावयास सांगितली. त्यावरून ही गोष्ट दादांजवळ काढता ते म्हणाले, " कोकणच्या इस्टेटी त्या काय ! पैंचे तुकडे असावयाचे, करितां एकाकडून काढून दुसऱ्याकडे ज्यास्त उत्पन्न देतो, म्हणून देणे ठीक नव्हे. खुषीनें जे काय येईल तें येईल. कोणीतरी खावयाचाच मग भाऊबंद का खाईना ! "

( ७ ) मी पंजाबांत लाहोर येथे गांधर्व-महाविद्यालयात कांहीं दिवस होतों. तेथें बडेबडे शीख लोक येत असत. सुमारें १९०२–३ सालीं लो. टिळकांकडे मंगलकार्य निघाल्यावेळीं त्यांनीं मला पंजाबांत कुंकुमपत्रिका कार्डावर पाठविली. दाक्षिणेतील व पुण्याकडील पत्र आणि त्यावर लो. टिळकांची सही पाहून, तें पत्र माझ्या हातीं एक दोन दिवस आलें नाहीं. तेथील मंडळींनीं कौतुकानें तें आपसांत फिरविलें. नंतर पत्र माझ्या हातीं आल्यावर सलगी झालेल्या शीख मंडळींच्या बोलण्यात आले कीं, आम्ही लोकमान्य टिळकांना एवढा मान देतो ह्याचें कारण, त्यांनीं आपले स्वत्व सोडिलें नाहीं. पाहा ! एवढी थंडी पंजाबांत असते पण ते येथे आल्यावेळीं दिवसभर त्यांच्या पायांत दाक्षिणीच जोडा असे. अगांत जाकीट, कोट किंवा शर्टहि नव्हता. फक्त साधा सदरा पुणेंशाहचा अंगरखा व डोक्यावर पगडी हें पाहून त्यांना मोठें आश्चर्य वाटलें, व म्हणाले " मोठेपणाचें लक्षण तें हेंच कीं, स्वत्व न सोडणें "

( ८ ) एकदां सातान्यास लो. टिळकांबरोबर प्रॉव्हिन्शिअल कॉन्फरन्सला मी गेलों होतो. तेव्हां जेवण्याच्या वेळीं निरनिराळ्या तऱ्हेचे लोक निरनिराळ्या तऱ्हेने पक्तींत बसलेले पाहून मी दादांना म्हटलें, 'अशा ठिकाणीं मुकटा काय कामाचा ?' त्यावर ते म्हणाले " दुसऱ्यानें चोरी केली म्हणून आपण तसेंच का करावयाचें ? अशाने शिस्त बिघडते व वळणहि बिघडते आणि दुसरे आपलें अनुकरण करितात. करितां तूं माझा मुकटा काढ व आपलाहि मुकटा काढ." व त्याप्रमाणे त्या गंगाजमुनापक्तींत आम्ही दोघेही सोंवळें नेसून जेवावयास बसलों होतो.

( ९ ) एकदां दौंड स्टेशनावर त्यांची माझी गांठ पडली. त्यावेळी त्यांना सुपारीची जरूर दिसली. त्यावरून मजजवळ खिशांत असलेले सुपारीचे २।४ मोठे रोठे त्यास दिले व मजजवळ अडकित्ता नसल्यानें मी इकडे तिकडे दगड शोधू लागलो. तो त्यांनीं मला हांक मारून सांगितलें, " मजजवळ अडकित्ता आहे. इकडे ये ! " असे म्हणून रोठा आपले तोंडांत धरून दातांनीं त्याचे कडाकड तुकडे केले. तेव्हां ते म्हणाले, " पाहिलेंस ? हाच माझा अडकित्ता ! "

( १० ) वर्तमानपत्रकर्ते या नात्यानें टिळक व आगरकर यांजकडे बऱ्याच नाटक कंपन्यांचीं तिकिटे येत असत. आगरकरांचा धाकटा भाऊ दामुअण्णा हा कधीं कधीं त्या तिकिटांचा उपयोग करीत असे, व एकदा त्यानें आपल्या-बरोबर मलाहि नेलें होतें. हे पाहून दादा म्हणाले " फुकट तिकिटांचा उप-योग करून घेणे केव्हाहि चांगले नाहीं. करिता तीं तिकिटे घेऊन नाटकाला आत जाऊ नका. जाणेंच झालें तर पैसे भरून जाणें चांगलें. कारण आम्हाला अभिप्राय देणे झालें तर ओशाळगतीमुळें स्पष्टपणें अभिप्राय देतां येणार नाहीं. "

( ११ ) १८९७ सालचे खटल्याचे वेळीं दादा नेहमीप्रमाणें आंग्रेवाड्यांत दाजीसाहेबांकडे उतरले होते. खटल्याच्या शेवटल्या दिवशीं कोर्टात जाण्या-पूर्वी गांवांत वदता उठली कीं, त्यास दीड वर्षांची शिक्षा होणार आहे. ती त्यांस कळलेली होती. म्हणून जी काय व्यवस्था करावयाची ती करून त्याचा ललोटा बंद करून त्यांनी तो दाजीसाहेबांच्या हवालीं केला. त्या वेळीं बोल-तांना सर्व घरगुती सबंध आठवून ते मला म्हणाले, " राजकारणी पुरुषाला लग्न, पोरेंबाळें वगैरे उपयोगाचीं नाहींत. हें एक विघ्नच होतें. कारण त्यामुळें मनाचा ओढा व मनाची चलबिचल फार होते, पण नानांनी ( वडिलांनीं ) लहानपणीं माझें लग्न केलें तेथे माझा इलाज नाहीं."

( १२ ) लो. टिळकांचे वडील ज्यांस ते नाना म्हणत, ते रत्नागिरी जिल्ह्यांत गुरुजी या नांवाने प्रसिद्ध होते. ते शाळाखात्यांत इन्स्पेक्टर होते. ते

जिल्ह्यांत फिरत असल्यानें व त्याचें घर चिखलगांव हें लाडघराला ( आमचें राहण्याचें ठिकाण ) जवळ असल्यानें कोणतें घराणें कसें आहे ही सर्व माहिती त्यांस होती. नानाचा आमचे वडिलांविषयीं आदर फार होता. नाना असेरच्या दिवसांत उदराच्या विकारानें आजारी झाल्यावेळीं त्यांच्या जवळ जे काय ७।८ हजार रुपये शिल्लक होते, ते सर्व त्यानीं कागदपत्राशिवाय म्हणजे लेखाशिवाय आमचे वडिलांचे स्वाधीन करून व्याजबट्ट्याचा व्यवहार करण्याकरितां दिले. व त्या पैशांच्या व्याजांत लो. टिळकाचें शिक्षण व्हावें व मुद्दल त्याचें त्यास परत मिळावें असें नानाचें सांगणें आमचे वडिलास होतें.

आमचे घराण्याबद्दल नानांची पूज्यबुद्धि पाहून आमचे वडील एक दिवस त्यांस म्हणाले 'माझी बहीण लग्नाची आहे व ती तुमचे मुलाला द्यावयाचा आमचा विचार आहे.' तेव्हां त्यांनीं (नानानीं) त्याचे वडील रामचंद्रपंत कार्यांत पेन्शन घेऊन पुण्यक्षेत्रीं राहत असत, त्यास पत्र पाठवून विचारिलें कीं, 'लाडघरचे बाळ यांची मुलगी सांगून आली आहे. पण मुलगी सामान्य आहे. व हुंडाहि फार मिळणार नाहीं. तसेंच दुसऱ्या सुस्वरूप मुली सांगून आल्या आहेत व हुंडाही ५०० किंवा त्याहून ज्यास्त मिळणार आहे, तर कार्य कोठे म्हणजे कोणत्या मुलीशीं जमवावें ?' ह्याचें उत्तर आलें कीं, जरी ( हुंडा नसला व दुसऱ्या कितीही चांगल्या मुली असल्या, तरी ) लाडघरचे बाळ यांचीच मुलगी पसंत करावी. नानांच्या मनातून शरीरसंबंध व पैशाचा संबंध ( पैसे ठेवण्याचा ) एक ठिकाणीं केल्यानें फायदेशीर होईल, असें होतेंच, त्याप्रमाणें लग्न जुळलें.

ज्या ठिकाणीं लग्न झालें त्या ठिकाणीं त्याच जागेवर लो. टिळक, आमचे वडील वारल्यानंतर सासूबाईंना व आम्हाला सुमारें १९०४ सालीं भेटण्यास कोंकणांत आले. तेव्हां सहजच टिळकाच्या सासूबाईंनीं म्हणजे आमच्या आजीबाईंनीं म्हटलें 'हें आतां सरकारशीं भांडण्याचें सोडून द्या, व शिक्षेमुळें होणारे हाल चुकवा. कोण जिवाचे हे हाल व यातायात !' असें म्हणून आजीबाईंनीं डोळ्यांतून पाणी काढलें, व म्हटलें 'नानाचाहि हेतु असा कांही नव्हता.' तेव्हां लो. टिळक मजकडे वळून म्हणाले, " काळवेळानुसार गोष्टी घडत असतात. अमुकच करावयाचें किंवा घडावयाचें हें काळ ठरवीत असतो. आम्ही कोण ?"

(१३) दादांच्या मनातून काड्यांचा कारखाना व साखरेचा कारखाना काढण्याचा फार इरादा दिसत होता. त्यासाठीं त्यानीं त्यांचे नातेवाईक रा. गंगाधर रंगनाथ महाजन यास अनेक ठिकाणीं पाठवून अनेक ठिकाणचे अनुभव पाहाण्यास लावून त्यास साखरेच्या कारखान्यांत प्रवीण केला, व मला काड्यांच्या कारखान्यांबद्दल माहिती पटवून कांहीं कांहीं ठिकाणें पहाण्यास पाठविलें. कोंकणांतून मुद्दाम नाना प्रकारच्या लांकडांचे तुकडे मागवून त्याच्या काड्या,

कोणत्या झाडाच्या कशा बनतात यांचे नमुने मजकडे पाठवीत. एकदां तर ते स्वतः नमुने पाकिटांत भरून घेऊन मला दाखविण्यास आले होते. पुण्यास दादांचे मद्रास, कलकत्ता मुंबई, वगैरे व इतर बरेच ठिकाणांहून मोठमोठे लोक येत जात असत. व धंद्यासंबधीं गोष्टी निघत असत. पुण्यास एकदां जेवावयास बसलो असता बोलतां बोलतां कारखान्यासंबधीं गोष्टी निघाल्या. तेव्हां मजकडे बोलण्याचा रोख करून ते म्हणाले, " ह्याच्या मनांत ह्याला सांगतां सांगता आतां कोठे कारखाना काढण्याचे दिसतें." व त्यावरून त्यांनीं आपला संतोषहि व्यक्त केला. गोदावरी लाइनवर रेल्वे खात्यात बरेच लोक माझ्या ओळखीचे आहेत. त्यास विचारून १०० रुपयांचा एक शेअर असे १०–१५ हजार रुपये जमतील असा अजमास करून त्या लोकानीं मला कळविले. ही गोष्ट मीं दादांना सांगितली. तेव्हा ते म्हणाले, " आपल्या लोकाना अजून एकत्र भांडवलाची संवय जडून भांडणतंट्याशिवाय कारखाना चालविण्याची पात्रता दिसत नाहीं. भांडणें मात्र होतील. करितां ५००० रुपये तू काढ व ५००० रुपये मी देईन. मग तेवढ्या भांडवलावर कारखाना अल्प प्रमाणावर प्रथम उभारू. लोकांचे पैसे नकोत. " हें बोलणें झाल्यानंतर काहीं काळ लोटल्यावर त्याच्यावर खटला होऊन ते मंडालेस गेले. मिळून दोन्ही गोष्टी तशाच राहून, त्याच्या इच्छेप्रमाणे पार पडलेल्या नाहींत.

(१४) लो. टिळकांनीं केसरीपत्र ऑईल इंजिन आणून त्यावर चालविण्याचें मनात आणिले. त्यावेळीं ऑईलइंजिनवर वर्तमानपत्र कोठेंच निघत नसे. म्हणजे हा प्रथमचाच लो. टिळकांचा प्रयत्न होता. पण रा. हरिभाऊ गोखले, पूर्वीचे केसरीचे असलेले मॅनेजर हे त्याविरुद्ध फार होते. ते म्हणत तुमचा हा प्रयत्न फुकट आहे. लो. टिळकानीं मनांत आणल्याप्रमाणे मशीनसंबधीं सर्व माहिती करून घेऊन फिटिंग वगैरे कसे करावयाचे ह्याची माहितीपुस्तके मागवून उत्तम करून घेतली व मशिन मागवून त्यावर केसरी छापण्यास सुरुवात झाली. पण खिळा, चूक किंवा काहीं बिघाड झाला व लो. पुण्यास नसले म्हणजे अडत असे. त्यांस बोलावून आणून ते येत, तेव्हां छापखान्याचे काम चाले.

(१५) सरकार मोठ्या दक्षतेने जीं गुप्त कारस्थाने करी, तीं लो. टिळकांस अचानक कळून बाहेर फुटत व केसरींत तीं प्रसिद्धहि होत. ह्याची सरकारला त्यावेळीं चीडहि येई. लोकमान्यांवर सरकारचा रोष होण्याला जीं अनेक कारणे झालीं त्यापैकीं हें एक कारण होय. एकदां लो. टिळकाच्या घरीं मंडळी जमली असता कांहींजण म्हणू लागले 'तुम्हांला सरकारच्या गुलदस्तांतील माहिती कळते कशी ?' त्यावर ते म्हणाले, " माझ्या पाठीवर जसे सरकारचे डिटेक्टिव्ह आहेत, तसेंच माझेहि डिटेक्टिव्ह सरकारच्या पाठीवर आहेत. " पुढे कांहीं दिवसांनीं

ऑफिशिअल सीक्रेट किंवा गौप्यगोपन हें सरकारच्या शस्त्रागारातून एक शस्त्र बाहेर पडलेलें लोकांना स्मरत असेल.

(१६) तळेगावास कांचेचा कारखाना निघाला. त्या कामांत प्रयोग करून कारखाना यशस्वी करण्याकरिता कांहीं पैशाचा व्यय झाला. म्हणजे प्रयोगावस्थेत अनुभवाकरिता पैसा व्यर्थ गेला, असे पाहून टिकाकार लोक तक्रार करू लागले कीं, 'लो. टिळकानीं सार्वजनिक पैसा व्यर्थ उडविला.' त्या बाबतींत लो. टिळक मला म्हणाले, " लोकांचा कोणी हात धरला होता कां ? त्यानीं प्रथमच सांगायास पाहिजे होते कीं, अशा अशा तऱ्हेनें गेल्यानें पैशाचा उगाच व्यय न होता यश खात्रीनें येईल. असें सुचविलें असता आम्हीं जर ऐकलें नसते तर मग आमचे वर दोष राहता. अनुभव घेऊन अशाच तऱ्हेनें गेल्यानें फायदा होतो असें ठरल्यावर मग लोकांचे बोलणें काय कामाचें ? लोक असेच भागून भागून टवाळक्या करावयाचे व नाउमेद करून टाकावयाचे. ह्यासाठीं ज्याला काम करावयाचें आहे त्यानें लोकाच्या टीकेकडे लक्ष देता कामा नये."

(१७) लोकमान्य कोंकणात गेल्यावेळीं त्याचें गाव जे चिखलगांव, तेथपासून पुढे दाभोळपर्यंत पांचविण्यास मी त्याच्याबरोबर गेलों होतो. वाटेत डोंगर वगैरे कोंकणचे चालण्यास अवघड पण त्याना त्याचें कांहींच वाटले नाहीं. माझा मात्र निभाव त्याच्याबरोबर लागेना. तेव्हा ते म्हणाले, " कोंकणांत राहून कोंकणचे डोंगरसुद्धा तुला उलटवत नाहीत." त्यावेळीं वाटेत बोलता बोलता कोंकणच्या लोकाच्या वागणुकीबद्दल विषय निघाला. " लोक आळशी, काहीं काहीं ठिकाणीं गांजा ओढणारे, पत्ते झोडणारे व लोकांच्या बोलण्याचा विषय काय तर यदा तू किती भात पिकविलेंस, माझें इतकें झालें, पण आपल्या शेतात सुधारणा करून अनुभव घेऊन, तो अनुभव इतरांच्या फायद्याकरिता लोकांपुढे ठेवणारे आहेत आहेत का ? पूर्वापासून चालत आल्याप्रमाणेच पुढेंहि त्याचप्रमाणें शेतीचीं कामें चालावयाचीं, यात सुधारणा किंवा काहीं फरक करणारे कोणी आढळावयाचे नाहींत." हें सांगण्याचें कारण मी कोंकणचा रहिवाशी; करिता त्या दिशेने मी कांहीं तरी सुधारणा दाखवून लोकाना धडा घालून द्यावा हा त्यांचा हेतु होता असे दिसले.

(१७) लग्नकार्यांतील अशुभता टाळण्याकरिता काय उपाय योजावा व काय करावें असा विषय दादाजवळ सहज निघाल्यावेळीं ते म्हणाले, " अष्टवर्षा भवेत् कन्या ' ह्या जुन्या शास्त्रमताला मान देण्याकरितां मुलगी लग्नाला योग्य झाली म्हणजे मुलामुलींकडून ( त्याच्या पालकाकडून ) पसती ठरवून शेवटीं वाङ्-निश्चय वगैरे प्रकार ठरवून ठेवावेत. होम, सप्तपदी वगैरे पुढील विधि करू नयेत. कारण हिंदु लोकांचा लग्न-विधि हा इतर अन्य जातीतील लग्न-विधिप्रमाणें कॉन्ट्रॅक्ट नसून तो एक प्रकारचा पवित्र विधि पुनः न बदलणारा मानला जातो.

करितां मुलगी वयांत आल्यावर मागाहून हे विधी केले असतां तशाच प्रसगीं त्यांत बदल करण्याला वाव राहतो. व अनिष्ट प्रसग, मग जरूरी वाटल्यास टाळतां येणे शक्य होते." ही सुधारणा त्यानीं त्यावेळीं सुचविली. पण एकदम अमलांत येणेहि कठीण पडेल असेहि ते बोलले.

---

## श्रीपाद कृष्ण बेलवलकर

[ पी. एच्. डी., एम्. ए., प्रोफेसर डेक्कन कॉलेज, भांडारकर रिसर्च इन्स्टिटयूटचे सभासद, पुणें ]

(१) विद्यार्थी या नात्याने पुण्याशीं माझा सबध जरी इ. स. १९०० पासूनच सुरू झाला होता तरी १९१५ पावेतो लोकमान्यांचे साक्षात् दर्शन असे मला १।२ वेळांच झाले असेल; मग परिचय तर दूरच राहिला. इ. स. १९१५ सालीं माझी येथील डेक्कन कॉलेजांत नेमणूक होऊन मी कायमचा 'पुणेकर' बनल्यानंतर पुण्याच्या सुप्रसिद्ध विभूति म्हणजे गुरुवर्य डॉ. भांडारकर, ऑनरेबल गोपाळरावजी गोखले व लो. बळवतरावजी टिळक यांची काहीं तरी प्रसग काढून मुद्दाम ओळख करून घेणे जरूर आहे असे मला वाटू लागले. व असें वाटण्याचे मुख्य कारण म्हणजे वरील विभूतित्रयाच्या जोडीने ज्यांचे नाव घेता येईल अशा एका महाराष्ट्रीय विभूतीचे—न्यायमूर्ति रानडे यांचे—दर्शन घेण्याचा एक सुप्रसग मी माझ्या आळसाने गमाविल्यामुळे त्या दर्शनास मी कायमचा अतरलो, याबद्दल मनास लागून राहिलेली चुटपुट हे होय. वरील तिघांपैकीं डॉ० भांडारकर यांच्याशीं दुसऱ्या काही कारणांनीं माझा निकट सबध घडवून आणिला; व मुद्दाम सधान बांधून पाच मिनिटेच कां होईना गोपाळरावजींशीं प्रत्यक्ष सभाषण करण्याचा प्रसग त्यांच्या शोचनीय निधनाच्या कांही दिवस अगोदर मला लाभला. ऑनरेबल गोखल्याशी झालेल्या या भेटीचा दिवस व वेळ अगोदरच ठरविली होता, व भेटीपूर्वी मी त्यांना जरी सर्वांशीं अपरिचित होतो तरी मी भेटीस येणार म्हणून मजबद्दल बरीच माहिती त्यानी शोध करून जमविली होती असे त्यांनीं भेटींत विचारलेल्या प्रश्नांवरून मला दिसून आले. लोकमान्याच्या भेटीबद्दल मी आगाऊ तयारी अशी कोणतीच केलेली नव्हती. कसलीहि सूचना न देतांच एक दिवस आम्हीं 'गायकवाडवाड्यांतील त्यांच्या नित्याच्या बसावयाच्या खोलीत जाऊन उभे राहिलो, व त्यानतरहि 'मुलाखतीचे अनेक प्रसग आले. त्यावेळीं केव्हांहि आम्हास अगोदर निरोप' पाठवून appointment करावी लागली नाहीं. नाहीं म्हणावयास एका खेपेस मात्र लोकमान्य वाड्यांत असूनहि त्यांच्या

बसावयाच्या खोलीचें दार बंद केलेलें आम्हांस आढळलें. केसरीच्या संपादकाशीं कांहीं गोष्टींची गुप्त वाटाघाट चालली होती असें आम्हास नंतर समजलें. दार बंद असल्यामुळें आम्हांस दोन मिनिटें थांबावें लागलें हें सुद्धा लोकमान्याना आवडलें नाहीं. आम्हीं न थांबतां आंतच यावयास पाहिजे होतें असें त्यांनीं बोलूनहि दाखविलें. या लहानशा गोष्टीवरूनहि लोकमान्यांची निरभिमानता दिसून येते. आपण कोणी अद्वितीय व्यक्ति आहों याची जाणीव आपणास आहे, अशी आपल्याबद्दल लोकांच्या मनात शंका सुद्धा उत्पन्न न होऊं देण्याविषयीं त्यांचा तीव्र कटाक्ष असे.

(२) मंडालेहून १९१५ सालीं परत आल्यानंतर लोकमान्यांविषयीं प्रत्यक्ष सरकारच्या वृत्तीतहि पालट झाला असावा; मग त्याला लोकमान्यानीं देशहितार्थ केलेला स्वार्थत्याग, भोगलेली संकटपरंपरा व दाखविलेलें धैर्य या व्यतिरिक्त त्यांची प्रत्यक्ष अशी मुळींच माहिती नव्हती, अशा मजसारख्या अपरिचिताला अशा थोर विभूतीच्या प्रथमदर्शनप्रसंगीं काय वाटलें असेल याची कल्पनाच केलेली बरी. स्वतःच्या लहानपणाची जाणीव कशा आदबीनें वागून स्पष्ट प्रकट केली जाईल इकडेच माझें लक्ष लागून राहिलें होतें. मी थोडासा भांबावूनहि गेलों होतों. शेवटीं " तुम्ही सरकारी नोकर असून आमच्याकडे कसे आलात ? " या लोकमान्यांच्या प्रश्नानेंच माझें मन स्थिर केलें. आणि ' माझा परिचय आपल्या वाङ्मयात्मक कार्यांशींच अधिक निकटचा आहे व त्या नात्यानेंच आपली भेट घेण्यास मला कसलीहि दिक्कत वाटत नाहीं ' या अर्थाचें मीं उत्तर केलें. तथापि सरकारच्या मनोभावनांचा लोकमान्यास विशेष अनुभव आला होता म्हणून असेल कदाचित्, पण मी सरकारी नोकर आहे ही गोष्ट मी केव्हा केव्हां विसरून जात असलों तरी लोकमान्य केव्हांहि विसरले नाहींत. एकदां लोकमान्याना मजजवळचें एक फ्रेंच पुस्तक पाहिजे होतें; तें मागण्याकरिता त्यानीं आपल्या चिरंजिवास नारायण पेठेंत माझ्या बिऱ्हाडीं पाठविलें होतें. मी पुस्तक व 'सोबत पुस्तक पाठविलें आहे' म्हणून एक चिठ्ठी पाठविली. चारपांच आठवड्यानीं पुस्तक परत आलें. त्यावेळीं त्याबरोबरच 'Returned with thanks' असा शेरा लिहून माझीच चिठ्ठी लोकमान्यानीं मजकडे परत पाठविली. हें कदाचित् सहजगत्या झालें असेल; पण मला माहीत आहे कीं, डेक्कन कॉलेजांतील एका युरोपियन प्रोफेसराचा लोकमान्यांशीं त्यांच्या शेवटच्या कारागृहवासापूर्वी बराच पत्रव्यवहार होता. खटल्याचें वारंट निघण्यापूर्वी कित्येक दिवस अगोदर लोकमान्यानीं वरील साहेबमजकुरानें आपणास लिहिलेलीं सर्व पत्रें जिकडचीं तिकडे परत पाठविलीं होतीं. आपल्या घरची झडती झाली असतां विनाकारण दुसऱ्यास तोशीस पडूं नये एवढ्याकरितां ही सर्व तजवीज. तेव्हा कदाचित् मी पाठविलेली चिठ्ठी बुध्याच मजकडे परत पाठविली असल्याचाहि संभव आहे.

(३) माझी लोकमान्यांशीं प्रथम भेट झाली त्या वेळीं 'गीतारहस्या'च्या छपाईचें काम चालू होतें. निम्मा अधिक भाग तयार झाला होता. मला पुढल्या टर्मपासूनच कॉलेजांत गीता शिकवावयाची होती, तेव्हां लोकमान्यांचें पुस्तक वाचण्यास मी अत्यंत उत्सुक होतों, हें उघडच आहे. न जाणो, कदाचित् प्रसिद्ध झालेला भाग मीं वाचून पहावा अशी लोकमान्यांचीहि इच्छा असावी. कारण 'तुम्ही हल्ली काय करीत असतां?' असा सूचक प्रश्न त्यांनीं मला केला. प्रश्नाचा रोख पूर्णपणें लक्षांत आला नाहीं व पहिल्या भेटींत तरी रहस्याच्या तयार असलेल्या फार्मांचा खंड त्यानीं मजकडे वाचण्यास दिला नाहीं. पण पुनः ४।५ दिवसांनीं कांहीं कारणानें मी गायकवाडवाड्यांत गेलों असतां लोकमान्यांनीं पूर्वींचाच प्रश्न मला विचारिला, व 'विशेष काम नसल्यास हीं छापलेलीं पानें वाचून अभिप्राय कळवा म्हणजे कांहीं दुरुस्ती करणें जरूर असल्यास पुस्तक छापून पुरें होण्यापूर्वी तसें करितां येईल' असें म्हटलें. मला दिलेल्या या महत्त्वाबद्दल मला मनांतून अतोनात हर्ष वाटला हें सांगावयास नकोच. हातीं आलेलीं पानें मीं एकसारखें बसून वाचून काढिलीं. ग्रंथाच्या ओजस्वितेनें व तर्कशुद्ध मांडणीनें पुर्वपरिचित असलेलाच गीताग्रंथ मला अपूर्वसा भासला व एकदरींत रहस्यासबंधानें माझा अत्यंत अनुकूल ग्रह झाल्याचें मीं लोकमान्यांस सांगितलें. येथें प्रसंगानें दोन किरकोळ गोष्टींचा उल्लेख करणें जरूर आहे. ग्रंथ घाईघाईनें वाचल्यानंतर ज्या १०।१२ लहानसहान गोष्टी थोड्याफार दुरुस्तीकरितां मीं रहस्यकारांच्या निदर्शनास आणिल्या त्यांपैकीं एक म्हणजे १४८ पृष्ठावरील 'मनाचे व आत्म्याचेहि परमाणु आहेत' हे न्यायप्रक्रियेबद्दलचें वाक्य होय. अर्थात् न्यायप्रक्रियेप्रमाणें आत्मा निरंश व विभु असल्यानें वरील विधान चुकीचें गणलें जाईल. आपल्याकडून अनवधानानें झालेली ही चूक शुद्धिपत्रांत 'आत्म्याचेहि' याचेबद्दल 'शरीराचेहि' असा शोध सुचवून रहस्यकारांनीं बेमालुमपणे सुधारून घेतली आहे. पण 'मनाचे व आत्म्याचेहि' यामध्यें जो एक climax आहे तो 'शरीराचेहि' यामध्यें तसा राहिला नाहीं हे सूक्ष्मदृष्टि वाचकांच्या लक्षांत आल्याशिवाय राहणार नाहीं. दुसऱ्या एका गोष्टींत मात्र माझी पूर्णपणें फजिती झाली. ग्रंथ आपण कसोशीनें वाचला आहे हें दाखविण्याकरितां ४१६ पानावरील पाचव्या ओळींतील 'मीच' हा शब्द जाड टाइपांत घेतला पाहिजे होता हें दाखविण्याकरितां मी मार्जिनमध्ये पेन्सिलीनें × अशी खूण केली होती. ती पाहतांच ही काय खूण आहे असा लोकमान्यांनीं बुद्ध्याच मला प्रश्न केला. 'आतां पुस्तक छापून झालेंच असल्यामुळे त्यांत कांहीं विशेष दुरुस्ती नाहीं' असें मीं उत्तर केलें; परंतु लगेच त्यांनीं मला दाखवून दिलें कीं, ही लहानशी बाबसुद्धां त्यांनीं पूर्ण विचार करूनच तशी ठेवली होती. 'भगवंतांनीं स्वतःसंबधानें केलेला प्रथमपुरुषी उल्लेख सप्तमीपासून प्रथमेपर्यंतच्या सर्व विभक्तींतून दाख-

वाक्याचा असल्यानें तेवढीं रूपें मात्र जाड टाइपांत घेतलीं. तृतीया व द्वितीया यांच्यामध्यें आलेला प्रथमाविभक्तीचा उल्लेख विषयाच्या न्यायप्राप्तक्रमानें अपरिहार्य असल्यानें वळगता आला नाहीं,' पण क्रमभग असल्यानें तो जाड टाइपांत घेतला नाहीं असा खुलासा त्यांनीं केला. तो ऐकून मी मनांत बराच ओशाळा झालों.

(४) गीतारहस्यावर मी एक टीकात्मक निबंध 'विविधज्ञानविस्तारां'त लिहिला होता व त्याला त्याच ठिकाणीं रहस्यकारांनीं उत्तरहि दिलें होतें, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. तेव्हां ओघानें आल्यामुळें आठवणीचा हा भाग पुरा करून घेतों. आचार्यपक्षीय टीकाकाराचा रहस्यकाराशीं जो वादविवाद त्यावेळीं व्याख्यानातून, वर्तमानपत्रातून अगर मासिकांतून होत होता त्यांतील एक मुद्दा मला अगोदरपासूनच पटला होता. ब्रह्मज्ञान झाल्यानंतर मनुष्य विधिनिषेधातीत होतो व तदनंतर त्याच्यावर कसलीहि सक्ति करितां येणार नाहीं. ब्रह्मज्ञान हें अंतिम ध्येय असल्यानें त्यानंतर पुढें आणखी एखादें कर्तव्यकर्म, आणखी कसलाहि "ought" शिल्लक राहू शकणार नाहीं, हा तो मुद्दा होता. या विरुद्ध रहस्यांत अनेक ठिकाणीं विधानें केली गेलीं आहेत. उदाहरणार्थ पृष्ठ ३५१–३५३ वर दिलेल्या कोष्टकात आरंभीच्या ब्रह्मविद्या अथवा आत्मज्ञानाचा अर्थ जर साक्षात्कारी ज्ञान असा करावयाचा असला तर तशा ज्ञान्याला 'स्वधर्मविहित कर्मे केलीं पाहिजेत,' 'निष्काम कर्मे सोडू नको' इत्यादि विधिनिषेध करिता येणार नाहींत हें उघड आहे. हे विधिनिषेध भगवंतांनींच स्वमुखानें केले आहेत; त्यात रहस्यकारांनीं पदरचे काहीं घातले नाहीं असें सांगून या अडचणींतून मोकळे होता येणार नाहीं; कारण जेथें शब्दांचा सरळ उत्तानार्थ घेतला असता स्पष्ट न्यायविरोध घडतो तेथें आपला अर्थ चुकला असेंच मानिलें पाहिजे, असा मीमांसाशास्त्राचा नियम आहे. रहस्यावरील माझ्या निबंधांत हा मुद्दा मीं स्पष्टपणें प्रतिपादिला होता, व निबंध प्रसिद्धीस देण्यापूर्वी रहस्यकारांकडे अवलोकनार्थ पाठविला होता. त्यावेळीं वरील मुद्द्यावर उत्तर करितांना 'ज्ञानी विधिनिषेधातीत असल्याचें आपणांस कबूल आहे व आपण तसें रहस्यात स्पष्ट म्हटलेंहि आहे' असें २।४ उल्लेख दाखवून लोकमान्यांनीं सिद्ध केलें. त्यावेळीं, पाश्चात्य तत्त्वज्ञानाशीं परिचित असलेल्या इसमास पटेल असा कँटचा Metaphysic of Morals-मधील एक उतारा ( रहस्य पृष्ठे ३७०–७१, टीप ) त्यांनीं मला मुद्दाम म्हणून दाखविला. 'मग याशीं विसंगत अशीं विधानें रहस्यांत कां यावींत' असा प्रश्न केला असतां, अशीं विधानें रहस्यात एक तर बुद्धिपुरःसर कोठे केलेलीं नाहींतच व असतील त्यांचा विनियोग ज्ञान्याचें विधिनिषेधातीतत्व ग्रंथकर्त्यास मान्य आहे हें लक्षात ठेऊनच केला पाहिजे. ग्रंथ रोज एक फार्म अशा प्राइनें छापला जात आहे तेव्हा जरूर तेथें वाचकांनीं आपलें 'जजमेन्ट सस्पेण्ड' केलें पाहिजे,

एकदम शेरा-मारण्याची घाई करून चालणार नाहीं' असा त्यांनीं मला इशारा दिला. व तो पटल्यामुळें प्रथम लिहिलेल्या निबंधांत ठिकठिकाणीं मला योग्य तो फेरफार करावा लागला. तथापि न्यायविरोधाचा मुद्दा थोडासा आंगलट येण्याची जाणीव रहस्यकारांसच वाटली असावी व म्हणूनच इतर कोटिक्रमांच्या नादीं न लागतां शेवटीं 'लिङ्गा-'च्या व 'कृत्या' च्या पाणिनिप्रक्रियेप्रमाणे होणाऱ्या निरनिराळ्या समवनीय अर्थांचा मुद्दा त्यांनी माझ्या निबधास प्रत्युत्तर करितांना प्रामुख्यानें पुढें आणिला. मला वाटते, हा सोइस्कर मुद्दा प्रथम प. वा. कृष्णाजी गोविंद ओकशास्त्री यांनी सुचविला. 'चित्रमयजगत' मध्येंहि या विषयावर एक लेख आला होता, व 'निष्काम कर्में करावींत' या विधानांतील विध्यर्थांचा अभिप्रेत अर्थ 'विधि' नसून 'स्वाभिप्राय निवेदन' आहे, व अशा अर्थींच रहस्यांत जागोजागी ज्ञानासवंधाने केलेला 'लिङ्गा' चा व 'कृत्या' चा उपयोग समजला पाहिजे असें म्हणण्याने एक तर न्यायविरोधाच्या कचाटींतून मोकळें होतां येतें व ग्रथांत केलेलीं विधाने परत घेण्याचा प्रसंग टळतो अशी दुहेरी सोय या कोटिक्रमांत होती. ते कसेहि असले तरी माझ्या निबधास दिलेल्या प्रत्युत्तराने तेवढ्या मुद्द्यापुरती तरी आचार्यपक्षीय टीकाकार व रहस्य-कार यांच्यामधील विरोधाची तीव्रता बरीच कमी झाली.

याशिवाय आणखी दोन तीन मुद्दे मी माझ्या निबधांत पुढें आणिले होते; पण त्यांचें योग्य समाधान रहस्यकारांनीं आपल्या प्रत्युत्तरांत केलें नाहीं. 'स्वभावो-ऽध्यात्ममुच्यते' या श्लोकाचा जो सहज सुचलेला अर्थ मी माझ्या निबंधांत जातां जातां नमूद केला होता, त्याचेच नामनिर्देशपूर्वक रहस्यकारांनीं गौरव केले याचे मला थोडेंसें आश्चर्य वाटले. वॉरन हेस्टिंगसच्या पार्लमेंटरी चौकशीचा निकाल देतांना त्यास मोठमोठ्या आरोपांतून दोषमुक्त करणे व अयोध्येच्या बेगमपासून एवढी मोठी खडणी घ्यावयास नको होती, थोडी कमी घेणे न्याय्य झालें असते, या किरकोळ मुद्यावर त्यास गुन्हेगार ठरविणें यासारखाच हा प्रकार होता. या सर्व गोष्टींत कौतुकाने नमूद करण्याजोगी आठवण म्हणजे आगाऊ दोन चार दिवस लोकमान्यांकडे निबध पाठवून देऊन त्याचेविषयीं चर्चा करण्यास त्यावेळीं मी त्यांचेकडे गेलो होतों त्यावेळीं लोकमान्य जेवावयास उठणार होते. परतु मला पाहतांच सर्व नित्यकृत्ये बाजूस ठेऊन सुमारे अर्धा पाऊण तास त्यांनीं मजबरोबर चर्चेमध्यें घालविला ही होय. कामांत व्यापृत असले म्हणजे त्यांना देहधर्माचा सुद्धां विसर पडत असे याचें हें एक प्रत्यंतरच होते.

कालक्रमानुसार लोकामान्यांच्या परिचयाचा दुसरा महत्त्वाचा प्रसंग म्हणजे याच सुमारास स्थापन झालेल्या Sanskrit research नामक त्रैमासिकाकरितां लोकमान्यांकडून लिहवून घेतलेला त्यांचा सुप्रसिद्ध A missing Sāmkhyakārikā हा निबंध होय., निबधांतील विषय संक्षेपानें रहस्यामध्येच पृ. १६० ,वरील

एका टिपेंत आला होता. पण विषय महत्त्वाचा असल्यामुळें तो इंग्रजी वाचकांच्या नजरेस पडावा, व त्यामध्यें नवीन शोध लागलेल्या माठरवृत्तींतील पुराव्याचाहि समावेश केला जावा याबद्दल त्रैमासिकाच्या वतीने मी लोकमान्यास विनंति केली होती. माठरवृत्तीचे चिनी भाषेतून फ्रेंच भार्षेत झालेलें भाषांतर मी या प्रसंगीं लोकमान्यांच्या नजरेस आणिलें व निबंधाचा पहिला खर्डा मला दाखवून त्यावर थोडी चर्चा झाल्यावर मगच लोकमान्यांनीं तो निबंध पूर्ण करून प्रसिद्धी-करितां माझ्या स्वाधीन केला. प्रस्तुत निबंधासबंधीं १।२ गोष्टी मला येथें नमूद कराव्याशा वाटतात. निबंधाचा विषय व त्यांतील मुख्य मुद्दे गुरुवर्य डॉ. भांडारकर यांना मी एकदां तोंडी सांगितले असतां, गौडपादभाष्यांतील टीका मजकडून वाचवून घेऊन, त्यावरून रा. टिळकांनीं काढिलेला निष्कर्ष योग्य आहे असा डॉक्टरसाहेबानीं आपला अभिप्राय मजजवळ स्पष्टपणें नमूद केला. व ही गोष्ट लोकमान्यांस कळवितां त्यांसहि डॉ० भांडारकरांची संमति मिळाल्याबद्दल संतोष झालेसें दिसलें. दुसरी सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे प्रो. टाकाकुसूंच्या फ्रेंच भाषांतराचा लोकमान्यांनीं आपल्या निबंधांत केलेला उपयोग ही होय. लोक-मान्यांस फ्रेंच शब्दांचा उच्चार बिनचुक करितां येत असावा; पण त्यांना फ्रेंच भाषा मुळींच अवगत नव्हती. ही गोष्ट एका लहानशा फ्रेंच वाक्याचा एक सर्वांशीं अशक्य अर्थ त्यांनीं मुद्रणीपर्यंत माझ्या ध्यानींमनींहि आली नाहीं. पुढें लगेच त्या वाक्याचा योग्य अर्थ कळतांच आपण अदमासानें दुसरा अर्थ केला, ती आपली चूक झाली हें लोकमान्यांनीं प्रांजलपणे कबूल केलें. असो.

गुरुवर्य डॉ० भांडारकर यांच्या नांवानें एक रिसर्च इन्स्टिटयूट पुणें येथें स्थापण्याचा उपक्रम आम्हीं केला, त्यावेळीं लोकमान्याचा आगाऊ सल्ला आम्ही घेण्यास विसरलों नाहीं. सरकाराकडून सदर संस्थेस पैशाचा व विशेषतः हस्त-लिखित ग्रंथसंग्रहाचा फायदा मिळावयाचा असल्यामुळें सदरहु संस्थेच्या व्यवस्थेंत सरकारचा अंश जेवढा घेण्याचे आम्हीं ठरविलें होतें तेवढा सरकारास देण्यास लोकमान्यांनीं आपली पूर्ण संमति दर्शविली. सरकारच्या मदतीनें कां होईना जर एकादें चांगलें कार्य घडून येत आहे तर केवळ त्यासाठीं सरकारची मदत घ्यावी लागणार त्यापेक्षां काम न झालें तरी पुरवलें, अशा प्रकारची प्रवृत्ति लोकमान्यांनीं केव्हांहि दाखविली नाहीं. होऊ घातलेल्या संस्थेसंबंधानें अनुकूल लेख केसरींत येऊं देणें कदाचित् संस्थेस विघातक होईल म्हणून प्रथम त्यांनीं संस्थेसबंधानें मौन व्रतच स्वीकारलें होतें. तरी सुद्धां आम्ही विनंति करतांच संस्थेस ५०० रुपये देण्याचें व आणखी आग्रह केल्यावरून ५०० चे १००० रुपये करण्याचें लोकमान्यांनीं आम्हांस आनंदानें अभिवचन दिलें व ते पुरेंहि केलें. संस्थेचा मधला दिवाणखाना पुरा होतांच संस्थेस भेट देण्याकरितां त्यांना आम्हीं पाचारण केलें व संस्थेच्या दिवाणखान्यांत त्यांस बसवून प० वा० डॉ० गुणे यांचे हस्तें त्यांस पुष्पहार अर्पण

केला. त्यावेळीं झालेल्या भाषणांतील २।३ मुद्दे येथें नमूद करण्यासारखे आहेत. भांडारकर इन्स्टिटयूटचे पिछाडीस एक टेंकडी असून तीवर मोठें पठार आहे. संस्था बांधण्यास ती टेंकडीच पसंत करावयास पाहिजे होती असें आपलें मत सांगून लोकमान्य म्हणाले, " फर्ग्युसन कॉलेजच्या इमारतीहि वरती टेकडीवरच बांधाव्या असे आपलें मत होतें; पण त्यावेळीं ते कोणींहि ऐकलें नाहीं. टेंकडीवर असल्यानें समोंवारच्या जगातील पसाऱ्यापेक्षां आपण अधिक उंच आहोंत अशी भावना क्षणोक्षणीं जागृत होते. भूमि व स्वर्ग यांमधील अतर तितकें तोडलें जातें, व उच्च वातावरणांतील शुद्ध हवा सेवावयास सांपडते. आम्हाला सिंहगडावर गेल्याने कामास अधिक स्फूर्ति येते, यांतील रहस्यहि हेंच होय. आपण सृष्टीच्या वर आहोंत अशी भावना तेथे पदोपदीं जागृत होते." आम्हीं लोकमान्यांस पुष्पहार अर्पण केला त्यास उद्देशून ते म्हणाले, " पुष्पहार तुमचेकडून मिळ-ण्याची मीं अपेक्षा केली नव्हती. पुष्पहाराचे प्रसंग इतरत्र पुष्कळ येऊं शकतात." संस्थेस लाभलेल्या जागेसबंधाने ते म्हणाले, " ही जागा तुम्हांस सोईस्कर अशी आहे. ती सर्व माझ्या पूर्ण परिचयाची आहे, कारण या बाजूला मी कांहीं दिवस येऊन राहिलों होतो. एका वेळीं दिवसाढवळ्या खूनदरवड्यांची ही जागा होती, पण आता तुम्ही तिचें रूप पालटून टाकलें आहे. आम्हीं येथें झोंपडींत रहात होतों, तेव्हां पुष्कळांना दरवडेखोरांकडून उपद्रव पोंचला होता, पण आमच्या झोंपडीस मात्र त्यांनीं केव्हांहि उपसर्ग दिला नाहीं."

सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांस ८० वर्षें पूर्ण झालीं, त्या प्रसंगीं जो एक निबधसंग्रह त्यास अर्पण केला गेला, त्यामध्यें लो. टिळकांनीं एक निबंध लिहावा अशी त्यांस विनति केली होती व ती त्यांनीं मोठ्या आनदाने कबूल केली. निबंधास दोन विषय त्यांनीं सुचविले होते. त्यांपैकीं Chaldean and Indian Vedas हा विषय लोकमान्यांच्या आजपर्यंतच्या वेदविषयक संशोधनास धरून असल्यानें व तद्वारां कांहीं अपूर्व सिद्धांत प्रथमच जगापुढे येतील असा विश्वास वाटल्याने आम्हीं पसत केला. प्रस्तुत विषयासंबधाचीं टांचणें एका जीर्ण वहींत कांहीं शाईने व कांहीं पेनसिलीनें लिहिलीं होतीं, तीं काढून दाखवून त्यांपैकीं कांहीं मुद्दे त्यांनीं आम्हांस तोंडानेंच सांगितलें, व ते निदान मला तरी नवीन वाटले. निबंधांत नमूद असलेल्या मुद्द्यांशिवाय १।२ त्यावेळीं लोकमान्यांनीं मला सांगितले होते; पण निश्चित पुराव्याच्या अभावीं त्या केवळ कल्पनाच समजल्या जातील म्हणून त्यांचा उपयोग त्यांनीं निबधांत केला नाहीं. ते मुद्दे येथें नमूद करण्यास आतां हरकत नाहीं. वैदिक धर्मातील विष्णु व लक्ष्मी यांचा संबंध पतिपत्नीप्रमाणे हल्लीं मानलेला असला तरी, खाल्डियन दैवत मर्दुक व आर्यन दैवत विष्णु यांचें मूलतः साम्य असून, जेव्हां वैदिक धर्मात विष्णु व मर्दुक या उभयतांचा समावेश करणें इष्ट वाटलें तेव्हां मर्दुक यास विष्णूची बायको

बनविण्यांत आलें असावें. वास्तविक लक्ष्मी ही स्वतंत्र देवता केव्हांहि नसावी असें लोकमान्यांचें मत झालें होतें. त्याचप्रमाणें 'शिखर' या संस्कृत शब्दाचा संबंध Zigurat या समानार्थक ॲसीरियन शब्दाशीं असावा व देवपूजनाकरितां उच्च देवालयें बांधण्याची कल्पना खाल्डियन धर्मातून आर्यन धर्मात शिरली असावी अशी एक दुसरी कल्पना लोकमान्यानीं त्यावेळीं पुढे मांडली होती. पंजाबांत हल्लीं जे नवीन इमारतींचे अवशेष सांपडूं लागले आहेत त्यावरून या दुसऱ्या कल्पनेंत तथ्य असण्याचा संभव दिसतो.

लोकमान्यांची ' खाल्डियन वेदा 'ची कल्पना आधारास घेऊन व त्या दृष्टीनें अथर्व वेदासंबंधीं प्रचलित मतें आणि वेद आणि अवेस्त यामधील साम्य व विरोध यांचा एक नवीन दृष्टीनें विचार करून मी यानतर कांहीं दिवसांनीं Devas and Asuras या विषयावर एक निबंध पुणें येथील Literary and Philosophical Association समोर वाचिला. त्यावेळीं गुरु॰ डॉ॰ भांडारकर यांची अध्यक्षस्थानीं योजना केली होती. डॉ॰ भांडारकरांनीं अध्यक्ष या नात्यानें या समयीं मुद्दाम लिहून आणलेला Asuras हा निबंध वाचला. हा निबंध पुढें प्रसिद्धहि झालेला आहे. डॉ॰ भांडारकरांच्या निबंधातील व माझ्या निबंधातील विचारसरणी अनेक ठिकाणीं अनपेक्षपणे जुळून आली याबद्दल अध्यक्षानीं संतोष प्रकट केला होता. माझ्या वरील निबधाचा विषय लोकमान्यांपुढे मांडण्याचा प्रसग पुढें कांहीं दिवसांनीं अकल्पितपणें मला लाभला. एके दिवशीं सकाळीं पुण्याहून मुंबईस जाण्यास निघालो असतांना मी गाडींत बसल्यानंतर थोड्या वेळाने मी बसलों होतों त्याच सेकंडक्लासचे डब्यात लोकमान्यहि बसावयास आले. डब्यामध्यें आम्हांशिवाय दुसरे ४।५ च उतारू बसले होते, व लोकमान्य या डब्यांत आहेत ही बातमी आगगाडींतील उतारूवर्गात पसरल्यावर त्यांचें दुरून दर्शन घेण्याकरितां मधून मधून २।४ इसम येत व पांच मिनिटे थांबून जात. याशिवाय आम्हां उभयतांमधील संभाषणांत त्यावेळीं दुसरा कसलाहि व्यत्यय आला नाहीं. माझ्या निबधांतील मुद्दे शांतपणे ऐकून घेतल्यानंतर लोकमान्य म्हणाले, " तुमच्या कल्पनेंत बरेंच तथ्य असावेंसे वाटते, पण अवेस्ता व इष्टकालेख (Caneiform inscription यांचा स्वतः साक्षात् अभ्यास केल्या-शिवाय तुमचे विचार अगोदर प्रसिद्ध करू नका. वास्तविक तुमच्या सारख्या एखाद्या संस्कृतज्ञानें या वाङ्मयाचा पद्धतशीर अभ्यास केल्यास पुष्कळ नवीन शोध लागण्याचा संभव आहे. मला स्वतःला लोकांनीं केलेल्या भाषांतरावरच सर्वस्वीं अवलबून रहावे लागल्यानें पुष्कळ ठिकाणीं माझे मांडणे मला तितक्या जोरानें मांडता आलें नाहीं." पुढें विलायतेंत असतांना लोकमान्यांनीं तेथील प्रसिद्ध ॲसीरियालॉजिस्ट प्रो॰ Pinches यांजकडे आपल्या Chaldean and Indian Vedas या निबंधाची प्रत पाठवून देऊन त्याची तत्संबधीं मुलाखत

घेतली. तिची हकीगत जी त्यांनीं इकडे कळविली त्यावरून असे समजते कीं, प्रोफेसर मजकुरांना निबंधांतील मुद्दे विचारणीय वाटले, पण एखाद्या ॲसीरियालॉजिस्टकडून कधींहि घडून आल्या नसत्या अशा १।२ चुका त्या निबंधांत राहून गेल्यानें निबधाची योग्यता प्रसंगविशेषीं कमी होण्याचा संभव आहे, असें त्यांचे म्हणणें पडलें. ही हकीगत मला मुद्दाम कळविण्यासाठीं लोकमान्यांनीं पत्रद्वारां रवाना केली. त्याचा संबंधहि कदाचित् वरील संभाषणासच अनुलक्षून असेल.

आगगाडींत घडून आलेल्या या मुलाखतीतील २।४ आठवणी मुद्दाम नमूद करण्यासारख्या आहेत. दिवस थंडीचे असून सूर्योदयकालीन गार वारा अगास झोंबत होता. लोकमान्य ज्या बाकावर बसले होते तेथील खिडकी उघडीच होती, व आंत येणारा सोसाट्याचा वारा लोकमान्य उघड्या डोक्यानें बसले असल्यानें त्यांना चांगलाच झोंबला असावा असें मला वाटलें. निदान मला तरी तो तसा झोंबला, व लोकमान्य खिडकी आतां बंद करतील, मग बंद करतील अशी मी आतुरतेनें वाट पाहिली. पण लोकमान्य खिडकीवाटे महाराष्ट्रभूचे दर्शन घेण्यांत व मनन करण्यांत गढून गेले असावेतसे वाटलें. कारण आंत येणाऱ्या वाऱ्याची त्यांनीं मुळींच पर्वा केली नाहीं, व खिडकी शेवटपर्यंत बंदहि केली नाहीं. ज्या करारी पुरुषानें उभ्या आयुष्यांत अनेक तऱ्हेचे कठीण व आणीबाणीचे प्रसंग निर्धावलेल्या धैर्यानें सहन केले त्याला यःकश्चित् वारा तो कसला उपद्रव करणार!

आगगाडींत ३।४ तास एकत्र सहवास लाभल्याने मला लोकमान्यांना अनेक प्रश्न विचारून त्यांचा खुलासा करून घेता आला. त्यावेळीं विलायतेतील लेबरपार्टीची सहानुभूति मिळवून तद्द्वारां हिंदुस्थानच्या राजकीय आकांक्षा पूर्ण करवून घेण्याचा प्रयत्न ऐन जोरांत होता. अशा वेळीं सुद्धां विलायतेतील मजूरवर्गाच्या मदतीवर मी सर्वस्वीं अवलंबून नाहीं. जोंपावेतो एखाद्या पार्टीचा आपणास अनुकूल उपयोग करून घेता येतो तोंपावेतो त्यांचा उपयोग करून घ्यावयाचा; पण अखेर मिळवायाचें ते स्वतःच्या जोरावरच मिळत असतें असे त्यांनीं स्पष्ट बोलून दाखविलें. यावरून लोकमान्यांची दृष्टि चालू क्षणाच्या पुढे नेहमीं धांव घेणारी होती हें मला स्पष्ट समजून आलें. त्यावेळी प्रसिद्ध होणाऱ्या लेखांतून वा व्याख्यानांतून लेबरपार्टीविषयीं अशा प्रकारचा भावी अंधुक अविश्वाससुद्धां उघडपणें कोणीं प्रकट केल्याचें मला माहीत नव्हतें. याच अनुरोधानें, 'बदललेल्या परिस्थितीप्रमाणे तोंडपालट करून झुंज देण्यास उभा राहण्याचें ज्याच्या अंगीं कसब नाहीं त्याला लोकांचें नेतृपद फार वेळ सभाळतां येणार नाहीं' अशा अर्थाचें एक विधान करून त्याच्या समर्थनार्थ दक्षिण महाराष्ट्रांतील एके ठिकाणीं आपल्या सन्मानार्थ भरविल्या जाणाऱ्या जाहीरसभेला आपण हातोहात पानसुपारीच्या समारंभाचे रूप कसें देवविले त्याची हकीगत लोकमान्यांनीं मला सांगितली, व

वी पुष्कळांच्या परिचयाचीहि असेल. पुढें हिंदुस्थानांतील नेटिव्ह खिश्चियन लोकांचा प्रश्न निघाला असतां, 'जोंपावेतों हे लोक खाइस्टला हिंदूंच्या इतर देवांप्रमाणें परमेश्वराचा एक अवतार म्हणून मानावयास तयार होणार नाहींत, व आपला देव आपला धर्म हाच जगांतील एकुलता एक खरा धर्म व इतर सर्व धर्म थोतांड आहे ही भावना सोडणार नाहींत, तोंपावेतों हा समाज आम्हांशीं फटकून वागणार व आमच्या आमच्यांत तटे उपस्थित करून आमच्या हितशत्रूंच्या गळीं उतरणार' असें लोकमान्यांनीं स्पष्ट भाकीत बोलून दाखविलें. हिंदुस्थानच्या भवितव्यतेसंबधानें बोलणें निघालें असतां लोकमान्यांनीं मलाच उलट "तरुण पिढीशीं तुमचाच विशेष निकट संबध आहे, तेव्हां तुम्हांला स्वतःला या संबधांत काय वाटतें ?" असा प्रश्न विचारला. मीं उत्तर दिलें कीं, "निदान मला तरी हल्लींच्या तरुण पिढीसंबंधानें आशा वाटते. आपल्या सद्यःस्थितीबद्दलची त्यांची जाणीव वाढत आहे व आपण कांहीं तरी स्वार्थत्यागपूर्वक देशकार्य करावें असें बऱ्याच जणांस मनःपूर्वक वाटत असतें. अर्थात् आपल्यापुढें सोडवावयाचे प्रश्न किती बिकट आहेत याची खरी कल्पना पुष्कळांस नसल्यामुळे व बहुतेकजण कांहीं तरी तुरुतदान करून मोठें पुण्य व मोठें नांव मिळविण्यास हपापलेले असल्यामुळें त्यांच्या संबधानें 'गर्जेल तें पडेल काय' ही म्हण जरी खरी होणारी असली तरी चार वर्षांच्या कॉलेजच्या पिढींत निदान २।३ तरी तरुण मला बहुधा असे आढळतात कीं, त्यांच्या भावी कर्तबगारीबद्दल—मग ती कोणत्या का क्षेत्रांत असेना—मला मोठी उमेद वाटते." लोकमान्यांनीं उत्तर केले, "तुम्हांस भावी पिढीबद्दल एवढी आशा वाटते ही समाधानाची गोष्ट आहे. मी स्वतः आशावादी नसून प्रयत्नवादी आहें. भोंवतालची परिस्थिति कितीहि बिकट असली तरी आपल्या हातून होईल तें व आपणास पचेल ते कांहींना कांहीं तरी आपण नेहमीं करीत असावें. मग त्याचा परिणाम केवढा का क्षुद्र होईना. मी राजकारणांत शिरलों त्या वेळची परिस्थिति व आजची परिस्थिति यांत पुष्कळच फरक पडला आहे. पण एवढा फरक एवढ्या अवधींत घडवून आणू असें त्यावेळीं आमच्यापैकीं एकाच्याहि स्वप्नीं आलें नसते, व या घडून आलेल्या फरकाबद्दलचें श्रेयहि पण त्यापैकीं कोणा एकाच्याच पदरांत बांधणें हेहि न्यायाचें होणार नाहीं. आपण मिळविले हे अत्यल्प आहे. आपणास केवढा तरी पल्ला अद्याप गांठावयाचा आहे. पण पुढील कार्याच्या प्रचंडतेमुळें धीर खचून देणें व निराशेनें कांहींहि न करणें यानें आपलें काय हित साधणार ? गीतेंतील कर्मयोगाचें, भगवंताचें अधिष्ठान असलेल्या कर्मयोगाचे, खरे कार्य तें याच प्रसंगीं दिसून येणार." वरील अवतरण—चिन्हांतर्गत शब्दच लोकमान्यांनीं या समयीं वापरले असतील अशी ग्वाही इतक्या अवधीनतर देणें अशक्य असलें तरी त्यांच्या म्हणण्याचा एकंदर भावार्थ वरील प्रकारचा निःसंशय होता, व त्यावरून लोकमान्यांचें राजकारण

उतावळें व तडकाफडकीचें नसून ते अत्यंत खोल व भावनाप्रधान होते .हे मला प्रथमच स्पष्टपणें दिसून आलें.

आणखी एका प्रसंगीं लोकमान्यांच्या Arctic Home theory संबंधानें बोलणें निघाले असतां ' सदर ग्रंथाची दुसरी आवृत्ति काढण्याची माझी फार इच्छा आहे. पण तत्पूर्वी Scandinavian mythology वरील कांहीं अलीकडे प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांचा अभ्यास केला पाहिजे' असें सांगून तशा १।२ पुस्तकांचीं नांवेंहि त्यांनीं सुचविलीं. " सिंहगडास तुम्ही १ महिना आल्यास या विषयाची चर्चा करून काय काय फरक दुसऱ्या आवृत्तीकरिता करावे लागतील ते आपण ठरवूं." असें म्हणून मला लोकमान्यांनीं पुढील उन्हाळ्याच्या सुट्टींत सिंहगडास येऊन राहण्यास बोलाविले. परंतु एवढी मोठी कामगिरी मला देऊं करून लोकमान्य जरी माझा गौरव करूं इच्छित होते तरी माझ्या तद्विषयक अपात्रतेची मला अंतर्गी जाणीव असल्यामुळें त्या प्रसंगीं तरी त्या निमंत्रणाचा मला स्वीकार करतां आला नाहीं, व पुढे ही गोष्ट एकदां मागे पडली ती कायमचीच पडली. वेदांचा आरंभकाळ हजारो वर्षें मागे नेला तरी तो काल व त्यानंतर ज्या काला-संबंधानें आपणास थोडी तरी निश्चित माहिती देतां येते तो काल यांच्या मधील २।३ हजार वर्षांच्या दीर्घ अवधींत काय होत होते याबद्दल जोपावेतो आपणास अंधुक कल्पनाहि करून देणें शक्य होत नाहीं तोपावेतो एवढ्या मोठ्या कालाची खैरात वाटण्यास कोणीहि चिकित्सक विद्वान् तयार होणार नाहीं. व म्हणूनच Arctic Home च्या दुसऱ्या आवृत्तींत वैदिक व वेदपाश्चात्कालीन वाङ्मयाचा सगतवार इतिहास देणे जरूर आहे असें मी सुचविले होते, व त्यास लोकमान्यांनीं रुकारहि दिला होता; पण या सर्व गोष्टी आतां केवळ ' झाल्या असत्या ' या सदरांतच नमूद करावयाच्या आहेत.

वरील सदरांतच समाविष्ट करावयाची दुसरी एक गोष्ट म्हणजे वेदांग ज्योतिषावर तयार केलेला लोकमान्यांचा सुप्रसिद्ध निबंध ही होय. सदरहु निबंधाची लेखी प्रत जवळ जवळ तयार होती. पण एक दोन श्लोकांचा अर्थ लावतांना पाठ बदल करणे जरूर वाटत असल्यामुळे लोकमान्य थोडे साशंक होते. कांहीं जुन्या वेदांग ज्योतिषाच्या पोथ्यांचे पाठ तुलना करून तरी पहावे असे ठरवून सदर ग्रंथाच्या १०।१२ पोथ्यांचें Collation प्रथम लोकमान्यांनीं करवून घेतलें. पण त्यानें सर्व काम भागेना. तयार असलेला निबंधच नुसता प्रसिद्ध करण्याचे ऐवजीं लोकमान्यांनीं वेदांग ज्योतिषाची भाषांतर व टिपणी देऊन एक आवृत्तीच काढावी असें मी सुचविले, व ही आवृत्ति भांडारकर इन्स्टिट्यूटमार्फत प्रसिद्ध करण्यासहि लोकमान्यांनीं आपली संमति दिली. तयार असलेली साधनसामग्री एकदां तपासून व्यवस्थितपणें मांडण्यास लोकमान्यांस ४।८ दिवसांची फुरसत मिळावयास पाहिजे होती; पण शेवटच्या दिवसांमध्यें त्यांचेमागें कामाचा एवढा

लकडा लागून राहिला होता कीं, वरील महत्त्वाच्या कामासाठींहि त्यांना जरूर तो अवधि मिळाला नाहीं, व वेदकालावर नवीन प्रकाश ज्या ग्रंथाच्या योगानें निःसंशय पडला असता असा हा ग्रंथहि अप्रसिद्ध स्थितींतच शेवटपर्यंत राहिला.

छापण्याच्या कलेंत दिवसानुदिवस घडून येत असणाऱ्या सुधारणांसंबधाने बोलणें निघालें असतां लोकमान्य म्हणाले, " अहो, अशा या सुधारणा व्हावयाच्यांच—झाल्याच पाहिजेत. पण आजचें काम उद्यां होणाऱ्या सुधारणेसाठीं खोळबून तसेंच ठेवतां येणार आहे ? आम्हीं छापखाना प्रथम मांडिला तेव्हां एडिटरची साधनसामग्री म्हणजे बसावयास घातलेली सतरंजी व लिहावयास कागद ठेवण्याकरितां बिछान्याची केलेली वळकटी, एक बरूची लेखणी व एक पैशाची चिनीमातीची दऊत !"

लोकमान्यांशीं बोलतांना मराठी वाक्यांत मध्येंच इंग्रजी शब्द येऊ नयेत याबद्दल मी दक्षता ठेवीत असतांनाहि तसे शब्द प्रसगविशेषीं येत. त्याबद्दल मीं दिलगिरी दाखविली असतांना लोकमान्य म्हणाले, " हा परिस्थितीचा दोष आहे. जर एखादा इंग्रजी शब्द इंग्रजी स्वरूपातच आरंभापासून आपणास परिचयाचा असेल—उदाहरणार्थ, स्टेशन—तर त्याबद्दल दुसरा शब्द सुचणार कसा ? असे शब्द आम्ही केसरींत जसेच्या तसेच घेतों, पण दुसरे कांहीं शब्द—उदाहरणार्थ, सनदशीर, नोकरशाही, वगैरे—आम्हीं वेळींच तयार करून त्यांचा प्रचार करवितों. केसरीनें असे ५०।६० वर शब्द प्रचारांत आणलेले आहेत. तथापि प्रयत्न केल्यास भेंडगुजरी भाषा आपणांस अजीबात टाळतां येईल. निदान तिचें केव्हां केव्हां दृष्टोत्पत्तीस येणारें हास्यास्पद स्वरूप तरी टाळता यावें."

प्रचलित राजकारणातील एका बाबीची चर्चा चालली असतांना त्या विषयांचा मी विशेष अभ्यास करीत नाहीं असें लोकमान्यांच्या दृष्टोत्पत्तीस आल्यावर ते म्हणाले, " तुम्ही सरळ एकाच मार्गानें जातां हें कांहीं वाईट नाहीं. आम्हाला स्वतःला राजकारणापेक्षां शाळेंत शिकविणेंच जास्त आवडत असे. पण परिस्थितीच्या ओघामुळें आम्हास राजकारण पत्करावें लागलें. त्यांतून स्वतःस मोकळे करून घेण्याची आमची धडपड चालूच असते; पण यश मिळत नाहीं. शेवटीं सरकारच कृपा करून आमच्या मदतीस येतें व आम्हांस येरवड्यांत अथवा ब्रह्मदेशांत नेऊन ठेवितें, आणि तेव्हा कोठें आम्हास अध्ययनास मुबलक वेळ मिळतो !"

बंगाल्यातील एक आर्यसमाजिष्ट शास्त्री श्रीउमेशचंद्र विद्यारत्न पुण्यास आले होते व लोकमान्यांच्याच घरीं उतरले होते. त्यांच्या मनातून पुण्यातील शास्त्रीमंडळीपुढें संस्कृतांत एक व्याख्यान द्यावयाचें आलें. पुण्यास त्यावेळीं 'संस्कृत वाग्व्यवहारवर्धिनी' नामक सभा होती. तिच्या विद्यमाने बाबू महाशयाचें व्याख्यान ठरलें. पण विद्यारत्नांच्या मतांची लोकमान्यांस अगोदरच माहिती असल्यानें सभेंत कदाचित् अतिप्रसंग होईल अशी त्यांस भीति वाटली, व म्हणून

सदर व्याख्यानप्रसंगीं मुद्दाम हजर राहण्याविषयीं लोकमान्यांनीं मला निरोप पाठविला. व्याख्यानाचा रागरंग पहातां लोकमान्यांची भीति निराधार नव्हती, अशी माझी खात्री झाली. सदस्यांच्या चांगुलपणामुळे व सहनशीलतेमुळें सभा निर्विघ्न पार पडली हे समजतांच लोकमान्यांस समाधान झालेसें दिसले. सदर शास्त्रीनीं आपल्या एका पुस्तकांत लोकमान्यांच्या Arctic Home Theory विरुद्ध बरेच लिहिलें होतें, व तसाच प्रकार दुसऱ्या एका छोटेखानी इंग्रजी पुस्तकांत एका हिंदी विद्यार्थ्यानें केला होता; पण अशा वाह्यात चर्चेकडे लोकमान्य कधींहि सहसा लक्ष देत नसत. A missing Sāmkhyakarika या निबंधाबद्दल सुद्धां अशीच एक गोष्ट घडून आली. एका टीकाकारानें पदरचे एक दोन शब्द घालून व शब्दांचा क्रम बदलून लोकमान्यांनीं तयार केली होती त्यापेक्षां जास्त सरस आर्या करून त्यांचेकडे अभिप्रायार्थ पाठवून दिली होती; पण येथे अर्थात् कारिकेच्या सरसनिरसतेचा प्रश्न नसून गौडपादटीकेतील प्रतीकांवरून कोणती आर्या जुळवितां येते हा मुख्य प्रश्न होता. लोकमान्यांनीं वरील टीकाकारास उत्तर पाठविले नाहीं हे सांगावयास नकोच.

मंडालेच्या तुरुंगात वाचण्याकरितां नेलेलीं पुस्तके गायकवाडवाड्यांत एका स्वतंत्र कपाटांतच व अलगच ठेवलीं होतीं. लोकमान्याचा ग्रंथसंग्रह पाहण्याची इच्छा दर्शविल्यावरून एक दिवस लोकमान्यानी स्वतः उठून सर्व ग्रंथसंग्रह आम्हांस दाखविला, व त्यानंतरहि त्यांच्या ग्रंथसंग्रहापैकीं एकादें पुस्तक मी मागितल्यास स्वतः उठून तें पुस्तक असेल तेथून आणून हातांत देत. दुसऱ्या कोणास सांगून असलीं कामें करवून घेण्यास ते सहसा नाखूष असत. या त्यांच्या संवयीसंबंधाने बोलणें निघाले असतां लोकमान्य म्हणाले, " एक तर अमुक एक पुस्तक अमुक ठिकाणचें असे दुसऱ्यास नीट समजावून सांगण्याचा त्रास; शिवाय सांगितलेली गोष्ट नीट ध्यानांत न आल्याने हटकून घडून येणारी चूक, व योग्य ते बूक हातीं आणून दिले तरी तें शोधीत असतां इतर पुस्तकांची उलटापालट झाली किंवा कसे याबद्दलची अनिश्चितता. त्यापेक्षा स्वतःच झटकन उठून काम केलेलें काय वाईट ! "

एखादा गृहस्थ आपणास भेटावयास आला असतां त्यास अगत्याने परतभेट देण्याची चाल जशी युरोपांत तशी आपल्याकडेहि आहे. मी लोकमान्यांच्या दर्शनास गायकवाडवाड्यांत गेल्यानंतर अशा परतभेटीचा एक प्रसंग अनायासे साधून आला व तो लोकमान्यांनीं दवडिला नाहीं, ही विशेष लक्षांत घेण्यासारखी गोष्ट मला वाटली. शनवार पेठेत एका चाळींत त्यावेळीं लोकमान्यांचे स्नेही ना. उपासनी रहात होते व मीहि त्याच चाळींत भाड्याने रहात होतो. उपासनी यांच्याशीं करावयाचें तें काम झाल्यावर लोकमान्य दोन मिनिटे मुद्दाम माझ्या बिऱ्हाडी आले व त्यावेळीं विशेष बोलणेचालणें जरी झाले नाहीं तरी अशा रीतीने

मजवर अनुग्रह करण्याची लोकमान्यांस इच्छा झाली याचेंच मला विशेष कौतुक वाटलें.

याशिवाय लोकमान्यांच्या भेटीचे आणखी २।४ प्रसंग मला आठवतात, पण त्यांची नुसती जत्री देणें हा ' आठवणी ' प्रसिद्ध करण्याचा मुख्य उद्देश केव्हांहि असू शकत नाहीं. आठवणीमध्यें ज्याची आठवण द्यावयाची त्याच्या स्वभावाचें एकादें विशेष अंग दिसून आले पाहिजे तरच स्वतःस महत्त्व देण्याचा आरोप स्वीकारूनहि ती प्रसिद्ध केल्याचा उपयोग. शेवटीं या आठवणींना पुनः उजाळा देण्याचें माग पाडून तेवढा वेळ लोकमान्यांच्या पुण्यस्मरणांत घालविण्याची संधि दिल्याबद्दल आठवणीकारांचे मनापासून आभार मानून येथेंच हात आटोपता घ्यावा हें बरें.

---

## सौ. मथूबाई साने.

(लोकमान्यांची कनिष्ठ कन्या, यांना माहेरीं ' आक्का ' म्हणतात.
डॉ. श्रीरंग मोरेश्वर साने, पी. एच्. डी. (बर्लिन) प्रोफेसर
सायन्स कॉलेज लखनौ, यांच्या पत्नी)

(१) दादांचा बहुतेक वेळ राजकारणांत जात असे त्यामुळें संसारी माणसाप्रमाणें घरांतील मंडळींशीं बोलण्यास त्यांना वेळच नसे. परंतु तसा वेळ सांपडे तेव्हां त्यांच्या प्रेमळ व विनोदी स्वभावाचा अनुभव आम्हा मुलींना येत असे. स्त्री-शिक्षण हें त्यांचें कार्यक्षेत्र नव्हतें म्हणून किंवा राजकाणाइतकें महत्त्व ते ह्या विषयास देत नव्हते म्हणून त्यांनीं ह्या बाबतींत सरळ सोपा म्हणजे—प्राथमिक शिक्षण देऊन मुलींचीं लग्नें करून देणें हा—मार्ग पत्करिला होता. परंतु ' बायकांची बुद्धि चुलीपुरती ' अशा प्रकारची स्त्रियांच्याबद्दल अनुदारपणाची त्यांची वृत्ति नसल्यामुळें आमच्याशीं निरनिराळ्या विषयांवर बोलून पुष्कळ गोष्टी ते आम्हाला समजून सांगत. आणि अशा तऱ्हेनें आम्हाला ज्ञान मिळविण्यास उत्तेजन देत. ते ज्या राजकीय चळवळी करीत त्याबद्दलहि ते बोलतां बोलतां माहिती सांगत. महाभारत, मनुस्मृति वगैरे जुन्या वाङ्मयांतील गोष्टीच ते फार सांगत. हे सर्व सांगतांना त्या त्या गोष्टीशीं त्यांचें इतकें तादात्म्य होई कीं, ऐकणाऱ्याच्या मनावर त्याचा ठसा कायमचा उमटे. स्त्रियांचीं कर्तव्ये सांगतांना ते नेहमीं मनुस्मृतींतील ' उत्पादनमपत्यस्य जातस्य परिपालनं ' ह्या श्लोकाचा उल्लेख करीत. परंतु

हीं कर्तव्यें सोडून किंवा करून पुरुषांच्या समजल्या जाणाऱ्या कार्यक्षेत्रांत ज्यांनीं कांहीं कर्तबगारी करून दाखविली आहे अशा स्त्रियांबद्दल ते आदरानेंच बोलत.

(२) राजकीय गोष्टीबद्दल नेहेमीं वाचन, लेखन व विचार चालूं असल्यामुळे विनोदांतहि त्याचेंच प्रतिबिंब दिसून येई. लग्न होण्यापूर्वी ते मला नेहेमीं थट्टेनें म्हणत " तुला बेझटबाई व्हावयाचें आहे काय ? म्हणजे लग्नविघ्न करीत नाहीं." कधीं कधीं ते आम्हाला विचारीत 'तुमच्या घरांत तुम्हाला होमरूल मिळाला आहे काय ?' माझ्या बहिणीची एक लहान मुलगी होती, ती नेहेमीं तिच्यामागें असे. ती कधीं दिसली नाहीं म्हणजे ते विचारीत " आज तुझे होडके कोठें आहे ?" व मग आपणच सांगत कीं, "मोठ्या गलबताबरोबर नेहेमीं एक लहान होडी असते तशी तुझी मुलगी आहे."

(३) सकाळीं चहा घेतांना ते टपाल पाहात आणि त्यावेळीं सर्वांशीं कांहींतरी विनोदानें बोलत असत. त्यांच्यावर मोठीं संकटें आलेलीं होतीं व अनेक तऱ्हेची काळजी त्यांच्या मागें असे. अशा वेळीं सुद्धां घरांत ते त्रासलेले किंवा रागावलेले क्वचितच दिसत. १९०८ च्या सुरतेच्या कांग्रेसच्या आधीं व नंतर नेमस्त व जहाल पत्रांतून बरीच शिवीगाळी चालू होती. त्या वेळीं एके दिवशीं चहा घेतांना ते म्हणाले " तुम्ही सर्व चहाबरोबर कांहींना कांहीं खात असतां, पण मी काय खातो सांगा पाहू ! ' ते चहाबरोबर कधीं कांहींच खात नसल्यामुळें आम्हीं म्हटलें ' तुम्ही तर कांहींच खात नाहीं. ' त्यावर ते हंसून म्हणाले " मी रोज ताज्या शिव्या खात असतो. ! "

(४) प्रत्येक मनुष्याने आपल्या वाट्यास जें काम आलेले असेल ते चांगल्या रीतीने बजावावें, असा त्यांचा उपदेश असे. घरांत स्वयंपाक आचाऱ्याने वाईट केला म्हणजे ते म्हणत "विलायतेतल्याप्रमाणें इकडेहि स्वैपाक्यांच्या शाळा असल्या तर बरें होईल." त्यांच्याकडे शेंकडो विद्यार्थी देशकार्य करण्याच्या हेतूने काय काम करावे हें विचारण्यास येत आणि प्रत्येकाचा कल पाहून ते योग्य सल्लाहि देत. कोणाचें शिक्षण अर्धवट झालेले असेल तर नेहेमीं शिक्षण पुरें झाल्यावर या असें सांगत. परंतु सामान्य उपदेश करतांना मी त्यांना असे सांगतांना ऐकलें आहे कीं, " सर्वच मनुष्यांना मी करितों हेंच काम करितां येईल असे नाहीं. तुम्ही काय पाहिजे ते काम करा, पण जें कराल त्यांत पूर्ण लक्ष घाला. तुम्ही जोड्याचे दुकान काढलें तरी हरकत नाहीं. पण अशी महत्त्वाकांक्षा बाळगा कीं, अमक्याच्या दुकानचा जोडा ना ? फार उत्तम असतो, असे लोकांनीं म्हणावें. !"

(५) त्यांची राहणी अत्यंत साधी होती तरी व्यवस्थेशीरपणाची त्यांस आवड होती. आणि साधेपणा म्हणजे केवळ आपल्या गरजा कमी करणे नव्हे तर आपलें मन ह्या संवयींच्या ताब्यांत न जाऊं देणें असे ते म्हणत. मंडालेहून परत आल्यानंतर मधुमेहाचें दुखणें ज्यास्त झाल्यामुळें साखर व नेहेमींच्या जेवणांतील भात

वगैरे पदार्थ त्यांस अगदीं वर्ज करावे लागले. परंतु हे कडक पथ्य त्यांनीं एकदम सुरू केलें आणि वर्ज्य असणाऱ्या पदार्थांपैकीं एखादा पदार्थ थोडासाहि खाण्याची त्यांनीं कधीं इच्छा दर्शविली नाहीं. पथ्याचे पदार्थच ते मोठ्या चवीनें खात असत आणि आम्ही कोणी एखादे वेळेस म्हटलें कीं, 'दादा, हें तुम्हाला चागलें कसे लागतें.' म्हणजे ते म्हणत "तुम्ही खाण्याकरितां जगतां आणि मी जगण्याकरिता खातो.' आणि तें खरेंच होतें. कारण जिभेवर इतका ताबा नसता तर आयुष्याच्या शेवटच्या दहा वर्षांतील कार्यें करणें त्यांना जवळजवळ अशक्यच झालें असतें.

---

## केशव लक्ष्मण दप्तरी

[ बी. ए. एल्एल्. बी. वकील, करणकल्पलता ह्या ज्योतिषविषयक ग्रंथाचे कर्ते, नागपूर ]

(१) इ. स. १९१४ च्या नोव्हेंबरच्या अखेरीस दोन किंवा तीन दिवस मी, डॉ. मुंजे व श्री. दादासाहेब खापर्डे लोकमान्यांच्या वाड्यांतच उतरलों होतों. तेव्हां लोकमान्यांशीं माझा थोडासा सहवास झाला. त्यावेळीं एके दिवशीं रात्रीं निजण्याच्या सुमारास आमच्याकडे ते येऊन बसले तेव्हां कांहीं गोष्टी झाल्या. त्यांच्या डोक्यावर मधुमेहामुळें फोड वारंवार होत असत. ते फोड ते कोणतेसें आसिड लावून जाळून टाकीत व त्याचे काळे डाग त्यांच्या डोक्यावर होते. ते पाहून डॉ. मुंजे ह्यांनीं 'त्या आसिडानें वेदना फार असह्य होतात व आपण त्या कशा सहन करू शकतां?' असा प्रश्न केला. त्यावर त्यांनीं फार शांतपणें उत्तर दिलें कीं, "एकदां ती गोष्ट करावयाची असें ठरलें म्हणजे ती सहन केलीच पाहिजे." ह्याच बैठकीस मी आपल्या "महाभारतीययुद्धकालनिर्णयाची" हस्तलिखित प्रत वाचण्याकरितां त्यांना दिली. ती त्यांनीं तेव्हांच कांहीं कांहीं ठिकाणीं वाचून पाहिली. तेव्हां ऋग्वेदांग ज्योतिषातील "दिनत्यजः" ह्याच्या मीं केलेल्या अर्थाकडे त्यांचें लक्ष गेलें. त्यावरून त्यांनीं वेदांगज्योतिषांतील कांहीं श्लोकांचे अर्थ लाविले होते, त्याविषयीं विशेषतः "ऊन" म्हणजे भागाकार करून राहिलेले शेष असा अर्थ तेथें फार चांगला जुळतो असें त्यांनीं सांगितलें. दुसऱ्या दिवशीं मला आपस्तंब धर्मसूत्राचें पुस्तक पाहिजे होतें ते त्यांनीं ७५–८० आलमाऱ्यांपैकीं कोणत्या आलमाऱ्यात व कोणत्या नंबरावर आहे तें पुस्तकाच्या यादींत पाहिल्याशिवायच एकदम जाऊन फारच थोड्या वेळांत आणून दिलें. तें

पाहून त्यांच्या ग्रंथसंग्रहपरिचयाचें मला फार आश्चर्य वाटलें. भारतीय युद्ध शकापूर्वी १२७५३ ह्या वर्षी झाले असें त्यांचे (माझ्या मताप्रमाणें) मत होतें, हे माझ्या महाभारतीय-युद्धकालनिर्णयावर त्यांनीं जो अभिप्राय दिला त्यावरून दिसेल. तो अभिप्राय त्यांनीं डॉ. मुंजे ह्यांस पाठविलेल्या पत्रांत पुढीलप्रमाणे दिला आहे.

*Yavat*, 1-9-1915.

MY DEAR MUNJE,

I have read and reread Mr. Daftari's mss Essay. The conclusion is in my opinion sound. But I don't agree with certain suggestions by which he tries to explain away the texts contrary to his view.

Yours sincerely,
BAL GANGADHAR TILAK,

(२) करणग्रंथाच्या चर्चेकरितां मला लोकमान्यांनीं बोलविल्यावरून मी पुण्यास गेलों व लोकमान्यांच्या घरींच जून १९२० मध्ये ८-१० दिवस राहिलो. तेथें असतांना माझा बहुतेक वेळ करणग्रंथासबंधीं प्रो. नाईक वगैरेंशीं चर्चा करण्यांत गेला. त्यांतील मुख्य प्रसगीं लोकमान्य हजर असत. त्यांना फुरसत फार थोडी मिळे, त्यामुळे त्यांचे माझे इतर गोष्टींसबधानें बोलण्याचे प्रसग फार थोडे आले. एका प्रसंगीं हिंदुस्थानच्या ऐतिहासिक गोष्टीच्या कालव्यवस्थेविषयीं ( Indian Chronology ) बोलत असतां अशा ह्या शुष्क विषयांत आपण आपला वेळ विनाकारण दवडतो अशी टीका कित्येक लोक आपणांवर करतात असे मी त्यांना सांगितले. तेव्हां ते मोठ्या आवेशानें म्हणाले, " अशा लोकांना नाटके किंवा तमाशे पाहण्यांत, गजिफा खेळण्यांत किंवा गप्पा सांगण्यांत जितका आनंद होतो तितकाच आनंद आम्हांस ह्या विषयांत होतो." दुसऱ्या कोणत्या तरी प्रसंगीं " हिंदु ग्रीकांपासून गणित-ज्योतिष शिकले किंवा ग्रीक हिंदूंपासून गणित ज्योतिष शिकले ह्याविषयी बोलणें निघालें असतां Ancient Calendars and Constellations by E. M. Plunkett part I page 97 येथील पुढील उतारा त्यांनीं मला दाखविला. " Again the opinion of the Greek-writers at the beginning of our era may be quoted as showing the high estimation in which at the time of the world Indian Astronomy was held; as for instance in the life of Appollonius of Tyana ( written about 210 A. D. by blulostratus ) The wisdom and learning of Appollonius are set high above those of all his contemporaries, but from the sages of India, he is represented as learning many things especially matters of astronomy. "

(३) एकदां मुंबईच्या ज्योतिष-परिषदेंत वर्षमान सूर्यसिद्धांताचेंच घ्यावें हा व पुण्याच्या ज्योतिषपरिषदेंत अयनांश २२ घ्यावें हा, हे दोनहि सिद्धांत अपसिद्धांत असूनहि आपण कसे मान्य केले असें मीं त्यांना विचारलें. तेव्हां "जुने सोडून नवीन स्वीकारण्याची जी प्रवृत्ति त्या ठरावांत होती तिला उत्तेजन देण्याकरितां" असें त्यांनीं उत्तर दिलें. 'नवीन जरी चूक असलें तरी कालांतरानें दुरुस्ती होईलच अशी मला खात्री होती' असेंहि ते म्हणाले.

(४) नागपुरास परत येण्याच्या वेळीं मला निरोप देतांना करणग्रंथ तयार झालाच पाहिजे, ह्याविषयीं त्यांनीं फार आतुरता दाखविली आणि करणग्रंथ कसा असावा ह्याविषयींहि मला त्यांनीं कांहीं सूचना केल्या. 'मीहि आपणास पाहिजे तसा करणग्रंथ करून देतों, आपण निश्चिंत असावें' असें आश्वासन दिलें.

---

## मोतिराम बालकृष्ण वेलकर.

[ एल्. एम्. ॲन्ड एस्., डॉक्टर, १९१९ च्या विलायतेंतील डेप्युटेशनचे एक सभासद, आमदार, मुंबई. ]

लोकमान्य टिळकांची हिंदुस्थानच्या राजकारणांत वर्तमानपत्राच्या द्वारें अथवा व्यासपीठावरून जी कामगिरी झाली, ती विध्वंसक स्वरूपाची झाली. परंतु विधायक कामगिरीला टिळकांची मनोरचना अनुकूल नव्हती, असा जो आरोप लोकमान्यांवर नेहमीं करण्यांत येतो, त्यासंबंधीं त्यांची मनोरचना कशा प्रकारची होती हें जर कोणाला पहावयाचें असेल तर आपल्या स्नेह्यापाशीं खाजगी संभाषणांत, टिळकांनीं काढलेल्या उद्गारांचा बराचसा उपयोग होईल. १९१९ सालांत विलायतेंत मॅंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणासंबंधीं पार्लमेंटरी जॉइंट कमिटीसमोर हिंदी शिष्टमंडळांच्या साक्षी चालल्या असतांना त्यासंबंधानें घरीं बोलत असतांना टिळक म्हणाले:—

"स्वराज्याचे अधिकार प्राप्त झाल्यानंतर आपल्याला ज्या कांहीं बाबींची सुधारणा आणि पुनर्घटना घडवून आणावी लागेल त्या बाबींबरोबरच आपल्या वर्तमानपत्रांची सुद्धां सुधारणा व पुनर्घटना केली पाहिजे. लोकशिक्षणाचें काम करण्याकरितां वर्तमानपत्रें अत्यंत स्वस्त दरानें लोकांच्या हातीं पडलीं पाहिजेत. अत्यंत गरीब लोकांना सुद्धां वर्तमानपत्र विकत घेतां आल्यास लोकशिक्षणाचें काम सहज झपाट्यानें होत जातें. म्हणूनच "डेली न्यूज" पत्राचा दररोजचा

-खप हृा लक्षांवर आहे, आणि ' संडे पिक्टोरीअल् ' चा वीस लाखावर आहे. आतां मॅाटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणानंतर हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेतील पुनर्घटनेच्या काळाला सुरवात होणार, तेव्हां आपलीं वर्तमानपत्रेंसुद्धां त्याच धर्तीवर चाललीं पाहिजेत. आतां वर्तमानपत्रांनीं प्रचलित राज्यपद्धतीवर फक्त टीकात्मक लेख लिहून चालावयाचें नाहीं. तर आतां राज्यव्यवस्थेच्या विधायक कार्याकडे देखील आपल्या वर्तमानपत्रांनीं लक्ष दिलें पाहिजे. पुनर्घटनेच्या-Reconstruction च्या-बाबींमध्यें लोकांना शिक्षण देण्यासाठीं वर्तमानपत्रें चालविण्याच्या पद्धतींत आपणास सुधारणा घडवून आणिली पाहिजे. प्राथमिक शिक्षणप्रसाराचा विचार करितांना लोकशिक्षणाचें एक मुख्य साधन या दृष्टीनें मी वर्तमानपत्रावरील पोष्टाचा खर्च कमी करण्याचा प्रयत्न करीन कीं, जेणेंकरून हिंदुस्थानांतील दूरच्या कोपऱ्यांतील खेडवळ मनुष्याला तें पत्र पोष्टखर्च धरून सुद्धां अगदीं अल्प किमतींत विकत घेतां येईल."

समाषणाच्या ओघांत ते वैद्यकीय शिक्षणाकडे वळले आणि म्हणाले,"स्वराज्य मिळाल्यावर मी ठिकठिकाणीं प्रयोगशाळा उघडीन आणि त्या ठिकाणीं आपल्या देशांतील औषधी आणि वनस्पतींच्या संशोधाचें काम सुरू करीन. आर्थिक दृष्टयासुद्धां ह्या गोष्टीकडे आपण लक्ष दिले पाहिजे. परदेशी औषधें विकत घेण्याकडे जे लाखों रुपये आपल्या देशांतून परकीय देशांत जातात त्याची बचत होईल. माझें कांहीं असें म्हणणें नाहीं कीं, That you must not advance with Science. It would be futile to stick to the old theme of वात, पित्त, कफ, but it is equally necessary to study the actions of our Indian preparations after the western laboratory methods. वैद्यकीय शास्त्रांत पाश्चात्य देशांत जी झपाट्यानें प्रगति होत आहे, ती आपण लक्षांत घेतली पाहिजे. नुसतें वात, पित्त आणि कफ या जुन्या कल्पनांना चिटकून चालणार नाहीं. पाश्चात्य प्रयोगशाळेतील प्रयोगाच्या धर्तीवर आपल्या आर्य औषधीसंबंधानें प्रयोग करून त्याचे परिणाम काय होतात याचा अभ्यास व्हावयाला पाहिजे."

जनतेमध्यें राष्ट्रीय जागृति करण्याचें एक साधन म्हटलें म्हणजे वक्तृत्वकला ही होय. या कलेंतल्या खाचाखोंचा टिळकांना पूर्णपणें अवगत होत्या. ग्लासगो येथील मजुरांच्या संघापुढें टिळकांचीं व माझीं दोघांचीं भाषणें झालीं. सभा विसर्जन झाल्यानंतर घरीं येतांना वक्तृत्वकलेसंबंधानें टिळक म्हणाले:—"तुमचें कोणतेंही भाषण परिणामकारक व्हावें अशी जर तुमची इच्छा असेल तर तुमचा उत्तम गोळीबार ( Best shots ) भाषणाच्या शेवटीं राखून ठेवा. सुरवातीलाच तो खपवून टाकूं नका. श्रोता आणि वक्ता यांचा नेहेमीं एकमेकांवर आघात आणि प्रत्याघात होत असतो. बहुसंख्यांक श्रोतृसमाज

पाहून वक्त्याला स्फुरण चढत असतें. भाषण करितांना प्रतिपक्षाची बाजू त्यांच्या दृष्टीने मांडण्याचा प्रथम प्रयत्न करा. त्यांच्याच मुद्यांचे मुद्दाम औडंबर माजवा. नतर टीकेचा भडिमार करून प्रतिपक्षाच्या मुद्यांचा फोलपणा लोकांच्या नजरेस आणा म्हणजे यश तुम्हाला ठेवलेलेंच. मी माझीं भाषणें अगोदर तयार करून ठेवीत नाहीं. लोकांची मनस्थिति पाहून मी भाषणास सुरुवात करितों. प्रतिपक्षाकडील अगदीं गचाळ असे मुद्दे घेऊन ते निरुत्तर आहेत असें क्षणभर लोकांना भासविण्याचा मी मुद्दाम प्रयत्न करितों. आणि नतर मुद्देसूद कोटिक्रमानें त्या गचाळ मुद्यांचा सहज लीलेनें धुव्वा उडवून टाकितो. ह्यामुळेंच माझीं भाषणें अत्यत परिणामकारक होत असतात. लीडर पत्राचे सपादक मि. सी. वाय. चिंतामणी मला नेहेमीं म्हणतात कीं, "तुम्हीं ह्या तुमच्या विलक्षण कोटिक्रमानें लोकाना चकवितां. तुम्हीं नेहमीं प्रतिपक्षावर एकदम हल्ला सुरू करितां. आपल्या मुद्यांचा बचाव ( Defence ) करीत बसत नाहीं." "होय, I always take offensive, offensive is the best defensive in war. Attack your enemy at the weakest point and I do it. Defensive argument makes your case weak. युद्धामध्यें शत्रूवर छापा (offensive) घालून त्याला चीत केले पाहिजे. आपल्या बाजूचा नुसता बचाव करीत राहून यश यावयाचें नाहीं. श्रीयुत गोपाळ गणेश आगरकर हे भाषासौष्ठव व डौल ( Style ) या दृष्टीनें माझ्यापेक्षां सरस लेखक होते; परतु हजिरी जवाब "Reparties" आणि अघाडीच्या माऱ्यामध्यें ( Frontal attacks ) केसरीचें नेहेमीं वैशिष्ट्य होतें. नामदार गोखले नेहेमीं म्हणत असत कीं, "टिळक भाषणामध्ये काय किंवा लेखामध्यें काय वकिली करीत असतात." "होय, खरोखरच मी वकिली करीत असतों. प्रतिपक्षाची बाजू विचाराकरितां म्हणून पुढे आणण्याचा आव घालून प्रतिपक्षाचे गचाळ मुद्दे मुद्दाम पुढे आणावयाचे आणि त्यांवर मात करून प्रतिपक्षाची बाजू ढासळून पाडावयाची ही गोष्ट ज्याला यशस्वी रीतीने करितां येते तोच उत्तम वकील होय; मी नेहेमी असेंच करीत असतों. मी भाषासौष्ठवाकडे किंवा अलकाराकडे लक्ष देत नाहीं. फक्त माझ्या मतांचा साध्या व सोप्या भाषेमध्यें लोकांच्यावर परिणाम व्हावा याकडेच मी लक्ष देत असतो."

बोलण्याच्या ओघांत मजुरांच्या चळवळी ( Labour Movements ) कडे ते वळले आणि म्हणाले, "डॉक्टरसाहेब, येथील मजुरांची चळवळ पाहून व मजुरांच्या सघापुढें भाषणें करून परत हिंदुस्थानात गेल्यावर अशाच चळवळी आपल्या देशामध्यें सुरू झाल्या पाहिजेत, असें तुम्हाला वाटणें साहजिक आहे. परतु आपल्या देशपरिस्थित्यनुरूप आपण या चळवळीला हात घातला पाहिजे. I do not want to set up labour against the capital in my own

country When our clerks are getting Rs 15 or 20 a month, to spur on labourers, to ask for higher wages, Rs. 2 or 3 a day and so on, would be sheer folly. I would certainly organize labour, but I would do it, on the basis of social welfare. पाश्चात्य देशांप्रमाणें माझ्या देशांतील मजूर व भांडवलवाले ह्यांच्यामध्यें मला तेढ उत्पन्न करावयाची नाहीं. ज्या देशांमध्ये शिकलेल्यासवरलेल्या कारकुनाला दरमहा रु. १० ते २० पर्यंत पगार मिळतो, त्या देशात रोजीं दोन किंवा तीन रुपये मिळाले पाहिजेत म्हणून मजुरांना चळवळ करावयास लावणें हा वेडेपणा होय मला मजुरांची संघटना व्हावयास पाहिजे, परंतु ती Social welfare च्या पायावर व्हावयास पाहिजे. त्यासाठीं Employment—Insurance, Hospitals, Entertainment—rooms, Saving and co-operative credit societies आणि आधुनिक पद्धतीवर पुराणे स्थापण्याकडे मी मजुरवर्गाचें चित्त खेचून घेईन. १९०६ व १९०७ सालीं मजूरवर्गामध्ये फैलावत असलेल्या दारूच्या व्यसनापासून त्यांना परावृत्त करण्यासाठीं मद्यपाननिषेधाची मोठी चळवळ मीं महाराष्ट्रभर केली; परंतु सरकारकडून ह्या चळवळीला अडथळा करण्यांत आला. मजूर लोकांची स्थिति सुधारावी अशी माझी फार इच्छा आहे. मुंबईत मजुरांच्या एका सभेंत, भाषणाच्या अगदीं सुरवातीस मी असें उद्गारलेलें मला आठवतें कीं, " मुंबई मजूर लोकांची आहे." आपलीं कोंकणांतील घरेदारें सोडून मुंबईत येऊन राहणाऱ्या मजुरांच्या श्रमावर मुंबईची श्रीमंती अवलंबून आहे. तेव्हां मजुरांनीं दुःखामध्ये काळ लोटलेला पाहणे कोणाला कसें बरें वाटेल? औद्योगिक बाबतींत निकृष्टावस्थेस पोंहोचलेल्या आपल्या देशामध्ये नुकत्याच कोठें जन्मास आलेल्या आपल्या देशांतील कारखान्यांना व गिरण्यांना परदेशांतील राज्यसत्तेचें ज्यांना पाठबळ आहे अशा कारखान्यांशीं व गिरण्यांशीं स्पर्धा करावयाची आहे. अशा स्थितींत मजुरीचे दर कृत्रिम रीतीनें वाढवून कसें चालेल? मजुरी स्वस्त—अलबत मजुरांच्या पोटापुरती—ठेवून परकीय मालाच्या किमतीनेंच आपल्या देशी कारखान्यांतून व गिरण्यांतून बाहेर पडलेला माल विकतां आला पाहिजे. राहून राहून मला असें वाटतें कीं, मजूर आणि भांडवलवाले ह्यांच्यांतील लढा आणि संपत्तीची अयोग्य वाटणी नाहींशी करण्याला आपली प्राचीन जातिव्यवस्था यशस्वी होईल.

धर्म व तत्वज्ञान यासंबंधाने विचार करुन स्वतंत्र ग्रंथरचना करावी असें मला नेहेमीं वाटत असे व आतां सुद्धां वाटतें. राजकारणांत पडून मी जो केसरी वर्तमानपत्र चालवीत आहें, आणि देशभर हिंडून व्याख्यानें देऊन लोकजागृतीचें काम करीत आहे, ते केवळ माझ्या देशाला ह्या गोष्टींची जरूरी आहे, यासाठीं केवळ आपद्धर्म म्हणून करीत आहें."

विलायतेतून परत येत असताना वाटेत "पोर्टसैद" बंदराला आगबोट लागते. "पोर्टसैद" येथें Modern Town आणि Native Town असे शहराचे दोन विभाग आहेत. त्यासंबधानें बोलत असतांना टिळकांनीं असें सांगितले कीं, "असा प्रकार सर्व ठिकाणीं पहावयास सांपडतो. आपल्या हिंदुस्थानांत अलिकडील इंग्रजी राज्यांत मद्रास शहरामध्ये–' Native Town ' असा शहराचा निराळा भाग पाडला आहे. व तो ' Black Town, ' या नावानें ओळखिला जातो. अलीकडे लोकमताला मान देऊन त्या विभागाला ' George Town ' असे नाव दिले आहे. इतकेंच काय तर मराठ्यांच्या काळात सुद्धां सुरत, अहमदाबादसारखी शहरे मराठ्यांनीं काबीज केल्यानंतर मराठ्यांनीं आपली वस्ती शहरवासीयांपासून अलग अशाच ठिकाणीं केली होती आणि तो सर्व भाग तेव्हांपासून अजूनपर्यंत ' भद्र ' या नांवानें संबोधिला जातो. तेव्हां सध्यांच्या ब्रिटिश आमलात शहरांमध्यें ' Cantonment ' सारखे भाग पाडून आपले युरोपियन राज्यकर्ते हिंदी लोकांच्या वस्तीपासून वेगळे राहतात आणि हिंदी लोकांमध्यें मिसळत नाहींत म्हणून काहीं आश्चर्य वाटावयास नको. जेत्यांना जित लोकांमध्यें मिळून मिसळून राहणें कधींहि आवडत नाहीं. असें केल्याने जित लोकावरील आपला दरारा कमी होतो अशी त्याची नेहेमींची समजूत असते."

ब्राह्मण मराठा हा भेद ज्या स्थितींत सध्यां आपणास पहावयाला सापडतो तसा पेशव्यांच्या काळीं अस्तित्वांत नव्हता, असें टिळक नेहेमीं म्हणत असत. ह्याच विषयावर बोलतांना ते एकदां म्हणाले "पेशव्यांच्या वेळीं पेशव्यांच्या वाड्यांत, ब्राह्मण सरदार आणि मराठा सरदार भोजनसमारंभास एकाच जागीं बसत असत आणि पेशव्यांच्या घराण्यांतील स्त्रिया जर पक्तींत वाढावयास आल्या नाहींत तर तो अपमान समजला जात असे. ब्राह्मण आणि मराठे सरदार पक्तीमध्यें समोरासमोर बसत असत."

ह्याच वेळीं अस्पृश्यतेसंबंधाने बोलतांना टिळकांनीं सांगितलें कीं, "राष्ट्रकार्यामध्यें पेशव्यांच्या काळांत देखील अस्पृश्यतेला जागा नव्हती. महारांना देखील कांहीं विशिष्ट अधिकार होते. त्यावेळीं ज्या ज्या ठिकाणीं पेशव्यांचा तळ पडत असे, त्या त्या ठिकाणीं, खुद्द श्रीमंत पेशवे सरकाराच्या तंबूशेजारीं महारांच्या मुख्याचा तंबू ठोकण्याची वहिवाट चालू असे, व तो त्याचा हक्क समजला जात असे. एके दिवशीं महारांच्या अधिकाऱ्याचा तंबू ठोकावयाचा त्या ठिकाणीं नाना फडणविसांचा तंबू ठोकण्यांत आला. थोड्या वेळानें तो अधिकारी त्या ठिकाणीं आला. त्यानें आपला तंबू निराळ्या जागीं ठोकण्याचें साफ नाकारलें, व तो घोड्यावरून खालीं उतरेना. शेवटीं त्या वेळेचे पेशवे श्रीमंत सवाई माधवराव

यांना नाना फडणविसांचा तंबू त्या जागेवरून काढून महारांच्या अधिकाऱ्याचा तंबू त्या जागीं ठोकावा लागला. यावरून आपली खात्री होईल कीं, ब्राह्मण पेशव्यांच्या काळात सुद्धां महारांना कांही अधिकार होते. "

विलायतेहून परत येतांना केबिनमध्यें नव्या सुधारणासंबंधीं लोकमान्य बोलत असतांना महाभारतांतील एक प्रसग घेऊन ते म्हणाले " स्वराज्य जर पाहिजे असेल तर समोंवतीं असलेल्या परिस्थितीबद्दल आपण नेहेमीं असतुष्टच राहिले पाहिजे. ब्राह्मणांचा सतुष्टपणा टाकून देऊन स्वराज्य मिळेपर्यंत असतोषी क्षत्रीयच बनलें पाहिजे. नव्या सुधारणान्वयें कौंसिलांत गेल्यावर जर एज्युकेशन पोर्टफोलिओ हातांत आला, तर पहिल्याने मी जी गोष्ट करीन, ती ही कीं, आपल्यांतील पुराणे, कीर्तनें, प्रवचनें, इत्यादि जुन्या सस्था मी ऊर्जितावस्थेस आणीन. पुराण, प्रवचन व कीर्तन ह्या धर्मप्रसाराच्या जुन्या संस्था काबीज करून मी आपल्या सुशिक्षित, संस्कृत आणि स्वार्थत्यागी तरुणांना पुराणिक, प्रवचनकार आणि कीर्तनकार म्हणून देशांतील खेड्यापाड्यामध्यें मिशनरी म्हणून सोडून देऊन सद्यःस्थितीविषयींची लोकांना पूर्ण ओळख करून देईन आणि लोकजागृतीचे काम करीन. "

स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत सुद्धां लोकमान्य टिळकांचे विचार लक्षांत घेण्यासारखे होते. एकदां लडन शहरांतील रस्त्यांतून मोटारीमधून फिरत जात असतांना जागोजागीं Bread Butter Restaurant, Lyons Restaurant, Grill Rooms, Dinner Hall, अशा नांवाच्या पाट्या लावलेली उपहारगृहे दृष्टीस पडत होतीं. मला मोठी मौज वाटली आणि मी म्हटले, काय ही Restaurant, किती तरी उपहारगृहें, मला वाटते, इग्रज लोक घरीं झोपावयास मात्र जातात. जेवण्याखाण्याचे सर्व व्यवसाय ह्या उपहारगृहांतून होत असले पाहिजेत; तेव्हां लो. टिळक म्हणाले " इंग्रजांना हसावयास नको, आपल्या देशास अशी स्थिति लवकरच येणार. सध्या इंग्लंडांत स्त्रीशिक्षणपद्धतीचा परिणाम असा झाला आहे कीं, इंग्रेजी स्त्रियांस पुरुषांच्या बरोबरीने राहावयास पाहिजे आहे. पुरुषांप्रमाणें द्रव्यार्जन करण्याची जरूरी त्यांना सुद्धां भासूं लागली आहे. पुरुषांप्रमाणे दररोज संध्याकाळीं व्याख्यानास किंवा सभेस जावयास पाहिजे, तेव्हां घरीं स्वयंपाक कोणी करावयाचा ? जेवण वगैरे बाहेरच्या बाहेर आटोपून घरी फक्त झोंपावयास जावयाचे. 'Bread and Breakfast at Home and Lunch and Dinner outside ' अशा रीतीची राहणी ह्याचमुळें इंग्लंडांत आली आहे. सकाळीं जी न्याहरी करून बाहेर पडावयाचें ते दोनप्रहरचा फराळ आणि रात्रीचें भोजन बाहेर उपाहारगृहांत घेऊन रात्रीं घरीं झोंपावयास यावयाचें. आपल्या देशामध्यें अशी स्थिति भलत्या स्त्रीशिक्षणाच्या योगाने हळूहळू येणार; कारण सध्यांच्या परिस्थितीकडे लक्ष देऊन स्त्रियांना शिक्षण तर दिलें पाहिजे. तें

दिल्यावांचून कांहीं गत्यंतर नाहीं. स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत योग्य काळजी आतां-पासून घेतली नाहीं आणि पाश्चात्य स्त्रीशिक्षणाच्या नमुन्यावरहुकूम येथे स्त्री-शिक्षणपद्धति सुरू केली, तर त्याचा परिणाम असा होईल कीं, स्त्रियाना सुद्धां पाश्चात्यांप्रमाणें पुरुषाच्या बरोबरीचे हक्क असावे, असें वाटावयास लागेल. घरां-तील आपली साम्राज्यसत्ता सोडून देऊन घराबाहेरील खटपटींत आपलें अंग असावे, असें वाटूं लागेल; आणि मग इंग्लंडप्रमाणें आपल्या देशात सुद्धां 'Bread and Breakfast at Home and Lunch and Dinner outside ' अशी राहणी सुरू होईल. तेव्हां स्त्रीशिक्षणपद्धति सुरू करितांना आपल्या आर्य संस्कृतीला धरून त्या दिशेनें आपले प्रयत्न सुरू झाले पाहिजेत. " सुधारणेसंबधीं आणि स्त्रीशिक्षणाविषयीं लो. टिळकाचीं अशा प्रकारचीं मतें होतीं.

लोकसंग्रहाचें जें कार्य लो. टिळकांनीं केलें, तें मागे सांगितल्याप्रमाणें मुख्यतः लेख व व्याख्यानद्वारां त्यांनीं केलें. ग्लासगोहून परत येतांना स्वतःच्या केसरीं-तील लेखासंबधानें ते म्हणाले, " केसरींतील लेख लिहीत असतांना भाषासौंदर्या-कडे मी फारसें लक्ष देत नाहीं. माझ्या अंतःकरणांत असलेले विचार जितक्या सोप्या भाषेंत कळवितां येतील तितके कळविण्याचा मी प्रयत्न करीत असतों. अंतःकरणांत घोळत असलेले विचार सहज बाहेर पडलेल्या भाषेंने लोकाच्या समोर ठेवल्यानें त्यांच्या मनावर तात्काळ परिणाम होत असतो. मी जेव्हां कडक टीका करितों, तेव्हां खरोखरीच माझ्यामध्यें रागाचा आवेश आलेला असतो. अशा रीतीनें विषयाशीं तादात्म्य पावल्यानें माझ्या लेखांमध्यें भाषासौष्ठव वगैरे नसतांनाहि माझ्या साध्या भाषेचा परिणाम लोकावर जास्त होतो." लोकमान्यांच्या वक्तृत्वासंबधानें सुद्धां असाच प्रकार आहे.

एवढ्या प्रचंड उलाढाली करीत असतांना सुद्धां लो० टिळकांच्या संबधानें मला एक महत्त्वाची गोष्ट दिसून आली, ती ही कीं, लहानसहान बारीकसारीक गोष्टींविषयीं सुद्धां ते आस्थापूर्वक माहिती मिळवीत असत. इंग्लंडांतील कोणत्याहि लहानशा ठिकाणीं आम्हांला जावयाचें असेल तर लो. टिळक लंडनचा 'Topo-graphical Map' (स्थलदर्शक नकाशा) उघडून तें ठिकाण दाखवीत. हा नकाशा-वरून त्यांनीं लंडनच्या लहानसहान ठिकाणांची माहिती करून घेतली होती. मँचेस्टर, लीड्स, एडिंबरो, ग्लासगो, वगैरे ठिकाणीं जाणाऱ्या गाड्यांच्या वेळा सुद्धां त्यांना मुखोद्गत होत्या. केसरीकरितां २५००० रुपयांचें जे नवीन मशीन त्यांनीं इंग्लडांत खरेदी केले, त्या मशीनच्या अगदीं बारीक स्क्रूविषयींची माहिती सुद्धां त्यांनीं पुस्तकांतून अगोदर करून घेतली होती. ती माहिती पाहून त्या मशीनच्या मालकांनीं टिळकांच्या मशीनरीसंबधाच्या ज्ञानाविषयीं आश्चर्य प्रगट केलें. ह्यासंबधानें बोलत असतांना टिळक म्हणाले, "अशा रीतीची सवय मला लहानपणापासून आहे. ज्या विषयावर लिहावयाचे त्या विषयाची

पूर्ण माहिती मी त्या विषयावर असलेल्या ग्रंथांतून करून घेतली आहे. मी Anatomy चा अभ्यास केला आहे. मी Physiology वाचलेली आहे. कॉलेजांत B. A. चा अभ्यास करीत असतांना Heart आणि डोळ्यांच्या अंतस्थ रचनेची माहिती मिळावी म्हणून मीं एकदां बैलाचे Heart व डोळे माझ्या खुद्द घरच्या खोलींत आणून dissect करून पाहिले आहे. वर्तमानपत्राच्या संपादकाला जर यशस्वी संपादक व्हावयाचे असेल, तर लिहावयाला घेतलेल्या प्रत्येक विषयाची माहिती त्या विषयावरील स्वतंत्र ग्रंथांतून त्याने करून घेतली पाहिजे."

---

## श्रीमती काशीबाई कानिटकर

[ कै. रा. सा. गोविंद वासुदेव कानिटकर यांचें कुटुंब व प्रसिद्ध विदुषी, हल्लीं मु. श्रीक्षेत्र काशी. ]

लो. टिळकांचे नातेवाईक व पुढे आमचे व्याही झालेले कै. रा. ब. गोपाळरावजी टिळक हे आमच्या मामजींचे स्नेही व एक धंद्याचे असल्यामुळें व आमचे घरीं व शेजारीं त्यांचें रहाणे होतें म्हणून लोकमान्यांसंबंधीं आम्हा सासुरवासिनींना त्यांच्या बायकांकडून माहिती मिळे.

(१) मुंबईस जेव्हां पहिली सामाजिक परिषद कै. न्या. मू. तेलंग यांच्या अध्यक्षतेखालीं भरली तेव्हां परिषदेचें काम देशी भाषांतून व्हावे अशी लोकमान्यांनीं सूचना आणली होती. मंडपांत त्यांना बरीचशीं मते अनुकूल होतीं. परंतु सर्वांना समजण्याकरितां सर्व काम इंग्रजींत झालें पाहिजे असें अध्यक्षांनीं निक्षून सांगितल्यावर ज्या ज्या प्रांतांसंबंधीं विशेष ठराव होतील त्यावर तरी त्या त्या भाषांतून कांहीं भाषणें व्हावींत अशी त्यांनीं दुसरी सूचना आणली व ती बहुमतानें पसार झाली.

(२) चहा—प्रकरणाच्या वेळीं लोकमान्य आमच्या पुण्याच्या घरीं वारंवार येत असत. एकदां रात्रीच्या जेवणाच्या वेळीं ते आले होते. रोजच्या नियमाप्रमाणें पगती बसल्या होत्या. माझे चुलत सासरे सुधारक मंडळींच्या व स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध होते हें त्या वेळच्या जगाला माहीत होतेंच. श्रीशंकराचार्यांचा दरबार—किंवा न्यायसभा म्हणा—रोज चालू होती. साक्षीपुरावे घेण्याचें काम जारीनें चालू होतें. त्या सभेत कै. नारायण बापूजी, माझे चुलत सासरे, हे विरुद्ध म्हणजे नातूपक्षाचे होते. त्यांना न्यायसभेंत टिळकांच्या सांगण्यावरून कै. रघुनाथ दाजींनीं असा सवाल

केला की, " काल तुम्ही आपल्या घरी जेवावयास रावसाहेबाच्या पगतीला बसला होता की नाही ? "

'उत्तर:—नाही.

प्रश्न:—मग तुम्ही त्यांच्या बरच्याच पाटावर बसून काय करीत होता ?

उत्तर:—फक्त डिंकाचा लाडू खात होतो.

प्रश्न:—सर्व पदार्थांच्या मध्यें वाढलेला तो डिंकाचा लाडू होता काय ?

उत्तर:—होय.

लोकमान्यांच्या या मर्मभेदक वकिली काव्याबद्दल जितक्या लोकांनी त्याना शिव्या दिल्या तितक्याच लोकांनीं त्यांच्या लढा लढण्याच्या कसबाबद्दल त्यांची प्रशंसाहि केली.

---

## शंकर बापूजी मुजुमदार

[ लोकमान्याचे न्यू इंग्लीश स्कूलमधील शिष्य व महाते, मालक किर्लोस्कर संगीत नाटक मंडळी. ]

मी न्यूस्कूलमध्यें तिसऱ्या इयत्तेंत असल्यापासून म्हणजे १८८० सालच्या आरंभापासूनच्या या आठवणी आहेत. माधवराव नामजोशी याचा माझा विशेष संबंध होता; व न्यूस्कूलच्या व्यवस्थापक वर्गात त्यांचा व टिळकाचा विशेष सबध होता. टिळकाचें नामजोशांचे घरीं जाणें येणे होई, त्यावेळी माझाहि तेथें असण्याचा योग येई. त्यामुळें मला ते नामजोशाच्या ऋणानुबध्यापैकीं एक म्हणून ओळखूं लागले व पुढे पुढें किर्लोस्कर सगीत मडळीच्या बाबतींत निरनिराळ्या कारणांनीं टिळकांशी अधिक दळणवळण वाढत गेले

(१) विष्णुशास्त्री, टिळक व नामजोशी हे मूळ न्यूस्कूलचे उत्पादक. यांत विष्णुशास्त्री यांचा लौकिक ते कृष्णशास्त्रींचे ' बापसे बेटा सवाई पुत्र ' म्हणून व निबधमालेचे कर्ते म्हणून ( सपादक हा शब्द त्यावेळीं फारसा प्रचलित नव्हता ) अगोदरच चोहोंकडे पसरला होता. परतु टिळकांचे नाव मात्र सर्वांच्या तोंडीं नवीन झालें. एक एल्‌एल्. बी. झालेले तरुण गृहस्थ पांचशे रुपयाची मुनसफीची नोकरी सोडून शाळेला मिळाले, अशा गप्पा लोकांतून चालत. ह्यामुळे टिळकांविषयीं विद्यार्थीवर्गांत व इतर लोकांच्याहि मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न होऊ लागली होती. आपटे शाळेला येऊन मिळण्यापूर्वी नामजोशी याचा शाळेंत दरारा असे. विष्णुशास्त्री हे शांतिब्रह्म. त्यांच्याबद्दल विद्यार्थीवर्गाची पूज्यबुद्धि ' असे. परतु

टिळकांकडे कोणाचें कांहीं म्हणणे असले तर मोकळ्या मनाने सांगतां येत असे. काश्मिरी टोपी घालून ते तिसऱ्या इयत्तेच्या वर्गापर्यंत मधून मधून कांहीं शिकविण्यास येत असत. कांहीं तडजोडीचे प्रसंग आले तर टिळकांकडून ते मिटविण्यांत येत असत.

(२) कोल्हापूरप्रकरणाच्या शिक्षेतून टिळक, आगरकर हे 'बाळगोपाळ' सुटून आल्यावर त्यांचा पुर्णेकरांनीं फार मोठा सन्मान केला. गोसावीपुऱ्यांतून मोरोबादादांच्या वाड्यापर्यंत हजारो लोकांचा समुदाय टिळक—आगरकरांच्या मागे चालला होता. त्यावेळीं गाडींतून मिरवणुकीची चाल नव्हती असें वाटते. कारण ह्यापूर्वी अशी सन्मानाची स्वारी निघण्याचे प्रसंग राजेरजवाड्यांच्या मिरवणुकीशिवाय पुणें शहरांत घडून आल्याचे आठवत नाहीं व ऐकिवांत नाहीं.

शिक्षेचा परिणाम दोघांच्याहि शरीरप्रकृतीवर विशेष दिसत होता. परंतु टिळकांच्या प्रकृतीवर अधिक झाला होता. ते फारच कृश झाले होते. या दोघांचे त्या वेळचे फोटो चित्रशाळेने प्रसिद्ध केले होते. परंतु आतां टिळकांच्या फोटोच्या इतक्या आवृत्त्या निघाल्या तरी त्या फोटोची आवृत्ति पाहण्यास मिळत नाहीं. ठेंगणी मूर्ति. शरीर कृश झालेले, त्यांत मोठे पागोटे डोक्यावर, असा तो फोटो होता. टिळकांना व आगरकरांना पाहून लोक फारच हळहळले. समारंभांतटिळक काही बोलले नाहीत; परंतु आगरकर लोकांचे आभार मानताना म्हणाले कीं, " घडून आलेल्या प्रकाराचा खरा इतिहास मागून कळत असतो. सवाई माधवराव व नानाफडणीस यांच्या संबंधाच्या आख्यायिका लोकांच्या बोलण्यांत काय आहेत यावरूनच पुढें कोल्हापूरप्रकरणात लोक पुढें काय बोलतील हे समजण्यासारखे आहे. सरकारचा न्याय हा कागदोपत्री राहतो, परंतु लोकवार्ता व आख्यायिका या पिढ्यानपिढ्या चालत येऊन त्यांचा इतिहास निराळाच बनत असतो."

(३) १८८० साली न्यूस्कूलाबरोबर किर्लोस्कर संगीत मंडळीचेंहि जनन पुणें शहरांत झाले, व तिनेंहि देशकार्याला हातभार लावण्याचा क्रम सुरू केला. कोणतीहि नवी चळवळ निघाली कीं, तिला मदत करण्याबद्दल मागण्या येऊ लागल्या. पुण्याची नेटिव्ह जनरल लायब्ररी नुकतीच बुधवार वाड्यांत जळाली होती. तिच्या मदतीकरितां, जोशीहॉलच्या मदतीकरितां, बर्वे प्रकरणांतील केसरीमराठ्याच्या फंडाकरितां हातभार किर्लोस्कर मंडळीने त्यावेळी लावला होता. आर्यभूषण छापखाना, केसरी—मराठा वर्तमानपत्रे, या संस्था त्यावेळीं एकत्र होत्या. टिळक, आगरकर वगैरे मंडळीत त्यावेळीं मतभेद नव्हते. या संस्थांना प्रत्यक्ष द्रव्याची मदत न करतां अण्णासाहेब किर्लोस्कर यांनीं आपल्या संगीत शाकुंतल व सौभद्र नाटकांच्या स्वामित्वाचे हक्क फारच थोड्या किंमती घेऊन टिळक—आगरकरप्रभृति मंडळींना कायमचे दिले. व ' मीं हें तुम्हांला शेत दिले आहे, ' याचा मोगवटा

तुम्ही कायमचा घ्यावा ' म्हणून सांगितलें! परंतु पुढें या सत्रांत फाटाफूट होऊन सदर दोन पुस्तकाचे हक्क एका आर्यभूषण छापखान्याकडे गेले. टिळक या छापखान्याच्या मालकींत होते म्हणूनच पुस्तकाचा हा व्यवहार किर्लोस्करांनीं--डॉ. गर्दे व गणपतराव सोहनी यांच्या मध्यस्थीनें केला होता.

(४) किर्लोस्कर मंडळीच्या इतिहासात टिळकांचा संबंध वारंवार घडत गेला आहे. टिळक--आगरकर सुटून आल्यावर डेक्कन कॉलेजमध्यें त्यांस मेजवानी झाली. त्या प्रसगीं नाटेकर, भाऊराव कोल्हटकर, वाघोलीकर हे किर्लोस्कर मंडळींतले प्रमुख गायक मुद्दाम बोलावण्यांत आले होते. दुसऱ्या प्रसगींच्या कारागृहवासांतून मुक्त झाल्यावर टिळक सार्वजनिक रीत्या बाहेर पडले, ते प्रथम किर्लोस्कर मंडळीच्या नाटकाच्या प्रसगानें पडले. नाटकगृहांत पाऊल ठेवल्याबरोबर लोकांनीं प्रचंड टाळ्यांच्या गजरांत त्यांचें स्वागत केले. नाटक दिवसाचें होतें. खेळ संपल्यावर मंडळींतच त्यांच्या मेजवानीचा समारंभ झाला. रा. रा. तात्यासाहेब केळकर, श्रीधर विठ्ठल दाते, बडोदा कमिशनरचे बापट, वासुदेवराव जोशी, इत्यादि मंडळी मेजवानीस होती. श्रीधर विठ्ठल याची जेवणाच्या वेळीं जिभेची टकळी टिळकांच्या स्तुतिपर चालली होती. " हा आमचा बच्चा कसा आहे ! " असें जमलेल्या मंडळीस ते विचारीत.

किर्लोस्कर मंडळीचे एक वेळचे मालक श्री. जोगळेकर हे टिळकांच्या लॉ क्लासात वकिलीच्या अभ्यासाकरितां होते. १९०० सालीं भाऊराव कोल्हटकर यांच्या असाध्य दुखण्यानें मंडळी नामशेष होण्याचा तो प्रसंग होता. परंतु टिळकांच्या सह्यानें जोगळेकर मंडळीस मिळाले. त्यावेळीं जोगळेकरास त्यांनीं दोनच शब्द सांगितले. ते हे कीं, " नाटकातलीं व्यसनें अगीं लावून घेऊ नका. " टिळकांनीं किर्लोस्कर मंडळीला जोगळेकर हें नवजीवन दिले असें म्हणण्यास हरकत नाहीं. पुढें १९०६ सालीं पुण्यांत किर्लोस्कर मंडळीची २५ वर्षांची ज्युबिली झाली. त्या प्रसगीं लोकमान्य मुद्दाम बाहेर गांवाहून येऊन ऐन समारंभाच्या वेळीं हजर झाले. किर्लोस्कर मंडळीबद्दलचा अभिमान त्यांनीं वेळोवेळीं शब्दानीं व कृतीनें व्यक्त केला आहे. मुंबईस सुरेंद्रनाथ बानर्जी आले असतांना टिळक त्यांना मुद्दाम मंडळीच्या नाटकास घेऊन आले व ' पहिल्यापासून या मंडळीचा मला अभिमान आहे ' असें भाषण करतांना त्यांनी सांगितले.

किर्लोस्कर मंडळीची पहिली फाटाफूट झाली त्यावेळीं टिळक मोकळे नव्हते. सुटून आल्यावर मी त्यांच्या भेटीस गेलों., तेव्हां " तुमची हकीकत मला जहाजावरच येताना कळली." (इन्स्पेक्टर सदावर्ते त्याना आणण्यास गेले होते त्यानीं सांगितली.) " नाटक मंडळीच्या कारभारात दुसऱ्यानें पडण्याचें कारण काय ?" असें. जे फाटाफूट करण्याच्या कामांत होते त्यांना अनुलक्षून, ते म्हणाले. किर्लोस्कर मंडळी प्रथम कलकत्त्यास गेली त्यावेळीं अमृतबझार पत्रिकेचे मालक बाबू मोतीलाल यांना लोक-

-मान्यांनीं 'किर्लोस्कर मंडळी ही महाराष्ट्रांतील आद्य व प्रमुख नाटक मंडळी आहे व तिचे मालक-शं. बा. मुजुमदार हे माझे स्नेही आहेत ( हा बहुमान वास्तविक अस्थानीं होता. परंतु देणाराचा थोरपणा यांत व्यक्त होतो. ) तेव्हां याना मदत केल्यास मला फार आनंद होईल ' असे पत्र लिहिले. कलकत्त्यांतील कि. मं. ची सफर यशस्वी होण्यास टिळकांचे पत्र व अमृतबझारपत्रिकेचे लेख हेच कारण झाले.

(५) टिळकांची लोकप्रियता डळमळण्याचे प्रसंग त्यांचे आयुष्यात तीन आले होते. पुण्याच्या कॉंग्रेसच्या वेळेचा सामाजिक परिषदेस मंडप देण्याचा वाद, ४२ असामींबद्दलचा चहा प्रकरणांतील ग्रामण्याचा वाद, व सुरतेच्या कॉंग्रेसचा प्रसंग. या तिन्ही गोष्टींत टिळकांना कोणी बरे तर कोणी वाईट म्हणणारे होते; परंतु त्यांच्यावर पुढे राजद्रोहाचा पहिला खटला, ताईमहाराजाचे प्रकरण, पुन्हां राजद्रोहाचा खटला इत्यादि संकटे आलीं, त्यांत त्यांचे अलोट धैर्य, व समतोल शांतवृत्ति पाहून, लोकप्रियतेचा काटा जो कोठे डळमळीत दिसत होता तो जागच्या जागीं कायमचा राहिला.

(६) महादेव गोविंद रानडे व टिळक यामध्यें तीव्र मतभेद असल्याचें जरी लोकदृष्ट्या दिसत होतें, तरी कांहीं वेळां एकमेकांबद्दल किती आदरबुद्धि परस्परांत असे हे माझ्या निदर्शनास आलें आहे पुण्याच्या कॉंग्रेसच्या वादानंतरच एकेदिवशीं महादेव गोविंद रानडे व टिळक कोतवालचावडीकडून बुधवार चौकाकडे आनंदानें बोलत बोलत येताना पुष्कळांनीं पाहिले असेल. टिळक १८९७ सालच्या खटल्यात कारागृहात असतांना मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचा वार्षिक समारंभ मुंबईच्या आर्यसमाजाच्या मंदिरांत होता. त्यावेळीं रानडे अध्यक्ष होते. रिपोर्टांत टिळकांचें नांव आले होते, ते पाहून एका हलकट गृहस्थानें टिळकांसंबंधानें फारच नीचपणाचे उद्गार काढले. लोकांनीं तेथल्या तेथे त्याला जागेवर बसविले. परंतु रानडे यांनी भाषण करतानाहि या गृहस्थांचा निषेध करून, टिळकांची योग्यता विद्वत्तेनें फार मोठी आहे हं प्रसिद्धपणे समाजाला उद्गारून दाखविलें.

समतिवयाच्या वादापासून पुण्यांत दुही माजली होती. रानडे वारल्यावर एकेदिवशीं टिळकांकडे मी जोशीहालात तिसऱ्या मजल्यावर गेलों असताना ओघानें निघालेल्या गोष्टींत पुण्यांतील या दुहीसंबधानें ते म्हणाले कीं, रानडे असते तर पेनशन घेतल्यावर पुण्यांत येऊन दुही मोडण्याचा प्रयत्न करण्याचा त्यांचा विचार होता. रानड्यांबद्दलचा त्यांच्या हातचा मृत्युलेख मशहूर आहे यावरून एवढें सिद्ध होतें कीं, एकमेक एकमेकांची योग्यता चांगली जाणून होते.

(७) टिळकांच्या अंगचा मोठा व लक्षात राहण्यासारखा गुण म्हणजे त्यांच्याकडे कोणी गेला तरी त्याच्याशीं मोकळेपणानें बोलावयाचें हा होय. हा लहान, हा मोठा, असा भेदाभेद ते दाखवीत नसत. कित्येक वेळां, माझे व त्यांचे प्रवासांत एके ठिकाणी बसण्याचे प्रसंग थाले असतांना मोकळेपणानें माझ्याशीं बोलल्याच्या आठवणी नमूद करण्यासारख्या आहेत. "ज्या लेखांबद्दल आपणास शिक्षा झाली होती ते लेख ज्यांनीं लिहिले, त्यांनीं आपलीं नांवें सांगितलीं असतीं तर आपल्यावरचे प्रसग टळले नसते का ?" म्हणून मी विचारता, ते म्हणाले कीं, "ज्यांनीं लेख लिहिले ते तर तुरुगांत गेले असतेच, शिवाय मलाहि घातल्याशिवाय सरकार राहिलें नसतें. मुख्य कटाक्ष माझ्यावर होता." रा. खाडीलकर यांसहि मी हा प्रश्न पूर्वीं केला होता. तेव्हा त्यांनीं हेंच सांगितलें. व त्याचा कठ फार गहिवरून आला. कारण त्या वेळीं टिळक मंडालेकडे होते.

ताईमहाराजप्रकरण, छापखान्यासंबधीं निकाल इत्यादि बाबतींत ज्याच्याशीं व्यवहार पडला त्यापैकीं कोणी कसें नाडविलें वगैरे सबघानें त्यांना जो अनुभव आला तो त्यांनीं बोलून दाखविला; परतु त्यात प्रत्यक्ष नांवें कोणाचीं नसल्यानें, अनुमानानें केलेली कल्पना कोणाबद्दल खरी हें सांगता येत नाहीं. परतु त्यांना अनुभव कटु आला असला पाहिजे हे खरें.

(८) मित्रधर्माला जागणें हा कित्ता टिळकांच्या चरित्रांतच पाहण्यास मिळतो. नामजोश्यांचा शेवट सुखात झाला नाहीं. परतु जेव्हा टिळकांना प्रतिबंधात राहण्याचे प्रसग आले त्या त्या वेळीं नामजोश्याच्या कुटुबाची व्यवस्था, अगोदर करून ठेवलेली असे.

(९) त्यांच्या शांत व धिमेपणाच्या स्वभावाची लक्षणें पुष्कळांच्या पाहण्यांत आलीं असतील. परतु एकदोन गमतीदार आहेत तीं सागतों. ताई महराज प्रकरणात जामीनावर टिळक खुले होते. दुसरे दिवशीं खटल्याची तारीख असल्यामुळें ते मुबईस जावयाचे होते. परतु आग लागली म्हणजे विडी पेटवून घेणाऱ्या प्रमाणें कांहीं लोक अशा प्रसगांतहि त्याचेकडे गेले होते. त्याच्या मनास स्वस्थता किती आहे, ही वेळ कोणती, याचा विचार त्यांच्याकडे जाणारे फारसे करीत नसत. एक नाटककार आपले नाटक त्यास वाचून दाखविण्याकरिता गेले असतांना, जसें कांहीं कोणत्याच काळजींत आपण नाहीं, असें समजून त्यांच्याशीं ते बोलत होते. तसेंच ताईमहाराजप्रकरणाचा शेवटचा निकाल मुबईहून तारेनें यावयाचा होता त्यावेळीं ते सदाशिव पेठेच्या हौदाजवळच्या केसरी ऑफीसमध्यें तारेची वाट पाहत अगरखा व पगडी घालून, विरुद्ध निकाल झाला तर पुढच्या तयारीनें, आनंदात बसले होते.

(१०) नाटकाच्या बाबतींत केसरींत लेख येत नाहींत याबद्दल लोकास आश्चर्य वाटतें. परतु त्यांच्या भोवताल्चा परिवार म्हणजे, केळकर, खाडीलकर, हे

नाट्यप्रिय असल्याने, आम्हास मिळतात ते 'नाटकीच' मिळतात असे विनोदानें ते म्हणत असत. केसरींत आरंभीं नाटकाच्यासंबधाचे लेख येत असत.. परंतु टिळकांच्या एका गैरहजिरींत शाहुनगरवासी मंडळीसंबधानें फारच लेख येऊं लागल्यानें लोकांत बराच गवगवा झाला. पुढें टिळक परत आल्यावर नाटकासंबधानें लेख घेण्याचे त्यांनीं बंद केले. वासुदेवराव केळकर व टिळक यांचा बेबनाव होण्याच्या कारणांत हे एक कारण झालें अशी त्यावेळीं बोलवा होती. नाटक पाहणें, वाचणें याला त्यांना वेळहि नसे व तितकी आवडहि नसे. ते एकदां यासंबधाने 'किरात' नांवाच्या एका नाटककाराला म्हणाले की, "आम्ही स्वतः नाटकें करीत नाहीं. तर नाटकाला आम्ही विषय करून देतों." व हे बोलणें त्यांनीं अक्षरशः खरे केलें. त्यांच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांत "भगवान् टिळक" नावाचे नाटक हिंदी भाषेंत झालें. व ते किर्लोस्कर संगीत मंडळी हल्लीं करीत आहे.

---

## परशुराम त्र्यंकटराव धारपुरे.

[बॅरिस्टर, लोकमान्याचे निस्सीम भक्त व अभिमानी, अध्यक्ष डिस्ट्रिक्ट बोर्ड, वर्धा.]

थोर पुरुषांच्या सहवासाचा योग अल्पसा जरी घडला तरी, तेवढ्यानेंच मानवीप्राण्यास परम धन्यता वाटते व यामुळेंच अशा सहवासाची स्मृति त्याचें मनांत जागृत राहात असते. सदरहु मानवी स्वभावास अनुसरूनच, भगवान् लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांच्याशीं घडलेल्या सहवासांतील कांहीं आठवणी खालीं देत आहेः—

( १ ) १८९७ सालीं लोकमान्यांवर राजद्रोहाचा खटला झाला, त्यावेळीं, मी इंग्रजी तिसऱ्या वर्गांत असेन; हिस्लॉप कालेजचे प्रो. शंकरराव गोखले ( जे हल्लीं अमेरिकेंत आहेत ) यांच्या प्रोत्साहनाने, लहान लहान विद्यार्थ्यांतून सुद्धां बरीच रक्कम गोळा करून टिळक-डिफेन्स फंडाकडे रवाना केली, व या रकमेबद्दल, पोचपावतीनुसार, आम्हां विद्यार्थ्यांस शतकृत्य केल्याप्रमाणे धन्यता वाटत असे; व तेव्हापासून आम्ही टिळक-प्रेमी बनलो.

( २ ) ( अ ) लोकमान्याच्या प्रत्यक्ष दर्शनाचे व सहवासाचें भाग्य प्रथमतः १९०६सालीं कलकत्त्यास भरलेल्या कॉंग्रेसच्या वेळीं लाधलें. त्यावेळीं ब्रिटिश मालावरील बहिष्काराच्यासंबधीं नेमस्त व जहाल, असे दोन पक्ष जनतेत निर्माण होऊन त्यांच्यात चुरशीचे रण माजले होतें. बहिष्काराचा

ठराव कॉंग्रेसमध्यें पसार होईल अशी जहालांना खात्री नव्हती; तेव्हां तो पसार न झाल्यास, तत्संबंधीं जोराची चळवळ देशभर सुरू करण्यासाठीं, 'बहिष्कार संघ' काढावा, अशा प्रकारचें बोलणें लोकमान्य, दादासाहेब खापर्डे व कांहीं बंगाली गृहस्थ यांच्यामध्यें चाललें होतें. ( १ ) कपडा, ( २ ) मीठ, ( ३ ) साखर, ( ४ ) आगपेट्या, यापैकीं निदान एक तरी वस्तु, कांहींहि झालें तरी ब्रिटिश कारखानदारांची वापरणार नाहीं, असें शपथपूर्वक प्रत्येक सभासदानें कबूल करावयाचें, सदरहु सर्वच वस्तूंवर बहिष्कार घालणारे किंवा फक्त तीनच अगर दोनच वस्तूंवर बहिष्कार घालणारे, असे वर्ग ठरवून एकदर चार प्रकारच्या सभासदांचा समावेश या बहिष्कार-संघांत करावयाचा अशाप्रकारचें कांहींसें ठरवावे, असें तें बोलणें होतें; परतु पुढें बहिष्काराचा ठराव जहालपक्षाच्या मताप्रमाणें कॉंग्रेसमध्यें पसार झाल्यामुळें, 'बहिष्कार संघ' निर्माण करण्याचें कारणच राहिलें नाहीं.

( ब ) असल्याच एका वादविवादाच्या वेळीं, एकानें लोकमान्यांस विचारलें कीं, "स्वदेशी कपड्यांत आपण कानपुरच्या गोऱ्या लोकांच्या गिरण्यांतील कपड्याचा समावेश कां करतां ? यामुळें नफा न होतां उलट स्वदेशी चळवळीस नुकसान पोह्चत आहे. कारण हे कानपुरचे गोरे गिरणीवाले इंग्रजी कापडाचे Agents आहेत व ते इग्रजी कपडा आपल्या कानपुरच्या कपड्यांत मिसळून स्वदेशी कपडा म्हणून विकूं शकतात; व यामुळें इग्रजी कापड स्वदेशी कापडाच्या नांवाखालीं दीडपट, दुप्पट किंमतीस खपतें; तरी स्वदेशी कपड्यांत, ह्या कानपुरच्या गोऱ्या गिरणीवाल्यांच्या कपड्याचा समावेश करू नये, असें आपण जाहीर करणें, अत्यंत इष्ट व जरूर आहे." यावर लोकमान्यांनीं सांगितलें कीं. 'अहो, या बंगालच्या फाळणीमुळें ही स्वदेशीची लाट सर्व देशभर उत्पन्न होऊन तुमच्या देशाभिमानाचा पारा, कांहीं डिग्री वर चढला आहे खरा, परतु अद्यापि तो Normal च्या म्हणजे नेहमीं अवश्य लागणाऱ्या डिग्रीच्या किती तरी खालीं आहे, याचा विचार करा. एकदमच उड्यावर उड्या घेऊन काय तोंडघशीं पडायचं आहे ? अहो, राजकीय आखाड्याचे आखलेले नियम आहेत; प्रतिस्पर्ध्यांची शक्ति प्रथमतः पूर्णपणें अजमावी लागते, नुसता भरधांव घोडा चालवून चालत नाहीं. प्रत्येक पाऊल मापून टाकावें लागतें; व एकदां का पाऊल पुढें टाकलें म्हणजे मग, प्रसंग पडल्यास, पावलोंगणीक झगडा सुरू ठेऊन अखेर प्रतिपक्षास चीत करावें लागतें. तुम्हीं स्वतः या गोऱ्या गिरणीवाल्यांचा कपडा वर्ज करून आपल्या मित्रमंडळींनाहि तसें करावयास लावा.

तुमची विचारसरणी लोकांस पटली तर स्वदेशीच्या मार्गातील धोंडा बाजूस केल्याचें तुम्हास श्रेय मिळून, आमच्या स्वदेशी चळवळीसहि जोर चढेल.'

( ३ ) लोकमान्यांवर १९०८ मध्ये राजद्रोहाचा खटला होऊन त्यांना सहा वर्षे काळेपाण्याची शिक्षा झाली. पुढे महायुद्ध सुरू होण्यापूर्वी त्याची सुटका झाली. त्यावेळीं मी डब्लिन ( आयर्लंड ) मध्ये होतो; तेथे त्यांच्या सुटकेची बातमी ' लंडन टाईम्स ' मधून कळली. त्यांच्या सुटकेसंबंधीं प्रसिद्ध केलेल्या मजकुरास लंडन टाईम्सनें "Father of Sedition" असा मथळा दिला होता. तसेंच १८९७ मध्यें लोकमान्यांवर राजद्रोहाचा खटला होऊन शिक्षा झाली त्यावेळीं सरहद्दीवर आफ्रिडी लोकांशीं युद्ध सुरू झाले होतें. बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी पुण्यास भरलेल्या कॉंग्रेसचे अध्यक्ष झाले होते; पुणेंकरावर सरकारची इतराजी झाली होती; टिळक बडखोर आहेत असें जाहीर झालें होते. हिंदुस्थानासंबधीं व त्याच्या भूगोलासंबधीं ज्ञान, इंग्लडांतील लोकांना यथातथाच होते. अशा वेळीं एका स्कॉच पत्रांत खालील प्रमाणे मजकूर प्रसिद्ध झालेला आढळला.

"Surendra Nath Banerjea a native of Berar, the well known capital of Behar, is the best known man in India

He was the president of the Indian National Congress which held its sittings at Poona——a mountainous tract near Afganistan—chiefly people by turbulent Bramhins, sometimes called Swatis or Afridis—who recently rose in rebellion againest the British Government, a leader of whom one Balgangadhar Tilak was recently arrested and imprisoned after incalculable loss of both life and money on the part of the English."

( ४ ) होमरूल संघासबधीं गोष्टी निघाल्या असतांना, लोकमान्यांस सुचविण्यांत आलें कीं, असा नियम केला जावा कीं, होमरूल लीगच्या प्रत्येक समासदानें खालील बाबी अवश्य पाळल्याच पाहिजेत:—

( १ ) स्वदेशीच कपडा वापरणें.

( २ ) सरकारी पदव्या व मानमरातब नाकारणें.

( ३ ) सरकारी नोकरींत न शिरणें.

तेव्हां लोकमान्य म्हणाले " तुम्ही तर हुबेहुब पार्नेलाइटपणा इकडे आणूं पाहातां ! तुमच्या अटी कठीण आहेत, अशांतलीहि गोष्ट नाहीं; परतु ह्या अटी घालण्याचें ठरविल्यास, आतां मिळत आहेत ते देखील समासद मिळणार नाहींत. तुम्ही तीन तरी अटी सांगतां, पण मी म्हणतो कीं, नुसती कापडासबंधीं स्वदेशी चळवळ करण्याचीच जर अट केवळ १०।१२ महिने पाळली तर या

इम्रजांचे जितके, धर्वे दणाणेल, तितके १०।१५ हजार लोकांच्या पलटणीनें वड उभारूनहि दणाणणार नाहीं. परंतु या १०।१२ महिन्यांच्या अवधींत प्रत्येकानें नायका खडतर व्रत पाळतात त्याप्रमाणें या बाबतींत वागलें पाहिजे. कसलींहि अडचण असो, स्वदेशी कापडाशिवाय कोणतेंहि कापड खरेदी करावयाचें नाहीं असा निश्चय व आचरण पाहिजे. श्रीमंतांनीं त्यांच्या आवडीप्रमाणें स्वदेशी कापड न मिळाल्यास, या अवधींत, कोणतेंहि कापडच खरेदी करू नये म्हणजे झालें. वस्त्रविरहित रहाण्याचा प्रसंग येवो अगर प्राणत्यागाचा प्रसंग येवो, विकत घ्यायचें तर स्वदेशीच कापड घ्यायचें, स्वदेशीशिवाय इतर कापडाची खरेदी वर्ज्यच केली पाहिजे. स्वदेशी म्हणजे सूत देखील हिंदुस्थानातलेंच पाहिजे; नाहींतर, मागें अहमदाबाद मीलने जसे विलायती सुताच्या धोतरजोड्या तयार करून स्वदेशी चळवळीची माती केली तसे व्हावयाचें ! हें कार्य एवढ्या थोड्या अवधींत यशस्वी करण्याकरितां "पिकेटिंग" हि करावे लागेल. प्रसंग पडल्यास तुरुगात जावे लागेल ! परंतु इतके सोसायला किती तयार होणार ! लोकांची सांप्रतची स्थिति तुम्ही पहातांच आहां !"

( ५ ) १९१८ त विलायतेस प्रयाण करण्यापूर्वी, होमरूल फंड जमविण्यासाठीं, वऱ्हाड मध्यप्रांतांत लोकमान्यांनीं दौरा काढला तेव्हां ते वर्धा जिल्ह्यांतून प्रवास करीत असतांना, सर्व ठिकाणीं त्यांच्या सन्निध रहाण्याचें भाग्य मला लाभलें व त्यावेळीं त्यांचे वन्याच विषयावरील विचार श्रवण करावयास मिळाले, त्यांतील कांहीं आठवणींनुसार, खालीं देत आहे:—

(अ) "माझ्या चळवळीस प्रथमपासून जर कोणाची सक्रिय सहानुभूति व मदत मिळाली असेल तर ती आपल्या हिंदी रेल्वे नोकरांची ! या रेल्वे नोकरांचे संघटण घडवून आणल्यास, पुढें मागें, त्यांची राष्ट्रकार्यास बरीच मदत होणार आहे. तारमास्तरांचा संप यशस्वी झाला असता तर पुष्कळच बहार झाली असती. परंतु असावी तशी त्यांच्यांत एक जूट नसल्यामुळें तो संप मोडला गेला. यापासून आपणास पुष्कळच बोध घेण्यासारखा आहे. त्रुटीशिवाय संप करणें अगर संपाचा बागुलबोवा दाखविणे राष्ट्रकार्यास घातक होईल."

(ब) लोकमान्यांस असें दर्शविण्यांत आलें कीं, या दौऱ्यांत आपण फार फार तर एक लाख रुपये जमवू शकाल, परंतु विलायतेंतील ( त्याची खाजगी कामगिरी नव्हे ) राजकीय कामगिरीसाठीं, ही एक लाखाची रक्कम अगदीं अपुरी पडेल; तेव्हां लोकमान्य म्हणाले "मला जी एक लाखाची "पर्स" तुम्हीं सर्वांनीं नजर केली आहे तिची मी या फंडातच भर घालणार आहे, शिवाय माझा खटला यशस्वी झाल्यावर चिरोलपासून मिळणारी मोबदला—रक्कमहि यांतच भर टाकणार आहे; व इतक्या उपरहि, कार्य

यशस्वी होत आहे, व एकमेमुळेच अडतें, असे दिसून आल्यास पुनः एकदां दौरा काढूं म्हणजे झालें !"

(क) "सर्व जगभर लोकशाहीची लाट उसळून क्रांति होत असतांना आपला हिंदुस्थान, स्वस्थ घोरत पडेल, हे संभवत नाहीं. फारफार तर १०।१५ वर्षांतच, इंग्रजांना अशी वेळ येऊन ठेपणार आहे कीं, त्यांना हिंदुस्थानच्या लोकांकडून लष्करी सैन्याची मदत घेतल्याशिवाय चालणार नाहीं, व ह्या मदतीसाठीं हिंदी लोकांना सरोस लष्करी शिक्षण देणे भाग पडणार आहे; त्यावेळी लष्करी सामर्थ्ययुक्त जय्यत सज्ज झालेल्या हिंदुस्थानची स्वराज्याची तहान भागविल्याशिवाय, इंग्रजाना गत्यंतर राहणार नाहीं. परंतु त्यावेळीं सर्वजण एकजूट झाले पाहिजेत. नाहीं तर, आतां म्हणतात तसें 'एवढ्या मोठ्या सुधारणा जहाल मागतात तितक्या नको,' असे म्हणणारे "सवत-सुभे" उभे राहून म्हणूं लागतील, 'साहेब, एवढे मोठे स्वराज्य आम्हांला नको.' एकजूट झाल्याशिवाय कोणतेहि राजकारण घडून येणें शक्य नाहीं. राजकारण म्हणजे कांहीं सोपी गोष्ट नव्हे. धोरण बांधून प्रतिपक्षाला चीत करायचे असतें व हे करीत असतांना राग, द्वेष याचा मागमूसहि दिसू न देतां हांसत मुख रहावें लागते, ते निराळेच. राजकारणाचा डाव मोठा चमत्कारिक आहे, तो इतर खेळासारखा संपणारा नसून अहर्निश, पुढें जास्त जास्त वाढत जाणारा आहे, व खुबी आहे कीं, या खेळांतील प्रत्येक भागाची समाप्ति ( वरपगी ) तडजोडीने होत असते; परंतु सदरहु तडजोड विरुद्ध पक्षावर लादावी लागते. Politics is like a non-ending game, in which every stage is reached, apparently, by compromise, but this compromise has to be thrusted on the opposite side."

(ड) "माझ्या नांवाने चिरोल, टाईम्स वगैरे सारख्यांनीं खडे फोडले तर त्याचें कांहीं आश्चर्य नाहीं; त्याची येथील चैन बंद पडावी म्हणून तर आमची चळवळ; तेव्हां त्यांना तें न खपणें रास्तच आहे. पण आमच्यांतीलच जेव्हां, त्या चिरोल, टाईम्सची 'री' ओढतात तेव्हां मात्र संताप येतो. आज जर असले घरभेदे नसते तर लोकजागृति करायला इतके प्रयास कशाला पडते; व लोक जर तयार असते, तर मग पुढारी व्याख्यानाचा दौरा न काढतां हातांत तरवार घेऊनच नसते का बाहेर पडले ? अहो लोक तयार नाहींत म्हणूनच तर आमच्या पाठीमागें सरकारचा "ससेमिरा" आहे; लोक तयार झाल्यावर, एक दिवसहि हें सरकार येथें टिकणें शक्य नाहीं."

( ५ ) "इंग्रजांच्या उदारपणाची टिमकी वाजविणाऱ्या मवाळ लोकांनीं इंग्रजांस ओळखलेंच नाहीं; ते या घटकेस एकास गोंजारतील, तर दुसऱ्या घटकेस त्यानें चंचुगवाळें घेऊन फेकून देतील. आपणा सर्वांच्या बारशाला इंग्रज जेवले आहेत हें यांना कळत नाहीं; इंग्रजांना नुसतें ओळखून तरी काय फायदा ? त्यांच्या डावास प्रतिडाव खेळण्याचें धाडस केलें तरच राष्ट्र-कार्यास फायदा होईल !"

( ६ ) लोकमान्यांच्या शिकवणीचा एकंदर मतितार्थ असा दिसला कीं, या नोकरशाहीशीं मिळून मिसळून राहून कदापिहि निभणार नाहीं: नेहमीं झगडत राहण्यांतच फायदा होईल; विजय मिळणार नाहीं म्हणून झगडायचें नाहीं या वृत्तीनें राहिल्यास नोकरशाही डोईजड होईल. उलट झगडा सुरु ठेवल्यानें तिची शक्ति अजमावली जाऊन आपली शक्ति कोठें, कशी, व किती कमी पडते, याचें ज्ञान होऊन त्याबरोबरच तिच्या डावपेचाची ओळख पटून आपणहि त्यावर प्रतिडाव अगर मात करण्याचें शिकून तयार होऊं.

---

## सौ. मनुताई खापर्डे.

[ लोकमान्यांचे परमस्नेही कै. श्रीमंत बाबामहाराज यांची कन्या, श्रीयुत बाबासाहेब खापर्डे वकील अमरावती याचें कुटुंब. ]

माझे वडील कै. वा. श्रीबाबामहाराज वारल्यानंतर लो. मा. टिळकांनीं आम्हां सर्वांस म्हणजे आम्हां तिघा बहिणींस स्वतःच्या कन्येसुलीप्रमाणें अत्यंत प्रेमानें वागविलें. त्यांतल्यात्यांत इतरांपेक्षां पुण्यास जाण्यायेण्याचा व राहण्याचा प्रसंग मला पुष्कळ अधिक आल्यामुळें व घराण्या-घराण्याचें दळणवळण आणि सलोखा अधिक वाढल्यामुळें मला त्यांचा सहवास अधिक घडला. मी पुण्यास गेलें म्हणजे त्यांच्या वाड्यांतच उतरत असे आणि दर खेपेस चोळी बांगडी केल्याखेरीज त्यांनीं मला कधीं परत केलें नाहीं. अगदीं स्वतःच्या मुलीप्रमाणें माझ्याशीं प्रेमानें बोलत किंबहुना कांकणभर अधिकच प्रेमानें बोलत व एके प्रसंगीं तर ते १॥–२ तास सारखे बोलत बसले. माझ्याशीं बोलावयाला ह्यांना इतका वेळ सांपडतो कसा याचें मला त्यावेळीं नवल वाटत असे. पण आज त्याचें फार कौतुकहि वाटतें व एवढा मोठा मनुष्य आपण डोळ्यांनीं पाहिला एवढेंच नव्हे तर त्यांनीं आपल्यावर मुलीप्रमाणें प्रेम केलें याबद्दल धन्यता वाटते. त्यांनीं आमच्यावर व श्रीबाबामहाराजांच्या घराण्यावर जे उपकार केले ते आजन्म

फिटणार नाहींत. आजहि " माहेर " म्हणून त्यांची आठवण होते व त्यांचाच वाडा आठवतो. माझे दत्तक बधू श्री. जगन्नाथमहाराज यांचें पहिले कुटुंब वारलें तेव्हां मी पुण्यास गेले होते. माझ्या भेटीला म्हणून लोकमान्य महाराजांच्या वाड्यांत आले होते व पुष्कळ वेळ बोलत बसले. त्या दिवशीं ते म्हणाले " मनुष्य सुखासाठीं जन्मतच नाहीं. जो मनुष्य सुखाची आशा करतो तो निराश होतो." हे शब्द माझ्या इतके मनांत बसले कीं, त्यानंतर ते मला वारवार दुःखाच्या व सकटाच्या काळीं आठवले व त्या त्या प्रसंगीं दुसऱ्या कशानेहि झाले नाहीं इतके समाधान या शब्दांच्या आठवणीनें झालें. माझ्या जन्मांत मला तो एक धडा मिळाला असे मी समजत्यें व हा धडा जन्मभर कामीं पडणार आहे.

महाराजांच्या वाड्यांत भूतचेष्टा असल्याबद्दल संशय आहे असे श्रीजगन्नाथ महाराज त्यांस म्हणाले तेव्हां ते म्हणाले " रिकामें मन असले म्हणजे असे वाटते. घोड्यावर बसून खूप व्यायाम करा म्हणजे चांगली झोप लागेल. प्लॅटफार्मवर उभा राहिलो म्हणजे माझ्याहि अगांत भूत येत असतें. खाली उतरलों म्हणजे जातें. !" प्लेगमुळे उमरावती नजीक बडनेर मुक्कामीं आम्ही रहात होतों व माझ्या मुलाची तेथेंच मुंज झाली. या प्रसगीं लोकमान्य आले होते व प्रसगापेक्षां त्यांसच पाहण्यास पाहुणे अधिक आले होते. मुंजीच्या वेळीं मामा जवळ पाहिजे म्हणून माझे मामजी दादांना ( टिळकांना ) म्हणाले " आतां मुलाला मामा कोठून आणूं ? बळवंतराव तुम्हींच व्हा मामा " तेव्हां खरोखरीच " हो, हो, माघार घेतो कीं काय ? " असे म्हणून बोहोल्याजवळ उभे राहिले व मुंज लागली. अर्थात् मुलाचे नशिब मोठें म्हणून सर्व वाखाणूं लागले. तेव्हां मला केवढा आनद झाला असेल तें सांगून समजणार नाहीं.

त्यांच्या ठिकाणीं माझी देवासारखी भक्ति होती व त्यांची तसबीर माझ्या देव्हाऱ्यांत आहे, तिची मी नित्य पूजा करीत असत्यें.

---

## सीताराम बाबाजी गुर्जर.

( मुंबई, जगन्नाथाचे चाळींत राहणारे एक बहुश्रुत वृद्ध गृहस्थ, कवि, 'वार्ता-हरा'चे संपादक; 'सीता,' 'उदार दामोदर' नाटक वगैरे पुस्तकांचे कर्ते, व ' अनंता ' पूर्वीचे केसरीचे बातमीदार. )

( १ ) सुमारें ६० वर्षांपूर्वीची ही गोष्ट असेल ! त्यावेळीं सर्व महाराष्ट्रात रत्नागिरीस मराठी, संस्कृत व इंग्रजी शिक्षण फारच चांगलें होत असे. मुंबई विश्वविद्यालयाचे पहिले एम्. ए. पदवीधरांपैकीं प्रसिद्ध विद्वान व पंडित विद्यमान डॉक्टर रामकृष्ण गोपाळ भांडारकर हे त्यावेळीं हायस्कूलचे हेडमास्तर असून त्यांचे हाताखालीं गुंडोशास्त्री नांवाचे हुषार व फार कळकळीनें संस्कृत शिकविणारे शास्त्री होते. वरच्या पहिल्या नंबरच्या मराठी शाळेंत गंगाधर रामचंद्र टिळक हे मुख्य गुरुजी होते व विठोबाच्या देवळाजवळ खालच्या दुसऱ्या नंबरचे शाळेंत शिवराम भास्कर काणे हे होते. हे दोघेही मुख्याध्यापक विद्वान असून गणित विषयांत फारच हुषार होते. उभयताहि ग्रंथकर्ते होते. शिकविण्याची हौस व कला या दोघांहि गुरुवर्यांचे ठिकाणीं अतोनात असे. यामुळें त्या काळीं तेथें शिकलेलीं पुष्कळ मुलें पुढें नांवलौकिकास चढलीं. गोलीय त्रिकोणमिति हा उच्च प्रतिचा गणितसंबंधीं ग्रंथ गंगाधरपंतांनीं केला होता. काणे हे त्यावेळीं सुबक 'भूगोल' तयार करीत असत. व गणितसार म्हणून त्यांचें एक पुस्तक छापण्यांत येत होतें. टिळकशास्त्री हे जसे गणितज्ञ तसेच वाङ्मयोपासकहि होते. त्यांनीं केलेल्या लघुव्याकरणावरूनच हा लेखक प्रथमतः मराठीचें व्याकरण शिकला आहे. हें व्याकरण तिकडे त्यावेळीं सरकारी शाळांतून चालत असे. या पुस्तकाचा मालकी हक्क सरकारनें ग्रंथकर्त्यांपासून मागितला होता; परंतु रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलिक यांच्या सल्ल्यानें गंगाधर शास्त्र्यांनीं तो देण्याचें नाकारलें. त्यामुळें रा. ब. दादोबा पांडुरंग तरखडकर यांजकडून सरकारनें नवीन लघुव्याकरण करवून तें शाळांत चालू केलें, म्हणून प्रसिद्ध गणपत कृष्णाजीच्या छापखान्यांत छापलेल्या शास्त्रीबोवांच्या व्याकरणाच्या पुष्कळ प्रती घरीं पडून राहिल्या. या सर्वानें गंगाधरशास्त्री यांस झालेला तोटा रा. सा. मंडलिक यांनीं स्नेहभावानें भरून दिला. असो; त्यावेळीं ह्या आठवणीचा नायक ' गुरुजींचा बाळ्या ' आठ-नऊ वर्षांचा असेल. याची नुकतीच मुंज झाली होती. रत्नागिरीस मधल्या आळींत एक अतिशय सत्वस्थ अशा बाळशास्त्रीबोवा देवस्थळी पुराणिक यांच्या घरीं हा लंगोटी नेसलेला मुलगा वारंवार त्यांच्या मुलांबरोबर खेळावयास व गप्पा मारण्यास येत असे. त्यावेळीं ह्याची शब्दरूपावळी, धातुरूपावळी व समासचक्र होऊन अमरकोशाचीं तीनहि काण्डें अगदीं मुखोद्गत जाहलीं होतीं. 'बाळ्याचे' वडील हे त्यास पचपंच उषःकालीं उठवून पुरुषसूक्त वेदाक्षरांचाहि अभ्यास कर-

घून घेत. आणखी त्यांच्या तीर्थरूपाकडे गणितसंबंधीं कठिण प्रश्न व शंका घेऊन पुष्कळ विद्यार्थी येत असत. वरील कारणांनीं बळवंतराव टिळक हे पुढें गणितशास्त्रविशारद व संस्कृत पंडित झाले यांत संशय नाहीं. वरील देवस्थळी पुराणिक याजकडे बळवंतरावजींची मातापितरें भागवतभारतादि श्रवणास बहुधा दररोज सध्याकाळीं येत असत व हा त्यांचा मुलगाहि कधीं कधीं येत असे. अशा पौराणिक ग्रंथांकडेहि त्यांच्या तीव्रतम बुद्धीचा यथाकालीं ओघ वळला असावा.

(२) सन १८७४ मध्ये ह्या आठवणीचा जन्म आहे. त्या सालीं कोण्या एका फॉरेस्ट नांवाच्या साहेबांची, पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत, गणित विषयाचे अध्यापक म्हणून नेमणूक झाली. हे गृहस्थ अगोदर मुंबईत सेक्रेटेरीयटमध्यें रेकॉर्डच्या कामावर मुख्य होते. ह्यांचे इंग्रजीचें ज्ञान चांगलें होतें; पण ते गणित शिकविण्यास अयोग्य होते, असे म्हणत. 'हे साहेब आपल्यास शिकविण्याचे कामीं पसत नाहींत, दुसऱ्या लायक मनुष्याची त्या जागेवर योजना व्हावी,' अशा आशयाचा वरील कॉलेजांतील त्या वेळच्या कित्येक विद्यार्थ्यांच्या सह्यानिशीं तत्कालीन इलाखाधिपतींकडे अर्ज गेला. खालीं सह्या करणारांपैकीं पहिली सही करणारा कोण आहे, हे न समजावें म्हणून त्या वैश्वदेवांतील मण्डलाप्रमाणें वर्तुलाकृतींत केल्या होत्या! ही युक्ती टिळकांनीं सुचविली! प्रिन्सिपाल साहेबांच्या परवानगीवांचून हा अत्युच्च अधिकाऱ्याकडे पाठविलेला अर्ज उभय साहेबांच्या तीव्र रोषास पात्र झाला, हे सांगणें नकोच. ह्या चळवळ्या विद्यार्थ्यांमध्यें टिळक व दाजी साहेब खरे हे प्रमुख होते! सरकारच्या रोषरूपविषाचे बीज तेव्हांपासून बळवंतरावांच्या अंगांत भिनू लागले! बळवंतराव म्हणूनच तें त्यांनीं लोककल्याणार्थ शंकराप्रमाणे सहन केले! अस्तु; त्या अर्जावर सह्या करणाऱ्या सर्व व्यक्तींस एक वर्ष परीक्षेस जाण्याची मनाई केल्याची शिक्षा ठोठावण्यांत आली. मग त्यास यथाकालीं माफी दिली किंवा नाहीं ते कळले नाहीं! पण सरकारी शिक्षा खाण्याचा टिळकांचा हा असा बालाभ्यास होता.!

(३) राष्ट्रीय सभाविषयक यच्चयावत् सर्व ताजी वार्ता मराठी वाचकास दररोज कळावी म्हणून टिळक हे वासुदेवराव केळकरादि सर्व संपादक व आर्यभूषण छापखान्याचे व्यवस्थापक हरि नारायण गोखले वगैरे मंडळींस घेऊन मुंबईस गणपत कृष्णाजीचे छापखान्यांत दैनिक 'केसरी' काढण्याकरितां आले होते. सदरील सर्व छापखाना मालकांनीं ह्या पुणेंकर पाहुणे मंडळीच्या हवालीं केला होता. येथें किती दिवस 'केसरी' निघाला, हें आतां बरोबर स्मरत नाहीं. तरी पण १०-१२ अंक निघाले असावेत, असें वाटतें. या सर्व साहसाचें आदिकारण लोकमान्यच होत.

( ४ ) पुण्यामध्यें १८९५ त होणाऱ्या राष्ट्रीय सभेसाठीं द्रव्यसाहाय्यार्थ शहरांत इतर मंडळींसह बळवंतरावजी फिरत असता नारायण पेठेंत रा. ब. श्रीराम भिकाजी जठार यांचे घरीं जाण्याचा त्यांजवर प्रसंग आला. सर्व मंडळी माडीवर गेली. टिळक हे जठारांच्या प्रतिपक्षांतील असल्यामुळें ते मात्र खालीं बाहेरच जिन्याचे पायऱ्यांवर बसले ! हे वृत्त रा. ब. जठार यास कळताच लोकमान्याजवळ येऊन त्यांचा हात धरून नेऊन त्यास वर दिवाणखान्यात बहुमानपुरःसर योग्य स्थानीं बसविलें व पुढें बोलतां बोलतां टिळकाची विद्वत्ता, देशाभिमान इत्यादि अनेक गुणांचे वर्णन करून त्याचे केसरीची स्तुति केली व ते म्हणाले कीं, "मी जरी केसरीचा वर्गणीदार नाहीं, तरी प्रत्येक केसरीचा अंक विकत घेऊन मी अगोदर वाचतो. तुमचें अन्तःकरण लोककल्याणाविषयीं कसे व किती तळमळतें आहे हे मला स्पष्ट समजतें. तुमचा आमचा कांहीं खाजगी किंवा व्यक्तिविषयक द्वेष नाहीं. मतांतर असले म्हणून आपल्या सारख्या सद्गृहस्थानीं आमच्या घरांत येऊ नये, हें पाहून मला फार वाईट वाटते. आम्ही तुम्ही एकाच महाराष्ट्रांतील व एकाच शहरांतील राहणारीं माणसे ! मग असे का ? " बळवंतराव यावर विशेष कांहीं न बोलता "हे काम महाराष्ट्राचें खरे, पण सर्वांशीं पुणेंकरावर ह्याचे ओझें आहे, हे आपणांस माहीतच आहे." इतकेंच म्हणाले. टिळकांचे कडे पहात लगेच यादीवर जठारांनीं आंकडा घातला व संतुष्ट होऊन टिळक हसत तेथून बाहेर पडले.

( ५ ) मुंबईत शान्तारामाचे चाळींत रघुनाथ मोरेश्वर बाकणकर नावाचे एक सद्गृहस्थ 'टाईम्स ऑफ् इंडिया' चे ऑफिसांत कॅशर होते. 'केसरी' व 'मराठा' हीं वृत्तपत्रें भरभराटीस येण्याविषयीं हे मुळापासून कळकळीने व अभिमानपूर्वक फार फार झटत असत. इंग्रजी पत्रकार आपल्या वर्तमानपत्राच्या वृद्ध्यर्थ कसकसे यत्न करतात, वगैरे त्यांस पूर्णपणें माहित होतें. त्याचा प्रयोग ते यथाशक्ति या पुण्याच्या नियतकालिकांवर करीत असत. कधीं पुण्यास येऊन ते संपादकमंडळास मोकळ्या मनाने व निरपेक्ष बुद्धीनें टाइम्सच्या सवधानें माहिती देत, कधीं मुंबईतील होतकरू लिहिणारांस त्यांचे घरीं जाऊन अमुक विषयांवर तुम्ही लिहा, अमुक ठिकाणीं आज सभा आहे तर तेथें जाऊन तेथील हकीगत मजजवळ लिहून द्या, अमुकाचे अमुक कारणामुळे पुढील केसरींत अल्प चरित्र तरी आलेंच पाहिजे, असें कोणास सांगत व असा मजकूर घेऊन पुढील सर्व व्यवस्था आपण करीत. बोरीबंदरावर ह्यासाठीं रविवारीं रात्रौ गाडीच्या वेळीं बांकणकर हे किती तरी वेळ दिसत असत. टपालाची वेळ चुकून गेली मग कोणी चांगला मनुष्य आपला लखोटा केसरींत देणारा न भेटल्यास कधीं ते स्वतः आगगाडींत बसून पुण्यांतील काम करून लगेच परत येत व तसेच ते परस्पर कचेरींत जात ! ह्याप्रीत्यर्थ स्वतःच्या खर्चाची किंवा गैरसोईची

-ते कधीं पर्वा करीत नसत. मुबईंत ह्यांची सर्वत्र ओळख असे. त्या कचेरींत वांकणकर हे फार प्रिय असून त्यांचा पोषाख त्यावेळीं सभ्य मानलेला ब्राह्मणी पद्धतीचा असे. कशामध्यें तें बरोबर स्मरत नाहीं–पण त्या छापखान्यांत मुद्रित झालेल्या एका पुस्तकांत ब्राह्मण कसा दिसतो, म्हणून जे एक छायाचित्र दिलें होतें ते ह्या राघोपंताचेच होते.

त्यावेळीं वरील वर्तमानपत्राशीं संबंध असणाऱ्या सर्व विद्वानांशीं याचा स्नेहसंबंध होता. त्यांत बळवंतरावांशीं तर विशेष जडला. कोल्हापूरप्रकरणांत मुबईंत वांकणकरांनीं आपली खडतर नोकरी संभाळून अविरत श्रम केले होते. टिळकाचे वांकणकरावर अतोनात निष्कपट प्रेम व त्यांचेविषयी आदर असे. मुंबईस आल्यावर टिळक त्यांची भेट घेतल्याशिवाय कधींहि राहात नसत.

(६) मुंबईंत जगन्नाथाचे चाळींत श्रीगणपत्युत्सवांत लोकमान्यांस पानसुपारी करण्याचें ठरलें. लोक फार उल्लसित झाले! टिळक यावयाचे म्हणजे तेथें विलक्षण गर्दी व्हावयाची! त्यावेळीं त्या पुराणमताभिमानी चाळींतील सौ. लक्ष्मीबाई रिसबडकर यांनीं स्वयप्रेरणेनें स्वागतपर सरस व समयाला उचित अशा आर्या रचल्या होत्या. वरील कवियित्री–'केरळ–कोकिळचे' संपादक आठल्ये यांची कन्या, हिने उभय प्रसगीं केलेल्या स्वागतार्यापैकीं मासल्याकरितां एक एक आर्या देऊन ही फारा दिवसांची आठवण विस्तरशः न देतां थोडक्यांत संपवितो—

**स्तुति किति अल्पमतीनें करणें? यश थोर आपुलें आर्या।**
**यास्तव सुमनें अभिनव सुमनासम अर्पिल्या पदीं आर्या॥**
**वर्णावे भाग्य किती बलवन्ताचा अखण्ड सहवास।**
**लाभे तुम्हां गमे हें युष्मत्कृत पूर्वसुकृतबल खास॥**

(७) मुबईंत श्रीगणपत्युत्सवात बहुधा प्रत्येक संस्थेंत रविवारी महाप्रसाद होत असे. श्रीगजाननापुढें भक्ति, श्रद्धा, भाव, आनंद वगैरे सन्मनोभावना सर्व स्त्रीपुरुषास व्यक्त करण्यास हा प्रसंग मोठा गंभीर असे. सर्वोत्सवांत हा दिवस सर्वांस परमप्रिय वाटत असे. परन्तु लोकमान्यांनीं कारागृहात कदन्न खावे, आणि आपण मिष्टान्नात गर्क असावे हें बरे नाहीं असे वाटून हें महाप्रसादाचे सदर लोकानीं कमी केलें. शिक्षेंतून मुक्त झाल्यावर कोठें कोठें पुनः महाप्रसादास आरंभ झाला. पण सहा वर्षांच्या त्याच्या शिक्षेमुळे लोकांच्या जिवास चटका लागल्यामुळें ह्या आवडत्या सदरास जी एकदा रजा मिळाली ती अजून कायमच आहे.

(८) प्रो. श्रीधर गणेश जिनसीवाले व त्यांचे शिष्य बाळ गंगाधर टिळक, यांचा फारच स्नेह व घरोबा होता. ते एकमेकांची विद्वत्ता व योग्यता जाणत असत. जिनसीवाले हे कित्येकांचे मतें आग्रही, कडक व एकांकली असले तरी फार

प्रेमळ व साधे होते. टिळकांनीं थोडे तरी कर्मठ असावें, सार्वजनिक कितीहि कामें त्यांचे मागें असलीं तरी त्यांनीं निदान तीन अर्घ्य देऊन दहा गायत्री जपाव्या, असें स्वकर्मरत जिनसीवाले ह्यांस वाटत असे. टिळकांवर आलेल्या मधल्या संकटाचे वेळीं एकदां प्रोफेसरसाहेब मुंबईत समुद्रतीरीं हवा खात बसले असतां मीं जवळ असतां त्यांना रडतांना पाहिलें आहे. टिळक सुटतील कीं नाहीं ह्याचा त्यांना रात्रंदिवस ध्यास लागला होता. टिळकांची ते वारवार कुंडली पहात. परंतु सरकारनें वर्तविलेल्या त्याच्या पत्रिकेत हे ज्योतिषी आंकडे मांडून अधिक तें काय वर्तविणार !

(९) मुंबई कायदेकौन्सिलांत लोकमान्य निवडून आल्यावर तेथील ब्राह्मणसभेनें काळबादेवी रस्त्यावरील आंग्रे यांचे वाड्यांत रात्रौ पानसुपारी केली. लोकांची अतिशय गर्दी झाली. डॉ. भालचंद्र कृष्ण भाटवडेकर हे अध्यक्षस्थानीं होते. स्वागतपरकविता करण्याचा मान चिटणिसांकडून मला मिळाला होता. त्यातील पहिली वदनपर असल्यामुळें पुढें दिली आहे.

> बुद्धिवरं सन्मतिदं गंगाधरपार्वतीसुतं बालम् ।
> गणनाथं कुलतिलकं प्रातं रत्नं नमामि रत्नगिरेः ॥

(१०) सन १९१६ च्या एप्रिल महिन्यांत कोणी एक सगोदावरीप्रांतस्थ वृद्ध तैलंगशास्त्री जवळ कांहीं द्रव्य नसता वाटेत जे कांहीं भिक्षुकवृत्तीनें मिळेल तें घेऊन काशीयात्रेस एकटाच निघाला. त्याची आमची रात्रौ प्रयागातील दारागंज स्टेशनावर काशीस जात असतां गांठ पडली. त्या शास्त्रीबोवांनीं माझ्या डोक्यावरील दक्षिणी तांबडी पगडी पाहिली व लगेच ते " महाशयस्तिलकः " इत्यादि संस्कृत बोलावयास लागले व मला पुण्यपत्तनस्थ टिळक माहीत आहेत काय म्हणून विचारलें व गाडींत बसल्यावर त्या भाषेत बोलूं लागले. मला मात्र तें काम भराभर झेपेना. तात्पर्य कीं, ते म्हणाले " सात आठ दिवसांपूर्वी मी पुण्यास दोन दिवस टिळकांचे वाड्यांत वेदान्तावर व अनेक गूढ विषयांवर वादविवाद करीत असें. रोज त्यांचे पंक्तींत भोजन करी. निघताना त्यांनीं मला द्रव्यसाह्यहि केलें; त्यांचें नांव लोकांस सांगून शहरांत फिरतांच मला बरेंच द्रव्यसहाय्य झालें. " त्या विद्वान् संस्कृत शास्त्रीबोवांनीं लोकमान्यांच्या विद्वत्तेची अत्यंत प्रशंसा केली व असा अष्टपैलू पुरुष देशास पुन्हा लाभणें कठीण असे उद्गार काढले.

(११) टिळकांचें नांव फक्त लहानमोठ्या शहरांतूनच केवळ बहुश्रुत मंडळीस माहीत होतें असें नाहीं; तर लांचलांबच्या लहान मोठ्या खेड्यापाड्यांतूनहि अडाणी व अज्ञ लोकांस तें, ज्ञानदेव तुकाराम यांच्याप्रमाणें हा कोणी तरी आपला हितकर्ता आहे या भावनेनें, माहीत होतें. सन १९१७ सालीं

दक्षिण कोंकणांत मी आपल्या कशेळ गांवीं गेलो असतां तेथे होलिकोत्सवाला जाण्याचा मजवर प्रसंग आला होता. त्या स्थळीं एका ग्रामदेवतेच्या देवळाच्या रम्य व विस्तीर्ण पटांगणांत त्या दिवशीं अखिल स्पृश्यास्पृश्य लोक भेदभाव विसरून एकत्र होत असतात. महार लोक मोठमोठे ढोल गळ्यांत अडकवून तालावर बडवीत होते. वाजंत्री वाजत होतीं. सर्वांच्या चेहऱ्यांस सर्वत्र गुलाल फासलेला होता. अशा थाटांत या अनेक जातीय पुरुषांच्या वार्षिक संमेलनांत होळीसाठीं पुरावयाचे झाड लोक नाचवीत नाचवीत नेमलेल्या खड्याजवळ आणीत होते. त्यांतच एक गुलालानें माखलेली त्या गांवची वरीच वर्षे वेड लागलेली एक भंडारीण बाई त्या वाद्यांचे नादावर तोंडाने "माझे टिळक माझे टिळक" म्हणत खूप जोरानें शरीराची पर्वा न करितां नाचत होती.

(१२) आमचा एक सुशिक्षित,सुशील, पदवीधर स्नेही टिळकांचा केवळ अंध भक्त किंवा चाहता होता असे नाहीं, तर त्यांच्या विद्वत्तादि अनेक गुणांचा ग्राहक होता. सरकारच्या विरुद्ध किंवा सरकारास कळविण्यासारख्या केसरींतील लेखांचे इग्रजी भाषान्तर करण्याचें सतत काम करणारापैकीं हे एक कामगार असल्यानें टिळकांची विद्वत्ता, योग्यता, देशाविषयीं अत्यंत कळकळ व जाज्वल्य देशाभिमान इत्यादिकांची त्यांस पक्की ओळख होती. व त्यामुळे लोकमान्यांविषयीं त्यांचे मनांत पूर्ण आदर वसत असे. परंतु हे गृहस्थ सार्वजनिक समुहांत लोकमान्यांचे नांव कधींही चुकून सुद्धां घेत नसत. १९१९ च्या प्रसिद्ध चिरोल प्रकरणामध्यें यांना टिळकांच्या व तत्संबंधीं अनेक लेखांचें सर व्हॅलेन्टाइन चिरोलसाठीं भाषांतर करावें लागलें.

पुढे असें झालें कीं, ह्या गृहस्थावर ह्याच प्रकरणामध्ये टिळकांनीं क्रॉस एक्झामिनेशन घेण्याचा बिकट प्रसंग आला ! तेव्हा त्यांना फार वाईट वाटलें. कारण, पूर्वी एका खटल्यांत ह्यांचेच एक अतिशय तरतरीत व हुशार व्यवसायबंधु भास्कर विष्णु जोशी यांना लोकमान्यांनीं ह्या तपासणींत किती व कसें छेडलें होतें व पुढें त्यांचें देहावसानहि ऐन तारुण्यांत लवकर कसें झालें, हें वरील भाषांतरकारांना पूर्णपणें माहीत होतें. ह्या परिक्षेसाठींच ह्यांना दादोबाचें मोठें व्याकरण हातीं घ्यावे लागलें असेल ! असो; नेमल्या दिवशीं प्रो० टिळक यांनीं परीक्षा घेतली. लोकमान्यांचे विरुद्ध व सर्व लोकास अप्रिय असे प्राक्तनकर्मानुरूप कृत्य आपल्या हातून घडलें, हें बरे झाले नाहीं, असें त्यांच्या मनाने घेतलें. अशा दूषित मनाचा परिणाम त्यांच्या देहावर हळुहळू घडला. बहुतेक तेव्हांपासून हे सद्गृहस्थ अनेक प्रकारच्या रुग्णावस्थेंत असून, ऑपरेशन, हवापालट, नानाप्रकारचीं औषधें ह्या उपायांत ते गुतले होते आणि शेवटीं अशक्तता व अस्वास्थ्य यांचे तावेदार होऊन दोनतीन महिन्यापूर्वी मृत्यु पावले, हें लिहिण्यास फार वाईट वाटतें. तात्पर्य, टिळकांशीं द्रोह, हेंच आपल्या रोगाचें

कारण असून पुढें आपल्या मृत्यूचेंही तेंच कारण होणार असें त्या विद्वान, समयज्ञ व आपलें कर्तव्य करणाऱ्या मनुष्यास वाटत होतें, असें म्हणतात हें आश्चर्य होय !

---

## गोविंद सखाराम सरदेसाई

[बी. ए. न्यूइंग्लिश स्कुलांतील लोकमान्यांचे एक शिष्य, प्रसिद्ध इतिहासकार, बडोदें.]

(१) फर्ग्युसन कॉलेज स. १८८५ सालीं सुरू झालें त्याच वर्षी मी पुण्यास त्या कॉलेजांत दाखल झालों. त्यावेळीं गणित, म्हणजे भूमिति व बीजगणित, हा विषय आणि संस्कृतचा एक भाग म्हणजे भर्तृहरीचीं शतकें आम्हास लोकमान्य शिकवीत असत. मी रत्नागिरीहून पुण्यास आलेला बाहेरचा विद्यार्थी असल्यामुळें, टिळक व आगरकर या सुप्रसिद्ध नावांचा एवढा मोठा धाक मनांत वाटे कीं, त्यांच्याशीं सलगी करण्यास धैर्य होत नसे. मात्र न्यूस्कुलांतून आलेले त्यांचे पूर्वीचे विद्यार्थी अगदीं नि:शंकपणें त्यांच्यापुढें जाऊन पाहिजे ती चर्चा करीत. याबद्दल त्या विद्यार्थ्यांचा आम्हां बाहेरच्यांस मोठा हेवा वाटे. तथापि त्यांच्या शिकवण्याचा माझ्या मनावर कॉलेजांत कायमचा परिणाम घडल्याचें आठवतें त्यांत लोकमान्य हेच प्रमुख होते. फर्ग्युसन कॉलेजला त्यावेळीं एकच वर्ग शिकविण्याची परवानगी असल्यामुळें, स. १८८५ सालीं प्रीव्हियस झाल्यावर मला मुंबईस एल्फिन्स्टन कॉलेजांत यावें लागलें आणि लोकमान्यांचा संबंध सुटला. भर्तृहरीचीं नीति व वैराग्य शतकें शिकवितांना, काव्य, व्याकरण, तत्त्वज्ञान वगैरे अनेक अनुषंगिक मुद्यासंबधानें, गंगेच्या प्रवाहासारखा, लोकमान्यांच्या वाणीचा प्रशांत पण बलवान ओघ सारखा चालू असे. तो अद्यापि आमच्या कानांत घुमतो आहे असें वाटतें. भूमिति शिकवितांना कोणा विद्यार्थ्यास फळ्याजवळ बोलावून त्याजकडून आकृति काढवितांना मर्जीप्रमाणें पाहिजे तीं अक्षरें घेण्यास ते सांगत. कित्येक आकृतींत इंग्रजी अक्षरपट बहुतेक सर्व खलास होऊन जाई. लोकमान्यांची पाठ फळ्याकडे असे. तरी मागें वळून वळून फळ्याकडे बिलकूल न पाहतां सर्व अक्षरें ध्यानांत ठेवून ते प्रमेयांतील एका पुढील एक पायरी बिनचूक बोलत जात आणि विद्यार्थ्यांची चूक लगेच दाखवीत, तें पाहून आम्हा सर्वांस मोठा अचंबा वाटे. त्याचप्रमाणें बीजगणितांत permutations and Combinations हा भाग शिकवितांना पाश्चात्य व्यवहारांतलीं उदाहरणें न देतां आपल्याकडच्या मुलांमुलींच्या खेळांतलीं व सामाजिक व्यवहारांतलीं सर्वांच्या परिचयाचीं निरनिराळीं अनेक उदाहरणें घेऊन ते तो

विषय इतका मजेदार समजवीत कीं, त्याच्या निरीक्षणशक्तीचें सर्वांस मोठें आश्चर्य वाटे. विद्यार्थ्यांनीं केव्हांहि येऊन शंका विचारल्या तरी त्यांस कटाळा वाटत नसे. कॉलेज सुटल्यावर घरीं जातांना रस्त्यानें सुद्धां विद्यार्थ्यांचा घोळका त्यांजबरोबर चर्चा करीत जात असे. पाहिजे त्या विषयांत श्रोत्यांशीं समरस होण्याची त्यांची हातोटी अप्रतिम होती. त्यांस राग आलेला असा आम्हास कधीं दिसलाच नाहीं. वर्गांत थट्टा वगैरे कधीं न चालतां गंभीर व्यासंगाचें वातारणच परिपूर्ण नांदत असे.

(२) पुढील आयुष्यांत एकदां मी त्यांस मुद्दाम भेटण्यास गेल्याचें आठवतें. ब्रह्मदेशच्या प्रवासानंतर त्यांनीं एक व्याख्यान दिलें होतें. तत्संबधीं कांहीं मुद्यांची चर्चा, मी त्यास भेटून केली. त्यावेळीं ब्रह्मदेशच्या इतिहासासंबधीं अनेक उपयुक्त ग्रथांची यादी त्यांनीं मला दिली. परंतु हा विषय ब्रिटिश रियासतीच्या उत्तरार्धांत यावयाच्या असल्यामुळें अद्याप ती यादी मजजवळ पडून आहे. लोकमान्य मजवर लोभ ठेवीत व इतिहासाच्या कामांत मला प्रोत्साहन देत. परतु त्यांचा बहुमोल वेळ निष्कारण घेण्यास मला संकोच वाटत असल्यामुळें, कारणाशिवाय त्यांस भेटण्याचा माझा प्रघात नव्हता.

(३) एका महत्त्वाच्या बाबतीसंबधानें खुलासा करण्यास ही संधि चांगली आहे. पुष्कळांचा समज आहे कीं, श्रीमंत गायकवाड महाराजांनीं आपला पुण्याचा वाडा, टिळकांच्या उद्योगास साह्य करण्याच्या बुद्धीने, त्यांस फुकट दिला. हा प्रवाद साफ खोटा आहे. महाराजास वाडा विकून टाकावयाचा असून, त्याची किंमत योग्य तपासाने नक्की केल्यावर त्यांनीं जाहीर लिलावाच्या स्वरूपांत मागण्या मागविल्या. त्यांत टिळकाची मागणी सर्वांत किफायतशीर जाणून महाराजांनीं ती मान्य केली आणि रोख रक्कम घेऊन वाडा टिळकांस विकला. सौदा पुरा झाल्यावर मागाहून लोकमान्यांच्या विरोधकांनीं अनेक शंका काढून कंड्या पिकविल्या, त्यांत कांहीं तथ्य नाहीं, हे मला खऱ्या माहितीवरून ठाऊक आहे.

---

## गोविंद रावजी चोळकर.

[एम्. ए., प्रोफेसर महिला महाविद्यालय, हिंगणें.]

सन १९०५—६ चा सुमार. आमच्या गावचे सरकारी नोकरींत असलेले एक गृहस्थ एका सार्वजनिक उत्सवांत प्रमुख भाग घेत असत. त्यांना लो. टिळकांची भेट घ्यावयाची होती, म्हणून त्यांनीं मला बरोबर घेतलें होतें. भेटींत उत्सवासंबधीं बोलणे निघाले. तेव्हा लोकमान्य म्हणाले, "अहो, ×× याचा तुम्हीं उत्सव करितां हे फार चागलें आहे. परतु सरकारी नोकरी व सार्वजनिक काम हीं दोन्ही तुम्हाला साधणें शक्य नाहीं. दोहोंपैकीं एकाचा नाद तुम्हांस सोडला पाहिजे. लोकसेवा म्हणजे सुळावरची पोळी आहे. हें विसरू नका." त्या गृहस्थानीं उत्तर केलें, "मी नोकरीची कधींही पर्वा करीत नाहीं. जरूर पडेल त्याक्षणीं मी नोकरी सोडण्यास तयार आहे." लोकमान्य म्हणाले, "मग ठीक आहे. तुमचें काम जोरांत चालू द्या. मला जी काय मदत करतां येईल ती मी आनंदानें करीन. पण सरकारच्या इतराजीला मात्र तुम्ही तयार असलें पाहिजे." "त्या-बद्दल आपणांस बिलकूल शका नको," असे त्या गृहस्थानीं उत्तर दिलें.

यानतर बगालच्या फाळणीमुळें देशात सुरू झालेली चळवळ विशेष जोरात येऊ लागली. सरकारचा मोर्चा सार्वजनिक काम करणारांकडे जास्तच वळूं लागला. त्यांत आमच्या गांवचा उत्सव व त्याचे चालक ह्यांचेकडेहि वळला. सरकारनें उत्सवासंबधीं चौकशी सुरू केली. वर सांगितलेल्या गृहस्थानीं उत्सव बद केला! पुढें कांहीं महिन्यानीं त्याची नोकरीहि पण गेली!!

---

## पन्नालाल व्यास.

[ पेहेलवान, व्यायाम शिक्षक, सुप्रसिद्ध वक्ते, खामगाव. ]

१९१७ साली होमरूलच्या दौऱ्यावर असतांना लोकमान्य टिळकाचा मुक्काम खामगांव येथें एक दिवसभर होता. लोकमान्य टिळकांच्या व्याख्यानाची वेळ सध्याकाळीं ५॥ ची ठरवून त्याबरहुकुम हस्तपत्रिकाहि वाटण्यांत आल्या होत्या. ही वेळ सरकारी नोकर व विद्यार्थी यांना अर्थातच अत्यत गैरसोयीची होती. लोकमान्यांसारखा महात्मा खामगांवास आलेला तेव्हां त्यांचे व्याख्यान ऐकण्याची ( चोरून कां होईना ) इच्छा वरील लोकास असणारच. तेव्हां विद्यार्थीवर्ग जरा निराश झालेला दिसूं लागला. तेव्हां दुपारीं २ वाजता कांहीं

सरकारी नोकर, शिक्षक व विद्यार्थी मंडळी लोकमान्यांच्या दर्शनास गेली असतांना त्यांचे लोकमान्यांशीं खालीलप्रमाणे संभाषण झालें.

शिक्षकः—दादासाहेब ! व्याख्यानाची वेळ शिक्षक, विद्यार्थी व सरकारी नोकरास अगदींच गैरसोईची आहे असे आपणास वाटत नाहीं कां ? आपलीं पुस्तकें वगैरे घरीं ठेऊन येण्यापुरतां तरी वेळ विद्यार्थ्यांना मिळावयास नको कां ? बरें त्यांनीं आपापलीं पुस्तके वगैरे घेऊन व्याख्यानास यावयाचे म्हणजे—(यावेळीं रिस्ले सर्क्युलरचा अमल जोरांत सुरू होता. )

लोकमान्यः—पुराव्यानिशींच व्याख्यानाला गेले होते म्हणून सांपडावयाचे ! तर मग मी आतां असे करतो कीं, अंधार पडल्याशिवाय व्याख्यानभूमिकडे जातच नाहीं, म्हणजे झाले कीं नाहीं ? आणि खरोखरच आतां विद्यार्थ्यांनाच—तरुण मुलांनाच—असल्या व्याख्यानांची देशोद्धाराच्या दृष्टीनें जास्त जरूरी आहे.

लोकमान्य त्या दिवशीं खरोखरच अंधार पडल्यावर मग व्याख्यानाकरतां घराबाहेर पडले ! !

---

## गोविंद रामचंद्र विनीवाले.

[ सुप्रसिद्ध वैद्य, सांगली. ]

(१) लोकमान्य ज्योतिषसंमेलनाचे वेळीं सांगलीस आले होते व त्या वेळीं श्रीमत् शंकराचार्य डॉ. कुर्तकोटीहि आले होते. त्यांना भेटण्यासाठीं मी लोकमान्यांना मोटारींतून घेऊन गेलो. डॉ. कुर्तकोटी जुन्या गांवांत ज्या घरीं उतरले होते तेथें आम्ही गेलो. स्वामी संध्या वगैरे आन्हिक करीत होते. त्यांना ' लोकमान्य भेटीस आले आहेत ' असे कळविण्यांत आलें. तेव्हां खोलीचें दार उघडण्यांत आलें व डॉ. कुर्तकोटींनी आंत येण्यास सुचविले. लोकमान्य, रा. अतुकाका फडणीस व मी असे तिघे आंत गेलो. रा. अतुकाकांचे हातात नारळ व रुपया होता तो लोकमान्यांनीं मागून स्वामींचे पुढे ठेऊन नमस्कार केला, मागून आम्हीहि स्वामींना वंदन केलें. स्वामींनीं बसण्यास आज्ञा केल्यावर आम्हीं बसलों. लोकमान्यांचे व स्वामींचे कुशल प्रश्न झाल्यावर स्वामींनीं 'विलायतेस शिष्टमंडळांतून दि. ब. व्ही. पी. माधवराव यांना आपण घेऊन गेला होता त्यांचा आपणास कितपत व कसा काय उपयोग झाला'. असा प्रश्न लोकमान्यांना केला. (दि. ब. माधवराव यांचा व स्वामींचा विशेष परिचय आहे असे दिसलें.) तेव्हां लोकमान्यांनीं उत्तर दिले कीं, " जॉईंट कमिटीपुढें लिन्दी संस्थानची

दिवाणगिरी केलेल्या जबाबदार गृहस्थांची जोरदार साक्ष झाली व त्यामुळें पुष्कळ उपयोग झाला. बाकी त्यांच्या इतर गोष्टींकडे बघण्याचे मला कारण दिसलें नाहीं." यावरून लोकमान्यांचें 'आपल्या लोकांच्या गुणाची पारख करून त्यांच्या गुणाचा जरूर तेथें उपयोग करून घ्यावयाचा व त्यांच्या इतर अवगुणांकडे लक्ष द्यावयाचे नाहीं.' असे धोरण स्पष्ट होते. या गुणामुळेच त्यांनीं येवढा लोकसंग्रह केला.

(२) ज्योतिषसंमेलनच्या मंडपांत ज्योतिषशास्त्रावर सकाळीं आठ वाजल्यापासून दुपारीं बारावर दोन वाजेपर्यंत जोराचा वादविवाद चालला होता. परंतु अखेर एकवाक्यता होऊन ठराव सर्वानुमतें पास झाला. पंचांग करण्यास मुख्य अडचण करणग्रंथाची आहे. तो लवकर कोणी लिहून काढावा अशी चर्चा चालली होती. अखेर कोणी एका ज्योतिष्यानें लोकमान्यांना आपणच करणग्रंथ लवकर लिहून काढावा असें म्हटलें, तेव्हां लोकमान्यांनीं हसत उत्तर दिलें कीं, "हल्लीं मला इतकीं कामें आहेत कीं, हा ग्रंथ लिहिण्यास मला मुळींच वेळ मिळणार नाहीं. आतां सरकारनेंच जर मला ५।६ महिन्यांची विश्रांति (तुरुंगवास) दिली तर मात्र तो मी ३।४ महिन्यांत लिहून काढीन."

---

## लक्ष्मण रघुनाथ भिडे.

[ एक अस्पृश्योद्धारक, सांगली. ]

ज्योतिषसंमेलनासाठीं लोकमान्य सांगलीस आले होते; व अस्पृश्य मंडळाने त्यांना मानपत्र देण्याचें ठरविलें. त्यास उत्तरादाखल केलेल्या भाषणांत लोकमान्यांनीं खालील महत्त्वाचे उद्गार काढले आहेत.

"अस्पृश्य लोकांतर्फे मानपत्र स्वीकारण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग आहे. तेव्हां या बाबतींत मजबद्दल जे गैरसमज आहेत त्यांचें निराकरण करण्याची संधि मी आता घेतों. अस्पृश्यांना स्पृश्य मानणाऱ्यांपैकीं मी एक आहे. गणपती उत्सवांत माझ्या गणपती बरोबर चामाराचा गणपती मिरवणूकींत असतो. अस्पृश्यांच्या उद्धाराबद्दल सुधारकांइतकीच मला तळमळ आहे, पण मतभेद आहे तो मार्गांत आहे. अस्पृश्यांनीं किंवा सुधारकांनीं एकदम बंड करून धर्मभोळ्या समाजास दुखवावें हें मला पसंत नाहीं. फार पुरातन कालापासून चालत आलेली ही रूढी एकदम मोडणें शक्य नाहीं. उतावीळ होऊन कांहीं तरी करण्यात अर्थ नाहीं; दमानें घेतलें पाहिजे. स्पृश्य समाजाचें लोकमत अनुकूल करून घेण्याचा

आम्ही करून प्रयत्न केला पाहिजे. अस्पृश्यांनींहि आपल्यांतील दोष काढून टाकले पाहिजेत. स्वच्छता राखली पाहिजे. मेलेल्या जनावरांचें मांस खाणें सोडलें पाहिजे. शिक्षण घेतले पाहिजे. जरी शिक्षण घेतले तरी आपला धंदा सोडून पांढरपेशा वर्गाप्रमाणे नोकरीच्या मागें त्यांनी लागावे हें मला पसंत नाहीं. धंदा घाणेरडा म्हणून तो अपमानास्पद न समजतां नवीन वळणावर त्याची सुधारणा करणें हेच त्यांना अधिक श्रेयस्कर आहे. जेव्हां अस्पृश्य आपल्या धंद्याची सुधारणा करतील तेव्हांच त्यांचा उद्धार झाला असे मी समजेन. शेवटीं ज्या कामास मी स्वतःला वाहून घेतलें आहे तें सर्व जातींचें असल्यामुळे प्रत्यक्ष शक्य नसले तरी अप्रत्यक्षपणें मी अस्पृश्यांच्या उद्धारार्थच झटत आहें. ”

---

## सिद्धेश्वरशास्त्री चित्राव.

[ वेदशास्त्रसंपन्न, व्युत्पन्न, टिळक महाविद्यालयांतील संस्कृतचे प्रोफेसर, अध्यक्ष हिंदु म. स. पुणें. ]

( १ ) लो. टिळक विलायतला जाऊन परत आल्यानंतर ते प्रायश्चित्त घेतात कीं नाहींत इकडे जुन्या लोकांचें लक्ष वेधले होते. दोन महिने झाले, तावडतोबीचे सर्व कार्यक्रम सपून लोकमान्याचा मुक्काम पुणें येथे असतांना आचार्य पत्राच्या सपादकापैकीं एक म्हणून कांहीं मडळींना बरोबर घेऊन आपण प्रायश्चित्त घ्यावें असें सांगण्याकरितां त्यांचे घरीं मी गेलों. ते आपल्या घराच्या माडीवर आराम खुर्चीवर वाचीत सुपारी खात पडले होते.

कांहीं प्रश्नोत्तरें झाल्यानतर आपण प्रायश्चित्त घ्यावे असें मी त्यांस म्हटलें, त्यावरोबर ते म्हणाले. “ मला प्रायश्चित्त घेण्यास तुम्ही कां सांगतां. ? मी कांहीं तुमच्यात जेवावयास येत नाहीं. माझा व्यवहार लोकापासून सर्वस्वी निराळा आहे. घरांतसुद्धां माझा काहीं संबध नसतो. माझ्यावरोबर मी एक आचारी ठेविला आहे., अशा स्थितींत तुम्ही मला प्रायश्चित्त घ्यावयास कां सांगावें हें मला समजत नाहीं. ”

त्यानंतर आपण लोकांना वळण घालून देणारे आहांत आणि प्रायश्चित्त घेण्यास आपली संस्कृति, कायम ठेवण्याचे श्रेय मिळतें वगैरे म्हटल्यानंतर ते म्हणाले “तुम्हाला मी एवढें सांगतों कीं, मी प्रायश्चित्त घेणार आहे. तें केव्हां घेणार हें आतांच मला सांगता येणार नाहीं. माझे असे असे कार्यक्रम ठरले आहेत. तथापि तुम्ही प्रायश्चित्ताचें इतकें स्तोम माजवूं नका. ! ”

( २ ) त्यानंतर त्यांना एका पतितपरावर्तन विषयक व्याख्यानाच्या अध्यक्षते-बद्दल विचारले असतां ते म्हणाले, " हे आमचे जुने लोक खुळचटपणाचे वाद-विवाद किती दिवस करीत बसणार आहेत समजत नाहीं. जग किती धुम-धडाक्याने पुढें चाललें आहे. जो तो आपल्या धर्मांची संख्या वाढवितो आहे. आणि आमचे शास्त्रीपंडित पहावें तर पतितपरावर्तन योग्य कीं अयोग्य याचा वादविवादच करीत बसले आहेत. आमची सर्व बाजूनीं सांखळी सुटली आहे. मला अशी खात्री आहे कीं, खिस्ती, मुसलमान, या पेक्षाहि वैदिक धर्म-प्रसाराचें काम आपल्या पूर्वजांनीं फार सुव्यवस्थित आणि नेटानें केलें आहे. " पण व्याख्यानाचे दिवशीं त्याचा मुक्काम दुसरीकडे असल्यामुळें त्याना अध्यक्ष-स्थान स्वीकारितां आलें नाहीं.

( ३ ) पुणें येथें वैष्णवांचे गुरु श्री सत्यध्यानतीर्थ यांचा मुक्काम असताना त्यांच्यापुढें गीतारहस्यावर विचारविनिमय चालू होता. त्याप्रसंगीं लोकमान्याची अनेक विषयावरील मतें समजून आलीं.

'तुम्ही राजकारणाकरिता गीतारहस्य लिहिलें असें म्हणा म्हणजे आमचा वाद नाहीं' असें एकानें म्हटलें असता, त्यावर लो. टिळक म्हणाले कीं, " मी असें स्पष्ट सांगतों कीं, अनेक हेतूंप्रमाणें राजकारणाकरितांहि मी गीतारहस्य लिहिलें आहे. "

एक गृहस्थ म्हणाले--' वेदाच्या अनेक शाखा होत्या त्यांपैकीं कित्येक नष्ट झाल्या आहेत. तन्मूलक स्मृत्यादिकांत आचार ग्रथित केले आहेत म्हणून स्मृत्यादिकांतील आचार बदलता येणार नाहींत. '

यावर लोकमान्य म्हणाले--" वेदांच्या अनेक शाखा होत्या आणि त्या आता नष्ट झाल्या, हे खोटें आहे. एकादी शाखा कदाचित् कमीजास्त झाली असेल. हें नुसते वेदाचा गौरव करण्याकरिता आहे. त्याला तसा प्रामाणिक आधारहि नाहीं. एखाद्या ग्रंथकारांनीं म्हणावें ' सहस्रवर्मा सामवेदः ' परंतु हें केवळ वेदाचा गौरव करणारें म्हणणें आहे; त्यात यथार्थता नाहीं. "

( ४ ) एके दिवशीं केसरींत कांहीं मजकूर देण्याकरितां मी केसरीकार्यालयात गेलों असतां लोकमान्य सुपारी खात इकडे तिकडे फिरत होते. सकाळची वेळ, कोणी कांहीं पत्रव्यवहारासंबंधीं तर कोणी केसरीसंबधीं त्यांना प्रश्न विचारीत होते आणि लोकमान्य प्रत्येकाला अधिकारयुक्त वाणीनें एक घाव दोन तुकडे अशीं फडाफड उत्तरें देत होते. आणि मधून मधून स्फुट विषयाबद्दलहि चर्चा करीत होते.

भोंवतालच्या प्रत्येक मनुष्याच्या मनांत या महापुरुषाबद्दल अत्यंत आदर आणि एक प्रकारचें भय आहे असें उघड दिसत होतें. प्रत्येकजण अत्यंत दबत आणि नम्रपणानें त्यांच्याशीं बोले आणि अशी अपेक्षा करी कीं, माझें म्हणणें महत्त्वाचें आहे असें समजून त्यांनीं माझ्या प्रश्नाला हळू आणि शांतपणें उत्तरें

चावींत ! परंतु लोकमान्यांचा तो ठणठणींत आवाज आणि उत्तर देण्याची ती तुकडेतोड पद्धति सर्वत्र एकच. यामुळे पुष्कळ जणांना आपण कोणीकडून त्यांना विचारावयास गेलो असेहि होत असावे; आणि कांहीं तर केवळ बोलावयास व या थोर पुरुषाचे बोलणें ऐकावयास मिळावे म्हणूनच त्यांच्याशीं कांहीं तरी बोलत.

(५) त्याच वेळीं लोकमान्यांनीं मानवधर्मशास्त्राचे कर्ते घारपुरे यांचे 'आधीं द्वैताद्वैताचे वाद मिटावा, ईशावास्याबद्दल माझे असें असे म्हणणें आहे, द्वैताद्वैताचे वाद मिटल्याशिवाय कांहीं करिता येणार नाहीं.' अशा अर्थाचें पत्र आल्याचें आम्हांस सांगितले. व लगेच हा खवळलेला सिंह गरजला कीं, "जगाच्या अन्तापर्यंत हे वाद मिटणार नाहींत. हे वाद कोणालाहि कायमचे मिटवतां आले नाहींत व येणारहि नाहींत. आणि वाद कसले आले आहेत ? ज्यांच्या बुद्धीला जे वाटले आणि पटलें ते त्यांनीं स्वीकारले. त्याकरितां आपला व्यवहार व इतर कामे थांबवण्यासारखी अशी कोणती मानगड आज उत्पन्न झाली आहे ? मनुष्याला बुद्धी आहे तोपर्यंत असे प्रकार चालावयाचेच. याला भिण्याचे काय कारण आहे ?" असें बोलून त्यांनीं याच अर्थाचे त्यांना उत्तर लिहावयास हाताखालच्या गृहस्थास सांगितलें.

---

× × × × ×

[ एम्. ए. हेडमास्तर हायस्कूल...... ]

१९१६ सालीं लखनौच्या कॉंग्रेसहून फिरत फिरत लोकमान्य ×× येथे आले. त्यावेळीं मी ×× येथे सरकारी नोकर होतो. रिस्ले सर्क्युलराचा जोरांत अमल सुरू असल्यामुळे मुलांच्या मनांत औत्सुक्य असूनहि त्यांना लोकमान्यांचे दर्शन घेतां येईना ! सध्याकाळीं एक मिरवणूक निघाली. एक लहानसे व्याख्यानहि झालें व पुढें रात्रीं बारापर्यंत गप्पा झाल्यानतर मंडळी घरोघर गेली. मी पहांटेच उठून दर्शनासाठीं गेलों तों काय लोकमान्य प्रातर्विधी आटोपून एकटेच वाचित बसल्याचें मला आढळलें ! मला फार आनंद झाला. विद्यार्थ्यांना ही बातमी कळली व जरा भीति दूर सारून तेहि तेथें जमले व लोकमान्यांच्या पायावर डोके ठेवून आमचें भाषण ऐकत बसले.

लखनौच्या कॉंग्रेससंबंधीं सर्व वर्तमानपत्रांचीं मते मी मुद्दाम वाचून टिळकांच्याबद्दल चांगलें वाईट कोण काय म्हणतो तें मुद्दाम पाहत होतो. पहिल्यानें ओळखपाळख झाल्यानंतर येथील सर्व सरकारी खात्यांबद्दल त्यांनीं चौकस

बुद्धीने पृच्छा केली. त्या प्रश्नांची उत्तरें यथाशक्ती दिल्यानतर मी सहज म्हटले मुसलमानांच्यासबधीं आपण जे औदार्य दाखविले त्याबद्दल वर्तमानपत्रांतून आपल्यावर सडकून टीका येत आहे! तेव्हा ते म्हणाले " खरेंच, लखनौपासून मी सारखा हिंडत आहें, तेव्हां कोणतीं वर्तमानपत्रे काय म्हणत आहेत तें एकदा मला पाहिलें पाहिजे. " यामुळें मला समाधान वाटले, कारण त्या निमित्तानें तरी लोकमान्यांशीं बोलावयास सापडेल अशी मी आशा केली.

त्यानतर मुसलमानाशीं केलेल्या करारासबधीं ते म्हणाले " या लोकानीं याचा इतका बाऊ का केला आहे तें समजत नाहीं. आज आम्हांस परकीय सरकारास तोंड द्यावयाचें आहे. त्यावेळीं कमीअधिक प्रमाणात मुसलमानबधूस मतदानाचे हक्क अधिक देण्यात काय हरकत आहे ? स्वराज्य मिळाल्यानतर हे प्रमाण केव्हाहि बदलतां येईल ! इतर देशातल्या प्रातिनिधिक सस्थाचा इतिहास पाहिला असता अनेक वर्गांत मतदानहक्काचें प्रमाण कोठे स्थिर आहे ? हाऊस ऑफ कॉमन्स आणि हाऊस ऑफ लॉर्डस याचे तरी पूर्वीचे हक्क कायम आहेत का ? मग अशा वेळीं आपण तरी विशेष घासाघीस का करावी ? दुसरी गोष्ट म्हणजे मिसेस बेझट सबंधीं होय. ते म्हणाले " आम्ही या बाईना ओळखून आहो. जोपर्यंत आम्हास त्याचा उपयोग होत आहे तोपावेतों करून घेऊ, नाहीं त्या दिवशीं दोघांचे मार्ग वेगळे आहेतच ! "

त्यानतर मी म्हटलें आपण इतके स्पष्ट बोलता ! जर एकाद्या मुसलमानानें ऐकिले किंवा बाईच्या शिष्यानें ऐकिलें तर मोठें वादळ होईल ! त्यानतर ते म्हणाले " यांत काही नाहीं. हे नेहमींचेच आहे. अशीं वादळें मी पुष्कळ पचविलीं आहेत ! "

त्यानतर मी फराळासाठीं निमत्रण केलें, त्यावर त्यांनीं उत्तर केलें कीं, " मी फराळाला आल्यापासून तुमचें नुकसान होणार आहे. स्वतत्र पद्धतीनें ज्याला देशाचें काम करतां येत नाहीं, त्याने सरकारी नोकरींत राहून देशहिताकडे लक्ष पुरवावें. सरकारी नोकरींत अशा माणसांचा भरणा अधिक होईल तितका पाहिजे आहे. ज्याना ज्या योगें देशहित सांधतां येईल त्यांनीं तें करीत असावें."

तासभर असें भाषण झाल्यानतर इतर मडळी भेटीस येऊ लागलीं म्हणून लोकमान्याचा मी निरोप घेतला. पुढें दोन वर्षांनीं रेल्वेत सहज गांठ पडली असता, मी पायावर डोकें ठेविले तों माझें नांव घेऊन माझें क्षेम विचारलें !

---

## रा. ल. घरत

[ आवास, जि. कुलाबा. ]

(१) सन १८९६ सालीं पाऊस फारच कमी पडल्यामुळें हिंदुस्थानांत प्रायः सर्वत्र दुष्काळ होता. कोकणांत सहसा फार कडक दुष्काळ नसतो, पण या वर्षी तो बराच तीव्र भासू लागला कोकणांतील जमिनीचे सरकारसारे फार जबर असल्यामुळें आणि याच सुमारास घुष्कळ तालुक्यांच्या जमीनमहसुलाची फेर-तपासणी होऊन साऱ्याची बेसुमार वाढ झाल्यामुळे सरकाराम जमीनमहसूल देणे लोकास अत्यंत जड जाऊ लागले. साऱ्याची माफी किंवा तहकुबी मिळावी म्हणून सभा भरवून अर्जद्वारे व वर्तमानपत्रांत लेख लिहून तद्वारे लोकांनीं चळवळ सुरू केली होतीच. याच वेळीं पुणे सार्वजनिक सभेचे प्रचारक प्रोफेसर अच्युतराव साठे, ठाणे व कुलाबा या जिल्ह्यात सरकारच्या दुष्काळी कायद्याचा अर्थ लोकांस समजावून देण्याकरितां व्याख्याने देत होते. १८९६ च्या नाताळांत पेण येथें त्यावर खटला करण्यात आला. त्यांच्या बचावाकरितां लो० टिळक पेणेस आले होते. साठे दोषमुक्त होऊन लोकमान्यांसह पेणेहून अलिबागेस येऊन त्यावेळचे अलिबागचे प्रसिद्ध वकील व पुढारी कै० गोविंदबाबा गुर्जर यांच्या घरीं उतरले. गोविंदबाबा माझे चांगले स्नेही असल्यामुळें मीहि दोन दिवस त्याच्या येथें गेलो, त्यामुळें भोजनासनशय्यादि व्यवहार लोकमान्यांबरोबरच झाले. सरदार विवलकर वगैरे कांहीं थोर गृहस्थाकडे पानसुपाऱ्या झाल्या, त्यावेळींहि मी बरोबरच होतों. अलिबाग तालुक्याच्या जमीनमहसुलाच्या फेर तपासणींत झालेला अन्याय 'टाईम्स ऑफ इंडिया' वगैरे पत्रात लेख लिहून मी सरकारच्या व लोकाच्या नजरेस स्पष्टपणें आणला होता. प्रांतिक समात तद्वि-षयक भाषणें केलीं होतीं व दुष्काळ, प्लेग वगैरे विषयांवरहि लेख लिहिले होते, त्यांमुळें लोकमान्यांबरोबर झालेल्या खासगी संभाषणांतहि हेच विषय निघून त्यांच्या तोंडून माझ्या पुढील लेखांस उपयुक्त अशा बऱ्याच सूचना मला मिळाल्या. अलिबागेहून निघण्याच्या दिवशीं सकाळीं दहा वाजतां जेवून अलिबागच्या बदरांत आगबोटींत बसून दोन वाजण्याच्या सुमारास पोहोंचून तेथून सायंकाळीं ठाण्यास व्याख्यान देण्याकरितां जावयाचें लोमान्यांनीं निश्चित केलें होतें. इतक्यांत किहीम व आवास या गांवांतील कांहीं मंडळी येऊन त्यांनीं लोकमान्यांस आपआपल्या गांवीं पानसुपारी करण्याची उत्कट इच्छा दर्शविली. ठाण्याच्या व्याख्यानास हरकत येऊ नये म्हणून रेवस बंदरावर जाऊन सायं-काळीं चार वाजता बोटींत बसावें असें मीं सुचविले. त्या वेळीं मोटारी नव्हत्या, व पधरा मैल प्रवास तांग्यानें करावयाचा होता, तथापि लोकमान्यांनीं आपल्या

सौजन्याला अनुसरून ती गोष्ट मान्य केली, व जातांना मार्गांत दोन ठिकाणीं पानसुपारी घेऊन लोकांचें समाधान केलें.

(२) सन १८९७ सालीं लोकमान्यांवर राजद्रोहाचा पहिला खटला होऊन ते जामिनावर खुले असता मुंबईंत गिरगावात आग्र्याच्या वाडींत कै० दाजीसाहेब खऱ्यांच्या घरीं रहात होते. त्यावेळीं मी दररोज सायंकाळीं त्याकडे जात असे. हूण, म्लेंच्छ वगैरे शद्बांचा विशेष खुलासेवार अर्थ ज्यांत होता असें एक संस्कृत नाटक माझ्या एका मित्रानें लोकमान्यांस दाखविण्याकरितां मजपाशीं दिलें. कांहीं दिवस तें पुस्तक आपणापाशीं ठेवून घेऊन नतर लोकमान्यांनीं ते त्याचे त्यास परत देण्यासाठीं मजपाशीं दिलें. 'टाइम्स ऑफ इंडिया'चे त्या वेळीं मिस्टर टी. जे ( आता सर थॉमस ) बेनेट हे संपादक होते. त्याचा माझा चांगला स्नेह होता. लोकमान्यास सागून मी एक दिवस बेनेट साहेबाकडे सहज गप्पा मारण्याकरिता म्हणून गेलों. ' जस्टिस ' सहीनें पत्र लिहिणारे एक उत्तम संस्कृत भाषाभिज्ञ शास्त्री आहेत असे बेनेटसाहेबानीं मला सांगितले. 'कै० गोखल्यांबद्दल बेनेटसाहेबांनीं स्वतःच बोलणें काढून म्हटले कीं, गोखले हे फार थोर मनाचे गृहस्थ असून माफी मागतली ही त्यांनीं फार चांगली गोष्ट केली. टिळकांनींहि तसेंच करावें हें उत्तम.' रात्रौ लोकमान्यास ही सर्व हकीगत कळविल्यावर ते म्हणाले, " सर्वजण माफी मागूं लागले, तर कसें होईल ? कांहींनीं माफी मागू नये हेंच उत्तम."

लोकमान्य कैदेंतून सुटून आल्यावर आवसातील लोकानीं त्याचें अभिनंदन केलें त्यास त्यांनीं स्वदस्तुरचें उत्तर पाठविले. त्यांच्या हातचीं दोनतीन पत्रे त्या वेळीं जपून ठेविलेलीं आतां दुर्दैवानें आढळत नाहींत.

(३) १८९९ सालीं पुनः दुष्काळ पडून तो कोंकणांतहि चांगलाच जाणवला. ह्या दुष्काळाची चौकशी करण्याकरितां सरकारनें सर ॲंटनी मॅंगडोनाल्ड यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिशन नेमलें. सन १८९६–९७ च्या दुष्काळाची चौकशी करण्याकरितां सरकारनें नेमलेल्या कमिशनपुढें कोंकणांतील दुष्काळासंबंधानें माझी विस्तृत साक्ष होऊन ती कमिशनच्या रिपोर्टांत छापलेली आहे. ती साक्ष लोकमान्यांनीं वाचल्यामुळें व १८९९ च्या दुष्काळावर मी कांहीं लेख प्रसिद्ध केल्यामुळें या दुसऱ्या कमिशनपुढेंहि मी साक्ष द्यावी म्हणून त्यांनीं कै० गजानन भास्कर वैद्य यांस मजकडे पाठवून कळविलें कीं, "मागच्या कमिशनपुढें झालेल्या साक्षीचा रिपोर्ट पहावयास पाठवितों. यावेळींहि साक्ष द्या." ह्याच वेळीं माझा होतकरू पुतण्या वारल्यामुळें साक्ष देण्याचें जबाबदारीचे काम पतकरून त्याची तयारी करण्यास लागणारा वेळ मला नसून माझ्या मनाची स्थितिहि

अनुकूल नव्हती. त्यामुळे लोकमान्यांच्या इच्छेप्रमाणें मला तसें करितां आलें नाहीं. तथापि त्यांनीं केलेल्या सूचनेवरून त्यांची गुणग्राहकता अगदीं स्पष्ट होत आहे.

---

## यादव श्रीहरी अणे.

[ एल् एम् अॅन्ड एस् ( नॅ० ) डॉक्टर, वणी, वऱ्हाड. ]

लोकमान्य तुरुंगांतून सुटून आल्यानंतर त्यांनीं चिरोलवर नोटीस काढली. ती 'केसरीं'तून मला कलकत्त्याला नॅशनल मेडिकल कॉलेजमध्यें शिकत असतां वाचावयास मिळाली. मला इंपीरिअल लायब्ररींत वाचावयास जाण्याचा नाद होता. लायब्ररींत गेल्याबरोबर प्रथम " न्यू बुक्सच्या " शेल्फमधून हिंदुस्थानविषयक जीं पुस्तकें असतील तीं चाळावयाचीं अशी माझी रीत असे. नोटीस वाचल्यावर त्याच दिवशीं लायब्रींत मला कर्मधर्मसंयोगानें " फार्कहार " यांचे हिंदुस्थान-विषयक पुस्तक त्याच सुमारास हिंदुस्थानांत आलेलें " न्यू बुक्सच्या " सेल्फमध्यें असलेले पहाण्यांत आलें. ते चाळीत असतां, त्यांत लोकमान्यांसंबंधीं विधानें चिरोलपेक्षांहि पुढें जाऊन विशेष धाडसाचीं केलेलीं आढळलीं. व तीं खास पुण्यास जाऊन मी प्रत्यक्ष चार शिष्ट लोकांच्या मुलाखतींत मिळालेल्या माहिती-वरून केलेलीं आहेत असें छातिठोक विधान केलेले होतें. फार्कहारसाहेब हे कलकत्त्याला प्रिन्सिपाल म्हणून अनेक वर्षे कोणत्याशा कॉलेजमध्यें राहिलेले असे होते. त्याचीं विधानें पाहून चिरोलसाहेबांना ते एक नवीन साथीदार असेच होत हें मनांत आलें व त्याचे पुस्तकांतील लोकमान्यविषयक सर्व प्रकरणाची एक नक्कल तयार करून ती रा. तात्यासाहेब केळकर संपादक केसरी या पत्त्यावर मी पाठवून दिली. त्यांत पुस्तकाचे नांव, मिळण्याचा पत्ता, प्रकरणांच्या पानांची संख्या वगैरे उपयुक्त मजकूर कळविला होता. व सवाई चिरोल म्हणून त्याजविषयीं काय कारवाई करणें असेल ती आपणास योग्य वाटेल ती करण्याकरितां एक अनुपलब्ध माहिती या उद्देशानें ' केसरी ' कर्त्यांकडे पाठविली. ही गोष्ट अंदाज १९१५ जानेवारींतील असावी. त्यानंतर जूनचे पहिले आठवड्यांत मला सिंहगडला लोकमान्यांचे दर्शनार्थ जाण्याचा योग जुळून आला. श्रीमंत दादासाहेब खापर्डेहि तेथेच सिंहगडला सर्व मंडळींसुद्धां होते. प्रवासांत सिंहगडला माझे बरोबर स्वामी आनदानंद हे गीतारहस्याच्या गुजराथी भाषांतराचा आपणास हक्क कां मिळावा याची लोकमान्यांजवळ शहानिशा करून निर्घू घातलेल्या गुजराथी गीतारहस्याची

छापील पुर्फे घेऊन स्वतःचे भाषांतराचा तर्जुमा जवळ ठेवून त्याचें तुलनात्मक महत्त्व समजवून देण्याकरितां आले होते. सिंहगडला पोहोंचल्यावरोबर श्रीमंत दादासाहेब याची मार्गांत भेट झाली. त्यांनीं आम्हास आपल्या बंगल्यावर नेले व तेथून आम्ही लोकमान्यांचे दर्शनार्थ त्यांचे बंगल्यावर गेलों. कै० नामदार खरे यांचे येथें ते गप्पा गोष्टी करीत होते. गड्याने आमचीं नावे विचारून घेतलीं. व आम्ही स्नानास परत गेलो. आमचे स्नान सुरू आहे तोंच लोकमान्यांचे एक चिरंजीव, 'अणे' आहेत काय म्हणून तपास करू लागले. व तुम्हाला बोलाविलें आहे म्हणून सांगितले. आम्ही तावडतोब स्नान आटोपून लोकमान्यांच्या दर्शनास गेलो. आम्ही गेल्यावरोवर आम्हास बसावयास सांगितले. आम्ही लोकमान्यास चरणावपात करून खालीं बसलों. आतून फळफळावळीचीं दोन ताटें भरून आलीं. तीं पुढें असताच लोकमान्यानीं माझ्याकडेस पाहून चिरोल प्रकरणासंबधीं साद्यंत हकीकत आम्हा उभयतांस सांगण्यास सुरुवात केली. चिरोल प्रकरण आटोपल्यावर त्याची री ओढणाऱ्या व त्याचा मराठी तर्जुमा करणाऱ्या अनेक इंग्रजीमराठी वृत्तपत्रांचा समाचार यथाक्रम घेता येईल, येथ पावेतों चिरोल वृत्तांत निवेदन केल्यावर व विशेषतः फार्कहार साहेबासंबधींचा उल्लेखहि स्पष्टपणे केल्यावर माझे डोक्यांत एकदम लख्ख प्रकाश पडला कीं, फार्कहार संबधी केसरीकर्ते यांस आपण सहा महिन्यापूर्वी जो मजकूर लिहिला त्याची ओळख लोकमान्यांनीं अशा रीतीनें दिली. त्यावरोबर मन उचंबळून आलें व लोकमान्यांच्या "लोकसंग्रहा"बद्दल धन्यता वाटली! ती० स्व० माधवरावजींचा व त्यांचा जरी राजकारणव्यवहारामुळे परिचय होता तथापि लोकमान्यांच्या समोर जाण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग. त्यावेळीं सहा महिन्यांपूर्वी त्यांच्या ऑफीसांत केसरीकर्त्यांच्या नावानें पाठविलेल्या बातमीदाराची ओळख ठेऊन त्याचीं जाणीव इतक्या मनमोकळ्या व स्नेहयुक्त अंतःकरणानें दिली कीं, लोकमान्यांचा अनुयायी हा तद्रूपच व्हावा. आयुष्यातील तो क्षण मला चिरस्मरणीय होईल.

---

# रघुनाथ कृष्ण फडके.

[ सुप्रसिद्ध शिल्पकार, चर्नीरोड, मुंबई. ]

(१) लोकमान्यांचे समक्ष भेटीचा योग सन १९१७चे आक्टोबर महिन्यांत मुंबई येथें प्रथम आला. या सुमारास आमचें वार्षिक प्रदर्शन नुकतेच सुरू झाले होतें. व कांहीं कामानिमित्त लोकमान्यहि त्या वेळीं मुंबईस आलेले असल्यामुळे त्यांनीं एक वेळ प्रदर्शनाला आपली अमूल्य भेट द्यावी अशी स्वाभाविक इच्छा झाली. परतु प्रत्यक्ष ओळख वगैरे नसल्या कारणानें, हें जुळून येणें त्या वेळीं तरी मला बरेंच अवघड होतें. कोणाच्या मार्फत अगर वशिल्यानें प्रयत्न करून पहावा म्हणून मी थोडी फार खटपट करून पाहिली, परतु त्यापेक्षां समक्षच भेटणे श्रेयस्कर वाटून एक दिवस वडील बधु व मी सायकाळीं पांच वाजण्याचे सुमारास दाजीसाहेब खरे याचे बगल्यात लोकमान्य उतरले असल्याचें समजल्यावरून तिकडे जावयास निघालो. आम्ही तेथें जाऊन पोंचलो त्या वेळीं लोकमान्य घरींच असून बाहेर एकटेच बसलेले होते. अगात सद्रा वगैरे नव्हता. अनेक प्रसंगीं प्रचड श्रोतृसमुदायांत विराजमान होणारी ती सामर्थ्यवान मूर्ति अशा घरगुती व साध्या थाटात दृष्टीस पडताच, आतांपर्यंत चाललेल्या विचारतरगांना विलक्षण भरती येऊन त्यांत क्षणभर मन गोंधळूनच गेलें; परतु नमस्कारांतच अभयाचें आश्वासन दिसून आल्यामुळें कांहींशी स्थिरता येऊन कोण काय वगैरे विचारपूस झाल्यानतर आम्ही आपले कामाची नम्रतापूर्वक सुनावणी केली. आमची विनति मान्य होणे कठीण असाच पूर्वग्रह झालेला असल्यामुळे नकारार्थी उत्तराची साशकितपणानें वाट पहात असतां, " बर मग मी केव्हां आलें पाहिजे म्हणता ? " असा अगदींच अनपेक्षित प्रश्न लोकमान्यांकडून आल्यानें आनदाश्चर्यानें पुढे काय बोलावें याचेही भान क्षणमात्र नाहींसें झालें. " आपले सवडीप्रमाणे सांगाल त्या वेळीं आम्ही आपणांस न्यावयास येऊ " असें आम्ही सांगितल्यानतर यत्किंचितही आढेवेढे न घेतां दुसरे दिवशी सध्याकाळी येण्याचे नक्की ठरून अनपेक्षित यश सपादन करून आम्ही परत आलो.

ठरल्याप्रमाणे दुसरें दिवशीं लोकमान्यांना घेऊन येण्यासाठीं आम्हीं त्यांचेकडे जावयास निघालो. कबूल केल्याप्रमाणे श्री. तात्यासाहेब केळकर वगैरे मडळींसह त्यांनीं प्रदर्शनाला भेट देण्याची कृपा करून आम्हाला कृतार्थ केले. त्या आनंदाचे भरांत ह्या प्रसगाची साद्यत हकीकत लक्षांत राहण्या इतकें भानच नव्हतें म्हटलें तरी चालेल. इतकें मात्र खरें कीं, लोकमान्यांनीं त्यांचे नेहमीचे चौकस व मार्मिक बुद्धीनें सर्व कामें पाहिलीं व त्यांना विशेष संतोष झाल्याचें निदर्शनास आलें. लोकमान्याचे नेहमीचे सहवासांतील मंडळींना ह्या

गोष्टींत कदाचित विशेष असें कांहींच वाटणार नाहीं. परंतु ज्याची पूर्वी कधींच भेट झालेली नाहीं, अशा जनतेपुढें नुकत्याच येणाऱ्या माझ्या सारख्या नवख्या मनुष्याला हा योग निरंतर लक्षांत राहण्या सारखा वाटावा हें स्वाभाविक आहे.

(२) वरील हकिकतीनतर सुमारें चार सहा दिवसांचे अंतरानें मिसेस ॲनी बेझंट याची अटक दूर होऊन त्या मुंबईस यावयाच्या असल्यामुळें त्यांचे स्वागताची तयारी फार मोठ्या प्रमाणात चालली होती. लोकमान्यांचे भेटीमुळें महत्त्वाकांक्षेला एक प्रकारचें उत्तेजन मिळून मिसेस बेझंट यांनांहि बोलावण्याचें मनांत आले. लोकमान्यांचे नुकतेच झालेल्या भेटीमुळें एक प्रकारचा विश्वास उत्पन्न होऊन त्यांना विचारून पाहण्याचा विचार सुचला. लोकमान्य घरीं होते व त्यांची भेटहि झाली. लोकमान्य म्हणाले " मग त्यांत काय आहे येवढें कठीण. " त्या सहज उच्चारलेल्या वाक्यानें आमच्या सर्व कल्पना खजिलच झाल्या. मी त्यावर म्हणालों, " मिसेस बेझंट यांचा कार्यक्रम आगाऊच ठरलेला असल्यामुळे त्या खेरीज त्यांना सवडच होणार नाहीं असे सर्वांचें म्हणणें आहे. "

लोकमान्यः—छेः छेः अहो, त्यांना बोलावलें म्हणजे त्यांना न यायला काय झालें ?

मीः—शिवाय माझी ओळख वगैरेहि नाहीं.

लोकमान्यः—तुम्ही असें करा. आज नॅशनल युनियन तर्फे बाईना ॲट-होम आहे तेथें येऊन मला भेटा, म्हणजे मीच त्याना सांगेन म्हणजे झालें.

आम्ही गेलों त्यावेळीं बरीच ठळक ठळक मंडळी आलेली होती. समारंभाचा एकंदर थाट व भव्यपणा आमचे कल्पनेप्रमाणेंच दिसून आल्यामुळें पुढील केलेल्या अंदाजालाहि दुजोराच प्राप्त झाला. थोड्याच वेळात लोकमान्यांची स्वारीहि आली. मिसेस् बेझंट येण्याचीहि वेळ झाल्यामुळे त्यांचें स्वागत केलें व प्रथम श्री. अण्णासाहेब नेने जवळच होते, त्याची ओळख करून दिली. इतक्यात त्यांचें लक्ष माझेकडे गेलें व लगेच मला जवळ बोलावून दुसरी ओळख माझीच करून देऊन ते मिसेस् बिझांट यांस पुढें म्हणाले " यानीं केलेलें प्रदर्शन मी नुकतेंच पाहिलें आहे व आपल्यालाहि आतां तिकडेच जावयाचें आहे. " असें बोलून लोकमान्य मला म्हणाले, " तुम्ही आतां जा ! आम्ही मागाहून येतोंच. " हा प्रकार सर्वांनाच विस्मय वाटण्यासारखा झाला. तेथील समारंभ आटोपून मिसेस् बिझंट यांस रात्रीं १० वाजतां मांडवी येथें जावयाचें होतें. व नॅशनल युनियन मध्यें अगोदरच उशीर झाला असल्यामुळें आमचेकडे येण्याचा बेत रहित करण्याचेहि कांहीं प्रयत्न झाल्याचें मागाहून समजलें. व त्यांतच पावसानेंही थोडासा दुजोरा दिला. तथापि लोकमान्यांपुढें

कोणाचेच कांहीं चालण्यासारखे नसल्यामुळे ठरल्याप्रमाणें बेझंट, अरुंडेल, हॉर्निमन वगैरे मंडळींसह येऊन लोकमान्यांनीं आम्हाला सदैव ऋणी करून ठेवलें. हारतुरे पानसुपारी वगैरे झाल्यावर मंडळी परत फिरली. जातां जातांना लोकमान्यांनीं माझेकडे वळून कृपापूर्ण मुद्रेने विचारलें, " काय, झालें तुमच्या मनाप्रमाणे ? " इतक्या वाक्याने या दोनतीन प्रसंगांतच लोकमान्यांच्या प्रथम कडक वाटणाऱ्या, परंतु वास्तविक प्रेमळ व दयाळु स्वभावाची खात्री पटून त्यांचा वाजवीपेक्षां अधिक फायदा घेण्यासहि संकोच वाटेनासा झाला.

(३) एक वेळ मला त्यांची कांहीं कामानिमित्त भेट घ्यावयाची होती; परंतु ते पुण्यास असल्यामुळे त्यांस पुढील आशयाचें पत्र पाठविले. "मला कांहीं कामानिमित्त आपली भेट घ्यावयाची आहे, तरी आपला मुंबईस येण्याचा विचार होईल त्याप्रमाणें मला तसें अगाऊ कळविण्याची कृपा झाल्यास आभारी होईन." अशा प्रकारचें पत्र लोकमान्यांसारख्यांना पाठविण्यात आपण एक प्रकारचे धारिष्ट करीत आहों असे आधीं व नंतरहि वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. पांच सहा दिवसांतच लोकमान्यांचा मुंबईस येण्याचा विचार होतांच, माझे विनंतीप्रमाणे स्मरणपूर्वक तसें मला अगाऊ कळविण्यांत आले. त्यांतहि आणखी विशेष म्हणजे सदरहू पत्र त्यांचे स्वतःचे हातचे आहे. साधारण मंडळींकडून सुद्धां पत्रांचें उत्तर न मिळण्याचा ज्यांना अनुभव असेल त्यांना यातील महत्त्व कळून येण्यासारखे आहे. असो; लोकमान्यांचा बस्ट करण्याच्या उद्देशाने मला त्यांचे सर्व बाजूचे फोटोग्राफस् घ्यावयाचे होते. मुंबईस आल्यानंतर नक्की वेळ वगैरे ठरवून फोटो घेण्याची परवानगी मिळाली. त्यावेळीं लोकमान्यांनीं मला एक दोन प्रश्न विचारले. त्यांतील उद्देश मला नंतर बरेंच दिवसांनीं समजला. तेव्हां त्या प्रश्नांतील खुबीदारपणा व दूरदर्शित्व याबद्दल विस्मय वाटला. त्यांत थोडासा व्यक्तिविषयक संबंध येत असल्यामुळे त्याचा अधिक खुलासा येथें करतां येत नाहीं.

(४) पुन्हा कांहीं दिवसानंतर लोकमान्य मुंबईस आले त्यावेळीं त्यांचे घेतलेले फोटो तयार होऊन नुकतेच माझे हातीं आले होते. त्यावरून बस्टला थोडासा आरंभ करून त्यांचें प्रत्यक्ष सिटिंग मिळावें म्हणून मी लोकमान्यांची भेट घेऊन आपला हेतु प्रदर्शित केला. त्यावर ते म्हणाले, " मी मुंबईस येतो तो केवळ कामानिमित्त. त्यांत सिटिंगमध्यें वेळ मोडण्यास कशी सवड असणार ? तशांतून कांहीं वेळ सारखे बसून राहणेहि आतां प्रकृतीला सोसत नाहीं. " इतकें सांगितल्यानंतर आणखी भीड घालणे मलाहि बरोबर न वाटून मी कांहींच बोललों नाहीं. परंतु त्याचा अर्थ मी नाराज झालों असा समजूनच कीं काय, लोकमान्य म्हणाले, " हें पहा, तुम्ही आतां सांगतच आहां तर फार झालें तर मला एक तासच तुमचेकडे येऊन बसतां येईल. " वास्तविक एक तास फारच अपुरा

होता, व तेवढ्यासाठीं त्यांना तसदी देणेहि मला प्रशस्त वाटलें नाहीं तथापि त्यांनीं होऊनच येण्याचे कबूल केल्यानंतर तितकाच लाभ समजून नक्की वेळ वगैरे ठरवून मी परत आलों. या प्रसंगावरून त्यांच्या शिस्त स्वभावाची कल्पना होण्यासारखी आहे.

(५) ब्राह्मण सभेतर्फे लोकमान्यांना गांधर्वमहाविद्यालयामध्ये पानसुपारीचा बेत होता विद्यालयापासून आमचा स्टुडिओ नजिकच असून तेथपर्यंत लोकमान्यांना यावयाचेच असल्यामुळें, आपलेकडेहि पानसुपारीचा समारंभ केल्यास, त्यांना मुद्दाम अशी तसदी दिल्यासारखी न होता आपलाहि हेतु साध्य होईल असें वाटून मी प्रथम श्री. तात्यासाहेब यांची भेट घेतली, त्यांनीं लोकमान्यांनाच समक्ष विचारण्याविषयीं सांगितल्यावरून मी त्यांचेकडे गेलो. मला दारात येतांना पाहताच एकदम कांहीं स्मरण झाल्यासारखें करून लोकमान्य म्हणाले—"फडके ! काल ते असें झालें कीं, बोलण्याचे भरात तुम्ही दिलेल्या बस्टसंबधीं उल्लेख करावयाचें अगदींच राहून गेले " हें ऐकून मला त्यांचे थोरपणाबद्दल धन्यता वाटली. जी गोष्ट माझे मनातहि आली नाहीं त्याची जाणीव त्यांना किती होती हे व्यक्त केल्याखेरीज त्यांना राहवत नाहीं, हे ह्यावरून समजण्यासारखें आहे. मी आपला येण्यातील हेतु कळविल्यानंतर माझी विनंति मान्य करण्यात येऊन ह्याप्रमाणे दुसरे दिवशीं लोकमान्य, श्री तात्यासाहेब, श्री. अण्णासाहेब नेने, डॉ. भडकमकर, श्री. अतुकाका फडणीस वगैरे वरीच निमंत्रित मंडळी आली होती. पानसुपारी—समारंभाची व्यवस्था लहानशा "ॲटहोम"चे पद्धतीवर केली होती. हार–तुरे पानसुपारी होऊन मी दोन शब्दात आलेल्या थोर मंडळींचे आभार मानले. ह्या प्रसंग इतर भाषणाचा वगैरे नसल्यामुळे लगेच सर्व मंडळी उठणार, तोंच लोकमान्यांनीं उभे राहून बोलण्यास आरंभ केल्यामुळे सर्वांचे लक्ष तिकडेच गेलें. लोकमान्यांनीं पुढील प्रमाणे सुरुवात केली. " मनुष्याची चूक झाली म्हणजे ती त्यानें दुरुस्त केली पाहिजे. " ह्या भाषणाचा कांहींच संदर्भ न समजल्यामुळे ऐकणारी मंडळीहि विचारात पडल्यासारखी दिसली. मला मात्र त्यांचे बोलण्याचे धोरण लक्षात येऊन एक प्रकारचा संकोच उत्पन्न झाला. लोकमान्य पुढे म्हणाले, " फडके यांनीं मला काल बस्ट अर्पण केला त्यावेळीं बोलण्याचे भरात त्यासंबधीं उल्लेख करण्याचें माझेकडून राहून गेले. त्याची दुरुस्ती करण्याचा योग आज त्यांचेकडेच येत आहे व हे गोड गोड पदार्थ पुढें ठेऊन मला त्याचा पुन्हां विसर व्हावा अशी त्यांची योजना दिसतें. "

(६) विलायतला जाण्यापूर्वी बस्टकरितां म्हणून लोकमान्यांचे घेतलेले फोटो कांहीं कारणानें यावे तसे न आल्यामुळें पुन्हां एकदां फोटो घेण्याची संधी मिळावी म्हणून लोकमान्य मुंबईस आल्याचें समजतांच ह्या वेळीं आगाऊ परवानगी न

घेतां माझे मित्र श्रीयुत कीर्तीकर फोटोग्राफर यांस त्यांचे [illegible] ऊन गेलों. लोकमान्य नुकतेच बाहेरून आले होते. मी आपली इच्छा प्रदर्शित केल्यावर ते म्हणालेः—" मागें एकदां तुम्ही फोटो घेतलेत, आतां पुन्हां कशाला पाहिजेत ?" ही हरकत येणार अशी प्रथमपासूनच कल्पना असल्यामुळें त्याच्या उपायाची योजनाहि करून मी गेलो होतो. तथापि मी जरा भीतभीतच म्हणालो, " पगडी शिवाय उघडे असे आपले फोटो घेतलेले नसल्यामुळे फ्रेनॉलजीच्या दृष्टीनेहि ते विशेष उपयुक्त होतील असे वाटून मी ही पुन्हां आपणास तसदी देत आहे. " माझे हे उत्तर जरी पटण्यासारखे होते तरी त्यांतील बनावटपणा त्यांचे लक्षांत येऊन ते हासले व फोटो घेण्याची सर्व तयारीच केलेली पाहून म्हणाले " कांहीं तरी निमित्त पुढे करून फोटो घेण्याचे तयारीने आलां आहा इतके खरे ! " हीच त्यांची परवानगी समजून आम्ही आपले काम उरकून घेतले. श्रीयुत तात्या-साहेब यानीं लिहिलेल्या चरित्रांत दिलेला फोटो ह्या वेळीं घेतलेल्या फोटो-पैकींच आहे.

(७) धुळें येथील श्रीशिवाजी मंदिरासाठीं श्रीशिवाजी महाराजाचा पुतळा तयार करून घ्यावयाचा होता. मला या सबधीं अगाऊ कांहींच खबर अगर कल्पनाहि नसल्यामुळें त्याची अपेक्षा अथवा त्याकरतां प्रयत्न करण्याचे कारणच पडले नाहीं. पुतळ्याचे प्रश्नाबरोबरच लोकमान्य व श्री॰तात्यासाहेब याचे विचारें ते काम माझेकडून करवून घेण्याचे ठरवून त्याप्रमाणे एक दिवस श्रीयुत तात्या-साहेब मजकडे आले. श्रीशिवाजीमहाराजांसारख्या राष्ट्रीय पुण्यपुरुषाचें पवित्र काम लोकमान्यासारख्या तशाच विद्यमान विभूतींकडून माझेकडे सोपवि-ण्यात यावे या अनपेक्षित भाग्याबद्दल धन्यता वाटली. श्रीयुत तात्यासाहेब यानीं पुढील योजनेबद्दल खुलासा केला. कै. गोखले यांचे देणगींतून बरीचशी रकम मंदिराचे कामातच लागावयाची असल्यामुळे बाकी राहणाऱ्या रकमेंत काय साधेल ते पहावयाचे होतें. अश्वारूढ पूर्ण आकाराच्या धातूच्या पुतळ्याचे काम फारच खर्चाचे असल्यामुळें शिल्लक असलेल्या रकमेच्या अंदाजात, तसाच प्लास्टरचा पुतळा होण्यासारखा असल्यास करावा असा साधारण विचार दिसला; परतु स्मारकाचे दृष्टीने जरूर तो टिकाऊपणा व मोहकता प्लॅस्टरचे कामांत नस-ल्यामुळें मला ही योजना श्रेयस्कर वाटली नाहीं स्मारकाचे पद्धतीला साजेशी, अक्षय्य, टिकाऊ व खर्चाचे अंदाजांत होणारी मार्बल बस्टची कल्पना श्री. तात्या-साहेब यांस मी सुचवली व त्यानाहि ती योग्य वाटून त्याप्रमाणेंच करण्याचा विचार ठरला. काम सुरू करण्यापूर्वी एक वेळ पुण्यास येऊन लोकमान्यांची भेट घेण्याविषयीं श्री. तात्यासाहेब यानीं सांगितल्यावरून मी दोनचार दिवसांत तिकडे गेलो. श्री. तात्यासाहेब याचे बरोबर गायकवाडवाड्यात जाऊन लोकमान्याची भेट घेतली. शिल्लक राहणाऱ्या रकमेच्या मानाने पुतळ्याचे काम शक्य तितक्या

काटकसरीनें करण्याचें अगोदरच ठरलेलें होतें. तथापि बोलण्याचे सुरवातीलाच लोकमान्यांनीं पहिली गोष्ट ही सांगितली कीं, 'असलीं कामें एकदमच व्हावयाचीं असल्यामुळें त्यांत कमी अधिक खर्च लागला तरी हरकत नाहीं, परंतु त्यांत कोणत्याहि प्रकारें कमतरता राहता कामा नये.' अशा प्रकारें काटकसरीचे प्रश्नाबद्दल प्रस्तावना झाल्यानंतर मला कामासबंधीं कांहीं प्रश्न विचारले. त्यावरून त्यांना त्याविषयीं पूर्ण माहिती असून केवळ माझा अभिप्राय कळावा व त्या बरोबरच थोडी फार चांचणीही व्हावी असा त्यांचा दुहेरी हेतु दिसून आला. पुतळा करण्यासाठीं कोणकोणत्या ऐतिहासिक चित्राच्या व शब्दवर्णनाचा आधार घ्यावा त्याविषयीं लोकमान्यांनीं विचारच करून ठेवलेला असल्यामुळें कांहीं पुस्तकांची यादी व कांहींतील निवडक उतारे आणि एका फ्रेंच चित्रकारानें काढलेलें चित्र माझे स्वाधीन करून ते म्हणाले " शिवाजी महाराजांचे अगदीं विश्वसनीय चित्र अमुकच हे ठरवणें कठीण आहे; फ्रेंच चित्रकाराने काढलेल्या चित्राला थोडाफार आधार असावा असें लिहिलेल्या माहितीवरून वाटते. राजा रविवर्मा यांनीं प्रसिद्ध केलेलें चित्रहि अगदीं बरोबर आहे असें म्हणता येत नाहीं; तथापि तूर्त तें लोकांचें नजरेंत भरलेलें असल्यामुळें त्याकडेहि अगदींच दुर्लक्ष करून चालणार नाहीं. तरी उपलब्ध असलेलीं चित्रें व इतिहासातील शब्द-वर्णन या सर्वांना साधारण मिळतें येईल असें केले म्हणजे लोकांनाहि तें पटून साधारहि होईल." इतक्यांत मध्येंच कोणी सुचविलें " पुतळा भव्य दिसेल असा करावा." त्यावर लोकमान्य म्हणाले " शिवाजी होता तसाच करावयाचा म्हणजे तो कांहीं धिप्पाड किंवा भव्य नव्हता," असें सांगून लगेच त्याची उंची व वजनहि एका पुस्तकांत असल्याचे सांगितले. त्याप्रमाणें सर्व खुलासा झाल्यावर पुढील खर्चाची मला सवड असेलच असें गृहित धरून न चालतां ती सोय ताबडतोब तेथेंच करण्यांत आली, मी रीतसर पैसे पोंचल्याची पावती लिहूं लागलों तेव्हां " त्याची घाई नाहीं, ती सावकाश मागाहून पाठवून द्या" असें सांगून मला परत जाण्यास रजा दिली.

---

× × × × ×

( बी. ए, 'पुरुषार्थाचें मूळ' या केसरींतील लोकप्रिय लेखमालेचे लेखक, पुणें. )

( १ ) श्रीमंत × × × यांचा सरकारकडे पाठवावयाचा अर्ज लिहावयाचा होता. त्या संबंधाचे कागदपत्र पाहून लागलींच मला अर्ज लिहून घेण्यास सांगितलें. सांगतांनां मध्ये थांबण्याची किंवा एकदा सांगितलेले फिरविण्याची मुळींच जरूरी पडली नाहीं.

( २ ) लोकमान्य, कै० कृष्णाजी आबाजी गुरुजी व आणखी एक दोन गृहस्थ रस्त्याने चालले होते. भाषण नाटकांसंबंधांचें होते. नाटक पाहण्यास जाऊन अमुक सुधारणा सुचवाव्या असें गुरुजी लोकमान्यांना म्हणाले. तेव्हां ते म्हणाले— " मी नाटकाला कधीं जात नाहीं; मला काम नसलें म्हणजे मी आपला झोंप घेतों. "

( ३ ) लोकमान्यांविषयीं कांहीं पत्रांतून ' महाडकर ज्योतिषी यांनीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्यांस अमुक वेळां शिक्षा झाल्या. ' असा मजकूर आला होता, तेव्हां या बातमीच्या खरेपणाविषयीं खुद्द लोकमान्यांना विचारलें; तेव्हां त्यांनीं पुढील प्रकारचे उत्तर दिले. " वर्तमानपत्रांतील बातमी खोटी आहे. महाडकर ज्योतिष्याना मी पूर्वी ' ह्या वर्षी काय काय घडणार तें सांगा ' म्हणून विचारीत असे, परंतु त्यांनीं सांगितलेल्या गोष्टी अनुभवास न आल्यामुळे त्यांना भविष्य विचारावयाचे मीं सोडून दिले आहे. त्यांना चेहरा पाहून कुंडली बऱ्याच वेळां बरोबर मांडतां येते. मनुष्याचे नाक, डोळे, वर्ण यांवरून त्यांनीं कांहीं अडाखे बसविले असावे; तथापि हे त्यांचे अडाखे महाराष्ट्रीयांसंबंधाचे मुख्यत: आहेत. मजबरो.र ते मद्रासला आले होते, तेव्हां तेथें मद्रासी लोकांचा चेहरा पाहून कुंडली मांडण्याचें त्यांचे काम बरोबर जमेना. पुढे मद्रासी लोकांचा वर्ण व चेहरा यांविषयीं त्यांनीं विचार केल्यावर त्यांना ते काम साधारण साधू लागलें.........परवां विश्वनाथ ( त्याचे ज्येष्ठ चिरंजीव, हे त्या वर्षी नुकतेच प्लेगने गेले होते ) गेला त्याच्या मृत्यूविषयीं मला एकाहि ज्योतिष्याने सांगितले नाहीं. ती पहा कपाटांत पत्रिकाची भेंडोळींच्या भेंडोळीं पडलीं आहेत."

(४) १९०४ सालीं पुण्यास प्लेग असल्यामुळे मी गावाबाहेर झोपडींत रहात होतों. त्यावेळीं मी फर्ग्युसन कॉलेज लायब्ररींतील स्पेन्सरचे कांहीं ग्रंथ आणले होते. बळवतरावांना त्यांपैकीं एक ग्रंथ पाहावयाचा होता. तो मजजवळ आहे असें कळल्यावरून ते माझेकडे आले ! मला निरोप पाठविला असता, तर मी त्यांच्याकडे पुस्तक तेव्हांच पाठवून दिले असते, पण तसे करण्याचे त्यांच्या मनांत आलें नाहीं. सर्व कामे ते जातीनें करीत. आळस हा त्यांचा शत्रु होता !

(५) बडोदा स्टेटकडून माझ्या एका नातलगास जपानची स्कॉलरशिप मिळाली होती. स्कॉलरशिप घेणाऱ्याने बडोदा संस्थानांतील सधन गृहस्थाची जामिनकी द्यावी अशी एक अट होती. असा ओळखीचा सधन गृहस्थ सांपडणें कठीण असल्यामुळे बरीच अडचण पडली. एक गृहस्थ कबूल झाले, पण त्यांनीं उलट अट अशी घातली कीं 'बळवतरावांनीं तुमच्याबद्दल हमी घेतली पाहिजे. ' त्याप्रमाणें बळवतरावजींना कळविलें. तेव्हां त्यांचा व माझा म्हणण्यासारखा स्नेह नसताहि, त्यानीं माझी विनंति मान्य केली !

( ६ ) एका नियतकालिकाच्या संपादकाचा व्यवसाय करावा असें एकदा माझ्या मनांत आलें होते व त्यासंबधानें मी सल्ला विचारण्यास गेलों होतों. त्यावेळीं बळवतराव नव्या आणलेल्या छापखान्याच्या यंत्राची छुळ्वाछुळव करीत आर्यभूषण छापखान्यांत बसले होते. ' मला लेखनाचा सराव व फारसा अनुभव नाहीं, तेव्हां हें काम पत्करावें काय ' म्हणून विचारतां ते म्हणाले ' खुशाल पतकरा. कोणतेंहि काम केले म्हणजे येतें. मी लेखक किंवा संपादक होईन असें मला तरी पूर्वी कधीं वाटले होतें ? शिक्षकाचें काम आमरण करावयाचें हा माझा पहिला बेत, पण पुढें पडलों या कामात." जणु काय, त्यांच्या मतें त्यांच्याप्रमाणें सर्वांस यश येणें शक्यच आहे.

---

## नारायण सीताराम देशपांडे

[ फर्ग्युसन कॉलेजातील लोकमान्यांचे विद्यार्थी, खेड, जि. पुणें ]

( १ ) सन १८८६ सालीं शनवार पेठेंतील गद्रे यांच्या वाड्यात न्यू-इंग्लिशस्कूल व फर्ग्युसन कॉलेज पैकीं, पी. ई. चा वर्ग भरत असे. मी या सालीं कॉलेजच्या विद्यार्थ्यांपैकीं एक विद्यार्थी होतों. मला येथे कॉलेजची स्कॉलरशिप मिळत असे. कॉलेजात त्यावेळीं कै. वामन शिवराम आपटे संस्कृत, कै. बाळ-गंगाधर टिळक संस्कृत व गणित, कै. वासुदेवराव केळकर इंग्लिश, कै. गोळे सायन्स, कै. आगरकर लॉजिक वगैरे विषयाचे प्रोफेसर असत. जे ते आपा-पल्या विषयांत निष्णात होते. परंतु अपल्या विषयाखेरीज दुसरा विषय शिक-विण्याची पाळी आली असता, टिळकांखेरीज इतरास तें काम बहुधा साधत नसे. खेरीज पाच तास एकसारखे शिकविण्यास कोणी टिकत नसत व शंका विचारल्या असतां बहुतेक मंडळी चिडत. लो. टिळक यांची स्थिति तशी नव्हती. चारपांच तास अविश्रांतपणे ते शिकवीत, व कोणताहि विषय त्यांचा अवघड असे. ते कधीं चिडत नसत. गणित विषयात मला त्यांची योग्यता फार मोठी वाटे. कारण ते विद्यार्थ्यांस धरून करून आणण्यास उदाहरणें बीजगणिताचीं वगैरे देत असत. व ज्यास उदाहरणे येत नसत' त्यांस तीं वर्गांत समजावून देण्यात येत असत. त्यांची रीत अशी असे कीं, बीजगणिताचें 'उदाहरण' फळ्यावर एकवार लिहून ठेवलें जाई. नंतर ज्या कोणातरी विद्यार्थ्यांस उदाहरण

सुटत नसे त्यास तें त्याच्या वहीवरून कसें केलें ते वाचण्यास सांगत. त्याच्याकडे लक्ष ठेवून त्याची चूक त्यास समजावून सांगण्यांत येई. इतके अवधान त्या विद्यार्थ्यांचे वाचनावर त्यांचें राही. केव्हां केव्हा या अवधानाची सीमा येथपर्यंत जाई कीं, एकाद्या समीकरणांत दोन्ही बाजूतून '२ क्ष + य - ३ ' अशासारखी रक्कम साधारण म्हणून काढून टाकणे जरूर होते असेहि ते सांगत. साराश युनिव्हर्सिटीच्या प्रवेश परीक्षेत गणित विषयांत ज्या विद्यार्थ्यास शेकडा जवळ जवळ शभर मार्क मिळत अशा विद्यार्थ्यांसहि टिळकांच्या गणितज्ञतेबद्दल फार आचबा वाटत असे.

यावेळीं कै. गोपाळ कृष्ण गोखले हे न्यूइग्लिशस्कूलमध्ये मास्तर होते. मॅट्रिक क्लासास ते गणित शिकवीत असत. परीक्षेकरितां कांहीं निवडक मुलगे शिकविण्याचें काम त्यांचेकडे दिले गेले होते या वर्षी नऊ विद्यार्थी गणित विषयाचे विशेष शिक्षण घेण्यास पसत केले होते, त्यांत मी एक होतो. गोखले व टिळक या दोघांचीहि गणित विषयाबद्दल ख्याति होती. एकदां बोलतां बोलता दोघामध्ये श्रेष्ठ कोण असा विषय निघाला त्यावेळीं कै गोखले यानीं सागितले कीं, 'टिळक ते टिळक; आंम्हास त्यांच्या केसाचीहि सर येणार नाहीं.' मलाहि गणित विषयांत सपूर्ण मार्क बहुधा मिळत असत. गणितज्ञ म्हणून टिळकाबद्दल माझी फारच आदरबुद्धि असे.

( २ ) मेन साहेबांचे हिंदू कायद्याचे पुस्तक फार विस्तृत व त्याची किंमतहि फार असल्याने त्याची सक्षिप्त आवृत्ति काढावी अशी विनति माझ्या एका स्नेह्याने टिळकांना केली होती. त्यावर त्यांनीं सांगितले होतें कीं, मेनसाहेबांच्या ग्रथाची सक्षिप्त आवृत्ति काढण्यापेक्षां जरूर असल्यास मीच एक सक्षिप्त हिंदुधर्मशास्त्रावर पुस्तक लिहीन. मेनसाहेबांच्या पुस्तकाचा सक्षेप–ग्रंथ लिहिण्याचें मला योग्य वाटत नाहीं. यावरून त्यांचा स्वाभिमान दिसून येतो.

( ३ ) ओरायन वगैरे पुस्तकें इग्रजींत न लिहितां मराठींत लिहिलीं तर पुष्कळ वाचकांस–विशेषेकरून इग्रजी न जाणणाऱ्या जुन्या पद्धतीच्या लोकांस– फार उपयोग होईल, तरी तीं देशी भाषेंत लिहावीं अशी एकदां आम्ही त्यांस विनंति केली होती. त्यावेळीं यानीं सांगितलें कीं, "एकपरी तुमचें म्हणणें खरें आहे; परतु सदर पुस्तकें इग्रजी भाषेंत लिहिण्याचें एक कारण असें आहे कीं, परकी लोक आपलेवर जे आक्षेप करतात त्यांचें योग्य निरसन करण्याकरितां मला जे ग्रथ लिहावे लागतात ते.इंग्रजी भाषेंतच लिहिणे जरूर आहे."

(४) कुलकर्णी–वतनें गेल्यावर मी व दुसऱ्या एका कुळकर्ण्यानें त्यांची गांठ घेतली. त्यावेळीं ते शिक्षेतून नुकतेच सुटून आले होते. त्यांच्या वाड्यासमोर त्यावेळीं, त्यास भेटण्यास कोण कोण लोक येतात त्यांची नांवें टिपून घेण्या-

करतां पोलिस लोक ठेवले असल्याची लोकवार्ता होती तथापि त्यांस भेटण्याच्या उत्कट इच्छेनें पोलिसच्या भीतीमुळें आम्ही पराङ्मुख झालों नाहीं. सहावर्षांच्या वियोगानंतर आमची व त्यांची गांठ पडली. त्यावेळीं सर्व मंडळीस प्रथम हुंदका आला. तो आवरल्यावर प्रथम आमची ओळख त्यांस पटेना. मागून आम्ही नांवगांव सांगितल्यावर आमच्यासंबंधाच्या बारीक सारीक गोष्टीहि त्यांनीं आठवणीनें सांगितल्यावरून त्यांच्या स्मरणशक्तीचें आम्हास फार आश्चर्य वाटले. कुलकर्णीवतनाचा विषय निघतांच त्यांनीं सांगितलें कीं, " माझे दारासमोर गेट आहे. तरी कुळकर्णी वतनदार लोकांस मजकडे येण्यापासून त्रास होण्याचा संभव आहे. ' त्यावर आमच्या कुळकर्णी मित्राने उत्तर दिलें कीं, 'वतन गेलें तरी हरकत नाहीं. परंतु आम्हांस आपली भेट घेतल्याखेरीज रहावेना म्हणून विचारपूर्वकच आम्ही येथें आलो आहो.' असें कळल्यावर त्यांनीं कुळकर्णी वतनाच्या बाबतींत आम्हांस सांगितलें कीं, " इंग्रज सरकारास डोईजड माणसें नको आहेत. पेशवाई बुडाल्यावर लागलींच सरंजामदार लोकांस त्यांनीं सांगितलें कीं, ' आपण फौजफांटा व्यर्थ बाळगून मेहनत घेऊं नये. ही दगदग न करताच आम्ही जहागिरीचा कांहीं भाग आपणाकडे चालवूं.' त्यावेळीं सरंजामदार मंडळीस ती गोष्ट मानवली. त्यांचा मान कमी झाला. नंतर देशमूख, देशपांडे वगैरे वतनदार लोकांस तशीच सवलत दाखवून त्यांसहि घरीं बसविलें. आतां तीच गत कुळकर्णी वतनाची होण्याचा रंग दिसत आहे. "

---

## पुरुषोत्तम नारायण आठवले

[सावंतवाडी.]

( १ ) १८९४ चा मे महिना. पुण्याच्या वक्तृत्वोत्तेजक सभेंत एका अभंगावर भाषण करण्यासाठीं मी गेलो. व्याख्यानश्रवणास लो. टिळक होते. दुसरे दिवशीं एक गृहस्थ मजकडे येऊन म्हणाला 'टिळक तुम्हांला बोलावीत आहेत.' मी त्याजबरोबर गेलों. ही लोकमान्यांची व माझी पहिलीच भेट होय. लोकमान्य मला म्हणाले, " तुम्हाला बोलावयाचें कारण हें कीं, आजपर्यंत या अभंगाचे विषयावर, बोलण्यासाठीं येथे पुष्कळ उमेदवार आले. त्यांत कांहीं शास्त्री, पुराणीक, हरिदासहि होते. परंतु ते कवीचा अभ्यास केल्यावांचून येत. कवीचें हृद्गत कवीच्याच शब्दांत सांगण्याची तुमची शैली उत्तम आहे. कवीचा अभ्यास असाच या दृष्टीनें केला पाहिजे, " मी म्हटलें, " ही पद्धति मला

सहज पसत पडली ती मी स्वीकारली. तिजवर आपला मान्यतेचा शिक्का बसला हें पाहून मला फार संतोष वाटतो, पुढे हीच पद्धति मी सुरू ठेवीन. "

( २ ) लोकमान्यांची मित्रकार्य व देशकार्य करण्याची आस्था लोकोत्तर होती. १९०३ च्या एप्रिल महिन्यांत, धारवाडच्या प्राव्हिंशियल कान्फरन्ससाठीं लोकमान्य तेथें गेले होते. मी त्यावेळीं धारवाडास होतो. लोकमान्य हे ताईमहाराजांचे खटल्यांत जामिनावर खुले होते. मी त्यांस भेटण्यास गेलो. सवाद झाला तो येणें प्रमाणेः—

मीः—दत्तक कोणी कां होईना, आपण यातून आपले अंग काढून घ्यावें हें बरे. देशकार्यांचे कामीं उपयोगी पडणारा आयुष्याचा वेळ अशा रीतीनें फुकट जातो.

लोकमान्यः—तसे नव्हे. कै० बाबामहाराजांचा माझा फार स्नेह. त्यांचा माझ्यावर पूर्ण विश्वास, म्हणून त्यांनीं मला ट्रस्टी नेमिले. त्यांचे इच्छेप्रमाणें गोष्टी घडवून आणणे हें माझें कर्तव्य. त्यासाठीं कितीहि आपत्ति भोगाव्या लागल्या तरी त्या भोगणे हे मला जरूर. मित्रकार्यांचा असा कित्ता लोकापुढे ठेवणे हेच एक प्रकारे देशकार्य असे मी समजतों.

( ३ ) १९०६ चा जून महिना. पुण्यांत मी लोकमान्यांस भेटण्यास गेलों. त्यावेळीं वक्तृत्वासाठीं वेगवेगळे कवी वाचून त्यांच्या मतांचीं केलेलीं टांचणे, व लिहिलेलीं व्याख्यानें वगैरे कागदपत्र त्यांस दाखविण्यासाठीं बरोबर नेले होते. मला पाहतांच ' कवींचा अभ्यास कसा काय चालला आहे ' हा त्यांनीं मला प्रश्न केला. मी म्हटले, " केलेला अभ्यास दाखविण्यासाठींच आणलेला आहे ! " त्यांनीं ते कागदपत्र आस्थापूर्वक चाळून पाहिले व मला म्हणाले, " आठवले, हा तुमचा सर्व जन्माचा अभ्यास दिसतो. तुमचा लेखन व्यवसाय व वक्तत्व याचा उपयोग जनतेस झाला पाहिजे; या कामीं तुम्हांस मदत करणें हें आमचे कर्तव्य आहे. सांप्रत तुम्ही काय उद्योग करीत असतां ? " मी सांगितले ' सध्या दोन वर्षे मी उमरावतीस तेथील सर्व शाळांतून भारत, भागवत, रामायण या ग्रंथांच्या आधारें, एका श्रीमान्, सुशिक्षित व उदार गृहस्थाच्या आश्रयाखालीं नैतिक व्याख्यानें देत असतों ' लोकमान्य म्हणाले, ' फार उत्तम गोष्ट आहे. या कामीं तुम्हास कांहीं मदतीची गरज लागल्यास अवश्य मला कळवा. '

( ४ ) १९१४च्या नोव्हेंबरांत मी लोकमान्यांस भेटण्यास गेलो होतो. त्यावेळीं ते छापखान्यांत गीतारहस्याच्या तपासलेल्या प्रुफाप्रमाणें टाइपांत दुरुस्ती करवीत फिरत होते. त्यावेळीं गीतारहस्याविषयीं कांहीं संवाद करावा असे माझ्या मनांत आलें. सवाद झाला तो येणेप्रमाणें:—

मीः—गीतारहस्यावर माझी एक शंका आहे.

टिळकः—खुशाल विचारा.

मीः—गीतारहस्याची प्रत छापून जगापुढें यावयाची आहे. परंतु आपण जी अलीकडे गीतेच्या अभिप्रायाबद्दल व्याख्यानें दिलीं त्यावरून मला वाटतें कीं, सन्यासापेक्षा कर्म श्रेष्ठ असें आपलें मत असून भगवद्गीतेचा तोच अभिप्राय आहे असा आपला सिद्धांत आहे. पण गीतेंत ' अरति-र्जनससदि ' असें ज्ञानाचें लक्षण सांगितलें आहे त्याची वाट काय !

टिळकः—एवढेंचसें काय, ' अनिकेत ' ' सर्वारंभपरित्यागी, ' अपरिग्रह ' असे आणखीहि शब्द गीतेंत आहेत व त्यांस विरोधी अशीहि वाक्यें आहेत. अशा परस्परविरोधी वचनांची तडजोड करून खरा अर्थ बाहेर काढण्याचाच उद्देश या गीतारहस्याचा आहे.

मीः—कोणी एक खरोखर भक्ति–ज्ञान–वैराग्यसंपन्न आहे. त्याची स्वतःच्या अन्नाच्छादना पुरतीच शिक्षावृत्ति आहे. तो सर्व काळ स्वतःच्या मुक्तीचा विचार व भूतमात्राच्या हिताचें चिंतन करीत आहे. तर तो श्रेष्ठ नव्हे असें म्हणता येईल काय ?

टिळकः—असाच आमचाहि एक भक्ति–ज्ञान–वैराग्ययुक्त इसम आहे. तो तन, मन, धन, तिन्ही जनहिताकडे लावीत आहे. तुमचा इसम फक्त मनानेंच लोकहित चिंतीत आहे. पण आमचा इसम तन अर्पित आहे, म्हणजे बुद्धीनें ग्रंथ करतो, उपदेश करतो, जरूर पडल्यास केवळ शारीरिक श्रम देखील जगासाठीं घेतो, जवळ धन असल्यास ते लोक-कार्याकडे लावतो, नसल्यास बुद्धीच्या बळावर तें संपादन करून जन-हितासाठीं खर्चितो. तर तुमच्या त्या एकलकोंड्या वनवासापेक्षा आमचा हा जनांत अलिप्तपणें पण मिळूनमिसळून जनासाठीं खपणारा, अधिक श्रेष्ठ नव्हे असें म्हणतां येईल काय ? हें पुस्तक छापून लवकरच बाहेर पडेल तें वाचा व त्यावर जितक्या शंका निघतील तितक्या मला कळवा. त्या मी निवारण करीन. "

लोकमान्यांची व माझी ही शेवटची भेट होय.

# श्रीपादराव वैद्य

## [ पेशावर ]

सन १९१४ सालच्या नोव्हेंबर अगर डिसेंबर मधील गोष्ट. मी तेव्हा नुकतीच मॅट्रिकची परीक्षा झाल्यामुळे परीक्षेचा निकाल लागेपर्यंत तरी रिकामाच होतों. म्हणून केसरी ऑफिसमध्यें वर्गणीदारांची नांवें लिहिण्याचें हंगामी कामावर लागलों होतो. माझे स्नेही व नूतनमराठींतील एक शिक्षक श्री. रा. गोपाळराव निंबवीकर यांचे वडील नगर जिल्ह्यांतील आपल्या गांवाहून पुण्यास कांहीं कामानिमित्त आले होते. मी केसरी ऑफिसमध्यें काम करीत आहे हें त्यांस कळल्यावर त्यांना स्वतःस मधुमेहाचा विकार असल्यामुळे लोकमान्यांच्या भेटीची इच्छा दर्शविली. अर्थातच लोकमान्यांकडे जाण्यास कोणालाच मज्जाव नव्हता. तरी पण ह्यांना दहापांच मिनिटे तरी गांठ घेण्यास केव्हां वेळ मिळेल हे बाबांना विचारतों व त्यावेळेस तुम्ही तिकडे येऊन जरूर त्यांची गांठ घ्या असें मी त्यांना सांगितले. त्याप्रमाणें दुसरेच दिवशीं सकाळीं दहाच्या सुमारास रा. निंबवीकर, त्यांचे वडील व चुलते आणि मी असे सर्वजण गायकवाड वाड्यात गेलों. प्रथम कुशल प्रश्न झाल्यावर निंबवीकर यांच्या वडिलांनीं "मला मधुमेहाचा विकार आहे" असे सांगितलें. तेव्हां लोकमान्य अगदीं कळवळ्यानें म्हणाले, "अरेरे फारच वाईट रोग. औषधोपचारापेक्षा ह्या रोगाला पथ्यानें रहाणें हा एकच मार्ग चांगला आहे." असें म्हणून त्यानीं पथ्यानें कसें रहावें यासंबंधीं जें एक पत्रक छापलें होतें तें दिलें. पुढें आणखी थोडीशी विचारपूस करतां, लोकमान्यांनीं सांगितलें कीं, "मंडलेस असतांना पुष्कळ औषधोपचार केले, तरीपण त्यापासून गुण आला नाहीं. रोग वाढतां वाढतां इतका वाढला कीं, मला दररोज १२० औंस लघवी होऊं लागली. तेव्हां मी सरकारी डॉक्टरास 'पथ्यानें राहिल्यास त्रास होणार नाहीं' असें सांगितलें व तेव्हांपासून मला त्यांनीं पथ्यावर ठेवलें, आणि मग त्रास कमी कमी होत गेला." चहा घेण्याविषयीं विचारतां, "मी स्वतः चहा सॅकरीन घालून घेतों." असें सांगितलें. अंगावर पडणाऱ्या चट्ट्यांविषयींहि लोकमान्यांनीं "माझ्या अंगावरहि चट्टे पडले आहेत हे पहा" असे म्हणून मानेवरील चट्टे वगैरे दाखविले.

---

## कृष्णाजी केशव कोल्हटकर

[ हेडक्लार्क—वेस्टर्न इंडिया लाईफ इन्शुअरन्स कंपनी, सातारा. ]

(१) १८९८ सालची शिक्षा भोगून लो० मा० सुटून आल्यावर लवकरच साताऱ्यास प्रांतिक सभा झाली. त्यावेळीं मला लो.मा. प्रथम दर्शन झालें. परिषद झाल्यानंतर दे. भ. शिवरामपंत परांजपे यांचें पुराण येथील आगटे यांचे राममंदिरात व्हावयाचें होतें. पुराणाची तयारी होऊन जाहीर केलेली वेळ झाली म्हणून लोकमान्य, पुराणिक काळकर्ते, वगैरेंना बोलावण्याकरितां मी स्वयंसेवक नात्यानें नातूंचे वाड्यात गेलों, व " मंडळी जमली आहेत, आपली वाट पहात आहेत. तेव्हा आपण— चलावें " म्हणून लोकमान्य व काळकर्ते यास सांगितलें. तेव्हा मंडळी उठून आंगात घालू लागली. दे. भ. शिवरामपंत परांजपे यांच्या पोशाखास जरा वेळ लागला. लोकमान्य आंगात घालून ' अहो आटोपा ' म्हणत त्यांचें पुढें येऊन उभे राहिले व हसत थट्टेनें म्हणाले " अहो पुराणिकबोवा, लवकर आटोपा; तुम्हास हा असला पोशाख कशालाहो पाहिजे, तुम्ही तर पुराणिकबोवा ! चला आटपा लवकर ! दे. भ. परांजपे यांनीं स्मितहास्य केलें. पुढें त्याच रामाच्या देवळात भीष्माचार्यांच्या " अर्थस्य पुरुषो दासः " इ. वचनावर त्यांचें अत्यंत सुश्राव्य प्रवचन झालें.

( २ ) याच वेळीं येथील शिवाजी क्लबात लोकमान्याना पानसुपारी झाली त्यावेळीं त्यांचें भाषण होण्यापूर्वी एक मराठा गृहस्थ आपल्या भाषणांत आपल्या मनात खळबळणारे विचार लोकमान्यांच्या समक्ष असल्यामुळें मोकळेपणानें सांगू लागला. त्यावेळीं राजद्रोही काय ते एकटे टिळक. बाकी सर्व मंडळी पराकाष्ठेची राजनिष्ठ असल्यामुळें या मराठा गृहस्थाच्या भाषणास शुकशुक असा आडयळा होऊ लागला व एका बाजूने " अहो राजद्रोही भाषण करू नका " असे शब्द आले. भाषण करणारे गृहस्थ खेड्यांतले अशिक्षित असल्यामुळें ते जरा गोंधळले व त्यांनीं आपलें भाषण थांबविलें. हें पाहतांच लोकमान्यांनीं सांगितलें " तुम्हीं आपलें भाषण कां थांबवितां; तुमचें आपलें चालू द्या; अंतःकरणांत ज्या गोष्टी जळजळतात त्या बोलून दाखविण्यांत राजद्रोह कसला ? मनात राजद्रोह असलाच तर आपले विचार बोलून दाखविल्यानें तो कमीच होईल. तेव्हां तुम्ही लोकांच्या ' शुकशुक 'कडे मुळींच लक्ष देऊ नका आणि जें काय बोलावयाचें तें अगदीं निर्धास्तपणें बोला. " लोकमान्यांच्या या भाषणानें त्या मराठा गृहस्थास फारच धीर आला व त्यांनीं आपलें भाषण पुरें केलें. भाषणांत नाटकी डामडौल अगर अलंकार नव्हते. पण प्रत्येकास जणू काय आपल्या मनातलेच विचार हा गृहस्थ बोलतो आहे असें वाटल्याशिवाय राहिलें नाहीं.

(३) श्रीमंत दादासाहेब करंदीकर यांच्या ६१ व्या वाढदिवसानिमित्त लोकमान्य व त्यांच्या पक्षांतली पुण्यांतील बहुतेक थोर मंडळी येथे आली होती. त्या प्रसंगीं लोकमान्यांस अनेक ठिकाणीं पानसुपाऱ्या झाल्या. लोकमान्य एकदरींत या वेळीं प्रकृतीनें खालावलेच होते. नुसत्या कोठे पायऱ्या चढणे झालें तरी आपली काठी—म्हणजे श्री. अतुकाका फडणीस यांचा हात—धरल्याशिवाय ते रहात नसत. त्यांत कांहीं जणानीं पानसुपाऱ्या आपआपल्या माडीवर केल्या, त्यामुळें मोटारींतून रस्त्यावर, तेथून पायऱ्यांवरून घरांत व तेथून जिन्यानें माडीवर असा चढउतार करून लोकमान्य थकल्याचे स्पष्ट दिसत असे. श्री. लक्ष्मणराव आपटे यांचे माडीवर पानसुपारी होऊन लोकमान्य, दादासाहेब वगैरे मंडळी उठली, त्यावेळीं लोकमान्यांस एक गृहस्थ अत्यंत भक्तीनें म्हणाले "बळवंतरावजी, आपण आतां आणखी किती पानसुपाऱ्या घेणार ? आतां हे हाल पुरे झाले." यावर लोकमान्य आपल्या विनोदी स्वभावास अनुसरून म्हणाले:—"अहो, अश्वलाने किती घरीं जाऊन खेळ करून दाखवावयाचा, ही गोष्ट कोणी अश्वलाला विचारतात का ? आमचे दरवेशी दादासाहेब करंदीकर ! ( कारण त्यांच्या वाढदिवसानिमित्त लोकमान्यांस बोलाविले होतें ) अश्वलाला काय ? दरवेशाने चल म्हटलें कीं, तें चाललें; बस म्हटलें कीं तें बसणार ! "

(४) याच खेपेस श्रीयुत भाऊसाहेब सोमण यांचे माडीवर लोकमान्य व पाहुणे मंडळी यांचेकरतां गाणे चाललें होतें. गाण्यास लोकमान्य बसले होते व आसपास येथील व पुण्याची पाहुणे मंडळी बसली होती. लोकमान्यांच्या शेजारींच डाव्या हातास पुढच्या बाजूस श्री. खाडिलकर बसले होते. इतक्यांत श्रीयुत तात्यासाहेब केळकर आपले स्नान आटोपून माडीवर आले व पुढें मंडळी बसली असल्यामुळे मागच्या बाजूसच कोठे तरी बसण्याच्या विचारांत होतें. इतक्यांत लोकमान्य त्यांस म्हणाले, "अहो नरसोपंत, असें मागे मागे करूं नका, पुढे या" व त्याचे हातास धरून श्रीयुत खाडिलकर जेथें बसले होते त्यांच्या पुढच्या बाजूस त्यांस त्यांनीं बसविलें. केळकर खालीं बसताच लोकमान्य पुन्हां म्हणाले "हे काय नरसोपंत ! मागाहून आलात आणि खाडिलकरांच्या पुढें गेलात." केळकरानीं हजरजबाबीपणा करून उत्तर दिलें. 'मला हो काय, तुम्हीच आपल्या हातांनीं मला त्यांचे पुढे आणून बसविलेत त्याला मी काय करूं ! ' लोकमान्यांच्या कोटीचें स्वारस्य व श्रीयुत केळकरांच्या उत्तरांतील समयसूचकता हीं सर्वांच्या लक्षांत चटकन आलीं हें निराळें सांगणे नको.

(५) कराड येथें जिल्हासभा झाली, त्यावेळची एक मौज आठवते. लोकमान्य येणार ही गोष्ट अगोदर आसपासच्या खेड्यापाड्यांत पसरली होती. त्यामुळें सकाळींच श्री. सुपनेकरांचे वाड्यासमोर खेड्यांतील लोकांची गर्दी "टिळक महाराज " पाहाण्याकरितां जमली होती. लोकमान्य शौचमुखमार्जनाकरिता

मागील बाजूस गेले आहेत असें कळले. तेव्हां अर्थात् लोकांचा घोळका मागील दारासमोर जमला. परिषदेकरितां साताऱ्याहून अनेकजण आले होते. त्यांत श्री. नानासाहेब आगाशे आले होते, व तेही त्यावेळीं मागील चौकात उभे होते. नानासाहेबांचें शरीर धिप्पाड असे व पोषाखाचा डामडौल नजरेंत भरण्याजोगा होता. त्यांच्या या वैशिष्ट्यामुळें दाराबाहेरील खेड्यातील लोक 'अरे, ते पहा टिळक' असें म्हणून त्यांसच दुरून नमस्कार करूं लागले. मला हें पाहून मौज वाटली. कारण अगदीं दारात त्या लोकांच्या समोर लोकमान्य तोंड धुवत होते. लोकमान्यांच्या डोळ्यांत जरी विभूतिमत्वाची चमक असे तरी इतर बाजूनीं त्यांच्या अत्यत साध्या राहणीमुळें त्यांची ओळख खेड्यांतील त्या त्यांच्या भक्ताना त्यांच्या बाह्यवेषावरून होण्याजोगीं नव्हती. त्याचा साधा सदरा, डोकें उघडे व भुर्र उडणारी छोटी शेंडी, यामुळें त्यांचेकडे कोणाचें लक्ष गेलें नाहीं व श्री. नानासाहेब आगाशे यासच 'टिळक' समजून ते लोक नमस्कार करीत होते. त्याना टिळकदर्शनाचें पुण्य अज्ञातपणें न लागता ज्ञातपणानें लागावें असें मला वाटल्यावरून मी दारांत गेलों. व त्यांस त्याचे अगदीं समोर दिसत असलेले तेच टिळक असें सांगितलें. तेव्हा त्यांतला एकजण बोलला, "अहो दादा, हेच टिळक का? आहे खरा पुण्याचा राजा! लोकांच्या कैवाऱ्याला शोभेल असा साधा पुरुष आहे खरा." हे उद्गार ऐकून माझे अंगावर रोमांच उभे राहिले, व डोळ्यांस पाणी आलें. आज हे पुण्यस्मरण लिहून पाठविताना हा प्रसग अगदीं कालचा ताजा असा वाटला.

(६) स्नेही मंडळींत सहज बोलताना श्री. दादासाहेब करंदीकर यानीं खालील गोष्ट सांगितली "लोकमान्यांचा बारीक सारीक बाबतींतहि दांडगा आत्मविश्वास दिसून येई. चिरोलवरील खटल्यांत डोंगऱ्याची साक्ष चालली होती. त्यांच्या सहीचा कागद कोर्टापुढें आला होता. व ती आपली सही असल्याचें कबूल करणें त्यांस इष्ट नव्हते. 'या कागदावर सही तुमची आहे ना?' असा प्रश्न विचारल्यास ते हटकून नाकबूल करतील अशी मला खात्री असल्यानें मी तसा प्रश्न साक्षात् न विचारतां आजूबाजूनें प्रश्न विचारीत होतों. लोकमान्य मला सारखे डवचीत होते व म्हणाले "ही तुमचीच सहीना असें स्पष्ट त्यांस विचारा कीं." अखेरीस मी लोकमान्यांस म्हणालों "अहो, तसा साक्षात् प्रश्न विचारला आणि ते नाहीं म्हणाले तर त्यांत आपल्यास प्रतिकूल नाहीं का होणार?" यावर लोकमान्य म्हणाले "माझ्या समोर उभा राहून खोटें बोलायाची काय छाती आहे?" तसा प्रश्न विचारला तर साक्षीदार खोटे बोलणार व आपल्यास तितकीच प्रतिकूल गोष्ट होणार हे नेहेमीच्या अनुभवानें मला ठाऊक असल्याने मीं तो प्रश्न अखेरपर्यंत विचारला नाहींच. उलट तपासणी संपवून मी खालीं बसताच लोकमान्य ताडकन उठले व त्यांनीं डोंगऱ्यास प्रश्न विचारला "या

कागदांवर सही आहे ती तुमचीच आहे कां?" डोंगरे अमळ चपापले व घुट-मळून म्हणाले 'होय, ती माझीच सही आहे' हें उत्तर ऐकतांच उलट तपास-णीतला आजपर्यंतचा माझा अनुभव फुकट आहे; लोकमान्यांस दुसऱ्याची मनः-स्थिति मजपेक्षां अधिक समजते असा विचार माझे मनांत आला!"

(७) आमच्या आजीबाई (वडिलांच्या मातुःश्री) लोकमान्यांच्या परम भक्त असत. १८९८ सालच्या तुरुंगवासाचे वेळीं ते बंदिवासातून सुखरूप व लवकरच सुटून यावेत म्हणून त्यांनीं श्रीकृष्णलीलामृत या ग्रंथाचीं १८ पारायणें करण्याचा संकल्प केला. हीं पारायणे नित्याचीं प्रपचांतील कार्यें सभाळून त्यांनीं चालू ठेवलीं होतीं. अशा तऱ्हेच्या धार्मिक प्रवृत्तीचें महत्त्व त्यावेळीं मला पटलेले नसल्या कारणाने मी त्यांस विनोदानें एकादे वेळीं म्हणत असे "आजी, तुमची १८ पारायणे झालीं कीं टिळक सुटून येणार!" त्या नुसत्या हंसत असत. पुढें योगायोग असा आला कीं, त्यांचीं १८ पारायणें सपावयाला आणि लोकमान्यांची सहा महिने आधी सुटका व्हावयाला एकच गांठ पडली! त्यावेळीं त्या म्हणाल्या "बघ, माझीं १८ पारायणें संपतात तोंच टिळकांची सुटका झाल्याची सुवार्ता आली." मी त्यांस म्हणालों, "आजी, मोक्षमुलर म्हणून एक विद्वान् साहेब आहेत, त्यानें राणीला विनति केल्यावरून टिळकांची सुटका लवकर झाली. त्याचा तुमच्या पारायणांशीं कसा सबध पोंचणार!" त्यांनीं उत्तर केलें "कां नाहीं पोंचणार! ईश्वर सर्व कांहीं पाहतो व करतो. आपण श्रद्धेनें केलेली प्रार्थना तो ऐकतो व माणसाना बुद्धि तोच देतो. राणीला विनति करण्याची बुद्धि देवानेंच त्यास दिली."

(८) लोकमान्यांस ईश्वरानें आयुष्य व आरोग्य द्यावे म्हणून आपल्या नित्य नेमानें करावयाच्या ज्या गोष्टी त्यांत श्रीज्ञानोबारायांचा हरिपाठ रोज एकदां म्हणावयाचा समावेश आजीबाईनीं केला होता. लोकमान्यांच्या करितां हा रोज हरिपाठ म्हणण्याचा नेम त्यांनीं लोकमान्यांच्या निधनानतरहि बोलवत होते तोपर्यंत पाळला! घरांत मगलकार्य असो, घरांतील कोणी माणूस मृत्युवश झालें असो, किंवा स्वतःचे आजारीपण असो, त्यांचा नित्यनेम व टिळकांच्याकरितां करावयाचा हरिपाठ कधींहि चुकला नाहीं! एकदां त्या नवज्वराने अत्यवस्थ आजारी पडल्या होत्या. नवव्या दिवशीं सर्वांची आशा सुटली होती. हातपाय गार पडूं लागले, नाडी सुटूं लागली, घसा घरघरूं लागला, इतक्यांत वडिलांचे मनांत विचार आला कीं, कालपर्यंत आईनें टिळकांच्याकरितां हरिपाठ म्हणण्याचा नेम टळूं दिला नाहीं. त्यांना आंतून स्मृति असेल तर या नेमाची आठवण करून दिल्यास त्या हरिपाठ म्हणण्याचा प्रयत्न करतील व कदाचित् त्या पूर्ण शुद्धीवर येऊन त्यास उताराहि पडेल" या कल्पनेनें वडील आजींच्या कानापाशीं जाऊन ओरडून म्हणाले "आई, टिळकांच्या करितां म्हणायचा हरिपाठ राहि-

साहेबांकडे पाहून ) एकीकडे मध व ( बळवंतराव सहस्रबुद्धे यांजकडे वळून ) दुसरीकडे खडीसाखर ! मग स्वागत गोड झाले तर त्यांत नवल काय ? मध गोड असूनहि तो थोडा कडसर असतो व हातास चिकट लागतो. खडीसाखर चिकट लागत नाहीं, आंत बाहेर सारखीच स्वच्छ व गोड असते." करदीकरांस मध व सहस्रबुद्धे यांस खडीसाखर म्हणण्यांत त्यांच्या स्वभावांचे वर्णन करण्याचा हेतु होता कीं काय कोण जाणे !

---

## नीलकंठ शंकर नवरे

[ बी. ए., शिक्षक. सोलापूर. ]

( १ ) गीतारहस्य व ओरायन या ग्रंथावरून कित्येकांना असें वाटण्याचा संभव आहे कीं, लोकमान्य केवळ गंभीर वृत्तीचे असावेत. परंतु खासगी संभाषणांत, केसरींतील लेखांत, व बाहीर भाषणप्रसंगींहि, त्यांच्या बोलण्यांत विनोद चमकत असे, हे पुष्कळांस ठाऊक आहे. सारांश ते जरी वेदविद्यापारगत होते, तरी वेदाभ्यासजड नव्हते.

१९१५ सालीं, ज्यावेळीं गीतारहस्य छापण्याचे काम सुरू होतें, त्यावेळीं एका स्नेह्यास भेटण्यासाठीं मी सहज चित्रशाळेंत गेलों होतों. सकाळीं आठनऊ वाजण्याचा सुमार. लोकमान्य ओव्हरकोट घालून चित्रशाळेत आलेले होते. इतक्यांत ' चित्रमयजगत् ' मध्ये छापण्यास एक जाहिरात पोस्टाने आली, ती थोडक्यांत खालीलप्रमाणे होती:—

**' वधु पाहिजे '**

हल्लींच्या कुटुंबास मुलें होत नाहींत. वधु कोंकणस्थ, कऱ्हाडे अथवा देशस्थ कोणीहि चालेल......वगैरे.

म्यानेजर जाहिरात वाचीत असतां, " हल्लींच्या कुटुंबास मुलें होत नाहींत. " हें वाक्य ऐकून लोकमान्य म्हणाले, " तर मग या गृहस्थानें मुलें होण्याबद्दल सर्टिफिकेट असलेल्या वधूशींच विवाह करावा ! नाहींतर दुसऱ्या कुटुंबास खात्रीनें मुले होतील हे कशावरून ? "

( २ ) १९२० सालची मे महिन्यांतली गोष्ट. २० मे रोजीं गोरजमुहूर्तावर माझे स्नेही, श्रीधर ऊर्फ बापूचे लग्न भाऊमहाराजांचे वाड्यांत लागले. पानसुपारीस आलेल्या लोकांची गर्दी कमी कमी होत चाललेली होती; इतक्यांत

रँगलर परांजपे आले. दादासाहेब खापर्डे व लोकमान्य पानसुपारी खात गप्पा मारीत मंडपांतच बसले होते. मी मंडपांत इकडे तिकडे हिंडत असता पुढील संभाषण ऐकलें. रँगलरांकडे पाहून दादासाहेब लोकमान्यांस म्हणाले, " Two Mathematicians never agree " यांवर लोकमान्य तत्काळ म्हणाले, ' But they agree on fundamental principles. " रँगलरांनीं पानसुपारी घेतां घेता किंचित हास्यवदन केलें !

( ३ ) १९२० सालीं जुलई महिन्यांत मी सोलापूरला आलों. एप्रिल महिन्यांत भरलेल्या प्रांतिक परिषदेबद्दल लोक अद्याप बोलतच होते. त्या परिषदेस हजर असलेल्या एका नागरिकानें पुढील मौज सांगितली; स्वागताध्यक्षाचें भाषण चालूं असतां मंडपांत चलविचल उडाली. बाहेरून दगड येऊं लागले. तेव्हां लोकमान्य म्हणाले:—" आंतले दगड जेव्हा बाहेर गेले तेव्हांच बाहेरचे आंत येऊं लागले ! "

---

## नारायण बाळकृष्ण केळकर

(बी. ए., ' कै. गोविंद महाराजांचें चरित्र ' ' पतित अबला ' वगैरे पुस्तकाचे कर्ते, मॅनेजर प्राणीरक्षक संस्था, धुळें. )

( १ ) १९१४ सालच्या जून मधील गोष्ट. लोकमान्य नुकतेच सुटून आले होते. आम्हीं कॉलेजमधील कांहीं मित्रमंडळींसह लोकमान्यांचें दर्शन घेण्यासाठीं गायकवाडवाड्यांत भीत भीतच गेलों. कारण पोलिस नांवें टिपून घेतात वगैरे वातम्या बऱ्याच पसरल्या होत्या. म्हणून आम्हीं अगदीं गुपचूप वाड्यात आलों. लोकांची गर्दी सारखी सुरू होतीच. अशा गर्दीत आपण गेल्यास कोणास कांहीं विशेष समजणार नाहीं अशा समजुतीनें आम्हीं आत गेलों. लोकमान्य त्यांच्या घराच्या पश्चिमाभिमुख गॅलरींत उभे होते. आम्हीं त्यांचें मनमुराद दर्शन घेतलें. पूज्यभावानें त्यांस दुरूनच वंदन केले व खालीं मान घालून इकडे तिकडे न पाहतां वाड्याच्या बाहेर पडलों व तडक कॉलेजचा रस्ता धरला ! हेतु हा कीं, आम्हांस तुम्हीं कुठे गेलां होतां वगैरे कोणी विचारू नये.

( २ ) रविवार ता. २१ जून १९१४ रोजीं लोकमान्यांस जाहीर रीतीनें पानसुपारी देण्याचा व अहेर अर्पण करण्याचा समारंभ झाला. त्या दिवशीं गायकवाडवाडा माणसांनीं नुसता फुलून गेला होता. आम्हींहि गुपचूप एका बाजूस जाऊन बसलों होतों. त्यावेळीं लोकमान्यांचा अपूर्व सन्मान झाला.

( ३ ) बुधवार ता. २ सप्टेंबर १९१४ रोजीं गायकवाडवाड्यांत गणपति उत्सवानिमित्त मास्टर कृष्णा, भास्करबुवा बखले व बालगंधर्व, यांच्या गाण्याचा कार्यक्रम ठरला होता. गायकवाडवाडा माणसांनीं खेचून भरला होता. प्रथम मास्टरकृष्णा यांचें उत्कृष्ट गायन झाल्यावर भास्कर बुवा यांचे गाणें सुरू झाले. पण लोकास गंधर्वांचे गाणें प्रथम ऐकावयास मिळावें अशी इच्छा होती, म्हणून लोकांनीं गडबड करण्यास सुरवात केली. बुवांचे गाणे सुरूंच होते; पण लोक गडबड थांबवीनात व " गंधर्व गंधर्व " म्हणून ओरडूं लागले. त्यामुळें तात्यासाहेब केळकर यानीं लोकांस शांत राहण्याबद्दल विनति केली. तरी पण लोकांची गडबड थांबली नाहीं. व बुवांच्या गाण्यांत व्यत्यय येऊं लागला. ते पाहून लोकमान्यांस राग येऊन ते बोलावयास उभे राहिले व म्हणालेः—" आज जो कार्यक्रम व्हावयाचा प्रसिद्ध झाला आहे त्याप्रमाणेच तो होईल. त्यांत बदल होणार नाहीं. असें असतां चाललेली गडबड कां व्हावी हें मला समजत नाहीं. ज्यांना हा कार्यक्रम पसंत नसेल किंवा बुवांचें गाणें ऐकण्याची इच्छा नसेल त्यांनीं उठून जावे. कार्यक्रम ठरल्याप्रमाणेंच झाला पाहिजे त्यांत बदल होणें शक्य नाहीं." हें सडेतोड उत्तर ऐकतांच लोक गप्प बसले.

( ४ ) शनिवार ता. २० फेब्रुवारी १९१५ रोजीं कै. ना. गोखले यांची स्मशानयात्रा निघाली. त्यावेळीं स्मशानभूमीवरच्या दुःखवट्याच्या सभेंत लोकमान्याचें भाषण झालें. प्रथम डॉ. भांडारकर यांचें भाषण झाल्यावर लोकमान्यांस विनति करण्यांत आली. लोकमान्यांनीं भाषणास सुरुवात करताच लोकानीं टाळ्यांचा प्रचंड गजर केला. त्यावेळीं लोकमान्यांनीं त्या गोष्टीचा सडकून निषेध केला. लोकांवर त्यांचें विलक्षण वजन असे. याप्रमाणे लोकांस गप्प बसविल्यावर लोकमान्यांचें भाषण सुरूं झाले. भाषण साधारणतः १५—२० मिनिटें झालें असावे. त्यातील ४।५ मुद्यांच्या गोष्टी खालीलप्रमाणे आहेतः—

( १ ) मरण हें रकापासून रावापर्यंत सर्वांना लागू आहे.

( २ ) जन्मास आल्यापासून मरेपर्यंत आपल्या हातून जीं कांहीं बरीं वाईट कृत्यें होतात त्याचा आपणास परमेश्वरापाशीं झाडा द्यावा लागतो. तो झाडा देण्यासाठीं मृत्यु हे द्वार आहे. या द्वारांतून सुखाने जाण्यास आपला आयुष्यक्रम चांगला असला पाहिजे.

( ३ ) जगांत येऊन आपण करतों आहों काय, काय केलें पाहिजे, संसारांत राहून सर्व देह पोटाची खळगी भरण्यांतच कष्टविला कीं देशबांधवांचा फायदा किंवा देशाची सेवा केली, यांबद्दल आपल्या मनांत आपण विचार केला पाहिजे.

( ४ ) मनुष्याच्या मनांत सद्धेतु व उत्कट इच्छा असली तर त्याप्रमाणे कृति खात्रीनें करतां येते, हें नामदार गोखल्यांच्या उदाहरणावरुन घेण्यासारखे आहे.

( ५ ) शेवटीं नामदार गोखले यांची उणीव तुम्ही पुणे शहरांत तरी मात्र देऊ नका एवढे माझें तुम्हांस कळकळीनें सांगणें आहे.

याप्रमाणें लोकमान्यांच्या भाषणातील मुख्य मुद्दे मी लिहून घेतले होते ते दिले आहेत.

( ५ ) मंगळवार ता. १६ नोव्हेंबर १९१५ या दिवशीं आम्हीं कॉलेजातील मित्रमंडळींसह सिंहगड पहावयास गेलों होतों. आमच्या सुदैवानें लोकमान्य गडावर होते. आम्हीं गडावर सकाळीं ८॥ च्या सुमारास पोंहोचलों. लोकमान्यांची स्वारी अंगात एक सदरा घालून बंगल्याच्या पडवीवर इकडून तिकडे फिरत होती. आम्हीं सर्वांनीं त्यांच्या पवित्र चरणावर डोकें ठेवून लोकमान्यांस वंदन केलें. आम्हांस पाहताच. " तुम्हीं कोण, कोठून आला, उतरण्याची सोय कोठें आहे, जेवण्याची सोय काय, " वगैरे अनेक प्रश्नांचा भडिमार झाला. आम्हीं फराळाचें बरोबर घेऊन आलों होतों. स्टोव्ह वगैरे सर्व सामुग्री होतीच. त्यामुळें आम्हीं तसें त्यास विनयपूर्वक कळवून देवडीवर उतरणार म्हणून सांगितले. परंतु त्यांस ते न आवडून त्यांनीं घरातून किल्ल्या आणल्या व शेजारचा बंगला उघडून देऊन, भांडींकुंडीं, एक मोठा झोन्या, तक्के, लाकडें, गोवऱ्या वगैरे सर्व सामान स्वतः हातानें काढून दिले व काम झाल्यावर सर्व व्यवस्थितपणें लावून ठेवा असें आम्हांस बजावून लोकमान्य आपल्या उद्योगास लागले. आम्हीं आश्चर्यानें अगदीं थक्कच होऊन गेलो. लोकमान्यासारख्या थोर विभूतीनें विद्यार्थ्यांकरितां स्वतः एवढे कष्ट सोसून तरतूद लावून द्यावी, असा अनुभव मला वाटतें दुसऱ्या कोणाचाहि नसेल! रात्रीं ७॥ चे सुमारास आम्हीं त्यांची भेट घेण्याचे ठरवून त्याप्रमाणें बंगल्यावर गेलो. लोकमान्य आरामखुर्चीवर बसून कसला तरी ग्रंथ वाचीत होते. आम्हीं आत शिरलो व लोकमान्यास नमस्कार करून बाजूस उभें राहिलों. बसा म्हणून लोकमान्यानी आम्हांस आज्ञा केली. सतरजी सर्वांना पुरेशी नव्हती. त्यामुळें कांहीं विद्यार्थ्यांस जमीनीवर बसावें लागलें. पण आम्हास तसें बसू न देता आपल्या पलंगावर बसण्याविषयीं आज्ञा केली. आम्हास तसे करण्यास संकोच वाटला. पण लोकमान्यांनीं आम्हांस जमिनीवर बसू दिले नाहीं आम्हीं बसल्यावर लोकमान्यांनींच पहिला प्रश्न केला. " कोणीकडे आलां व काय काम आहे?" आम्हीं हा प्रश्न ऐकून गांगरूनच गेलो. कारण त्यांच्याशीं कांहीं काम आहे म्हणून आम्हीं गेलोंच नव्हतो. व याविषयीं विचारहि कोणीच केलेला नव्हता. तेव्हां आम्हीं काय उत्तर देणार? सहज आलों आहों, आम्हास कांहीं उपदेशपर शब्द आपण सांगावें अशी आम्ही विनति केली. म्हणून विद्यार्थ्यांच्या अभ्याससंबधीं बोलणें झालें. नंतर समाजसुधारणा, औद्योगिक चळवळ, धार्मिक शिक्षण, राजकीय चळवळ वगैरे पुष्कळ गोष्टींसंबधानें लोकमान्यांनीं आम्हास सांगितलें.

धार्मिक शिक्षणासंबधानें लोकमान्य म्हणाले कीं, " हल्लीं हा प्रश्न विशेष लक्षांत घेण्यासारखा आहे. कारण पूर्वीच्या लोकांचे स्वतःचें वर्तन अत्यंत धार्मिक असे. त्यामुळे शिक्षणाची आम्हांस फारशी जरूरी भासत नसे. पण आतां घरींहि व शाळांतूनहि धार्मिक शिक्षणाचा अभाव असल्यामुळें अभ्यासक्रमांत धार्मिक शिक्षणाचा समावेश अवश्य झाला पाहिजे. "

तसेंच हल्लींच्या तरुणांनीं काय करावें असा प्रश्न निघाला असतां लोकमान्य म्हणाले, " जो उठला तो लागला सरकारी नोकरीच्या मार्गे ! इतक्या लोकांस सरकार नोकऱ्या देणार कोठून ? स्वावलंबनानें स्वतःच्या पायावर उभें राहण्यास शिकलें पाहिजे. मला नोकरी मिळत नाहीं अशीं कधी मारवाड्याच्या मुलानें तक्रार केली आहे का ? त्यांचें लक्ष आपल्या उद्योगधंद्याकडे असते. यःकश्चित् माळीण, कीं जिला पुरे दहा आंकडेहि मोजतां येत नाहींत ती देखील रुपयाच्या मालाचे सतरा अठरा आणे कमवित्ये आणि तुमच्या हातांत रुपया दिला तर त्याचे तुम्हीं बारा आणे तरी परत आणाल कीं नाहीं याची भ्रांतच ! विद्यार्थ्यांनीं आतां नोकरीच्या नादांत फारसे पडू नये. नोकरी म्हणजे गुलामगिरी होय ! वाटेल तो उद्योग करा, पण आपली बुद्धि सरकारास विकूं नका. "

(६) एकदा गणेशोत्सवाच्या दिवसांत दुपारीं १॥ च्या सुमारास मी कशाकरितां गांवांत गेलों होतो मला कांहीं आठवत नाहीं. पण लोकमान्य आप्पाबळवंताच्या गेटाकडून १५–२० लोकांसह पायींच वाड्याकडे परत येत होते. ऊन सपाटून पडलें होतें. पण लोकमान्य कांहीं मंडळींसह पायींच चालत येत होते. कपाळास गुलालाचा मळवट भरलाच होता. अशा स्थितींत त्यांना भर उन्हातून—छत्री देखील बरोबर नव्हती—पायीं चालतांना पाहून मला फार नवल वाटलें.

( ७ ) किर्लोस्कर थिएटरमध्ये प्रि. परांजपे यांच्या अध्यक्षतेखालीं इंडिअन डिफेन्स फोर्स संबधानें सभा भरली होती. पुष्कळ वक्त्यांचीं भाषणें झालीं. तेव्हां श्रोतृवर्गांतून ' शेम शेम ' चा उच्चार अनेक वेळां करण्यांत आला. लोकमान्यांचेंहि त्यावेळीं भाषण झालें. तेव्हां "तुमच्या शेम शेमच्या नुसत्या आरोळ्या ऐकूनच मला लाज वाटूं लागली आहे; शेम शेम ओरडून कांहीं उपयोग होणार नाहीं. प्रत्यक्ष कार्य करावयास तयार आहां कां ? " असा रोख ठोक जबाब लोकमान्यांनीं विचारला. त्यावेळीं सभा अगदीं स्तब्ध होऊन गडबड अगदीं बंद झाली. सर्व भाषणे इंग्रजींतच झालीं.

( ८ ) शुक्रवार, ता. २८ नोव्हेंबर १९१९ रोजीं मी प्रो. शेलार यांची सर्कस पहावयास गेलों होतो. कर्मधर्मसंयोगानें त्याच दिवशीं लोकमान्यहि सर्कस पाहण्यास आले होते. खेळ आटोपल्यावर प्रो. शेलार यांनीं लोकमान्यांस पुष्पहारांनीं मंडित केल्यावर लोकमान्य उत्तरादाखल दोन शब्द बोलले ते असे. " प्रो. शेलार यांनीं हिंस्र पशूंना ताब्यांत आणण्यांत जे कौशल्य दाखविलें व

अप्रतिम हातोटीनें त्यांच्यावर ताबा मिळवून त्यांच्याकडून चोख कामें करून घेतलीं. तसेंच आम्हीं जी मोठी सर्कस सुरू केली आहे त्यामध्यें आम्हांलाहि असेंच यश येवो हीच परमेश्वराजवळ प्रार्थना आहे" सर्कसीमध्यें सुद्धा लोकमान्यांना स्वराज्याखेरीज दुसरें कांहीं सुचत नव्हतें.

( ९ ) शुक्रवार, ता. १६ जानेवारी १९२० रोजीं देशभक्त दादासाहेब खापर्डे. डॉ. साठ्ये व विठ्ठलभाई पटेल हे विलायतेहून परत आले. तेव्हां सन्मानार्थ शांतारामच्या चाळींत लोकमान्यांच्या अध्यक्षतेखालीं जाहीर सभा भरली होती. त्यावेळीं अध्यक्ष या नात्यानें लोकमान्य म्हणाले:—"आपले ध्येय साध्य होईपर्यंत आपण चळवळ चालू ठेविली पाहिजे. जगातील बहुतेक सर्व देशात आज बदल होत आहे. व अशा आणीबाणीच्या वेळीं आपण नेटानें चळवळ चालविली तर माझी खात्री आहे कीं, चारपाच वर्षात आपणांस स्वराज्य मिळेल अमृतसरच्या कॉंग्रेसने सुधारणा कायदा हा अपुरा, असमाधानकारक व निराशाजनक आहे असें ठरविलें आहे. या कायद्यामुळें खरी सत्ता अशी कांहींच मिळाली नाहीं. पिशवीचें तोंड सरकारच्याच हातांत असून आमच्या तोंडावर उगीच एक तुकडा टाकून आम्हांस गप्प बसविण्याचा सरकारचा हा एक डाव आहे. स्वयनिर्णयाचें तत्त्व आतां मान्य झालें असून इकडील परिस्थिति समजावून देण्यासाठीं पाश्चिमात्य राष्ट्रांत आपण योग्य ते प्रतिनिधी पाठविले तर ते हिंदुस्थानास हितावहच होईल. सहकारिता ही नेहमीं सापेक्ष आहे. नोकरशाहीनें लोकांशीं सहकारिता केल्याखेरीज लोकाना नोकरशाहीशीं सहकारिता करता येणार नाहीं. इंग्लंडातील मजूरपक्ष आपल्याशीं सहकारिता करावयास व मदत करण्यास तयार आहे. आणि अशा वेळीं जर आपण आपणापुढें टाकलेला तुकडा चघळण्यात संतोष मानला तर सर्व जगांत आपलें हांसें झाल्याखेरीज राहणार नाहीं. द्विदल राज्यपद्धति फोल असून फोडा व झोडा या पूर्वीच्या धोरणावर येथील राज्यकारभार आता चालणे शक्य नाहीं. मिळालेल्या सुधारणांत समाधान माना असा मानभावीपणाचा उपदेश कांहीं लोक करतील. पण त्यानें तुम्ही फसू नका. इजिप्त आयर्लंडसारखे देश स्वराज्याची मागणी जोरानें करीत असताना मिळालेल्या आणा दोन आण्यांच्या स्वराज्यांत आपण समाधान मानून घेणें यासारखी दुसरी कोणतीहि लाजीरवाणी गोष्ट नाहीं." भाषण इंग्रजींत झालें.

( १० ) शुक्रवार, ता. ३० जानेवारी १९२० रोजीं शांतारामाचे चाळींत अलीबंधूंचा सन्मान करण्यासाठीं लो. टिळक यांच्या अध्यक्षतेखालीं सभा भरली होती. सभेच्या कामास सुरवात करतांना लोकमान्य म्हणाले:—"आपणा सर्वांच्या वतीनें आजच्या सन्माननीय पाहुण्यांचें मी स्वागत करितों. माझी प्रकृति बरोबर नसल्यामुळें मी भाषण वगैरे करू नये म्हणून डॉक्टरांनीं मला बंदी केली आहे. पण आजच्या महत्त्वाच्या प्रसंगामुळे डॉक्टरांच्या उपदेशास न

जुमानतां मी येथें आलों आहे." लोकमान्यांस बोलवेना म्हणून त्यांनीं बॅ. बॅप्टिस्टा यांना भाषण करण्यास सांगितलें. त्यांचे भाषण झाल्यावर लोकमान्यांनीं अलीबंधूंच्या गळ्यांत पुष्पहार घातले. त्यावेळीं लोकमान्य म्हणाले, "ही सुमन-माला मी सुमनाने अर्पण करतो." लोकमान्यांच्या उजव्या बाजूस महमदअली होते व शौकतअली डाव्या बाजूस बसले होते. त्यामुळें लोकमान्यांनीं साहजिक-पणे उजव्याबाजूस बसलेल्या महंमदअलींच्या गळ्यांत प्रथम हार घातला. प्रथम शौकतअलींच्या गळ्यांत हार घातला नाहीं ही केवळ नजरचूक. व्यासपीठावरील एका गृहस्थानें तसें बोलूनहि दाखविलें. पण त्यावर लोकमान्य म्हणाले;:—"महंमदअलींना मी प्रथम हार घातला हा कांहीं चुकीने नाहीं घातला, तर मुद्दा-मच घातला. शिष्यादिच्छेत्पराजय या न्यायाने आपला शिष्य अधिक विद्वान् होऊन त्याचा लौकिक वाढला म्हणजे खऱ्या गुरूस जसा आनंद होतो किंवा आपल्या मुलाचा आपल्या डोळ्या देखत झालेला सन्मान पाहून बापाला जसा कल्पनातीत संतोष होतो तसाच महमदअलींचा शौकतअली देखत प्रथम सन्मान केल्यानें त्यांना फार आनंद होईल अशी माझी खात्री आहे." असे म्हणून लोकमान्यांनीं शौकतअलीकडे पाहिलें व त्यांनींहि लोकमान्यांच्या म्हणण्यासच दुजोरा दिला. चूक काढणाऱ्या सद्गृहस्थास आपण कुठून बोललों असें होऊन गेले! आम्हीं मात्र लोकमान्यांच्या समयसूचकतेचे आश्चर्य करीत होतो. अलीबंधूंचीं भाषणे आटोपल्यावर समारोप करतांना लोकमान्य म्हणाले:—"आज आजारीपणामुळे मला नीट बोलतां येत नाहीं यासारखे मला माझ्या उभ्या आयुष्यांत कधींहि इतके वाईट वाटले नाहीं." प्रथम अलीबंधूंच्या भाषणाबद्दल दोन शब्द सांगून लोकमान्य म्हणाले, "इंग्लंडच्या राजास डिफेंडर ऑफ फेथ म्हणून म्हणतात. ब्रिटिश साम्राज्यात हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती वगैरे अनेक धर्मानुयायांचा समावेश होत असल्यामुळें इंग्लंडच्या राजास डिफेंडर ऑफ फेथ्स् होण्याखेरीज दुसरें गत्यंतर नाहीं. प्रजेचा संतोष हे ब्रिटिश राज्यकाभाराचे ध्येय आहे व लोकांच्या सुखसमाधानावर ब्रिटिश राज्याची शाश्वति अवलंबून आहे असें १८५८ च्या राणी सरकारच्या जाहीरनाम्यांत म्हटलें आहे. ह्या जाहीरनाम्यांस अनुसरून मुसलमानांच्या मनासारखा खिलाफतीच्या प्रश्नाचा निकाल ब्रिटिश लोकांना कराव-यास लावणें भाग आहे. या प्रश्नाचा समाधानकारक निकाल लावला नाहीं व सात कोटि मुसलमान व तीस कोटि हिंदु किंवा जगाच्या लोकसंख्येपैकीं $\frac{1}{5}$ लोकसंख्येस ब्रिटिशांनीं नाराज ठेवण्याचें मनांत आणले तर मी असें स्पष्ट रीतीनें सांगतो कीं, ब्रिटिश साम्राज्यास कधींहि शाश्वति राहणार नाहीं. आज मुसलमानावर प्रसंग आहे, उद्यां हिंदूवरहि येईल. अशावेळीं आमच्या मुसलमान बंधूस आम्हीं शक्य तेवढी मदत करावयास तयार आहो. आणि या कामीं कितीहि वेळा मदत लागली तरी मी स्वतः ती देण्यास व इंग्लंडला जाण्यास तयार आहे." भाषण इंग्रजींत झाले..

( ११ ) नेटिव्ह अंमलदार, मग त्याचा हुद्दा केवढाहि असो, मनानें किती पंगु बनतात याचें उदाहरण देण्यासाठीं लोकमान्यांनीं आम्हास एक उदाहरण सांगितलें. लोकमान्याची मंडालेहून सुटका झाल्यावर त्यांनीं जगन्नाथमहाराजांस आपल्या घरींच ठेवून घेतलें. पुण्याच्या हायस्कुलांत त्यांना घालावें असा विचार ठरून त्याप्रमाणे त्यांना हायस्कुलांत पाठविण्यांत आलें. तेव्हां त्यावेळच्या हेडमास्तरानीं वास्तविक तशी कोणत्याहि प्रकारची जरूरी नसतांना जगन्नाथमहाराज केवळ लोकमान्याकडे रहात होते म्हणून सरकारास ही गोष्ट कळविली व जगन्नाथमहाराजांस हायस्कुलांत घेऊं काय म्हणून विचारिलें ! सरकारनें अर्थातच ह्या गोष्टीस हरकत घेण्याचें कांहींहि कारण नव्हतें व त्याप्रमाणे परवानगी मिळालीहि. ही गोष्ट सांगून लोकमान्य म्हणाले, "पाहा, आमचे लोक किती भागूबाई बनत चालले आहेत. नोकरीच्या चरकांत मनुष्य सांपडला म्हणजे त्याची गुलामासारखी स्थिति होते."

( १२ ) पुढील गोष्ट ही लोकमान्यांनींच आम्हांस सांगितली. "पैसाफंडाची कल्पना निघून ती जशी लोकप्रिय होत चालली तशी टिळकद्वेषी मनुष्यांच्या तळव्याची आग मस्तकास पोंचू लागली. पैसाफंड मागावयास स्वयंसेवक डॉ. परांजप्ये ( फर्ग्युसन कॉलेजचे माजी प्रिन्सिपॉल ) यांचेकडे गेले. तेव्हां स्वयंसेवकास त्यांनीं धमकी देऊन कंपाऊंडाबाहेर हांकलून लावून पुन्हां पैसाफंड मागावयास येऊं नये म्हणून सक्त ताकीद दिली ! आणि याचें कारण काय तर पैसाफंडाचे उत्पादक टिळक ! तोच अनुभव डॉ. भांडारकरांचाहि ! पण मजा अशी कीं, मी डॉ. भांडारकर यांचेकडे गेलों आणि काय असेल तें असो, मी जातांक्षणींच माझ्या हातावर डॉक्टरसाहेबांनीं पैसे ठेविले व म्हणाले "टिळक, काल तुमचा स्वयंसेवक पैसाफंड मागावयास आला होता तेव्हां मी त्याला पैसाफंड दिला नाहीं. पण फिरून विचार केल्यावर असें वाटलें कीं, तुमचा आमचा मतभेद असला तर तो राजकीय बाबतींत; स्वदेशी उद्योगधंद्याच्या बाबतींत त्याचा कांहींहि संबंध नाहीं. म्हणून पैसाफंडाकरितां हे पैसे मी तुमच्याजवळ देतों."

---

# हरि भिकाजी करमरकर

[ एम्. ए., माजी प्रोफेसर राजाराम कॉलेज, कोल्हापूर. ]

लोकमान्यांशीं माझा मुळींच परिचय नव्हता—ओळखहि नव्हती. तथापि १९०४–५ सालीं या थोर पुरुषाच्या भेटींचा सुयोग आला. हा प्रसंग मी कधींहि विसरणे शक्य नाहीं, पण आठवण लिहिण्यासारखे मात्र यांत विशेष कांहीं नाहीं. तथापि मला मात्र तो स्मरणविषय होऊन बसणें स्वाभाविक आहे. त्यावेळीं उम्याउम्याच त्यांची आमची भेट झाली, तेव्हां मी त्यांस म्हणालों 'माझी आपली ओळख नाहीं, तरी पण आपणास थोडेसे विचारावेसे वाटते; म्हणून मी एक दोन गोष्टी विचारूं काय?' अति तत्परतेनें व स्मित करून 'विचाराहो, जरूर विचारा, याला इतकी प्रस्तावना कशाला पाहिजे?' असें ते म्हणाले. मी म्हणालो 'आपण रात्रंदिवस जी एवढी प्रचंड खटपट करितां ती आपल्या देशाचे भाग्य पुढें खात्रीनें उदयास येईल या भावनेनें करितां कीं काय?" उल्हसित वृत्तीने व आत्मविश्वासपूर्वक लोकमान्य म्हणाले 'तुम्हाला ही शंका तरी कशी येते? अहो, India is going to be regenerated and her future would be as splendid as it was in ancient days;' 'आपण काय वाटेल तें लिहून व बोलून एकटे कैदेत गेल्याने हे घडून येणार असें आपणांस वाटतें काय?' असा प्रश्न मी करतांच ते म्हणाले "माझ्या सारखा एखादाच तुरुंगात जाऊन काय होणार हें खरें; लाख दोन लाख गेले पाहिजेत, तेव्हां कोठे जरा हालचाल होईल व मग सरकारची झोप उतरेल; पण याचा उपक्रम कोणी तरी करावयास पाहिजेना? तेवढे काम आमचे आहे." मनांत कोरून ठेवण्यासारखे हे शब्द ऐकून 'बरे आहे, बाहेर टांगा वाट पाहात आहे, माझें समाधान झालें, गाडीची वेळ झाली,' असे म्हणून लोकमान्यांची मी रजा घेतली.

वरील प्रसंग घडून येण्यापूर्वीं कांहीं दिवस महाराष्ट्रांतीलच एका प्रसिद्ध जहाल पुढाऱ्यास मी तोच प्रश्न केला होता. तेव्हां त्यांनीं प्रांजलपणे उत्तर दिले "आम्ही जे कांहीं करितो तें कांहीं तरी करीत रहावयाचे म्हणूनच करितों. आम्ही इंग्रजांच्या या लढ्यांत खास कायमचे मरणार!!" तुलनेने श्रेष्ठ गोष्टीचें महत्त्व मनावर बिंबावें म्हणून हा यथासाग्र प्रसंग वर दिला आहे.

---

## कुमारी शांताबाई शारंगपाणी

[ इंदूर. ]

सन १९१७ सालीं मी मुद्दाम लो० टिळकांस पाहण्यास वडिलांबरोबर पुण्यास गेलें होतें. त्यावेळीं मी नऊ वर्षांची होते. आमचेबरोबर माझे आतेवधू हेहि आले होते. माझे आतेवधू त्यावेळीं सोळा वर्षांचे असून, त्यावर्षी मुंबई युनिव्हर्सिटीची मॅट्रिकची परीक्षा नापास झाल्यामुळें फार उदास दिसत होते.

माझे वडील, मी व आतेवधू असे आम्ही 'केसरी' ऑफिसांत लो० टिळकांकडे गेलों. त्यावेळीं लोकमान्य 'केसरी'चे संपादक श्री. नरसोपंत केळकर यांच्याशीं बोलत होते. टिळकांचा व माझ्या वडीलांचा स्नेह होता. त्यांच्या व टिळकांच्या अर्धा पाऊण तास गप्पा झाल्या. नंतर टिळकांनीं आमच्याबद्दल माहिती विचारली. त्यांत आमचे आतेवधू नापास झाल्यामुळें फार उदास झाले आहेत असें टिळकांस कळलें. तेव्हां लोकमान्यांनीं त्यांचें समाधान करून त्यांना सांगितले, "तुम्ही लवकरच एम्. ए. व्हाल असें आज मी भाकित करतों."

यदांच गेल्या वैशाखांत आमचे आतेवधू एम्. ए. झाले ! ही तार जेव्हां मी प्रथम वाचली त्यावेळीं मला लोकमान्यांच्या शब्दांची आठवण झाली. एक दीर्घ उसासा टाकून मी म्हटले, 'आज लो० टिळक हे ऐकण्यास नाहींत.' एका डोळ्यानें अश्रु पुसीत व दुसऱ्या हर्षोत्फुल्ल डोळ्यानें पहात मी आमचे आतेवधूचे हातांत तार टाकली. तार वाचल्यानंतर त्यांचेहि नेत्र पाण्यानें भरून आले, व त्यावेळीं तेहि म्हणाले " आजचा हा दिवस त्या दिवसाच्या टिळकांच्या उपदेशानें व प्रोत्साहनानेंच मला दिसत आहे. "

---

## पृथ्वीगीर हरिगीर गोसावी

[ संपादक ' हरिकिशोर, ' यवतमाळ. ]

(१) इ. स. १८९५ सालीं मुंबईस शिकण्याचा योग आला. त्याच वर्षी दे. भ. टिळक नामदार झाले आणि पुण्याला कॉंग्रेसचे अधिवेशन झालें. राष्ट्रीय सभेला बरेच देशभक्त येणार व नामदार टिळकांचेंहि दर्शन होणार या आशेनें एका मित्राबरोबर मी पुण्यास गेलों.

रेमार्केटच्या समोरचे पटांगणांत जंगी जाहीर सभा झाली. त्यावेळीं जमलेल्या अनेक देशभक्तांत नामदार टिळक ह्यांच्या साध्या पोषाखामुळे, ते तेव्हांच ओळख

आले. फार आनंद झाला. "साधी राहणी व उच्च विचार" यांचा मूर्तिमंत पुतळा पाहून पूज्यबुद्धि जास्तच वृद्धिंगत झाली, व दुरूनच नमस्कार केला.

( २ ) इ. स. १८९७ सालीं उमरावतीला राष्ट्रीय सभा झाली. मी मुख्य स्वयसेवकांपैकीं एक होतों. याच वर्षीं महाराष्ट्रांतील पहिला 'राजद्रोहा'चा खटला झाला व दे. भ. टिळकांस बादशाही पाहुणचाराचा मान दुसऱ्यांदा मिळाला. अर्थात् राष्ट्रीय सभेला ते हजर राहूं शकले नाहींत. तथापि राष्ट्रानें त्यांचें जें अभिनदन केले तें विसरणें शक्य नाहीं. इ. स. १९०३ मध्ये प्रसिद्ध "ताई-महाराज केस" करितां लोकमान्याचें येणें उमरावतीस होऊं लागलें. यवतमाळ-करांनीं त्यांना यवतमाळास आणण्याचा प्रयत्न केला. परंतु गडबडीमुळे त्यांचें येणें झाले नाहीं.

( ३ ) इ. स. १९०२ मध्ये मुंबईची राष्ट्रीय सभा झाली. मीहि गेलों होतों. लोकमान्यांचे प्रत्यक्ष दर्शन घ्यावे अशी उत्कट इच्छा झाली. कै. अण्णासाहेब बापट यांचे वशिल्यानें दर्शनाचा लाभ मिळाला. कै. शामराव दादा देशपांडे व आणखी एक दोन स्नेही बरोबर होते. आम्ही गेलो तेव्हां डॉ. मुंजे प्रभृति कांहीं मडळी बसली होती. डॉ. मुंजे यांचें एक इंग्रजी हस्तपत्रक तेथे वाटण्यांत आले होते. श्री. अण्णासाहेब बापटांस पाहून लोकमान्यांस फार आनंद झाला. या बसा म्हणतां म्हणतांच लोकमान्यांची भेदक तीव्र दृष्टी आम्हां तरुणांकडे गेली व निमिषार्धांतच त्यांनीं आमच्या अंतः-करणाचा ठाव घेतला. एकेकजण नमस्कार करून जाग्यावर बसूं लागला. श्री. बापट परिचय करून देत होते. माझ्या संकोचवृत्तीमुळे मी सर्वांच्या मागें होतो. मी नमस्कार करतांच श्री. अण्णासाहेब म्हणाले "हा आमचा पापा' 'हरि-किशोर'चा संपादक" ( श्री. अण्णासाहेब हे माझ्या वडिलाचे स्नेही. ते माझ्यावर पुत्रवत प्रेम करीत व नेहमीं त्याच नांवानें हाक मारीत. ) हें ऐकून लोकमान्यांस फार आनंद झाला. त्यांनीं पितृवात्सल्यानें माझ्या पाठीवरून हात फिरविला. माझ्या जन्माचे सार्थक झाले. मी खालीं बसतांच ते म्हणाले "पत्र बरेंच चुर-चुरीत असतें. तुमचा 'सिंहाचा अप्रतिम युक्तिवाद' हा लेख मी वाचला आहे. चांगली माहिती गोळा केली आहे. आधाराशिवाय पुष्कळ फर्डे लेखक कलम-बहादरी करतात. पण शेवटीं त्यांचें 'लिहिणे फोल होते व बोलणें वांया जाते' तरुणांनीं हें नेहमीं लक्षांत ठेवले पाहिजे." नतर माझ्याकडे पाहून ते हंसत म्हणाले "तुम्ही सतीचें वाण घेतलें आहे. उत्तम गोष्ट आहे. धैर्यानें काम करा!"

नतर मी हरिकिशोरचे दोन ताजे अंक लोकमान्यांस दिले. या अंकांत माझे सन्माननीय मित्र श्री. माधवरावजी अणे बी. ए. (ह्या वेळीं हे एल्.एल्.बी. झाले नव्हते. हे उमरावतीच्या विद्यागृहांत शिक्षक होते. ) यांचा 'राष्ट्रीय सभा

व लोकमत ' हा मननीय लेख होता. ह्यावरून आपली दृष्टि फिरवून लोकमान्य म्हणाले "अरे वा! वऱ्हाडकर तरुण मंडळी आमच्या पुणेकरांच्याहि पुढे दिसतात."

( ४ ) इ. स. १९०५ साल म्हणजे सर्व हिंदुस्थानास 'स्वदेशी चळवळी' मुळें संस्मरणीय होऊन गेलें, आणि आम्हा यवतमाळकरांस तर चिरस्मरणीय झालें आहे. या वर्षी लोकमान्य टिळक ' ताईमहाराज प्रकरणांत ' उमरावतीस पुन्हां आले. ' टिळक कमिशन ' म्हणून त्यावेळीं साक्ष-पुराव्यास नांव मिळालें होतें. श्री. रा. रा. दादासाहेब खापर्डे यांची साक्ष घेण्याकरितां कमिशन नेमिलें होतें. आगष्ट १९०५ ची ही गोष्ट. यवतमाळकरांस लोकमान्य उमरावतीस आल्याची बातमी लागतांच त्यांनीं रा. ब. मुंडले यांचे मार्फत त्यांना येथें येण्याकरितां तार केली. कामामुळें पुन्हां येणें होणार नाहीं म्हणून येथून त्यांना आणण्याकरितां श्री. रा. रा. अण्णासाहेब बापट व श्री. रा. रा. बाबासाहेब पेशवे हे मुद्दाम गेले होते. लोकमान्य बुधवारीं येणार अशी तार येताच जो कांहीं आनंद झाला तो लिहितां येत नाहीं.

ता. १४ आगष्ट १९०५ पर्यंत येथें पाऊस नव्हता. लोक हवालदील झाले होते. दुष्काळ डोकावू लागला होता. अशा मनस्थितींत सर्व होते तरी लोकमान्यांवरील निःस्सीम प्रेमामुळें लोकांनीं एक दिवसांत नवीन अपुऱ्या धर्मशाळेंतील पुरुषभर खोल पटांगण भरून काढून सुशोभित सभामंडप तयार करून दिला. कै. सदाशिवराव भागवत व कै. भाऊसाहेब बापट ( लहान बापट ) यांच्या सारख्या वयोवृद्ध टिळकभक्तांचे श्रम पाहून पुष्कळांनीं तोंडांत बोटें घातलीं. लोकमान्यांसारख्या खऱ्या महात्म्याचें तें आगमन. त्याचें स्वागतार्थ प्रत्यक्ष मेघराजानें येऊन सर्वांस आनंदित केलें. दुष्काळाचें उग्र स्वरूप एकदम पालटलें. ' टिळक महाराज की जय ' या जयघोषानें दशदिशा भरून गेल्या. मुलांबरोबर मोठेहि आनंदानें नाचू लागले. हा आनंदमहोत्सव ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिला ते धन्य होत.

लोकमान्यांची उतरण्याची व्यवस्था त्यांचे बालमित्र श्री. रा. रा. अण्णासाहेब बापट यांचें नवीन बंगल्यावर केली होती. तेथें प्रचंड मिरवणूक येऊन थांबल्यावर लोकमान्य व्हिक्टोरियांतून खालीं उतरले तेव्हां व्यवस्थेमध्यें गढून गेलेले श्री. तात्यासाहेब भागवत धांवत पुढें झाले व जवळच्या एका गुलाबाचे झाडावरून एक फूल तोडून मोठ्या प्रेमानें " ही फूल नाहीं फुलाची पाकळी " म्हणून त्यांनीं अर्पण केलें. लोकमान्यहि हसत म्हणाले " एक पाकळी, प्रेमाची साखळी. " तात्या—" ये यथामाम् प्रपद्यते तांस्तथैव भजाम्यहम् "

लोकमान्यांचा मुकाम येथे फारच थोडा असल्यामुळें कुलीन स्त्रियांनीं त्याचें व्याख्यान ऐकण्याची संधि सर्वांचें अगोदर साधून घेतली. स्त्रीसमाजापुढील लोकमान्याचें व्याख्यान फार मनन करण्याजोगें झालें. स्त्रीशिक्षणाची आवश्य-

कता सांगून ते म्हणाले "स्त्रियांना शिक्षण पाहिजे, पण तें शिकून नोकरी करितां आली पाहिजे अशा प्रकारचें नको. ...पाश्चात्य देशांत स्त्रिया शिकून नोकरी करीत असल्या तरी ती गोष्ट इकडे अनुकरण करण्याजोगी नाहीं. कारण दोन्ही ठिकाणची परिस्थिति अगदीं वेगळी आहे. आमच्यावर परकीयांचें राज्य आहे. त्यामुळें इकडे बाहेरचे अनेक व्यवसाय सांभाळतां सांभाळतां पुरुषांच्याच नाकीं नव येतात. नेहमीं अपमान सहन करावा लागतो. मग जेथें पुरुषांचाच टिकाव लागत नाहीं, त्या गोष्टी स्त्रियांनीं करू म्हणणे कधींहि इष्ट होणार नाहीं."

दुपारीं मर्दानी खेळ झाल्यावर लोकमान्य टिळक येथील सोशल क्लबला भेट देऊन आले. ही गोष्ट बहुतेक लोक विसरले म्हणून तिचा मुद्दाम उल्लेख केला आहे.

संध्याकाळीं ७ ला जंगी जाहीर सभा झाली. या वेळच्या विशेष नमूद करण्यासारख्या गोष्टी म्हणजे—यवतमाळास 'हें लवकरच लोकमताचें ठाणें होईल' असा दिलेला आशीर्वाद, 'वऱ्हाड जोडणें व बंगाल फोडणें, मताला किंमत नाहीं—निश्चयाला असते, सावटाखालीं झाड वाढत नाहीं, सामाजिक सुधारणा करतांना बाह्यस्थितीशीं टक्कर देतां येईल ती सुधारणा, आपले सुख व राष्ट्राचें सुख यांत भेद पाहिजे, सबंध फेरफार करण्यापेक्षां जुन्या भक्कम पायावरच इमारत बांधल्यास अधिक यश येईल,' वगैरे अनेक मुद्यांचा केलेला ऊहापोह, मानपत्रावर मार्तंड पाटील, कादरभाई बोहरी व भाऊसाहेब मुंडले, भाऊसाहेब बापट, अशा निरनिराळ्या धंदांच्या व मतांच्या लोकांच्या सह्या, श्री. आबासाहेब डोळे यांनीं या प्रसंगाकरितां मुद्दाम तयार केलेलें 'हे प्रभो वरदवर स्वभालधृत—विधुतिलका' हें हृदय उद्दीपित करणारें पद, वगैरेंचा उल्लेख केल्याशिवाय राहवत नाहीं.

(५) लोकमान्यांस पुष्कळ ठिकाणीं पानसुपाऱ्या झाल्या. 'हरिकिशोर' वर्तमानपत्राच्या चिमुकल्या ऑफिसांतहि त्यांना पानसुपारी झाली. त्यावेळीं ते हंसत म्हणाले "आम्हांवर प्रेम करणाऱ्या माणसांनीं संकटाशीं झगडण्यास तयार असलें पाहिजे." नंतर ते हरिकिशोरचा चिमुकला छापखाना पाहण्याकरितां त्या चंद्रमौळी घराकडे वळले; तेव्हां ती दैन्यावस्था लोकमान्यांचे नजरेस पडूं नये म्हणून मी म्हणालों "तिकडे कांहीं विशेष पाहण्याजोगें नाहीं." माझा उद्देश चटकन त्यांचे लक्षांत आला व ते हंसत म्हणाले "मनुष्याला आपल्या दारिद्र्याची लाज वाटावयास नको, त्याला आपल्या दुर्गुणाची लाज वाटली पाहिजे." नंतर प्रेस पाहून टाईप कोणत्या फाउंड्रीचा, शिरस कोणता, प्रेस कोणत्या मेकरचा आहे वगैरे बारीक चवकशी करून लोकमान्य बाहेर पडले.

दहा वर्षांपूर्वी मनोराज्य करणाऱ्या एका विद्यार्थ्याचे घरीं लोकमान्य प्रत्यक्ष दर्शन देऊन जातात, हा योगायोग विलक्षण तर खराच, पण त्या पेक्षाहि—महाराष्ट्रांतील पहिला राजद्रोहाचा खटला 'केसरी' वर, तर बरोबर दहा वर्षांनींच

वऱ्हाड मध्यप्रांतांतील 'पहिला' राजद्रोहाचा खटला 'हरिकिशोर' वर, हा योगायोग त्यापेक्षांहि अपूर्व होय !!

१९०७ साली राष्ट्रीय सभेचें अधिवेशन नागपुरास होईल व अध्यक्षस्थान लोकमान्य सुशोभित करतील या सुखार्थेत असतां 'हरिकिशोर'वर 'राजद्रोहा'चा खटला होऊन माझी रवानगी नागपुर अंजनी जेलमध्यें झाली.

(६) १९०८ मध्यें तुरुगांत अशी बातमी पसरली कीं, लवकरच स्वराज्य मिळून 'तिलक महाराज' कैद्यांस सोडण्याकरितां येणार आहेत. 'कैद्याचें मनोराज्य' चालू असतां एके दिवशीं रात्रीं ३ च्या सुमारास श्रीयुत जोशी नामक एका असिस्टट जेलरने मला झोपेंतून उठवून "लोकमान्यांस ६ वर्षांची शिक्षा झाली" अशी दुःखद बातमी सांगितली. श्री. जोशी मोठे 'टिळकभक्त' होते. लोकमान्यांस शिक्षा झाली त्या दिवशीं त्यांनीं अन्न ग्रहण केलें नाहीं. ही बातमी वरिष्ठ अधिकाऱ्यांचे कानावर गेली. श्री. जोशाना सरकारी नोकरीस अखेरचा रामराम ठोकावा लागला.

(७) १९१६ मध्यें लोकमान्यांनीं बेळगांव मुक्कामीं अनुयायाची समजूत घालून "रुसण्यापेक्षा घुसणे"च योग्य असे ठरवून राष्ट्रीय सभा काबीज करण्याकरिता कंबर कसली. लखनौस राष्ट्रीय सभेचें अधिवेशन होतें. लोकमान्य आपल्या बऱ्याच महाराष्ट्रीय अनुयायांसह "स्पेशल"नें निघाले. भुसावळेस स्पेशल येताच जयजयकाराने दिशा दुमदुमून गेल्या. आम्ही यवतमाळकर याच स्पेशलने गेलों. जागजागीं जें अपूर्व स्वागत झालें तें वर्तमानपत्रात प्रसिद्ध झालेच आहे. या वेळचा विशेष, म्हणजे लोकमान्यांस सर्व राष्ट्र "टिळक भगवान्" म्हणून अनन्य भावाने पूज्य मानू लागले, हा होय. याची प्रचीति जागजागीं आली. भोपाळ सारखी मुसलमानी रियासत पण हजारों टिळकभक्त गाडीस ४—५ तास उशीर झाला तरी रात्रीच्या वेळीं कडाक्याच्या थंडींत अत्यंत उत्कंठेने चातकासारखी वाट पहात बसले होते. गाडी स्टेशनांत येतांच सर्वांस जो आनंद झाला, त्याचें यथातथ्य वर्णन करणें शक्य नाहीं. याचा ज्याना प्रत्यक्ष लाभ झाला ते धन्य होत. कानपूरचें स्वागत अपूर्वच झालें आणि लखनौला तो टिळकभक्तांचा समुद्र पाहून कृतार्थता वाटली.

लखनौस, लोकमान्यांचें आगमन झाल्याबरोबर जो तो "Lucknow" म्हणजे राष्ट्राच्या भाग्योदयाची मुहूर्तमेढ रोवली गेली असें म्हणू लागला.

या वेळची लोकमान्याची अलौकिक कामगिरी त्यांच्या उज्वल कीर्तीस साजेशीच झाली. "स्वराज्य हा माझा जन्म सिद्ध हक्क आहे आणि तें मी मिळवीन" हें वेदवाक्य याच वेळीं लोकमान्यांच्या मुखांतून बाहेर पडलें आणि लोकमान्य हेच खरे "राष्ट्रसूत्रधार" आहेत अशी सर्वांची खात्री झाली.

(८) १९१७ मध्यें राष्ट्रीय सभा संपते न संपते तो लोकमान्याचा दौरा वऱ्हाडांत

आला. यावेळीं त्यांना यवतमाळास आणावयाचें बरेंच श्रेय कै. गणपतराव दवंडे यांना आहे. या वेळचें लोकमान्यांचें स्वागत म्हणजे हिंदी राष्ट्राच्या हृदयसम्राटाचेंच स्वागत होतें. यावेळीं सर्व ठिकाणीं तें अपूर्वच झालें. या चिमुकल्या यवतमाळानें जें स्वागत केलें तें प्रत्यक्ष 'राज्यारोहण समारंभा' पेक्षां सर्व प्रकारें श्रेष्ठ दर्जाचें झालें. मैल दीड मैल सारखें चिरांगण लागलें होतें.

लोकमान्य श्री. रा. रा. अण्णासाहेब जतकर यांच्या बंगल्यावर म्हणजे पूर्वीच्या कै. अण्णासाहेब बापटांच्या बंगल्यावरच उतरले होते. दर्शनाकरितां हजारों भक्त गोळा झाले होते. दर्शनाची गर्दी उसळली होती. त्यांच्या सर्वव्यापि नजरेंतून कोणीहि परिचित चुकला नाहीं. बराच वेळ झाला, मी दिसलो नाहीं तेव्हां त्यांनीं मुद्दाम चवकशी केली. मी माझ्या पूर्वजन्मींच्या सुकृतानें त्याच दिवशीं दुपारीं दिल्लीवरून आलों होतों व मानपत्र छापण्याचे कार्यांत गर्क झालों होतों. मानपत्राचें करेक्शन करून प्रुफ निघतांच तें घेऊन बाहेर पडलों इतक्यांत परतणाऱ्या मित्रमंडळींकडून लोकमान्य आठवण करीत असल्याचें कळलें व मी धांवत निघालो.

गर्दी कमी झाल्यावर लोकमान्य म्हणाले " काय असेल कोण जाणे, यवतमाळास आलों म्हणजे घरीं आल्यासारखें वाटतें. "

हें ऐकून कै. दवंडे आनंदाने म्हणाले " आपण आमची सेवा गोड करून घेतां हें पाहून धन्यता वाटते. "

लोकमान्य म्हणाले " यवतमाळकर जनता-जनार्दनाची सेवा उत्तम प्रकारें बजावितात हें पाहून समाधान होतें. तुमच्या या फुलांनीं व फळांनीं मला आनंद होत नाहीं. "

रात्र बरीच झाल्यानें त्यांचा आशीर्वाद घेऊन सर्वजण परतले.

दुसऱ्या दिवशीं जाहीर व्याख्यान झालें. इतकी गर्दी यवतमाळास कधींच पाहण्यांत आली नाहीं. " स्वराज्य म्हणजे घरचा कारभार " हें लोकमान्यांनीं आपल्या अमृततुल्य वाणीने जेव्हां विशद करून सांगितले तेव्हां श्रोतृवृंद तल्लीन होऊन डोलत होता.

लोकमान्य बिन्हाडीं परत आल्यावर एकजण जरा धन्यतेनें म्हणाले " कॉंग्रेस तर आपण आतां सर केली आहे" लोकमान्य थोडें थांबून म्हणाले, "त्याला रक्त आटवावें लागलें आहे. बाबारे, खरी जबाबदारी आतां आंगावर येऊन पडली आहे. हीच खरी परीक्षेची वेळ आहे. आमची आतां ' कृतान्तकटकामलध्वजजरा ' अशी स्थिति झाली आहे. तुम्हा तरुणांवरच आतां राष्ट्राची मदार आहे. "

' त्या पुण्य पुरुषाचे हेच अखेरचे शब्द व हेच शेवटचें दर्शन ! !

---

## कृष्णाजी लक्ष्मण वेलणकर

[ मॅनेजर विजय प्रेस, पुणे. ]

सन १९१६ सालीं लोकमान्यांची स्वारी पनवेलीस येऊन टेनिस कोर्टांत त्यांचें सुश्राव्य असें उपदेशपर भाषण सुरू झालें. त्यावेळीं तेथील शृंगारलेल्या मंडपावर " स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मी मिळविणारच ! " असे लोकमान्यांच्या तोंडचे प्रतिज्ञेचे शद्ब मोठ्या सुवर्णाक्षरांत लिहिलेले झळकत होते. "मी राष्ट्राकरितां काय करूं ? " असा प्रश्न लोकमान्यांना विचारावा असें माझ्या मनानें ठरविलें.

लोकमान्यांचें भाषण व इतर समारंभ सपून लोकमान्य गर्दीतून मोटारीकडे जात होते. लगेच मीहि त्या अलोट गर्दीतून मोटारीपर्यंत जाऊन भिडलों व लोकमान्यांच्या बाजूला मोटारीवर चढूं लागलो. मी मोटारीवर चढतांच मोटार सुरू होण्याकरितां गुरगुरूं लागली व " हा कोण असा लगट करीत आहे. ओढा खालीं ! " अशी जवळची मंडळी ओरडूं लागली. मंडळींनीं मला खालीं ओढलें व मोटारीचें चालणें सुरू झालें. मात्र या दरम्यान लोकमान्यांची नजर माझ्या त्या अति उत्सुक चेहेऱ्याकडे गेली होती, हें लवकरच निदर्शनास आलें. कारण मी मंडळींत मागें खेचला जात आहे व मोटार पुढचा मार्ग स्वीकारूं लागली आहे, तेव्हां लोकमान्यांस असें वाटलें असावें कीं, आपली व त्या मुलाची भेट अशा दगलींत होणें अशक्य आहे व म्हणूनच कीं काय, त्यांनी सात आठ हात पुढे गेलेली मोटार थांबविण्यास ड्रायव्हरला सांगितलें व त्या मुलाला इकडे आणा असे ते म्हणाले. लोकमान्यांची आज्ञा मिळाल्यावर ज्या लोकांनीं मला जमिनीवरून ओढलें त्याच लोकांनीं मला फुलाप्रमाणें उचलून लोकमान्यांजवळ नेलें ! त्यांच्याजवळ जातांच ' लो. टिळक महाराजकी जय ' असा जयजयकार करून मी त्यांस नमस्कार केला. व लोकमान्यांनींहि तितक्याच प्रेमानें माझा नमस्कार स्वीकारून माझ्या खांद्यावर हात ठेविला व म्हणाले, "बाळ, तुझा धीटपणा व चिकाटी चांगली आहे, आतां बोल लवकर, तुझे काय म्हणणें आहे तें, म्हणजे मीहि तुला सर्वांचें एकच उत्तर देतों. हं, बोल, वेळ घालवूं नकोस. " मी तावडतोब विचारलें " माझ्या देशाकरितां माझ्या शक्तीप्रमाणें मी काय करूं ?" माझें पधरा वर्षांचें वय लक्षांत घेऊन खरोखरीच त्यांनीं सगळ्याचें सार म्हणून मला सांगितलें कीं, " चहा पिऊं नकोस ! "

हीच ती आठवण ! माझें चहा न पिण्याचें व्रत लोकमान्यांची भेट होण्यापूर्वीं चालूं होतें खरें; तरीपण पुढे आजपर्यंत माझें हें व्रत चालूं राहिलें आहे

त्याला कारण म्हणजे लोकमान्यांचा उपदेश. हा उपदेश जर मला मिळाला नसता तर हें व्रत चालू राहणें अशक्य होतें.

---

## काशीनाथ अण्णाजी पिंप्रीकर

[ लोकमान्यांचे भक्त, बुलढाणा, वऱ्हाड ]

( १ ) आमचे घरीं रा. रा. गणपतिबुवा मडके मातापूरकर आले होते. त्यांनीं माहूर मुक्कामीं फरशी बसविण्याचा उद्योग चालविला आहे. याचें कारण लोकमान्य जळगांवीं आले असतांना ते सर्वांशींच जसे गोड बोलत असत तसेच यांचेशींहि बोलले. त्यांच्या साध्या गोड बोलण्याचा परिणाम असा झाला कीं, यांच्या मनांत लोकमान्यांबद्दल अत्यंत कळकळीची पूज्य बुद्धि उत्पन्न झाली. लोकमान्य विलायतेंत असतांना त्यांची प्रकृति बिघडल्याची बातमी जेव्हां यांचे कानावर आली, तेव्हां यांनीं मातापूरच्या अंबाबाईस नवस केला कीं, लोकमान्यांची प्रकृति जर बरी झाली, तर मी तुजपाशीं फरशी बांधीन. हे गृहस्थ पैशानें दरिद्री असून देखील एवढें मोठें जें लोकोपयोगी काम करीत आहेत, तें निव्वळ लोकमान्यांच्या गोड बोलण्याचा परिणाम म्हणून !

(२) ते एकदां माझ्याशीं कांहीं तुर्कस्थानाबद्दल बोलत होते. ते माझ्यासारख्या लहान पोराशीं देखील अगदीं मोकळ्या मनानें वागतात,हें पाहून माझी खात्री झाली कीं, त्यांना आपले स्वतःचे मोठेपणाबद्दल मुळींच गर्व नव्हता. मी त्यांना एकदां सांगितलें कीं, " माझी बहिनी वयानें लहान असून देखील सुशील आहे, व आतां ती अगदीं मरणोन्मुख झाली आहे. तिचें रक्त तपासण्यास आम्ही मुंबईस आलों आहोंत." पुढें दुसऱ्या खेपेस जेव्हां मी त्यांना सरदारगृहांत भेटलों, तेव्हां प्रथम त्यांनीं मला, " तुझे बहिनीची तब्येत कशी आहे ? " म्हणून विचारलें. त्यांची साधारण माणसाबद्दल अशी कळकळ पाहून मला फार अचंबा वाटला.

---

## माधव गोविंद पंडित

[ लोकमान्यांचे चहाते, पुणें ]

नागपूरच्या कॉंग्रेसला नागपूर मेलनें जात असतां वाटेंत भुसावळ स्टेशनवर इतकी गर्दी झाली कीं, एकमेकांच्या डोक्यावर बसण्याची वेळ आली. विशेष गर्दी पंजाबी लोकांची. त्यात पंजाबचे डेलिगेट होते, ते सर्व एकदम डब्यात घुसले; व आम्हास त्रास देऊं लागले. परंतु गमत अशी कीं, थोडे स्थिर झाल्यावर बोलतां बोलतां ' आम्ही पुण्याचे आहोंत ' असें म्हटल्याबरोबर त्यांनीं आम्हांस साष्टांग नमस्कार केला. हें पाहून आम्हांस फारच आश्चर्य वाटलें. आम्ही त्यास विचारतांच ते म्हणाले, " आप तिलक महाराजके नगरके रहानेवाले हो. आज हमको आपनें पुनीत किया. हमको तिलकके दर्शनकी वहोत आशा थी लेकीन हमारे कमनशीबसे लोकमान्य चले गये ' असें म्हणून ते गृहस्थ ढळढळा रडूं लागले! हें पाहून आम्हासहि थोडें चमत्कारिक वाटलें. यानतर मात्र त्यांनीं आम्हांस मुळींच त्रास दिला नाहीं. उलट त्यांनीं आम्हांस पुण्य नगरीबद्दल व लोकमान्याबद्दल अनेक प्रश्न विचारले व आम्ही त्यांस यथाशक्ती उत्तरें दिलीं.

---

## गोपाळ कृष्ण सहस्रबुद्धे

[ बी. ए. एल्‌एल्‌. बी. वकील, भंडारा, मध्यप्रांत. ]

ता. २७ जून १९१८ रोजीं मी लोकमान्यास भेटण्यास पुणें येथें गेलों होतों. त्या वेळीं लोकमान्य शहराबाहेर श्रीयुत लिमये याच्या बगल्यात विश्रांति घेण्याकरितां म्हणून रहात असत. भेट होण्याकरता कांहीं वेळ लागेल किंवा थोडे तरी प्रयास पडतील असें मला वाटले होतें. परंतु तसा प्रकार मुळींच घडला नाहीं. आम्हांस पहातांच लोकमान्यांनीं बिछायतीवर बसण्यास सांगितलें व स्वतः लोकमान्य जवळच बसले. मी स्वतःचा परिचय करून दिल्यावर शंकर नांवाच्या माझ्या मुलाच्या विद्याभ्यासासंबधानें गोष्ट निघाली. त्यावेळीं तो संस्कृत शिकत असून त्यानें वेदान्ताचा अभ्यास नुकताच सुरू केला होता. हें त्याना कळवितांच त्यांनीं सांगितलें कीं, ' ह्या मुलाला वेदान्तशास्त्राइतकेंच इंग्रजी भाषेचें ज्ञान असणें अवश्य आहे. कारण इंग्रजींत नैपुण्य संपादल्याशिवाय आपल्या वेदान्तशास्त्राच्या श्रेष्ठत्वाची छाप पाश्चात्य वेदान्तावर बसवितां येणार नाहीं. '

त्यानंतर मुलाने संस्कृताचा अभ्यास चालू ठेवला व गतवर्षी तो पंजाब युनिव्हर-सिटीच्या ' शास्त्री ' परिक्षेंत उत्तीर्ण होऊन यंदा त्याच विद्यालयाच्या मॅट्रिक परीक्षेंत पास झाला आहे. पुढच्या परीक्षाहि देण्याची त्याची इच्छा आहे. हें केवळ लोकमान्यांच्या उपदेशाचें फळ.

---

## व्यंकटेश गणेश जावडेकर

[ वकील, सार्वजनिक चळवळींचे प्रचारक, धुळें ]

( १ ) १८९१।९२ सालाच्या सुमाराची गोष्ट असावी. कै० टिळकाना मोंगलाईतील लातुरास त्यांची जी एक जिनिंग फॅक्टरी असे तिकडे जावयाचें होते. बार्शी लाइट रेल्वेचा अद्यापि जन्महि झालेला नव्हता. ह्यामुळे पुण्याहून कुर्डुवाडीस रेल्वेने जावयाचे, व तेथून टांग्यानें बार्शीस जावयाचें व तद्वतच पुढचा प्रवासहि करावयाचा अशी परिस्थिति होती. त्यावेळीं केसरींतील सुप्रसिद्ध लेखक " धनुर्धारी " हे बार्शीसच राहात असत. सबब आपण अमुक गाडीने कुर्डुवाडीस उतरणार आहों असे त्यांनीं त्याना कळवून ठेविलें. तेथे उतरल्या-नंतर बार्शीस पोंचण्यास टांग्याने तीनचार तास लागत, ह्यामुळें एका गृह-स्थाला सांगून त्यानीं त्यांच्या करिता तेथें चहाची व्यवस्था करविली. ठरल्या-प्रमाणें टिळक तेथे उजाडता रायचूर मेलला उतरले. टिळक म्हणजे तत्कालीन आङ्ग्लविद्याविभूषितांच्या पद्धतीप्रमाणे नेकटाय, कॉलर, पॅंट व बूट घातलेली अशी व्यक्ति असावयाची अशी त्या गृहस्थाची ठाम समजूत. ह्यामुळें ह्या नमुन्याबर-हुकूम एक दक्षिणी गृहस्थ सेकंडक्लासच्या डब्यांतून उतरलेले पाहतांच त्यांनाच टिळक समजून त्यांनीं नमस्कार ठोकला व चहाचा पेला तयार ठेवला होताच, तो त्यांच्या पुढे केला. ते गृहस्थहि कोणी तरी खम्पीच असून व अशी आयती चालून आलेली सोन्यासारखी संधि वायां दवडणारे नव्हते. त्यांनीं कोणतीहि चौकशी न करतां पुढें आलेला चहा मुकाट्याने गट्टम् करून टाकला व आपला पुढचा रस्ता सुधारला. इकडे टिळक उतरून तडख टांग्याकडे गेले व तो ठरवून बार्शीस दाखल झाले. दाखल झाल्यावर स्टेशनवर चहा मिळाला का म्हणून विचारतां नाहीं असें खरें उत्तर मिळाले. नतर चौकशी करविली-तींत वरील हकीगत निष्पन्न झाली ! हा घोटाळा उडण्याला कारण केवळ लोकमान्यांची साधी राहणी हें सांगावयाला नकोच !

(२) पुण्यास दर शुक्रवारीं राष्ट्रीय पक्षांतील प्रमुख मंडळी आळीपाळीनें कोणाकडे

तरी जमून आठवड्यांतील राजकीय विषयांची चर्चा करीत व बरोबर फराळा-चादि घेत उडवीत. त्याला "शुक्रवार क्लब" हेंच नांव असावें. एकदां खुद्द लोकमान्यांच्या येथें, एकदां कवडे शास्त्र्यांच्या दवाखान्यांत व एकदां डॉ. साठे किंवा कोणाकडे तरी अशा तीनचार प्रसंगीं मी स्वतः हजर होतों. पैकीं एका प्रसगीं मोठीच आणीबाणीची वेळ आली. कांहीं एका प्रश्नावर लोकमान्य व बाबासाहेब परांजपे ह्यांच्यामध्यें वाद सुरू झाला. उभयतांचें ऐकमत्य होईना. वाद इतका भरांत आला कीं, उभयतांचाहि संतापाचा पारा भलताच वर चढला. बाबासाहेब म्हणजेहि जबरदस्तच ! लोकमान्य झाले म्हणून काहीं त्याना दबकून चालत नसत. हार कोणीच खाईना व वाद कांहीं मिटेना. तेव्हां श्री. तात्या-साहेब केळकरांनीं एक हास्यकारक कोटि मध्येंच करून दोघांनाहि एकदम हसू फुटेल असें केलें व मग उभयतांचाहि रागाचा पूर ओसरून गेला !

( ३ ) लोकमान्यांना सल्ला कोणत्या बाबतींत व कोणी विचारावा ह्याचा मुळींच धरबध नसे. विचारणारा आपली योग्यता काय व आपण त्यांना कोणत्या बाबतींत विचारतों ह्याचा विचार सहसा करीतच नसे. येनकेन प्रकारेण आपलें व टिळकांचें बोलणें झालेलें आहे येवढें सांगतां यावें अशाचकरितां कांहीं विचारणारे व भेटणारे येत, असें माझ्या नजरेस आलें. एकदां माझ्या देखत एक टोप्याचा दुकानदार येऊन त्यांच्याशीं गोष्टी करू लागला व तेहि त्या कशा तयार कराव्या व विकाव्या ह्याबद्दल त्या तयार करून विकणाऱ्याशीं बोलत राहिले. 'तुमचें आतां झालें का काम' असें सुद्धा त्याला न विचारतां त्याची जितका वेळ बोलण्याची इच्छा होती तितका वेळ त्याला बोलू दिलें ! ही तरी केवढी खिलाफी म्हटली पाहिजे !

( ४ ) एकदां दसऱ्याचा दिवसच माझा त्यांच्या येथें पडला. दिवसभर त्यांचे दुसरे उद्योग झाले. सध्याकाळपासून सोनें देण्याला येणाऱ्यांची रहदारी सुरू झाली. हा आला–तो गेला, असें सारखें सुमारें रात्रौ १० वाजेपर्यंत चाललें. मी जवळच एका खुर्चीवर बसलेलो होतों. अशा वेळीं पैसाफंड काचशाळेसबधानें मला त्यांच्याशीं ज्या गोष्टींची वाटाघाट करावयाची होती त्या गोष्टी मी काढल्या. पण त्यांनीं असें काहीं म्हटलें नाहीं कीं, 'आज सकाळपासून आतांपर्यंत फार कटकट झाली; आतां आपण उद्यां बोलूं या.' लागलींच तो विषय काढला. ह्या-संबंधानें वाटाघाटीस सुरुवात होऊन त्याना ज्या सूचना करावयाच्या होत्या त्या त्यांनीं केल्या. सुमारें ११ वाजण्याची वेळ आली. पण विषय पुरा केला. उधार ठेवला नाहीं, तेव्हां ही तरी सहनशीलपणाची कमालच कीं नाहीं ?

( ५ ) पुण्यास भरणाऱ्या ज्योतिषसंमेलनाचें अध्यक्षपद त्यांच्याकडे होतें. मला वाटतें तें साल सन १९१७ असावें. भाषणाची लेखी तयारी वगैरे अगो-दरपासून कांहीं नाहीं. ते कोठें गावीं गेले होते व सम्मेलनाच्या आदल्या दिव-

शींच पुण्यास आले. येण्याबरोबर त्यावेळी " मराठ्याचें " संपादनकार्य प्रत्यक्ष करणारे श्री. भट ह्यांच्यापुढें त्यांनीं भाषणाकरितां लागणाऱ्या ज्योतिषग्रंथांची ( इंग्लिश व संस्कृत ) यादी टाकली. त्यांनीं लायब्ररी हॉलमधल्या कपाटांतून यादीबरहुकूम पुस्तकें नेऊन दिलीं व त्यांची तयारी झाली. एक दिवस अगोदर आले हें तरी मी भीतभीतच म्हणतों. वास्तविक मला असें वाटतें कीं, ज्या दिवशीं संम्मेलन भरायचें त्याच दिवशीं सकाळच्याच गाडीनें ते आले व कांहीं तासांतच भाषणाची तयारी झाली! ताईमहाराजकेस व चिरोलकेस यावेळींहि त्यांची स्मरणशक्ति किती दांडगी व सदैव जागृत असे हें चांगलेंच प्रत्ययास आलें आहे.

( ६ ) मुंबईच्या पुढाऱ्यांचें नाव घेऊन त्यांची एक गोष्ट त्यांनीं सांगितली. ते म्हणाले कीं, ' देशांतील कोणताहि पुढारी जरी घेतला तरी कोणाचें कांहीं गौण, तर कोणाचें कांहीं असें सांपडावयाचेंच. तिकडे लक्ष देऊन उपयोगी नाहीं. राष्ट्रीय महत्कार्यांत ज्याचा जितका उपयोग करून घेतां येत असेल तितका तो हमेश करून घेत राहिलें पाहिजे. सर्वांच्या सर्वच गोष्टी नेहमींच चांगल्या असतील किंवा ठरतील असा कांहीं नेम नाहीं. ज्याचें जेवढें चांगलें तेवढे घेत जावें व बाकीचें सोडून देत जावे व तिकडे दुर्लक्षच करावे ! ' मला वाटतें हें कोणाकाहि नाकबूल करतां यावयाचें नाहीं व ह्यांतच लोकमान्यांची " लोकसंग्रहाची किल्ली " होती.

( ७ ) स्वराज्यसंघाच्या दौऱ्याच्या वेळीं धरणगांवाहून चोपड्याला जातांना रात्र झाल्यामुळें वाटेंत जागोजाग लोक मशाली लावून भररस्त्यांत त्यांची मोटार आडवून दर्शन घेण्याकरितां जमलेले असत. अर्ध्या रस्त्यावर तापी ओलांडावी लागते तेथें तर लोकमान्य येणार म्हणून कळल्याबरोबर तीन दिवसपर्यंत यात्रेप्रमाणें लोकांनीं पाले लावून ठेविलीं होतीं. चोपडा हा गांव मोठा, पण आडवळणी असल्यामुळे तिकडील लोकांना टिळकांचें दर्शन म्हणजे एक अभूतपूर्व गोष्टच असल्यामुळे आसपासच्या खेड्यांतल्या लोकांच्या झुंडीच्या झुंडी दर्शनाला येऊं लागल्या. एकदम एक शेपन्नास लोकांचा गट्टा जमला कीं, मी त्यांना गाडीच्या खिडकीशीं तोंड बाहेर काढून उभे राहण्यास सांगत असें. लोकांनीं हात जोडून नमस्कार केले कीं, टिळकांनीं त्यांना " अरे नुसता नमस्कार करून काय करतां, मी व्याख्यानांत काय सांगणार आहें तें ऐकायला या " हें सांगावें. ते कित्येकांना लवकर समजावयाचें नाहीं. मग मी त्यांना सांगावें कीं, " अरे त्या असा म्हनतस कीं, खालीं हात जोडीसन काय होआव छे ? मी भाषणमा जें काय सांगसू तें ऐकील्या व त्या परमान काई करी देखाडा. " त्यावर लोकांनीं म्हणावें कीं, " भासन गिसन अमले काय समजस. ते तुम्हीच ऐकील्या. आमी दर्सनकरता उनु. ते जाय कीं गावना रस्ता घरनाच ! स्वरज गिराज तुम्ही कमाईल्या मग आम्ही देखसु ! "

खानदेशी मार्फत त्यांना मिळालेला जबाब ऐकून लोक थोडेसे चपापले व एकजण उद्गारलाच कीं, " अरे, या पुनाबालासना बरोबर कोनी खानदेशी दिसस?" एवढें लोकमान्यांना समजलें व त्यांनीं " अरे होय हे तुमच्या, अमळनेरचेच वकील आहेत. " "हां तव्हा ते " असें फिरून प्रत्युत्तर मिळालें.

(८) लोकमान्य होमरूलच्या दौऱ्यावर असतांना त्यांचा मुक्काम धुळ्यास आला होता. लोकमान्यांची प्रचंड मिरवणूक धुळ्याच्या बाजारपेठेंतून वाजत गाजत चालली होती. लोकमान्यांचें पुण्यदर्शन घेण्यासाठीं दुतर्फा घराच्या ग्यालऱ्यांतून स्त्री–पुरुषांची गर्दी जमली होती. रस्त्यावरहि खूप गर्दी लोटली होती. अशा गर्दींत एक उतारवयाचा गृहस्थ हात जोडून मिरवणुकीबरोबर चालला होता. लोकांच्या गर्दींतून लोकमान्यांचें दर्शन होतांच जोडलेले हात तो वर नेऊन त्यांना नमन करी; असें करता करतां त्याचे डोळ्यांतून घळघळा अश्रुप्रवाह सुरू होऊन तो गृहस्थ स्फुदुन स्फुदुन रडू लागला. मी त्याच्या शेजारींच होतों. त्याला अशा प्रकारें अश्रु ढाळताना पाहून मी त्याला विचारलें " म्हातारेबुवा, हें काय! तुम्ही असे रडतां का ! " म्हातारा सद्गदित होऊन म्हणाला ' भाऊ, काय सांगू तुम्हाला ! मी कां रडत आहें हें माझें मलाच समजत नाहीं. टिळक महाराजांना या पूर्वी मी प्रत्यक्ष कधींच पाहिलेलें नाहीं, पण आज त्यांचें दर्शन होतांच त्यांच्या मूर्तीकडे पाहून माझें हृदय उचंबळून आलेलें आहे व मला न कळत हे अश्रु माझ्या डोळ्यांतून गळू लागले आहेत. मी कां रडत आहें याचें कारण माझें मलाहि सांगतां येत नाहीं. " सदर म्हातारा इसम असाच कितीतरी वेळ अश्रु ढाळीत मिरवणुकीबरोबर चालत होता. मिरवणुक चौकातून दुसऱ्या रस्त्यास लागल्यावर त्यानें जागच्याजागींच लोकमान्यांना एक साष्टांग नमस्कार घातला व अंगावरील उपरण्यानें डोळे पुसत पुसत तो वृद्ध गृहस्थ आपल्या घराकडे निघून गेला!

( ९ ) कै. टिळकांचीं जीं राजकीय मतें असत त्या बाबद कोणाचा कितीहि मतभेद असला तरी त्यांची खासगी वर्तन अशंकनीय होती हें त्यांच्या कट्टया शत्रूलाहि नाकबूल करतां येणार नाहीं असें मला वाटतें. त्यांच्या दिलदार-पणाचें व बोलला शब्द खरा करून दाखविण्याचे एक ढळढळीत उदाहरण म्हणजे कै. नामजोशांच्या बाबतींतील होय. माधवराव मृत्युशय्येवर पडलेले असतां टिळक व इतर कांहीं मंडळी त्यांच्या जवळ बसलेली होती. प्राणोत्क्रमणाची वेळ तर येऊन ठेपली, पण कुडींतून प्राण बाहेर कांहीं निघून जाईना. तोंडानें बोलण्याची तर ताकत नव्हती. मात्र डोळ्यांतून अश्रु पडू लागले. तेव्हां टिळकांनीं त्यांना हाताच्या खुणेनेंच ' असें कां होतें ' म्हणून विचारलें; त्यांनीं खुणेनेंच ' कुटुम्ब व मुलाबाळांचा परिवार ह्यांचें आपल्या पश्चात् कसें होईल ह्या चिंतेनें तो अद्यापि घुटमळतो आहे ' असें सुचविलें. त्याबरोबर

टिळकांनीं आपल्या छातीवर हात ठेवून असे सुचविले कीं, 'त्यांची काळजी माझ्याकडे लागली. तुम्ही सुखानें चालले जा.' इतकें दर्शविल्यावर टिळकांचें वचन हें काय किमतीचें असतें हें ते त्यांचा उजवा हातच असल्यामुळें पुरतेपणीं जाणून होते. ह्यामुळे त्यांनीं इतकें होतांच आनंदाने प्राण सोडून दिला! टिळकांव्यतिरिक्त दुसरा एखादा लेचापेचा माणूस जर असता तर मरणाऱ्याच्या समाधानापुरते दिलेलें वचन, त्याची मागाहून काय किम्मत आहे म्हणून स्वस्थ बसता!. पण ह्या बहादरानें असे मुळींच केलें नाहीं. तुरुंगाची किंवा काळ्यापाण्याची शिक्षा जरी झाली तरी धोहुबावाना त्यांनीं असें बजावावयाचे कीं "टिळक तुरुगांत गेले किंवा काळ्या पाण्यावर गेले असे वरच्या माणसांनीं वाटेल तर समजावें; पण माधवराव नामजोशांच्या माणसाना मात्र टिळक गायकवाड वाड्यांत आहेत असे समजले पाहिजे व ही गोष्ट विसरली न पाहिजे." माधवरावांच्या पश्चात् त्यांचे कुटुंबपोषण, मुलांचे शिक्षण, त्यांच्या मौंजी व मुलींचीं लग्ने वगैरे टिळक आपल्या खर्चानेंच करीत राहिले हे केवढे आश्चर्य! आठवणींच्या पहिल्या खंडांत कै. माधवरावांच्या पश्चातच्या गोष्टी त्यांच्याच चिरंजीवांनीं दिल्या आहेत. पण खास अंतकाळच्या वेळची गोष्ट त्यांत आली नाहीं. सबब मुद्दाम दिली आहे. एकाद्याने आपल्यावर विश्वास टाकला किंवा एकाद्याला टिळकांनीं "आपला" म्हटले कीं, त्याच्याकरितां आपल्यावर किती सकटें ओढवून घ्यावीं व खस्ता खाव्या हें ताईमहाराजकेसनें दुनियेला दाखवून दिलेच आहे!

(१०) पैसाफडांतून निर्वाहाकरितां कांहींहि घ्यावयाचे नाहीं अशी काळ्यांनीं शपथ घेतली असल्यामुळें निर्वाह तर चालला पाहिजे म्हणून टिळक त्याना पैशाची मदत कांहीं कालपर्यंत करीत. (केव्हां केव्हां मुबईचे डॉ. नानासाहेब देशमुख हेहि करीत असें मला वाटतें) तथापि सतापी स्वभाव असल्यामुळे दे. काळे लोकमान्यांशीं कसे वागत हे कांहीं सांगावयाला नको! "मदत येते, पण ती अगदीं पहिल्या तारखेला यावयाला पाहिजे तशी येत नाहीं. टिळक बरोबर आठवणच ठेवीत नाहींत. (जणुंकाय त्यांना एवढेंच काम असे!) मला आठवण देण्याकरितां पत्रेंच लिहावीं लागतात" इ. इ. अंताजीपतांच्या तक्रारी असत. हें कसें कां असेना, पण एकदां असें झालें कीं, पैसाफडाची मुबईस जाहीर सभा, टिळक स्वतः व्याख्याते, हजारों श्रोते व काळ्यांची खाशी स्वारीहि मूर्तिमत हजर, असा योग आला. त्यांच्या देखत टिळकांनीं त्यांची अशी झडती घेतली कीं, कांहीं पुसतां गरज नाहीं. दृष्टांन्त येथपर्यंत दिला गेला कीं, "कल्पना मी काढली म्हणून कोणीहि घमेंड मारूं नये. एक गांजाची चिलीम ओढली कीं वाटेल तेवढ्या कल्पना सुचूं लागतात! शिताफी जी आहे ती कल्पना उत्तम रीतीनें अमलांत आणून दाखविण्यांत आहे" अशा प्रकारचें भाषण तत्कालीन पत्रांत प्रसिद्ध झालेलें वाचल्याचे मला स्मरतें. ह्यानंतर

काळ्यांनीं टिळक, अण्णासाहेब नेने व नानासाहेब देशमुख अशा तिघांना आपल्या घरीं (मुंबईच्या गिरगांवीं) पानसुपारीचें आमंत्रण दिलें. " ऑटोक्रसी " ऊर्फ " अरेरावी " चा काळ्यांचा आरोप व तदनुषंगिक त्यांचा रोष तिघांवरहि सारखाच होता. नेने व देशमुख गेले नाहींत. एकीकडे टीकाहि करावयाची व एकीकडे पानसुपारीसहि बोलवावयाचें असें म्हणून त्यांनीं नकार दिला. पण टिळक एकटे जाऊन पानसुपारी घेऊन आले ! दोन धक्के द्यावयाचे व दोन घ्यावयाचे व पुन्हां मनांत कांहीं ठेवावयाचें नाहीं ही जी संवय टिळकांना होती ती सर्वांना कोठून असणार ! ह्यामुळें साहजिकच दोघे गेले नाहींत. तोंडावर हल्ला चढवूनहि पुन्हां घरीं पानसुपारीला आल्याबद्दल काळ्यांना जो आनंद झाला तो त्यांनीं स्वतःच माझ्या जवळ कांहीं दिवसांनीं व्यक्त केला.

( ११ ) टिळकांच्या खानदेशांतील होमरूलच्या दौऱ्यांत चोपडें मुक्कामाला एका नाटककंपनीचे खेळ चालू होते. टिळक व खापर्डे ह्यांच्यासारखे प्रसिद्ध पाहुणे तेथें असल्यामुळें साहजिकच रात्रौ खेळाला येण्याबद्दल उभयतांनाहि निमंत्रण करण्यांत आलें. टिळकांनीं म्हणावें, " दादासाहेब येतील तर मी येईन. " व दादासाहेबांनीं म्हणावे कीं, " बळवंतराव येतील तर मी येईन. " असें होतां होतां होकार तर भरला गेला. ठरल्याप्रमाणें एक अंक होण्याबरोबर मॅनेजर बोलावण्यास आले. तोंपर्यंत दोघेहि झोंपले होते. अतुकाकांनीं हाक मारण्याबरोबर टिळकांनीं ओ म्हटलें व सांगितलें कीं, ' अगोदर दादासाहेबांना उठवा. कारण ते उठतील, मग हुक्का पितील, मग जामानिमा होईल तेथपर्यंत माझी आणखी एक झोंप होऊन जाईल. त्यांची तयारी झाली कीं, मला कळवा म्हणजे मी डोक्यावर पगडी ठेवली कीं, चालण्याला सुरुवातच करतों.' मग अतु-काका त्यांना उठवावयाला गेले. ते जागे झाले तरी एकदम ओ म्हणताहेत कशाला ! झोंपमोड करून जाण्याचा प्रसंग असल्यामुळें ते जाणें टळेल तर बरें अशाच विचारांत होते. दिवसभराच्या शिणामुळे कटाळून टिळकच आता येत नाहीं म्हणून सांगतील अशी त्यांची अटकळ म्हणून, " बळवंतराव येतात काय ! " हा त्यांनीं पहिला प्रश्न केला. हो म्हटल्याबरोबर एक मोठें संकटच येऊन पडलें असें त्यांना झाले व हळूच उद्गारले कीं, " काय करावें ह्या बळ-वंतरावाला, कोणाचें मन म्हणून मोडायचें नाहीं. हे त्याचे मोठें कठीण काम आहे. " शेवट ते जेव्हां स्वतः आले तेव्हां येथपर्यंत म्हणण्याची पाळी आली कीं, " तुम्ही एकटेच जा व थोडावेळ बसून या व मला निजूं द्या., " पण बळवंत-राव असें कोठें होऊ द्यायला बसले होते ! ते म्हणाले " असें होत नाहीं. लोक अगत्यानें बोलावतात तर आपण गेलें पाहिजे म्हणजे त्यांच्या मनाची हुषारी कायम राहते, नाहींतर ती थिजून जाते." अखेर त्यांना घेऊन गेलेच ! दिसण्यांत गोष्ट क्षुल्लक आहे. पण लोकसंग्रहाची जी किल्ली आहे ती असल्या अनेक

गोष्टींत असते. हा सर्व प्रकार माझ्या देखत घडलेला आहे. कोणाच्याहि उत्साहाला ते जागच्या जागीं जिरूं देत नसत ही त्यांची खुबी !

कोणी त्यांच्याकडे आला व काय करावें व काय नाहीं ह्याबद्दल जर सल्ला विचारूं लागला तर त्यांचें पहिलें पाहणे हे असे कीं, हा 'मेग्या' आहे कीं, 'उत्साही' आहे. मेग्या दिसला तर ते मनाशीं ठरवून टाकीत कीं, ह्याच्या हांतून कांहीं होणें ना जाणें; उगाच आपला विचारतो आहे झालें. पण जर खरा उत्साही दिसला व त्याचा मार्ग जर चुकीचा असला तर त्याच्या उत्साहाला योग्य तो मार्ग दाखवून देऊन ते त्याची ती शक्ति कामांत आणीत. वांया जाऊं देत नसत. ह्या ठिकाणीं मला चाणक्य राजनीतिशास्त्रांतील खालील श्लोकाची आठवण होते.

> यस्य यस्य हि यो भावस्तस्य तस्य विभाव्यताम् ।
> अनुप्रविश्य मेधावी तंतमात्मवशं नयेत् ॥

श्रद्धा व उत्साह ह्यांची नेहमीं सांगड असते. कोणत्याहि कामांत एक दुसऱ्याशिवाय राहूंच शकत नाहीं. हें तत्त्व बरोबर ओळखून काम करणाऱ्याच्या पोटात शिरून त्याला ते नेहमीं आपलासा करून घेत.

---

## कृष्णाजी बल्लाळ देवल

[रावबहादूर, पेन्शनर हुजूर डेप्युटी कलेक्टर, गायनशास्त्राभिज्ञ, लोकमान्यांचे स्नेही, सांगली ]

(१) गायनशास्त्राचे आद्याचार्य भरत मुनी यांचा काल खिस्ती शकापूर्वी किंवा नतर दोनशें वर्षे असा आहे. ऋक् प्रातिशाख्ये व यजुः प्रातिशाख्ये यांमध्ये ससस्वर अगर यम यांचा निर्देश केलेला आहे म्हणून त्यांचा काल ठरविण्याकरितां मी लोकमान्य बळवंतरावजी टिळक यांजकडे मुद्दाम गेलो होतो. ऋक् प्रातिशाख्याचीं भाष्यें आचार्य आणि शिष्य यांच्या सवादात्मक असलेलीं मी त्यांस दाखविलीं; व त्यांचा काल त्यांस विचारिला. या वेळीं अनेक भानगडीच्या शेंकडो सार्वजनिक कामांत ते गुतले असतांहि व राजकारणांतील मनास अस्वस्थ करणारीं प्रकरणें त्यांचे मागे चालूं असतांहि त्यांनी सदर बाबीसारख्या गहन विषयाचा संशोधक बुद्धीनें विचार करून हीं प्रातिशाख्ये खिस्तीशकापूर्वी १५०० वर्षांच्या पूर्वीचीं असलीं पाहिजेत असा सप्रमाण निर्णय दिला! या त्यांच्या

निर्णयानें गायनशास्त्राचे बाबतींत प्राचीन संशोधन करणारास अपूर्व व अमूल्य मदत झाली आहे.

( २ ) लोकमान्य टिळकास ' हट्टी ' हें विशेषण त्यांच्या प्रतिपक्षीयाकडून लाविलेलें आम्ही अनेक वेळां पाहिलें व ऐकिलें आहे. कोणाचा काय अनुभव असेल तो असो, पण निदान आमच्या मनावर तरी त्यांच्या स्वभावाचा ' प्रांजल-पणा ' हाच प्रतिबिंबित झालेला आहे, हें एकाच उदाहरणानें स्पष्ट करितों. साग-लीच्या ज्योतिष समेलनांत आपल्या ' ज्योतिर्गणित ' या ग्रंथाचा तुम्ही आजपर्यंत मुळींच परामर्ष घेतलेला नाहीं असा श्रीयुत व्यंकटेश बापूजी केतकर यांनीं किंचित् आवेशानें व थोड्या रागानें बळवंतरावजींवर हल्ला चढविला. त्यावेळीं त्या थोर व उदार मनाच्या पुरुषानें असें का झाले याचीं कारणें त्यांचे जवळ असतांहि, त्यांनीं तीं सांगत न बसता, एकदम भर सभेंत केतकरासारख्याचे बाबतींत प्रांजलपणें आपली चूक कबूल केली व वाद मिटविला हें काय हट्टी-पणाचे लक्षण ?

( ३ ) लोकमान्य बळवंतरावजींचे धैर्य उसनें नसून उपजत असल्याबद्दल माझी लहानपणींच खात्री पटलेली आहे. बळवंतराव डेक्कन कॉलेजमध्यें शिकत असताना मी एकदां तेथें सहज गेलों होतों. गच्चीवर आम्हीं सर्व मंडळी गप्पा मारीत बसलों होतो. पेशवाईतल्या मर्दानीपणाच्या व पराक्रमाच्या गोष्टी चालल्या होत्या, यामुळें कांहींना आवेशहि चढला होता.' यावेळीं एकाएकी येथून नाहींसे होण्याचा प्रसंग आल्यास तू काय करशील ' असें आपसात बोलणें निघालें. जो तो ' हें बुवा अशक्य आहे ' असें म्हणू लागला, पण इतक्यात टिळकांनीं काच्या मारून सुमारे २ पुरुष उंचीच्या त्या जागेवरून, क्षणाचाहि विचार न करिता, एकदम ' मी हें असे करीन ' असे म्हणत खालीं उडी फेकली ! तें पाहून ' अरे याचा हातपाय मोडला असला पाहिजे ' असें म्हणत सर्व मंडळी मिळून गडबडीनें धावत खालीं जाण्यास जिन्याकडे धांवली; तों टिळकांची स्वारी पुनः वर येण्यास जिन्यापर्यंत आलेली पाहून सर्वांनीं आश्चर्यानें तोंडात बोटें घातलीं !

( ४ ) सन १९०५ सालीं श्रीक्षेत्र काशी येथें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन झालें. त्याकरितां लोकमान्याबरोबर मी गेलो होतों. कॉंग्रेसचे नियोजित अध्यक्ष ना. गोपाळराव गोखले हे सकाळच्या गाडीने बनारसेस यावयाचे होते म्हणून त्यांचें स्वागत करण्याकरितां व त्यांस सामोरे जाण्याकरितां बळवंतरावजी मुद्दाम आदले दिवशीं बनारसेस जाऊन दुसरे दिवशीं सकाळीं गाडीचे वेळीं स्टेशनवर गेले होते. अध्यक्षांची गाडी येण्यापूर्वी बराच वेळ टिळक स्टेशनवर गेले अस-ल्यामुळें, त्यास पाहण्याकरितांच तेथें अतोनात गर्दी जमली. पुढें कांहीं वेळानें गाडी आली. मग गर्दी काय विचारावी ! माणसांच्या लोंढ्यांत मी एका बाजूस वाहात गेलों; तेथेंच अमेरिकेहून नुकत्याच आलेल्या सिस्टर निवेदिता व त्यांच्या

बरोबरीच्या दोन अमेरिकन बाया गर्दीत वाहात आल्या. आमची कांहीं एक ओळख नसतां त्यांनीं मला अति उत्सुकतेने प्रश्न केला, कीं "Gentleman! will you please show us where Mr. Tilak is? We are anxiously waiting here to have a glimpse of him," हे ऐकतांच मी त्यांस होकारार्थी उत्तर देऊन तसाच पुढे त्या अलोट गर्दीत शिरलों व टिळक उभे होते तेथपर्यंत जाऊन त्यांस सदर बाया तुम्हास फार उत्कंठेने भेटूं इच्छितात असें सांगितले. टिळक लगेच माझेबरोबर येऊन त्यांस भेटले. तेव्हां त्या बायांस झालेला आनद पाहून मला मोठे आश्चर्य वाटलें. अति प्रेमादराने टिळकांशी हस्तांदोलन करून त्या म्हणाल्या, "Mr. Tilak! we know you up till now in America only by your world-wide works namely 'Orion' and 'Arctic Home in the Vedas;' but to day we have had the great pleasure of seeing you personally. Certainly this day is a day—a happy day in our life and we shall never forget it"

---

## बळवंत मार्तंड नागपूरकर

[ लोकमान्यांचे परम स्नेही कै. बाबामहाराज यांचे मानी कारभारी व ताईमहाराज प्रकरणांतील बाळामहाराज व ताईमहाराज यांचे पक्षपाती, कोल्हापूर. ]

कै. लो. टिळक यांचेबद्दल माझी पूज्यबुद्धि होती. व अखेरपर्यंत ती तशीच कायमहि राहिली. प्रसिद्ध दत्तक प्रकरणामध्यें या परमवंद्य पुरुषाच्या सरळपणाचा कांहींनीं फायदा घेऊन मतभेद व भानगडी उत्पन्न केल्या व अखेर लोकमान्यांस त्या पायीं द्रव्यद्वारा व शरीरद्वारा कसा यज्ञ करावा लागला हें सर्व प्रसिद्धच आहे; परंतु लोकमान्य हें सर्व सोसण्यास पूर्ण समर्थ असले तरी, अखेर मित्रकार्य करीत असतांच त्यांचा मुंबईत अंत झाला; किंवा अंत होईपर्यंत त्यांनीं मित्रकार्य सोडलें नाहीं हा विचार निदान माझ्या सारख्याचे तरी मनांतून नाहींसा होणे शक्य नाहीं.

( १ ) सदर दत्तकप्रकरणाच्या कज्याचे कामी कमिशनने माझी साक्ष इकडील श्रीनी काढिल्यावेळीं उलट बाजूने लोकमान्यांची स्वारी करवीरीं आली होती. वास्तविक यावेळीं त्यांचें माझें नातें कशा प्रकारचे होतें हें सांगण्याचे कारण नाहीं; तथापि दोन प्रहरीं ते कोर्टीत जात असतां, कोर्टाचा रस्ता, आमच्या

घरासमोरून असल्यानें ‘ हें नागपूरकरांचे घर ’ असें त्यांस कोणी सहज सांगतांच त्यांनीं तेथें गाडी थांबवली व मला हांक मारिली; परतु त्यावेळीं मी घरांत नव्हतों, तरीहि त्यांनीं मुलांस हांक मारून पाणी पिण्यास मागितलें. ‘ मी घरून पाणी पिऊन आलो होतों, पण हे बळवंतरावाचें घर म्हणून मुद्दाम येथें उतरून पाणी पीत आहें ’ असें तेथील मंडळीजवळ म्हणून ते कोर्टात गेले. त्या तारखेस मला समन्स लागू न झाल्यामुळें मी कोर्टात गेलों नाहीं मी सायंकाळीं घरीं आल्यावर हा मजकूर मला समजताच मी आश्चर्यचकित झालों. ते सायकाळीं तेथून निघावयाचे होतें म्हणून लागलींच तसाच त्यांचे भेटीस स्टेशनवर गेलों. त्यावेळीं ते मला अति प्रेमानें भेटले, व मला गहिंवर येण्यासारखे माझ्याशीं एक सारखे बोलत होते तें काय लिहावें ? केवढा त्यांचा हा मोठेपणा व मुत्सद्दीपणा !

( २ ) प्रिव्हिकौन्सिलचा निकाल झाल्यावर बेळगाव वगैरे भागाकडून पुण्यास लोकमान्य जात असता. मिरज स्टेशनवर त्यांना पानसुपारी झाली. त्या वेळीं सहज त्याची व माझी तेथें भेट झाली. दत्तकप्रकरणात त्याचें माझें नातें व संबंध कोणत्या प्रकारचा होता हे ज्याना पूर्णपणें माहित आहे त्याना खालील मजकूर वाचून त्या उदार अंतःकरणाच्या पुरुषाच्या मनाचा ठाव कोणासहि लागला नव्हता असे वाटल्याखेरीज राहणार नाहीं. वर लिहिलेला स्टेशनवरील समारंभ होताच त्यांनीं माझा हात धरून मला गाडींत घेतलें, आणि सागितलें कीं, ‘ तुम्ही पुण्यास या आणि पूर्ववत् आपल्या कामावर हजर व्हा, नुकसान करून घेऊ नका; जरूर या; झालें ते सर्व होऊन गेलें. आतां पुनः नवी चिटी नवें राज्य ! ” परंतु माझ्या समजुतीनें खरी असलेली बाजू मला सोडावीशी वाटली नाहीं. तरी पण लोकमान्य मात्र अखेरपर्यंत मला कामावर बोलावीतच होते ! !

( ३ ) दत्तकापूर्वी,—लोकमान्य हजर नसलेल्या मुदतींत,—एकदर जो खर्च झाला तो पुढें सर्व ट्रस्टींची मंजुरी मिळेपर्यंत, माझ्या नावे होता. सन १९०१ सालीं सिंहगडावर ट्रस्टींच्या कमिटीपुढे तो मंजुरीसाठीं ठेवण्यात आल्यावर इतर ट्रस्टींनीं, त्यांचे मनांतून जो श्री. नानामहाराजाचा मुलगा दत्तक घ्यावयाचा होता त्यांस मी विरुद्ध असल्यामुळें, सदरहू खर्च फार फाजील झालेला आहे वगैरे भानगडी उपस्थित करून तो सर्व खर्च माझ्यावर बसविण्याचा प्रयत्न करून अखेर त्यांनीं वादहि केला. परंतु त्या निःपक्षपात बुद्धीच्या सत्यनिष्ठ पुरुषानें माझे सर्व हिशेब पाहून त्यांत काहीं भानगड नाहीं अशी आपली खात्री करून घेतल्यावर बसल्या बैठकींत तो झालेला सर्व खर्च मंजूर करून जमाखर्चे करून घेतला येथूनच ट्रस्टींचे मतभेद होऊन कज्ज्याचें बीज पेरले गेलें आणि काहीं या परोपकारी पुरुषास पुढें घालून आपण मात्र नामानिराळे झाले !

---

# व्यंकटेश रामचंद्र सखदेव, जोशी

[ बी. ए. एलएल्. बी. वकील, कऱ्हाड ]

कै. लोकमान्य टिळक महाराज व कै. नामदार गोपाळ कृष्ण गोखले या दोन थोर विभूतींकडे मला सन १९०६–७ चे जुलैअखेर कांहीं कामानिमित्त जाणें भाग पडलें. त्यावेळीं मला त्या थोर पुरुषांचा जो अनुभव आला तो लिहीत आहे. ना. गोखले हे आमच्या मातोश्रींच्या चुलत भावाचे मुलगे. अर्थात् माझा व त्यांचा लांबचा कां होईना, पण आते–मामेभाऊपणाचा संबंध येत होता; तथापि यापूर्वी त्यांची माझी कधींहि भेट झाली नव्हती. लोकमान्यांचा व आमचा तशा तऱ्हेचा कोणताहि संबंध नव्हता; पण ज्या बाईंना घेऊन मी लोकमान्यांच्याकडे गेलों त्या बाईंचे सासरे कैलासवासी नाना भिडे हे लोकमान्यांचे एक जिवलग स्नेही होते.

वर लिहिलेल्या बाई, आमच्या मावशी असून, त्या व त्यांचा एक मुलगा असे दोघे सुमारे बारा वर्षे आमचे घरीं राहिलीं होतीं. पुढे त्यांचा मुलगा इंग्रजी पहिली इयत्ता हरिपुरास शिकूं लागला. त्यावेळीं आमच्या मावशीच्या मनांत असें आले कीं, आपला भाचा ना. गोपाळराव गोखले यांचेकडून कांहीं मदत मिळाल्यास पहावी; म्हणून त्या पुणे येथे आल्या. त्यावेळीं मी फर्ग्युसन कॉलेज-मध्यें शिकत होतों. मावशी पुण्यास अर्थात् माझेकडे आल्या. मी व त्या मिळून नामदार साहेबांच्या सोसायटीच्या बंगल्यामध्यें त्यांना भेटण्याकरितां सकाळी गेलों. तेथे गेल्यावर नामदारांना भेटण्याकरितां येणारी मंडळी ज्या ठिकाणीं बसतात तेथें आम्हांस बसविण्यांत आलें. सुमारे तास दीड तास आम्ही त्यांची वाट पाहिली व आज भेट होत नाहीं असें वाटू लागलें. आम्हांस बराच कंटाळाहि आला; परंतु सुदैवानें त्यांचे जांवई (नामदारांचे थोरले बंधु गोविंद-राव यांचे जांवई) तेथें येऊन 'नामदारांना भेटण्यास आतां परवानगी आहे तुम्हीं आंत चला' असें बोलले नंतर आम्हांस एका बंगल्याचे मागील सोप्यांत नेण्यांत आलें. याच बंगल्यांत नामदार राहातात असें नंतर आम्हांस समजलें. तेथें गेल्यावर मी एका खुर्चीवर बसलों व मावशी दारापाशीं उभ्या राहिल्या. नंतर नामदार साहेब दुसरे एक दार उघडून आत आले. लगेच मी उठून उभा राहून त्यांना अदबीनें नमस्कार केला व नामदार खालीं खुर्चीवर बसल्यानंतर आलेल्या बाई ह्या आपल्या आत्याबाई असून त्या आपणांस पूर्णपणे ओळखितात, त्यांचा व नामदारांचा कसा आप्तपणा आहे वगैरे हकीकत मी त्यास सांगितली. तेव्हां नामदारानीं उठून मावशींना लवून नमस्कार केला व दोन मिनिटें स्तब्ध बसून मला म्हणाले, "आपण मंडळी मजकडे का आलां ते मला दोनचार मिनिटांतच सांगा, माझा फार वेळ घेऊ नका, मला कामाची घाई

आहे. " हे ऐकून मला मोठें आश्चर्य वाटलें व मी त्यांस म्हणालों " माझ्या स्वतः-संबंधाने कोणत्याहि प्रकारची याचना करण्याकरिता मी आपणाकडे आलो नाहीं व परमेश्वराने माझी तशी स्थितिहि ठेविली नाहीं. मी फक्त या आमच्या मावशी-बरोबर,— ती बायको माणूस म्हणून,—आलों आहें. त्याची आपणाकडे जी याचना आहे ती त्या स्वतः आपणांस सांगू शकतील अगर आपण परवानगी दिल्यास मी सांगेन. " नामदार म्हणाले, " तुम्हीच सांगा, कांहीं हरकत नाहीं; पण हे पहा, जें सांगाल ते अगदीं थोडक्यात सांगा, " मी म्हणालों, " सदरहु आमच्या मावशी म्हणजे आपल्या आत्याबाई ह्या कोल्हापूरचे सुप्रसिद्ध वकील कै. नाना भिडे यांची सून असून त्या गेलीं बारा वर्षे आमचेच घरीं आहेत; त्यांचा मुलगा नुकताच इंग्रजी शिकू लागला आहे व त्याना सदर शिक्षणा-बद्दल खर्च करण्याची ऐपत नाहीं. तेव्हां कोल्हापूर संस्थानातून यांच्या दिराला जशी स्कॉलरशिप मिळत आहे तशाच तऱ्हेची, एखादी लहानशी का होईना, स्कॉलरशिप आपल्याहि मुलाला मिळावी अशी त्यांची इच्छा आहे. आपण कोल्हापूरच्या महाराजांना अगर तेथील कोणाहि अधिकाऱ्याला एखादे पत्र देऊन खटपट करावी अशी त्यांची आपणापाशीं याचना आहे. तेव्हां नामदार म्हणाले, " पूर्वी एकेकाळीं कोल्हापूरच्या महाराजावर माझें वजन होतें, परंतु हल्लीं त्यांचें व माझें ठीक नाही. तेव्हा माझेकडून तुम्हांला कोणतीहि मदत होईल असे वाटत नाहीं. शिवाय व्यक्तिविषयक गोष्टीमध्यें मी कोणाजवळहि आपला शब्द खर्च करीत नसतों. करितां माझे नादावर आपण बिलकुल विस-बून राहू नये, " असें म्हणून तावडतोब ते उठले व बराच वेळ मोडला असें बोलले. हे शब्द ऐकतांच मीहि उठलों व "ठीक आहे, आम्ही आपली रजा घेतो" असें म्हणून मी त्यांस नम्रपणें व अदबीनें नमस्कार केला. लगेच नामदार आल्या दरवाजानें आंत गेले व दरवाजा बंद झाला! आम्हीं उभयता विषण्ण अंतःकरणाने नशिबास दोष देत बाहेर पडलों.

नंतर दुपारी जेवणखाण झाल्यावर आतां पुढें काय करावे, मुलाचे शिक्षण कसें होणार अशी मावशीस काळजी पडली; व त्या बाबतींत आम्हां उभयतां-मध्यें वाटाघाट सुरू झाली. त्यावेळीं मावशींना एक सहज युक्ति सुचली. त्या म्हणाल्या लोकमान्य टिळक हे आमचे मामजी नाना भिडे यांचे स्नेही असून त्या उभयतानीं कोल्हापूर—बर्वेप्रकरणांत हाल सोसले आहेत. तेव्हां त्यांना सायंकाळीं भेटून आपली सर्व हकीकत निवेदन करून पाहावी, कांहीं उपयोग झाल्यास पहावें, नाहींतर आल्या वाटेने परत हरिपुरास हात हालवीत जाणें हे नशीबीं ठेविलेलेंच आहे.

ठरल्याप्रमाणें सायंकाळीं सहा वाजतां आम्हीं उभयतां लोकमान्य टिळक-महाराजांचे घरीं गेलों. दारांत भय्या बसला होता. तो आम्हांस आत जातांना अगदीं

खास खास आडवील म्हणून आम्ही आपण होऊनच, 'कोठें जातां' असा त्याने सवाल करण्याचे पूर्वींच, ' टिळक महाराजांना आम्हांस भेटावयाचें आहे, आंत जाण्यास परवानगी आहे काय ? ' असा प्रश्न विचारिला. मय्या म्हणाला ' टिळक महाराज आंतल्या अंगास झोपाळ्यावर बसले आहेत; तुम्ही खुशाल जाऊन त्यांना भेटा, त्यांना भेटण्यास अगोदर परवानगी वगैरे कांहींहि लागत नाही, त्यांचे दार सर्वांकरिता नेहेमीं उघडे आहे. ' हा एक प्रकारचा शुभ शकूनच झाला असे समजून आम्हीं आत गेलो. लोकमान्य झोपाळयावर अगदीं उघडेच बसलेले होते. जवळपास दुसरें कोणीहि नव्हतें. आमच्या मावशी बाजूच्या दरवाज्याने आंतील आंगास लोकमान्यांच्या कुटुंबाकडे गेल्या व मी लोकमान्यांना नमस्कार करून झोपाळ्यापुढे असलेल्या बाकाजवळ उभा राहिलो. लोकमान्यांनीं मला झोपाळ्यावर आपल्या जवळ बसण्यास सांगितले. बराच आग्रह केला, परंतु आपली तितकी योग्यता नाहीं हे समजून मी झोपाळ्यावर न बसतां बांकावर बसलो.

लोकमान्यांनीं मला ' तुम्हीं कोण, कोठून आलांत, तुमचे बरोबर आलेल्या बाई कोण, तुमचे काय काम आहे' वगैरे हकीकत विचारिली; तेव्हां मीं वरील सर्व हकीकत सविस्तरपणे त्यांस सांगितली. ते ऐकून लोकमान्य म्हणाले ' नानांचा व माझा अत्यंत स्नेह होता; आम्हीं उभयतांनीं कै० आगरकरांसमवेत कोल्हापूर-बर्वेप्रकरणांत तुरुंगाचा पाहुणचार घेतलेला आहे; आम्हां तिघांवर जेव्हां फौजदारी खटला झाला त्यावेळीं नानांच्या कडून मला थोडी आर्थिक मदत झाली होती, पण ते पैसे मी तावडतोब त्यांस परत केले आहेत. ते पैसे अद्याप येणे आहेत असे समजून बाई मजकडे आल्या आहेत कीं काय ?" मीं म्हणालों " पैशासंबंधी आपण सांगितलेली हकीकत बाईंना बिलकुल माहीतहि नाहीं, तेव्हा त्याकरितां त्या येणार कशा ! त्यांची एकच आपणांस विनंति आहे कीं, त्यांचा मुलगा बारातेरा वर्षांचा असून तो हल्लीं नुकताच इंग्रजी शिकूं लागला आहे; पण बाईंची आर्थिक स्थिति मात्र फार हलाखीची झाली असल्यामुळें त्या आपणाकडे मुलाच्या शिक्षणाची कांहीं सोय होईल काय हें विचारण्यास आल्या आहेत " यावर लोकमान्य म्हणाले " नानांचा नातू इंग्रजी शिकूं लागला हें ऐकून मला फार संतोष झाला, मुलगा माझ्या घरीं आणून ठेवा, त्याच्या शिक्षणाची सर्व सोय मी करितो व तो जेथपर्यंत शिकेल तेथपर्यंत त्याला मी माझ्या मुलाप्रमाणे आनंदाने शिकवितो. तुम्हीं त्याच्या शिक्षणाची कांहीं एक काळजी करूं नका " हे ऐकून दाराच्या आंतील बाजूस उभे राहून मावशी म्हणाल्या ' आपल्या म्हणण्याप्रमाणे मी मुलास येथें आणून ठेवण्यास तयार आहें; पण हरिपुरास मी ज्या माझ्या भाच्याच्या घरीं राहते तेथेंच शिक्षण व्हावें अशी फार इच्छा आहे व घरांतील मंडळींचाहि पण तसाच आग्रह आहे. ' लोकमान्य म्हणाले " ठीक आहे; मुलाचे शिक्षण हरिपुरासच व्हावें अशी तुमची इच्छा

असेल तर माझी कांहीं हरकत नाहीं. मुलाच्या शिक्षणाकरिता म्हणून तूर्त दरमहा पाच रुपये व पुढें लागतील तसे हरिपुरास पाठविण्याची मी तजवीज करितों. तुम्हीं काळजी करूं नका." किंचित् गहिंवरून मावशी म्हणाल्या 'आपण अशा रितीनें मजवर डोंगरा एवढे उपकार करीत आहां, पण आपणांस अशा तऱ्हेची प्रत्यक्ष तोशीस द्यावी अशी माझी बिलकुल इच्छा नाहीं व याकरिता मी आलेंहि नाहीं. माझी एकच इच्छा आहे व ती ही कीं, कोल्हापूर संस्थानांतून माझ्या दिरास जशी हल्लीं स्कॉलरशिप मिळते तशी एखादी लहानशी स्कॉलरशिप मुलास मिळावी व ती आपण मिळवून द्यावी.' यावर लोकमान्य मजकडे वळून म्हणाले "पहा बुवा, तुम्ही आपला विचार करा; मी कशा तऱ्हेचा माणूस आहें हे तुम्हास माहीतच आहे. सरकार मला पाण्यांत पाहात असतें व सरकारचे अंकित असलेले संस्थानिक यांचेबद्दल तर काहीं विचारूंच नका; कारण संस्थानिकाचें अस्तित्व केवळ सरकारच्या मर्जीवर. माझ्या पत्रानें तुम्हास काहीं उपयोग होईल असें मला वाटत नाहीं; तथापि तुमचा तसा आग्रहच असेल तर तुम्ही ज्या कोणास पत्रे देण्यास सांगत असाल त्यास पत्रें देण्यास मीं तयार आहे." मावशीनीं कोल्हापूरचे दिवाण साहेब व आणखी एक बडे अमलदार अशा दोन इसमांचीं नावें सुचविलीं. लोकमान्यानीं तात्काळ माडीवर जाऊन पत्रे लिहीण्यास सुरुवात केली. मलाहि वर हाक मारिली. यावेळी त्यानीं आपली आणखी काहीं खाजगी पत्रें लिहिलीं. नंतर आमचीं पत्रें पाकिटांत घालून त्यावर पत्ते लिहून तीं आमच्या जवळ दिलीं. नंतर आम्ही उभयतां पुनः खालीं येऊन बसलों. त्यावेळीं लोकमान्यानीं आमच्या घरच्या सर्व मंडळींसबंधीं चौकशी केली व आपणहि एकदा हरिपुरास गोखले सावकार यांचे घरीं आलो होतों वगैरे आपली आठवण सांगितली. सांगली-मिरजेकडील हवापाण्यासबधानें चौकशी करून 'तुम्ही कधीं पुनः सांगलीस गेल्यास सांगली हायस्कूलचे सुप्रसिद्ध हेडमास्तर हरीपंत करमरकर याना माझा नमस्कार अवश्य कळवा. हरीपंत व मी लहानपणीं एकाच हायस्कूलमध्यें शिकत होतों.' अशा रीतीनें सुमारें तास पाऊण तास बोलणें झाल्यावर मी होऊनच लोकमान्यांची रजा घेतली. आम्हीं उभयतां निघालो त्यावेळीं लोकमान्य चार पावलें आम्हास पोहोचविण्यास आले व परत जाण्यास मावशीना भाडेखर्चाकरिता म्हणून चार रुपये माझे जवळ देऊं लागले! मी ते घेण्याचे नाकारलें. लोकमान्य ऐकेनात. तेव्हा मी म्हटलें 'आम्ही आमचे कामाकरिता आपणाकडे आलो, आपण आमचें काम केलेत व आता उलट आपणच आम्हांस भाड्याचे पैसे द्यावे ही गोष्ट आम्हांस लाजीरवाणी आहे' इतके जेव्हा निक्षून सांगितले तेव्हा मग लोकमान्य पुढें काहीं बोलले नाहींत, त्यास नमस्कार करून आम्हीं निघून आलों

नंतर मावशी स्वतः तीं पत्रें घेऊन कोल्हापुरास दिवाणसाहेबाकडे गेल्या.

परंतु चमत्कार असा कीं, ज्यावेळीं लोकमान्यांनीं तीं पत्रें लिहून आम्हांस दिलीं त्यावेळीं त्यांनीं आपल्या दुसऱ्या स्नेह्यांस लिहिलेलें पत्र चुकून दिवाणसाहेबांचें पाकिटांत गेलें ! अर्थातच् दिवाणसाहेबांनी तें घेण्याचे नाकारिलें. तेव्हां कष्टी होऊन पुनः मावशी कोल्हापुराहून पुण्यास माझ्याकडे आल्या व पत्रासंबंधीं घडलेली हकीकत त्यांनीं मला सांगितली. म्हणून पुनः आम्हां उभयतांस लोकमान्यांकडे जावें लागलें. सर्व कच्ची हकीकत त्यांना सांगून पत्राचें पाकीट त्यांना दाखविलें. लोकमान्यांनीं झालेली चूक कबूल केली व फार खेदहि प्रदर्शित केला. त्यांनीं पुनः लगेच दुसरे पत्र लिहून आमच्याजवळ दिलें व मावशींच्या गाडेखर्चाकरितां म्हणून दहा रुपयांची नोट माझे हातावर ठेविली !, आम्ही ती घेण्याचे नाकारलें; परतु यावेळीं मात्र लोकमान्य थोडे रागावले व मला म्हणाले, " चुकी माझी, मग त्याबद्दलचा भुर्दंड तुम्ही काय म्हणून सोसावा ? या खेपेस हे पैसे तुम्ही घेतलेच पाहिजेत; न घ्याल तर मला फार वाईट वाटेल. " लोकमान्यांच्या अशा तऱ्हेच्या शब्दांची अवहेलना कोण करूं शकणार ? आम्ही तर काय, यःकश्चित माणसें; आम्ही ती नोट निमूटपणें घेतली. तेव्हा लोकमान्यांना फारच समाधान वाटलें. नंतर आम्ही उभयतानीं त्यांचा निरोप घेतला. त्यावेळीं ते म्हणाले " तुम्ही केव्हांहि नड लागल्यास मजकडे येत जा; माझे हातून जें करितां येईल ते सर्व मी तुमच्या मुलाकरितां अवश्य करीन. मी तुम्हांस सांगितलेच आहे कीं, तुमच्या मुलांत आणि माझ्या मुलांत मला कांहींच अंतर वाटत नाहीं; कारण नाना मिठ्यांचा नातु हा मला माझ्या मुलाप्रमाणेंच आहे ! "

येणेंप्रमाणें मला त्या दोन थोर पुरुषांचा जो अनुभव आला तो हातचें-पदरचें कांहींहि न घालतां यथातथ्य वर्णन केला आहे. सदर अनुभव लिहितांना या दोन थोर व्यक्तींची कोणत्याहि प्रकारें तुलना करण्याची माझी इच्छा नाहीं; कारण त्यास मी पात्र नाहीं. शिवाय कालवश झालेल्या या दोन्ही विभूतींबद्दल माझे मनात सारखीच पूज्य बुद्धि वसत आहे. 'Never speak ill of the dead' ही इंग्रजी म्हण सदर आठवण लिहित असतांना मी माझ्या डोळ्यापुढे ठेविली आहे. म्हणून कोणाचेहि गुणवर्णन वा अवगुणप्रदर्शन मी केलेलें नाहीं. निर्विकार मनानें घडली तशी गोष्ट लिहिली आहे.

---

## गणपतिबुवा भिंगारकर

[ वारकरी संप्रदायाचे एक वयोवृद्ध पुढारी व लोकमान्यांचे चहाते, पुणें. ]

आधुनिक विद्येनें व पाश्चात्य विचारसरणीनें चिकित्सक झालेले लोक लोकमान्यांकडे निराळ्या दृष्टीनें पाहात हें मला माहित आहे; तथापि श्री समर्थ व श्री तुकाराम महाराज यांचेकडे पाहाण्याची जी दृष्टी त्याच दृष्टीनें लोकमान्यांकडे आमचा सर्वसामान्य समाज पाहात असे हें मी आपल्या स्वतःच्या अनुभवावरून सांगतो. श्रद्धा ही एक प्रकारची शक्ती आहे. ती जेथें असेल तेथें कांहीं चमत्कार घडून आल्यास नवल नाहीं. लोकमान्यांसंबधानें सामान्य लोकांची विलक्षण श्रद्धा असे, हें शहरांतील केवळ तर्कानीं चालणाऱ्या लोकांस माहित असणें शक्य नाहीं. म्हणून पुढील तीन गोष्टी सांगतों.

(१) आमच्या विशेष परिचयाचे पुजाजी शेट म्हणून एक मारवाडी गृहस्थ होते. त्यांची लोकमान्यांविषयीं अपूर्व भक्ति असे. लोकमान्यांस ते अवतारी पुरुषच समजत, इतकेंच नव्हे तर शेवटीं शेवटीं लोकमान्याविषयी त्यांची भक्ति इतक्या निःसीम पदास जाऊन पोहोंचली कीं, त्यांनीं लोकमान्यांची तसवीर आपल्या देव्हाऱ्यांत ठेवून पुत्रसंतान होण्याबद्दल त्यास नवसहि केला व विचित्र योगायोग असा कीं, त्या निपुत्रिकास हा नवस फळास येऊन पुत्रलाभ झाला!!

( २ ) तसेच आमचे एक स्नेही राजेश्री गावडे हेहि एक मोठे टिळकभक्त होऊन गेले. लोकमान्य मंडालेहून बंधमुक्त होण्याचे आधीं पंधरा दिवस राजेश्री गावडे यास स्वप्नांत दृष्टान्त झाला कीं, अमुक अमुक दिवशीं मी पुण्यात येऊन पोहोंचणार आहें. यामुळें तेव्हांपासून त्यांनीं उपोषण सुरू केलें व दृष्टांताप्रमाणें ठराविक दिवशीं अचानक टिळक महाराज पुण्यास आल्याची बातमी आम्हां सर्वांस कळली ! त्या आनंदाचें कोण वर्णन करू शकेल ? पुढें रा. गावडे यांनीं आपले घरीं एके दिवशीं मोठा सत्यनारायण समारंभ करून टिळक महाराजांस प्रसादास व त्यांची पूजा करावी म्हणून बोलाविलें होतें. सर्व समारंभाचे शेवटीं त्यांनीं उभे राहून हात जोडून मोठ्यानें सत्यनारायणाची प्रार्थना केली कीं, " हे प्रभो ! या आमच्या टिळक महाराजास दिर्घायुषी कर; व या पुढें कोणतेंहि संकट त्यांचेवर आणू नको." हे ऐकून सर्व समाज गहिंवरून गेला ! तेथें लोकमान्यांनींहि सर्वांस थोडें उपदेशपर भाषण केलें; पण तें लिहून काढण्यास मी असमर्थ आहें.

( ३ ) वरील दोनहि गोष्टी वाचून श्रद्धेस पारखे झालेल्या आधुनिक विद्वानांस हे सर्व अविश्वसनीय वाटेल. मग ही तिसरी गोष्ट वाचून तर त्यास काय वाटेल याची कल्पनाच मला होत नाहीं. असो; येथें दाजीबा नांवाचा एक मोई

महारोगानें ग्रस्त झाला होता. लोकमान्यांस तर हा देवच समजत असे. परंतु या त्याच्या देवाचे दर्शन मात्र त्यास दुर्दैवानें लांबूनच घेऊन त्यास समाधान मानावे लागे. पण त्याची लोकमान्यांविषयी भक्ति मात्र पराकाष्ठेची व एकनिष्ठ असे. श्री गणपती उत्सवांत एकदां गर्दीमध्ये तो जरा बाजूस उभा असलेला लोकमान्यांस दुरून सहज दिसतांच त्यांनीं त्याचेजवळ जाऊन आपल्या मुला-प्रमाणें त्याचे पाठीवरून हात फिरविला. हे पाहून आजूबाजूचे सर्व लोक चकित झाले! एके दिवशीं त्यास स्वप्नांत दृष्टान्त झाला कीं, 'तू रोज नित्य नियमाने महादेवाचें दर्शन घेत जा व तीर्थ प्राशन करून सर्वांगावर त्याचे प्रोक्षण करीत जा.' याप्रमाणे तो मनात टिळक महाराजांचें नाम सकीर्तन करीत राहिला. असा क्रम कित्येक दिवस अखंड चालविल्यावर अद्‌भुत चमत्कार असा झाला कीं, त्याची काया पूर्ववत् शुद्ध झाली !! व एके दिवशीं तो टिळक महाराजांचे वाड्यांत जाऊन साक्षात् आपल्या देवतेच्या चरणावर मस्तक ठेवून त्याने स्वर्गतुल्य आनद लुटला !!

---

## विश्वनाथ विष्णू नाटेकर

[ वकील, चाळीसगाव ]

सन १९१३ सालची गोष्ट. एके दिवशीं सकाळी मी कांहीं कामानिमित्त लोणावळ्यास जाण्याकरितां पुण्याचे स्टेशनवर गेलों, परतु गाडी चुकली; दुसऱ्या गाडीला दोन तास अवधी असल्यामुळें प्लॅटफॉर्मवरच बसून राहिलो. कांहीं वेळाने एक पोलिस सार्जंट गोऱ्याकडील एका खिस्ती इसमाला घेऊन आला व मी ज्या बाकावर बसलों होतों त्याच बाकावर त्या इसमाला बसवून सार्जंट निघून गेला. पोलिस सार्जंट बरोबर का, म्हणून सरदहू इसमास विचारितां त्यानें सफाईदार इग्रजी मार्फत सांगितले कीं, तो एका मालाच्या मोठ्या बोटीवर इंजिनांत कोळसे घालणारा 'आगवाला' होता. सुमारें १०।११ महिन्यापूर्वी ती बोट मुंबईला माल घेऊन आली होती. ती परत इंग्लंडला जाण्याचे वेळीं सदरहु 'आगवाला' दारू पिऊन झिंगलेला असल्यामुळे कामावर राहू शकला नाहीं. म्हणून प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटनें त्यांस नऊ महिन्यांची सजा दिली होती. इतकी हकीकत त्याने मला सांगितल्यावर आम्ही दोघे कांहीं वेळ स्तब्ध होतों. नतर त्यानें मला एकाएकीं उत्सुकतेनें विचारलें "Where is that great man?" हा इसम कोणासंबंधानें चौकशी करीत आहे हें

जाणण्याची मला जिज्ञासा उत्पन्न झाली व मी विचारलें "Which great man ?" त्यानें उत्तर दिलें "Mr. Tilak of course" ! पुढें मी त्याला योग्य माहिती दिली; पण नेहेमीं इंग्लंडांत राहून दक्षिण अमेरिका, जपान वगैरे दूरदूरच्या देशाकडे प्रवास करणाऱ्या बोटीवरील इसमानें तुरुंगांतून बाहेर येताच लोकमान्यासंबधानें इतक्या उत्सुकतेनें विचारपूस करावी याचें मला मोठें आश्चर्य वाटलें.

---

## बाळकृष्ण मार्तंड चौंडे

[ कीर्तनकार, प्रसिद्ध गोरक्षण कार्यकर्ते, वाई. ]

(१) लोकमान्याची व माझी दोनतीन वेळां भेट झाली. प्रत्येक वेळीं त्यांनीं मला माझे कार्यांत उत्तेजनच दिलेलें आहे. तथापि आतां असल्या लहानसहान उपायाने कांहीं भागणार नाहीं, असें ते वारवार म्हणत. एकदा ते म्हणाले कीं, " आजपर्यंत मी हे असले सर्व प्रयत्न करून पाहिले. आतां बारीक सारीक फांद्या तोडण्यांत अर्थ नाहीं. पराधीनतेचें मूळच ज्यानें उपटेल असा स्वराज्याच्या चळवळीचा धक्का दिल्याखेरीज हें विषारी झाड उन्मळून पडणार नाहीं, तथापि ज्यानें त्यानें आपल्या आवडीच्या चळवळीचा जोराचा धक्का ह्या झाडास दिल्यास आमचें कार्य तितकेंच सुकर होणार आहे."

(२) बोलता बोलतां एकदा ते म्हणाले " राष्ट्रभक्त अधिक निर्माण झाल्या-खेरीज राष्ट्रकार्य जसें होणार नाही तसेंच कळकळीचे व निष्ठावत गोरक्षक तयार झाल्याखेरीज गोरक्षण तरी कसें होणार ? शिवाय तुम्हीं हें लक्षांत ठेवा कीं, अशिक्षित समाजास धार्मिक दृष्ट्या तुम्ही जसें चटकन् गोरक्षण पटवूं शकाल तसें हल्लींच्या संशयवादी सुशिक्षितांस तुम्हांस गोरक्षण पटविणें फार जड जाईल, म्हणून तुमचे पुढें सुशिक्षित समाज जेव्हा असेल तेव्हा आर्थिक दृष्टीचें अंजनच त्यांचे डोळ्यांत तुम्हास घातलें पाहिजे, एरवी काहीं जमणार नाहीं !"

(३) एका भेटींत देशाच्या सद्यस्थितीसंबंधानें किंचित् चिंताजनक विचार मनांत येऊन लोकमान्य म्हणाले " परकीयांचा, देशाच्या देहावर ताबा असला तरी मला तितकें वाईट वाटणार नाहीं; पण तरुणांच्या मनावर इंग्रजांच्या राज्यानें बराच अनिष्ट परिणाम केला आहे. आमच्या संस्कृतीवर जबरदस्त आघात होत आहे. भारतवर्षातील लोकांस गोरक्षणाचें महत्त्व सांगण्याचा प्रसंग यावा काय ? आणि तेंहि धार्मिक दृष्ट्या न पटण्यापर्यंत सुशिक्षितांची मजल जावी

अं ! कांहीं झालें तरी गोभक्षक जोपर्यंत आहेत तों पर्यंत गोरक्षण हे आपणाला केलेंच पाहिजे. काम जड आहे, कष्ट आहेत, परीक्षेची वेळ आहे; पण त्यास इलाज नाहीं. ”

---

## प्रल्हाद नरहर ऐनापुरे

[माजी कारकून टिळकस्वराज्य संघ, पुणे.]

( १ ) एकदा लोकमान्य आपले वाड्यांत दोन प्रहरीं आरामखुर्चीवर पडलेले असतांना एक सरकारी मोठ्या हुद्यावरचे गृहस्थ दारूच्या धुंदींत नारिंगें द्राक्षे, संत्रीं वगैरे आपल्या बागेतील उत्कृष्ट फळें घेऊन आले व तीं खाण्याविषयीं लोकमान्यांस ते आग्रह करू लागले. तेव्हां त्यांस अशा स्थितींत पाहून कष्टी होऊन मूळ मिडस्त स्वभावाचे लोकमान्य या वेळीं रागानें ताडकन त्यास म्हणाले ‘ ज्या दिवशीं तुम्ही हे व्यसन—दारू—सोडाल त्या दिवशीं मी तुमच्याशीं बोलेन, तोंपर्यंत मी तुमच्याशीं बोलणार नाहीं व तुमचा हा नजराणाहि घेणार नाहीं.’

( २ ) केसरीचें नवीन यंत्र वाड्यांत येऊन पडल्यापासून लोकमान्यास त्यावाचून काही सुचेनासे झाले होतें. अजून तें यंत्र पुरें यावयाचे होतें. त्याचे फक्त कांहीं भाग येऊन पडलेले होते. एक दिवस लोकमान्य खोक्याच्या फटींतून यंत्राचे वरून ते भाग सूक्ष्म दृष्टीने पहात एकसारखे उभे होते. यावेळीं वरून सपाटून पाऊस पडत होता, खालीं चिखल झाला होता, तरी तिकडे त्यांचें लक्ष नव्हतें. त्या वेळीं त्यांच्या अंगांत फक्त एक सद्रा होता. तो व नेसतें धोतर चिंब होऊन गेले तरी त्यांस त्याचे भान नव्हते !! यावरून त्यांच्या चित्तैकाग्र्याची कल्पना होते !

(३) बॅरिस्टर बॅप्टिस्टा विलायतेस कोणत्या तारखेस गेले ती तारीख कांहीं कामाकरितां पाहिजे होती म्हणून मी केसरीची फाईल चाळून पहात होतो. इतक्यात लोकमान्य तेथें आले व म्हणाले “ काय करतां हो ” ? ‘ बॅरिस्टर बॅप्टिस्टा कोणत्या तारखेस विलायतेस गेले ती तारीख पहात आहे ’ असे मी सांगितलं, तेव्हा ते म्हणाले “अहो, मी आपल्या डायरीवरून ती तारीख तुम्हांला सांगतो, या इकडे म्हणजे फाईल चाळण्याचे श्रम व वेळ वाचेल. ” लगेच त्यांनीं मागील सालची डायरी काढून तारीख सांगितली ! निरलसता व साधेपणा याची येथे सीमा झाली ! माझ्यासारख्या कारकून लोकांशीहि ते कसे वागत हें यावरून दिसून येईल.

---

## शंकर गणेश लवाटे

[ बी ए. माजी उपसंपादक केसरी, माजी व्हा. प्रेसिडेन्ट पुणें म्युनिसिपॅलिटी, पुणें. ]

(१) न्यू प्रिपरेटरी क्लासेस नांवाची आमची एक इंग्रजी शाळा होती. ती बळवंतरावांनीं एकदा पहावी म्हणून त्यांना आम्हीं पाचारण केलें. ही गोष्ट त्यांना पहिली राजद्रोहाची शिक्षा झाल्यानंतरची असावी. बळवंतरावांनीं शाळा पाहून चांगला अभिप्राय द्यावा अशी आम्ही आपल्याकडून थोडीशी तयारीहि केली होती. आमचें आमंत्रण स्वीकारून स्वारी शाळा पाहण्यास आली. इंग्रजी शाळांतून अक्षरावर मेहनत घेत नाहींत असा तेव्हा तरी फार प्रवाद असे. परंतु मी स्वतः कॉपी मास्तर असून स्कॉटच्या बोर्डप्रमाणें शक्य तितकीं हुबेहुब अक्षरें तयार करवून मीं मुलांकडून कॉपिबुकें तयार करविलीं होतीं. बळवंतराव आले म्हणजे त्यांना तीं दाखवावींत व शाबासकी मिळवावी अशी माझी अपेक्षा होती. बळवंतराव कॉपीराउंडमध्यें आले व त्यांनीं मुलांच्या वह्या पाहिल्या. परंतु "अशीं अक्षरें मुलांना सहज भराभर काढतां आलीं तर उपयोग; नुसतीं कोरीव अक्षरें तयार करण्यांत काय मुद्दा आहे " असें ते म्हणाले व त्याबरोबर त्यांच्या टीकेची सार्थकता पटून मी चूप झालों.

(२) ९७ सालची शिक्षा भोगून बळवंतराव परत आले. त्यानंतर एके दिवशीं संध्याकाळीं सार्वजनिक सभेच्या तिसऱ्या मजल्यावर नित्याप्रमाणें सर्व मंडळी जमली होती. वेळ बरी आहे असें पाहून मंडळीनें बळवंतरावांभोंवतीं गराडा घातला. बळवंतराव सुटून येण्याच्या अगोदर मराठ्यांत गोखल्यांविषयीं अनुकूळ व जिन्सीवाल्यावर टीकात्मक असे लेख नुकतेच लिहून आले होते. त्यामुळें नरसोपंतांवर मंडळी गरमागरम होती; व म्हणून बळवंतराव आल्याबरोबर त्यांनीं बार भरण्यास सुरवात केली. मंडळींनीं आपलें म्हणणें पुढें टाकल्याबरोबर बळवंतराव म्हणाले कीं " नरसोपंतासारखीं तरी माणसें कोठें आहेत ? मला माणूस आणून द्या. व शिवाय गोखल्यांशीं आमचे आजपर्यंत जे प्रसंग झाले त्यामुळें एकमेकांच्या मनांत एकमेकांविषयीं ज्या अढी पडल्या आहेत त्या या त्रयस्थ असलेल्या नरसोपंताच्या मनांत कशा उतराव्या व त्यांनीं त्याप्रमाणें लिहावें अशी आम्ही अपेक्षा तरी कशी करावी ? " बळवंतरावांनीं असें उत्तर दिल्याबरोबर विषय पुढें न वाढतां तो समाप्त करण्याच्या पथाला शिष्यमंडळी लागली !

(३) बळवंतराव हे सुधारकांचे विरोधी व नरसोपंत हे त्यांचे पक्षपाती अशी स्थिति होती. हें सर्वांना माहीत होतें; व बळवंतराव तर ओळखून होतेच. तथापि केळकरांची सुजनता, काम करण्याची तडफ, निष्ठेने व कष्टपूर्वक कार्य करण्याची

हातोटी, आणि योग्यता हे अनन्यसामान्य गुण बळवतरावांनीं अगदीं पूर्णपणे जाणले असल्यामुळें व असा सहायक आपणांस किती जरूरीने जोडून ठेवणे प्राप्त आहे हे ते पूर्णपणे ओळखून असल्यामुळे नरसोपंतांच्या स्वतंत्र वृत्तीचा ते समावेश करून घेत असत. इंग्रजसरकाररूपी कर्दनकाळाशींहि बेधडक मुसंडी देणारा बळवंतराव आपल्या हाताखालीं असलेल्या नरसोपंताशीं नमते घेतानां पहाण्याचा एक प्रसंग मला आलेला आहे. सुधारकपत्राचा नवा अवतार बाहेर पडला. त्यावर नरसोपंतांनीं अनुकूळ अभिप्राय प्रसिद्धपणें दिल्याची कुणकुण हपीसात लागली. सकाळची वेळ होती. आम्ही सर्व हपीसांत होतो. बळवंतराव होते; पण नरसोपंत त्यावेळीं नव्हते. नरसोपंतांनीं दिलेल्या अभिप्रायाबद्दल आमचे उद्‌गार निघू लागले; बळवंतरावांनीं आपला विरुद्ध अभिप्राय स्पष्ट सांगितला. इतक्यांत नरसोपंताची स्वारी येऊन दाखल झाली. बळवंतरावांनीं अभिप्रायाची गोष्ट काढली; त्याबरोबर नरसोपंत चटकन सटक्यासरशीं व किंचित् बेपर्वाईनें म्हणाले कीं 'हे पहा माझें हें असे आहे; यांत बदल व्हावयाचा नाहीं; पहा तुम्हांला पटलें तर !' हे नरसोपंताचे शब्द बाहेर पडल्यावर बळवंतरावांनीं तो विषय तसाच अजीबात सोडून दिला. !

(४) सुरतेची कांग्रेस झाली. मंडळी घरोघर परत आली. मी कॉंग्रेसला गेलों नव्हतों. परंतु परत आलेल्या जहालमवाळ दोन्ही प्रकारच्या लोकांशीं माझा परिचय असल्यामुळें मी त्यांच्याशीं सुरतेस झालेल्या विलक्षण प्रकारासंबंधाने पृच्छा केली; तेव्हां माझ्या स्पष्ट नजरेला आलें कीं, दोन्ही पक्ष बळवंतरावांविषयीं परा कोटीला गेलेले होते. मवाळांच्या एका निष्कपट पुढाऱ्याने मला स्वच्छ सांगितले कीं, Balwantrao is the devil incarnate. सुरतेचा सत्यानाश, सर्व खेळखंडोबा त्यानें केला. हे त्या गृहस्थाचे जळजळीत उद्गार व त्याची एकंदरींत अत्यंत क्षुब्ध झालेली मनोवृत्ती पाहून बळवंतरावांनीं मवाळपक्षाशीं सुरतेच्या प्रसंगानें केवढें भयंकर हाडवैर संपादन केलें याची मला अटकळ आली. पुढें लगेच जहाल पक्षाचे एक प्रमुख गृहस्थ भेटले; तेहि सुरतेहून नुकतेच आले होते. त्यांच्यापाशींहि मी तसाच सवाल टाकला; त्याबरोबर ते गृहस्थ अत्यंत उत्साहाने व अभिमानाने एकदम म्हणाले कीं, "जन्माला यावे आणि बळवंतरावांची मूर्ति सुरतेच्या प्लाटफार्मवर पहावी ! तुमच्या नशीबीं तें पाहण्याचे नव्हते. पुनः असा अद्भुत योग कधीं यावयाचा नाहीं. ती धीरोदात्त मूर्ति व तें अढळ धैर्य फिरून पहावयास सांपडावयाचें नाहीं !" असोः वरील पराकाष्ठेचे परस्पर–विरोधी उद्गार ऐकून प्रतिस्पर्ध्यांना व स्वपक्षीय जनांना बळवंतराव कसकसे वाटत याची मला पूर्ण साक्ष पटली; व मथुरेच्या आखाड्यांत कृष्ण कोणास कसा वाटला व दिसला याचें वामनपंडिताने जें वर्णन केले आहे त्याची आठवण झाली !

(५) १८९६ सालच्या दुष्काळांत जिल्होजिल्ही हिंडून व दुष्काळग्रस्त लोकांची

दीनावस्था अवलोकन करुन ती दूर करण्याविषयीं फ्यामिन कोडाच्या कलमान्वयें, सरकारास भाग पाडण्यासाठीं माहिती मिळविण्याकरितां व व्याख्यानें देण्याकरितां, पुणें सार्वजनिक सभेनें बळवंतरावाच्या नेतृत्वाखालीं कांहीं प्रचारक पाठविले होते. त्यापैकीं एका जिल्ह्याकरितां एका बड्या पदवीधराची नेमणूक झाली होती. सदर गृहस्थ फार उत्साही होते व त्याच्यावर कसला तरी आरोप ठेवून सरकारी अधिकाऱ्यांनीं त्याच्यावर खटला भरला; तेव्हा त्याचा मोठा गवगवा झाला. पुढें ठराविक पद्धतीप्रमाणें खटला उभा राहिला. बळवंतराव मुद्दाम त्या खटल्याकरिता कोंकणात गेले; वकील दिला व खटला चालू झाला. तेव्हा जावजबान्या सुरू असतांना बळवंतरावांची किंचित् सचिंत मुद्रा झाली आहे असें त्या उमेदवार प्रचारकास वाटून तो त्यांना म्हणाला:—"बळवंतराव, तुम्ही काहीं घाबरू नका; कोर्टाच्या बाहेर दोन हजार सोडगे माझ्या रक्षणाकरितां उभे आहेत." बळवंतरावांनीं त्यावर काहींच उत्तर दिलें नाहीं. पुण्यास परत आल्यावर सहज बोलतांना ते माझ्याशीं म्हणाले कीं, 'हे जेव्हा त्या गृहस्थानें उद्गार काढले तेव्हा मला हसू आलें व मी मनात म्हटले कीं, प्रसंग पडला तर यातला एक तरी मनुष्य याला उपयोगी पडेल काय?' लोकसमूहाच्या आविर्भावाविषयीं त्यांची काय समजूत असे हें यावरून कदाचित् लक्षांत येईल.

(६) सत्याण्णव सालची शिक्षा भोगून बळवंतराव परत आले, पुढें काहीं दिवसांनीं त्या शिक्षेच्या वेळीं हायकोर्टाच्या आंतबाहेर झालेल्या प्रकाराविषयीं गोष्टी निघाल्या. शिक्षा होण्याच्या प्रसंगीं हायकोर्टाच्या आवाराभोंवतीं व बागातून हजारों लोक गोळा झाले होते. त्याच्याविषयीं बोलतांना ते म्हणाले "अहो, माझ्याबद्दल सहानुभूति दाखविणाऱ्या व दुःख प्रदर्शित करणाऱ्या या दहा हजार लोकांपैकीं, मला झालेली शिक्षा ऐकून एकाचें तरी डोकें फिरावयास पाहिजे होतें!" आमच्या समाजाची तमासगीरपणाची थिल्लर वृत्ति बळवंतरावाना पटली होती हें वरील उद्गारावरून माझ्या लक्षात आलें.

(७) हिंदुमुसलमानांचीं भांडणें होऊन पुण्यामध्ये गणपतिउत्सव सुरू झाले. त्यासंबंधानें साशंक वृत्तीनें एक गृहस्थ बळवंतरावांपाशीं बोलावयास लागले. त्यावर ते म्हणाले, "अहो, हे लोक आजपर्यंत डोल्यांपुढें नाचत होते आता गणपतीपुढें नाचावयास लागले; फरक काहीं नाहीं!"

(८) सन १८९२ सालीं वामन शिवराम आपटे वारले. त्यावर सुधारकांत व केसरींत दोन्ही पत्रात अग्रलेख आले. त्यात केसरींतला बळवंतरावांचा लेख अंतःकरणाच्या वृत्तींना हालवून सोडणारा असा ठरला. सुधारकातील गोपाळराव आगरकरांचा लेख त्यापुढें फिका पडला. त्यावर गोष्टी निघाल्या असतांना बळवंतराव म्हणाले, 'गोपाळराव चांगला लेख लिहिण्याकरितां म्हणून मुद्दाम बसले कीं, त्यांची अर्धांग अवस्था होते, हें मला माहीत आहे. हसून

खडकून प्रतिज्ञापूर्वक असा चांगला लेख त्यांना वठवितां येत नाहीं. त्यांची लेखणी एखाद्या विषयावर सहजपणे लिहितांना आपले सौष्ठव प्रगट करित्ये.'

(९) लोकमान्य बळवंतरावजी टिळक हे अत्यंत मिडस्त स्वभावाचे होते हें मला स्वानुभवावरून अनेक वेळीं माहीत झालेले आहे. सन १८९५ सालीं कै. महादेव गोविंद रानडे यांच्यासंबधानें बुधवारांतल्या आनंदोद्भव नाटक-गृहांत एक सभा भरविण्यांत आली होती. तींत बळवंतरावांचा अर्थाअर्थी कांहीं एक संबंध नव्हता. त्या सभेंत कै. रानडे यांच्यासंबधानें मी कांहीं आक्षेपकारक उद्गार काढले अशी ज्ञानप्रकाशमध्ये शका आली होती; व सभेच्या सर्व कृत्याच्या बुडाशीं बळवंतराव आहेत असा वृथा समज पिकविण्यात आला होता. ही समजूत सर्वथैव खोटी असल्याबद्दल मी ज्ञानप्रकाशांत पत्र लिहून कळविलें. तें पत्र वाचून बळवंतरावजीस बरें वाटलें. परतु आपल्या संबधींच्या गैरसमजाचा तुम्ही उघडपणें इनकार करा हें त्यांना मला अगोदर सांगवलें नाहीं.

(१०) न्यू प्रिपरेटरी क्लासेस म्हणून कै. सदाशिव श्रीधर करदीकर यांनीं काढलेली आमची एक शाळा होती; तिचा वार्षिक रिपोर्ट लिहून छापण्यापूर्वी तो मी बळवतरावजींस दाखविण्याकरिता घेऊन गेलों. त्या रिपोर्टांत, आम्ही केवळ्या देशाभिमानानें काम करीत आहो; परंतु आमची केवढी हलाखी आहे ह्याचें यथार्थ पण अति दीनवाणें चित्र मी रेखाटले होतें. बळवतरावजींस ही आमची पद्धति मुळींच पसंत पडली नाहीं. ते म्हणाले, 'लोकांपुढें नुसतें दैन्य भाकून कांहीं उपयोग होत नाहीं. आपल्या सहाय्यानें एक संस्था ऊर्जितावस्थेस खास येत आहे असा त्यांचा समज झाला तरच ते मदत करतात.' एवढें सांगून बळवंतरावजी स्वस्थ बसले नाहींत. त्यांनीं लगेच हातांत टाक घेऊन तो रिपोर्ट बहुतेक सगळा फिरून लिहिला व रात्रीचे एक वाजेपर्यंत त्यांना हें काम पुरवलें. असो. आपल्याकडे शुद्ध बुद्धीनें आलेल्याचें काम करण्यास कष्ट व वेळ खर्च करण्यास, नाहीं म्हणण्याचें त्यांचे जीवावर येत असे; व अशा रीतीनें त्यांनीं किती तरी वेळां जिकीरीनें त्रास सोसल्याचें मला माहीत आहे.

(११) बळवतरावांची सांपत्तिक स्थिति त्यांच्या लौकिक आयुष्याच्या उत्तरार्धांत त्यांच्या पराक्रमानें सुधारली. परंतु पूर्वार्धांत सरासरी तोंडमिळवणीच असे. अशा स्थितींत कै. देशभक्त भिकाजीपत हर्डीकर यांनीं बळवतरावांपाशीं गोष्ट काढली कीं, अहो बळवतराव, ते करंदीकर व लवाटे शाळा चालविण्याच्या पायीं अगदीं रडकुंडीला आले आहेत, त्यांना कांहीं मदत करा. भिकाजीपतांच्या या विनंतीस बळवतरावजी एका पायावर तयार होते; परतु त्यांच्यापाशीं तेव्हां तसला कांहीं आधार देण्यास साधन नव्हतें. त्यांनीं भिकाजीपतास सांगितलें कीं, एखाद्या श्रीमंताचा सरकारांत अर्ज वगैरे करण्याचें काम आणा म्हणजे त्याचे जे कांहीं सातआठशें रुपये येतील ते आपण करंदीकरांना देऊन टाकू. हा योग अनेक

बाह्य कारणांनीं पुढें घडून आला नाहीं; परंतु बळवंतरावजींनीं अंतःकरणापासून काढलेले हे उद्गार त्यांची उदारमनस्कता उघडपणें व्यक्त करतात हें सत्य आहे.

---

## श्रीपाद दत्तात्रेय उर्फ नानासाहेब नागपूरकर

[ एम्. ए. जी. यूनियन एजन्सी, पुणें. ]

( १ ) माझे काका ताई महाराज यांचे खटल्यांत प्रसिद्धीस आलेले ती० बळवंतराव नागपूरकर यांचें कोल्हापुरांत वास्तव्य असल्यानें ताई महाराज आमचे काकांचे घरीं अनेकवेळा मेजवानींस येत असत. त्यावेळीं मी लहान असून काकांचे घरीं जेवणाकरितां अनेकवेळीं मीहि जात असे. आम्हां सर्व मुलांबरोबर ताई महाराज खेळीमेळीनें व आनंदानें अनेक गोष्टी बोलत असत. एके प्रसंगीं मी त्यांना या लहानपणीं शोभेल अशा मोठ्या धिटाईनें प्रश्न विचारिला कीं, " महाराज ! आपण आमच्या टिळकांशीं कां हो भांडतां ! त्यांनीं तुमचें असें काय वांकडें केलें आहे. ? "

हा प्रश्न विचारतांच ताईमहाराजांच्या डोळ्यांत अश्रू आले व त्या गहिंवरून म्हणाल्या " बाळ, टिळकांनीं माझें वाकडें तर केलें नाहींच; पण वाड्यांतील सुतळीचा तोडा सुद्धां नेला नाहीं; पण एक गोष्ट मात्र आड आली आहे. टिळक अत्यंत हट्टी आहेत. व मी तर पडले अभिमानी ताई ! माझे पुढें येऊन जर ते एकदां उभे राहतील व मला असे म्हणतील कीं, ' काय महाराज, काय चालविलें आहे हे ! ' तर मी एकदम जाऊन त्यांचे पाय धरीन व ते सांगतील त्याला रुकार देईन. परंतु मी होऊन कांहीं प्राण गेला तरी माघार घेणार नाहीं. या कामीं तुझे काकाचा हट्ट मुळींच नाहीं. माझाच सर्व हट्ट आहे. व टिळकांचा हट्ट मी ही जिरविणारच !! "

( २ ) मंडालेहून परत आल्यानंतर एकदां कांहीं कामानिमित्त मला टिळकांनीं वाड्यांत बोलावून नेलें होतें. त्यावेळीं आम्ही दोघेजणच एका खोलींत कांहीं बाबीसंबंधीं बोलत बसलों होतों, ' आपण स्वराज्य मागणें हें काय नवीन काढलें आहे ' असें मी त्यांना म्हणतांच माझेकडे टक लावून व एकदम हासून ते म्हणाले कीं, ' मला स्वराज्य मागणें ' हा नगारा इतका फुगवावयाचा व ताणावयाचा आहे कीं, तो फुटून जावा म्हणजे सर्व लोकांचा आपोआप भ्रम होईल. व नंतर स्वराज्य ' मागणें ' हा शब्द जाऊन त्या जागीं स्वराज्य ' मिळविणें ' हा शब्द तयार होईल ! याच वेळीं दुसरा एक प्रश्न मी विचारला

तो असा कीं, ब्राह्मणेतर लोकांस वाटतें कीं, स्वराज्याची धडपड ही ब्राह्मण लोकांनीं कौंसिलांत जाऊन आपल्यावर पगडा बसवावा म्हणून चालविलेली आहे व याच उद्देशानें केसरीनेंहि ती हातीं धरली आहे. टिळक म्हणाले ' आहे, वरवर पाहतांना हें खरेंहि वाटण्यासारखें आहे. व त्याच करितां मी माझे परिचयांतील ब्राह्मण लोकांना सांगत असतों कीं, आपण आतां पाठीमागें व्हा व सुशिक्षित धरंदाज परंतु राष्ट्रीय पक्षाचीं तत्वें मान्य असणाऱ्या अन्यजातीय लोकांना हातीं धरून त्यांचे कडून कौन्सिलें काबीज करा व त्यांचे पाठीवर राहून कौन्सिलें स्वराज्याच्या चळवळीस उपयोगी पडतील असें करा व तसें न झाल्यास त्याचा परिणाम असा होईल कीं, अनुभवाने अन्यजातीय पुढाऱ्यांनाहि कौन्सिलचा पुढे वीट येईल व तेहि हळू हळू 'तर मग आतां पुढे काय?' असा विचार करू लागतील. करितां कांहीं दिवस सर्वांनीं मिळून कौन्सिलें काबीज करणें हा मार्ग प्रस्थापित करण्याखेरीज गत्यतर नाहीं.'

( ३ ) एकदां दिवेलावणीच्या सुमारास टिळकाचे वाड्यावरून मी व यूनिअन एजन्सिचे चालक आनंतराव मोडक मिळून मोटारींतून जात असतां लक्षांत आले कीं, रस्त्यावरील माडींतील खिडकींत टिळक उभे आहेत. अशा स्थितींत त्यांचे वाड्यावरून जातांना त्यांचें दर्शन न घेतां पुढे जाणें अयोग्य असा विचार मनांत येतांच मोटार उभी केली व आम्ही माडीवर गेलों. टिळकांनीं स्वतः काडी ओढून दिवा लाविला; व ते आपल्या आराम खुर्चीवर बसले. आम्हांसहि बसा म्हणून सांगितले. परंतु आम्ही तसेच उभे राहिलों. 'कां? जाण्याची गडबड आहे काय ? ' असे म्हणतांच आम्ही दोघेहि त्यांचे पाया पडलो व समोरील बाकावर बसलों. एकदोन मिनिटे इकडचे तिकडचे प्रश्न झाले व ते एकदम म्हणाले कीं, 'बरें झालें; वेळेवर आलात.' नतर जरा कावरी मुद्रा करून मला म्हणाले "कायरे बटाट्याची कीड काढलीस तशी एकदां आपल्या मायदेशाची कीड काढूं नयेस काय?" आम्ही स्वस्थच बसलो. पुढे ते म्हणाले कीं, "मला फार आशा होती कीं कोणी तरी एखादां मुलगा मला धिटाईनें असे म्हणेल कीं, तुम्ही आतां फार म्हातारे झालां आहां, आतां बाजूला सरा व मीच आतां तुमची मनीषा पुरी करितों. माझे डोकीवर पाय देऊन वर चढणारा कोणी मुलगा मी माझे हयातींत पाहीन असें मला आतां वाटत नाहीं. मी आतां फारतर आणखी तीन वर्षें वांचेन; त्यांपैकीं दोन वर्षें हिंडून काम करीन व एक वर्ष अथरुणावरून काम करीन " इतक्यांत दुसरे लोक आंत आले. बोलणें थांबलें यांचा फायदा घेऊन खिन्न अंतःकरणानें त्यांचें पुनः दर्शन घेऊन आम्ही बाहेर पडलो.

---

## सीताराम त्र्यंबक चितळे

[ सरंद, पोस्ट मारळन, जि० रत्नागिरी. ]

(१) १९१९ सालची गोष्ट. माझे वडील पुण्यास आले व नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें गायकवाडवाड्यांत लोकमान्यांचें दर्शन घेण्याकरिता गेले. त्याचे बरोबर मीहि गेलों होतों. आम्हीं त्यांच्या नेहमीच्या खोलींत गेलों तेव्हां लोकमान्य आरामखुर्चीवर वाचीत पडले होते. आम्हीं आल्याची चाहूल लागतांच टिळकांनीं पुस्तक बाजूला केलें व माझे वडलांकडे पाहून एकदम म्हणतात 'आपण पर्शरामचे ना ! आपण दोन वर्षांपूर्वी आला होता ! तिकडे एकदर ठाकठीक आहे ना ! माझी पर्शरामला येण्याची मनीषा फार आहे. ईश्वर काय करील तें खरें' वगैरे. थोड्या वेळानें त्यांना वंदन करून व विशेष परिचय नसता साधारण मनुष्य त्यांचे ध्यानांत कसा राहातो याचें आश्चर्य करीत आम्ही बिर्‍हाडीं आलों. लोकमान्यांची परशुरामक्षेत्रीं येण्याची फार उत्कट इच्छा होती परंतु आमचे दुर्दैवामुळें विधिघटना निराळीच ठरली.

(२) लोकमान्य शिष्टाईकरितां इंग्लंडला जाण्यासाठीं प्रथमतः निघाले त्या वेळीं मुंबई मुक्कामीं ठिकठिकाणीं पानसुपाऱ्या झाल्या. त्याचप्रमाणें ठाकबाचे वाडींतील घसवाडीच्या नाक्यावर हरिभाऊंच्या रामाचे मंदिरांतहि झाली. गर्दी बरीच झाल्यामुळें आम्हा विद्यार्थ्यांस मंदिरांत प्रवेश मिळेना. तेव्हा त्यांचे दर्शन घेण्याचे हेतूनें आम्हीं चिंचोळ्या गल्लींत उभ्या असलेल्या त्यांच्या मोटारी जवळ कसेबसे उभे राहिलो. लोकमान्य मोटारींत बसण्याकरितां आले तेव्हां त्यांचे बरोबर मंडळीचा घोळकाहि आला व त्यामुळें आधींच मोटारमुळें अडलेल्या त्या बोळांत भारीच खेचाखेच झाली. व आम्हास चेंगरून जाण्याची भीति वाटूं लागली. हें पाहून लोकमान्य मोटारींत बसतां बसतां म्हणतात 'बाळानों ! तुम्ही मोटारचे बाजूवर उभे रहा' व आम्हाला घुटमळतांना पाहून पुढे म्हणतात 'मी तुमच्या प्रमाणेंच साधा मनुष्य आहें. घुटमळण्याचे कारण नाहीं.' नंतर आम्ही त्यांचे सांगीप्रमाणें मोटारचे बाजूवर उभे राहून गर्दीतून सुटका करून घेतली.

(३) लोकमान्यांना १८९८ सालीं शिक्षा झाली त्या वेळीं आम्ही चिपळूण येथील मराठी शाळेंत शिकत होतों. नित्याप्रमाणें शाळेंत जात असतांना शाळेच्या आवाराबाहेर कांहीं तरुणांनीं आम्हांस अडविले व आज शाळेंत जाऊं नका असें परोपरीनें सांगितलें व आमचा जाण्याचा आग्रह पाहून ते म्हणाले 'आपले टिळक तुरुंगांत पडले याचे तुम्हांस कांहींच कां वाटत नाहीं ?' आपले टिळकांना शिक्षा झाली हें ऐकून मात्र आम्हीं शाळेंत न जातां घरीं गेलों. दुसरे दिवशीं मास्तर विचारतात, 'कायरे काल कां आला नाहीं ?' 'मग ! आमच्या टिळकांना शिक्षा

झाली म्हणून !' त्यावर मास्तर एवढेंच म्हणाले, 'मुलांनो असे बोलूं नये.' मास्तर असें कां म्हणाले त्याचा उलगडा आतां होतो.

(४) पुणे येथे लोकमान्य इंग्लंडाहून शिष्टाई करून परत आले. त्या वेळीं त्यांस रौप्यकरंडकांतून मानपत्र अर्पण करण्याकरितां मंडईत सभा जमली होती. मानपत्रास विरोध करणारे १५-२० इसमहि त्यांच्याकरितां मुद्दाम तयार केलेल्या खुराड्यांत उभे होते. मानपत्राविरुद्ध बोलण्याकरितां त्यांतील एक विद्यार्थ्या आंतील मुलगा प्लॅटफार्मवर उभा राहिला. त्याबरोबर मंडळींत गलबला सुरु झाला. गडबड बद करण्याविषयीं अधिकारयुक्त वाणीनें लोकमान्यांनीं सांगताक्षणींच गडबड बद झाली. तो मुलगा चाचपडत म्हणाला 'टिळक आमचेबरोबर भोजन करण्यास तयार असतील तर मानपत्रास आमचा विरोध नाहीं.' हें ऐकून लोकमान्य हसून म्हणतात 'हे मानपत्र जेवणाकरिता कांहीं मला मिळत नाहीं व जेवणाकरितांच ते असेल तर त्याची मला जरूरहि नाहीं. तें माझ्या इंग्लडातील कामगिरीबद्दल आहे' वगैरे. यावरून त्यांच्या समयसूचकपणाचें व तडफेचें आश्चर्य वाटलें.

---

## दामोदर विश्वनाथ गोखले

[ बी. ए. एलूएलू बी; चिटणीस टिळक स्वराज्य संघ; संपादक 'मराठा' पुणें ]

(१) लोकमान्यांवरील जामिनकीचा खटला चालू असतां रविवारच्या 'मराठ्यां' स या खटल्याचा सविस्तर रिपोर्ट गेला पाहिजे असें लोकमान्यांनीं मला बजावलें होतें. शुक्रवार संध्याकाळपर्यंतचा रिपोर्ट तयार होता; पण तो त्यांना पहाण्यास वेळ झाला नाहीं. शनिवारीं खटला होता व मराठ्याच्या संपादकवर्गांपैकीं मी व माझे मित्र रा. भट असे दोघेहि सायंकाळपर्यंत कोर्टांत गुंतलों होतों. अर्थात् सायंकाळनंतर रिपोर्टाचा मजकूर लिहिला गेला, व रात्रीं तो कंपोज झाला. "प्रुफे तयार झाल्याबरोबर मला उठवा, मी सर्व प्रुफे पाहणार आहें. मी पाहिल्याशिवाय घालूं नका" असें लोकमान्यांनीं निजण्यापूर्वीं सांगितलें. अर्थात् पहाटे ३ वाजतां त्यांना उठवावें लागलें. व मौज ही कीं, तास दीडतास खटल्याची इतकी दगदग व चित्तव्यग्रता असतांनासुद्धां त्यांनीं अत्यंत एकाग्रचित्तानें सर्व प्रुफे तपासलीं. लोकमान्यांचा दमदारपणा, उत्साह, व कर्तव्यजागृति ६१ व्या वर्षीं किती होती याचें हें एक लहानसें उदाहरण आहे. पण याहीपेक्षां त्यांनीं यापुढें तत्संबंधी जे उद्गार काढले ते अधिक महत्त्वाचे आहेत.

त्यांच्यासंबंधीं प्रतिपक्षानें केलेल्या अनुदार टीकेचा मजकूर रिपोर्टांत होता व तो त्यांच्याच ' मराठ्यां ' त प्रसिद्ध होत होता. त्याला अनुलक्षून ते म्हणाले " वर्तमानपत्रकर्ता ही जागाच अशी आहे कीं, त्या जागेचें काम करीत असताना आपण खाजगी स्वत्व विसरलेंच पाहिजे. " रिपोर्टांचा मजकूर तपासतांना आरोपी टिळक ही भूमिका जाऊन संपादक टिळक एवढेंच नातें होतें. लोकमताला वळण देणाऱ्या संपादकावर स्वतःच्या निस्पृहतेनें व आचारानें प्रत्यक्ष उदाहरण घालून देण्याचीहि जबाबदारी असते.

( २ ) महायुद्धाच्या वेळीं लोकमान्यांनीं प्रथम विद्यार्थ्यांना सैन्यात दाखल होण्याबद्दल उपदेश केला होता. त्यांच्या सांगण्यावरुन पुष्कळ विद्यार्थ्यांनीं आपलीं नांवें त्यांच्याकडे रजिस्टर केलीं. पुढें त्यानीं सैन्यांतील अधिकाऱ्याच्या जागांसंबंधीं सुचविलेल्या अटी सरकारास मान्य न झाल्यामुळें व त्या बाबतींत सरकारचें धोरण सर्वस्वी विरोधी व राष्ट्रास अपमानकारक असें वाटल्यावरुन लोकमान्यांनीं सैन्यभरतीविरुद्ध मोहीम सुरू केली. त्याचाहि परिणाम पुष्कळ झाला. एक गृहस्थ या सर्व सभांना हजर असत. एकदां पुण्यास अशीच एक मोठी सभा झाल्यानतर त्या सभेंत लोकमान्यांच्या शब्दास मिळणारा मान पाहून त्या गृहस्थांनीं घरीं नेऊन लोकमान्यास एक विलक्षण प्रश्न केला. त्यांनीं विचारलें कीं, ' आपला शब्द अशा रीतीनें लोक झेलीत असताना आपण त्याच्या बळावर सरकारविरोधी अशी दुसरी बलवत्तर चळवळ कां करीत नाहीं ! ' यावर लोकमान्यांनीं सांगितलें कीं, ' प्रस्तुत मी चळवळ करीत आहें याचा खरा अर्थ व व्याप्ती लक्षांत घेतलीत तर असें आपण विचारणार नाहीं. मी आज लोकजागृति करीत आहें, मृतवत् झालेल्या देहांत संजीवन घालीत आहें. हजारों लोक व्याख्यानास येतात, टाळ्या वाजवितात, शब्द मानतात म्हणून राष्ट्र पुढच्या कठीण वर मार्गास तयार झालें आहे असें कोणी समजेल तर तो फसेल. पुढील पायरी अधिक महत्त्वाची आहे. लोकांची तयारी मोजण्याचें माप सभेंतील गर्दी व टाळ्यांचा कडकडाट हें नव्हे; हा फक्त उज्वल श्रीगणेशा आहे. ज्या दिवशीं स्वराज्याशिवाय जगणें शक्य नाहीं ही भावना मनांत मुरेल व कृतींत उतरेल तो दिवस खरा. तो दिवस उजाडल्याची माझी खात्री झाली तर मग मी पुढील मार्ग अवश्य सागेन. तोंपर्यंत हा अग्नी चेतवणें एवढेंच महत्त्वाचें काम करणें जरूर आहे.' लोकमान्यांचें धोरण व लोकमत मोजण्याची पद्धति ठरलेली होती.

( ३ ) या वरील आठवणींवरुन आणखी एक सदर गोष्टीसंबंधीची आठवण नमूद करावीशी वाटते. आपल्यामध्यें एक अहंमन्य, चढेल व अतिशिष्ट लोकांचा वर्ग आहे. या वर्गांतील गृहस्थ आपल्यास ज्ञानात बृहस्पती समजतात इतकेंच नव्हे तर मुत्सद्देगिरींत व व्यावहारिक राजकारणांतहि आपली

योग्यता अतीशय उच्च कोटीची आहे असेंहि ते समजतात. या वर्गापैकीं एकानें महायुद्ध संपल्यावर लोकमान्यांवर असा आक्षेप घेतला होता कीं, '१९१५ सालीं लोकमान्यांनीं बंडाचें निशाण उभारावयास पाहिजे होतें. पण तें त्यांनीं उभारलें नाहीं ही मोठी चूक झाली.' अशाच एका मुद्यावर लोकमान्य एकवेळ बोलत असतांना पुढील अर्थाचें मत त्यांनीं प्रगट केलें होतें. 'बंड करण्याइतकी राष्ट्राची तयारी झाली आहे असें मला वाटत नाहीं. पण जरी त्यापासून नुकसान न होतां राष्ट्राचा किंचित् तरी फायदा होईल असें मला वाटलें असतें तर मी खचित त्या मार्गाचा तात्विक दृष्ट्या तरी विचार केला असता. तयारी असती तर खचित कोणीना कोणी तरी दंड थोपटून उभाहि राहिला असता. पण वस्तुस्थिति तशी नव्हती. त्या मार्गानें अधिक नुकसान त्या वेळीं तरी झालें असतें. १८५७ सालच्या विस्कळित प्रयत्नाचा परिणाम निःशस्त्र होण्यांत झाला हें विसरतां कामा नये. वेल्हिनसन साहेबांनीं लिहिलेल्या पुस्तकांत मी त्यांच्या अशाच शंकाप्रश्नाला दिलेलें उत्तर नमूद आहे व तेंच मत माझें कायम आहे. माझ्यापेक्षां अधिक पराक्रमी माणसांनी धडा घालून दिला असता तरी मला बरेंच वाटलें असते." वेल्हिनसन साहेबांनीं अशाच जातीचा प्रश्न विचारला होता. त्याला लोकमान्यांनीं दिलेलें उत्तर प्रसिद्ध आहे. "बेकीनें बिघडलेले, बेशिस्तीने बेमान झालेले व निःशस्त्र केले गेलेले असे सर्व लोक असतांना सध्याच्या परिस्थितींत मला पूर्ण स्वातंत्र्यासाठीं कराव्या लागणाऱ्या झगड्यास प्रारंभ करणे शक्य दिसत नाहीं. तिन्ही दोष नाहींसे करण्याचा प्रयत्न करून ते नाहींसे झाले म्हणजे पुढील विचार करणे योग्य आहे. व तो ती वेळ आली तर मी जरूर करीनहि." या अर्थाचे तें उत्तर आहे.

(४) लोकमान्यांना साधे, सुबक व यथायोग्य शब्द वापरण्याची केवढी हातोटि साधली होती हें सर्वांस माहीत आहे. चांगला पूर्ण अर्थवाहक असा शब्द मिळाला म्हणजे त्यांना आनंद होत असे. वऱ्हाडच्या दौऱ्याच्या वेळीं, म्हणजे १९१८ सालीं, अकोट येथे त्यांचे 'स्वराज्या'वर व्याख्यान चाललें होतें. हिंदुस्थानची प्रचलित राज्यपद्धति कोणत्या प्रकारची आहे असे सांगतां सांगतां बादशहा, पार्लमेंट, हिंदुस्थानसरकार व हा कारभार हाकणारा गोरा नोकरवर्ग यांचे परस्पर संबंध त्यांनीं विचार करून सांगितले. व अन्वयव्यतिरेकानें या पद्धतीस नांव देतांना ही राजेशाही, बादशाही अगर झारशाही नव्हे तर ही 'नोकरशाही' आहे असे त्यांनीं म्हटलें. 'नोकरशाही' हा शब्द सुचला त्यावेळीं त्यांना अतिशय आनंद झाला. व व्याख्यान संपल्याबरोबर प्रथम रा. कृ. प्र. खाडीलकर यांना व मला बोलावणें पाठवून गमतीनें आज आपल्यास नवा शब्द सांपडल्याबद्दल स्वतःचें त्यांनीं अभिनंदन केलें. 'ब्युराक्रसी' या इंग्रजी शब्दाला प्रतिशब्द आपण किती तरी दिवस शोधीत होतों व या शब्दाचा मराठींत अर्थ

सांगतांना लांबलचक शब्दयोजना कशी करावी लागे याचेंहि त्यांनीं विनोदी वर्णन दिलें. हा शब्द हल्लीं चोहोंकडे रूढ झाला आहे. मराठींतून तो इतर भाषांतहि गेला आहे.

( ५ ) नाशीकचे रा. प्रधान यांनीं त्यांच्या 'भारतसेवक' मासिकांत कै. आगरकरांचें चरित्र लोकमान्यांनीं लिहावें अशा अर्थाचा प्रसिद्ध झालेला मजकूर टांचणी लावून लोकमान्यांकडे पाठविला होता. त्यावेळीं लोकमान्य चिरोल खट-ल्याच्या गडबडींत होते. रा. प्रधानांच्या सूचनेसबधानें ते म्हणाले कीं, "खरोखरच आगरकराचें चरित्र मीच उत्तम लिहू शकेन, इतरास माझ्यासारखें लिहितां येणार नाहीं. कारण मला त्यांचे अतरग, त्याचे उत्कट गुण जितके माहीत होते इतके इतरांस असणे शक्य नाहीं. राजकारणाच्या प्रस्तुतच्या धादलींतून मला थोडी सवड मिळाली तर मी जरूर लिहीनहि." तो विषय मागे पडून चरित्रा-संबंधींच सर्वसाधारण गोष्टी सुरू झाल्या. व इंग्रजी चरित्रग्रंथ, मराठी चरित्र-ग्रंथ यांची तुलना होऊन बॉसवेलपासून मोर्लेपर्यंतच्या चरित्रकाराचीहि झडती झाली. शेवटी ते उद्वेगाने म्हणाले "चरित्रें कोणाचीं लिहावीं ? चरित्रें राष्ट्राला स्वातंत्र्य देणाऱ्यांचीं लिहावीं. श्रीशिवाजी महाराज, वाशिंग्टन, गॅरिबाल्डी, मॅझिनी यासारख्यांचीं लिहावीं. हिंदुस्थानला जे स्वातंत्र्य देतील त्याचीं चरित्रें हींच खरीं चरित्रें. नाहींतर सूर्यापुढें लामणदिव्यासारखीं इतरांची चरित्रें !"

( ६ ) लोकमान्याचीं मतें व विचार दर्शविणाऱ्या अशा अनेक आठवणी वरील पद्धतीच्या देतां येतील. त्यांचीं राजकीय मते सर्वप्रसिद्ध असल्यानें त्यावर यापेक्षां अधिक प्रकाश पाडण्याची जरूरी नाहीं. चरित्रग्रंथांचें तें काम आहे. लक्षांत ठेवण्यासारख्या इतर बाबतींतील एक दोन गोष्टी नमूद करतों.

१९१६ सालीं बेळगांवास ना. दादासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखालीं राष्ट्रीय पक्षातर्फे प्रांतिक परिषद भरली होती. नेमस्तपक्ष यांत सामील झालेला नव्हता. महात्मा गांधी सदर परिषदेकरिता बेळगावास आले होते. तथापि या परिषदेचे प्रतिनिधी ( डेलीगेट ) होण्याचें त्यांनीं नाकारलें होते. ना. बेळवी यांनीं लोकमान्याच्या कानावर ही गोष्ट घालताच त्यांनीं बेळवींना व मला त्यांच्याकडे जावयास सांगितलें व निरोप सांगितला कीं, 'ज्या अर्थी आलाच आहां त्या अर्थी डेलीगेट झाल्यास अधिक बरें, आपलेहि विचार परिषदेस ऐकावयास मिळतील.' लोकमान्यांचा निरोप सांगतांच गांधींनीं प्रतिनिधीच्या फॉर्मवर सही करून फॉर्म मजजवळ दिला.

( ७ ) महायुद्धाच्या वेळीं व नतर लोकमान्य टिळक व महात्मा गांधी यांच्यामध्यें दोनतीन वाद सुरू होते. एक युद्धांत सैन्यभरतीच्या कामीं मदत करावी कीं नाहीं या मुद्यावर होता. दुसरा वाद 'जशास तसें' वागावें कीं दुष्टांचा प्रतिकार प्रेमानें करावा या मुद्यावर होता. व तिसरा शेवटीं शेवटीं

अनात्याचारी असहकारितेसंबंधीं होता. पहिल्या वादाची एक आठवण देतों. सरदारगृहांत महात्मा गांधी व लोकमान्य टिळक यांचा बराच वाद सैन्यभरतीच्या बाबतींत झाला. लोकमान्यांचें म्हणणें कीं, 'राष्ट्रीय दृष्ट्या आम्हास राजकीय अधिकार, निदान सैन्यांतील कमिशन्ड ऑफिसरांच्या जागा एवढ्या जरी दिल्या तरी मदत करावी. वरील अधिकार देण्याचें जर नाकबूल केलें तर सैन्यभरतीस मदत करू नये.' महात्मा गांधी म्हणत कीं 'मदत करावी व सरकार या जागा तरी निदान खास देईल.' 'सरकार जागा देण्यास तयार असेल तर मी खास ५००० सैन्य महाराष्ट्रांत उभे करतो. आपण वरील प्रकारचें आश्वासन सरकारकडून आणवावे' असें लोकमान्य म्हणाले. 'सैन्य इतके जमणे शक्य नाहीं. सरकार आश्वासन मात्र खास देईल' असे महात्माजी म्हणाले. त्यावरोबर लोकमान्यांनीं त्यांना सांगितले कीं "ठीक आहे. आपण आश्वासन मिळवा. मी सैन्य देतों. सैन्य उभारण शक्य झालें नाहीं तर प्रत्येक शिपायाकरितां सरकार १० रु. खर्च करतें त्याप्रमाणे मी ५००० चे ५०००० रु. आपल्याजवळ जामीनकी ठेवतों. आतां तो हक्क मिळवून द्या." महात्मा गांधी उठून गेले व लोकमान्यांनीं त्याच दिवशीं सायकाळीं ५०००० रुपयांची डिपाझिट रिसीट त्यांच्याकडे पाठवून दिली. सरकारने असें आश्वासन देण्याचे नाकबूल केलें ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे!

(८) दुसऱ्या व तिसऱ्या मुद्यावरील वाद जवळ जवळ सुप्रसिद्ध आहेत. 'जशास तसें' अगर 'ये यथा मां प्रपद्यन्ते' हा न्याय लोकमान्यांचा व 'अक्रोधेन जयेत् क्रोध' हा न्याय महात्माजींचा. गीतारहस्यांत त्याचा उहापोह केलेलाच आहे. लोकमान्यांनीं आपलीं मतें स्पष्ट व खडखडीत मांडण्याचा परिणाम 'टाईम्स' वगैरे ॲंग्लो इंडियन पत्रकारांनीं "डिप्लोमसी कीं डुप्लिमसी" असले वाष्कळ लेख लिहून महात्माजींची बाजू उचलून धरून लोकमान्यांविरुद्ध जोराचा हल्ला केला. अनत्याचारी असहकारितेच्या मुद्यावरहि थोडाबहुत वाद झालाच. असहकारितेचें तत्त्व लोकमान्यांना मान्य होते. पण त्याला जें स्वरूप महात्माजींनीं देण्याचें योजलें होतें तें त्यांना सर्वस्वी अमान्य होतें. त्यांचा स्वतःचा असा एक असहकारितेचा मार्ग होताच. पुढे तो मार्ग अमलांत आणण्यास दुर्दैवानें संधीच आली नाहीं. अनत्याचाराची महात्माजींनीं केलेली ओढाताण व त्यांचें तद्विषयक तत्त्वज्ञान मात्र त्यांना मान्य नव्हते. महात्माजी म्हणतात त्याप्रमाणें राष्ट्र अनत्याचारी बनणें व्यवहारांत शक्य नाहीं असेंच त्यांना वाटत होते.

(९) दासबाबूंचा व लोकमान्यांचा गुरुशिष्यासारखा संबंध होता. १९१७ सालीं कलकत्ता कॉंग्रेसच्या वेळीं कर्टिस साहेबांच्या 'प्राव्हिन्शियल ॲटॉनमी'च्या जाळ्यांत दासबाबू सांपडले होते. लोकमान्यांना हे पसत नव्हते. कलकत्त्यास गेल्यानंतर दासबाबू व लोकमान्य यांचा पुष्कळ वाद झाला. व शेवटीं दासबाबूंनीं सांगितलें कीं, "माझी खात्री पटली नाहीं तरी मी तुम्ही

सांगाल त्याप्रमाणें मानण्याचें कबूल करतों. कारण आपण आमचे पुढारी आहांत व बऱ्यावाईटाची जबाबदारी घेऊन गाडा पुढें ढकलण्याची धमक आपल्यांत आहे." दासबाबूंचा लोकमान्यांविषयींचा आदर वरील प्रकारचा श्रेष्ट दर्जाचा होता.

(१०) १९२० सालीं भरलेल्या कलकत्त्याच्या जादा राष्ट्रीय सभेचें अध्यक्ष-स्थान लोकमान्यांनीं स्वीकारावें अशी दासबाबू व रवींद्रनाथ टागोर यांची फार इच्छा होती. त्यांनीं आग्रहहि खूप केला. परंतु लोकमान्यांनीं ती गोष्ट नाका-रली. त्यांनीं लिहिले कीं, "कलकत्त्यास राष्ट्रीय पक्ष व महात्मा गांधींचा पक्ष यामध्ये जो वाद होणार आहे त्या वादाच्या वेळीं मी अध्यक्ष होऊन तोंड बंद करून अडकून बसणें बरें नाहीं. दोन्ही पक्षामध्यें एकोपा घडवून आणण्यास मी मोकळा असलेलाच बरा." त्यांनींच लाला लजपतराय यांचें नांव सुचविलें. दुर्दैवानें लोकमान्य कलकत्त्याच्या जादा सभेच्या अगोदरच गेले! व त्यांच्या बरो-बर एकोपाहि गेला!!

(११) तरुण पिढींतील कर्त्या व होतकरू मंडळींनीं राष्ट्रकार्यांत पुढाकार घ्यावा अशी लोकमान्यांची फार इच्छा असे. त्यांचें लक्ष अशीं माणसें संग्रहित करण्याकडे अर्थात् होतेंच. प्रत्येक वर्षी युनिव्हर्सिटीचे रिझल्ट झाले कीं, बी. ए., एम्. ए., बी. एस्. सी. वगैरे परिक्षांत पहिल्या वर्गांत कोण आले, बक्षिसें कोणास मिळालीं याची ते चौकशी करीत. व त्या मुलांना बोलावून भेटून त्यांच्या पुढील कार्यक्रमाची ते विचारपूस करीत. ही त्यांची चांचणी पुष्कळ वर्षे चालली होती. गांवांतील सुखवस्तु व सुशिक्षित तरुणांनीं राष्ट्रकार्यांत लक्ष घालावें याकरितां ते फार प्रयत्न करीत. १९१५ सालानंतर सार्वजनिक सभेचें पुनरु-ज्जीवन त्यांनीं केले. त्यावेळीं पुण्यांतील तरुण, सुखवस्तु व सुशिक्षित अशा पुष्कळ गृहस्थांना त्यांनीं बोलावलें होतें. व त्यानीं सभेची सेक्रेटरीशिप पत्करावी म्हणून खटपट केली होती. तरुण पिढीशीं निकट संबंध ही एक त्यांच्या राष्ट्र-कार्याच्या धोरणापैकीं एक बाब होतीच व त्याच्या अभूतपूर्व यशाला त्याचा काय उपयोग झाला, हें सांगणें नकोच.

(१२) लोकमान्य मंडालेहून परत आल्यानंतर लवकरच कांहीं महिन्यांनीं युरो-पांतील महायुद्ध सुरू झालें. वास्तविक त्यांच्या परत येण्याचा व महायुद्ध जर्म-नीनें पुकारण्याचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नव्हता व असणेंहि शक्य नव्हतें. पण त्यावेळीं महायुद्ध सुरू झाल्यानंतर एक गमतीचा लोकप्रवाद मात्र रूढ होता. तो अज्ञानजन्य होता, हें सांगणें नको. 'जर्मनीचा बादशाहा कैसर व लोक-मान्यांचा केसरी हे एकच असून गायकवाडवाड्यातील केसरी कचेरीच्या गच्ची-वर एका मध्यरात्रीं जर्मन विमान उतरलें व जर्मन अधिकाऱ्यांनीं लोकमान्यांचा सल्ला घेऊन नंतर युद्ध पुकारले' अशी ही नवलकथा आहे. वरील कथेंत सत्यांश

नाहीं. पण महायुद्धाचे बाबतींत राष्ट्राचे पुढारी या दृष्टीने लोकमान्यांचा कांहीं संबंध असलाच पाहिजे, अशी लोकांची अपेक्षा होती, एवढे मात्र सिद्ध होतें.

( १३ ) महायुद्ध व हिंदी राष्ट्रपुढाऱ्यांचें कर्तव्य या विषयासंबंधी लोकमान्य अनेक वेळां चर्चा करीत असत. स्वराज्य मिळविण्याच्या उद्योगांत आपलें तनमनधन व सर्व आयुष्य वेचणाऱ्या हिंदी पुढाऱ्यांना युरोपांत स्फोट झालेल्या येवढ्या ज्वालामुखीची कल्पना नसावी, व तो ज्वालामुखी धडाडूं लागल्यावर त्याचा फायदा हिंदी राष्ट्रानें सुसंगतपणें घेण्यास तयार नसणें याचें त्यांना राहून राहून वाईट वाटे. स्वराज्य संपादन करणाऱ्या राजकारणी हिंदी मुत्सद्यांना कल्पनाहि नसावी, ही गोष्ट त्यांना नालायकीची व नामुष्कीची वाटे. सदर बाबतींची सांगोपांग चर्चा करतांना ते दुःखित अंतःकरणाने व आवेशाने म्हणाले कीं, " मी जर सहा वर्षें मंडालेच्या तुरुंगांत डांबलो गेलों नसतों तर, या महायुद्धाची आगाऊ सूचना मिळून त्याचा जितका फायदा घेता आला असतां तितका शक्य त्या बाजूंनीं घेतला असता. असल्या अभूतपूर्व व क्वचित प्रसंगीं घडून येणाऱ्या उत्पातांचा उपयोग करून न घेणाऱ्यांची मुत्सद्दीगिरी जिवंत नव्हे व त्यांचें राजकारणहि जिवंत नव्हे. आतां महायुद्ध सुरू झालेंच आहे व आपली कांहीं तयारी नसली तरी याचाहि आपण शक्य तितका उपयोग करून घेतला पाहिजे." लोकमान्य महायुद्धापूर्वी हिंदुस्थानांत असते व मंडालेस अडकून राहिले नसते तर, त्यांनीं कोणते डाव टाकले असते व राजकारणाची काय रचना केली असती हें आज सांगणें शक्य नाहीं. एक गोष्ट निश्चित आहे, ती ही कीं, या देशाच्या स्वातंत्र्याच्या दृष्टीनें बराच मार्ग गांठिला जाईल अशी त्यांनीं योजना केली असती ! !

वरील दृष्टीनेच सांगोपांग स्वपर बलाबलाची उत्तम छाननी करून युद्धारंभानंतरच्या गणपती उत्सवांत 'ब्रिटिश साम्राज्याच्या संकट काळी हिंदी राष्ट्राने सर्वतोपरि त्यांना मदत केली पाहिजे,' अशा अर्थाचे त्यांनीं उद्गार काढले, हे सर्वश्रुत आहे. आपल्या राष्ट्राची महायुद्धाचा फायदा घेण्याच्या दृष्टीने तयारी किती आहे, याचा अंदाज त्यांनीं निरनिराळ्या मार्गांनीं निश्चित काढिला होता, हें मला माहित असल्यामुळें नमुद करणें जरूर आहे. परिस्थितीच्या दृष्टीनें, धोरणी मुत्सद्दी या दृष्टीनें त्यांना वरील दिशाच घेणें जरूर दिसले. याबद्दल त्यांच्यावर बराच हल्लाहि, वरील धोरण मान्य नसणारांनीं किंबहुना वरील धोरणाच्या उलट धोरण असावे असें म्हणणारांनीं केला होता. प्रत्यक्ष वाटाघाटींत उलटसुलट दोन्ही धोरणें दृष्टीपुढें ठेवून कल्पनाचित्रापेक्षां प्रत्यक्ष वस्तुस्थिती पाहूनच हें धोरण ठरविलें होतें, इतकें सांगितलें म्हणजे वरील धोरणाचा उलगडा नीट होईल. यापुढें त्यांनीं एकवार सैन्यांत सामील व्हावें अशीहि खटपट केली व त्याचा प्रत्यक्ष फायदा मिळत नाहीं असें दिसल्यावर सामील होऊं नका असेंहि

प्रतिपादण्यास कमी केलें नाहीं. या एकाच गोष्टीवरून त्यांचा तारतम्यभाव लक्षांत येईल.

(१४) उक्ती व कृति यांत सामान्य माणसाच्या बाबतींत मोठाच फरक असता, हा रोजचाच अनुभव आहे. असामान्य माणसांची अर्थात् त्यापेक्षां उलट स्थिति असते. लोकमान्यांनीं बाल्पणापासून भगवद्गीतेचा अभ्यास केला, व दोन तपाच्या मननानंतर गीतारहस्यासारखा सर्वोत्तम ग्रंथ लिहून कर्मयोगाचा उपदेश सर्वांना केला. प्रवाहपतित कर्म सुखदुःखाचा लवलेश वाटू न देतां फलाशा-रहित चित्तवृत्तीनें करीत राहणें यावर कर्मयोगाची भदार आहे. लोकमान्यांच्या वर्तनांत वरील कर्मयोगाचें तत्त्व पूर्णपणें बिंबलें होतें. एकाच प्रसंगाची आठवण नमूद केल्यानें त्यावर पूर्ण प्रकाश पडेल असें वाटतें. चिरोल केस चालविण्याकरितां दुसऱ्या खेपेस लोकमान्य मुंबईहून विलायतेकडे रवाना झाले. जाण्याच्या आदले दिवशीं सरदारगृहाच्या गच्चीवर मागील कामकाजाची व्यवस्था कशी करावयाची हें ते रा. बाबासाहेब विद्वांस व रा. केळकर यांना सांगत होते. इतर कामें संपल्यानंतर चिरोल केस जिंकल्यास पैशाची काय व्यवस्था करावयाची याची त्यांनीं योजना केली. केस खास जिंकणार असें त्यावेळीं तेथें असलेल्या दुसऱ्या एका गृहस्थानें सांगितलें. पण त्या यशाच्या आनंदाच्या भावनेची छटा त्यांच्या चेहऱ्यावर दिसली नाहीं. उलटपक्षीं केस हरल्यास पुढें काय करावयाचें याचीहि तजवीज त्यांनीं शांतपणें केली. सदर तजवीजींत जवळ असणारी तुटपुंजी शिल्लक खर्चीं घातल्यावर वाडाहि विकण्याची अनुज्ञा त्यांनीं दिली! अशा रीतीनें आपलें सर्वस्व खर्चीं घालण्याचा विचार चालू असतांनाहि त्यांच्या चेहऱ्यावर चिंता अगर दुःख यापैकीं कोणत्याहि विकाराची छटा दिसत नव्हती. "सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ" यातील रहस्य त्यांच्या सर्व कृतींत उतरलें होतें.

---

# गणेशभट रामभट आपटे

[वेदशास्त्रसंपन्न, पुणें.]

शके १८२७ जेष्ठ (सन १९०५ जून) मासीं पुण्यास वे. शा. स. राम दीक्षित बापट यांचा अत्यग्निस्तोम झाला. हिरण्यकेशियाकडे हा यज्ञ असल्यामुळे ऐष्टिक व पाशुक हौत्र याजुष होणे हे योग्यच होतें. परतु पुणें येथें हिरण्यकेशी व आश्वलायन यांचेमध्ये उपग्रंथ वगैरेमुळे पूर्वींच तेढ असल्या-कारणानें यज्ञ समारभ पुणें येथें होणार असें ठरल्यावर यज्ञांत होणारे हौत्र अशास्त्र आहे अशाबद्दलचा मजकूर आश्वलायनाकडून अगोदर एक आठवडा 'केसरीं'त छापला गेला. सदर मजकूर केसरींत आल्यामुळे लोकमान्यांची भेट घेणें आम्हांस भाग पडले. याकरितां त्याजकडे जाऊन आम्हीं मडळींनीं त्यांना विचारिलें कीं, 'केसरीं'त याजुष हौत्र अशास्त्र आहे असा मजकूर आला आहे तो कोणी दिला ? त्यावर त्यांनीं सांगितले कीं, 'तो आश्वलायनांनीं आणून दिलेला आहे. तथापि ह्या सबधानें दुसरी बाजू म्हणून हिरण्यकेशियांचे शास्त्रीय रीत्या काय म्हणणे आहे ते सप्रमाण दाखविल्यास त्यासहि केसरींत अवश्य स्थान मिळेल.' म्हणून दुसरे दिवशीं कै. वे. रामभटजी खरे, कै. वे. शा. रामभटजी आखवे, वे. शा. अण्णंभटजी अभ्यंकर, वे. शा. गोपाळभटजी गोखले वगैरे श्रौति मंडळी लोकमान्यांकडे जाऊन त्यांच्यांशीं चर्चा करून याजुषहौत्राबद्दल ब्राह्मण, मत्र, सूत्र, विधि वगैरे प्रमाणे त्यांस दाखविलीं. लोकमान्यानीं आश्वलायन वृत्ति स्वतः काढून पाहिली; परंतु चमत्कार असा कीं, लोकमान्याचा श्रौत हा कांहीं विषय नसतां त्यांनीं आपल्या अपूर्व ग्रहणशक्तीने सुमारे १०।१५ मिनिटांत त्याची सर्व माहिती पूर्णपणे करून घेऊन त्याबद्दलचा ग्रंथाधारें अनुकूल असा आपला अभिप्राय केसरींत प्रसिद्ध केला; ह्यामुळे येथील आश्वलायन मड-ळींनीं त्यांचे विरुद्ध दोनतीन हस्तपत्रके काढून लोकमान्यांनीं दिलेला अभिप्राय व निर्णय हा चूक आहे वगैरे प्रसिद्ध केले. त्यालाहि यथायोग्य उत्तर तारीख १३ जून सन १९०५ चें केसरींत दिले गेलें. त्यावर त्यांना खासगी रीतीने विचा-रतां लोकमान्य म्हणाले, "ज्यांचे जवळ अशास्त्रतेबद्दल सप्रमाण व यथायोग्य शास्त्रीय पुरावा असतो ते अशा तऱ्हेने कांहीं तरी अद्वातद्वा लिहून हस्तपत्रकें काढीत नसतात; ज्या अर्थीं अशा तऱ्हेचीं हस्तपत्रके निघालीं आहेत त्या अर्थीं त्या मडळींजवळ पाहिजे तसा शास्त्रीय पुरावा कांहींहि नाहीं हे आतां निःसंशय आहे. अगदीं साध्या डावपेंचांतल्या गोष्टी तुमच्यासारख्यांच्या लक्षांत कशा येतील !"

## शिवराम महादेव परांजपे

[ एम्. ए., माजी प्रोफेसर महाराष्ट्र कॉलेज, संपादक 'काळ' व 'स्वराज्य,' महाराष्ट्रांतील असहयोगी पक्षाचे सुप्रसिद्ध पुढारी, अध्यक्ष पुणें सार्वजनिक सभा, पुणें. ]

( १ ) पुण्यांत फर्ग्युसन कॉलेज पहिल्यानें स्थापन झालें, तेव्हां त्याच्या पहिल्या वर्षी प्रीव्हियस परीक्षेचा एकच क्लास प्रथम सुरूं करण्यांत आला होता. व हा क्लास जेथें पूर्वी न्यू इंग्लिश स्कूल असे, त्याच शनवार पेठेंतील गद्रयांच्या वाड्यामध्यें पुढल्या थोरल्या दिवाणखान्यांत बसविण्यांत येत असे. व शाळेंतच त्या वेळीं हें कॉलेज भरत असल्यामुळें व मागच्या वर्षी मॅट्रिक्युलेशन मध्यें पास झालेली मुलें नवीन वर्षी या प्रीव्हियसच्या वर्गात येऊन बसल्यामुळें प्रीव्हियसचा वर्ग म्हणजे सातव्या इयत्तेच्या पुढची एक आठवी इयत्ता, असाच पुष्कळ लोकांच्या मनावर परिणाम झालेला होता. पुण्यांतील डेक्कन कॉलेज हें त्या वेळीं फार चांगल्या स्थितीमध्यें होतें. व त्या मानाने पाहिलें असतां नुकतेंच नवीन निघालेलें फर्ग्युसन कॉलेज हें डेक्कन कॉलेजची बरोबरी करूं शकेल, हें शक्य नव्हतें. व त्यामुळेंहि फर्ग्युसन कॉलेजचा पहिल्या वर्षीचा प्रीव्हियसचा वर्ग म्हणजे सातव्या इयत्तेच्या पुढचा आठव्या इयत्तेचा न्यू इंग्लिश स्कूलमधील आणखी एक नवीन वर्ग, असें पुष्कळ लोकांकडून म्हणण्यात येत असे. त्या वेळच्या त्या म्हणण्यांत जर कोणाचा कांहीं गर्भित अर्थ असला, तर तो गर्भित अर्थ फर्ग्युसन कॉलेजनें आपल्या पुढील कर्तबगारीनें आणि भरभराटीनें कसा निराधार ठरविला आहे, हें हल्लीं सर्वांना प्रत्यक्ष दिसतच आहे. पण या पुढल्या भावी उन्नतीचीं चिन्हें सूक्ष्म रीतीनें पहाणारांना अगदीं पहिल्या वर्षापासूनहि दिसत होतीं, असें म्हणावयाला हरकत नाहीं. कोणत्याहि कॉलेजचा नांवलौकिक हा मुख्यत्वेंकरून त्या कॉलेजांतील शिक्षकांच्या शिक्षणनैपुण्यावर अवलंबून असतो, हें उघड आहे. आणि या दृष्टीनें पाहतां फर्ग्युसन कॉलेजचे त्या सुरवातीच्या वेळचे प्रोफेसर इतके उत्कृष्ट होते कीं, निदान विद्यार्थ्यांना काळजीपूर्वक रीतीनें शिकविण्याच्या बाबतींत तरी त्यांची बरोबरी त्या वेळच्या दुसऱ्या कोणत्याहि कॉलेजांतील प्रोफेसर करूं शकले नसते. प्रो. वामन शिवराम आपटे, प्रो. केळकर, प्रो. आगरकर, वगैरे ते त्या वेळचे सर्वच प्रोफेसर फार नामांकित होते. परंतु त्या सर्वांमध्येंहि लोकमान्य टिळक यांची शिकविण्याची पद्धत फारच वाखाणण्यासारखी होती. लोकमान्य हे जो विषय हातीं घेत, त्यांत ते निष्णात होत, अशी त्यांची बुद्धि होती, यांत संशय नाहीं. त्या वेळीं न्यू इंग्लिश स्कूलच्या वरच्या वर्गांतून ते गणिताचाच विषय शिकवीत असत, त्यावरून

कॉलेजमध्येंहि ते बहुतेक गणिताचेच प्रोफेसर होतील, असा पुष्कळांचा अंदाज होता. व त्या अंदाजाप्रमाणें गणित शिकविण्याचे काम तर त्यांच्याकडे आलेंच. पण गणिताशिवाय संस्कृताचाही कांहीं भाग त्यांच्याकडे देण्यांत आला होता. प्रो. वामन शिवराम आपटे यांची संस्कृत विषय शिकविण्याची आणि विद्यार्थी तयार करण्याची हातोटी फारच वर्णनीय होती. त्यांनीं आपल्याकडे मालविकाग्निमित्र नाटक शिकविण्याचें काम घेतलें होतें. व भर्तृहरीचीं नीतिशतक आणि वैराग्य शतक हीं जीं दोन शतकें त्या वर्षीच्या प्रीव्हियसच्या परीक्षेला नेमलेलीं होतीं, तीं शिकविण्याचें काम लोकमान्यांकडे होतें. आणि तो विषयहि विद्यार्थ्यांना समाधान वाटेल अशा उत्कृष्ट रीतीनें त्यांच्याकडून शिकविला जात असे. गणितांतल्याप्रमाणेंच संस्कृतांतीलहि ही त्यांची पारंगतता पाहून लोकमान्यांच्या सव्यसाचीपणाबद्दल विद्यार्थ्यांच्या मनामध्ये अतिशय कौतुक आणि आदर उत्पन्न झाल्यावांचून केव्हांही राहिला नाहीं.

( २ ) कै. गोपाळराव दाते हे पूर्वीच्या नटवर्गांपैकीं एक प्रसिद्ध नट होते. त्यांच्या नाटकांचे प्रयोग पाहिलेले कित्येक प्रेक्षक अद्यापिहि ह्यात असतील. आपल्या आयुष्याच्या उत्तर वयामध्ये त्यांनीं रंगभूमीवर काम करण्याचें पुढे पुढें सोडून दिलें होतें. तरी पण मधून मधून आपलीं सुप्रसिद्ध जुनीं कामें आपण चांगल्या लोकांपुढें करून दाखवावीं, अशी त्यांना केव्हां तरी स्वाभाविकपणेंच लहर येत असे. अशा एके वेळीं आपला एक लहानसा प्रयोग पाहण्याकरितां त्यांनीं लोकमान्यांना पाचारण केलें. नाटकाचा धंदा सोडून दिल्यानंतर नाटकांतील कोणतीहि भूमिका घेण्याला जें नाटकी सामानसुमान लागावयाचें, तें अर्थांत्च गोपाळराव दाते यांच्यापाशीं नसे. म्हणून कोणती तरी एखादी नाटक कंपनी आलेली असली, म्हणजे त्या संधीचा फायदा घेऊन गोपाळराव दाते हे त्या कंपनीचे कपडेलत्ते, दागदागिने, वगैरेंच्या साहाय्यानें आपल्या भूमिकेचा प्रयोग करीत असत. नारायणराव पेशव्यांच्या वधांतील सुमेरसिंगाची भूमिका ही गोपाळराव दाते यांची प्रधान भूमिका होती. सुमेरसिंगाच्या कामाबद्दल गोपाळराव दाते यांनीं महाराष्ट्रामध्ये फारच मोठा नांवलौकिक मिळविला होता; किंबहुना पेशवाईच्या इतिहासांत त्या खऱ्या सुमेरसिंगानें जितकें वाईट नांव कमाविलें होतें, तितकाच चांगला लौकिक कै. गोपाळराव दाते यांनीं मराठी रंगभूमीच्या इतिहासांत मिळविला होता ! त्या वेळी गणेश पेठेतील आर्यभूषण थिएटर हें चांगल्या स्थितीमध्ये होतें. व तेथे या सुमारास किर्लोस्कर कंपनीचा मुक्काम होता. त्यांचें सामानसुमान घेऊन गोपाळरावांनीं सुमेरसिंगाचें काम करण्याचें योजिलें होतें. व सुमेरसिंगाच्या कामाची साथ करण्याकरितां दुसऱ्या एक दोन किरकोळ पात्रांचीहि त्यांनीं मदत घेतली होती. शिवाय हा प्रयोग रंगभूमीवर व्हावयाचा नसून थिएटरमधील आंतल्या एका लहानशा दिवाणखान्यांतच व्हाव-

याचा होता. ' लोकमान्य टिळक हे रात्रीं ९-९॥ वाजण्याचे सुमाराला आपल्या बरोबरच्या कांहीं मडळींसह पूर्वीच्या निमंत्रणाप्रमाणें येऊन दाखल झाले. परंतु नारायणरावाच्या वधासारखें क्रूर कृत्य करण्याची सुमेरसिंगाची अजून तयारी झालेली नव्हती. अजून भिवयांतून शेंदूर भरावयाचा होता. अजून सुमेरसिंगाला मोठमोठ्या मिशा आणि कल्ले आपल्या तोंडावर बांधावयाचे होते. व परदेशी थाटाचा फेटाहि डोक्यावर बांधला जाण्याला अजून अवकाश होता. पण कांहीं वेळानें आपल्या अन्नदात्या राजाला मारण्याची सुमेरसिंगाची तयारी झाली! आणि आपल्या म्यानांतून तरवार उपसीत तो क्रोधानें खवळलेला सुमेरसिंग पुढें आला! पूर्वीच्या काळच्या नाटक मडळ्यांमधून आणि प्रेक्षक मडळ्यांमधून हें नारायणरावाच्या वधाचें नाटक फार लोकप्रिय झालेलें होतें. याचे प्रयोग वरच्या-वर होत असत;' ते लोकाना आवडत असत; आणि सुमेरसिंगाचें काम चांगलें करण्याबद्दल गोपाळरावांना कित्येक मदील आणि सलकडीं बक्षिसहि मिळालेलीं होतीं! असलीं नाटकें पूर्वीं आपल्या समाजामध्यें इतकीं लोकप्रिय कशीं झालेलीं असावींत, हें एक मोठें गूढ आहे. याच नाटकमंडळ्या पूर्वीं झांशीच्या राणीचें नाटक करीत' असत. पण ह्या नाटकाला इंग्लिश अधिकाऱ्यांनीं मनाई केल्यामुळें पुढें तें नाटक बंद पडलें. परंतु आपल्या नारायणरावाच्या वधाचें नाटक करण्याला आणि पहाण्याला आपल्या चाणाक्ष समाजानें कधींहि कटाळा केला नाहीं! कै. गोपाळराव दाते हे सुमेरसिंगाचे काम खरोखरच फार चांगल्या रीतीनें करीत असत. पण त्या चागल्या कामाला चांगले म्हणावयाचें किंवा वाईट म्हणावयाचें हाच काय तो अवघड प्रश्न आहे. कै. शंकरराव पाटकर हेहि गेल्या पिढींतील एक सुप्रसिद्ध अभिनयकुशल असे नट होते. ते अथेल्लोच्या नाटकांतील आयागोचें काम फारच वाखाणण्यासारखें करीत असत, तें इतकें कीं, हें काम करणारा मनुष्य हा नेहमींचाच खरोखर अतिशय दुष्ट मनुष्य असला पाहिजे, इतका त्यांच्या अभिनयकुशलतेमुळें प्रेक्षकाच्या मनावर परिणाम घडत असे. आणि कै. गोपाळराव दाते याचीहि अशीच स्थिति होती. पण असलीं उदाहरणें इतक्या बेमालूमपणानें लोकांच्यापुढें मांडल्यापासून राजकीय दृष्ट्या फायदा आहे किंवा तोटा आहे, हा मुख्य महत्त्वाचा प्रश्न आहे. हा प्रयोग जेव्हां गोपाळरावांनीं लोकमान्यांच्या पुढे करून दाखविला, तेव्हांच्या त्या सुमेरसिंगाचें उतार वय झालेलें होते. त्यांच्या तोंडांतील द्विजपक्तीपैकीं कांहीं मडळी पतन पावलेली असल्यामुळें सुमेरसिंगाच्या ऐन क्रोधाच्या आवेशांतील कांहीं जोडाक्षरें आणि कांहीं 'र' ऐन प्रसगीं विश्वासघात करीत! तरी पण या सुमेरसिंगानें एकदां बेल भंडार उचलला, म्हणजे मग निमकहरामपणाचें कोणतेंहि काम करण्याला हा मागें येणार नाहीं, असा ग्रह हा उतार वयांतील सुमेरसिंगहि आपल्या प्रेक्षकांच्या मनावर उत्पन्न करण्याला समर्थ होत असे. असो. हा लहानसा प्रयोग

पाहून कै. गोपाळराव दाते यांच्या या नकलेबद्दल सर्वांना समाधान वाटलें. पण या नकलेवरून ज्या अस्सल प्रसंगाची आठवण होणें अपरिहार्य होतें, तो प्रसंग आपल्या इतिहासांत घडून आल्याबद्दल कोणालाहि वाईट वाटल्यावांचून राहिले नाहीं. गोपाळराव दाते यांनीं इतकी तसदी घेतल्याबद्दल लोकमान्यांनीं त्यांचे आभार मानले. आणि नंतर कांहीं वेळानें कै. ह. भ. प. श्रीपतबुवा भिंगारकर यांच्या आमंत्रणावरून त्यांच्या कीर्तनाला जाण्याकरितां मंडळी उठली.

(३) कै. ह. भ. प. श्रीपतबुवा भिंगारकर यांचा आणि लोकमान्यांचा फार स्नेह होता. दोघेहि विद्याव्यासंगी असल्यामुळे या समानशीलांचें अशा प्रकारचें सख्य जमलेले असावे, हें साहजिकच होतें. पूर्वीं ज्ञानेश्वर एक, किंवा दोन, किंवा तीन, अशा प्रकारचा श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या संख्येविषयीं एक वाद उपस्थित झालेला होता, हें त्या वेळच्या वाचकांच्या लक्षांत असेलच. त्या बाबतीमध्यें श्रीपतबुवा भिंगारकर यांनीं कांहीं साधार आणि सप्रमाण लेख लिहून प्रसिद्ध केले होते. त्यामुळे ह.भ.प. श्रीपतबुवा भिंगारकर हे एक केवळ जुने हरिदासच नसून ते नवीन पद्धतीच्या विचारसरणीचेही एक विद्वान गृहस्थ आहेत, असा त्यांच्याबद्दल लोकमान्यांचा ग्रह झालेला असला, तर तो अन्यथा होता, असें नाहीं. अशा अनेक प्रकारच्या कारणांनीं उत्पन्न झालेल्या परिचयातिशयामुळें श्री. श्रीपतबुवा भिंगारकर यांनीं लोकमान्यांना आपल्या कथेला येण्याविषयीं मोठ्या प्रेमानें प्रार्थना केली होती. श्रीपतबुवा भिंगारकर यांचें त्या दिवशीचे, अथवा त्या रात्रीचें, कीर्तन श्रीकृष्णजन्माच्या निमित्तानें गणेश पेठेंतील डुल्या मारुतीच्या देवळामध्यें होतें. आणि गणेश पेठेतील आर्यभूषण थिएटरपासून डुल्या मारुतीचें देऊळ जवळच असल्यामुळें श्रीमंत नारायणराव पेशवे यांचा वध पाहून झाल्यानंतर भगवान् श्रीकृष्ण परमात्मा यांचा जन्मोत्सव ऐकण्याकरितां मंडळी मोठ्या उत्सुकतेनें तिकडे निघाली. लोकमान्य डुल्या मारुतीच्या देवळांत आले, तो कथेला आधींच सुरवात झालेली होती. डुल्या मारुतीचें देऊळ किती मोठें आहे, अथवा ते खरोखरच किती लहान आहे, हें पुष्कळांनीं पाहिलेलें असेलच. आणि श्रीपतबुवा भिंगारकर यांचे सुरस कीर्तन असलें, म्हणजे तें ऐकण्याकरितां श्रोत्यांची किती गर्दी लोटत असे, हेंहि त्या वेळच्या श्रोत्यांना माहीत असेलच. लोकमान्य देवळांत गेले, तों देऊळ अगदीं चिकार भरून गेलेले होतें आणि तेथें पाऊल ठेवण्यालाहि जागा नव्हती. पण त्यांतूनच वाट करीत करीत लोकमान्यांना बुवांच्या जवळ नेण्यांत आलें. व ते उभे राहिले होते तेथे जवळच त्यांना बसविण्यांत आले. कीर्तन आधींच रंगांत आलेलें होतें. पण लोकमान्य आल्यामुळें कीर्तनाला जास्तच रंग चढला. श्रीकृष्णजन्माच्यासारखा पवित्र प्रसंग, भिंगारकरांच्यासारखे प्रेमळ कीर्तनकार आणि लोकमान्यांच्यासारखे मर्मज्ञ श्रोते, अशा प्रकारच्या या त्रिवेणी संगमामध्ये त्या वेळचे

बाकीचे श्रोते सहज पुनीत होऊन गेले, तर त्यांत नवल तें काय ! बुवांची भजनाची पद्धत फारच प्रेमळ होती. आणि भजनानें श्रोत्यांचीं मनें आधीं बहुतेक तल्लीन करून सोडल्यानंतर मग कथाभागानें एकाग्रतेचा अवशिष्ट अंश परिपूर्णतेस न्यावयाचा, अशी भजनी संप्रदायांतील इतर कीर्तनकारांप्रमाणें भिंगारकर बुवांचीहि पद्धति होती. त्या पद्धतीप्रमाणें "जय जय रामकृष्ण हरी !" अशा प्रकारच्या भजनाला सुरवात झाली. बुवांच्या पाठीमागें कमींत कमी निदान शंभर तरी टाळकऱ्यांची रांग उभी राहिलेली होती. भजन अतिशय भरात येऊं लागलें, तेव्हां इतके सगळे लोक त्यांच्या पद्धतीप्रमाणें आनंदानें डुलूं लागले आणि नाचूं लागले. त्या वेळीं सर्व देऊळच हालूं लागल्यासारखा भास होऊं लागला ! इतकी सर्वांच्या मनामध्यें एकतानतेची प्रेरणा होऊन गेली होती ! बुवांच्या कपाळाला बुक्का लावण्यात आलेला होता व त्यांच्या गळ्यात भिंगाच्या आरशांचा मोठा भव्य कमालखानी हार घालण्यांत आला होता. भजनाच्या आवाजात पेटीचा सूर मिळून गेला होता. व त्यातच एकानें अलगुजें वाजविण्याला सुरवात केली. त्यामुळें पेटीची आणि अलगुजाची साथ फारच चांगली जमून स्वरमाधुर्याची कमाल होऊं लागली. श्रीकृष्णजन्म झाला त्या आनंदाच्या निमित्तानें देवळांत जिकडे तिकडे गुलाल उधळण्यात आलेला होता. तो तेथील वातावरणामध्ये पसरून तेथील दिव्यांच्या प्रकाशामध्यें त्या लाल रंगाच्या गुलालानें अपूर्व शोभा उत्पन्न केली होती. व तें सर्व देऊळ त्यानें कोंदाटून गेलें होतें. अशांतच जन्म झाल्यानंतर त्या विश्वव्यापक भगवान श्रीकृष्णाला एका लहानशा पाळण्यात घालण्याचा सोहळा बुवांनीं सुरू केला ! व देवाला त्यात निजविल्यावर ते स्वतः अतिशय प्रेमळ स्वरानें पाळणा म्हणूं लागले. त्याबरोबर त्या देवळाच्या माडीवर बसलेल्या शेकडो स्त्रियांनींहि तें पाळण्याचें गाणें बुवांच्या बरोबर म्हणण्याला सुरवात केली ! तेव्हां तर करुण आणि वात्सल्य हे रस पराकाष्ठेला जाऊन पोहोंचले. असा तो अपूर्व प्रसंग पाहून लोकमान्यांच्या मनावर फारच विलक्षण परिणाम झाला !

कर्मधर्मसंयोगानें त्या गोकुळ अष्टमीच्या दिवशीं गुरुवार हा वार आलेला होता. 'माघो शुद्ध दशमी पाहोनी गुरुवार । केला अंगीकार तुका म्हणे ॥' या अभंगात सांगितल्याप्रमाणें गुरुवार हा तुकाराम महाराजांवर झालेल्या अनुग्रहाचा वार असल्यामुळें भजनी संप्रदायाच्या मंडळींमध्यें या गुरुवारच्या दिवसाला एक प्रकारचें महत्त्व असतें. म्हणून तो गुरुवारचा दिवस आहे हें लक्षात आणून बुवांनीं त्यासंबधानेंही थोडेंसे निरूपण केलें. तुकाराम महाराजांनीं पुष्कळ दिवसपर्यंत कोणालाही गुरु म्हणून मानलेलें नव्हतें. परंतु अदृश्य रीतीनें कोणातरी सत्पुरुषाची त्यांच्यावर कृपा होती. त्या त्यांच्या गुरूनें तुकाराम महाराजांना एकदां स्वप्नामध्य भेट दिली, आपलें बाबाजी असें नांव आहे असें सांगितलें,

व केशव चैतन्य, राघव चैतन्य, ही आपल्या गुरुपरंपरेची मालिका सांगितली, वगैरे हकीकतीसबधींचा तुकाराम महाराजाचा अभंग सुप्रसिद्धच आहे. या अभंगामध्यें बरींच स्थळें दुर्बोध, गूढ आणि सकृद् दर्शनीं विसगत दिसणारीं अशी आहेत. त्यापैकींच

'भोजना मागती तूप पावशेर। पडिला विसर स्वप्नामार्जी ॥'

हा एक चरण आहे. या चरणातील गूढार्थाचें निरूपण करतांना बुवांनीं जे समाधान सांगितलें तें फारच समर्पक होतें. भोजनाकरिता पावशेर तूप मागितलें याचा अर्थ काय? आणि ते पावशेरच तूप का मागितलें? असा पूर्वपक्ष करून त्यावर बुवानीं

पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि।

या पुरुषसूक्तातील ऋचेच्या अनुरोधानें वरील अभंगाच्या चरणांतील गूढार्थ फारच चांगल्या रीतीनें विशद करून दाखविला. 'पावशेर' यांतील 'पाव' हा पुरुषसूक्तातील वर दिलेल्या ऋचेतील 'पाद' याचा निदर्शक आहे. पुरुषसूक्तांतील तेथील कल्पना अशी आहे कीं, त्या आदिपुरुषाचे तीन-पाद दिव्य लोकामध्ये असून फक्त बाकी राहिलेल्या चवथ्या एका पादापासून ही जीवात्मा आदिकरून सृष्टि आलेली आहे. विभु आणि विश्वव्यापी अशा परब्रह्माचे अशा रीतीनें अंश कल्पिणें हें शक्य नाहीं, असा पुरुषसूक्तांतील याच ऋचेला अनुलक्षून या ऋचेतील विधानाच्या विरुद्ध श्रीशंकराचार्यांनीं ब्रह्मसूत्रावरील आपल्या भाष्यामध्यें एक सिद्धात बांधिलेला आहे. व अद्वैत वेदान्ताच्या दृष्टीनें तोच सिद्धांत बरोबरहि आहे. तरी पण 'पादोऽस्य विश्वा भूतानि' हेंही एक अपौरुषेय वेदवचन आहे; तेव्हां त्या वेदवचनाप्रमाणे 'पाद' (मराठींत 'पाव') या शब्दाने जीवात्मा उपलक्षित होतो. आणि म्हणून जो तुकाराम महाराजांचा संसारी जीवात्मा त्यांच्यापासून पावशेर तुपाच्या मिषानें मागून घेऊन तो बाकीच्या त्रिपाद भागामध्यें मिसळून द्यावयाचा आणि अशा रीतीने जीवब्रह्मांचें आत्मैक्य घडवून आणावयाचें, हा तुकाराम महाराजांच्या स्वप्नांतील गुरूंच्या वचनांतील गूढार्थ असला पाहिजे, अशी बुवानीं मोठ्या मार्मिकपणानें अभंगांतील चरणाची संगति लावून दाखविली. हा अर्थ खरोखर फार मनोवेधक होता. व तो ऐकून लोकमान्याना फारच संतोष वाटला.

वर सांगितलेल्या (२) व (३) या दोन्हीहि प्रसगीं लोकमान्यांनीं नाट्यकला, कीर्तनसंस्था, वेदान्तशास्त्र, वगैरे विषयांच्यासंबंधानें नतरच्या खासगी संभाषणामध्यें जे उद्गार काढले. ते खरोखरच फार मार्मिकपणाचे आणि गुणज्ञतेचे द्योतक होते. व वास्तविक पहाता ते जसेच्या तसेच येथें द्यावयाला पाहिजे होते. परंतु लोकमान्यांच्या आठवणी लिहिणाऱ्या बाकीच्या कित्येक लेखकांनीं अनेक वर्षांच्या

पूर्वीचीं त्यांचीं कित्येक लांब लांब भाषणेंहि अगदीं तंतोतंत लोकमान्यांच्याच शब्दांत दोन्ही बाजूंच्या अवतरण चिन्हांमध्यें बसवून ज्याप्रमाणें अक्षरशः दिलेलीं आहेत, त्याप्रमाणें वरील प्रसंगींचे उद्गार देण्याला प्रस्तुत लेखकाची स्मरणशक्ति तितकी चांगली नसल्यामुळें व त्याच्यापाशीं एखाद्या शार्टहँड रिपोर्टरचेंहि साह्य नसल्यामुळें त्यानें सामान्य शब्दांमध्यें त्याच्या उद्गारांचें वर्णन करण्याचा प्रयत्न केला आहे, याबद्दल वाचक क्षमा करतील अशी आशा आहे.

(४) बऱ्याच वर्षांच्यापूर्वीं एकदां लोणावळें येथील मंडळींच्या आग्रहावरून मुंबईस जातां जातां लोणावळ्यास व्याख्यानाकरितां सकाळचे कांहीं तासपर्यंत लोकमान्य उतरले होते. सकाळचें व्याख्यान होऊन दुपारच्या गाडीनें ते मुंबईस गेले. व्याख्यान सकाळीं आठनऊ वाजण्याच्या सुमारास व्हावयाचें होतें. ती वेळ अर्थात्‌च ऊन येण्याची होती. आणि लोकमान्यांच्या व्याख्यानाला लोकांची अतिशय गर्दी व्हावयाची, हेंही ठरलेलेंच होतें. तेव्हां इतक्या लोकांना उन्हाचा त्रास होऊं नये आणि लोकमान्यांचा उपदेश तर लोकांना एकाग्रतेनें ऐकावयाला मिळावा, यासाठीं कांहीं तरी तजवीज करणें जरूर होतें. आयत्या वेळीं इतक्या लोकांना पुरेल इतका मोठा मंडप उभारणें शक्य नव्हतें. तेव्हां तेथील व्यवस्थापक मंडळींनीं एक नवीनच योजना केली. लोणावळ्याच्या स्टेशनपासून बाजारच्या बाजूला जवळच एक लहानशी उथवस्थाची जागा असून तेथें उंच उंच वाढलेल्या जुनाट वृक्षांची दाट छाया नेहमीं असते. तेथील वृक्षांनीं लोकमान्यांच्या व्याख्यानाकरितां आधींच आणि आयताच एक मंडप घालून ठेविलेला आहे असें पाहून लोणावळ्याच्या लोकांनीं तीच जागा मुक्रर केली. ती वनभूमिका फारच रमणीय होती. आयताच सुंदर मंडप, आयतीच प्लॅटफॉर्मकरितां उंच जागा आणि श्रोतृसमुदायाला ऐसपैस बसण्याकरितां सभोंवार पसरलेला आयताच निसर्गरमणीय भूप्रदेश, आणि त्या ठिकाणीं लोकमान्यांच्या सारखे स्फूर्तिकारक वक्ते, असा योगायोग जमून आल्यानंतर तेथें कोणाचें मन समुल्लसित झाल्यावांचून राहणार आहे! त्या वेळचें त्या निसर्गरमणीय वनप्रदेशामधील लोकमान्यांचें भाषण हें एखाद्या वनभोजनाप्रमाणें लोकांना अत्यंत प्रियकर आणि पथ्यकर वाटलें. असा तो प्रसंग प्रेक्षकांच्या मनामध्यें आपल्या अप्रतिमपणामुळें चिरस्मरणीय होण्यासारखा झाला.

(५) रायगडावरील पहिल्या शिवाजी उत्सवाच्या वेळीं लोकमान्य रायगडास जाण्याकरितां आले, त्या वेळीं त्यांच्या बरोबर श्री. रा. रा. माधव कृष्ण देशमुख व कै. नारायण बापूजी कानिटकर हे होते. संध्याकाळच्या वेळीं रायगडाच्या पायथ्याशीं मंडळी जाऊन पोंहोचली. तेथें रा. रा. घारपुरे, हर्डीकर, वगैरे महाडच्या अनेक उत्साही स्वयंसेवकांनीं उतरण्याची वगैरे सर्व जय्यत तयारी करून ठेवलेली होती. व तेथेंच रायगडावर न्यावयाच्या सामानसुमानाचाहि

मुख्य कँप होता. व येथून धान्य, मांडीकुंडी, वगैरे सामान गडावर पोंचवतें करण्याकरितां आसपासचे शेकडो शेतकरी लोक खालून गडावर आणि गडावरून खालीं अशा खेपा करीत होते. हे बहुतेक मजूर गडावरची खेप करून आपल्या गडाखालच्या छावणीमध्यें संध्याकाळच्या वेळीं परत आलेले होते. लोकमान्य त्या छावणीमध्ये आल्यानंतर रात्रभर तेथें विश्रांति घेतील आणि नंतर पहाटेस ते गड चढून वर जातील, अशी पुष्कळांची साहजिकच कल्पना होती. पण हा कार्यक्रम अविश्रांत श्रम करण्याची सवय असलेल्या लोकमान्यांच्या उत्साही धडाडीला मुळींच पसत पडला नाहीं. त्यांनीं संध्याकाळचा फराळ झाल्यावर थोडी विश्रांति घेतल्याबरोबर रात्रीच्या रात्रीं गडावर चढून जाण्याचा व तेथें पोंचून मग झोंप घेण्याचा निश्चय ठरविला. त्याबरोबर जी मंडळी पहाटेस उठून वर जाणार होती, त्या लोकांनींहि लोकमान्यांच्या समागमामध्येंच रायगड चढून जाण्याची तयारी चालविली. अशा रीतीनें शेंकडो लोक इतक्या रात्रीं रायगडावर चढून जाण्याचें धाडस करण्याला लोकमान्यांच्या उद्दीपक उदाहरणामुळें उद्युक्त झाले. लगेच शेंकडो मार्गदर्शक मजुरांनीं आपल्या चुडी पेटविल्या. ओझेवाल्या मजुरांनीं पाहुणे मंडळींचे बोजे आपल्या डोक्यावर घेतले. आणि चारपांच लोकांच्या दरम्यान एकेक चूडवाला मनुष्य अशा रीतीनें जवळ जवळ चारपांचशें लोक एकेक माणसांची रांग करून चालूं लागले. रात्रीचा प्रसंग असल्यामुळें व कित्येक ठिकाणची पाऊल वाट अगदीं अरुंद असल्यामुळें चारचार पांचपांच माणसांची एकेक रांग करून त्या डोंगरांतून चालणें शक्य नव्हते. शेकडो चुडी पेटलेल्या असून त्यांची लांबच लांब अशी एक रांग डोंगरांतील वळणें घेत घेत वर चढत असलेली पाहून तळच्या छावणीमध्यें असलेल्या लोकांना हा डोंगरांतील देखावा फारच मनोवेधक भासला. व खुद्द शिवाजी महाराजांच्या वेळीं शिवाजी महाराज आणि त्यांचे मावळे किल्ला सर करण्याच्या वेळीं असेच रात्रीचे वर चढून जात असले पाहिजेत, हें प्राचीनकाळचें ऐतिहासिक चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें उभें राहून प्रस्तुतच्या पडत्या काळामध्येंहि सर्वांच्या अंगांत वीरश्री संचरण्याचा संभव दिसू लागला. त्यांतच "शिवाजी महाराज की जय!" "लोकमान्य टिळक महाराज की जय!" अशा रणगर्जना त्या गडावर होऊं लागल्या आणि त्यांचे प्रतिध्वनि त्या गडाच्या दऱ्याखोऱ्यांतून उत्पन्न होऊं लागले, त्या वेळीं तर हा सगळा रायगड किल्लाच त्या चुडींच्या उजेडामध्यें स्वदेश भक्तीनें प्रज्वलित होऊन स्वराज्यसंस्थापनेची भाषा बोलूं लागला आहे कीं काय, असा भास झाला. अशा रीतीनें रातोरात लोकमान्य रायगड चढून वर गेले.

(६) पहिल्या रायगडच्या उत्सवाच्या वेळीं लोकमान्य हे मुंबईच्या कौन्सिलमधील एक सभासद होते. व त्यांच्या उदात्त वर्तनानें आणि अजब कर्तबगारीनें

त्यांची लोकप्रियताहि दिवसेंदिवस वाढत चालली होती. त्यामुळें ते रायगडावर जाण्याकरितां महाडास गेले, त्या वेळीं तेथें त्याचा फारच मोठा सन्मान झाला. ज्यांच्या घरीं त्यांना पानसुपारी झाली नाहीं, असे महाडामध्ये श्रीमत लोक किंवा शेट सावकार कोणीही उरलेले नव्हते. याशिवाय त्या वेळीं महाडात श्री. रा. रा. नगारामपत नाना ओक यांच्या मडपांत सर्व गावच्या तर्फेनें एक सार्वजनिक मानपत्रहि त्यांना समर्पण करण्यात आलें. त्या मानपत्राला उत्तर देताना लोकमान्यानीं जें भाषण केलें, त्यात दिसून आलेली त्याची स्वदेशभक्ति आणि ओजस्विता या गुणांचा लोकाच्या मनावर फारच परिणाम झाला. त्या वेळीं महाडास कै. गोपाळराव अनत भट हे सबजजाच्या जागेवर होते. लोकमान्याचा आणि त्यांचा पुण्याचा पूर्वीचा परिचय पुष्कळ होता. त्यामुळें महाडास उभयतांच्या गाठी पडल्यामुळें दोघांनाहि मोठा आनंद झाला. कै. गोपाळराव हे जरी सरकारी नोकरीमध्ये होते, तरी देखील त्यांचीं बहुतेक मतें लोकमान्याच्या सार्वजनिक चळवळीला अनुकूल अशींच होतीं. महाडकर ज्योतिषी हे लोकमान्याचे त्या वेळचे आणखी एक परम स्नेही होते. ते व त्यांचे महाडातील इतर मित्र यांच्या खटपटीनें व लोकमान्यांच्या आशीर्वादानें रायगडासारख्या विकट ठिकाणचाही उत्सव उत्कृष्ट रीतीनें पार पडला. रायगडावरून परत महाडास येताना ठिकठिकाणच्या वाटेवरच्या गांवांतील लोकांकडून लोकमान्यांचा अपूर्व सन्मान झाला. त्यात नातें या गांवीं प्रभु, ब्राह्मण, गुजर, या जातींची वस्ती बरीच असल्यामुळें तेथील लोकांनीं लोकमान्याचें आदरातिथ्य करण्याचे कामीं फारच उत्साह प्रदर्शित केला. इकडे त्याचा अशा रीतीनें आदरसत्कार चाललेला असताना महाडाच्या जवळच दुसऱ्या बाजूला असलेला दुसरा बिरवाडी म्हणून जो एक चागल्या सुखवस्तु आणि श्रीमत लोकांचा गाव आहे, तेथील सर्व पुढारी मडळी लोकमान्याना आपल्या गांवीं घेऊन जाण्यासाठीं महाडास येऊन त्याची वाट पहात बसलेली होती. लोकमान्य हे रायगडावरून सध्याकाळच्या सुमाराला महाडास येऊन पोहोचतील, असा त्याचा अदमास होता. पण रात्रीचे १०।११ वाजले, तरी ते आले नाहींत. रायगडावरून परत येण्याच्या वाटेवरील गावातून चाललेल्या आदरातिथ्यापुढें लोकमान्यांचा अगदीं निरुपाय होऊन गेलेला होता. त्यामुळें ते वेळेवर महाडास येऊन पोहोंचणार कसे ? अखेरीस मध्यरात्रीचे सुमारास ते अगदी थकून महाडास येऊन पोहोचले. व आता स्वस्थ विश्रांति घ्यावयाची, असा त्यानीं मनात बेत केला. पण इतक्यात बिरवाडची जी मडळी त्याची वाट पहात बसली होती, ती त्याना भेटण्याकरिता आली. त्यांनीं आपली विनंति पुढें मांडली. पण ती विनंति त्या वेळीं लोकमान्यानी मान्य करणें शक्य नव्हते. लोकानीं आग्रहाची कमाल केली. आणि लोकमान्यांनीहि पुष्कळ आढेवेढे घेतले. पण अखेरीस आपल्याला कितीहि त्रास झाला, तरी लोकाना सतुष्ट ठेवावयाचे, ही ज्याच्या

आयुष्यांतील वर्तनक्रमाची मुख्य गुरुकिल्ली, त्यांनीं त्या लोकांचे म्हणणे मान्य केलें. विरवाडीच्या लोकांना अतिशय आनंद झाला. एकदम पांच पचवीस गाड्या महाडाहून विरवाडीस सुटल्या. सुमारे दीडदोन वाजतां रात्री लोकमान्यांसह विरवाडीची मंडळी विरवाडीस येऊन पोहोचली. लोकमान्य आपल्या गांवीं आलेले पाहून गांवांतील सर्व गरीब श्रीमत, बायकामुले, लहान मोठे, यांना अतिशय आनंद झाला. इतक्या रात्रीं दोन वाजल्यानतर पाट, रांगोळ्या, उदबत्त्या, समया, यांच्या थाटांत भोजनसमारभ झाला. पक्तीत शुभ्रदारूचे बैठे नळे उडविण्यांत आले. उत्साह परमावधीला पोहोचला. लोकांचें समाधान झाले. आणि लोकांच्या समाधानामध्येंच लोकमान्याचें समाधान असल्यामुळे लोकमान्यांनाहि समाधान वाटलें. अशा रीतीनें तेथील समारभ आटोपून लोकमान्य महाडास परत आले. तो सकाळची झुंजुमुंजु होण्याची वेळ येऊन ठेपली होती! लोकांना आपल्याकडे वश करून घेण्यासाठीं लोकमान्य आपल्या स्वतःला किती शीण देत असत, हे यावरून चांगलें व्यक्त होतें.

( ७ ) रँडच्या खुनानतर लोकमान्याच्यावर राजद्रोहाच्याबद्दल जो खटला झाला, त्याचा निकाल ऐकण्याकरितां मुंबईस हायकोर्टाच्या पुढच्या बाजूच्या मोकळ्या जागेमध्ये हजारो लोकांचे थवेच्या थवे जमा झालेले होते. कोर्टांत जेथें खटला चालला होता, तेथें तो ऐकण्याकरिता जाण्याची इच्छा सगळ्यांना, पण शक्यता व परवानगी मात्र अगदीं थोड्यांना, अशी हायकोर्टाची स्थिति असल्यामुळे बहुतेक लोकांना कोर्टाच्या बाहेरच आपली उत्सुकता तिष्ठत ठेवणें असल्या प्रसगीं नेहमींच भाग पडतें. त्याप्रमाणें हजारो लोक हायकोर्टाच्या तिसऱ्या मजल्याकडे सध्याकाळीं ५ वाजण्याच्या सुमारास डोळे लावून ताटकळत उभे राहिलेले होते. राजद्रोहाचा खटला सरकार ज्यांच्यावर करणार, त्यांना त्या खटल्यांतून सरकार दोषमुक्त करून सोडील, अशी अपेक्षा करण्या इतका त्या एवढ्या मोठ्या समाजामध्यें एकहि वेडगळ मनुष्य नव्हता. तरी पण काय शिक्षा होते हे समजावें आणि लोकमान्य तुरुगाच्या भिंतींच्या आड अदृश्य होण्यापूर्वीं एकदां त्यांचें दर्शन व्हावें, एवढ्या इच्छेनें तेथें फार मोठा लोकसमुदाय जमलेला होता. पुष्कळ वेळ वाट पाहून लोक कटाळून गेले, तरी आंतील बातमी बाहेर काहीं एक कळेना. परतु न्यायाचा काटा बरोबर तोलून पाहण्याकरितां न्यायदेवतेला किती वेळ शांतपणानें विचार करावा लागतो, याची बाहेरच्या बाजारबुणग्यांना काय कल्पना असणार! तरी पण शिक्षा झालेल्या कैद्यांना कोर्टांतून तुरुगांत नेण्याकरितां कैद्यांची जी एक काळ्या रंगाची गाडी येत असते, ती गाडी पोलिसांनीं हायकोर्टाच्या पुढल्या मुख्य दरवाजाच्या पायऱ्यांपाशीं आणून दुपारपासून उभी करून ठेवण्याची काळजी घेतली होती; त्यामुळें पुष्कळ लोकांना आशा करण्याला जागा झालेली होती. सरकारने

कितीही फसवाफसवी, आणि टाळाटाळी चालविली असली, तरी लोकमान्य कैद्याच्या गाडींत बसण्याकरिता येतील, तेव्हां तर त्यांना पाहण्याच्या बाबतींत सरकार आम्हाला कांहीं एक अडथळा करू शकणार नाहीं, या सरकारवरील आपल्या अप्रतिविधेय वर्चस्वाबद्दल आणि विजयाबद्दल या सगळ्यांना मोठें समाधान वाटत होतें! व लोकमान्यांना कैद्याच्या गाडींत जातांना 'मी पहिल्यानें पाहीन,' 'मी पहिल्यानें पाहीन,' अशा उदात्त आणि अभिमानपूर्व अहमहमिकेनें प्रत्येक जण त्या गाडी समोंवतालच्या अतिशय मान्याच्या अशा पहिल्या रांगे-मध्यें जाऊन उभे राहण्याकरिता मोठ्या शूरत्वानें आणि अतिशय धडाडीनें आपल्या जीवाकडेहि न पाहतां प्रयत्न करीत होता! त्या गाडीच्या आतमध्यें जाण्याची जरी कोणाची फारशी इच्छा नव्हती, तरी त्या गाडीच्या बाहेर कांहीं दुखापत न होईल इतक्या जरूर त्या दूर अंतरावर उभें राहण्याचें शौर्य दाखविण्याच्या कामात कित्येकांच्या मध्यें आपसांत मारामाऱ्याहि चालल्या होत्या! इतकी लोकांची उत्सुकता वाढलेली होती! व तुरुंगात जाण्या-करितां आता लोकमान्य खालीं येतील, अशी प्रत्येक क्षणाला लोक त्यांची वाट पहात होते. हायकोर्टाच्या पुढील पटांगणातून युनिव्हर्सिटीच्या राजाभाई-टॉवर वरील घड्याळ चांगले दिसतें. लोक एकदा त्या घड्याळाकडे पहात आणि एकदा हायकोर्टाच्या तिसऱ्या मजल्याकडे पहात. तरी पण कोठेंच कांहीं हालचाल दिसेना. युनिव्हर्सिटीच्या घड्याळावर पाच वाजले; सवापांचही वाजून गेले; साडेपाचावर कांटा येऊं लागला; आणि आकाशांतील सूर्यही मुंबईच्या बॅकबेमध्यें सायंस्नान करण्याकरितां अगदीं खालीं उतरण्याच्या बेतात आला; तरी देखील कोठें कांहीं हालचाल होईना. अखेरीस कांहीं वेळाने कोर्टाच्या माडीवरील कांहीं लोक बाहेर पडूं लागले. तेव्हा आता लोकमान्य खास खालीं येणार, अशी सगळ्या लोकांची खात्री झाली पण या उत्सुक झालेल्या बावळ्या लोकांच्या दुर्दैवानें लोकमान्य कांहीं खालीं आले नाहींत! फक्त अशी एक बातमी मात्र खालीं आली कीं, आता लोकमान्य इकडे कसले येतात! ते एव्हाना तुरुं-गात जाऊन पोहोंचले देखील असतील! ही बातमी ऐकून लोकाना खरोखरच मोठा सात्त्विक राग आला. आणि ते म्हणूं लागले कीं, हें तुम्ही काय म्हणतां! असें कसें होईल? तुरुंगांत जाणाऱ्या कैद्यांची ही गाडी आमच्या येथें आमच्या समोर अजून उभी असून लोकमान्य तुरुंगात जाऊन पोंचले देखील असतील, असें तुम्ही म्हणता, हे समजेल तरी कसें?—गरीब बिचारे भोळसर इंडियन लोक! असल्या बावळट लोकांना इंग्रजी पोलिसाचा कावा कोठून कळणार? हायकोर्टांतील न्यायाधीश ज्या उच्च सिंहासनावर न्याय देण्याकरिता बसतात, त्याच्या पाठीमागेंच लहान लहान वाटोळे जिने आहेत, त्यांतील एका जिन्याच्या तळमजल्यावरील पायऱ्यापाशीं हायकोर्टाच्या पिछाडीकडील खासगी बागेमध्यें

एक साधी गाडी बराच वेळपर्यंत उभी होती. निकाल झाल्याबरोबर लोक-मान्यांना मागच्या त्या चोरजिन्याने खालीं आणून तेथें तयार ठेवलेल्या त्या गाडींत बसवून पोलिस त्यांना खरोखर केव्हांच तुरुंगाकडे घेऊन गेलेले होते! पाठीमागून पुढच्या बाजूला जमलेल्या लोकाना जेव्हां कळलें कीं, लोकमान्यांना पोलिसांनीं मागच्या बाजूनें तुरुंगाकडे नेलें, तेव्हा त्या लोकसमुदायाच्या समुद्राच्या लाटा मागच्या बाजूला बॅंकवेच्या रस्त्याकडे वळल्या! त्यामुळें कैद्याच्या गाडी-समोंवतालची गर्दी अनायासेंच मोडून त्या देखाव्यासाठीं आणि अडाणी लोकाना चकविण्यासाठीं मुद्दाम आणून ठेवलेल्या गाडीची वाट आयतीच मोकळी झाली. साराश, व्यवस्था ठेवण्याचा आणि गर्दी मोडण्याचा यत्किंचितहि त्रास पोलिसांना न पडतां लोकमान्य आधींच सुरक्षितपणे आणि मागून तुरुगातील कैद्याची गाडीहि तितक्याच सुरक्षितपणानें कांहीं वेळानें तुरुंगात जाऊन पोंचली!

(८) लोकमान्याना १९०८ सालीं राजद्रोहाच्याबद्दल जेव्हां दुसऱ्या खेपेला शिक्षा झाली, तेव्हाहि लोकमान्यांना अटकेत ठेवण्यासाठीं कोणत्या तुरुंगात नेण्यांत येणार, ही बातमी लोकाना कळू नये, म्हणून पूर्वीच्या वर दिलेल्या युक्त्यांसारख्याच कित्येक युक्त्या योजण्यात आलेल्या होत्या, असे म्हणतात. लोकमान्यांना अमुक ठिकाणीं पाठविणार, तमुक ठिकाणी पाठविणार, अशा दहापाच निरनिराळ्या ठिकाणांबद्दलच्या खोट्या बातम्या आधीं लोकांत पसरवून ठेवण्यांत आलेल्या होत्या! कदाचित् यावरून सरकारच्या मनांतील निश्चयाचा शेवटपर्यंतचा अनि-श्चितपणाहि व्यक्त होत असेल. पण या निरनिराळ्या ठिकाणांबद्दलच्या बातम्यांना सत्यतेचें कांहीं थोडें बहुत तरी सोंग यावे, म्हणून समुद्रात एक आगबोट तयार ठेवण्यात आली होती आणि बोरीबंदरवरहि आगगाडीचे स्पेशल डबे आणून उभे करण्यात आले होते, असें म्हणतात. व आतां लोकमान्यांना हिंदुस्थानातल्या अगर हिंदुस्थानाबाहेरच्या कोणत्या प्रांतात नेऊन टाकतात कोण जाणे, अशी विवचना मुंबईतील सगळ्या लोकाना लागलेली होती. पण तसें कांहीं एक न होतां लोकाचे लक्ष्य दुसऱ्या भलत्या मार्गांकडे वेधून टाकून पोलिसानी लोकमा-न्याना हळूच त्या दिवशीच्या रात्रीच्या बी. बी. सी. आय. च्या एका गाडीनें अहमदाबादेजवळच्या साबरमतीच्या तुरुंगाजवळ नेले. साबरमतीच्या तुरुंगाच्या एका बाजूच्या बाहेरील तारेच्या एका कापाऊंडला अगदीं खेटून रेलवेची एक लाईन तुरुंगातील गुप्ततेच्या कामाला फार सोईस्कर होईल अशा रीतीनें जाते. त्या कांपाऊंडजवळ लोकमान्यांचा डबा उभा करून शिपायांच्या दुतर्फा रांगां-मधून लोकमान्यांना साबरमतीच्या तुरुंगाच्या आंत नेण्यांत आलें, असें सांगतात. त्या दिवशीं सकाळ होऊन दिवस बराच वर आला, तरी अहमदाबादेंतील लो. टिळकांच्या मित्राना आणि हितचिंतकाना कल्पनाहि नसेल कीं, आपले लोकमान्य आपल्यापासून एक दोन मैलांच्या अंतरावर येऊन राहिलेले आहेत! लोकमान्य

या वेळीं ज्या साबरमतीच्या तुरुंगांत रहाण्याकरितां आले होते, त्याच साबरमतीच्या तुरुंगांत पुण्यांतील रॅंडसाहेबाच्या खुनाच्या वेळीं नुसत्या संशयावरून १८१८ च्या तिसऱ्या कलमाखालीं स्टेट प्रिझनर म्हणून पकडलेले पुण्याचे कै. श्री. बाळासाहेब नातू ह्यांना कांहीं दिवसपर्यंत ठेवण्यांत आलेलें होतें. साबरमती जेलच्या थोरल्या दरवाज्यांतील ऑफिसवरून पुढे गेल्यावर उजव्या हाताकडे जो एक रस्ता वळतो, त्या रस्त्यावरून कांहीं अंतरावर गेल्यानंतर लहान वयाच्या गुन्हेगार मुलांना ठेवण्याकरितां एक जुव्हेनाईल वार्ड लागतो. त्यामध्यें त्या वेळीं श्री. बाळासाहेब नातू यांना जागा करून देण्यांत आलेली होती. आणि त्याच्याच पुढें जो एक युरोपियन वार्ड आहे, त्यांत लोकमान्यांना नेऊन ठेवण्यांत आलें होतें. व तेथें दुसऱ्या कोणालाहि येण्याची सक्त बंदी करण्यात आली होती. ही जागा फार रमणीय आहे. मध्यमार्गी असलेल्या रहावयाच्या बराकीला फरशी व भिंतीला चुन्याचा गिलावा केलेला असून पुढील पटांगणामध्यें जिकडे तिकडे बारीक रेती टाकलेली आहे. या पटांगणांतच मधल्या रस्त्याच्या दोन्ही बाजूला कडूलिंबाचीं हाताला सहजगत्या पानें आणि फुलें येण्याइतकीं लहान लहान झाडें आहेत. त्यामुळे तेथें वारा फार चांगला येतो आणि त्या वाऱ्याबरोबर कडूलिंबाच्या फुलाचा जो वास येतो, तो इतका मधुर असतो कीं, त्या वासाच्या फुलांच्या झाडाच्या पाठीमागे कडू हें विशेषण कोणी लाविलें असावे, याच्याबद्दल मोठें आश्चर्य वाटतें. या ठिकाणीं लोकमान्यांचा सुमारें दोन महिने मुक्काम होता व नंतर येथूनच त्यांना मंडालेकडे नेण्यांत आलें.

---

## विठ्ठल रामजी शिंदे

[ बी. ए., हिंदु निराश्रित सहाय्यकारी मंडळी पुणें या संस्थेचे आधारस्तंभ, पुणें. ]

ईश्वरी संकेताप्रमाणें ज्या लोकमान्य टिळकांशीं आदरपूर्ण विरोधभक्तीशिवाय माझा कधीं फारसा संबंध आला नाहीं, त्यांच्या आठवणी मी इतक्या लवकर प्रसिद्ध करण्यानें सामान्य वाचकाचा तरी निदान समजापेक्षां गैरसमजच जास्त होईल अशी मला भीति आहे. म्हणून रा. बापट ह्यांच्या चिकाटीस मी प्रथम बळी पडलों नाहीं. पण शेवटीं त्यांच्या स्तुत्य हेतूपुढें हार खाऊन मी पुढील आठवणी देत आहें.

ह्या लेखांत मी लाघवी स्तुती व मत्सरी निंदा सारख्याच दूर ठेवून सात आठवणींचे एकंदर दहा प्यारे लिहिले आहेत. उद्देश हा कीं, ह्या थोर पुरुषावर

त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं वेळीं अवेळीं ज्या दुर्गुणांचा आरोप केला ते सर्वच आणि सर्वांशीं खरे नाहींत, हें मी समक्ष पाहिलेल्या उदाहरणांनीं दाखवावें. टिळक राजकारणांध, समाजकारणविन्मुख, धर्मसुधारणेचे वैरी, इतर जातींचे द्वेष्टे, आपल्या चुका कधींच दुरुस्त न करण्याइतके हेकट व मठ्ठ डोक्याचे, दुसऱ्याच्या सत्प्रयत्नांकडे नेहमीं मत्सराच्या विषारी दृष्टीनेंच पहाणारे इ. नैतिक दोषारोप ऐकून माझे कान किटले आहेत. ज्या प्रसगीं मी त्यांच्याकडे अत्यंत निरखून पाहात असूनहि हे दोष अति सूक्ष्म प्रमाणांत दिसले असे कांहीं, अशतः दिसले असे कांहीं व मुळींच दिसले नाहींत असे कांही प्रसग मी निवडले आहेत. अर्थात् सार्वजनिक दोषांपेक्षां सार्वजनिक गुणच त्यांच्यांत अधिक व अधिक प्रमाणांत होते हें मीं निराळे सांगावयास नकोच. एरव्हीं त्यांच्या शत्रूंनींहि त्यांची गणना थोर पुरुषात कशी केली असती बरे ? आणि मी तरी ह्या आठवणींची उठाठेव का केली असती !

( १ ) ऑक्सफर्ड येथील मॅंचेस्टर कॉलेजमध्ये तुलनात्मक धर्माचें अध्ययनासाठीं हिंदुस्थानातील ब्रह्मसमाजाच्या मार्फत पाठविण्याची इ. स. १९०१ मध्ये जेव्हां माझी निवडणूक झाली तेव्हां तिकडे जाण्यापूर्वीं श्री. बळवतरावजींचें दर्शन घेऊन त्यांचे प्रत्यक्ष विचार ऐकण्याची मला इच्छा झाली. त्या वेळीं ते लोकमान्य झाले होते, तरी लोकमान्य ही पदवी प्रचारांत आली नव्हती. मी एक लहानसा अप्रसिद्ध विद्यार्थी, आचार, विचार, ध्येय वगैरेत त्यांच्याशीं माझे मुळींच साम्य ना संबध, अशा स्थितींत त्यांच्याकडे जाण्यांत मी धाडसच करीत आहे. असे मला वाटले. धर्माध्ययनासाठीं विलायतेस जातों ही गोष्ट ऐकून तर ते खात्रीनें नाकच मुरडतील अशी खुणगांठ बांधून मी गेलो, तेव्हा ते अगदीं जुन्या रीतीने जमीनीवरच बसले होते. जणूकाय फारा दिवसांचा लोभ आहे अशा सलगीनें त्यांनीं मला ओढून अगदीं आपल्या जवळ बसवून घेतलें आणि सामान्यतः उदारधर्मासंबधी व तुलनात्मक विवेचनपद्धतीसंबधीं अगदीं मोकळ्या मनानें व तज्ञपणानें आपले प्रागतिक विचार मजपुढे बोलून दाखविले; इतकेच नव्हे तर आमच्या प्रार्थनासमाजासंबंधी देखील कांहीं बाबतींत त्यांनीं आपली गुणग्राहकता प्रकट केली. ‘ आमच्या हिंदुतत्त्वज्ञानांत द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत इ. पुढे जे तट आणि उपासनेत शैव, वैष्णव, शाक्तादि पंथ माजले त्या योगे आपली दृष्टि विकृत होऊं न देतां व त्यांचे ऐतिहासिक महत्त्वहि पण कमी न करतां उपनिषद काळांत हिंदूंची जी निर्भय व स्वतंत्र दृष्टि होती तीच राखून पौरस्त्य पाश्चात्य आचार विचारांची तुलना करण्यास शिका’ असा त्यांनीं प्रेमाचा इषारा दिला. मला सानंद आश्चर्य वाटलें.

( २ ) परत आल्यावर धर्म सुधारण्याच्या प्रयत्नाशिवाय अस्पृश्यता निवारणाचा विशेष प्रयत्न व त्याची देशभर घटना करण्याचें काम मी चालविलें. त्याला

त्यांनीं स्वतः कधीं विरोध केला नाहीं, उलट प्रसंग विशेषीं न मागतां वर्गण्या पाठवून दुरून कां होईना, पण सहानुभूति राखिली होती. इ. स. १९०७ च्या सुमारास पुण्यास जी रा. भालेकर, डॉ. मॅनप्रभृतींनीं मद्यपानाविरुद्ध पिकेटिंगची जोराची चळवळ चालविली होती त्यात लोकमान्यांची पूर्ण मदत होती. ह्याच संबंधीं मुंबईस करीरोड स्टेशनजवळ गिरणी कामगारांच्या एका प्रचंड जाहीर सभेपुढें त्यांचे आवेशयुक्त भाषण झालें. दुसरेच दिवशीं ते आमचें परळ येथील मिशन पाहाण्यास येणार होते, पण लवकरच त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला होऊन त्यांना सहा वर्षे कारागृहीं जावें लागल्यानें तो योग आला नाहीं.

( ३ ) पुढें इ.स. १९१६।१७ च्या सुमारास लखनौच्या कॉंग्रेसमध्यें हिंदू-मुस्लीम स्कीम पास झाली त्यांत रा. बळवंतरावजींचा पुढाकार होता. ह्या स्कीमला बहुजनसमाजाचा पुरस्कार नाहीं, केवळ वरिष्ठ वर्गातील चार सुशिक्षित चळवळ्यांनींच हे काहूर माजविलें आहे अशा अर्थाचे आक्षेप इंग्लंडांतील सुधारणा-द्वेष्ट्यांकडून वेगांत येत होते. मॅंटेग्युसारख्या सुधारणावाद्यांनाहि अशा आक्षेपास हिंदुस्थानांतील बहुजनसमाजाकडून उत्तर जावयाला पाहिजे होतें. अशा आणीबाणीच्या वेळीं मद्रासेकडील चळवळीच्या अनुरोधानें महाराष्ट्रांत ही ब्राह्मणेतर पक्षाची अगदीं नवीन घटना चालू होती. पण ह्या पक्षाकडून राष्ट्रीय सभेला पाठिंबा मिळण्यासारखा नव्हता व ह्या पक्षाचे भावी सामर्थ्य व महत्त्व ओळखण्या इतकी दूरदृष्टि व भरीवपणा तेव्हाच्या कोणत्याही विचंत पुढारलेल्या पक्षांत आलेला नव्हता. म्हणून मागासलेल्या सर्व जातींना किंबहुना अस्पृश्य मानलेल्या वर्गातील सर्व जातींनाही तेव्हांच्या राष्ट्रीय मुहुर्तानें महत्त्व समजाऊन देऊन स्वराज्याच्या योजनेला लहानथोर सर्वांची सहानुभूति मिळविणें आम्हांला भाग पडलें. ता.२६ आक्टोबर १९१७ रोजीं सायंकाळीं ५ वाजतां शनिवारांतील रा. बोत्रे पाटील ह्यांचे घरीं "मराठा राष्ट्रीय सभाची" स्थापना झाली. सभाचे पहिलें काम म्हणून गुरुवार ता. ८ नोव्हेंबर १९१७ रोजीं सायंकाळीं शनिवार वाड्याच्या दिल्ली दरवाजासमोरील भव्य पटांगणांत शहरांत व मोंवतालच्या भागांत राहणाऱ्या सर्व जातींच्या, धर्मांच्या व पंथांच्या लोकांची सभा भरली होती. लखनौ येथे राष्ट्रीय सभेनें पास केलेल्या स्वराज्याच्या योजनेस पुष्टी देणें हा ह्या सभेचा उद्देश होता. सभेस सुमारे १० हजारापर्यंत लोकसमुदाय हजर असावा असा अंदाज आहे. रा. शिवकराव आवटे वगैरे मंडळी लोकमान्यांकडे गेली. ही चळवळ तेव्हांच्या राष्ट्रीय पक्षाच्या मार्फत व्हावी असा मला लोकमान्यांचा रोख दिसला. तो मला इष्ट वाटला नाहीं; कारण अशानें ह्या चळवळीच्या बहुजनमान्यतेला व स्वतंत्रपणाला बाध येऊन तिने दिलेल्या स्वयंप्रेरित पाठिंब्यालाही उणेपणा येईल असें मी आपले स्पष्ट मत लोकमान्यांना कळविलें. मराठे, ब्राह्मण, मुसलमान, महार, मांग, सुतार, सोनार शिंपि, प्रभु, माळी, बंजारी, चांभार, कासार,

कोष्टी, रामोशी, गवळी, परीट, गुजर, वारकरीसंप्रदाय इतक्या १८ जातींचे व संप्रदायाचे प्रत्येकीं दोनदोन असे वक्ते मुख्य ठरावावर बोलले. केवळ ब्राह्मणांचे प्रतिनिधी ह्या नात्यानें लोकमान्यांनीं बोलावें अशी मी ह्या सभेचा अध्यक्ष ह्या नात्यानें विनंति केली व ती त्यांनीं आपला पक्षाभिमान तात्काळ बाजूस ठेवून मान्य केली. "आतां आपल्याला पूर्वीचें स्वराज्य नको असून पाश्चात्य धर्तीवरील स्वराज्य पाहिजे आहे" असें सांगून ते म्हणालेः— "आपल्या जातीभेदामुळेंच येथे ब्रिटिश राज्य स्थापन झालें आहे. व जातीभेद असाच पुढें चालू राहाणार असेल तर स्वराज्यांतही आमची अशीच अधोगति होईल" असें स्पष्ट बोलून त्यांनीं आपली समयानुकूलता प्रकट केली ! वरील उतारे मराठा राष्ट्रीयसभाच्या नियमांच्या पुस्तकांतून घेतले आहेत.

(४) टिळक राजकारणांध होते किंवा राजकारणाच्या देवीपुढें समाजसुधारणेचें वासरू मारण्याकरितां त्यांचा हात नेहमी वर होता असें नव्हे, हें दाखविण्याकरिता मी खालील आठवण देत आहें. सन १९१७ सालीं राष्ट्रीय मराठ्यांची पहिली अखिलभारतीय परिषद आम्ही बेळगांवांस भरविली. अर्थात् "टिळकांचे बगलबच्चे" व "ब्राह्मणाळलेले" ह्या आरोपाच्या आहेरांची पुष्कळशीं पार्सलें आमच्याकडे आलीं. इतक्यांत अथणीची जिल्हा परिषद थाटाने झाली, तेथें लोकमान्य होते. राष्ट्रीय मराठे ह्या दृष्टीनें टिळक कंपूनें त्या वेळीं आमची किंचित् जास्त बडदास्त राखली, हें खरें. मी तर त्या वेळीं टिळकांचा पंचीप्याराच बनलों होतों ! पण मुद्याची गोष्ट पुढेंच आहे. टिळकांचा राजकारणांधपणाचा नंबर कोणता लागतो हें पहाण्याची मी ह्या वेळीं अमोलिक संधी साधली. त्याना मी अगदी एकातांत नेऊन विचारलें कीं, 'डिप्रेस्ड क्लासेस मिशनचें काम सोडून देऊन मी स्वतःला केवळ राजकारणालाच वाहून घेऊं काय ?' त्यांनीं तात्काळ 'नको' म्हटलें ! कित्येकाना ह्या उत्तरांतही अट्टल राजकारणाचाच वास येण्याचा पूर्ण संभव आहे. पण ह्या विषयावर मन मोकळें करून एक तासभर टिळक जें बोललें तें सारे मायावी म्हणण्याइतकें शाठ्य त्यांच्यांत नव्हते; उलट होतें असें म्हणणारांतच ते असण्याचा संभव मला दिसूं लागला. भाषणाचा तपशील देण्यांत अर्थ नाहीं. डिप्रेस्ड क्लासेस मिशनवर केसरीकार म्हणून नसला तरी टिळक म्हणून त्यांचा विश्वास बसून चुकला होता; व तो त्यानीं खालील आठवणींत दाखविल्याप्रमाणें मिशनच्या परिषदेंत भाग घेऊन व्यक्त केलाही.

(५) पुढील वर्षीं मार्च महिन्यांत मुंबईंत अखिल भारतीय अस्पृश्यतानिवारणपरिषद बडोद्याचे महाराज सर सयाजीराव गाइकवाड ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरली. हिचें मूळ किंचित् मनोरंजक आहे. डॉ. कुर्तकोटी हे करवीरपीठाचे शंकराचार्य असतांना एकदा आपल्या लवाजम्यासह मुंबईंतील कोल्हापुरमहाराजांच्या पन्हाळा लॉजमध्यें येऊन उतरले. पूर्वाश्रमींचे ते माझे मित्र

असल्यानें, त्यांनीं मला भेटीस बोलाविलें. इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर अस्पृश्यतानिवारणाची एक परिषद मोठ्या प्रमाणावर सर्व हिंदुस्थानाची स्वतंत्रपणें भरवून मी लोकमत अजमावून पाहावें, व ह्या बाबतींत कांहीं प्रत्यक्ष पुरावा मिळवून दिल्यास आपण शंकराचार्य ह्या नात्यानें आज्ञापत्र काढू, मात्र ह्या कामीं लोकमान्यांचें सहकार्य मी संपादन करावें असा त्यांचा सल्ला होता. शंकराचार्यांच्या आज्ञापत्राची देशस्थ व कोकणस्थ ब्राह्मणांमधील बेटी व्यवहाराचे बाबतींत कशी वासलात लागली हें मला माहित असल्यानें अशा आज्ञापत्राचें मला महत्त्व वाटेना. लोकमान्यांच्या सहकार्याविषयींही शंका नव्हती. तथापि मोठ्या प्रमाणावर एक स्वतंत्र परिषद करून, देशांतील प्रांतोप्रांतींच्या सर्व जातींच्या वेचक प्रमुख गृहस्थांच्या सह्या एका स्पष्ट अखिल भारतीय जाहीरनाम्यावर घ्याव्या असें मला बरेंच दिवस वाटत होतेंच. मी ह्या कार्यास तावडतोब लागलों. लोकमान्य त्यावेळेस इंग्लंडला जाण्याच्या गडबडींत होते, तरी ते वेळांत वेळ काढून एकदा मजबरोबर पन्हाळा लॉजमध्यें श्रींचे दर्शनास गेले. श्रींपुढें सुमारें २।३ डझन नारळांनीं भरलेलीं ताटें ठेवून, लोकमान्य आदरानें बसलेले पाहून मला कौतुक वाटलें. आमच्या तिघांच्या विचारें परिषद ठरली. पण अखेरीस शंकराचार्यांना येण्याला अवसर मिळाला नाहीं; तरी परिषद यशस्वी रीतीनें पार पडली. इतर कामाच्या गर्दींत लोकमान्यही पुण्याहून मुद्दाम मुंबईस जाण्यास काकू करूं लागले, पण मी देणेंकऱ्याप्रमाणें धरणेंच घेतल्यामुळें बिचारे करतात काय ? लोकमान्य होणें हे सुखाचें नाहीं. तो कांट्यांचा मुकुट डोईस कसा खुपतो, विशेषत: पुढें जाहिरनाम्यावर सही करण्याचे नाकारताना हा मुकुट त्यांच्या कपाळावर कसा रुतला, हें माझ्या प्रत्यक्ष दृष्टीस आलें, कारण 'केसरीकर्ता म्हणून नव्हे तर केवळ टिळक म्हणूनच मी परिषदेस येतो' असें बजावून सांगण्यास लोकमान्य विसरले नाहींत.

'कॉंग्रेसनें अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधी घेऊन आपल्या कार्यास त्यांचा पाठींबा मिळवावा,' अशा अर्थाचा ठराव लोकमान्यांनीं ता. २४ मार्च १९१८ रोजीं सकाळच्या बैठकींत आणिला. त्यावेळीं लोकसमुदाय ७००० वर जमला होता ! मंडपाच्या बाहेरही सारखी रेटारेटी चालू होती. लोकमान्यासहि आवेश चढून त्यांच्या गर्जना मंडपाबाहेर रस्त्यांतच नव्हे तर पलीकडील चाळींत राहणाऱ्या लोकांच्या कानावरहि आदळत होत्या " पेशव्यांच्या वेळींहि अस्पृश्यांनीं भरलेल्या पखालींतील पाणी ब्राह्मण प्याले......If a God were to tolerate Untouchability, I would not recognize him as God at all... अस्पृश्यता देवास मान्य असेल तर मी त्यास देवच म्हणणार नाहीं....( हे उद्गार ऐकून जो गजर उठला त्यांत मंडप कोसळून पडतोसें वाटलें )...मी येथें जरी आज शरीरानें प्रथमच आलों आहे, तरी मनानें ह्या चळवळींत नेहमींच आहे...जुन्या

काळीं ब्राह्मणांच्या धुळुमानें ही चाल पडली, हे मी नाकारीत नाहीं. पण ह्या रोगाचें आतां निर्मूलन झालेंच पाहिजे." वगैरे त्यांच्या तोंडचे शब्द भावी इतिहासांत घुमघुमत राहतील !

पुढे मी जाहीरनाम्यावर त्यांची स्वतःची सही घेण्यास गेलो. त्यावेळीं सरदारगृहांत लोकमान्य होते. भोवतालीं त्यांची प्रभावळ बसली होती. 'तात्यासाहेब केळकरच नव्हे तर दादासाहेब खापर्डे ह्यांनीं देखील आपला नवाबी हुक्का एकीकडे सारून तात्काळ आपली सही केली. पण लोकमान्य कचरू लागले ! एकवेळ ते पुढेंही आले. पण दादासाहेब करंदीकर आडवे आले ! शेवटीं लोकमान्य अगदीं काकुळतीला येऊन उभे राहून त्यांनी दोन्ही हात माझ्या खांद्यावर ठेविले, व आर्जवूं लागले कीं, 'इंग्लंडाहून परत येईपर्यंत तरी मी ह्या आग्रह सोडावा.' मी त्यांना स्पष्ट वजाविले कीं, सही न देण्यानेत्याना स्वतःलाच नव्हे तर त्यांच्या पक्षालाही खालीं पाहावें लागणार आहे. पुढे माझ्या समजुतीसाठीं मला एकट्यालाच एका दालनात नेऊन सामाजिक सुधारणेशीं आपला कसा संबंध आहे हे नागपूरच्या पहिल्या कॉंग्रेसपासून सुधारकांच्या कपूतून आपण कसे फुटलो व कां फुटलों, तरी आपण सुधारकच कसे आहो वगैरे बराच चित्ताकर्षक खासगी वृत्तान्त निवेदन केला. तो सर्व देण्याला येथे अवसर नाहीं. पण अखेर सही दिली नाहींच ! पुढे ह्या सर्व प्रकरणाला "जागरूक" काराने ही शिंद्यांची सर्कस अशा जाड्या टाईपांतले नाव दिले ह्यांत काय आश्चर्य !

(६) लोकमान्य इंग्लंडाहून परत पुण्यांत येतात तोंच येथें सक्तीच्या शिक्षणाची धुमश्चक्री चालू होती. पुण्याच्या म्युनिसिपालीटींत खडाजंगी वाद, सब कमिट्यांच्या बैठकी, आंकडेमोड, नागरीक सभा, इ. प्रकार होऊन, शेवटीं एके दिवशीं बायकाची एक प्रचंड मिरवणूक निघून तिने म्युनिसिपालिटींत चाललेल्या एका साधारण सभेस गराडा दिला. अखेर शहराकडे रेफरेंडम पाठविण्याचा विचार घेण्यासाठीं विरुद्ध पक्षाने किर्लोस्कर थिएटरांत एक जाहीर सभा बोलावली. त्यावेळी बळवतरावजी सिंहगडावर आजारी होते. तरी चालकांनीं त्यांना सभेंत मुद्दाम आणिले. मी त्यांचे जवळ बसलों होतो. त्यांना ह्या दंगदंगींत पडावयाचें नव्हते, असे सांगून निदान त्यानीं ह्या खवळलेल्या वातावरणात बोलण्यास तरी उभे राहूं नये म्हणून मी पुष्कळ विनविलें. पण तरी ते बोलूं लागतांच मागून एक तरुणांचा तांडा तुटून आमच्या अंगावर बेफाम आला व पुढूनही अंड्यांचा व भज्यांचा मारा होऊ लागला. शेवटीं लोकमान्यांना बाहेर काढून कशीबशी सभा मध्येंच बंद करून चालकांना घरीं जावें लागलें.

( ७ ) माझी त्यांची शेवटची भेट सोलापुरास गेल्या प्रांतिक सभेच्या वेळीं झाली. तीही धामधुमीचाच प्रसंग होता. सक्तीच्या शिक्षणाचे बाबतींत मी

ज्ञानप्रकाशांत त्यांच्या विरुद्ध फार कडक लेख उघड सहीवर लिहिले, ह्याबद्दल ते मजवर फार रागावले होते. हें मला पुरें माहीत होतें, तरी लवकरच एक अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत मोठें सहभोजन करण्याचा बेत कांहीं पुढाऱ्यांनीं केला होता. अशा भोजनांत मला स्वतःला कांहींच महत्त्व वाटत नव्हतें व अद्यापि नाहीं, तरी पण लोकमान्यांना अशा भोजनाला बोलवावें व तें काम मीच करावें अशी मला मडळींनीं गळ घातली, व मी त्यांच्याकडे गेलोंही. लोकमान्य वरून कठोर पण आंतून कोमल किती होते तें मला तेव्हां नीट नजरेस आलें. सुरतच्या कॉंग्रेसमध्यें किंवा वर वर्णिलेल्या किर्लोस्कर थिएटरांतील सभेंत किंवा तशा इतर प्रसंगीं विरुद्ध असलेल्या प्रचंड जनसमुदायापुढें ते कधीं नमत नसत. जुलुमी सरकारचीही ज्यांनीं कधीं भीड राखली नाहीं तेच बळवतराव एखाद्या लहानसान प्रसंगीं एकाद्या व्यक्तीच्या भिडेस पडून अगदीं मवाळ होत ! तें कसेंहि असो. त्यांची रागाची पहिली तुफानी फेर मजवर झडून गेल्यावर हे लगेच शांत झाले; आणि सोलापुरासच काय पण प्रत्यक्ष पुण्यासही असें सहभोजन झाल्यास त्यांनीं आनदानें येण्याचें कबूल केलें. जाहीरनाम्यावर सही न करण्यानें त्यांच्यावर जें वर्षभर काहूर माजलें होतें तें सर्व ह्या सहभोजनांत मिळून पचविण्याचा त्यांचा मुत्सद्दी विचार मला कळला. पण उपयोग काय ! काळानें त्यांच्यावर लवकरच झडप घातल्यानें सर्व श्रम आटोपला; आता नुसत्या आठवणी उरल्या !

---

## धोंडो वासुदेव विद्वांस.

[ लो. टिळकांचे भाचे, केसरीचे मॅनेजर, हल्लीं जॉइंट ट्रस्टी केसरी मराठा संस्था, लोकमान्यांच्या मृत्युपत्रान्वयें नेमलेले एक्झिक्युटर. ]

( १ ) लोकमान्य मडालेच्या तुरुंगात असतांना त्यांचे दोघे चिरंजीव मॅट्रिकचे वर्गांत होते. मॅट्रिकचा अभ्यास कसा करावा याबद्दल सामान्य सूचना त्यांनीं आपल्या चिरंजीवांचे शिक्षकांस पाठविल्या होत्या. त्या सर्वच विद्यार्थ्यांना व शिक्षकांनाहि बोधप्रद होतील म्हणून पुढें देत आहें.

Mr. × × ×, it seems that the method of teaching must be altered. You have not to teach him a subject as is done in a school; but, must see that he learns the method of studying a subject himself, of concentrating his attention thereon, and of

mastering the same. This will require special care on your part. But without philosophying on the subject, I think I can best tell you how to do it by taking up each subject separately. I begin with :—

**History**:—The boys should be first asked to read a portion—say the reign of a particular king, about 10 or 15 pages. Then they should be orally examined in this and if necessary the teacher should point out all the important passages Then draw up a few-3 or 4 questions on the same section as are likely to be asked in an examination. Then the student should be asked to write down the answers of these questions in brief, with the free assistance of his book. He should do this not in the presence of his teacher but in his private room. These answers should then be corrected by the teacher and the student asked to copy the corrected answers in a fair note book Finish the whole history in this way. The writing thus imposed improves the students' English and teaches him also to concentrate his attention, for though he summarises with the aid of his book he cannot do so without at the time, fixing his attention thereon. Do not use too large a book on history; but one of the compendiums published thereon. I have no faith in notes printed and published by others. The student must be taught to do the work himself. The History of England can be learnt in this way in about two or three months; and once so learnt can never be forgotten.

**Mathematics**:—In Arithemetic and Algebra each subject should be carefully explained—in vernacular if necessary—and then a few typical examples or equations selected for practice. After these examples are worked out—in the teacher's presence, the student is asked to copy them in a fair notebook. So that these notebooks revised on the day previous to the examination are sufficient to refresh the leading methods of work in Arithmetic and Algebra. The numbers of Examples in both these subjects especially worked in this way, should not exceed one hundred.

N. B.—Note that students generally forget the process of Decimal Divisions, Square and Cubic Root or the G. C. M. process in Arithmetic and Algebra. These should be specially revised very often. Then in selecting examples select a few from each kind—e. g., Time and Work,

Compound Interest, Stocks. They should not be the most difficult. But partly simple and partly of midium difficulty. The same remark applies to Algebraical problems, euqations and identities The object is to secure a sound knowledge in each subject.

**English:**—Boys should have, once a week at least, exercises in tabular analysis and parsing set to them They need not be entered in a fair book. So also it is necessary to train them in the Direct and Indirect constructions, rules about tenses, a few synonyms &c, but without entering into too many details About 25 per cent. of marks in each question paper are generally devoted to these mechanical subjects and hence its importance. The boys should be also now and then asked to paraphrase a piece a piece of English poetry, the translation exercise be set once a week at least Above all see that one simple English book like the Gulliver's Travels—or selected passages therefrom or from a similar book—not exceeding about 50 or 60 pages octavo are thoroughly mastered—nay learnt by heart if possible Always converse with the boys in English and make them reply in the same language

**Sanskrit:**—As for Grammar, I would confine to Bhandarkar's or Gole's books Instead of taking the boys to learn dry rules or difficult portions e g., frequentative or desiderative etc, confine to ordinary declensions and simple tenses—like the present, past and futures, imperative and potential. The knowledge of other portions may be more or less accurate, but of those indicated above should be thorough and accurate, so that a student should find no hesitation in answering any question in them. A few rules of *Karaka* ( cases Govt ) should be added from Apte's guide or the Kaumudi. Along with these, I would continue the reading of Hitopadesha—not continuous—but selected portions and learning by heart the important verses therein which improves Sanskrit composition. Care should be taken that whatever the boys knew, they know it thoroughly and definitely. It matters not if they omit the complicated portions of Grammar, but they must be able to thoroughly answer the ordinary questions For this purpose weekly examinations in selected portions should be held, or a fair notebook of grammatical forms should be kept up.

Generally:—To succeed in the Matric, it is not necessary to have any great proficiency. It is an ordinary examination. Only a preliminary to Higher Education. Whatever a student knows he should know it definitely; and similarly, 25 per cent. of marks are required to be obtained for passing, it does not affect a student's prospect if he omits the most difficult parts of subjects prescribed. Many students in attempting to master these parts neglect the ordinary ones; and then know neither. It is therefore absolutely necessary to cultivate amongst the students a habit of studying a definite thing in a definite way. This habit is of great use in after life, and its cultivation should be attended to from the beginning. I should further request you to create an interest in the Subjects taught. Frequent questioning and conversing with them is enough for the purpose. Sometimes a student knows a subject and is able to answer in the vernacular but fails to do so in English. This is specially the case in Science and Sanskrit grammar. It is therefore necessary to see—after explaining the subjects in Vernacular if necessary—that proper English words and expressions are accurately learnt in each case. The best way to secure this object is to make a student repeat verbally and in writing, these subjects in English. In short I should like to see the students *Taught to Work* as we do in our college-course. For better concentrating the attention, the practice of *Japa,* for about 15 or 20 minutes a day is very useful. And this should be freely tried Also some students are not able to grasp a subject, if you teach them all the subjects every day—So finish these subjects by taking them one after another. Thus the writing of Exercise book mentioned above may be taken up only in History for the first two months, the next two months may be devoted to Sanskrit or Mathematics and so on. This is my method of studying a subject. It is necessary nevertheless, to see that a student does not forget what he has learnt of other subjects; and so while devoting special attention to one subject at a time, a general teaching and revision of others should be kept up—especially when the examination time approaches

B. G. TILAK.

( २ ) १८९८ मध्यें लोकमान्यांवर पहिला राजद्रोहाचा खटला झाला. सर्व परिस्थिति लक्षांत घेतां सरकारची माफी मागणें ज्यास्त श्रेयस्कर, असा त्यांच्या कांहीं जिवलग मित्रांनीं देखील त्यांस सल्ला दिला. अर्थात् लोकमान्यांच्या बाणेदार स्वभावाला असला भीरुपणाचा सल्ला रुचला नाहीं. त्यावेळेस त्यांनीं सहज आपले मित्र बाबू मोतीलाल घोस यांस पाठविलेल्या पुढील पत्रावरून त्यांच्या स्वाभावाची चांगलीच ओळख पटेल:—

"प्रत्यक्ष रीतीनें मी दोषी आहें असेंच कबूल करावें असे विरुद्ध पक्षाचें म्हणणें आहे; ही गोष्ट करावयाला मी साफ तयार नाहीं. समाजांतील माझा दर्जा सर्वतोपरि माझ्या शीलावरच अवलंबून आहे. अशा खटल्यानीं मी जर भेदरून गेलों तर मी महाराष्ट्रांत राहणें जितकें चांगलें तितकेंच मंडालेमध्यें राहणेंहि चांगलें आहे. माझ्या विरुद्ध असलेला पुरावा अगदीं पोकळ आहे. नुसत्या मुद्याचाच विचार केला तर माझा बाजूनें विजय झालाच पाहिजे, असा माझा पूर्ण भरंवसा आहे; मला जर भीति वाटत असली तर ती न्यायाची नव्हे तर ज्यांना मराठी येत नाहीं अशा ज्यूरीची; परंतु आपल्याला जर सदैव राजकारणांतच राहावयाचें आहे तर अशा संकटांना नेहेमीं तयार राहिलेंच पाहिजे. तुम्ही सर्वच सांगता म्हणून मी एवढीच गोष्ट बोलण्यास तयार आहें कीं, 'माझ्या मतें लेख बिलकूल राजद्रोहि नाहींत, सरकारच्या सल्लागारांना तसे वाटत नाहीं, मी दिलगीर आहें !' परतु यानें सरकारचें काय समाधान होणार ? सरकारचा मुख्य उद्देश पुण्यांतील पुढाऱ्यांना माना खालीं घालावयास लावण्याचा आहे. परतु × × याच्याप्रमाणें माझी लेखणी लेचीपेची नाहीं, असे सरकारला समजून येईल शिवाय तुम्ही हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, कांहीं एका मर्यादेच्या पलीकडे आपण लोकांचे, जनतेचे नोकर आहोंत. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं आपण जर आपणांत धैर्य नाहीं असें दाखविलें तर आपण लोकांचा विश्वासघात केल्यासारखें होऊन त्यांची निराशा होईल. परतु सर्वांत मुख्य गोष्ट राजद्रोहाचा गुन्हा मी केला नसता, मी दोषी आहें असें माझ्यासारख्या गृहस्थानें म्हणणें योग्य होईल कां ? जर मला शिक्षा झाली तर लोकांची सहानुभूतिच मला आपत्कालीं धैर्य देईल अशी माझी समजूत आहे."

# रामचंद्र हरि गोखले

[ लोकमान्यांचे स्नेही, वकील वडोदें. ]

(१) माझा लोकमान्यांशीं संबंध किंवा ओळख ही रा. रा. बापट यांचे फौजदारी मुकदम्याचे संबंधीं सन १८९५ सालीं काम चाललें होते त्यावेळीं झाली. रा. रा. दाजीसाहेब खरे व वकील महादेव चिमणाजी आपटे हे समागमें होते. प्रथम आठपधरा दिवस लोकमान्यांचा मुक्काम माझे येथे होता. जेवणखाणहि माझेच येथें होत असे. त्या वेळचे आठपधरा दिवस त्यांचे दिनचर्येचा क्रम पाहून मी आश्चर्यचकीतच झालो होतों. एखादें एन्जीन देखील काम करतांना थांबेल, त्याच्यामध्यें जळण किंवा इतर सामुग्री कमी झाली म्हणजे त्याची हालचाल स्वाभाविकरीत्या कमी होत जाते. पण लोकमान्यांची स्थिति तशी दिसली नाहीं. ते काम करण्यास बसले म्हणजे आजूबाजूला कितीहि मडळी असली तरी त्या सर्वांशीं बोलून किंवा त्यास उत्तर देण्याचें चालू ठेऊन ते आपले स्वतःचें लिहिण्याचें काम अथवा मनन करण्याचें काम बिनधोक चालवीत असत व तसे करण्यामध्यें कितीहि कलाक लागले तरी त्याची त्यांस परवा नसे. ६ कलाक, ८ कलाक किंवा १० कलाक लागले तरी त्याची त्यांस दिकत न वाटतां सतत डोक्याचें काम ते करीत असत व शेजारी किंवा रस्त्यावरून वाजत्री, नगारे वगैरे वाजवीत वरघोडे जात असतांहि त्यांचे कामांत त्यास कधींहि व्यत्यय वाटला नाहीं. बापटांचा खटला चालत असतांना श्रीयुत लोकमान्यांस झोप अशी जवळ जवळ माहीतच नव्हती. सतत २४ तास काम करणें म्हणजे त्याचा हातखंडा होता. इतर बरोबरीची मदत करणारी मडळी थकल्यानें, भूक लागल्यानें, झोंप आल्यानें, उठून जात; असत परंतु लोकमान्यांचे काम चालूच रहात असे.

(२) प्रथम सात दिवस बापटांतर्फे केस चालविण्याकरितां रा. रा. आपटे वकील होते. श्रीमंत महाराणी जमनाबाईसाहेब यांनीं लोकमान्यांचे मागणीवरून आपला बेलबागेचा बंगला बापटांस व त्यांचे वकीलास उतरण्याकरितां दिला होता. तेथें रा. रा. दाजी आबाजी खरे, आपटे व लोकमान्य रहात असत. पहिले सात दिवस खटला चालला त्यावेळीं रा. आपटे उलट तपास करीत. त्यांचा उलट तपास फारच थोडा पण मुद्याचा असे. परंतु ही गोष्ट लोकमान्याच्या लक्षांत न येतां ते कुरकुर करीत असत कीं, 'रा. आपटे उलट तपास फार थोडा करितात, विचारावयाचे तें सर्व विचारीत नाहींत' वगैरे. परंतु ही गोष्ट प्रत्यक्ष रा. आपटे यांस सांगण्यास रा. खरे अथवा लोकमान्य धजले नाहींत. आबाहून मात्र अशी कुरकुर चालत असे. त्यावेळीं सर फिरोजशाहा मेहेता हे सरकारतर्फे प्रासिक्युशनचे काम करीत असत व समोर रा. आपटे असल्या-

कारणांनीं सर फिरोजशाहाहि त्यास वचकत असत. सात दिवसांत बापटाविरुद्ध बारपाच कामें संपलीं. शनिवार येतांच सर फिरोजशाहा काम सोडून गेले व रा. रा. आपटेहि प्रकृति बरी नसल्यानें काम सोडून मुंबईस गेले ते पुन्हा बडोद्यास त्या कामासाठीं आले नाहींत. थोड्याच दिवसांनीं त्यास देवाज्ञा झाली, त्यामुळें बाकी राहिलेल्या आरोपासंबधीं चौकशी चालत होती, त्यांत उलट तपासाचें काम रा. खरे यांनीं केलें. व पुढें साक्षीतपासाचें काम बंद होऊन डिफेन्स सुरू कर-ण्याची वेळ आली. रा. आपटे वकील असते तर त्यांनीं कदाचित् एकदम तोंडीं तक्रार केली असती. परंतु तसें करण्यास रा. खरे तयार नव्हते व लेखी डिफेन्स द्यावा असें ठरलें. लेखी डिफेन्स तयार नव्हताच; परंतु एक एक दोन दोन आरोपाबद्दल लेखी डिफेन्स तयार करून रोज कोर्टांत वाचून दाखवावा असें ठरले. परंतु रोज लेखी डिफेन्स तयार तर झाला पाहिजेच. एकंदर १०।१२ आरोप जे होते त्याची वांटणी श्रीयुत लोकमान्य व खरे यांनीं आपसांत करून घेतली व प्रत्येकानीं आपआपल्याकडे सोंपून घेतलेल्या आरोपाची हकीकत लिहिण्यास सुरुवात केली. रोज रात्रीं जेवण करून बसत. मुकदमा गुजराथींत ( भाषेंत ) चालला तरी गुजराथी भाषेंतील जबान्या वाचून काम चालवून घेत व तेवढ्यावरच काम भागत असे. प्रत्येक आरोपासंबधीं हकीकत वाचावी व त्यानंतर लिहिण्यास सुरवात करावी. रोज एक कीं दोन आरोपाबद्दल डिफेन्स तयार झाला म्हणजे दुसरे दिवशीं तेवढा मी जाऊन कोर्टांत वाचावा हा क्रम दोन चार दिवस चालला. डिफेन्स लिहितांना मुद्दे कोणते ते त्यांनीं ठरवावे व त्या मुद्यावर पुरावा तपासून लिहिण्याचें काम करावें. याप्रमाणें लिहित असतांना रा. रा. आपटे यांनीं चालविलेल्या पाससहा मुकदम्यासंबधीं त्यांचे असें लक्षांत आले कीं, आपण रा. आपटे याचा दोष काढीत होतो तो खोटा. जरी त्याचा उलट तपास थोडा तरी तो मुद्देसूद होता आणि त्यांनीं जे जे मुद्दे काढावे त्या त्या मुद्यावर रा. आपटे याचा उलट तपास स्पष्ट, खुलासेवार आणि बिनचुक असे. हें पाहून लोकमान्यांस आश्चर्य वाटे.

(३) एके दिवशीं सकाळीं यासंबधीं रा. आपटे यांच्याशीं बोलत असतां कांहीं गोष्ट लोकमान्यांनीं सांगितली ( कोणती ती आता माझ्या लक्षांत नाहीं. ) रा. आपटे लोकमान्यांना ' अरे बळवंतराव ' अशी हाक मारीत असत. तेव्हां आपटे म्हणाले, ' अरे बळवंतराव, ही कोर्टांत वकीलांत करण्याची गोष्ट आहे, वर्त-मानपत्रांत आरडाओरड करण्याची गोष्ट नाहीं !' याप्रमाणें आपटे बोलल्यावर लोकमान्य गप्प बसले. रा. आपटे याचा लोकमान्य फार मान ठेवीत असत.

(४) वासुदेवराव बापटांच्या केसचे वेळीं दिवाणबहादुर मणिभाई दिवाण असत. बापटाशीं त्यांचा ज्यांचा संबंध त्या सर्वांवर सरकारचा संशय व त्यांजवर सतत देखरेख असे. रेसिडेन्सीचा फार धाक वाटत असे. मी जरी कँपातील देऊळ

कोर्टामध्ये सरकारी वकिलाप्रमाणें काम करीत होतो तरी मी रा. बापटांचा वकील झालों म्हणून मजवर अवकृपा व सनद काढून घेण्यापर्यंत धमकीची मजल आली होती. लोकमान्य फार धाडशी असून अशा स्थितींतहि एकटे बेधडक फिरत असत. पोलीसचा फार सुळसुळाट होता. जिकडे जिकडे लोकमान्य जात तिकडे तिकडे त्यांचेमागें एक पोलीसचा किंवा इतर डिटेक्टिव्ह शिपाई असेच. लोकमान्यांनीं ५।६ दिवस ते सहन केले; परतु शेवट एक वेळीं आमच्या त्या वेळच्या दिवाणाना चिठ्ठी लिहिली कीं, 'हे तुमचे पोलीसचे किंवा डिटेक्टिव्हचे शिपाई माझ्या मागून फिरतात, परतु मी कोठें कोठें जातो व काय काय करितों हे त्यांस कांहीं कळत नाहीं म्हणून आपले व त्यांचे श्रम वाचविण्याकरितां मी आपली स्वतःची डायरी कोठे गेलों, काय केलें याबद्दल उद्यांपासून नियमीत पाठवीत जाईन !' याप्रमाणें चिठ्ठी पोंचतांच लोकमान्यांमागें पोलीसचे किंवा डिटेक्टिव्हचे शिपाई फिरणें बद झालें !

(५) शेवटीं एक आठवण कळविण्याची ती लोकमान्यांच्या प्रकृतीबद्दल होय. लोकमान्यांचा बांधा जरी उंच नव्हता तरी ते शरीराने सदृढ असत. कामाला जरी पुष्कळ वेळ बसत तरी झोंप घेण्याकरितां बिछान्यावर आडवे झाले की, त्यांना झोंप येत असे. माझेपेक्षां लोकमान्य पांच सहा वर्षें वयाने मोठे होते. माझीहि प्रकृति त्यावेळीं चांगली होती आणि मला वाटत असे कीं, माझ्यासारखे त्यांचे जेवण नसेल. परतु ती माझी चूक आहे असे मला कळले. लोकमान्य जेवावयास बसले म्हणजे स्वस्थपणाने अर्धा पाऊण तास जेवण जेवीत असत. पहिला भात, भाजी, चटणी वगैरे सर्व खाऊन त्याबरोबर पांच सहा पोळ्या ( घडीच्या ) ते पचवीत असत ! तात्पर्य त्यांचें जेवणहि चांगलें असे. पचनशक्तीहि उत्तम होती.

---

## विष्णु महादेव भट

[ बी. ए., एम्. बी. बी. एस्. माजी उपसंपादक 'मराठा', डॉक्टर येवले. ]

( १ ) लोकमान्याचा व माझा प्रत्यक्ष व निकट असा संबंध १९१५ च्या पूर्वी फारच थोडा आला. त्यापूर्वी, मी त्यांच्या दूरच्या नातेवाइकांपैकी असल्यानें, ते मला ओळखीत असत. आणि त्यांच्या लहानपणीं माझे आजोबा, त्यांचे चुलतमामा, असताना, ते त्यांचेकडे येतहि असत असें माझी आजी सांगत असे. पण प्रत्यक्ष त्यांचा व माझा संबंध १९१५ पूर्वी फारसा आला नाहीं. उलट त्यांची मज विषयींची आठवण म्हणजे त्यांच्यापेक्षाहि जहाल असलेल्या आणि म्हणून किंचितशा त्यांच्याविरुद्ध जाणाऱ्या, पक्षापैकीं एक मी होतों, अशीच होती. १९०४।१९०५ मध्ये आमच्या नाशिकच्या मित्र मेळ्यांतील कांहीं मुलें पुण्यास गणेशोत्सवांत सन्मित्र समाज मेळ्याशीं चढाओढ करण्याकरिता आलीं होतीं, त्यावेळेस त्यांचेसह मी लोकमान्यांकडे गेलों होतों. त्यांनीं आमच्या मेळ्यांतील देशभक्तीने गुरगुरणाऱ्या पद्यांची, तीं रचणाऱ्या सुप्रसिद्ध देशभक्त 'गोविंद' कवीची, मुलांच्या म्हणण्याच्या सुरेल पद्धतींची व शिस्तीची तारीफ केली होती. त्या कवि "गोविंदा" विषयींची त्यांची स्मृति शेवटपर्यंत तशीच जागृत असे.

(२) १९०८ मध्यें जेव्हां त्यांचेवर खटला झाला त्यावेळेस मी मुंबईस लॉ क्लासमध्ये एल्. एल्. बी च्या टर्मस् भरीत होतों टिळकांस शिक्षा झाल्यावर मुंबईस गिरणीच्या मजुरांनीं चिडून जाऊन सरकाराविरुद्ध जेव्हां दंगा केला तेव्हां त्यांजवर गोळ्या झाडण्यांत आल्या. त्यामुळें बरेच लोक जखमी होऊन जे. जे. हॉस्पिटलमध्यें उपचारार्थ पोलीसमार्फत आले होते. त्यावेळीं मी मेडिकल कॉलेजमध्ये शिकत असल्याने त्यांच्यांशीं संभाषण करण्याची संधि मला मिळत असे. त्यांच्या मनांतली टिळकांबद्दलची पूज्यबुद्धी पाहून खरोखरच आम्हा विद्यार्थ्यांस गहिंवर येई "त्यांच्याकरितां आम्ही प्राणाची होळी करावयास तयार आहोत" असे त्यांचे शब्द ऐकून श्रीछपत्रतीच्या एकनिष्ठ मावळ्यांचीच आठवण होत असे.

(३) १९१५ मध्ये मी तुरुंगांतून नासिकाच्या खटल्याचें पंचवार्षिक प्रायश्चित्त घेऊन सुटून आल्यावर पाहतों तों, आम्हास साहसास प्रवृत्त करणारे व ज्यांना आम्ही टिळकापेक्षाहि श्रेष्ठ मानीत होतों असे पुढारी हतप्रभ झालेले दिसले. त्यांच्या शिकवणीमुळें उत्तेजित होऊन आम्ही जो मार्ग पतकरिला होता त्यांत अपयश आल्यानें व सरकारी अवकृपेचा वरवंटा महाराष्ट्रावर फिरल्यानें सर्व राजकीय चळवळ मंदावली होती. पण आम्हांस त्या पुढाऱ्याविषयीं अशी आशा वाटत होती कीं, हे आमचे माझिनी–गॅरिबॉल्डी एखाद दुसऱ्या पिच्छेहाटीनें खचून

जाणार नाहींत, आणि आम्हांस कांहीं तरी मदत करतील. पण ही आमची आशा खोटी ठरली. हल्लीं प्रमाणें इतर लोकहि तेव्हां फारसे धीट झाले नव्हते. सरकारच्या परिचारक ज्याचे मार्गे सारखा २४ तास तिष्ठत आहे अशा व सरकारनें "बदखोर" ठरविलेल्या पण लायक इसमास आश्रय देण्यास व्यापारी व धनिक वर्ग तेव्हां तयार नव्हता. त्यामुळें मजसारख्या दरिद्री पण पदवीधर असलेल्या माणसास कोणीहि नोकरीस ठेवण्यास तयार होईना. अशा स्थितींत ८।१० महिने मी काढले. लोकमान्यांस भेटून 'केसरी' ऑफिसांत शिरावें अशी वारंवार इच्छा होई. पण सगोदरच सरकाराची वक्रदृष्टी असलेल्या व दोनदां राजद्रोही ठरलेल्या 'केसरी'त मजसारख्या सरकारविरुद्ध बंडखोरीचा आरोप असलेल्या माणसानें जाणें केसरीच्या स्थैर्याच्या दृष्टीनें गैर आहे, असें वाटून मी थबकत होतों. पण १९१५ च्या नोव्हेंबरांत माझी सांपत्तिक दुःस्थिति अत्यंत हलाखीची स्थिति झाली. शेवटीं काय होईल तें होवो आपण एकदा लोकमान्यास भेटावेंच असें मी ठरविलें. पण पुन्हां अशी शंका येई कीं, मागे त्यांच्याशीं किंचित्शा विरोधी असलेल्या जहाल कंपूपैकीं मी असल्याने ते मला थारा देतील कीं नाहीं? पण प्रत्येक बाजूने नाइलाजाच्या कोंडींत सांडल्यानें मी अगदीं हताश झालों होतों. निराशेच्या धैर्यानें एक दिवस मी त्यांना भेटलोंच, तों काय? त्यांच्या मजविषयींच्या वात्सल्यदृष्टीनें मी क्षणांत विस्मित होऊन गेलों! त्या उदारचरित विभूतीच्या उदात्ततेनें, धैर्यानें, राष्ट्रकार्यांत होरपळलेल्याविषयीं असलेल्या आस्थेनें, व सहाय्यतत्परतेनें माझी उपरिनिर्दिष्ट शंका पार मावळून गेली. व त्यांनीं सांगितलेल्या त्यांच्या स्वतःच्या साहसी प्रयत्नाच्या हकीकतीनें ह्या मोहिम्याविषयीं आमच्या कंपूच्या मनांत अजाणपणानेंच कां होईना, पण असलेल्या आढीविषयीं माझी मलाच लाज वाटूं लागली. माझी स्थिति पहातांच त्यांनीं मला काय हवी असेल तेवढी रकम घेऊन जा, व ती मदत किंवा तें कर्ज मानू नका, असें प्रेमळपणानें व जिव्हाळ्यानें सांगितलें. माझ्या जिवावरचें मोठें ओझें एकदम कमी झाल्यासारखें मला वाटलें. सरकारनें चोहोंकडून कोंडमारा केलेल्या स्थितींतहि स्वतंत्रपणें वागण्यास वाव देणारा एक प्रेमळ पुढारी मला भेटल्यानें माझी सर्व काळजी एकदम दूर झाली. सर्व बाजूंनीं घेरलेल्या निराशेच्या अंधकारांत हा एक रविकिरण माझा मार्ग उज्वल करील अशी मला आशा वाटूं लागली आणि ह्या उदार महात्म्यानें त्याप्रमाणें केलेंहि!

( ४ ) मला त्यावेळीं कांहीं रुपयांची जरूर भासत होती. ती रकम त्यांनीं मला तावडतोब दिली. इतकी थोडीच रकम मी मागितल्याबद्दल त्यांनीं थोडेसें आश्चर्य व कौतुकहि प्रदर्शित केलें. पण लगेच त्यांनीं "मी पुढें काय करणार" हा प्रश्न विचारला. मीं त्यावेळेस पुन्हां मेडिकल कॉलेजमध्यें शिरून

माझा राहिलेला २ वर्षांचा शिक्षणक्रम पुरा करण्याच्या खटपटींत होतो. तें नच जमलें तर उरलेली सेकंड एल्. एल्. बी ची परीक्षा द्यावी असाहि माझा बेत होता. पहिल्या मेडिकल कॉलेजच्या खटपटींत कदाचित् यश आलें तर मला द्रव्याश्रयाची जरूर लागेल असें मी त्यांना सुचविलें. तेव्हां ते चटकन मला म्हणाले कीं, 'तुमचा प्रयत्न सफल झाल्यास माझ्या रामभाऊप्रमाणें (लोकमान्यांचे ज्येष्ठ चिरंजीव हे मेडिकल कॉलेजमध्यें शिकत होते)—मी तुम्हालाहि पैशाची जरूर तेवढी मदत करीन. तुम्ही निश्चिंत असा" हे शब्द ऐकून माझा त्यांच्या उदारचारित्र्याविषयींचा ग्रह आणखी दुणावला. पोटच्या पोराप्रमाणें मला ते वागवावयास तयार झाले हें पाहून मला गहिंवर आला. "माझ्या रामभाऊस तुम्ही जोडीदार झाल्यानें त्यालाहि मदत होईल व तुमचीहि परीक्षा पास होईल" असें ते म्हणाले. "व तुम्ही तुमच्या खटपटीस लागा. विलंब लावू नका" असें म्हणून त्यांनीं मला निरोप दिला.

( ५ ) माझ्या त्यावेळच्या प्रयत्नास यश आलें नाहीं. ग्रँट मेडिकल कॉलेजचे प्रिन्सिपाल कर्नल स्ट्रीट हे मला कॉलेजमध्यें शिरू देण्याच्या विरुद्ध होते. आपल्या प्रतिपक्षाला एकदा त्याच्या राजकीय मताबद्दल शिक्षा भोगावयास लावल्यावरहि पुन्हा त्यांस आजन्म त्रास भोगावयास लावणाऱ्या कांहीं क्षुद्रबुद्धी ॲंग्लोइंडियनी अरेरावांपैकीं, ते होते. त्यांचा विरोध असल्यामुळें सर्जन जनरल व सरकार ऐंहि माझी बाजू उचलून धरावयास तयार नव्हते. ही अँग्लोइंडियनी अरेरावीची हकीकत मोठी मनोरंजक आहे. पण ती देण्याचें हें स्थल नसल्यानें ती येथेंच सोडून देणें प्राप्त आहे. टिळकांना मी हा सर्व पत्रव्यवहार दाखवीत होतों. व त्यांच्या सल्ल्यानेंच ह्या सर्व खटपटी चालल्या होत्या. मेडिकल कॉलेजमध्यें तूर्त तरी शिरकाव होत नाहीं, असें ठरल्यावर एल्एल्. बीची परीक्षा द्यावी असा घूट निघाला. पण माझी बी. ए. ची पदवी विश्वविद्यालयानें काढून घेतली असल्यानें ती परत मिळेपर्यंत मला ती परीक्षाहि देणें शक्य नव्हतें. म्हणून टिळकांच्या सल्ल्यानें मी आमच्या खटल्यातले न्यायमूर्ति व १९१५-१६ सालीं विश्वविद्यालयाच्या कायद्याच्या शाखेचे सिंडिक व व्हाइस चान्सेलर असलेल्या कै. न्या. चंदावरकरांस भेटावयास गेलों. त्यांच्याशीं माझा पत्रव्यवहार चालूच होता. चंदावरकरांनीं अगदीं न्यायमूर्तीत्वाचा मोठा आव आणून मला सांगितलें कीं, "युनिव्हर्सिटी ॲक्टाप्रमाणें एकदां काढून टाकलेली बी. ए. ची पदवी पुन्हां तुम्हाला देतां येईल असें मला वाटत नाहीं." मी आश्चर्यानें स्तिमित झालों! कर्नल स्ट्रीटची मनोवृत्ति एकपक्षीं मला क्षम्य वाटली. पण खुद्द चंदावरकरांची पाहिली तर त्याच्याहि वर ताण! हें चंदावरकरांचें मत बरोबर नव्हतें; पुढें सर चिमणलाल सेटलवाड ह्यांनीं तें बदलून कोणालाहि पदवी परत देतां येतें हें मला बी. ए ची पदवी देऊन दाखविल्यावरून स्पष्ट आहे.

टिळकांसहि चंदावरकरांचें हें वर्तन पाहून आश्चर्य वाटलें. आणि ' कुऱ्हाडीचे दांडे गोतास असे काळ होतात ' असें ते म्हणाले. असो; हें सांगण्याचा मतलब इतकाच कीं, " मी पुढे काय करणार " हा मजबद्दल स्वतःला टिळकांनीं गुतवून घेतलेला प्रश्न निरुत्तरच राहिला आणि त्यांचें उत्तर त्यांनीं दोन तऱ्हांनीं मला सुचविलें.

(६) पहिला त्यांनीं सुचविलेला मार्ग म्हणजे मी स्वदेशी कापडाचे व व्हाइट-अवे लेडलॉ कपनीप्रमाणे सर्व स्वदेशी कपडे तयार करून ते विकण्याचे एक मोठें दुकान मुंबईस काढावें. ही त्यांची मनांतली योजना पूर्ण करण्यास ते मला १०००० रुपये मांडवल द्यावयास तयार होते. त्यांचे म्हणणे असे कीं, मुंबईस ' मुंबई को-ऑपरेटिव्ह स्वदेशी स्टोअर ' मध्यें कांहीं दिवस उमेदवार म्हणून राहून तेथील सर्व खरेदी-विक्री वगैरे व्यवहार समजून घ्यावा व मग दुकान थाटावें. मला ही योजना माझ्या स्वतःच्या कौटुंबिक दृष्टीनें व इतर दृष्टींनीं पटेना. कुटुंबाचा रोजचा चरितार्थ चालविणे हें मला मुंबईस उमेदवारीच्या पगारावर शक्य नव्हते. ही माझ्या मार्गांतली मोठीच अडचण होती व ती त्यांनाहि पटली. दुसरे असे कीं, मला ह्या धंद्याची हौस नव्हती, अनुभव तर मुळींच नव्हता. आजपर्यंतचे माझें सर्व शिक्षण वाङ्मय, कायदा व वैद्यकी ह्या शाखांतून झालेले असल्याने व राजकीय प्रकरणात मनाला हौस वाटत असल्यानें, अष्टौप्रहर वार-कार्त्रीशीं खिळून बसणें मनाला आवडत नव्हतें. मी टिळकांना ही गोष्ट स्पष्ट सांगितली व ह्या मानसिक वृत्तीमुळे जर वरील धंद्यात अपयश आलें, व तुमचे-( टिळकांचे ) १०००० रुपये बुडाले, तर मला जगांत कोणीहि थारा देणार नाहीं, हीहि गोष्ट त्यांच्या नजरेस आणली. तेव्हां " तुम्ही त्या धंद्याला लायक नाहीं, तुम्ही ब्राह्मण असेच अल्प संतोषी रहाणार, स्वतः व्यापार करून हजारों रुपये कमावण्याचें तुमच्या नशिबींच नाहीं " असें जरा निराशेनेंच ते मला म्हणाले. " मी ही माझी योजना अमलांत आणण्यास लायक माणूस हुडकीत आहे; मी स्वतः ' स्टोअर ' मध्यें डायरेक्टर असल्यानें सहज ह्या गोष्टी मी करूं शकेन, भांडवलाचीहि अडचण भासूं देत नाहीं; तरी पण माणूस मिळत नाहीं. जो उठतो तो राजकारणांत पडतो, पण राजकारण म्हणजेच कांहीं कार्यक्षेत्र नव्हे. आपल्या लोकांनीं धंद्यांतहि पडलें पाहिजे. व्हाइट अवे लेडलॉ, ईव्हॅन्स फ्रेझर वगैरे कंपन्या केवढाले व्यवहार करीत आहेत तिकडे आमचे लक्षच नाहीं" वगैरे वगैरे ते मला म्हणाले. 'आम्हां सुशिक्षित ब्राह्मण लोकांस वैश्यवृत्ति पसत नाहीं' ही गोष्ट मी प्रांजलपणें कबूल केली. मनाची ही त्यांची तळमळ शांत झाल्यावर पुन्हां ' मग पुढे मी काय करावयाचें ' हा प्रश्न त्यांनीं मलाच विचारला. मी त्यांना सांगितलें कीं, "मजजवळ फक्त वाङ्मयाचें भांडवल आहे. फर्ग्युसन कॉलेजमध्यें ४ थ्या क्रमांत एक लेखी साप्ताहिक अंदमानांतून सुटून

आलेले माझे मित्र विनायकराव सावरकर व मी मिळून चालवीत होतों व माजी 'विहारी' पत्रांतहि ते व मी लिहीत होतों. त्यामुळें वर्तमानपत्रांत लिहिण्याची कला मला अवगत होती. एलएल्. बी पर्यंत अभ्यासहि झाला असल्यानें वृत्तपत्रांचे राजद्रोह वगैरे अपमृत्यु कसे टाळावे, हेंहि माहीत होतें. त्यामुळें मी 'केसरी-मराठा' वृत्तपत्रात लेखक म्हणून राहू शकेन, माझे लेख पसंत पडल्यास आपण मला कायम करावें" असें मी त्यांना सुचविलें.

(७) त्यांना त्यावेळेस दुय्यम संपादक मंडळींत एका माणसाची उणीव भासत होती. माझ्याबद्दलची अवांतर माहिती त्यांना होतीच. लोकमान्यांनीं केळकरांना मजबद्दल विचारलें. नरसोपंत केळकरांनीं माझ्या उपरिनिर्दिष्ट प्रयत्नात मला हवी ती मदत उत्साहानें केली होती. 'केसरी मराठा' संस्थेत त्या संस्थेचा एक सदस्य म्हणून मला घ्यावयास त्यांचीहि संमति ताबडतोब मिळाली. ह्यामुळें माझा त्या संस्थेत जानेवारी १९१६मध्यें प्रवेश झाला. प्रवेशापूर्वी लोकमान्यांनीं मला संपादकीय धोरणाबद्दल जो उपदेश केला त्यात त्यांच्या संपादकीयत्वाचें सारसर्वस्व होतें. त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ असा कीं, त्यांना केसरी नुसतां लिहितां येत होता इतकेंच नव्हे तर खिळे जुळविणें, ग्याल्या पाडणें, प्रुफें तपासणें, प्रेसवर मजकूर बांधणें-टाकणें, मशीन चालवणें व तो छापून काढणें हीं सर्व कामें त्यांनीं स्वतः केलीं होतीं. म्यानेजिंगचे कामांतीलहि खडानखडा माहिती त्यांनीं मिळविली होती. मशीन उभारणें, तें नादुरुस्त असल्यास दुरुस्त करणें, वगैरे यच्चयावत् कामें त्यांच्या हातातून गेलीं होतीं. फार काय 'केसरी' गांवात वाटण्याचेंहि काम मोठ्या पहाटेस उठून त्यांनीं व आगरकरांनीं केलें होतें. केसरी कारखान्यात असें एकहि काम नव्हतें कीं, जें त्यांनीं केलें नव्हतें. यामुळे ते म्हणाले "माझा वचक सर्व माणसांवर आहे. तुम्ही नवीन माणसें आतां गोळा होत आहांत, तुम्हाला ही खुर्च्या, टेबलें, ऑफिस वगैरे थाट आयता मिळतो. मला ह्यांपैकीं एकहि गोष्ट नव्हती. वळकटीवर पाट टाकला कीं, माझें टेबलाचें काम भागे. आतां ऑफिसची सुस्थिति आहे म्हणून तुम्हांलाहि मी माझ्याप्रमाणें दिवस काढा असें म्हणत नाहीं. पण जर तुम्हांस आपल्या कारखान्याचा, पत्राचा व त्याच्या यच्चयावत् व्यवस्थेचा जिव्हाळा असेल, तर तुम्हास मी सांगितलेलीं, व स्वतः केलेलीं, सर्व कामें शिकून घेतलीं पाहिजेत, ह्यासाठीं तुम्ही यंत्राची, टाइप फौंड्रीची वगैरे सर्व माहिती मिळविली पाहिजे. तुम्ही हवे तेव्हा, हवें तसें, हवें इतके लिहूं शकाल. पण ही अवांतर माहिती तुम्हांला अपरिचित असल्यानें शिकाल तरच मिळेल." नंतर 'केसरी'च्या धोरणाबद्दल मला त्यांनीं बऱ्याच गोष्टी सांगितल्या. त्यातील सार हे कीं, 'केसरी' हा महाराष्ट्रांत वृत्तपत्रांच्या शिरोभागींच चमकला पाहिजे. लोकांना स्वदेशाभिमानाचें, स्वार्थत्यागाचें, स्वातंत्र्याचें शिक्षण देऊन त्यांना ह्या पारतंत्र्यांतून वर निघण्याकरितां परिस्थित्यनुसार जे जे मार्ग आढळे-

तील, किंवा इतिहासाला ज्ञात असतील, ते ते सर्व मार्ग चोखाळण्याला लोकांना 'केसरी'नें तयार केलें पाहिजे. लोकांना ह्या गोष्टींचें ज्ञान नसतें. इतकेंच नव्हे तर बहुजनसमाज ह्या बाबतींत विचार करून योग्य उपाय शोधून काढण्यास अपात्र असतो. तो ह्या असल्या पुढारी वृत्तपत्रांकडे किंवा पुढाऱ्याकडेच मार्ग-दर्शित्वाबद्दल पहात असतो. म्हणून 'केसरी'ने हें मार्गदर्शित्व पतकरिलें आहे, आणि ते संपादकांनीं सांभाळले पाहिजे. देशांत निरनिराळे पक्ष असावयाचेच. नसले तरी सरकार ते उत्पन्न करू शकते. ह्यामुळें 'मतामतांचा गलबला' होतो. अशा स्थितींत सामान्य जनता गोंधळून जाते. कोणते खरें, कोणतें खोटें, कोणतें देशहितसाधक आणि कोणते देशहितनाशक, हे ह्या भांबावलेल्या जन-तेला समजत नाहीं. म्हणून 'केसरी'नें अगदीं स्वच्छपणे, लोकांना कळेल अशा सोप्या शब्दांत, पण ठासून 'हा अमकाच मार्ग खरा' असें निर्भिडपणे, निर्भयपणें व निःशंकपणे सांगितले पाहिजे. त्यांत वेळप्रसंगीं कित्येकांचीं मनें दुखवावीं लागतील, सरकारचा रोष होईल, ज्याचे हित बिघडतें अशांचें वैर साधावें लागेल. पण हें सर्व अंगिकारलेंच पाहिजे. आपणांस देश तयार करा-वयाचा आहे. आपण टक्केटोणपे खाल्याशिवाय लोकांनाहि स्वार्थत्यागाचें वळण लागत नाहीं. म्हणून लोकांना पचेल व रुचेल अशा रीतीनें, पण शक्य तितकें करून कायद्याच्या मर्यादेंत राहून, लोकांना स्वातंत्र्यप्रीतीचें, देशाभिमानाचें व प्राणत्यागापर्यंत स्वार्थत्यागाचें वळण लाविले पाहिजे. वेळ प्रसंगीं जरूर पडल्यास कायद्याचीहि फारशी मातब्बरी ठेवून चालत नाहीं. त्यावेळीं तो मोडूनहि लोक-कार्य पुढे ढकलले पाहिजे; त्याचप्रमाणें अगदीं ध्येयवादीहि व्यवहारी मनु-ष्याला राहून चालत नाहीं. लोकांना झेपेल असेच धोरण ठेवावें लागतें."

श्रीसमर्थांच्या 'मुलांच्या चालीनें चालावें' वगैरे शिकवणीची मला त्यावेळीं आठवण झाली. आमच्या नाशिकच्या कटाच्या खटल्याचा इतिहास त्यांना अवगत असल्यामुळें ते पुन्हां मला चटकन म्हणाले कीं, "जीं मतें तुम्हाला 'केसरी'तून प्रतिपादितां येणार नाहींत, तीं कोणत्याहि इतर वर्तमानपत्रांतून प्रतिपादिता येणार नाहींत. त्यांना व्यवहाराची गवसणी मलाहि घालावी लागली आहे व ती तुम्हालाहि घालावी लागणारच. काहीं वृत्तपत्रांनीं तसा यत्न केला तर तीं पत्रें क्षणभंगुर राहणार. अशींहि पत्रे हवींत. पण वाच्यार्थानें ह्या गोष्टी सुचविण्यापेक्षां व्यंगार्थानें जर त्याच सुचवितां येतात व कायद्याचें आड राहून दीर्घकालपर्यंत इष्टकार्य करितां येते तर तें कां करूं नये ? 'केसरी'नें हाच मार्ग स्वीकारिला आहे व तोच चालविला पाहिजे. ह्याखेरीज आणखी एक गोष्ट तुम्ही ध्यानांत ठेवा. वर्तमानपत्रकार हा एक लोकपक्षाचा कुशल, धीट, विचारी व तडफदार असा वकील असावा, असें माझें मत आहे. सरकारचा पक्षहि वकिली बाण्यानेंच तुमच्याशीं वागतो. तुम्हीहि तसेंच तोंडीला तोंड द्यावें

पाहिजे. सरकार जशीं आपलीं व्यंगें उघडीं करीत नाहींत, तशीं तुम्हीहि लोकपक्षाचीं व्यंगें चव्हाट्यावर मांडतां कामा नयेत. प्रत्येक पक्षात कांहीं तरी खरकटे असावयाचेंच. पण तेंच जर आपण मांडीत बसलों तर लोकांना आत्मविश्वास राहात नाहीं. लोकपक्षाचे गुणांची महति, पूर्वजांची सादरस्मृति. ध्येयाची शक्यता ह्यावरच जास्त भर द्यावी म्हणजे आत्मविश्वास वाढतो. वेळप्रसगीं, दोषदर्शनहि करावें लागतें, व तें करावेंहि. पण शक्य तोंवर आपली मांडी उघडी करू नये. उत्कृष्ट वकील ह्या धोरणानेंच काम करतो. आणि हेंच वृत्तपत्रांनीं करावें. साधकबाधक गोष्टीचा विचार करून न्याय निवडण्याचें काम वर्तमानपत्रकाराचें नाहीं. कारण त्याना दोन्ही बाजू पूर्णपणें कळणें शक्यच नसतें. तेव्हां नेहमीं अपुऱ्या माहितीनें उगाच न्यायाचे तारे तोडण्यापेक्षां लोकपक्षाची कुशल व तडफदार वकिली करणेंच जास्त हितावह आहे." त्यांच्या उपदेशाचें हें सार मी माझ्या शब्दांत पण समाषण रूपानें वर्णिले आहे. हें सर्व झाल्यावर त्यानीं मला प्रथम उमेदवार म्हणून १९१६ च्या जानेवारींत ठेवून घेतले व माझे लेख पसत पडतांच पुढच्या ३।४ महिन्यातच कायमहि करून घेतले.

( ८ ) टिळकांच्यावर जो जामीनकीचा खटला झाला त्यावेळची एक मोठी विलक्षण आठवण आहे. ज्या दिवशीं त्याच्यावर नोटीस बजावावयाची होती त्याच दिवशीं एका गौर बालिकेचें एक पोस्टकार्ड सकाळीं टिळकाच्या हातात पडले. त्यांतच 'माझे वडील उद्यां तुमच्यावर नोटीस बजावली जाईल असें म्हणत होते' असें लिहिलें होतें. गायडर साहेब नोटीस घेऊन येण्यापूर्वींच हें कार्ड मिळाल्यानें अगाऊ सर्व तयारी टिळक करून बसले होते. टिळकांबद्दल कित्येक गौरकाय मुलींच्या मनांतहि किती आदर होता हें दर्शविणारी ही आठवण असल्यानेंच तिचें महत्त्व आहे.

( ९ ) नासिक येथे जी प्रांतिक परिषद ना. श्रीनिवासशास्त्री ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती त्यावेळीं विषय नियामक कमिटींत, सर्व राजकीय कैद्यांच्या मुक्ततेबद्दल व विशेषतः सावरकरांना मुक्त करावें म्हणून एक ठराव मी मांडला होता. त्यावेळीं मवाळाचे अग्रणी ना. समर्थ व सर गोकुळदास पारेख ह्यांच्यासारख्यांनीं मला विरोध केला होता. पारखांनीं तर इतकी अक्कल उघळली होती कीं, हिंदुस्थानांत मुळीं 'राजकीय' कैदीच नाहींत! तेव्हां मी त्यांना "offences against the state" हा इंडियन पीनलकोडांतील ६ वा खंड आपल्यासारख्या सुज्ञ वकिलांना आठवतो काय, आणि तो आठवत असल्यास त्याअन्वयें शिक्षा झालेल्या त्या गुन्हेगारांना 'राजकीय' कैदी इतर देशांतील सरकारें मानितात, हे आपणांस माहीत आहे काय? असा रोकडा प्रश्न विचारला. सर गोकुळदासासारख्या वकिली मवाळाला ह्याचें उत्तर देतां येईना. तेव्हां समर्थ मजवर चवताळून उठले. त्यांच्याहि वकिली डावपेचांची

फेर ह्या माझ्या दोन सवालांपुढे टिकेना. शास्त्री अध्यक्ष, त्यांना माझें म्हणणें पटत होतें. पण आपल्या ह्या दोन संवगड्यांच्याविरुद्ध त्यांनीं आपलें मत प्रथम दिलें नाहीं. टिळकहि कमिटींत होतेच. त्यांनीं हा रंगांत आलेला वादविवाद पाहून व आमच्या 'केसरी' कचेरीपैकीं एका मनुष्यानें ह्या मवाळी वैद्यांची उडविलेली तिरपिट पाहून स्वतःच ह्या प्रश्नाची भवति न भवति केली व बोलावयास उठतांच "मी स्वतः एक राजकीय कैदी होतों हे तरी पारख, समर्थ मानावयास तयार आहेत काय?" असा रोखठोक प्रश्न विचारला. तेव्हांची समर्थ पारखांची अवस्था दर्शनीय होती. असो. टिळकांनीं माझा पाठपुरावा केल्यानंतर तो ठराव तेथे पास झाला हें सांगणें नकोच.

(१०) १९२० सालीं माझ्या मेडिकल कॉलेजमध्यें शिरण्याच्या प्रयत्नास अकल्पित रीतीनें यश आलें. सरकार दरबारीं किती बेअकलीपणा चालतो ह्याचें स्पष्ट चित्र मला त्या प्रयत्नांत दिसून आलें. ती हकीकतहि मोठी मनोरंजक आहे. पण ती सांगण्याचे हे स्थळ नव्हे. मला परवानगी मिळतांच मी लोकमान्यांना व केळकरांना ती गोष्ट कळविली व ह्या परवानगीचा फायदा घेण्याचें माझें मनांत आहे, ही गोष्टहि मी त्यांना ध्वनित केली. मी सुटून आल्यानंतर माझी जी ८।१० महिने विपन्नावस्था झाली होती, तशी पुनरपि राजकीय गंडांतर आल्यास, होऊं नये म्हणून मी मेडिकल कोर्स पुरा करण्याचा निश्चय केला होता. टिळकांनीं मला १९१५ मध्यें ह्या प्रयत्नांत उत्तेजन व साह्य देण्याचें अभिवचन दिलें होतें. त्या आशेवर मी होतों. पण मला ह्या वेळीं त्यांच्या मनाचा कल बदललेला दिसला. त्यांचें म्हणणें मी मेडिकल कॉलेजमध्यें जाऊं नये असें होतें. 'डॉक्टर झाल्यानंतरहि मी 'केसरी'चा दुय्यम संपादक, 'केसरी'ने ठेवल्यास, राहूं शकेन,' असें मी त्यांना सांगितलें. 'पण नुसत्या लेखणीखेरीज आणखीहि एका स्वतंत्र धंद्याची परीक्षा व ज्ञान इतर संपादकाप्रमाणें मजजवळ असूं द्या,' असा माझा मानस मी त्यांना कळविला. केसरींतील इतर संपादक मंडळी माझ्या मताची होती. टिळकांनीं शेवटीं माझ्या म्हणण्यास थोड्या नाखुषीनेंच रुकार दिला, व पूर्वीं दिलेल्या अभिवचनाप्रमाणें पैशांचें साह्यहि देण्याचें आश्वासन दिलें. स्वतःची फारशी खुषी नसतांहि त्यांनीं मला ह्यावेळीं जें साहाय्य केलें त्याबद्दल मी त्यांचा जन्मभर ऋणी आहेच. पण नाखुषींतहि मनाचा त्यांनीं जो उदारपणा दाखविला तो तर मला जास्त आदरणीय आहे.

---

# रामचंद्र मोरेश्वर साने

[ वकील, वार्शी. ]

लोकमान्य टिळकांच्या आठवणी लिहाव्या असें रा. स. वि. बापट यांनीं मला पुष्कळ वेळा लिहिलें, परंतु अनेक कारणांमुळें मला पहिला खंड प्रसिद्ध झाला त्या वेळीं कांहींच करतां आलें नाहीं; आतां दुसरा खंड लवकरच प्रसिद्ध होणार आहे तर या वेळीं तरी कांहीं लिहावें अशीं त्यांचीं आग्रहाचीं पत्रें आल्यावरून चार ओळी लिहीत आहें. त्या लिहितांना स्वतःसंबंधाचा कांहीं मजकूर येईल, पण ती गोष्ट अपरीहार्य आहे.

(१) लोकमान्य टिळकांचे अंगीं अनेक असामान्य गुण होते व त्यांचें वर्णन अनेकांनीं केलेलें आहे. लोकमान्यांनीं एकदां ज्यास आपला म्हटलें त्याला कधींहि विसरावयाचें नाहीं व त्याच्या मदतीस धावून जावयाचे हा त्यांचा गुण मोठ्या व धाकट्या माणसासबधान सारखाच दृष्टीस पडे. मेणापेक्षाहि मउ व वज्रापेक्षांहि कठीण असे त्यांचें मन असे व तेजस्वी स्वभावास साजण्यासारखे त्यांचें वर्तन असे. "परकी राज्य व तें भिन्न संस्कृतीचें असलें म्हणजे तें आपला पगडा राहवा अशी खटपट नेहमीं करीत असतें. व यांत अस्वभाविक असें कांहीं नाहीं. हिंदुस्थानात आर्य संस्कृतीची स्थापना करण्यात असाच प्रकार झाला असला पाहिजे व हल्लींहि तोच प्रकार चालू आहे. पूर्वींच्या काळचे व हल्लींच्या काळचे मार्ग व पद्धत भिन्न आहेत तरी मूळचा हेतु एकच." असें ते नेहमीं म्हणत. परकी राज्यकर्त्यांनीं टाकलेला प्रत्येक डाव सहेतुक असावयाचा ही जाणीव सुशिक्षित लोकांत अत्यंत तीव्रतेनें--निदान महाराष्ट्रात तरी जर कोणात वसत असेल तर ती लोकमान्यांतच होती. शर्करावगुंठीत सुधारणेची भपक्याची गोळी आपल्या प्रजेच्या घशात कशी उतरेल याचे डावपेंच अगदीं पहिल्यापासून कुशाग्रबुद्धिनें जर कोणी ओळखले असतील तर ते लोकमान्यानीं; येवढेच नव्हे तर ते या डावपेंचास ओळखून कसें वागावें ही व्यावहारिक दृष्टी नेहमीं जागरूक ठेवीत.

(२) 'सहकारी चळवळींत तुम्ही का पडलां' असा त्यांनीं मला एकदा प्रश्न विचारला. मी म्हटलें 'यात वावगें काय आहे, तें खुल्या मनानें मला आपण एकदा सांगा. या चळवळींत स्वावलंबन व हल्लींच्या बदललेल्या काळास अनुरूप अशी घटना उत्पन्न करण्याचे सामर्थ्य आहे' ते म्हणाले "हें सर्व ठीक आहे, पण अमुक एका मर्यादेच्या बाहेर तिची धाव जाते असें राजकर्त्यांस जर आढळलें तर आडवें आले कीं कापून काढावयास त्यास कमी करणार नाहींत, हें मात्र सदैव लक्षांत ठेवा. राज्याचीं सूत्रें जे प्रत्यक्ष हालवितात त्यांचें नेहमीं धोरण हें राहणार कीं, आपल्या तंत्रानें सर्व चालावें व आपले पखाखालीं

सर्वांनीं राहावें व जर यांत यत्किंचित् बिघाड होतो असें वाटलें तर मग ते परोपरीनें व युक्तिप्रयुक्तीनें त्याचा पाडाव करतील हे विसरूं नका." हें भाषण झाल्यास बरींच वर्षे झालीं. १९०७ सालची ही गोष्ट आहे, म्हणजे १७ वर्षे झालीं. इतक्या दिवसांत लोकमान्यांच्या म्हणण्याप्रमाणें काय काय अनुभव आला हें सांगण्याचें हें स्थळ नव्हे.

(३) तेजस्वी माणसांचे जरी एकमेकांशीं वैर आहे असे दिसलें तरी अंतर्यामीं त्यांचा एकमेकांविषयीं फार आदर असतो. मेथांना टिळकांविषयीं काय वाटत असे तें रा. बामणगांवकरांनीं आपल्या लेखांत लिहिले आहे. बामणगांवकरांचे म्हणण्यास पाठिंबा पाहिजे असेल तर मि. हार्निमन यांनीं जीं पत्रें प्रसिद्ध केलीं आहेत त्यांत आपणांस दिसेल.

(४) ता.२२।७।२४चे केसरींत पान २ वर जो लेख आला आहे त्यांत महाराष्ट्राविषयीं मेथा यांनीं काढलेले उद्गार दिले आहेत. त्यावरून मला एका गोष्टीची आठवण झाली. सोलापुरचे कै. साठे वकील यांस सरकारानें कायदे कौन्सिलांत नेमल्यावर त्यांनीं एका प्रसंगीं आपला अभिप्राय निर्भिडपणे अधिकाऱ्यांच्या तोंडावर सांगितला. यानतर पांचसात मंडळींच्या खाजगी स्वरूपाच्या भाषणांत त्याच दिवशीं व कौन्सिलच्या इमारतींत मेथा यांनीं असे उद्गार काढले कीं, 'Look at the spirit of this young chap.' साठे वयांनीं लहान, नवीनच कौन्सिलांत गेलेले व ज्या मंडळीस उद्देशून मेथा बोलले त्यांत महाराष्ट्रीय कोणी नव्हता. कोणाला उद्देशून मेथा बोलले तेंहि मला आठवतें, परंतु कोणाचा कमीपणा दाखवावा हें नको म्हणून मी त्याचा उल्लेख करीत नाहीं. मेथा यांच्या संबंधींची गोष्ट कै. साठ्यांनीं मला सांगितलेली पूर्ण स्मरते तिचा उल्लेख केला आहे.

(५) गुणग्रहण करणारीं माणसें एकमेकांविषयीं कितीहि मतभेद किंवा वांकडे असले तरी कशीं वागतात याचें एक उदाहरण खुद्द लोकमान्यांचे तोंडून मी ऐकलेलें सांगतों. मेथा आजारी होते व पुण्यास होते. त्यांचा बंगला रहदारीपासून आत दूर होता,- त्यांना गडबड नको होती, अशी त्यांची प्रकृति होती. लोकमान्य बंगल्याबाहेर गाडी उभी करून आंत बरेच चालत पोर्चमध्यें गेले व भेटण्याबद्दल निरोप पाठविला. मेथा जवळच होते. त्यांनीं त्यांस बोलावले, व गाडीवाचून इतके दूर कसे आला असें विचारलें. लोकमान्य म्हणाले "तुमच्या प्रकृतीस गडबड नको म्हणून गाडी मी बाहेर उभी केली आहे." मेथा म्हणाले 'तुम्ही प्रकृतीनें फार खराब झालेले दिसता तेव्हां गाडी आत आणण्यास हरकत नव्हती.' एकमेकांचें क्षेम कुशल प्रश्न झाल्यावर लोकमान्य परत आले. लोकमान्य तुरुंगांतून सुटल्यावरचा हा प्रसंग आहे. लोकमान्यांवर मुंबईस खटला केला व

लोकांनीं दंगे केले त्याबद्दल लोकपक्षाचा पाठिंबा त्यावेळच्या गव्हरनरास पाहिजे होता, पण मेथांचें वाणेदार वर्तन सर्वांस ठाऊक असेलच.

(६) माझा ज्ञा. प्र. पत्राशीं १८८३ पासून १८९३ पर्यंत संबंध होता. 'केसरी' व 'ज्ञानप्रकाश' यात सामाजिक व राजकीय बाबतींत जरी कधीं कधीं खटके उडत असत तरी एकमेकांविषयीं आदर कमी झालेला नसे व वेळप्रसंगीं एकमेकांस मदत करण्याकडे प्रवृत्ति होती.

(७) सातारा जिल्ह्यात वाळवे येथें मोठी कॉंग्रेस भरली होती. ह्यूमसाहेब या सभेस आले होते. कै. गोखले, लोकमान्य, मी अशी पुष्कळ मंडळी या सभेस गेलों होतों. या कॉंग्रेसहून परत येतांना सेकंड क्लासच्या डब्यांत टिळक, गोखले व मी व आणखी एक नातूघराण्यांतील गृहस्थ होते. रात्रीं टिळकांचे व गोखल्यांचे एकमेकाशीं मन मोकळेपणानें बोलणें झालें. हा आनंदाचा प्रसंग असे मला वाटलें. एकमेकाशीं बोलतांना काहीं आडपडदा नव्हता व खुल्या दिलाचा भाषणप्रसंग होता. अर्थात् आपल्यांतील दोषसुद्धां या भाषणांत एकमेकांस सांगण्यांस दोघानीं कमी केलें नाहीं !

(८) भिन्न मतांचे किंवा भिन्न दृष्टीचे गृहस्थ एकमेकांस अस्पर्श मानून एकमेकाचे मुखावलोकनसुद्धां व्हावयाचें नाहीं इतक्या भराला गेलेला दोष जर आपल्यांतील कमी होईल तर देशाच्या प्रगतीच्या मार्गांतील एक मोठी उणीव दूर होईल असें या भाषणप्रसंगावरून मला वाटलें. ताईमहाराज प्रकरणांत टिळकांचा झालेला छळ गोखल्यांस कसा पसंत नव्हता हें दाखविणारें गोखल्याचें एक पत्र मजजवळ होतें ते मी रा. फाटक यांजकडे नुकतेंच पाठविलें आहे. कारण ते गोखल्यांचें चरित्र लिहीत आहेत. लोकमान्य मंडलेहून परत आल्यावर त्यांच्या दारापुढे पहारा ठेवण्यांत सरकारची केवढी चूक होत आहे हे स्पष्ट शब्दांनीं गव्हरनरसाहेबाचे नजरेस माझे मित्र कै. हरीभाऊ आपटे यांनीं आणलें होते ही गोष्ट मला पक्की माहीत आहे. सारांश, एकमेकापासून अंतरावर राहून व मधल्या लुडबुड्या मंडळींच्या लावालावी किंवा अदूरदृष्टीमुळें वैमनस्याचा दोष वाढतो यांत काहीं शंका नाहीं. 'टिळक व मी पांच मिनिटें जर एकांतांत बसलों तर आम्ही एक होऊं' असे मेथांनीं हॉर्निमन जवळ काढलेले उद्गार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत.

---

## कृष्णाजी विष्णु ऊर्फ आंबासाहेब सांभारे

[ सुप्रसिद्ध वैद्य, सांगली- ]

( १ ) कोल्हापुरास ताईमहाराज प्रकरणासंबंधीं जाण्याकरिता लोकमान्य मिरजेच्या ' सुखनिवास ' बंगल्यांत रा. बळवतराव कुमोजकर यांचेसह-वर्तमान राहिले होते. त्या वेळीं मी कामानिमित्त स्टेशनवर गेलों असतां रा. कुमोजकर यांचे विनतीवरून त्यांचेकडे चहा घेण्यास गेलो. लोकमान्यांनीं आपण मधुमेहाचे विकाराकरितां पथ्यावर असून चहा सोडला असल्याचे सांगितले. आपल्या वैद्यकातील उपाय करण्यासबंधी गोष्ट निघाली, पण त्यावेळच्या बोलण्यात एतद्देशीय वैद्यकावर आपली श्रद्धा नाहीं असे त्यांनीं मला स्पष्ट सागितलें व ती गोष्ट तितकीच राहून गेली.

ते ब्रह्मदेशांतून परत येऊन पुन्हां राजकरणात पडले व विलायतेस त्यांचे खटल्याचे कामासबधानें निघण्याच्या विचारांत होते त्या सुमारास अचानक त्यांचे मला पुढीलप्रमाणें पत्र आलें.

" मी पुष्कळ वैद्याचे व डॉक्टरांचे उपाय मला असलेल्या मधुमेहाचे विकारावर करीत आलो आहें व त्या कामीं निराश झालो आहें. आपली ख्याती व आपला लौकिक ऐकून आपलेकडील औषधाचे प्रयोगाखेरीज निराश होणे योग्य नाहीं असें वाटून आपल्यास ही विनंति करीत आहें. आपले उपाय अवश्य करून पहावे अशी माझी इच्छा आहे. तरी पत्रोत्तरीं पुढें काय तजवीज करावयाची तें कळवावें. "

या पत्रास वेळेवर उत्तर मजकडून गेलें नाहीं. देशी वैद्यकावर त्यांची श्रद्धा नाही अशी त्या वेळींहि माझी समजूत असल्यामुळेहि विलंब जाहला असेल; इतक्यांत थोड्याच काळांत त्यांचेकडून मला तारेने बोलावणें आले. त्यांच्यासारख्याकडील तारेची उपेक्षा करणें योग्य नाहीं असे वाटून मी ताबडतोब पुण्यास गेलों. ते त्या वेळीं लिमये याचे बगल्यांत रहात होते. त्या प्रसगीं व नतर पुढें तीन महिने मी जाऊन येऊन पुण्यास होतों. त्या काळांत त्यांच्या भेटी होत असत.

( २ ) एके प्रसगीं इकडील वैद्यकाचे ऱ्हासाविषयीं त्यांनीं उद्गार काढले कीं, " आपल्या वैद्यकास इंग्रजी राज्य झाल्यापासून राजाश्रय नाहींसा झाला हें वैद्यकाच्या ऱ्हासाचें मुख्य कारण आहे. " त्यावर मी उत्तर केलें कीं, " माझें असें ठाम मत आहे कीं, ज्या दिवशीं वैद्यास राजदरबारीं मान मिळू लागला त्या दिवशीं वैद्यकाची विद्या बुडाली. राजदरबारांत मान मिळविण्याच्या आशेला वैद्य बळी पडून त्यांनीं आपली विद्या गमावली. " त्यावर लोकमान्य म्हणाले

की, " आपले वैद्यकांतील उंची औषधें तयार करण्यास साधनांचा त्साच मनुष्य-बळाचाहि बराच खर्च करावा लागतो. तो राजाश्रयाविना हल्ली करता येत नाहीं म्हणून औषधें पूर्वीप्रमाणें तेजस्वी होत नाहींत. " त्यावर मी म्हणालों, " आपल्याकडील रसायन पद्धतीन औषधें बनविण्याचा प्रकार खरोखरीच मोठ्या खर्चाचा आहे व त्याला राजाश्रयाची अपेक्षा असेल. परंतु खरें एतद्देशीय वैद्यक म्हणजे रसायनपद्धति नव्हे. आपल्याकडील आयुर्वेदात वास्तविक पाहाता रसायनाचा समावेश होत नाहीं. ती रसायनपद्धति बहुतांशीं परकी आहे, म्हणजे ती यवनांपासून उसनी घेतली आहे असें माझें मत आहे. आपलेकडील वैद्यकपद्धतींत वनस्पतींचें औषधावरच निर्वाह केलेला आढळतो. " याप्रमाणें माझीं मतें मी सप्रमाण प्रगट केलीं व तीं लोकमान्यांनीं बहुतांशीं मान्य केलीं.

( ३ ) हल्लीं चालू असलेल्या पद्धतीचीं संमेलनें मरविल्यापासून वैद्यकाचे दृष्टीनें अथवा जनतेच्या हिताच्या दृष्टीनें काहींच लाभ नाहीं असें माझें मत मी त्यास कळविलें. त्यावर ते म्हणाले, " वादे वादे जायते तत्त्वबोधः येवढा तरी लाभ आहेच कीं नाहीं ? " मी म्हणालो,–" जेथें प्रयोगसिद्ध अनुभवाचाच मुख्य प्रश्न आहे तेथें तत्त्वबोधाची फारशी मातब्बरी नाहीं. " त्यावर त्यांनीं मी कोणत्या प्रकारच्या संमेलनास अनुकूल आहे त्याचा खुलासा विचारला. मी त्यांस माझी कल्पना थोडक्यांत सांगितली. ती अशीः—

[ १ ] संमेलनास हजर राहणाऱ्या प्रत्येक वैद्यानें आपल्या नजरेखालील रोग्याचा पूर्वेतिहास, चिकित्सा, औषधयोजना व परिणाम याचा वृत्तांत लेखांत ठेवून आपलीं टिपणें संमेलनापुढें मांडावीं व त्यांच्या तुलनेनें काहीं निर्णय करण्यांत यावे [ २ ] जी पद्धत त्यानें स्वीकारली असेल त्या बाबतचे ग्रंथाधार त्यानें संमेलनांस दाखवावे व त्यावरून त्या ग्रंथाचीहि योग्यायोग्यता ठरवावी [ ३ ] दुराग्रह सोडून एकाच विषयावरील ग्रंथाधाराची तुलना सम-योग विचारांनीं ठरवावी व ते सर्व ग्रंथाधार व प्रयोग एकत्र करून ग्रंथरूपानें इतरांचे माहितीकरितां प्रसिद्ध करावे. लोकमान्यांनीं यावर विचार करून उत्तर केलें " आमचीं संमेलनें ही एक प्रकारची चळवळ आहे व सर्व प्रकारच्या चळवळी दूरच्या काळांत उत्तेजनास योग्य आहेत. "

मी यावर उत्तर केलें कीं, "वैद्यक हा वादानें अथवा चळवळीनें सिद्ध होणारा विषय आहे असें आपल्यास मनःपूर्वक वाटतें काय ?" त्यांनीं यानंतर आपलें मत वस्तुतः माझे विरुद्ध नसल्याचें मला सांगितलें. परंतु अखेर ते म्हणाले " तुमची योजना व्यवहार्य होईल किंवा कसें हें पाहिलें पाहिजे. तुम्हा वैद्यांपैकीं किती लोक तिला अनुकूल होतील याची मोठी चिंता वाटते. "

(४) माझें औषध चालू असतां केवळ सातूच्या पिठाचें पथ्यावर राहण्याचा त्यांनीं कांहीं काळ आग्रह धरला होता. एके दिवशीं त्यांचे भाचे मजकडे आले

व मला बोलावून घेऊन गेले. मी जाऊन त्यांस भेटलों, तेव्हां ते मला म्हणाले "आज मला उठण्याची उमका वाटत नाहीं, काल रात्रीपासूनच असें होत आहे, औषधहि बरोबर आलेली नाहीं." तेव्हां मी त्यांस म्हणालों "तो माझ्या औषधाचा परिणाम आहे, आपण नेहमींप्रमाणें म्हणजे नित्याचें अन्न घेण्याचा क्रम चालू ठेवल्यास कांहींहि विकार होणार नाहीं. माझें औषधाबरोबर आपलें पथ्य हा मेळ जमत नाहीं." असें सांगितल्यानंतर त्यांनीं गहू वगैरे नित्य आहारास सुरुवात केली. त्यामुळें त्यांस कोणताहि उपद्रव झाला नाहीं. याप्रमाणें सुमारें महिना दीड महिना तरी क्रम चालू होता. पुढें ते विलायतेस गेले व तिकडे त्यांनीं नित्याहारच चालू ठेविला होता असें समजतें.

---

## नारायणशास्त्री मराठे

[ आचार्य, प्राज्ञपाठशाला वांई. ]

( १ ) वांईक्षेत्राला लोकमान्यांचें पुण्यदर्शन झालें तो एक वांईकरांना अपूर्व प्रसंग. आश्रमांत धुळभेट झाली. गंगापुरींत करंदीकर ज्योतिष्यांनीं एक लहानशी लोकमान्यांची पत्रिका त्यांच्या चरणीं वाहिली. तेव्हां लोकमान्य म्हणाले "अहो, माझी कसली एका क्षुद्र मनुष्याची पत्रिका करतां ? आतां देशाची, राष्ट्राची पत्रिका बतवा."

( २ ) यावेळीं प्राज्ञपाठशाळेला लोकमान्यांनीं भेट दिली. अगदीं सावकाशपणीं प्रा. पा. शाळेच्या सर्व इमारती व पुस्तकालय सर्व पाहिलें. गंगापुरी घाटावरील मी राहतों त्या लहानशा मारुतीच्या बंगल्यावर सुद्धां आले होते. श्रीसद्गुरु प्रज्ञानंदस्वामींच्या समाधीचें दर्शन घेऊन परत जातेवेळीं "असल्या पाठशाळांची राष्ट्राला फार जरूर आहे" असें ते म्हणाले.

( ३ ) दीक्षित श्री. भाऊशास्त्री लेले यांच्या अग्निहोत्राचें त्यांनीं दर्शन घेतलें. शास्त्रीबोवानीं लोकमान्यांस एक चांगली शालजोडी व भस्म—अग्निदेवाचा प्रसाद म्हणून—दिलें. शास्त्रीबोवा, लोकमान्य व मी टांग्यांत बसलो. होमशाळेंत कपाळीं लावलेलें भस्म नाकावर व गालावर पडलें होतें तें अतुकाकांनीं फडक्यानें पुसलें. तेव्हां लोकमान्य म्हणाले "भस्म पाहून लोक मला अग्निहोत्री म्हणतील इतकेंचना ? मग मीं ब्राह्मण नाहीं कीं काय ?"

---

## गोविंद गणेश पाटणकर ऊर्फ मुरुडकर बोवा

[ सुप्रसिद्ध हरिदास, पुणें. ]

कै. लोकमान्यांचे अंगीं, सामान्य माणसानें स्मरण करण्यासारखी दैवीशक्ति होती, यांत काडिमात्र संशय नाहीं. त्यांचें व माझें अध्यात्म विषयासंबंधानें थोडेसें भाषण व्हावें अशी फार दिवसांपासून इच्छा होती. कै. लोकमान्य मंडालेहून सुटून आल्यावर कांहीं दिवसानीं आम्ही त्यास मुद्दाम भेटून तो सुयोग घडवून आणला.

कै. लोकमान्यास मी विचारिलें कीं, " आपणास आजपर्यंत पुष्कळच दुःखें सोसावीं लागलीं. सक्तर कारागृहवास, बिन कष्टानें व दुःखाचा लेशहि न होतां आणि सुखानें भोगून आपण परत आलात. बाह्य सुखदुःखाचा आघात होणारें जें अंतःकरण म्हणजे सूक्ष्मकारागृह त्याच्यातून सुटून आपण उभय कारागृहातीत असला पाहिजे, अशी माझी समजूत आहे. कारण कारागृहात ज्या श्रीमद्भगवद्गीतेचें परिशीलन केलेंत तेच भगवान् म्हणतात. ( आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ) या श्लोकाप्रमाणें आपण प्रज्ञाप्रतिष्ठित अर्थात् जीवन्मुक्त कोटींतील आहां. अर्थात् त्याच भूमिकेवर राहून आपण हे सर्व सहन केलें कां ?" असें मी विचारल्यानंतर, लोकमान्यांनीं थोडेसें हसून मला तावडतोब सांगितलें कीं—" बोवासाहेब, आपण विचारिलेला प्रश्न फार महत्त्वाचा आहे. व अशा प्रश्नाचें उत्तर देण्याचाहि मला आजपर्यंत आलेल्या मुदतींत पहिलाच प्रसंग आहे. आतां आपण जी स्थिति वर्णन केलीत ती स्थिति मला प्राप्त झालेली नाहीं. कारण मी कांहीं ब्रह्मनिष्ठ नाहीं. व त्या कोटींतीलहि नव्हे. मला लहानपणापासून वाचनाचा मोठा नाद व आपले मनांत धैर्य येणेंकरून उत्पन्न होईल अशा गोष्टींचा वारंवार विचार करण्याची सवय. मजवर प्रेम करणारी पूर्वींचीं कै. शास्त्रीबोवासारखीं माणसें यांचा सहवास आणि मंडाले येथें असतांना जी गीता लिहिली तीहि पण माझ्या पूर्वींच्या विचारात स्वतःच्या कल्याणाविषयीं कारणीभूतच झाली. मन अत्यंत धैर्यपूरित व उदार झालें. कांहीं काल ते सुखदुःखादि उभय द्वंद्व सोडून निश्चल होई. विचारानें असें ठरविलें कीं, त्या निश्चल स्थितींत सुखहि नाहीं व दुःखहि नाहीं, बाह्य सुखाची कल्पना केली तर सुख आहे किंवा दुःख आहे. असा विचार करून मी आपले मनाला हें द्वंद्व सहन करण्याचें सामर्थ्य आणलें. "

---

## वामन सीताराम मुकादम

[ मुंबई कायदेकौन्सिलचे सभासद, गोध्रा ( पंचमहाल ).]

( १ ) वंगभंगाच्या चळवळीच्या लाटेंत, म्हणजे सुमारे १९०६–७ सालांत, माझा लोकमान्यांशीं प्रथम परिचय झाला. पुढें १९१४ सालांत ते मंडालेहून परत आल्यानंतर स्वराज्यसंघाच्या कामगिरीसंबंधानें मजला त्यांच्या पुर्नभेटीचा प्रसंग आला. इकडील प्रांतांत ही चळवळ नवीनच सुरू करावयाची असल्यामुळें, मी माझा मनोदय त्यांस कळवून आमच्या पंचमहाल जिल्ह्यांत येण्याबद्दल विनतीहि केली होती. त्यास अनुसरून त्यांनीं मजला विनोदानेंच कळविलें कीं, " तुमच्या जिल्ह्यात येण्यासारखा एखादा महत्त्वाचा प्रसंग तुम्हीं आणा म्हणजे सहजच आम्ही तुमचे मुलखात येऊं. " पुढें लवकरच १९१७ च्या नोव्हेंबर महिन्यांत गोद्ऱ्यास पहिली राजकीय प्रांतिक परिषद महात्मा गांधी यांचे अध्यक्षतेखालीं भरली त्या परिषदेस सन्माननीय पाहुणे म्हणून लोकमान्य व दादासाहेब खापर्डे आले होते. गुजराथप्रांताच्या ह्या मागासलेल्या भागांत–पूर्वी केव्हांहि न आलेले असल्यामुळें–लोकमान्यांचें आगमन तर केवळ अपूर्वच होतें हें सांगावयासच नको महात्मा गांधी सर्व गावकऱ्यांसह त्यांस स्टेशनवर सामोरे गेले होते.

( २ ) प्रचलित वहिवाटीप्रमाणे लोकमान्याची महात्मा गांधीसहवर्तमान मिरवणूक स्टेशनावरून निघून शहरांतून व तशीच पुढें बाजारपेठेंतून ठिकठिकाणीं पानसुपारी घेत घेत आमचे घराजवळ येऊन थांबली. लोकमान्यांचा प्रातर्विधी–स्नान–उपहार वगैरे उरकेपर्यंत कांहीं वेळ त्यांचा मुक्काम आमचे येथेंच होता. तेवढ्या थोड्या अवधींतच त्यांच्या साध्या राहणीचा व व्यवहारचातुर्याचा मासला आमचे नजरेस पडला. तो असा कीं, घराचे ओटीचे आंत प्रवेश केल्याबरोबर तेथे देवाजवळ कोपऱ्यांत कालोलचे दत्तक फडणीस राजश्री बाबूराव कोगजे ह्यांच्या मातोश्री गोपिकाबाई ( त्यांचे वय जवळ जवळ ९० वर्षांचे असून त्यांस डोळ्यांनीं नीट दिसतहि नसे ) माळ फिरवीत बसल्या होत्या. त्यांचे पायावर शिष्टाचाराप्रमाणें डोकें ठेवून त्यांचा त्यांनीं आशीर्वाद घेतला. ( जवळपास उभी असलेली प्रेक्षक मंडळी हा प्रकार पाहून क्षणभर चकितच झाली. ) नंतर आमच्या भगिनी बबुताईस एखाद्या परिचित गृहस्थाप्रमाणें कुशल प्रश्न विचारून ते ताराबागेंत आपल्या मुक्कामावर जाण्यास निघाले. आमच्या वहिणींने त्यांस जातेवेळीं मोठ्या कळकळीनें म्हटलें कीं, " वामन आपल्या अखाड्यांत अद्याप पोरच आहे. त्यांस थोरांनीं सांभाळावें. " त्यावर लोकमान्य म्हणाले कीं, " आमची संगत म्हणजे नागव्या तलवारीवरील कवाईतच आहे व

आमचा एक पाय नेहमीं तुरुंगांत व एक बाहेर अशी आमची स्थिति असते हें वामनराव यांस ठाऊक असूनहि ज्या अर्थी ते आमच्या नादीं लागले आहेत त्या अर्थी ईश्वरच त्यांची पाठ राखील. त्याजबद्दल आपण काळजी कां करावी !" बाहेर पडण्यापूर्वी लोकमान्यांनीं सर्व घर लक्षपूर्वक पाहिलें आणि मागील दारीं स्नानाचे जागेजवळ अळू व केळींचीं झाडें व गोठ्यांत गाय वासरू वगैरे पाहून जुन्या चालीच्या राहणीबद्दल प्रसन्नोद्गार काढिले.

( ३ ) दुसरे दिवशीं सायंकाळीं लोकमान्य सुरतेस जावयाचे असल्यामुळें याच रात्रीं ९ वाजतां परिषदेच्या मंडपातच लोकांनीं स्वराज्य संघाचे सभासद होण्याबद्दल त्यांचें व्याख्यान महात्मा गांधींचे अध्यक्षतेखालीं झालें. व्याख्यानाचे सुरवातीस तें कोणत्या भाषेत व्हावें ह्याबद्दल बरीच भवति न भवति झाली. त्यांनीं श्रोतृवृंदास इंग्लिश किंवा मराठी या दोहोंपैकीं जी भाषा पुष्कळांस अवगत असेल त्या भाषेत बोलण्यास आपण तयार आहोंत असें सांगितलें. परिषदेच्या नियमांत एक विशेष महत्त्वाचा नियम असा होता कीं, ज्याची मातृभाषा गुजराथी असेल त्या लोकांनीं व्याख्यान त्याच भाषेत दिलें पाहिजे. इतरांनीं आपल्या स्वभाषेत बोलावें. परंतु इंग्लिश भाषेचा उपयोग ह्या परिषदेंत करावयाचा नाहीं. शेवटीं अध्यक्षाच्या नात्यानें महात्मा गांधी यांनीं परिषदेच्या नियमानुसार लोकमान्यांनीं मराठींतच बोलावें असें सांगितलें व सर्वांनीं तें निमुटपणें मान्य केलें. इतकें झाल्यावर सुमारें दीड तासपर्यंत लोकमान्यांचें मराठींतच व्याख्यान झालें व तें श्रोतृसमुहानें एकाग्रतेनें व शांतपणें ऐकिलें. सहासात हजार इतका लोकसमुदाय शांत ठेवण्यास व्याख्यानापूर्वी त्यास अश्वासन देण्यांत आलें होतें कीं, लोकमान्यांच्या व्याख्यानाचा तरजुमा नव्हे पण साग्रत गोषवारा त्यास गुजराथी भाषेत नामदार दादासाहेब खापर्डे यांजकडून सांगविण्यात येईल. ह्या मार्गानें सर्वांचीच नड दूर होऊन दोन्ही भाषा जाणणारांना मात्र दोन व्याख्याने ऐकण्याचा लाभ मिळाला. व्याख्यान संपून लोकमान्य परत स्थानापन्न झाल्यानंतर दादासाहेबांनीं त्याचा जो गोषवारा गुजराथी भाषेत सांगितला तो खरोखरच फार उत्तम वठला, इतकेंच नव्हे पण त्यांच्या विनोदी स्वभावाची झांकहि त्या भाषेत पूर्णपणे उतरली होती. नागपूर मध्यप्रांताइतक्या दूर रहाणाऱ्या एका दाक्षिणी गृहस्थानें एखाद्या उत्तम गुजराथी वक्त्याचे वर बोलण्यांत ताण केलेली पाहून श्रोतृवर्ग चकित झाला. तेथून परत जाण्यापूर्वी लोकमान्यांनीं येथील चालू परिषदेचें सूक्ष्म निरीक्षण केलें होतें व म्हणूनच मजला त्यांनीं खेड्यापाड्यातील वेठबिगारीचे ठरावावर संपूर्ण लक्ष देण्यास बजाविलें. त्याप्रमाणें आम्ही सर्व जिल्हाभर हा ठराव शेतकरी लोकांस समजावून दिला व तो त्यास पूर्ण पटलाहि.

( ४ ) रयतेची सहानुभूति व पाठबळ ह्या ठरावानेंच स्वराज्य संघास मिळून

त्याचें वजन पुढें सरकारदरबारीं किती वाढलें त्याचें एकच उदाहरण सांगितें त्यास बस्स होईल. ही चळवळ चालू असतां त्यावेळचे येथील कलेक्टर मिस्टर क्रेटन यांनीं यासंबधांत कांहीं बोलणें करण्याकरितां डेप्युटेशन बोलाविलें होतें व महात्मा गांधी यांचे प्रमुखत्वाखालीं एक कमिटी नेमून स्वराज्य संघानें त्यांस वेठ बिगारीचे बाबतींत कलेक्टर साहेबांशीं वाटाघाट करण्यास अधिकार दिला होता. उभयतांत ह्या गोष्टीची चर्चा होऊन शेवटीं कलेक्टर साहेबांकडून जिल्ह्यांतील सर्व अधिकाऱ्यांस असें सक्त सरक्युलर निघालें कीं, 'यःकश्चित् पट्टेवाल्यापासून तो असिस्टंट कलेक्टरचे दर्जापर्यंतच्या कोणत्याहि अमलदारानें फिरतीवर असतांना कोणाकडूनहि मोबदला न देतां नोकरी किंवा वस्तु घेऊं नये. हुकुमाचें अतिक्रमण झाल्यास त्याजबद्दल अधिकाऱ्याच्या दर्जाचा विचार न करितां सक्त इलाज केला जाईल' वगैरे. हा सर्व परिणाम कशाचा तर लोकमान्यांच्या सूचनेप्रमाणें बेगारीच्या ठरावावर सर्व लक्ष एकवटण्याचा हें वेगळें सांगावयास नकोच हा मजकूर त्यावेळच्या मराठा पत्राच्या अंकातहि प्रसिद्ध झाला होता.

( ५ ) स्टेशनावर गाडींत बसतांना बरीच गुजराथी मंडळी लोकमान्यांस निरोप देण्याकरितां आलेली होती. दुसऱ्या एका गृहस्थानें आम्ही गुजराथी लोक राजकारणांत हिंदुस्थानांतील इतर देशाच्या मानानें फारच मागासलेले आहोंत असे निराशेचे उद्गार काढिले असतां लोकमान्य त्यास म्हणाले कीं, "हा दोष परिस्थितीचा आहे, लोकांचा नव्हे. गुजराथ वाणिज्यप्रधान देश असल्यामुळें स्वाभाविकपणेंच त्यांत राजकारणाचे बाबतींत शैथिल्य आहे; तरी पण गुजराथेंत सद्‌गुणहि बरच आहेत. लोक पूर्ण श्रद्धाळु, धार्मिकवृत्तीचे, उदार व गुणग्राहि आहेत. दुसऱ्याचे मार्गांत कांटे पसरविण्याचा दुर्गुण त्यांच्यांत नाहीं, हें कांहीं कमी नाहीं. महाराष्ट्राची परिस्थिति भिन्न प्रकारची व प्रजा सांपत्तिक दृष्ट्या बहुतेक गरीब असल्यामुळें त्यांस शिक्षण व राजकारणावाचून गत्यंतरच नाहीं. महाराष्ट्रांतहि जे संपत्तीमान् व व्यापारी पेशाचे लोक आहेत त्यांची व राजकारणाची जवळजवळ फारकतच आहे." त्यांच्या येथील तीनचार दिवसाच्या मुक्कामांत परिषदेच्या कामांतून वेळांत वेळ काढून दिवसांतून निदान अर्धा तास तरी मी लोकमान्यांजवळ जात असे. परंतु 'राष्ट्राच्या सेवेपेक्षां व्यक्तिसेवनाचें माहात्म्य केव्हांही जास्त नाहीं. तरी तुम्ही आमची काळजी करूं नये व मुद्दाम तेवढ्याचसाठीं इकडे येऊं नये.' असें त्यांनीं बजाविलें व दारावरील स्वयंसेवकासहि त्याप्रमाणें सांगून ठेविलें! डेमोक्रॅटिक पार्टीतर्फे मी उमेदवार उभा राहिल्यावर त्यांनीं मजला कसाहि प्रसंग आला तरी डगमगतां कामा नये म्हणून बजाविलें. "आपल्या हक्काकरितां सरकाराशीं भांडत असतां कित्येक वेळ लोकांची दिशाभूल होऊन त्यांचेकडूनहि आपणांस नाउमेद होण्यासारखे टोमणे वरचेवर मारण्यांत येतात. अशा प्रसंगीं लोकांवर उलट सूड न उगविता धैर्यानें व चिकाटीनें त्यांची समजूत घालून

त्यांचें सहाय्य मिळाल्यास मिळवावें. परंतु गांगरून जाऊन आपल्या जागेचा राजीनामा केव्हांहि देऊं नये. " ह्या त्यांच्या उपदेशाचा परिणाम पुढें थोड्याच दिवसांनीं म्हणजे गया कॉंग्रेसच्या वेळेस माझ्या अनुभवास आला. सबंध गुजराथ प्रांताचे सभासद नाफेर पक्षाचे म्हणून उभे असतां त्यांच्यापैकीं मीच एकटा खादीच्या पोषाखांत नॉन को-ऑपरेटर कायम राहून देखील स्वराज्य पक्षास मिळालों. 'महात्मा गांधींशीं तुम्ही बेइमान झालात' असें मजला एक दोन नव्हे पण हजारों लोकांनीं म्हटलें असेल. परंतु सद्सद्विवेकबुद्धीच्या उलट वागणें मजला गैर वाटून मी स्वस्थ राहिलों. पुढें कलकत्ता, कोकोनाडा व बेळगाव येथील उत्तरोत्तर होणाऱ्या कॉंग्रेसमधील ठराव पहातां लोकमान्यांच्या उपदेशांतील धैर्य व चिकाटीची खरोखर किंमत मला कळली. लोकमान्याचे हयातींत नॉन-को-ऑपरेशन सुरू असतां गुजराथ प्रांताची तयारी त्यांनीं पाहिल्यावर एक वेळ ते मजला सहज म्हणाले, "Well, Mukadam, I think I have put you in an awkward position, but you may still continue. If I smell something otherwise I will instruct you what to do" परंतु हें बोलणें झाल्यावर पुनःश्च त्यांचे भेटीचा योग आलाच नाहीं. तेथून गेल्यानंतर दोन वेळ लोकमान्यांनीं मजला सर्व मंडळींसह पुण्यास बोलाविलें होतें. पैकीं एक प्रसंग त्यांचे चिरंजीवाच्या लग्नाचा होय त्या समारंभास मजला हजर राहतां आलें नाहीं, म्हणून त्यांस पुढें मीं पत्र लिहिलें त्यांत मोठ्या लोकाकडे पाहुणे जाण्याची संवय नसल्यानें मनास संकोच वाटतो वगैरे लिहिलें होतें त्यावर लोकमान्यांचें उत्तर आलें कीं, " मजकडे जरी बडे बडे पाहुणे येत असले तरी मी स्वतः आपलेप्रमाणेंच साध्या राहणीचा एक गरीब मनुष्य आहें, तेव्हां आपणास मजकडे येण्यास कांहींच हरकत नव्हती !" दुसरे प्रसंगीं गीतारहस्य प्रकाशनानंतर एका भेटीच्या प्रसंगीं त्यासंबंधानें बोलणें निघालें असता ते म्हणाले " थोडे दिवस पुण्यास मजजवळ येऊन राहा म्हणजे गीता हा ग्रंथ वेदान्ताप्रमाणेंच कर्मयोगासहि कसा लागू पडतो व राजकारणांत पडणाऱ्या मनुष्यास त्याचा किती उपयोग आहे हें सर्व समजावून सांगेन." परंतु पुढें माझें जाणें न झाल्यामुळें त्या गोष्टीची आठवण ठेवून कांहीं दिवसांनीं त्यांनीं मजला लिहिलें कीं, " तुम्ही कां आलांत नाहीं ? भ्याला कीं काय ? मी कांहीं तुम्हांस सोवळ्यानें गीतेची सया देण्यास बोलावीत नव्हतों ! " मुंबईस सरदारगृहांत एका भेटीच्या प्रसंगीं बोलणें निघालें असतां लोकमान्य म्हणाले कीं, " १९०८ सालीं मी मंडालेस जाण्यापूर्वी कांहीं दिवस अहमदाबाद येथील साबरमती जेलमध्यें असतांना राजकारणांत गुजराथ प्रांताची स्थिति फारच मागासलेली पाहून मजला फारच वाईट वाटलें होतें. व हा प्रांत तयार होऊन भरतखंडांतील इतर प्रांतांप्रमाणें स्वतःवरील जबाबदारी स्वतः केव्हां ओळखणार ह्या फिकीरींतच मी होतों, परंतु तुरुंगांतून बाहेर आल्या-

वर पुढें गुजराथनें केलेली प्रगति जेव्हां माझ्या नजरेस पडली व पंचमहाल-सारख्या मागासलेल्या जिल्ह्यांत पहिली राजकीय परिषद जवळ जवळ कॉंग्रेसच्या तोडीचीच पाहून मजला अत्यंत समाधान वाटले." महात्मा गांधी, आनीबेझंट व गोखले यांचेसंबधानें बोलणें निघालें असतां शेवटच्या दोन व्यक्तींसंबंधानें कित्येक बाबतींत त्यांचे वागणुकीचें धोरण लोकमान्यांच्या विरुद्ध असलेलें पाहून इतर सामान्य जनाप्रमाणें मी त्यांचेसंबंधानें अनुदार उद्गार काढलेले व त्यांचेवर बरेच तोंडसुख घेतलेलें पाहून ते मजवर बरेच रागावले, व माझी चांगलीच खरडपट्टी काढून कानउघाडणीहि केली. ती अशी कीं, "आनीबेझंट व गोखले यांनीं हिंदु-स्थानांतील लोकांकरितां कसे व किती श्रम केले आहेत ते बारकाईने पहा म्हणजे कळून येईल. त्यांच्या कामगिरीच्या मानानें विशेष महत्त्वाची कामगिरी जोपर्यंत तुम्ही करून दाखविली नाहीं तोंपर्यंत त्यांस नांवें ठेवण्याचा तुम्हांस कांहींच अधिकार नाहीं हे पक्कें लक्षांत ठेवावे. पुनश्च असे बोलत जाऊ नका." महात्मा गांधींच्या असहकारितेसंबधानें बोलतांना ते स्पष्ट म्हणाले कीं, "असहकारितेवांचून गत्यतर नाहीं, हे तत्त्व मजला पूर्णपणें मान्य आहे. देशाची तयारी ह्या दृष्टीनें व्हावी म्हणून आजवर मी पुष्कळ श्रम केले. परंतु देशाची तितकी तयारी माझे नजरेस न आल्यामुळें त्या मार्गाचा अवलंब करण्याची वेळ अद्याप आलेली नाहीं असे समजून मी स्वस्थ आहें. महात्मा गांधी यास लोकांची तितकी तयारी दिसत असेल किंवा ते स्वतःच्या तपःसामर्थ्यानें तितकी तयारी लोकांकडून कर-वून घेण्यास समर्थ असतील तर लोकांनीं त्या कामांत त्यांस तन, मन, धन सर्व अर्पण करून साहाय्य करावें, व ह्या मार्गाने कां होईना, पण आपल्या कार्यात यश संपादावें. आफ्रिकेतील महात्माजींची असहकारितेची चळवळ सर्वांस ठाऊ-कच आहे, व ह्या देशांत देखील ही चळवळ यशस्वीपणे चालवून दाखविण्या-इतका योग्य मनुष्य दुसरा कोणी नाहीं हें निर्विवाद आहे."

---

## वामन रामचंद्र नाईक

[ जहागीरदार, मुक्काम—दक्षिण हैद्राबाद. ]

(१) १८९६ सालीं मी मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेसाठीं पुण्यास गेलों होतों. त्या सालीं पाऊस कमी झाल्यामुळें धान्याचे भाव झपाट्यानें वाढत असून गोरगरिबांना त्यामुळें बराच त्रास झाला होता. अशा वेळीं गरिबांना त्रास होऊ नये म्हणून टिळक हातांत काठी घेऊन पुण्याच्या दाणे आळींत फिरत असून "धान्याचे भाव विनाकारण वाढवून गरीबाची उपासमार करू नका" असा प्रत्येक दुकानांत जाऊन दुकानदारांना कळकळयानें उपदेश करीत होते. हें पाहून त्यांच्यासबंधानें माझ्या मनात पूर्वीपासून वसत असलेली पूज्यबुद्धि दुणावली.

(२) १८९८ सालीं जेव्हा टिळक बंधमुक्त झाले तेव्हा आनंद प्रदर्शित करण्यासाठीं हिंदुस्थानातील प्रत्येक भागांत मोठमोठ्या सभा झाल्या. त्याचप्रमाणें एक मोठी सभा आमच्या वाड्यातील दिवाणखान्यांतहि भरली होती. त्या दिवशीं गोरगरिबांना अन्नदान करुन टिळकाच्या आयुर्वृद्धीसाठीं देवाची प्रार्थना करण्यांत आली. यानतर त्याच वर्षी मद्रासेस काँग्रेसची बैठक होणार असून त्यास लोकमान्य जाणार होते. कॉंग्रेसहून परत जातांना हैद्राबादेस भेट देण्याविषयीं हैद्राबादेच्या जनतेतर्फे आमंत्रण यावें या उद्देशानें एक सार्वजनिक सभा बोलाविली हाती. त्यांत कॉंग्रेसहून परत जाताना हैद्राबादेस भेट देण्याविषयीं टिळकांना निमंत्रण देण्याचा ठराव पास झाला. टिळकांना निमंत्रण देण्याची कामगिरी माझ्यावरच सोपविली गेल्यामुळें बळवतराव ज्या दिवशीं पुण्याहून मद्रासेस जाणार होते त्याच दिवशीं मी हैद्राबादेहून निघून वाडी जंक्शनवर त्यांची भेट घेतली. निजाम इलाख्यात गुलबर्गा, वाडी व रायचूर या तिन्ही ठिकाणीं टिळकांना पानसुपारी देण्याची व्यवस्था केली गेली होती.

रायचूर स्टेशनानतर अधोनी स्टेशनवर माझे वडील बंधु, मी व श्री पारसनीस असे तिघे टिळकांच्या डब्यांत शिरलों. प्रथमतः हैद्राबादेस भरलेल्या सार्वजनिक सभेंत पास झालेल्या ठरावाची नक्कल त्यांच्या हातात देऊन कॉंग्रेसहून परत जातांना हैद्राबादेस जरूर भेटण्याविषयीं त्याना आग्रहाची विनंति केली. "कॉंग्रेस संपल्यावर सिलोनला जाण्याचा विचार आहे व तेथून बेझवाडा मार्गानें कलकत्त्यास जाण्याचा विचार ठरला आहे. मी तिकडे गेलों नाहीं तर जरूर हैद्राबादेस भेट देईन." असें अभिवचन त्यांनीं दिलें. पुढें आमचे बोलणे चालले असतां गुंतकलचे स्टेशन आलें. या स्टेशनावर स्टेशनावरील हिंदी स्टाफ कडून पुष्पहार व पानसुपारी टिळकांना अर्पण करण्यांत आली. यावर टिळकांनीं मला विचारलें "ही सर्व मंडळी व हैद्राबादकर या नात्यानें

तुम्ही देखील माझ्याबद्दल इतकें प्रेम काय म्हणून व्यक्त करतां ? असें कोणतें कार्य मी केलें कीं, ज्याकरितां तुम्ही सर्वांनीं माझा इतका गौरव करावा ?" मी म्हणालों "आपल्या मायदेशासाठीं, जनतेसाठीं हाडाचीं काडें करून रात्रंदिवस जी झीज आपण सोसली व सोशीत आहां त्याबद्दल सर्वांच्या मनांत प्रेम उत्पन्न होणे साहजीकच आहे." "झीज ती कोणती ? सरकार जबरदस्त आहे त्यांनीं तुम्हांसहि अटकेंत ठेवले तर तुम्ही देखील माझ्या सारखा मुकाट्यानें तुरुंगवास सोसाल कीं नाहीं ?" असा उलट प्रश्न टिळकांनीं केला. मी म्हणालों "तुरुंगवास आम्ही सोसू कीं नाहीं हें परीक्षेची वेळ आल्याशिवाय सांगता येत नाहीं." यावर "हें उत्तर योग्य नाहीं. जबरदस्ताच्या हातांत सांपडल्यावर प्रत्येकाला माझ्यासारखेंच वागणें भाग पडतें." असें टिळकांनीं उत्तर दिलें. इतकें बोलणें सपते तोंच गुतकल पुढील नचरला स्टेशनवर गाडी उभी राहिली. इतक्यांत मामुली दर्जाचा एक मुसलमान गृहस्थ मागील डब्यांत पाहात पाहात आमच्या डब्यांतहि निरखून पाहू लागला. मी त्याला विचारले. "क्या देखते हो ?" "एक बडे आदमी जेलसे छुटकर इसी गाडीमे मद्रास जा रहे है. यह सुनकर उनको देखने हम लोग आये हैं" असे म्हणून लोकमान्यांकडे निरखून पाहात अंगुलिनिर्देश करून म्हणाला "वह यही महाराज हैं" असे म्हणून लोकमान्यांना दोनतीन वेळां लवून सलाम केला. श्री० पारसनीस यांनीं लोकमान्याना विचारलें "कांहो, बळवंतराव, आपल्या सबधाने याला कुणी सांगितलें ? आपण होऊन आपला शोध करीत करीत तो येथपर्यंत आला. व आपल्याला पाहताच त्याला किती तरी आनद झाला आहे ! याचे कारण काय बरें असेल ? अशा अनोळखी माणसानें आपल्या सबधीं जे प्रेम व्यक्त केले हे तुमच्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर आहे." यावर लोकमान्य म्हणाले "याचे कारण तुम्हीच. तुम्ही लोकांनीं माझ्या तुरुंगवासाचा इतका बभ्रा केला नसता तर या बिचाऱ्याला तरी तो कसा कळता ?" असे म्हणतांच डब्यांत हशा पिकला.

(३) यानतर आम्ही मद्रासेस गेलो. आम्हा सर्व महाराष्ट्रीयांना राहण्यासाठीं एकाच बगल्यांत व्यवस्था केली होती. तेथें तजावरच्या कांही प्रसिद्ध महाराष्ट्रीय मडळींनीं आम्हां सर्वांस पानसुपारी दिली होती. व सर्वांचा ग्रूपफोटोही काढला होता ( तो फोटो सध्या मजजवळ आहे ). या प्रसगीं लो. टिळकांचें जें लहानसें भाषण झालें होतें त्यांत एक मुद्दा लक्षांत ठेवण्यासारखा होता. टिळक म्हणाले "पृथ्वीच्या पाठीवर कोणत्याहि भागात महाराष्ट्रीय असोत, त्यांची एकमेकाची गांठ पडली म्हणजे जें प्रेम व आपलेपणा व्यक्त होतो त्यावरुन भविष्य करण्यास कोणतीहि हरकत नाहीं कीं, महाराष्ट्रीय पुन्हां एकवार आपल्या गतवैभवास प्राप्त करून घेऊन आपले राज्य प्रस्थापित करतील." तसेच नागोजीराव वगैरे तंजावरच्या मंडळींना टिळकानीं उपदेश केला कीं, "तुम्ही महाराष्ट्रीय असूनहि

आपली मातृभाषा तुम्हास चांगली बोलतां येत नाहीं. तुमच्या मुलाबाळांना तरी मातृभाषा--मराठी--शिकवा. पुण्याहून शिक्षक वर्ग मागवून तुमच्या देशांत मराठी शाळा काढा. महाराष्ट्रांतील शिक्षक येथें जास्त दिवस राहतील तर त्यांचीहि भाषा बिघडण्याचा संभव आहे. तरी दर पांचसहा वर्षांनीं शिक्षक वर्ग बदलून तुमच्या देशात मराठी भाषेचा प्रसार करा. निदान तुमच्या प्रांतांत असणाऱ्या महाराष्ट्रीयाकरितां तरी त्यांना मातृभाषा चांगली येईल अशी व्यवस्था करा. कोणत्याहि प्रांतात राहिल्यास हरकत नाहीं. परंतु आपल्या मातृभाषेस पारखे कधींच होऊं नये."

(४) १९१४ सालीं लोकमान्य तुरुंगांतून सुटून आल्यावर पुण्यास जाऊन त्यांची भेट घेतली. हैद्राबादेसंबंधीं बोलणें निघालें. बोलतांना लोकमान्यांनीं "तुमच्या देशी संस्थानांत सुधारणा केव्हां म्हणून येणार?" अशी पृच्छा केली. मी म्हणालो "आपण व देशातील इतर पुढारी संस्थानाकडे लक्ष देत नाहीं. एवढेंच नव्हे तर काँग्रेस ब्रिटिश इलाख्यापुरतीच असल्यामुळे त्यांत देशी संस्थानाबद्दल प्रश्नच येण्याचें कारण नाहीं असें म्हणून संस्थानासंबधानें कॉंग्रेसमध्यें कोणी विचारच करीत नाहीं. अशी वस्तुस्थिति असल्यामुळे देशी संस्थानांत सुधारणा केव्हां होणार हें सांगणें माझ्यासारख्याला फारच कठीण आहे. याबद्दलची तोड आपणच काढून त्यासंबधीं चळवळ सुरू कराल तरच कांहीं आशा वाटते." यावर टिळक म्हणाले; "तुमचें म्हणणे खरें आहे. देशी संस्थानांचा प्रश्न इतक्यांत कॉंग्रेसमध्यें आणता येत नाहीं. कारण सध्या ब्रिटिश सरकारशीं झगडण्यांत आमची सर्व शक्ती खर्ची पडत आहे. अशांत दुसऱ्या भूतांना जागे करण्यापेक्षां त्यांना आणखी कांहीं दिवस तरी गोंधळ घालू द्यावा. स्वराज्य हातीं आल्यावर या संस्थानिकांना योग्य मार्गावर आणणें कठीण नाहीं."

---

# शंकर दामोदर पेंडसे

[ एम्. ए., एम्. ओ. एल्, पुणें ]

(१) १९१७ सालची गोष्ट. लोकमान्यांचा गीतारहस्य ग्रंथ प्रसिद्ध होऊन त्यावर अनुकूल–प्रतिकूल टीकांची झोड उठली होती. अमळनेरच्या फिलॉसॉफिक इन्स्टिट्यूटमध्यें त्यावेळीं मी शांकरतत्त्वज्ञानाचें अध्ययन करीत होतों. गीतेच्या तात्पर्यासंबधानें स्वतःचें निश्चित मत बनविण्याकरितां मूळ गीता, त्यावरील आचार्यांचें भाष्य व गीतारहस्य याचा मी तुलनात्मक अभ्यास केला. त्यांत आचार्यांना गीतेचा कर्मसन्यासपर अर्थ करिताना अनेक ठिकाणीं पूर्वापर संदर्भ सोडून किंवा स्वतःचे कांहीं शब्द घालून गीतेच्या श्लोकांचा अर्थ करावा लागला आहे असें आढळून आले. अठराहि अध्यायातील असे सर्व श्लोक एकत्र आणून त्यांचा सरळ अर्थ काय आहे व आचार्यांना करावा लागलेला अर्थ कसा सदोष आहे हें दाखविणारा एक लेख मी तयार केला होता. हा लेख लोकमान्यांना अर्पण केलेला असल्यामुळें, पुण्यास गेल्यावर तो त्यांना प्रत्यक्ष द्यावा अशी कल्पना माझ्या डोक्यांत आली. त्या साठीं एक दिवस सकाळीं मी गायकवाडवाड्यांत आलों. तेव्हां ना. उपासनी वगैरे मंडळी बसली होती. लोकमान्य एकटे सांपडावे अशी तर माझी इच्छा! मी त्या वेळीं परत गेलों. दुपारीं लोकमान्य एकटे भेटले तर ठीकच, नाहींतर लोकांचे देखत आपल्या लेखाची कहाणी सांगण्याऐवजीं लिहूनच त्यांना काय ते कळवावें असा विचार करून एक चिठी लिहिली. " पूर्ववयांतच गृहस्थाश्रमाचें किंवा संसाराचें हें प्राचीन शास्त्र जितक्या लवकर समजून येणें शक्य असेल तितक्या लवकर प्रत्येकानें समजून घ्यावें " या गीतारहस्याच्या प्रस्तावनेंतील आपल्या आज्ञेप्रमाणें अभ्यास करून हा लेख लिहिला आहे, असे त्या चिठींत मीं लिहिलें होतें. दुपारीं दोन वाजतां मी वाड्यांत गेलों तेव्हाहि ते मंडळीच्या गराड्यांतच होते. तीनच्या एक्सप्रेसनें ते मुंबईला जाणार होते. मी आंत शिरलों तोंच 'बाबा' म्हणून हांक मारीत टांगा आणला कीं नाहीं याची चौकशी करण्याकरितां लोकमान्य खोलींतून बाहेर आले. ही संधि साधून मी तावडतोब वर गेलों व नमस्कार करून लेख आणि चिठी त्यांच्या हातात दिली. त्यांनीं चिठी वाचली " गाडींत मला वाचायला कांहीं तरी पाहिजेच आहे, तेव्हां तुमचा लेख मुंबईला नेतो. आठवड्यानें परत भेटा " असे सांगून त्यांनीं मला रजा दिली. सात दिवसांनीं मी त्यांच्याकडे गेलों. ते उघडेच मराठा ऑफिसमध्यें बोलत होते. मला पाहिल्यावर लेख परत देण्याकरितां ते आपल्या खोलीकडे निघाले. मी त्यांच्या पाठीमागून चालतों होतों. जातांना वाटेंतलें ठेंगणें दार त्यांच्या डोक्याला इतक्या जोरानें लागलें कीं, दुसरा एखादा मनुष्य मटकन् खालींच बसला असता.

आपल्या घाईमुळें त्याना लागलें असें वाटून मला तर फार संकोच झाला. पण डोक्यावरून हात फिरवून एका क्षणांत त्यांनीं आपला चेहरा शांत केला व ते पुढें चालूं लागले. खोलींत गेल्यावर ट्रंकेंतून त्यांनीं लेख काढून दिला व " कोठें तरी छापावयास द्या. केसरींत मजकुराची गर्दी नसती तर केसरींतच तो दिला असता " असें सांगून गीतेच्या तत्त्वज्ञानासंबंधान ते बोलू लागले. " इंग्रजी, जर्मन, फ्रेंच वगैरे भाषा, त्यांतील ज्ञानभांडार हस्तगत करून घेण्या करितां शिकणें जरूर आहे " असें सांगून त्यांनीं मला रजा दिली. जातांना, लेखाच्या प्रारंभीं व शेवटीं असलेली रहस्यकारांची स्तुति काढून टाका असें सांगण्यास ते विसरले नाहींत! लेख इतका काळजीपूर्वक वाचला होता कीं, ज्या ठिकाणीं विरामचिन्हें देण्याचीं राहिलीं होतीं त्या ठिकाणीं तीं सुद्धां त्यांनीं दिलीं होतीं! कित्येक ठिकाणीं शब्दयोजना बदलली होती. शंकराचार्यासंबंधानें लिहितांना ते किती काळजी घेत हें त्यांनीं केलेल्या खालील दुरुस्तीवरून लक्षात येईल. " ज्या त्या पदांतून संन्यास काढण्याची आचार्यांची इच्छा येथें इतकी अनावर झाली कीं, " या वाक्यांतील 'अनावर' शब्द काढून टाकून त्या जागीं 'प्रबल' हा शब्द त्यांनीं घातला आहे. 'अनावर' व 'प्रबल' या दोन शब्दांतील फरक चाणाक्ष वाचकांच्या तेव्हांच लक्षात येईल. 'टिळकांनीं देशाकरितां तुरुंगांत खडी फोडली' या वाक्याखालीं रेघ मारून पुढें प्रश्नचिन्ह केलें होतें!

( २ ) नंतर एक वर्षानें ते अमळनेर येथें आल्यावेळीं फिलॉसफिक इन्स्टिट्यूटमध्यें आले होते. तेथें मला पाहिल्याबरोबर त्यांनीं ओळखलें व मी गेल्या वर्षी त्यांच्याकडे गेलों होतों असें श्री. प्रतापशेट यांस सांगितलें. लोकमान्यांच्या इच्छेप्रमाणें माझा लेख पुण्यांतील एका मासिकाकडे प्रसिद्धीकरितां दिला होता. लेख प्रसिद्ध करण्यासारखा आहे असें लोकमान्यांनीं मासिकाच्या संपादकांना कळविलें होतें, पण त्यांनीं तो लेख चार महिने तसाच ठेवून दिल्यामुळें मी परत मागितला. तेव्हां लेखावर असलेली लोकमान्यांची शिफारस चाकूनें खरडून टाकून तो लेख माझ्याकडे परत पाठविण्यात आला! नंतर चार वर्षांनीं लोकमान्यांच्या पहिल्या पुण्यतिथीनिमित्त केसरींतून चार हप्त्यांनीं तो प्रसिद्ध करण्यांत आला.

---

## गणेश गोपाळ सोमण

[ कराड जि० सातारा. ]

पुष्कळ लोकांनीं लोकमान्यांची मोठमोठीं व्याख्यानें पुष्कळ ऐकलीं असतील, परंतु लोकमान्यांचें दोन शब्दांचें व्याख्यान ऐकण्याचा योग मात्र अपूर्व खराच !

सुमारें सहासात वर्षें झालीं. त्यावेळीं अथणीस एक परिषद भरणार होती. बुधगांव स्टेशनवर मी गेलों होतों. लोकमान्यांची गाडी येण्याचे वेळेपर्यंत समुदाय बराच जमला. रा. छापखाने प्रभृति सांगलीचे पुढारीहि तेथें आले होते. मेलगाडी स्टेशनवर येऊन थांबली. लोकमान्यांचा डबा दिसताच 'जय-जयकार' झाला. तेथें व्याख्यानासाठीं मुद्दाम व्यवस्था केली होती. प्रारंभीं छापखाने यांचें प्रास्ताविक भाषण होऊन त्यांत त्यांनीं लोकमान्यांनीं सर्वांना दोन शब्द सांगावे अशी विनंति केली. लोकमान्य उभे राहिले व म्हणाले "गाडी सुटायची वेळ झाली आहे. मला जास्त बोलतां येणार नाहीं. तरी छापखाने यांनीं सांगितल्याप्रमाणें मी आतां फक्त दोनच शब्द सांगतों. पहिला शब्द म्हणजे–आभार–तुम्हीं केलेल्या माझ्या सत्काराबद्दल आभार व दुसरा शब्द म्हणजे–स्वराज्य–मी ज्या कार्यासाठीं झटतों आहे त्या स्वराज्याचे कार्याला प्रत्येकाने यथाशक्ति हातभार लावावा." झालें. व्याख्यान संपलें ! गार्डानें शिटी फुंकली ! लोकमान्य गाडींत बसले व 'लोकमान्य टिळक महाराज की जय' या जय-घोषांत गाडी मिरजेकडे चालूं लागली.

---

## वासुदेव लक्ष्मण चिपळूणकर

[ कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे पुतणे, लोकमान्यांचे लॉ. क्लासमधील शिष्य, वकील, आकोला. ]

(१) लोकमान्यांशीं माझा प्रत्यक्ष संबंध प्रथम सन १८९६मध्यें आला. त्यावेळीं मी वकीलीच्या अभ्यासाकरितां लोकमान्यांचे लॉ क्लासमध्यें एप्रिल १८९६ मध्यें दाखल झालों; तों त्यांना १८९७ मध्ये राजद्रोहाचे खटल्यांत शिक्षा होऊन, क्लास बंद होईपर्यंत होतों. क्लासमध्यें दोन वर्षांचा कोर्स ठेविला होता; पहिल्या व दुसऱ्या वर्षांच्या विद्यार्थ्यांचे असे दोन वर्ग असत. त्यावेळचे माझे सहाध्यायी म्हणजे, शिवाजी उत्सवाचे चिटणीस रा. बामनराव तळवळकर वकील, रा.

तळायीकर वकील, पुणें; कै. रा. गोविंदराव घारप, वकील पुणें; व सरदार शिवकराव गोखले ( सदाशीव पेठ ) यांचे आठवतात. लॉ. क्लासचे अध्यापनांत मदतगार म्हणून लोकमान्य एक दुसरे कायदे पंडित गृहस्थ ठेवीत असत. माझे वेळीं पुण्यांतील प्रसिद्ध वकील, रा. दिनकर हरी चाकनीस हे कांहीं दिवस होते. ते गेल्यावर त्यांचे जागीं कांहीं दिवस थोड्याकार अवधीकरितां नगरचे रा. ब. शितळे वकील व खटला चालू असतां बारशीचे रा. गोविंदराव टिळक, वगैरे होते. अखेरीस कायमचे मदतगार म्हणून रा. न. चिं. उर्फ तात्यासाहेब केळकर हे आले. लोकमान्य व त्यांचे मदतगार गृहस्थ आळीपाळीनें, प्रत्येक वर्ग एकएक दिवस घेत. वर्ग दोन तास, सकाळीं ७ ते ९, असा असे. याप्रमाणें माझे वर्गावर ( पहिले वर्ग ) लोकमान्य एक दिवसाआड येत असत. त्यांनीं वर लिहिलेल्या सव्वा-दीड वर्षाच्या अवधींत आम्हांस मेनचा हिंदु लॉ व पुराव्याचा ॲक्ट शिकविला. त्यानंतर कराराचा ॲक्ट चालू असतां, त्याच्यावर राजद्रोहाचा पहिला खटला होऊन ते कारागृहांत गेले व क्लास बंद झाला. त्या वेळीं लॉ क्लास, तें रास्तांत असलेल्या विंचूरकरांचे वाड्यांत होता. ज्या दिवशीं लोकमान्यांचा दिवस असे, त्या दिवशीं क्लास सात वाजतां कधींहि सुरू झाला नाहीं. त्यांचेकडे खासगी व सार्वजनिक कामानिमित्त नित्य येणाऱ्या माणसांची नेहमीं येजा चालत असे. त्यांची निरवानिरव करून ते बहुधा साडेसात अगर त्याहीनंतर क्लासांत येत असत. कधीं कधीं सार्वजनिक कामाची निकड असल्यास तसा निरोप धाडून क्लास मुळींच बंद होत असे. क्लासांत आल्यावर नोकरानें टेबलावर आणून ठेवलेल्या पुस्तकाचीं जीं पानें वाचावयाचीं तीं चाळण्यांत व एकीकडे सुपारी चावण्यात, साधारण १०।१५ मिनिटें गेल्यावर मग, ते त्या दिवशीं जो भाग पुस्तकांतून वाचावयाचा, त्याचा सारांश १५।२० मिनिटांत सांगत असत. व मग वाचावयास सुरवात करीत. वाचावयास सुरवात झाल्यावर मध्यें कोणा विद्यार्थ्यांनीं प्रश्नच केला तर त्याचें उत्तर देऊन, फिरून वाचावयास सुरवात करीत. याप्रमाणें ९ वाजेपर्यंत वाचन चालून क्लास पुरा होत असे. विशेष तयारी करून, कधीं क्लास चालविल्याचें मला स्मरत नाहीं. त्यावेळीं विद्यार्थ्यांमध्यें अशी एक आख्यायिका असे कीं, लोकमान्यांचा पुराव्याच्या कायद्यात विशेष व्यासंग आहे; व त्याप्रमाणें त्या कायद्यावर, त्यांनीं पुराव्याचा ॲक्ट वाचावयास सुरू करण्याचे प्रसंगीं पहिलीं तीन व्याख्यानें उत्तम दिल्याचें मला स्मरतें.

( २ ) लखनौची कॉंग्रेस झाल्यावर लोकमान्य कलकत्त्याचे मार्गानें जानेवारी १९१७ मध्यें वऱ्हाडांतून पुण्याकडे चालले होते. त्यांचा मुक्काम यवतमाळास होता; व अकोल्याचे मंडळींची इच्छा त्यांना अकोल्यास आणण्याची होती. यवतमाळास जाऊन अकोलेकरांमार्फत प्रत्यक्ष निमंत्रण देण्याकरितां माझी व

रा. बापूसाहेब फडके यांची योजना झाल्यावरून, आम्ही दोघे यवतमाळास गेलों. अकोलेकरांचें निमंत्रण लोकमान्यांनीं मान्य केल्यावर, आम्ही कांहीं सार्वजनिक गोष्टी बोलत होतों. खेडेगांवाहून आलेल्या लोकांची दर्शनाची इच्छा कळल्यावर त्यांना आंत येण्यास सांगण्यांत आले. प्रत्येकजण आंत येऊन लोकमान्यांचें चरणांवर मस्तक ठेवून, त्यांचा आशीर्वाद घेऊन जात होता. आम्ही दोघे एकाच कोचावर बसलो होतों; बोलणें चालू होतेंच. इतक्यांत सहजरीत्या एका गृहस्थानें लोकमान्यांना वंदन करून, मलाहि त्यानें तसाच वांकून नमस्कार केला. त्यासरसें, त्याचे मागील गृहस्थानें तोच क्रम चालू करून, आम्हा दोघांनाहि वंदन केलें. तेव्हां हा कठीण प्रसंग आलासें पाहुम, मी विनोदानें लोकमान्यांना म्हटलें. 'Up to now, there was only one saint, but now it seems they are turning one into two' 'आतांपर्यंत (येथें) एकच साधुपुरुष (बसले) होते, पण असें दिसतें कीं, ही मंडळी आतां एका (साधू)च्या ऐवजीं दोन (साधू) निर्माण करीत आहेत' तेव्हां लोकमान्यांनींहि पण 'We need not regret, if one saint is being turned into two. India requires at present, not only two, but many such *political* saints' 'एका साधूच्या ऐवजीं दोन साधू झाले यांत वाईट वाटण्याचें कारण नाहीं; आज हिंदुस्थानाला दोनच नव्हत, तर पुष्कळ राजकारणी साधू हवे आहेत.' असें उलट विनोदानेंच पण अर्थपूर्ण उत्तर दिले.

(३) त्या दिवशीं सायंकाळीं रा. दादासाहेब बापट यांचे अध्यक्षतेखालीं यवतमाळकरांनीं, प्रचंड सभा भरवून, लोकमान्यांचा सन्मान केला. दुसरे दिवशीं सकाळीं रा. हूड वकील यांचे घरीं पानसुपारी झाली. या वेळीं, पुण्याचे रा. कृष्णाजी पुरुषोत्तम भट बी. ए. एल एल. बी. तेथें सब डिव्हिजनल ऑफिसर होते. ते लोकमान्यांचे फर्ग्युसन कॉलेजांतील एक शिष्य होते. पण सरकारी अधिकारी असल्यामुळें आदले दिवसांचे सभेला जातां न आल्यामुळें त्यांनीं, वरील पानसुपारीची वातमी लक्षांत ठेऊन, रा. हूड यांचे घराशेजारीं एका स्नेह्यास भेटावयास जाण्याचे निमित्तानें लोकमान्य तिकडून जातांयेतां दर्शन घेऊन, आपलें समाधान करून घेतलें!

(४) दुपारीं बाराचे गाडीनें लोकमान्य आकोल्यास जाण्याकरितां निघाले. आम्हीहि त्यांचेबरोबर निघालों. त्यांचेच डब्यांत आम्ही बसलों. गाडी चालू असतां अनेक विषयावर चर्चा चालली होती. प्रत्येक स्टेशनवर त्यांना पानसुपारी झाली. प्रत्येक वेळीं ते खालीं जाऊन चारपांच मिनिटांत होमरूलची योजना, त्याजबद्दलची चळवळ व तिचें महत्त्व सांगून त्या कार्यास मदत करण्याबद्दल लोकांस विनंति करून परत येत. अशा प्रकारची एक पानसुपारी होऊन लोकमान्य परत आले, व पगडी आंगरखा काढून म्हणाले, "या समाजाला तुम्ही (संघटित) organise

केले पाहिजे. आतां हा पाहा, तेलंगांचा मुलगा पंढरिनाथपंत; हा आमच्या महाराष्ट्रांतील माणूस; पण हा मिसेस बेझंटकडे जाऊन मग आमच्या चळवळींत कां यावा ?" हा उद्गारवाचक प्रश्न माझ्यासर्वंधानेंहि तितकाच लागू पडणारा होता. लोकमान्यांचा व माझा सहवास अल्प काळाचा; व त्यांची योग्यता फार मोठी; तेव्हां मी उत्तर काय देणार ? फक्त त्यांच्याकडे नुसते स्मित करून मी पाहात राहिलों व पुढें काय म्हणतात याची वाट पाहात होतों. पण त्यांचें बोलणें तितकेंच थांबलें. व मीहि जरी त्यांचेकडे नुसता बघत होतों, तरी माझे मनांत, फक्त लोकमान्यांनाच उद्देशून नव्हे, पण ' येथें शब्द नाहीं शिष्यासी । हे अवघे सद्गुरूपासीं ॥ ' ही समर्थांची ओवी येऊन गेली.

( ५ ) याप्रमाणें कारंजा, मूर्तिजापूर वगैरे ठिकाणीं पानसुपाऱ्या होत होत आम्ही सायंकाळीं आठ वाजतां आकोल्यास पोंचलों. पानसुपारी होऊन लोकांचा सम्मर्द जास्त व्यवस्थित झाल्यावर, लोकमान्यांची थाटानें मिरवणूक निघाली. रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी यांचे घरीं जानोसा ठरला होता. ते त्यांना नेण्यास स्टेशनवर आले होते. दुसरे दिवशीं बोटक्लब, सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक, लक्ष्मी ऑईल मिल वगैरे संस्थांना भेट देऊन, सायंकाळीं व्याख्यान झालें. श्रोतृसमुदाय १५००० पण चित्रासारखा बसला होता. रात्रीं घरीं आल्यावर मी त्यांना कांहीं सरकारी अधिकाऱ्यांची इच्छा कळविली कीं, ते सरकारी नोकर असल्याकारणानें, त्यांना त्या दिवसाचे व्याख्यानास येतां आलें नाहीं; तरी एक दिवस जास्त राहून ' गीतारहस्यावर ' एक व्याख्यान व्हावें. तेव्हां लोकमान्यांनीं एकदम प्रश्न केला कीं, ' मी जर सरकारी नोकरांकरितां एक दिवस राहून व्याख्यान दिलें, तर होमरूलकरितां ते काय करावयास तयार आहेत ? ' नंतर सर्वांचे मनोगत पाहून रुकार दिला व दुसरे दिवशीं गीतारहस्यावर व्याख्यान झालें.

( ६ ) यापुढें होमरूलचे कार्यानिमित्त त्यांचा माझा नेहमीं महिन्या दोन महिन्यांनीं सहवास येत असे. माझेशीं बोलतांना त्यांचे चेहऱ्यावर विशेष प्रेम व पितृवात्सल्य दिसे. सन १९१८ चे अखेरीस चिरोल केस करितां विलायतेस जाण्याचे पूर्वी एकदां सरदारगृहांत आम्हां एकदोघांना निरोपादाखल बोलतांना ते म्हणाले, " सार्वजनिक रीतीनें बोलतांना अगर कार्य करतांना तरुण माणसांनीं हें नेहमीं लक्षांत ठेवावें कीं, मी जें जें बोलतों अगर करतों, तें तें त्यांनीं बोलून अगर करून चालावयाचें नाहीं. तें त्यांच्या पचनीं पडणार नाहीं. मिसेस बेझंट जें जें बोलतात अगर करितात तें तें मीहि पण बोलून अगर करून चालावयाचें नाहीं. "

# सौ. राधाबाई चिपळूणकर

[ श्रीयुत वासुदेव लक्ष्मण चिपळूणकर वकील आकोला, यांचें कुटुंब. ]

( १ ) लोकमान्यांशीं माझा आठवणी देण्यासारखा प्रत्यक्ष संबंध दोनच वेळां आला. ते मंडालेहून सुटून आले त्या दिवशीं सकाळींच त्यांचें दर्शन घेण्याकरितां मी वाड्यांत गेले. ते पुढल्याच दिवाणखान्यांत अंगांत नुसता सदरा घातलेले बसले होते; व भोंवताली सर्व पुरुष मंडळी चिकार भरली होती; पण ते इतक्या वर्षांनीं सुखरूप घरच्या मंडळींना व राष्ट्राला लाभले या आनंदाच्या भरांत,/ लोकाना किंवा त्याना स्वतःला काय वाटेल याचा विचारहि मनांत न येतां, बरोबर आणलेला हार घेऊन मी तशीच शिरले. मंडळींनींहि मला जाण्यापुरती वाट दिली; मी जवळ जाऊन त्यांचे गळ्यांत तो हार घातला व नमस्कार करून आमच्या घराच्या वतीनें पहिला हार लोकमान्यांना घालण्याचा योगायोग जुळून आल्याबद्दल मनांत समाधान मानीत मी परत येऊन जिन्याचें दारांत उभी राहिल्ये. पण ती येण्याजाण्याची वाट होती; म्हणून "आपण घरांत जाऊन आंतलें जिन्याने वर येऊं" असें माझ्या भावानें सुचविलें. तेव्हां आम्ही खालीं येऊन आंतल्या जिन्याशीं गेलों; त्यांचे दिवाणखान्यांत मंडळी मावेनाशी झाल्यानें सर्वांनीं खालीं वाड्यांतील पटांगणांत जावयाचें ठरविलें. मंडळी बाहेरच्या जिन्यानें गेली व लोकमान्य आंतले जिन्याने खालीं आले. मी तेथेंच दाराशीं उभी आहें हें पाहतांच तेवढ्या गर्दीत मजकडे येऊन, कोण काय वगैरे चौकशी केली व "मला खालीं कां नाहीं बोलावलें ? मी खालींसुद्धां आलों असतो" असें ते म्हणाले.

( २ ) या नतर आठदहा दिवसांनीं मी मुलांना आपल्या बरोबर घेऊन गेलें होतें. हेतु हा कीं, आतां लोकमान्यांचें बरेंच वय झालेलें आहे व आपलीं मुलें लहान आहेत; तेव्हां तीं मोठीं होईपर्यंत लोकमान्यांना 'आयुष्य लाभून, त्यांच्या दर्शनाचा व वाणीचा लाभ मुलांना मिळेलच अशी कोणी खात्री द्यावी ? म्हणून मुलांना सध्यां निदान लोकमान्यांचें दर्शन तरी करवून आणावें; म्हणजे मोठीं झाल्यावर ' लोकमान्यांसारख्या महापुरुषाचें दर्शनाला आमच्या आईनें आम्हाला नेलें होतें ' अशी लहानपणची गोड आठवण त्यांना राहील. असा मी बेत केला व सर्वांना घेऊन त्यांचे वाड्यांत गेलें. त्या वेळीं ते ओटीवरील माडींत आरामखुर्चीवर बसले होते. जवळची मंडळी माझ्या ओळखीची नव्हती. पण ते बाबासाहेब विद्वांस व अंतुकाका असावेत असे बोलण्याच्या ओघावरून वाटले. मुलांकडून नमस्कार करविल्यावर आम्ही परत निघण्याच्या बेतांत होतों, परंतु लोकमान्यांनीं आम्हाला जवळ जवळ अर्धा तास बसवून घेतलें व अशी माझी

कित्येक दिवसांची ओळखच आहे अशा आपलेपणाने आमच्या घरांतील प्रत्येक माणसाची विचारपूस केली; थोरल्या शास्त्रीबोआंच्या वेळच्या सुद्धां गोष्टी काढल्या होत्या; पण हें सर्व बोलून झाल्यावर पोटांतून उद्वेग वाटून एकादा मनुष्य बोलतो तसे के. शास्त्रीबोआंची व इतर मंडळींची आठवण करून ते म्हणाले, "आतां आमच्या बरोबरीच्यापैकीं कोणी राहिलें नाहीं, सर्व गेले, मी मात्र एकटा राहिलों आहें." हें त्यांचें तोंडचें शब्द ऐकून आम्हाला भोंवतालच्या मंडळींना थोडा-वेळ उदासवाणें वाटलें. नंतर आतां निरोप घ्यावा म्हणून मी उठलें; तरी पुन्हां त्यांनीं "खालीं मुलींकडे जा व गांवांत आल्यावर त्यांचेकडे नेहमीं येत जा म्हणजे त्यांची व तुमची ओळख राहील" असें सांगून आम्हाला खालीं मुलींच्याकडे नेण्यास सांगितले व सर्वांना आम्रफलांचा प्रसाद पाठवून दिला.

( ३ ) तिसरा प्रसंग आख्यायिकेचा आहे. एकदां ती. सासुबाई व मुलें मोठेखालर एक दिवसाकरितां म्हणून सिंहगडावर गेली होतीं. ही सर्व मंडळी तेथल्या धर्मशाळेंत उतरली होती. माझा भाचा श्रीधर जोशी ( हा हल्लीं हिंदु-विश्वविद्यालयांतून एम्. एस्. सी. होऊन पुढील अभ्यासाकरतां इंग्लंडला गेला आहे ) यास लोकमान्य तेथेच आहेत अशी बातमी लागली. म्हणून शोध करीत तो त्यांच्या बंगल्याकडे गेला. कोठून तरी त्यांना महावयास सापडावें या उद्देशाने तो बंगल्याचे आसपास घुटमळत फिरत होता. इतक्यांत त्याचे इच्छेप्रमाणें ते त्याला दिसले, इतकेंच नव्हे तर त्यांनीं त्याला पाहिल्याबरोबर आंत बोलावून नेलें व कोण, कोठून आला वगैरे चौकशी केली. तेव्हां त्यानें आपली आई, आजी वगैरे मंडळी गडावर आलेली आहेत असें सांगितलें. हें ऐकून "जा त्यांना इकडे घेऊन ये" असें सांगून त्याचेकडून ती. सासुबाईंना बोलावून नेलें, व इकडे उतरायला कां आला नाहींत, आतां इकडे या, दोनतीन दिवस स्वस्थपणें रहा" असा फारच आग्रह केला; परंतु इतर दुसरी पुष्कळ मंडळी बरोबर असल्यामुळें त्यांना यांच्या सत्संगाचा लाभ घेतां आला नाहीं. त्यावेळींहि अर्धापाउण तास बोलून आमच्या घरची, अंकोल्याची व माझी विलायतेला गेले होते त्यांची, अशी सर्व इत्थंभूत हकी-कत विचारून मग त्यांना निरोप दिला !

# विनायक सदाशिव वाकसकर

[ इतिहासाभ्यासी, बडोदें. ]

इतरांप्रमाणेंच लोकमान्यहि आम्हां चांद्रसेनीय कायस्थप्रभूंचा द्वेष करीत, असें मी अनेकांच्या तोंडून ऐकिलें होतें. व या म्हणण्याची सत्यता तपासून पाहण्याचा मी शक्य तो प्रयत्नहि करी. पण कोणत्याहि प्रकारें निश्चित असें प्रमाण मला मिळेना व त्यामुळें ठाम मतहि बनवितां येईना. परंतु एके दिवशीं हा कोच अचानक घडून आला, तो असा.

श्री. कृष्णराव रघुनाथ ऊर्फ रावसाहेब धारकर हे पूर्वी आमच्या बडोदें राज्यांत रत्नशालेवर मुख्याधिकारी होते. हे गृहस्थ तारीख २७ आक्टोबर सन १९२२ रोजीं आपल्या वयाच्या बहात्तराव्या वर्षी निवर्तले. एकदां त्यांच्याशीं बोलत असतांना लोकमान्यांचा विषय निघाला. तेव्हां 'लोकमान्य आपल्या जातीचा द्वेष करितात, निदान आपल्याबद्दल ह्यांस प्रेम नाहीं असा त्यांचेवर आरोप आहे. याबद्दल आपणांस काय अनुभव आहे ?' असें मी रावसाहेबांस विचारलें. तेव्हा त्यांनीं सांगितलें " लोकमान्यावरील हा आरोप मींहि अनेकांच्या तोंडून ऐकिला आहे. परतु या बाबतींत माझा स्वतःचा अनुभव अगदींच निराळा आहे. तो असा कीं, धारेस आमचें कांहीं वडिलार्जित उत्पन्न व हक्क असून ते अलीकडेस बंद करण्यांत आल्यानें कोर्टांत त्याबद्दल केस चालली होती. केस लावण्यापूर्वीं मी पुष्कळ वकीलांचें मत घेतलें होतें. परंतु कोणाचेंच एकमत होईना, म्हणून मी मोठ्या विचारांत होतों. इतक्यांत सन १९०३ मध्यें रा. शंकर मोरो रानडे निवर्तल्यामुळे लोकमान्य येथें म्हणजे बडोदें मुक्कामीं आले असल्याचें मी ऐकिलें. तेव्हां आपल्या केससंबंधीं कागदपत्र त्यांस दाखवून त्यांचें मत विचारावें असें माझ्या मनांत आलें. परंतु 'लोकमान्यास आपल्याबद्दल प्रेम नसल्यानें ते तुम्हांस सल्ला देणार नाहींत.' असा मोडता बऱ्याच मंडळींनीं घातला. बराच विचार करून, कोणासहि न विचारितां एके दिवशीं मी घोड-दौडीवर रा. अप्पासाहेब शारंगपाणी यांचे बंगल्यावर लोकमान्यांस भेटण्यास गेलों. कारण त्यावेळीं ते तेथेंच उतरले होते. त्यांस भेटून केससंबंधीं हकीकत थोडक्यांत सांगितली व बरोबरचे कागदपत्र पाहण्यास विनंति केली. तेव्हां लोकमान्य मला म्हणाले कीं, 'मला सध्यां वेळ नाहीं व ह्या कामाचे कागदपत्र पाहण्यास बराच वेळ लागेल, तरी पुण्यास गेल्यावर एखाद्या फुरसतीच्या आठ-वड्यांत मी तुम्हांस मुद्दाम बोलावून घेईन. व मग तुमचे कागदपत्र पाहून माझें मत सांगेन.' हें लोकमान्यांचे शब्द ऐकतांच माझा थोडा विरस झाला व लोक-मान्यांस आपल्या जातीबद्दल प्रेम नाहीं असें जें म्हणतात तेंच खरें व म्हणूनच

त्यांनीं कांहीं तरी निमित्तानें मला वाटेस लाविलें अशी पक्की समजूत करून घेऊन मी ही घडलेली हकीकत कोणासहि न सांगतां मुकाट्यानें बसलों. पुढें सुमारें तीन महिन्यांनीं एके दिवशीं सकाळीं पाहतों तों लोकमान्यांचें पत्र आलें व त्यांत मी पुढील आठवड्यांत सवडीप्रमाणें पुण्यांत त्यांस भेटावें, असें मला कळविलें होतें. तें पत्र पाहतांच अर्थातच मला फार आनंद झाला व मी पुण्यास जाऊन आपले सर्व कागदपत्र त्यांस दाखविलें. सुमारें तीन साडेतीन तासपर्यंत एकाग्र चित्तानें त्यांनीं ते सर्व कागदपत्र पाहिले व ते पाहत असतांना मधून मधून कांहीं प्रश्नहि मला विचारिले आणि शेवटीं 'या कामांत तुम्हास यश येणार नाहीं; निष्कारण पैसा मात्र खर्च होईल,' असें स्पष्ट सांगितलें. इतकेंच नव्हे, परंतु ' वकील लोक तुम्हांस उगीच भर देतील व आशा दाखवितील; परंतु तुम्ही आपल्या मनाचा निश्चय ढळू देऊं नका ' असेंहि बजाविलें. या नंतर लोकमान्यांचे आभार मानून मी रजा घेतली. परंतु लोभामुळें लोकमान्यांचा उपदेश बाजूस ठेवून इतर वकीलांच्या संगतीनें कोर्टांत दावा मांडिला व हजारों रुपये बुडवून बसलों. "

याप्रमाणें लोकमान्यांसंबंधीं आपला अनुभव रावसाहेबांनीं सांगितला. कांहींचा अनुभव याहून भिन्न असणेंहि अशक्य नाहीं. तथापि रावसाहेब भारकर हे या राज्यांत मोठे प्रामाणिक म्हणून नांवाजलेले गृहस्थ असल्यानें त्यांच्या शब्दांची किंमत त्यांस ओळखणारास तरी निःसंशय फार वाटेल यांत शंका नाहीं.

---

## सौ० जानकीबाई जोशी

[ सिडेनहॅम कॉलेज—विद्यार्थिनी, मुंबई. ]

एकदां कांहीं कामाकरतां केसरीचे एजंट रा. रा. दातार यांचेकडे लो. टिळक व रा. न. चिं. केळकर आले होते. काम संपल्यावर जोडा व कांठी घेऊन बाहेर पडत पडत लो. टिळक रा. दातार यांचेपाशीं कांहीं बोलत होते व रा. केळकर जरा पुढें जिन्याच्या बाजूला चालू लागले, इतक्यांत टिळकांचें बोलणें संपलें व ते इकडे तिकडे नजर फेंकून केळकर तेथें नाहींतसें पाहून ते हसत म्हणाले— " माझी काठी कोठें गेली बोवा ! " हें ऐकून तेथील लोकहि हसू लागले !!

---

## रंगनाथ गोपाळ दुनाखे

[ बी. ए., पुणें. ]

मला सन १९२० सालीं 'नॅशनल डेमोक्रॅटिक पब्लिशिंग कंपनी'चा एक शेअर विकत घ्यावयाचा होता. मी शेअर फॉर्म घेण्याकरतां केसरी ऑफिसमध्यें गेलों व अर्जाचा फॉर्म घेतल्यानंतर तो फॉर्म भरण्याबद्दल तेथील एका गृहस्थाशीं विचारपूस करीत होतों. लोकमान्याची स्वारी त्या वेळीं रस्त्यावरील असलेल्या दिवाणखान्यांत इकडून तिकडे येरझारा घालीत होती. आमचें बोलणें ऐकून ते सहज दिवाणखान्याजवळील असलेल्या खोलीमध्यें आले व मला म्हणाले " तुम्हीं स्वतः तो फॉर्म वाचला असतां तुम्हांस तो फॉर्म भरण्याविषयीं सर्व माहिती सहज समजेल. स्वतः थोडेसे श्रम करून जी गोष्ट समजण्यासारखी आहे त्याजबद्दल दुसऱ्यांवर बिलकुल अवलंबून राहू नये; नेहेमीं स्वावलंबी होण्याचा प्रयत्न करावा. "

---

## शंकर गोपाळ सहस्रबुद्धे

[ काव्यतीर्थ ( कलकत्ता ), शास्त्री ( पंजाब ), मुख्याध्यापक श्रीसरस्वतीमुखमण्डन संस्कृत पाठशाळा, नागपूर. ]

इ. स. १९१८ सालच्या फेब्रुवारी महिन्यांतील गोष्ट. नागपुरास भरलेल्या कीर्तनसंमेलनाचे अध्यक्ष या नात्याने लोकमान्य नागपुरास आले होते. समेलन संपल्यानंतर लोकमान्य कटोलकडे जाऊन पुनः नागपुरास आले होते. एके दिवशीं ( फेब्रुवारी, ता. २२ ) माझे परमपूज्य विद्वद्वर्य विद्यागुरु श्री. वे. शा. सं. पंढरिनाथशास्त्री घाटे ह्यांच्याबरोबर लोकमान्यांना भेटावयास गेलों. तेथील मंडळींपैकीं एकानें माझ्या गुरूची लोकमान्यांस ओळख करून दिल्यानंतर लोकमान्य माझ्या गुरूस म्हणाले. ' आपण रहस्य वाचलेंच असेल. ' यावर माझे गुरु म्हणाले, ' होय; वाचलें इतकेंच केवळ नव्हे, तर त्याचा अभ्यास केला, असें म्हटलें तरी त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं. '

लोकमान्यः—मग त्याबद्दल आपलें काय मत आहे ?

माझे गुरुः—कित्येक ठिकाणीं शंकराचार्यांचा आपण विलक्षण विपर्यास केला असून त्यांवर कांहीं ठिकाणीं अयोग्य विधानें केलीं आहेत.

लोकमान्यः—तीं कशीं काय ?

यावर माझ्या गुरूंनीं लोकमान्यांना कांहीं स्थळें दाखविलीं. त्यांवर थोडा वेळ बोलणें झाल्यावर 'रुचिवैचित्र्य आहे; वास्तविक शंकराचार्यांचा मी अभिमानी आहें.' असें लोकमान्य म्हणाले. यावर माझ्या गुरूंनीं विचारलें, 'मग असें असतां आपण त्यांचें खंडन करण्याचा प्रयत्न केला, ह्याचा काय उद्देश ?'

लोकमान्यः—उद्देश एवढाच कीं, आपणासारख्या जुन्या शास्त्रर्यांनीं त्या विरुद्ध लिहून शंकराचार्यांचे खरें मत जनतेपुढें मांडावें.

माझे गुरुः—आम्हां जुन्या शास्त्र्यांना कसें लिहावें हेंच मुळींच माहीत नसतें. त्यांतूनहि एखाद्याला लिहितां येत असलें तर त्यानें सांगितलेलें उतरून घेणारा दुसरा कोणी तरी असावा लागतो. व तो लिहिणाराहि रहस्याचा नीट अभ्यास केलेला असा पाहिजे.

लोकमान्यः—नागपुरांत अशा प्रकारचा एकहि लेखक मिळणार नाहीं ?

माझे गुरुः—ह्या मंडळींपैकीं कितीजणांनीं रहस्याचा अभ्यास केला आहे, हें आपण त्यांना विचारा. हे आपले पूर्ण मतानुयायी म्हणवितात, पण ह्यांच्यांत व क्षेत्रांतील पड्यांत विशेष भेद नसतो, असें मला वाटतें.

लोकमान्यः—मला वाईट वाटतें कीं, मलाहि आपणांप्रमाणेंच कटु अनुभव आला आहे. माझे असे कट्टे मतानुयायी म्हणविणारांपैकीं कित्येकांनीं तरी माझ्या रहस्याचे पहिलें सुद्धां पान पुरतेपणीं वाचलें नाहीं. माझ्या प्रत्येक अनुयायी म्हणविणारानें रहस्याचा चांगला अभ्यास केलेला असावा, अशी माझी इच्छा आहे. रहस्याचें पुस्तक विकत घेऊन व तें देवघरांतून ठेवून त्यांनीं त्याची पूजा करावी अशी माझी मुळींच इच्छा नाहीं.'

## शिवाजी गणेश पटवर्धन

[ एम्. बी. ( ऑनर्स ), डॉक्टर, अमरावती. ]

लोकमान्य तिलकके मंडाले जेलसे छुटकर पूना आनेके कुछ दिनोंबाद हम कुछ विद्यार्थी उन्हे मिलनेके लिये गये ! आपसे मिलने वालोंकी हर समय आपके घर पर भीड उन दिनो रहा करती थी। इसलिये हम दुपहरके १२ बजे उनके घर गये और सीधे उनकी बैठकमें जा पहुँचे। लोकमान्य उस समय भोजन करने गये हुए थे। कुछ देरके बाद आप भोजन करके बैठकमें सुपारी हातमें लिये और कुछ मुँहमें चबाते हुए आ पहुँचे। हम सब लोगोंने उठकर उन्हे प्रणाम किया। बादमें सुपारी खाते हुए और इधर उधर टहलते हुए उन्होने हम लोगोंसे बातचीत करना शुरु किया। जिस प्रकार बहुत दिनोंसे बिछुडे हुए पुत्रोंके मिलने पर माता बडे प्रेमसे उनकी क्षेम कुशल और सब हाल पूछती है, उसी प्रकार उन्होने बडे प्रेमसे हमारे प्रत्येक साथियो से अलग २ बात करके हम सब लोगोका परिचय प्राप्त किया। हमारे मेंसे एक विद्यार्थीको कमजोर देखकर उन्होंने कहा–' तुम इस अवस्थामें इतने कमजोर हो, यह ठीक नहीं है। दुनियामे आजकल कमजोर आदमियोंको रहनेके लिये स्थान नहीं है। मेरा शरीर भी एक बार कालेजमें पढते हुए कमजोर होगया था, तब मैंने एक वर्षतक कालेजमे जाना बंद करके शरीर सुधारनेकी पूरी कोसीस की थी। तुम्हें चाहिए कि पहले अपने शरीरको निरोगी और सबल बनाओ। क्योंकि शरीर रोगी और दुर्बल रखने के समान दूसरा कोई पाप नहीं है। ''

इसके बाद हम लोगोंने आपसे पूँछा कि हमे किस प्रकार अपने देशकी सेवा करनी चाहिए ?

आपने कहा—इस प्रश्नका उत्तर देना कठिन है। संक्षेपमें मै आपलोगोंसे इतना ही कहना चाहता हूँ, कि From begging to open rebelion choose any thing according to your ability and do it; but remember " स्वधर्मे निधन श्रेयः परधर्मो भयावहः " सरकारसे भीक मांगनेसे लेकर खुल्लम् खुल्ला सरकारके साथ युद्ध करने तक कोई भी कार्य अपने देशके लिये अपनी शक्तिके अनुसार करते रहो। खैर यह न भूलो कि अपनी शक्ति और हैसियतसे कम या अधिक काम करना मानो देशका नुकसान करना है।

इसके बाद हम लोगोंने पूछा—आप कोई एकाध ऐसी सस्था क्यो नहीं खोलते कि जिसमें हम जैसे विद्यार्थी सम्मिलित होकर देशकी सेवा करें।

आपने कहा—परतंत्रा में संस्थाके रूपसे देशकी सच्ची सेवा नहीं हो सकती। सरकार जब किसी संस्थाके द्वारा देश का अच्छा कार्य होना देखती है, तब

उस सस्थाको मिटानेकी कोशीस करती है। ऐसी हालतमे सस्थाके सभासदों को देश के समान उस संस्था पर भी विशेष प्रेम हो जाता है। इसका फल यह होता है, कि समासद उस संस्थाके रक्षा करनेकी ओर अधिक ध्यान रखते हैं और देशका पूर्ववत् कार्य उनके द्वारा नहीं होने पाता। इसलिये परतंत्रतामें तो ऐसे देशसेवकोंकी जरूरत है जो आपसमें परस्पर सहायता करने वाले मित्रोंका समूह बना कर देशकार्य करें।

बस इतनी बात होनेके पश्चात और भी बडे २ व्यक्ति आपसे मिलनेके लिये आये, इसलिये आपको हम लोग प्रणाम करके चले आये।

---

## रामकृष्ण हरि भडकमकर

[ एम्. ए. एम्. डी., सुप्रसिद्ध डॉक्टर, मुंबई. ]

( १ ) १९०६ साली पढरपुरास स्वदेशींचें प्रदर्शन भरले होतें. त्या प्रसंगीं लोकमान्य पढरपुरास गेले होते. मी त्यावेळीं विद्यार्थीदशेंतच होतों. लोकमान्यांच्या बरोबरच माझाहि मुक्काम, ते सरदेसाईच्या वाड्यात उतरले होते तेथेच होता. त्यावेळीं मला त्यांचा प्रथम प्रत्यक्ष परिचय झाला.

( २ ) प्रदर्शन कै. ना. गोपाळराव गोखले यांचे हस्तें उघडले. प्रदर्शन उघडले त्यापूर्वींच एक दिवस गोखले मोडनिंबला येऊन श्रीमंत मिरजकरांचे पाहुणे म्हणून राहिले व श्रीमंतावरोबरच त्याचे गाडींतून अगदीं आयत्या वेळीं सभेचे जागीं येऊन दाखल झाले. श्रीमंत व गोखले दोन खुर्च्यांवर बसले. लोकमान्य जवळच बैठकीवर इतर लोकांत बसले होते. जवळच एक तिसरी खुर्ची ठेवून त्यावर बसावयास बोलाविलें, तेव्हां लोकमान्य नामदारास म्हणाले:—श्री पाडुरंगाचे दर्शनास आम्हीं आलों असल्यामुळें यात्रेस आलेल्या इतर वारकऱ्यातच आमचें स्थान असणें अवश्य आहे. प्रदर्शनासच आलेल्या लोकात बसणें योग्य नाहीं!

( ३ ) लोकमान्य बरोबरीच्या लोकाना घेऊन नियमानें पोंहावयास जात असत. पोहण्यानें फारच उत्कृष्ट व्यायाम होतो व त्यामुळें शरीराच्या सर्व भागांतले दोष जातात व सधिवातासारखे रोगहि नाहींसे होतात असें ते नेहमीं म्हणत. ते वारंवार असेंहि म्हणत कीं, पोहणें ही राष्ट्रीय कला असून ती प्रत्येकास आलीच पाहिजे. माझे हातीं सत्ता असल्यास मी पोहणें हा सर्व मुलामुलींच्या शिक्षणक्रमांतला एक आवश्यक विषय करून टाकीन!

(४) वै० वा. ह. भ. प. विष्णुबोवा जोग यांनीं लोकमान्यांनीं वारकरी लोकांस चार शब्द सांगावे असा आग्रह चालविला, त्यावेळीं लोकमान्य म्हणाले "अहो, येथील लोकांस उपदेश करण्याचें काम आमचें नाहीं. या लोकांत मतप्रसार करण्याचे काम तुम्हां हरिदासपुराणिकांचे आहे."

(५) याच प्रसंगीं एका व्याख्यानांत एका विद्वान् वक्त्याने भागवत धर्मावर हल्ला करून वारकऱ्याचा नेमधर्म वगैरे सर्व थोतांड आहे, त्याचा समाजाला कांहीं उपयोग नाहीं वगैरे टीका केली. त्यावर लोकमान्य म्हणाले "हें पाहा तुमचें चुकतें ते असेंच. भागवतधर्माच्या प्रसाराचा समाजाला काय उपयोग होतो हे रानडयांनीं दाखविलेच आहे. समाजकार्याकरितां स्वार्थत्याग कसा व कोणी करावा हे सांगून स्वार्थत्याग करण्याची प्रवृत्ति निवृत्तिरूपानें सत मडळानें उत्पन्न करून ठेविली होती. या संस्थांतून कांहीं दोष शिरलेच असले तरी वर्षांतून एकादा दिवस कां होईना, पण सर्वसंगपरित्याग करण्याची पात्रता दाखविणाऱ्या या लोकांकडूनच सध्याच्या राष्ट्रकार्याकरिताहि स्वार्थत्याग होणार आहे. तरी या संस्था त्यातील अनुयायांशीं समरस होऊन सुशिक्षितांनीं काबीज करणे अवश्य आहे. त्यांचे पाठीशीं ६०० वर्षांची परंपरा आहे हे विसरू नका!"

(६) कार्तिकीची वारी असल्यामुळे स्वाभाविकच पंढरीरायाचे दर्शन होणे मुष्कीलीचें होतेच. त्यांतच लोकमान्यांसारखे पुढारी आले असल्यामुळेहि नेहमींपेक्षां जास्त गर्दी होतीच. लोकमान्य व त्यांचे बरोबरीची मडळी यांस दर्शन करावयाचे म्हणजे वेळ मोडणार म्हणून रा. गणपतराव मोडक व बापूसाहेब सरदेसाई यांनीं खटपट करून या मडळीकरिता खास परवानगी काढून स्वतंत्र वेळ व मार्ग राखून ठेवण्याची व्यवस्था केली होती राखून ठेविलेला मार्ग बायकांकरिता राखून ठेविलेल्या जागेचे बाजूनेच होता. दर्शनाकरितां श्रीपंढरीरायाचे पुढें जें आडवट घालून ठेविलेले असतें तेथपर्यंत जवळजवळ मडळी पोचली असतां बायका मडळींपैकीं एक म्हातारी बाई आम्हां मंडळींकडे पाहून एकदम उद्गारली "वा पांडुरंगा, आतांच आलेल्या या मडळीला इतक्या लवकर व सहजासहजीं व अनायासे तुझें दर्शन व्हावें व आम्हीं कालपासून उपाशी तुझ्या दर्शनाकरितां धडपडत असतां आम्हांस अजून तुझी भेट न व्हावी अशी तपश्चर्या या लोकांनीं काय केली व आमचे हातूनच रे बाबा, असें काय पाप घडलें!" हे उद्गार ऐकून लोकमान्य चमकून कळवळ्यानें म्हणाले, "आजीबाई, तुमचें म्हणणे अगदीं खरे आहे. आम्हीं कांहीं पुण्याई केलेली नाहीं. व इतक्या अनायासें झालेल्या श्रीपांडुरंगाचे भेटीनें कांहीं श्रेय प्राप्त होणार नाहीं. तुम्हांसच आमचे अगोदर दर्शन झालें पाहिजे." आम्हीं आतां दर्शन घेतच नाहीं. अगोदर या ताटकळत बसलेल्या बायकांची सोय करा असें म्हणूं लागले. तेव्हां डॉ. नानासाहेब प्रभृति मंडळींना मोठ्या मिनतवारीनें सांगावें लागलें कीं, "बळवंतराव

असें काय करितां ? अहो आपलीं दुसरीं महत्त्वाचीं कार्यें अडूं नयेत म्हणून तर एवढी खास व्यवस्था केली आहे. ती फुकट दवडूं नका. बाकीच्या मंडळींचीहि व्यवस्था होईलच. तुम्हीं इतर कार्यक्रम तर पार पाडणारच. मग काय येथपर्यंत येऊन पांडुरंगाचें दर्शन केल्याशिवाय आपण परत जाणार व बरोबरीच्या मंडळींचीहि निराशा व गैरसोय करणार ?" तेव्हां कोठें लोकमान्य इतर मंडळींचे अगोदर दर्शन घ्यावयास कबूल झाले.

( ७ ) लोकमान्यांना पाहावयास पुष्कळच माणसें येत असत. त्यांत अर्थात्च सर्व जातींचीं व अगदीं लहान मुलापासून गलितांग झालेल्या वृद्धापर्यंतचीं सर्व वयाचीं माणसें असत. त्यांना त्रास होऊं नये म्हणून लोकमान्य आम्ही ज्या घरीं उतरलों होतो तेथील चौसोपींतल्या एका मोठ्या झडप्यावर बसून त्या सर्व मंडळींशीं बोलत असत. अशाच प्रसंगीं एक वांकलेले वृद्ध गृहस्थ दर्शनास आले. त्यांस वृद्धत्वामुळें नीटसें दिसतहि नव्हतें; तेव्हां त्यांनीं हातांनीं लोकमान्यांचें शरीर चांचपून सालिंगन भेट घेतली व असें करितां करिताच ते लोकमान्यांचे पायांवर डोकें ठेवूं लागले. त्यास तसें न करूं न देता लोकमान्य म्हणाले "अहो, असं काय करितां ? मस्तक हें फक्त वृद्ध अगर देव यांचे पायींच नमवावें. मीं असें काय केलें आहे कीं आपण पांडुरंगाचे पायींच नमवावयाचें मस्तक माझे पायीं ठेवूं इच्छिता ?" तेव्हां ते गृहस्थ सद्गदित अंतःकरणानें म्हणाले, 'अहो; आपण आणखी काय करणार ? श्रीशिवाजीमहाराजांनीं आम्हां हिंदूंची शेंडी कायम ठेविली. व आम्हां हिंदूंस स्वाभिमानपूर्वक मान वर करून इतर जगांत वावरावयास शिकविण्याचा प्रयत्न करून आपण तीच परंपरा पुढें चालवीत आहांना ? झाले, आमचे पांडुरंग आपणच !' अर्थात्च लोकमान्यांनीं त्यांस पायां पडूं न देताच वर उचलून धरिलें व "वारकरी पंथांतल्या आपणांसारख्या समंजस गृहस्थांवरच हिंदु संस्कृति जिवंत ठेवण्याचा भार असून तुमचेच पायीं आम्ही मस्तक लावविलें पाहिजे." असें सांगितलें.

( ८ ) एक प्रसंग अगदीं कधींहि विस्मरण न होण्याजोगा म्हणजे असा:— " माझ्या मनींची आवडी। पंढरपुरा नेईन गुढी " या सुप्रसिद्ध अभंगावर श्री. विष्णुबुवा जोग यांचें अत्यंत रसाळ व सुश्राव्य प्रवचन झाले. गर्दी अफाट लोटली होती. व वेळहि बराच झाला होता तरी त्यानंतर सुद्धां लोकमान्यांनीं कांहीं तरी बोलावेंच असा आग्रह मंडळींचा पडला. तेव्हां लोकमान्यांनीं त्याच चरणानें सुरवात करून विष्णुबुवांनीं विवरण केलेल्या भागवत धर्माची खूप स्तुति करून त्याच्या मूलभूत तत्त्वांची अगदीं सरळ सोप्या भाषेत श्रोत्यांस पटेल अशी फोड केली. "आपणहि एक या भागवतधर्माचे अनुयायी वारकरी आहों, फक्त आपलें पंढरपूर सध्यांच्या परिस्थितिमुळें बदललें असून तें साध्य करून घेण्याचें साधन जी राजकीय चळवळ ती आपण कार्तिकी—आषाढीच्या वाऱ्या इतक्याच भक्तीनें व

चिकाटीनें व धार्मिक भावनांनीं प्रेरित होऊन चालविली पाहिजे. या बदललेल्या स्वरूपांतहि आपण भागवतधर्माचें नेटानें परिपालन करून तो टिकावा व आपण घरचे मालक व्हावे व ऐहिक राष्ट्रोन्नतिरूप मोक्ष मिळवा अशी बुद्धि देव आपणांस देवो अशी त्यापाशीं मागणी करा." अशा आशयाचे उद्गार काढले.

( ९ ) स्वदेशी प्रदर्शन उघडल्यानंतर लोकमान्यांचे भाषण झालें. असलीं प्रदर्शनें कां भरावींत, त्याचा उपयोग काय यावर बोलतांना, आपल्यांत कांहीं कलाकौशल्यच नाहीं, आपल्यांतल्या या मोडक्यातोडक्या व नादान वस्तूचे प्रदर्शन भरवून त्याबद्दल लोकांत आवड उत्पन्न कशी करावी व प्रदर्शनें तरी भरवावींत कशाला व त्यांत पहावयाचे तरी काय ? या नेहमीं येणाऱ्या आक्षेपाला उत्तर देतांना लोकमान्य म्हणाले, "दुसऱ्याच्या नाकीं डोळीं नीटनेटक्या व गोंडस मुलांपेक्षां आपल्या शेंबड्या लेंबड्या मुलावर मातेचें जास्त प्रेम असतें. व तें तिला आवडते हें आपण प्रत्यहीं पाहतों. मग आपल्याच देशात तयार झालेल्या ओबडधोबड वस्तु आपणांस आवडावयास हरकत कोणती ? शिवाय आपल्या या प्रदर्शनांतल्या वस्तु पाहून इतर प्रदर्शनांतल्या वस्तूशीं तुलना केली असतां या बाबतींत आपण जगाच्या किती मागें आहों हे कळून सुधारणा करण्यास उत्तेजन मिळते हा काय कमी फायदा आहे ?"

( १० ) आतां प्रसंग व त्यांतील गृहस्थांचीं नांवे नीटशीं आठवत नाहींत. पण त्या सुमारास बेळगांव येथील एका वृत्तपत्रांत ( बहुधा चिकित्सक असावें ) एका पुढाऱ्यावर ( ते बहुधा लोकमान्य असावेत ) लोकांनीं छत्री धरून मिरवणूक काढल्याच्या प्रसंगावर कडक व कुत्सित टीका आली होती. त्याच पत्राचे संपादक पंढरपुरास लोकमान्यांस भेटावयास आले असतां वादविवादाचे भरांत त्याच विषयाकडे ओघ वळला. लोकमान्य त्या गृहस्थांस म्हणाले कीं "अहो, पुढारी लोक कांहीं या गोष्टींस उत्तेजन देत नाहींत. पण आपले पुढारी व त्यांनीं चालविलेली चळवळ याबद्दल आदर व प्रेम व्यक्त करण्याच्या भरांत लोक अशा गोष्टी करण्याचा आग्रह धरितात. असल्या बाह्य भपक्याचा सुद्धां लोकांत उत्साहवर्धनाचे कामीं थोडासा अप्रत्यक्ष उपयोग होत असतोच. शिवाय असल्या गोष्टींच्या विरुद्ध अगदीं आग्रह धरून अनुयायांस विरस व निरुत्साह करण्याइतकें त्या गोष्टींत पाप तरी काय ? त्यांत कांहीं एखाद्या तत्त्वाचा खून होत नसतो."

यावर ते गृहस्थहि जोराजोरानें वाद करूं लागले. मग काय विचारतां ! वादविवादास रंग भरला. लोकमान्य म्हणाले कीं, "स्वार्थाकरितां अधिकाऱ्यांच्या पुढें पुढे करून त्यांजपुढें गोंडा घोळण्याची व प्रसंगोपात्त साहेबावर छत्री धरण्याची प्रवृत्ति वाढत चाललेल्या सुशिक्षित समाजाकडून तरी सामान्य लोकांवर असले आक्षेप येऊं नयेत. तुम्हाला जर हें खपतें व त्याविरुद्ध तुम्ही चळवळ करीत नाहीं तर लोकसमाजानें आपल्या पुढाऱ्याचा अशा रीतीनें सन्मान केला तर त्या

विरुद्ध मात्र तुम्ही एवढी आरडाओरड का करितां व नसत्या हेतूंचा आरोप कां करितां ?" लोकमान्य आपल्या नेहमींच्या पद्धतीनें जरा मोठ्यामोठ्यानें बोलत होते. शेवटीं शेवटीं त्या गृहस्थास लोकमान्यांच्या कोटिक्रमास उत्तर देता आलें नाहीं. लोकमान्य त्यास म्हणाले "तुम्ही आता आपलीं विधानें सप्रमाण सिद्ध तरी करा, नाहींतर वर्तमानपत्रातून तीं जाहीर रीतीनें परत घेऊन माफी तरी मागा." त्यांचा तो वादविवादांतला कोटिक्रम व हल्ला यापुढें तो गृहस्थ हातटेकीस आला व शेवटीं तर बिचारा रडवेला झाला. वादविवाद फार लांबला व फराळाला मांडलेलीं पाने तशीच वाळून जाऊन सर्व मंडळी ताटकळून कटाळून गेली. ते गृहस्थ गेल्यावर बरोबरीचे स्नेही म्हणाले 'त्या गृहस्थाचे लिहिण्यास एवढे महत्व कां दिलेत व एवढा त्रास तरी कशाला घेतलात ? त्याचे कोटिक्रमांत उत्तर देण्यालायक एक तरी आर्ग्युमेंट होतें का ?' तेव्हां लोकमान्य शांतपणे म्हणाले "अहो, मीं चिडलों नाहीं. पण वादविवाद हेंहि एक युद्धच आहे लढाईस एकदां सुरवात झालीच म्हणजे प्रतिपक्षी चीत केलाच पाहिजे. नुसता आरडाओरडाच प्रतिपक्षी करील तर आपणासहि त्याचेपेक्षां जास्त जोरानें ओरडता येतें असे दाखविलेंच पाहिजे. लढाई मध्यें सोडता येतच नाहीं !"

( ११ ) लोकमान्य विलायतेहून परत आल्यानंतर श्रीजगन्नाथमहाराजांच्या इस्टेटीबद्दल येथील हायकोर्टांत कोल्हापूर दरबारतर्फे जी कारवाई चालली होती त्या खटल्याचे तयारीकरितां सरदारगृहांत ते येऊन राहिले होते. सुधारणांचा कायदा पार्लमेंटांत पास होऊन गेला होता. एक दिवस सहज एक रोगी पाहून येतांना मी सरदारगृहाकडे वळलों व रा. अतुकाका फडणीसांबरोबर लोकमान्यांच्या दिवाणखान्यांत गेलों. अतुकाका म्हणाले, "दादा, हे डॉक्टर भडकमकर भेटी-वयास आले आहेत." तेव्हां लोकमान्यांनीं विचारिलें "कांहो, काय चळवळ करीत असतां, आपल्या पक्षाचें हें मुंबईतलें गाडें कसें हांकणार ?" त्यावेळीं मी म्हटलें 'आपला पक्ष सुसंघटित करावयाचा तर आपल्या पक्षाचें एक उत्कृष्ट व भारदस्त वर्तमानपत्र ( दैनिक ) मुंबईत अवश्य पाहिजे. सध्यांच्या वर्तमानपत्रांनीं हें भागणार नाहीं. त्यांनीं वाचकांची रुचि अगदीं बिघडवून टाकिली आहे. तेव्हां लोकमान्य म्हणाले, "या विषयावर मला तुमच्याशीं पुष्कळच बोलावयाचें आहे. आतां जरा काम आहे, पुन्हां एकदां जरा फुरसतीनें या." खटल्याच्या तयारीचें काम संपलें, व आजारी पडण्याच्या पूर्वी सुमारें ८ दिवस वरील प्रसंगाची आठवण देऊन लोकमान्यांनीं आपण होऊन मला टेलीफोन केला व सरदारगृहात बोलावून घेतलें. इतरांचीं कामें आटोपून त्यांस बाहेर घालवून दिल्यावर चांगलें स्वस्थपणें त्या दिवशीं व पुन्हां दुसरें दिवशीं मिळून २।३ तास भाषण या विषयावर झालें.

माझी वर्तमानपत्राबद्दलची कल्पना पुन्हां सुचवून मी म्हटलें कीं, ' केसरी 'सारखें वर्तमानपत्र पाहिजे. आपण ' केसरी ' दैनिक करा. त्याकरितां पैसे वगैरे लागल्यास जमविण्यास अडचण पडणार नाहीं. आपण ते जमवूं या. तेव्हां लोकमान्य म्हणाले, " चळवळ कशी करावी याबद्दलचीं माझीं मतें मी विलायतेहून जाऊन आल्यापासून थोडीं बदललीं आहेत. चळवळ टिकाऊ व जोरदार व्हावयास पाहिजे तर ती समाजाच्या अगदीं खालच्या थरापर्यंत जाऊन पोंचली पाहिजे. कॉंग्रेसच्या चळवळीकडे खेड्यापाड्यांतल्या लोकाचेंहि लक्ष वेधून पुढाऱ्यांना खऱ्या लोकाचा पाठिंबा मिळावा अशा तऱ्हेचे प्रयत्न मी अगदीं आरंभापासूनच करीत आहे. तरी पण आपली सर्व चळवळ अद्याप बुद्धिमान ( Intellectual ) वर्गांतच चालली आहे. या वरच्या वर्गांत एकादी गोष्ट पटली तरी देखील ती चिकाटीनें व स्वार्थत्यागपूर्वक करीत राहाण्याच्या दृढ श्रद्धेचा सार्वत्रिक अभावच असल्यामुळे या वर्गामध्यें झालेल्या चळवळीला टिकाऊपणा येत नाहीं. व सरकारहि त्यास फारसा मान देत नाहीं. म्हणून या सर्व चळवळी आतां धार्मिक व औद्योगिक प्रश्नाच्या पायांवर उभारून खालवर कानाकोंपऱ्यांत पसरविल्या पाहिजे. या कामाकरितां स्वार्थत्यागी, अल्पसंतुष्ट व उद्योगी गरीब माणसें उपदेशक म्हणून तयार करून व त्यांस वक्तृत्व, वैद्यकी, ज्योतिष, थोडेबहुत धर्मशास्त्र इत्यादि लोकोपयोगी कला शिकवून खेड्यांतून राहावयास पाठवून राजकीय रामदासी सांप्रदाय वाढविला पाहिजे. त्यांनीं हरिदास व पुराणिक या नात्यानेंहि समाजसेवा करावी. हे असले लोक समाजांत ठिक-ठिकाणीं पसरून लोकांच्या सुखदुःखाशीं समरस होऊन वावरूं लागले म्हणजे ते लोकांचीं मनें आकर्षित करू शकतात. व नंतर त्यांच्या मार्फत मध्यवर्ती केन्द्रा-पासून निघालेली मतप्रसाराची व चळवळीची लाट समाजांत झटकन व संघ-टित रीतीनें पसरेल व चळवळ अन्तःस्फूर्तीनेंच उत्पन्न झाल्यासारखी चालू होऊन जिवंतपणा प्राप्त होईल. याप्रकारच्या चळवळीला वर्तमानपत्रांची मदत होत नाहीं. अगर त्याची गरज नाहीं असें नव्हे. पण ते काम एकाच ठिकाणाहून प्रसिद्ध होणाऱ्या ( व हजारांनीं वा लाखांनीं खपणाऱ्या का होईना ) केसरी-सारख्या उच्च दर्जाच्या वर्तमानपत्रानें भागणार नाहीं. वेगवेगळ्या ठिकाणीं तेथील स्थानिक प्रश्नावर चळवळ करणारीं, सोप्या भाषेंत लिहिलेलीं व स्थानिक व विश्वासु पुढाऱ्यांच्याच नांवाखालीं चालणारीं वर्तमानपत्रे असावींत. वाटल्यास या सर्व पत्रांना एकाच पक्षाच्या मुख्य फंडांतून मदत मिळावी. विलायतेंतहि असेंच करितात. असल्या पत्रांची किंमत मात्र अगदीं शक्य तेवढी थोडी—पैसा-भर सुद्धां—ठेवावी. त्यांत गहन राजकीय तत्त्वज्ञान नसावें. औद्योगिक, धार्मिक व सामाजिक बाबतींतल्या साध्या पण स्थानिक प्रश्नांवरच त्यांनीं भर द्यावा.

बोलतां बोलतां कौन्सिलांत जावें कीं नाहीं असा प्रश्न मीं विचा-

रिला तेव्हां ते म्हणाले " पहिल्या दर्जाच्या पुढाऱ्यांनीं कौन्सिलांत जाऊ नये. त्यांनीं बाहेर राहून दुय्यम पुढाऱ्यांकडून कौन्सिलें काबीज करवून कौन्सिलांतलें काम करवून घ्यावें. "

' कौन्सिलांतल्या कामाचा उपयोग काय होणार? लोकांस असे अधिकार तरी काय मिळाले आहेत?' असा प्रश्न निघाला असतां त्यांनीं " सॅनिटेशन (आरोग्य) खाते लोकांचे हातीं आलें आहे त्याचें उदाहरण घेऊन सांगितलें कीं, ' आज सरकार कांहीं आयुर्वेदाला उत्तेजन द्यावयास तयार नाहीं; पण लोकांचे दिवाणांचें हातीं हें खातें आल्याबरोबर ठिकठिकाणच्या वैद्य लोकास उत्तेजन देऊन स्वस्त किंबहुना फुकट समाजाला वैद्यकीय मदत व सल्ला देता येईल. लोकांना उपयुक्त अशा या वर्गाला मतदारांचीं मनें आकर्षण करता आलींच पाहिजेत. अशा रीतीनें समाजाला आपली उपयुक्तता जसजशी जास्त पटत जाईल तसतशी त्यांची सरकारकडे पाहाण्याची प्रवृत्ति कमी कमी होत जाऊन ते आपल्या लोकांवर विश्वसायला शिकतील व याप्रमाणें समाजांतले लोक आपल्या पाठीशीं राहूं लागले म्हणजे मग आपल्या चळवळीला सरकार वचकू लागेल, व आपणांस जास्त हक्क मिळवितां येतील. जें काय मिळेल त्याचा उपयोग जास्त मिळविण्याकडे करणें एवढाच मार्ग आपणांस मोकळा आहे; कोणत्याहि उपायानें लोकांत घुसा, त्यांचीं मनें व मतें काबीज करा, व आपल्या मतांचा प्रसार करा."

---

## गोपाळ आनंदराव देसाई

[ मनूर, जि. नाशिक. ]

शके १८२७ किंवा २८ ह्या वर्षांत श्रीमद् जगद्गुरू शंकराचार्य शिवगंगाधिपति यांची स्वारी इकडे नाशिक भागांत येऊन गेल्यानंतर आमच्या गोवर्धन ब्राह्मणसमाजांतील कांहीं पुढाऱ्यांस असें वाटू लागलें कीं, देशस्थ, कोकणस्थ वगैरे दक्षिणी ब्राह्मणांचा आणि आपल्या ब्राह्मण समाजाचा प्रसिद्धपणें अन्नव्यवहार कां असू नये? ह्या संबंधांत इतर समाजांपैकीं चांगले सुशिक्षित लोक आपणांस मनोभावें साह्य करण्यास सज्ज असतांना आपण कां स्वस्थ बसावें? सर्व गोवर्धन ब्राह्मण समाजांतील विद्वान् शास्त्र्यांच्या सह्यांचें लेखी विनतिपत्र तयार करून तें श्रींपुढें सादर करावें आणि देशस्थ वगैरे ब्राह्मणसमाजाचा गोवर्धन ब्राह्मणसमाजाशीं पूर्वी संपर्क अन्नव्यवहार होत होता अशा संबंधांची ऐतिहासिक प्रमाणें दाखवावींत. श्रींची समजूत पटल्यानंतर गोवर्धन ब्राह्मणसमाजाशीं वर

निर्दिष्ट केलेल्या ब्राह्मण समाजानें अन्नव्यवहार करण्यास अडचण नाहीं अशा आशयाचें श्रींकडून आज्ञापत्र प्रसिद्ध करवावें. ह्या कामांत श्रम व पैसे कितीहि लागले तरी कांहीं चिंता नाहीं, पण याचा शेवट लावलाच पाहिजे, असें सर्वानुमतें ठरलें. परंतु त्यापैकीं कांहीं पुढाऱ्याचें मत असें पडलें कीं, अशा मार्गानें श्रींकडून आज्ञापत्र मिळविणें कांहीं मोठें अवघड काम नाहीं. हा गौण मार्ग आहे, समाजोन्नतीचा खरा मार्ग नाहीं. तरी हा मार्ग न स्वीकारतां समाजाची वेदोक्त वगैरे उच्च शिक्षणाच्या वाढीनें उन्नती करणें हेंच प्रशस्त होय. सपंक्त अन्नव्यवहार हें कांहीं उन्नतीचे ध्येय नव्हे. मात्र अशा मताची अगदींच थोडी मडळी होती. म्हणून ह्या कामीं समाजाचें मत घेऊन काय करणें तें करावें असें ठरल्यावर समाजमत घेण्याकरिता शके १८२८ च्या आश्विन शुद्ध १५ स मगळवारी मुंबई येथें सर्व प्रांतस्थ गोवर्धन ब्राह्मण समाजाच्या प्रतिनिधींची सभा भरून तींत शृंगेरी पीठाचे श्रीमद्‌जगद्‌गुरु शंकराचार्य यांजकडे लेखी विनंतिपत्र सादर करण्याचें ठरलें. पुढें दुसरे दिवशीं अकस्मात असें समजलें कीं, लोकमान्यांची स्वारी येथेंच आहे. तेव्हां त्या कामीं त्यांचा विचार घ्यावा. असें ठरल्यानंतर मि॥ आश्विन वद्य २ स गुरुवारीं सकाळीं ८ वाजतां गोवर्धन ब्राह्मणसमाजांतील कांहीं निवडक पुढारी कै. वे. शा. स. हरिशास्त्री धर्माधिकारी, श्री. भगवत भाऊ कुळकर्णी, नारायण रामकृष्ण जोशी वगैरे गिरगांवांत लोकमान्याचे बिऱ्हाडीं गेले ( प्रस्तुत लेखकहि ह्या मंडळींत होता. ) प्रथम लोकमान्यांचे दर्शन झाल्यावर शिष्टसांप्रदायानुरूप प्रश्नोत्तरें आटोपल्यानंतर लोकमान्यांनीं मडळीस येण्याचें कारण विचारिलें. तेव्हां प्रस्तुत लेखकानें साग्र हकीकत लोकमान्यांपुढें नम्रपणानें मांडून ह्या कामांत स्वतःचा अभिप्राय देण्याविषयीं विनंति केली. तेव्हां लोकमान्य म्हणाले कीं, " हें पाहा, तुम्ही वाटेल तितके श्रम व पैसा खर्च करून श्रींचें आज्ञापत्र मिळवाल. त्यांत कांहीं मोठेंसें कठीण नाहीं. पण श्रींचें आज्ञापत्र प्रसिद्ध झाल्यावरहि जर श्री आपणांशीं अन्नव्यवहार केला नाहीं तर श्री अगर आपण माझे काय करणार ? आज आपणांशीं शास्त्रानुसार सक्तीनें अन्नव्यवहार करण्याबद्दलची श्रींच्या हातांत सत्ता आहे काय ? श्रींचें आज्ञापत्र म्हणजे कांहीं राजाज्ञा नव्हे कीं ती प्रत्येक व्यक्ति भिऊन पाळील ! मैत्राणी शाखेशीं अन्नव्यवहार करावा असें श्रींचें मत असलेंहि त्याप्रमाणें ब्राह्मणसमाजाकडून वर्तणूक होत नाहीं हे तुम्हांस माहीत आहे काय ? पळशे ब्राह्मणसमाजाचा प्रश्नहि असाच लोंबकळत पडला आहे. त्या समाजाच्या फडाचा मी ' सेक्रेटरी ' असून अद्याप त्याच्या प्रश्नाचा शेवट लागत नाहीं. पाहिजे तसा पैसा खर्च झाला आहे. आणि अजून पुष्कळसा पैसा शिल्लकहि आहे. सत्यदृष्ट्या आमचें शास्त्र असें सांगतें कीं, 'कोणत्याहि ब्राह्मणसमाजानें कोणत्याहि ब्राह्मण समाजाशीं अन्नव्यवहारच तर काय, पण

आदिरसवर्णव्यवहारसुद्धा करतात. पण आम्हीच आमचे शास्त्राप्रमाणे वागत नाहीं, त्यास शास्त्र काय करणार ? जेथें शास्त्राची महती नाहीं तेथे शंकराचार्यांची महती कितपत राहणार ? माझें तर स्पष्ट असें मत आहे कीं, आपण श्रींचें आज्ञापत्र मिळविण्याच्या कामात पैसा खर्ची घालण्याच्या व्यर्थ नादीं लागू नका. तोच पैसा आपल्या समाजाचे उच्च शिक्षणाकडे व्यवस्थित रीतीनें खर्च करून शोभवेल. ब्राह्मणसमाज सुसंस्कृत करा म्हणजे इतर ब्राह्मणसमाज आपोआप अन्नादिक व्यवहार श्रींच्या आज्ञापत्रावाचूनहि करतील आपले उत्कृष्ट शील आपण चांगल्या तऱ्हेनें रक्षण करा." लोकमान्यांचा हा पोक्त विचार ऐकून आमच्या पुढारी मंडळीनें प्रेमाने लोकमान्यांचा निरोप घेतला व लोकमान्यांच्या सडेतोड व स्पष्ट विचाराचें कौतुक करीत मंडळी आपल्या ठिकाणीं परत आली. श्रींकडे विनंतिपत्र सादर करून आज्ञापत्र मिळवावें हें वेड त्या वेळीं ज्या कांहीं व्यक्तींच्या डोक्यात शिरलें होतें तें लोकमान्यांचा पोक्त विचार पटल्यामुळे पुनः शोवर्धन ब्राह्मणसमाजांतील प्रसिद्ध पुढाऱ्यांच्या डोक्यात शिरलें नाहीं. हा लोकमान्यांच्या अधिकारयुक्त वाणीचा प्रभाव होय!

---

## श्रीमंत खंडेराव चिंतामण मेहेंदळे

[ बी. ए. सरदार, पुणें. ]

(१) सन १९०८–१९१४ पर्यंतचीं सहा वर्षें रिप्–व्हॅन्–विंकल् प्रमाणें अज्ञातवासात गेल्यामुळें मन्डालेहून परत आल्यावर लोकमान्य टिळक सहा वर्षांतल्या घडामोडींशीं आपला परिचय करून घेऊ लागले, तेव्हा लोकमतावर पूर्णपणें छाप असलेल्या या पुढाऱ्यास भारत इतिहास संशोधक मंडळाबद्दल दुसऱ्या कोणी माहिती सांगण्यापेक्षा आपली आपणच सांगितलेली बरी म्हणजे गैरसमजास अगर इतर पक्षाभिमानास वाव राहाणार नाहीं अशा समजुतीने आम्ही मंडळाचे पहिले चिटणीस स्वतः होऊनच जून १९१४ अखेरीस लोकमान्यांकडे गेलों. मंडळाचें उद्देशपत्रक नियम वगैरे देऊन मंडळ कां काढिलें, पक्षाभिमानास मंडळांत जागा नसल्यामुळें पक्षभेदविरहित आजवर कसें चालविलें, मंडळाबद्दल गैरसमज कां व कसे होताहेत व बद्धमूल होऊन कार्यक्षम होण्यासाठीं सर्व तऱ्हेच्या पक्षभेदांच्या माहेरघरीं म्हणजे पुण्यात मंडळाच्या चालकास काय सावधगिरी ठेवावी लागली, वगैरे सर्व हकीगत खुलासेवार आम्ही त्यांस सांगितली. लोकमान्यांनी मंडळांत खास कोण करतात, वगैरे जरूर वाटली ती सर्व

माहिती विचारून घेतली. व अखेर म्हणाले की " हें पहा तात्यासाहेब, आमच्या साहाय्याची तुम्हांस जेव्हां जरूर लागेल तेव्हां या, आमच्या हातून होईल तें साहाय्य तुम्हांस करूं. तुमचें मंडळ निघाल्यापासून तात्या तुमच्यांत आहेत, 'केसरी'तहि तुमचा मजकूर घेताहेत, तेव्हां आमच्याबद्दल तुम्हांस काळजी नको, शंका नको. तुम्ही दुसऱ्या माणसांना जपा. कारण त्यांच्या सावलीचा आम्हांस विटाळ होत नसला तरी आमची सावली कांहीं जणांना तरी सोसणार नाहीं. सभ्यांच बाहेर पहाराचौकी आहे. तेव्हां मी कांहीं तुमचा सध्या सभासद होत नाहीं. पण त्याबद्दल गैरसमज करून घेऊं नका. तुम्ही चांगल्या कामास आरंभ केला आहे. ते आमच्या सावलीमुळे बिघडावयास नको. पुण्यांत अशी संस्था निघून चालूं शकेल व त्यांत तुम्ही सांगतां तीं माणसे ४।५ वर्षे काम करूं शकतील, फार काय पण त्यांचें व कोणाचेंहि वर्षभर पटेल अशी मला मुळींच कल्पना नव्हती. ती अशक्य गोष्ट तुमच्यामुळे शक्य झाली आहे. तेव्हां तुमच्या संस्थेबद्दल आमचा कधीं गैरसमज होणार नाहीं. तुम्हांस आमच्या संसर्गानें उपाधि कधीं पोहोचणार नाहीं. तुम्ही दुसऱ्या पक्षांतील लोकांस, सरकारी नोकरास व तुमच्यासारख्या श्रीमंतांस जपा. तुमचे हें experiment successful झालें तर इतर कामांतहि Vested interest चीं माणसें पडूं लागतील. व अशीं पुष्कळ कामें आहेत कीं जेथे सरकाराशीं, सरकारी अधिकाऱ्याशीं विरोध न घेतां देशाला उपयोगी पडेल असा कार्यमार्ग ठरवून घेतां येईल. पण आज पाहातों तों हातपाय हालवणे म्हणजेच राजद्रोह अशी समजूत करून घेऊन जो तो थंड आहे." वगैरे आश्वासनावर बरेंच बोलणें होऊन पुढें सहा वर्षांत गीतेवर काय नवीन पुस्तकें झालीं आहेत हे विचारून ' आम्ही तुमच्यांत, तुमच्याबरोबर आहोंतच असें समजून चाला ' असे म्हणून त्या दिवशींचें संभाषण संपलें. आपला संसर्ग बाधू न देण्याचे व पूर्ण सहानुभूति बाळगण्याचें धोरण पुढे अव्याहतपणें चालू होते. मदत मागावयास गेलें म्हणजे तेवढी पूर्ण मिळत असे.

---

## शंकर बळवंत मेरेकर

[ फोटो आर्टिस्ट, खामगाव, वऱ्हाड. ]

(१) सन १९१८ फेब्रुवारी ता. ८ हा दिवस मी जन्मांत कधीं विसरणार नाहीं. या दिवशीं लोकमान्य वऱ्हाडचे दौऱ्यांत असतांना येथें (खामगावीं) आले. लोकमान्य येथें येणार हें १५ दिवस आगोदर सर्व लोकांस कळक झालें होतें. त्याप्रमाणे बहुतेक प्रत्येक धनिक, गरीब, लहान, थोर आपआपले योग्यतेनुसार लोकमान्यांचे कार्यास मदत व्हावी म्हणून वर्गणी देत होते. व एकंदर वर्गणी जवळ जवळ ७००० रु. झाली. मी स्वतः सुद्धां माझे योग्यतेनुरूप वर्गणी दिली. परंतु आपणांस ईश्वरानें जो थोडासा गुण दिला त्याचा उपयोग या वेळीं जरूर करावा व लोकमान्यांचें चरणीं एकादें चित्र काढून अर्पण करावें असा विचार आला; व लागलींच मी त्या कामास लागलों. याच वेळीं लोकमान्यांच्या गीतारहस्यावर टीका येत असत. काहींनीं प्रतिपादन केलें होतें कीं, लोकमान्यांनीं श्रीशंकराचार्य यांचा संन्यासयोग खोडण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु एकाच वृक्षाच्या दोन फांद्या दोघांनी निरनिराळ्या दाखविल्या हें मला वाटून त्याप्रमाणें मी चित्र तयार केले. मध्यमार्गी श्रीविष्णूची गरुडवाहन मूर्ति दाखवून उजवीकडून लोकमान्य व डावीकडून श्रीशंकराचार्य अशी चित्राची रचना केली. लोकमान्यांचे हातांत गीतारहस्य (कर्मयोग) व श्रींचे हातांत गीताभाष्य (संन्यासयोग) हेंहि त्यांत दाखविलें. हे चित्र लोकमान्यास अर्पण करण्याचा बेत ठरविला. येथील एक श्रीमंत व अत्यंत टिळकभक्त श्री. गोपाळराव पाचपोर यांचे हस्तें तें चित्र द्यावयाचे ठरविलें. व त्याप्रमाणे ता. ८–२–१९१८ रोजीं रात्रीं (त्या दिवशीं विद्यार्थ्यांना यावयास मिळावें म्हणून उशीर केला होता) सुमारें ८ वाजतां तें चित्र श्री. गोपाळराव यांनीं लोकमान्यांस अर्पण केलें. चित्र पुढें येतांच एकदां फक्त त्या चित्राकडे पाहून लोकमान्य बोलावयास उठले व म्हणाले:—"मला आतां जी तसवीर देण्यांत आली, त्या चित्रामध्ये श्रीविष्णूची मूर्ति असून उजवीकडून मी व डावीकडून श्रीशंकराचार्य यांना बसविलें आहे. यावरून श्रीशंकराचार्य व मी बरोबरीनें आहोत असे कोणी समजूं नये; तरी या चित्रावरून आपणास सध्याचे चळवळीचा बोध झाल्यावाचून राहणार नाहीं. आपणास या चळवळीस श्रीविष्णूचें पाठबळ असून आद्य श्रीशंकराचार्यांचा आशीर्वाद आहे." नंतर एकसारखा टाळ्यांचा गजर झाला. एका गृहस्थानें मजला त्याचेपुढें नेऊन हेंच ते चित्रकार म्हणून माझी ओळख करून दिली. लोकमान्यांनी पुढें होऊन माझे पाठीवर हात फिरवीत म्हणाले " वा, मला तर वाटलें हा चित्रकार कोणी मोठा प्रौढ मनुष्य असेल, परंतु तुम्हीं इतक्या तरुण वयांत छान चित्र काढलेत. असाच उद्योग चालू ठेवा. चित्रांत मी 'बालसुत' ही सही केली होती.

त्यावर ते म्हणाले " ही चित्रांतील सही मिळून केली काय ? " यावर फक्त मी इतकेंच म्हणालों " माझे वडिलांचे नांव सुद्धां बळवंतच आहे. यावर ते म्हणाले ' ठीक, नाहींतर मिथ्याचे कांहींच कारण नाहीं; आहेतच आपले बाबासाहेब." ( बाबासाहेब खापर्डे जवळच उभे होते. ) पुढें म्हणाले " हें चित्र मी माझे लायब्ररींत चांगलें लावून ठेवीन. पुण्यास केव्हांहि आल्यास आपले घरीं जरूर या बरें, विसरूं नका. " मला मात्र तो योग माझे कमनशीबाने आला नाहीं. मात्र वरील हा दिवस म्हणजे माझे आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाचा वाटला व मी तो आजन्म विसरणें शक्य नाहीं.

(२) श्री. गोपाळराव पाचपोर व मी असे मुंबईस लोकमान्य विलायतेस जाणार म्हणून त्यांना रवाना करण्यास जाणार होतों. जाण्याचा बेत नक्की ठरला. परंतु ऐन निघण्याचे दिवशींच श्री. गोपाळराव यांना फारच ताप आला व ते आजारी पडले. शेवटीं आमचा बेत रहित करावा असें ठरलें. इतक्यांत गोपाळराव तापानें फणफणत असतांना मला म्हणतात " बसलात काय, स्टेशनवर जा, व बरोबर भिकामाऊस (त्यांचे पुतण्याचे नांव) न्या." नतर आम्ही दोघेजण मुंबईस गेलों. दोन दिवस तेथें राहून घरीं परत आलों. यावेळीं श्री. गोपाळराव यांची प्रकृति फारच बिघडली असून त्यांना एकसारखी ३ दिवसापासून उचकी होती. त्यामुळें त्यांना श्वाससुद्धां चांगला घेतां येईना. आम्ही परत आल्याचें त्यांना समजलें. " अगोदर त्यांना बोलवा व मला माझ्या लोकमान्यांची हकीकत ऐकूं द्या " असें ते म्हणाले. आम्ही जवळच होतों. मी पुढें होऊन मुंबईस घडलेली हकीकत सांगू लागलों. निदान २ तास तरी मीं एकंदर सर्व हकीकत सांगितली असेल. आश्चर्याची गोष्ट या दोन तासात त्यांना एकदां सुद्धां उचकी म्हणून आली नाहीं ! डोळ्यांतून एकसारखे अश्रू नाल चालले होते. ते म्हणाले " असो, निदान हकीकत ऐकून तरी लोकमान्यांचें शेवटचे दर्शन मला झालें. " एक प्रकारचें समाधान वाटल्याप्रमाणें त्यांची चर्या दिसू लागली. नंतर त्याच दिवशीं त्यांचा अंत झाला. खरा टिळकभक्त. इतके ऐकण्याकरितांच जसा आत्मा -तिष्ठत ठेविला होता.

## लक्ष्मण रघुनाथ भोसले

[ वकील, लोकमान्याच्या लॉ-क्लासांतील एक लेक्चरर, आगतिक पक्षाचे पुढारी, पुणें.]

( १ ) पुण्यामध्यें १८९४ सालापासून श्रीगणेशोत्सव हल्लींच्या पद्धतीनें सार्वजनिकरीतीनें सुरू झाले, परंतु ते सुरू होण्याचे कारण मशिदीसमोर वाद्यें वाजविण्यासबधानें हिंदुमुसलमानांत झालेला वेबनाव होय. अर्थात् गणपति-उत्सव नवीन पद्धतीनें सुरू केल्यानें हिंदुमुसलमानामधील तेढ कायम होईल कीं काय, अशी भीति कांहीं पुढाऱ्यास वाटली. यासबधानें मी टिळकांस समक्ष प्रश्न केला तेव्हा ते म्हणाले " अहो, तेढ ही दोन दिवसाची आहे. गणपति उत्सवासंबधानें मुसलमानाचा गैरसमज थोड्याच वर्षांत खात्रीनें दूर होईल; परंतु हिंदु समाजाला धार्मिक ऐक्याची आलेली संधि आपण जर फुकट घालविली तर पुढें पश्चात्ताप करावा लागेल." टिळकाची ही दूरदृष्टि खरी होती, ह्याबद्दलचा प्रत्यय थोड्याच वर्षांत आपणा सर्वांना आलाच आहे.

(२) पुण्यामध्ये मेथा-रानडे यांचा नेमस्त पक्ष आणि टिळक याचा राष्ट्रीय पक्ष असे पक्ष होतें हें सर्वांस माहीत आहेच. या पक्षांचा एकमेकांशीं विरोध बरेच वेळां झालेला आहे. न्या. रानडे मृत्यु पावण्यापूर्वी ज्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनाला गेले होते त्या अधिवेशनाला पुण्याहून टिळक, रानडे, नगरकर, गोपाळराव गोखले व मी असे एकाच दिवशीं एकाच गाडीनें जाण्याचा सुयोग आलेला होता. वाटेने पुष्कळ प्रश्नांचा ऊहापोह झाला. राष्ट्रसभेपुढें येणाऱ्या विषयासंबधानें निदान महाराष्ट्रीय पुढाऱ्यांत तरी विनाकारण द्विधा मत दिसून आल्यास महाराष्ट्रातील पक्षभेद द्वेषमूलक आहेत असा आरोप परप्रांतस्थांकडून होईल ही गोष्ट रानड्यांच्या मनाला लागली. तथापि या बाबतींत टिळकांचें मत वळवून घेणें अवश्य होतें, म्हणून एका स्टेशनवर गाडी जरा जास्त वेळ उभी राहणार म्हणून रानडे स्वतः टिळकांच्या डब्याशीं जाऊं लागले तों टिळकहि माधवरावांकडेच येत होते उभयताची गांठ वाटेत पडताच टिळकांनीं विचारलें कीं, " रावसाहेब, पक्षभेद येथेंच ठेवावयाचा कीं, पुढे न्यायचा ! " तें ऐकून माधवराव म्हणाले. " अहो, तें गाठोडें परत पाठविणें जरूर म्हणून तर मी तुमच्याचकडे निघालो " एकाच उच्च हेतूने प्रेरित झालेले दोन पुढारी एकत्र मिळाल्यावर ऐक्यास काय उशीर ! त्या कॉंग्रेसमध्यें महाराष्ट्रातर्फें एकच मत सर्वानुमतें प्रतिपादन केलें गेले हा सुयोग सामान्य नव्हे. माधवराव जर कांहीं दिवस जास्त जगते तर टिळक-रानडे यांचा अपूर्व मिलाफ जगास खचित पाहावयास सांपडता. असो. टिळक-रानडे दोघेहि महाराष्ट्राच्या अब्रूस किती डोळ्यांत तेल घालून जपत होते हे वरील हकीकतीवरून उत्तम दिसून येतें.

(३) आयर्लंडला स्वाहतींचें स्वराज्य मिळण्यापूर्वी त्या देशांत किती अस्वस्थता व बंडाळी माजली होती हें पुष्कळांस माहीतच आहे. एके दिवशीं मी बळवंतरावांकडे गेलो असतां ते एक ऐरिश वर्तमानपत्र काळजीपूर्वक वाचीत होते. तेव्हां मी विचारलें " बळवंतराव, आयर्लंड बंडखोर आहे, त्यांचीं वर्तमानपत्रें वाचून आपल्यास काय फायदा ? " त्यावरून टिळकांनीं उत्तर दिलें " आपल्याला बंड करावयाचें नाहीं म्हणून तर ऐरिश वर्तमानपत्रें वाचलीं पाहिजेत. आयर्लंडची प्रवृत्ति बंडाकडे कां होत आहे आणि त्या प्रवृत्तीचें समर्थन तिकडील वर्तमानपत्रें करतात तें योग्य का अयोग्य हें आपल्या इकडील पुढाऱ्यांनीं अवश्य पाहिलें पाहिजे. कारण बंडखोरीची प्रवृत्ति उत्पन्न न होईल अशी इशारत सरकारला व लोकांना देणें हें आमचें मुख्य कर्तव्य आहे !"

---

## महादेवशास्त्री दिवेकर

[ आचार्य व प्रचारक प्राज्ञपाठशाळा, वांई. ]

( १ ) लोकमान्य टिळकांचें मला दर्शन प्रथमतः बेळगांवास १९०७ सालीं झालें. त्यावेळीं बंगभंगाची चळवळ अगदीं जोरात होती. बेळगांवच्या मंडळींनीं गणपती उत्सवामध्यंच लोकमान्यांना बोलाविले होतें असें स्मरतें. मी त्यावेळीं बेळगांवच्या New Preparatory क्लासमध्यें इंग्रजी ६ व्या इयत्तेंत होतों. आमची शाळा खासगी असल्यामुळें स्वयंसेवकाचें काम करण्यास व लोकमान्य टिळकांची स्टेशनवरून गाडी ओढण्यास आम्ही बरेच विद्यार्थी गेलों होतों. बेळगांवचा पावसाळा सुप्रसिद्धच आहे. रस्त्यांत इतका चिखल झाला होता कीं बोलून सोय नाहीं. मिरवणूकीचा रस्ता मात्र अलोट जनसमदाच्या पायखीमुळें खडखडीत वाळल्यासारखा झाला. मिरवणुकीच्या वेळीं पाऊस थोडाथोडा येतच होता. पण सर्वांना धास्ती ही होती कीं, सायंकाळीं रविवार पेठेंत लें उघड्या जागेंत व्याख्यान ठेवलें आहे त्यावेळीं जर पाऊस आला तर व्याख्यानाचें काय होणार ? व्याख्यान अगदी उघड्या चौकांत सायंकाळीं ५ वाजतां ठरल्याप्रमाणें सुरू झालें. लोकांचे डोळे पावसाकडें आणि कान व्याख्यानाकडे अशी स्थिति होती. चमत्कार असा कीं, दोनप्रहरीं दोन वाजल्यापासून पावसाच्या उघाडीचीं चिन्हें दिसू लागलीं. त्यामुळें भाविक लोक आपापसांत कुजबुजू लागले कीं, पहा टिळकांची पुण्याई किती आहे ! पावसाची झड बेळगांवास आठपंधरा दिवस सारखी लागत असते ही गोष्ट खरी, आणि त्या दिवशीं ही सकाळीं झड होती

तिचा मागमूसहि सायंकाळीं राहिला नाहीं हेंहि खरें ! व्याख्यान सुरू झाल्यानंतर १० मिनिटांनीं लख्ख सूर्यप्रकाश पडला. लोकमान्यांच्या तोंडावर सूर्यकिरण पडलें. पश्चिमेकडे तोंड करूनच ते व्याख्यान देत होते. त्यावेळीं लोकांना असें वाटले कीं, पहा सूर्यनारायणाची सुद्धां लोकमान्यांवर कशी कृपा आहे ती ! पुढें १५ मिनिटांनीं एक पावसाची बारिकशी सर आली. लोकमान्यांनीं विनोदानें 'पर्जन्यहि आज आपणावर आशीर्वादवृष्टि करण्याकरितां आला आहे' असे शब्द उच्चारल्यावर टाळ्यांचा कडकडाट झाला. कांहीं वेळानें ती सर गेल्यावर लोक खरोखरीच पाऊस लोकमान्याना आशीर्वाद द्यावयाला आला होता असें म्हणून टिळकांना नमस्कार करूं लागले.

( २ ) हिंदुस्थानच्या भोळ्या भाबड्या लोकांत भाविकपणा जास्त आहे, आणि ते कोणत्याहि मोठ्या माणसाला देव या भावनेनें भजतात हें खरें. पुण्यासहि एकदा अशीच मजा झाली. तो मजेचा प्रसंग म्हणजे लोकमान्यांचा साठावा वाढदिवस होय. गायकवाड वाड्यांत ३ वाजल्या पासूनच समारंभाकरितां गर्दी होऊं लागली होती. त्या गर्दीबरोबरच आकाशांतहि मेघाची गर्दी होऊं लागली. पांच वाजावयाच्या सुमारास तर आकाश मेघांनीं इतकें व्यापलें होतें कीं, मोठा पाऊस येऊन सगळ्या समारंभाचा विरस करणार असेंच सर्वांना वाटलें. ६ च्या सुमारास गायकवाड वाडा इतका फुलून गेला कीं तसा पूर्वी कधींच फुलून गेला नव्हता. समारंभास सुरवात झाली मात्र, तों ढग नाहींसे झाले व आकाश थोडक्याच काळांत निरभ्र झालें ! बेळगांव, खानदेश, वऱ्हाडपेक्षां पुण्याचा समाज कमी भावनाप्रधान व जास्त चिकित्सक असें म्हणतात. पण तेथेंहि असा चमत्कार झाला कीं, 'अहो हें मेघावडंबर नव्हे तर ते परमेश्वरानें पाठविलेले दूत बरें ! मृत्यूलोकावरील माणसें एका महापुरुषाची पूजा कशी करतात हें पाहण्याकरितां परमेश्वरानें देवदूत पाठविले होते. खरोखर लो. टिळकांच्या अशा गोष्टींचें पुढें एक गुरुचरित्र होणार;' असेंहि कांहीं कांहीं लोक म्हणूं लागले. यावरून लोकमान्यांच्या ठिकाणीं, त्यांनीं सोसलेला त्रास, दाखविलेला स्वार्थत्याग इत्यादी गुणांमुळे, किती निष्ठा होती हें चांगलें स्पष्ट होतें.

( ३ ) वाढदिवसाचे दिवशीं सकाळीं मी चिकोडी, सांगली, निपाणी वगैरेकडील हकीकत सांगण्याकरितां व आणलेले पैसे केसरी ऑफिसात देण्याकरितां गेलों. हिशेबाचें काम झाल्यावर लोकमान्यांना भेटलों. व जामिनकीची नोटीस बजावली कीं काय म्हणून विचारलें. लोकमान्य म्हणाले "तुम्हीं मला किति पैसे देणार आहात ? त्या मानानें सरकार माझ्याकडून ५।५० हजाराचा जामीन मागणार. तुम्हीं जो मला अहेर करणार त्यांतला कांहीं अहेर मला सरकारला केला पाहिजे इतकेंच !"

(४) लोकमान्यांना १९०८ साली शिक्षा झाल्याची बातमी चोहोंकडे हां हां म्हणतां पसरली. प्रस्तुत लेखक त्यावेळीं सांगली हायस्कूलमध्यें होता. हायस्कूलच्या विद्यार्थ्यांना दोनप्रहरीं ती बातमी कळली. मघल्या सुटींत जे विद्यार्थी गेले ते शाळेंत आलेच नाहींत. सांगली हायस्कूलच्या विद्यार्थ्यांनीं तीन दिवस शाळेत न जाण्याचा संप केला. हरीपूरच्या बागेंत दररोज सभा होत होत्या. १९०८ सालचें वातावरण एका दृष्टीनें अविचाराचे असें आज कांहीं लोक म्हणत असले तथापि त्यांत जिवंतपणा होता हें खास! त्या वातावरणाला अनुसरून हरीपूरच्या बागेंत विद्यार्थ्यांचीं भाषणें होत होतीं. गांवांतील कांहीं शिष्ट व वृद्ध माणसेंहि व्याख्यानें ऐकण्यास येत असत. व्याख्यानानंतर चिंचेच्या वनांत ५–२५ माणसें निरनिराळीं पण एकत्र बसून गप्पा मारीत असत. एक गृहस्थ म्हणाले 'काय हो, टिळकांच्याजवळ सर्व आहे. पण एकच कमी आहे.' दुसरे म्हणालें 'तें काय?' उत्तर "तपश्चर्या. लोकमान्यांच्या ठिकाणीं जर तपश्चर्या असती तर लोकमान्यांनीं दावरने शिक्षा दिल्यावर जे उद्गार काढले, त्याच वेळीं, 'चडाळा, तुझें राज्य जळून जाईल' असें म्हटले असतें तर त्याचवेळीं हायकोर्ट जळून खाक झालें असते!"

(५) पुण्यास ज्येष्ठ शुद्धांत श्री शिवराज्याभिषेक उत्सव होत असतो. श्री. ज. स. करंदीकर यांच्या आग्रहावरून (१८४० साल असावें.) या लेखकानें त्या उत्सवांत कीर्तन करण्याचें पत्करिलें. लकडी पुलाजवळील विठोबाच्या देवळांत कीर्तन झालें. आख्यान शिवाजी महाराजांचें दिल्लीस प्रयाण हें होतें. त्याच सालीं मे महिन्यांत मुंबई सरकारनें प्रमुख पुढाऱ्यांना बोलावून महायुद्धाला मदत करण्याकरितां मुंबईस सभा बोलावली होती. त्या सभेंत लोकमान्यांचा अपमान झाला व लोकप्रतिनिधींना ज्या सभेत आपमान सोसावा लागतो अशा सभेत बसण्यापेक्षां येथून निघून जाणें बरें असा खडखडीत जबाब लोकमान्यांनीं दिला होता व ते व त्यांच्या मागोमाग तात्यासाहेब केळकर असे दोघेहि निघून आले होते. शिवाजी महाराज आग्र्यास गेल्यावर औरंगजेबानें त्यांना आपमान केला व डाव्याबाजूस उभे केलें, असा विषय आख्यानांत चालला असतां कर्मधर्म संयोग असा कीं, शिवाजी महाराजांच्या तोंडचे 'ज्या दरबारांत माझा आपमान होतो त्या दरबारचा धिःकार करून मी चालता होतो' हे शब्द उच्चारल्याबरोबर लोकमान्यांची स्वारी सभागृहांत येऊन दाखल झाली. आख्यानास आलेला रंग व शिवाजीमहाराज व लोकमान्य यांच्या तोंडून निघालेले सारख्याच अर्थाचे शब्द त्यामुळें तो प्रसंग विशेषच खुलला. दुसरें दिवशीं लोकमान्यांना भेटावयास गेल्यावर ते म्हणाले "जुन्या व नव्या हरिदासांत फरक आहे तो हाच आहे. हरिदास, पुराणिक, प्रवचनकार या सर्वांनीं नव्या-जुन्याची घडी बरोबर बसविली पाहिजे. ही घडी किंवा सांगड बरोबर त्यांनीं बसविली तरच यापुढें हा वर्ग लोकप्रिय राहील."

( ६ ) स्वराज्य-शिष्टाईच्या दौऱ्यांत लोकमान्य चांदा जिल्हा परिषदेला हजर होते. ती परिषद दे. भ. गंगाधरराव देशपांडे यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. परिषदेच्या आदल्या दिवशीं लोकमान्यांना थैली अर्पण केली. लोकमान्य दमून भागून आलेले असल्यामुळें त्यांना येण्यास अकरा वाजले; मंडळी आठ वाजल्यापासून तिष्ठत बसली होती. मी तेथें दहा वाजतां गेलों. लोकमान्यांना तासभर यावयास अवकाश आहे हें जाणून श्रीमंत बाबासाहेब देशमुख यांच्या परवानगीनें मी तेथें व्याख्यानास सुरुवात केली. राष्ट्रपाठशाळेच्या प्रचाराकरितांच मी तेथें गेलों होतों. व्याख्यानामध्यें संस्थेची हकीकत सांगितल्यावर महाभारतांतील एक कथानक घेऊन त्याचें रूपक सद्यःपरिस्थितीशीं बतोतेंत जुळवून दाखविलें. रात्रीं व्याख्यान आटोपल्यावर बिऱ्हाडीं येतांच लोकमान्य म्हणाले, " समाजाच्या धार्मिक व सामाजिक वेडगळ समजुती आहेत त्या घालविण्याकरिता आणि लोकांमध्यें स्वराज्योपयुक्त सद्गुण उत्पन्न करण्याकरितां धार्मिक सामाजिक विषयावर लहान लहान पत्रकें छापून काढून तीं फुकट वाटलीं पाहिजेत. " मीं म्हटलें ' हें काम आपण आतां हातीं घ्या. ' लोकमान्य हंसून म्हणाले " दाढेनें पृथ्वी वर उचलणारा मी वराहाचा आवतार आहें असें समजतों का काय ? निरनिराळ्या कामाला निरनिराळीं माणसें पाहिजेत. हे काम मी करणार असें मला कोणी येऊन सांगा व अमुक मदत करा असेंहि सांगा, मग मी मागें घेतलें तर मला विचारा !"

( ७ ) लखनौ कॉंग्रेसच्या वेळीं होमरूल स्पेशल निघाली होती. हार्दो स्टेशनवर धनुर्मासाचें भोजन झाल्यानंतर उत्तरेकडील थंडीस प्रारंभ झाला. डिसेंबर महिना थंडीचाच. त्यांत लखनौकडची थंडी ! कॉंग्रेसचा पहिल्या दिवसाचा कार्यक्रम झाल्यावर लोकमान्य व दादासाहेब खापर्डे हे अगदीं कडक थंडी असतांना निरनिराळ्या कँपामध्ये जाऊन प्रतिनिधींचा समाचार व विषयनियामक कमेटींतील विषयांबद्दल मत घेत होते. छेदिलाल धर्मशाळेमध्यें बहुतेक कर्नाटक-महाराष्ट्रांतील प्रतिनिधी होते. लोकमान्य समाचार घेऊन तेथून निघूं लागले इतक्यांत एका गृहस्थानें विचारलें कीं, 'तुम्हाला थंडी वगैरे कांहीं वाजत नाहीं काय ! या वयाच्या मानानें काय ही थंडींत दगदग ! ' लोकमान्य म्हणाले, " अहो सगळीकडे थंडच आहे का कोठें उष्णता आहे हें पाहण्याकरितां मी हिंडत आहें. "

---

## श्रीनिवास भिकाजी सरदेसाई

### [ लोकमान्यांचे स्नेही, मुंबई. ]

( १ ) अत्यंत महत्त्वाच्या अनेक सार्वजनिक खटाटोपांचा शिरावर असलेला बोजा संभाळून आपल्या इष्टमित्रांच्या सामान्य घरगुती हितसंबंधासाठींहि लोकमान्य किती तत्परतेनें झटत याची अनेक उदाहरणें इतरांच्या आठवणींतून आलींच आहेत. त्यासारखेंच एक माझ्या आठवणींत असलेलें मी सांगतो:—

इ. स. १८८६।८७ साल असावें. मुंबईस शांतारामाचे चाळींत रा. राघोपंत वाकणकर म्हणून एक गृहस्थ राहात असत. ते 'टाईम्स ऑफ इंडिया' ऑफीसांत नोकर होते. त्यांचा व बळवंतरावजींचा फार स्नेह. माझा—त्यांचाहि थोडा परिचय होता. माझे धाकटे बंधूचा विवाह व्हावयाचा होता व राघोपंतांची मुलगीहि उपवर होती. राघोपंतांची इच्छा, मुलगी माझ्या बंधूस द्यावी अशी होती. राघोपंतांची नोकरी अशा तऱ्हेची होती कीं, त्यांस चारदोन दिवसहि मुंबईचे बाहेर जाण्यास मोकळीक नसे. माझा व बळवंतरावजींचा दृढ परिचय 'कोल्हापूर केस' पासून असल्याचें राघोपंतांस माहीत होते. म्हणून त्यांनीं बळवंतरावजीस हा संबंध जमवून आणण्यास सांगितले. किंबहुना मुलाला पाहण्यापासून लग्नतिथी ठरविण्यापर्यंतची मुखत्यारी त्यांचेवर सोंपविली. मित्रकार्याला नाे म्हणण्याचें बळवंतरावजींना कधींच ठाऊक नाहीं. ते लागलीच राघोपंतांचे पुरोहित बनून मजकडे आले. मी मुलगी पाहून आलो व ती मला पसंत असल्याचें मी त्यांस कळविले. संबंध ठरण्यास दुसऱ्या कांहीं अडचणी नव्हत्या; तेव्हां मी वडिलांस पत्र लिहिलें. राघोपंतांचे गोत्र अत्रि. आमचें कौशिक. तेव्हां त्यांच्या आमच्या गोत्रास पटत होतें असा माझा भरवसा. पण वडिलांनीं मला लिहिलें आमचा पूर्वज ( सात पिढ्या पूर्वीचा ) अत्रि गोत्रांतून कौशिक गोत्रांत दत्तक आलेला असल्यामुळें अत्री गोत्रातील मुलगी करतां येत नाहीं. कारण त्यास धर्मशास्त्राची हरकत आहे. मी बळवंतरावजीस ही गोष्ट कळविली. त्यांनीं लागलीच 'दत्तकमंजरी,' 'दत्तकमीमांसा,' 'नारायणभट्टी' वगैरे धर्मशास्त्राचे ग्रंथ काळजीपूर्वक पाहिले व मला सांगितलें "धर्मशास्त्राची मुळींच हरकत नाहीं. तुमचे घराण्यांतील वहिवाट चुकीची आहे." मी त्यांस सांगितलें, 'बळवंतरावजी, माझा तुमच्या सांगण्यावर विश्वास आहे, पण आमचें वडील तुम्हाला व मला सुधारक समजतात तेव्हां त्यांचा विश्वास या कामीं तुमच्यावर बसावयाचा नाहीं.' ते म्हणाले, "धर्मशास्त्र जाणणाऱ्या कोणाहि शास्त्रीचें मत मी तुम्हास आणून देतो." सांगलीस व्यंकटशास्त्री निपाणीकर म्हणून प्रसिद्ध न्याय, मीमांसा व धर्मशास्त्र जाणणारे शास्त्रीबुवा होते. त्यांच्याशीं वडिलांचा विशेष लोभ व त्यांच्यावर भरंवसाहि तसाच. मी बळवंतरावांस ते सांगि-

सलें. पण आम्ही पुण्यास आणि शास्त्रीबुवा व आमचे वडील सांगलीस, ही अडचण मला वाटली. त्यावेळीं एस्. एम्. आर. ची आगगाडी चांगली सुरू झाली नव्हती. पण दोनतीन दिवसांतच सगळे ग्रंथ खाकोटीस लावून बळवंतरावजी मला घेऊन सांगलीस गेले. निपाणीकर शास्त्रीबुवांस सर्व ग्रंथ दाखवून, त्यांच्याशीं वाद करून त्यांचें मत आपल्या प्रमाणें करून घेतलें. व त्यांजकडून माझ्या वडिलांची खात्री करून दिली. हा सर्व प्रयत्न करून राघोपंतांच्या इच्छेप्रमाणें त्यांच्या मुलीचें माझ्या बंधूबरोबर लग्न ठरलें व तें पारहि पडलें. या विवाहानंतर दुसरे कित्येक विवाह आमच्या घराण्यातील मंडळींनीं अत्री गोत्रज मुलींशीं व मुलांशीं केलें.

(२) लोकमान्यांचें हिंदी संस्थानांवर किती प्रेम होतें हें सर्वविश्रुतच आहे. माझें व त्यांचें एकवेळ या विषयासंबंधानें संभाषण झालें होतें. "ब्रिटिश मुलखांतील प्रजेच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नांच्या गतीस देशी संस्थानापासून विरोध होतो, संस्थानांनी प्रजेस न्यायाच्या संबधानें योग्य व समतोल न्याय बहुशा मिळत नाहीं. संस्थानी राजेमहाराजे ख्यालीखुशालींत प्रजेचा पैसा व आपला सर्व काळ घालवितात; तेव्हां हीं सर्व संस्थानें खालसा होऊन गेलीं तरी बरें. असें आपल्यास नाहीं कां वाटत ? या संबधानें एक लेख 'केसरी' पत्रांत प्रसिद्धीकरितां मी लिहून देऊं कां ?" असा प्रश्न मी एकवेळ बळवंतरावजींस केला. ते म्हणाले, "कोल्हापुरच्या शिवाजी महाराजांचा आम्ही पुरस्कार केल्यामुळें आमच्यावर खटला झाला, त्यावेळीं आम्हास मनोभावानें मदत करणारे तेच का तुम्ही बापू ? तुम्हाला एकाद्या देशी संस्थानांतील अधिकाऱ्याच्या मूर्खपणामुळें किंवा अविचारामुळें अल्पस्वल्प त्रास झाला असेल म्हणून इतके बिथरलात कीं काय ? अहो, हिंदी संस्थानें ह्या आमच्या स्वराज्याच्या खुणा आहेत. त्यांच्या अस्तित्वासाठीं हिंदुस्थानांतील सर्व सुशिक्षितांनीं काळजी वाहिली पाहिजे. संस्थानी न्यायासंबधानें म्हणाल तर तो कदाचित् ब्रिटिश पद्धतीचा दिखाऊ काटेकोरपणाचा नसेल. (अलीकडे दुर्दैवानें त्या तऱ्हेवर जात आहे) पण स्थूल दृष्टीनें तोच बरा व कमी खर्चाचा. लांचलुचपत, पक्षपात, हीं जगात सर्वत्रच आहेत. त्यांस ब्रिटिश पद्धतींतच जागा अधिक. संस्थानिकांच्या आयुष्यक्रमाबद्दल ब्रिटिश सरकार व त्यांचे अधिकारी सर्वस्वी जबाबदार आहेत. त्याना सरकारच्या व्यवस्थेनें जे शिक्षण दिले जातें व जो आयुष्यक्रम लहानपणीं लावून दिला जातो तोच पुढे बहारीस येतो. यांत त्या बिचाऱ्यांस कां दोष देतां ? तुम्हांस संस्थानी राज्यकारभारांतील चुकांबद्दल टीका करावयाची असेल ती करा, पण ही मुळावर कुऱ्हाड उचलण्याची कल्पना गैर आहे. तुमच्या डोक्यांतून ही काढा निदान 'केसरी'त तरी तिला जागा मिळणें शक्य-नाहीं."

(३) लोकमान्यांवर हेकेखोरपणाचा व हुसडेपणाचा कांहीं लोक विनाकारण

आरोप करतात. मी अनेक प्रसंग पाहिले. त्यांत आपल्या मुख्य तत्त्वांचा विघात न होतां शक्य त्या रीतीनें प्रतिपक्षांशीं मिळतें घेण्यास बळवंतरावजी नेहेमीं तयार असत. अशा प्रसंगांतला एक मला आठवतो. तो येथें देतों. इ. स. १८८७–८८ चे सुमारास टिळक–आगरकरांचा पहिला मतभेद होऊन डेक्कन एज्युकेशन सोसायटींत कायमचे दोन पक्ष होण्याचा प्रसंग आला होता, हें सर्वांस विश्रुत आहे. दोन्हीं पक्षांत माझी मिलमळी होती. आगरकरांच्या बाजूचे कट्टे पक्षपाती कै. गोखले माझे शाळासोबती व स्नेही आणि बळवंतरावजींचे कट्टे भक्त कै. बापुसाहेब धारप व प्रो. केळकर हे माझे मित्र. शिवाय मुख्य दोघेहि प्रतिस्पर्धी माझ्या चांगल्या परिचयाचे म्हणून या वादांत माझ्या मध्यस्थीचा कांहीं उपयोग झाला तर पाहावा म्हणून माझ्या स्नेह्यांनीं मला मुद्दाम सांगलीहून पुण्यास बोलावले. मी जाऊन सर्व हकीकत प्रथम समजून घेतली. नंतर बळवंतरावजींस भेटलो व म्हटलें, "बळवंतराव, आपला जो आगरकरांशीं मतभेद झाला आहे तो दिसण्यात तीव्र दिसतो. संस्थेच्या सुस्थितीवर त्याचे दुष्परिणाम होण्याचा फार संभव आहे. पण मला जी एकंदर हकीकत समजली आहे त्यावरून मला वाटते दोन्ही बाजूंनीं थोडे नमतें घेतल्यास मतभेदाची तीव्रता बरीच कमी होण्यासारखी आहे. शिवाय सोसायटीच्या प्रस्तुत स्थितींत उभयतांचीहि सोसायटीस अवश्यकता आहे." तेव्हां यासंबंधानें बळवंतरावजी म्हणाले, "तुम्हीं म्हणतां ते बरोबर. पण तुम्हीं आधीं गोपाळरावांस ( आगरकरांस ) भेटलात काय ?" मी म्हटलें, "नाहीं. पण मी गोखल्यांशीं बरेंच बोललों व त्याचें म्हणणें, आपला स्वभाव हट्टी आहे व आपण आपला आग्रह सोडणार नाहीं. म्हणून मी प्रथम आपलेकडेच आलों" बळवंतरावजी म्हणाले, "मी काय करावें म्हणजे हा बेबनाव मोडेल असे तुम्हांस वाटतें" मी उत्तर केले, "आपली आगरकरांची एकवार भेट होऊन मिलाफ करण्याच्या हेतूने दोन घटका संभाषण झाले तर पाणी बहुतेक निवळेल, मग मध्यस्थाने करण्याचें काम फारसे अवघड नाहीं." बळवंतरावजी म्हणाले, "बरे, मी पाहिजे तेव्हां व पाहिजे तेथें त्यांना भेटण्यास व त्यांच्याशीं समेटाच्या गोष्टी बोलण्यास तयार आहे." मी विचारलें, "आपण त्याचे घरीं याल काय ?" ते म्हणाले, "कां नाहीं ? तुम्ही त्यांना विचारा व वेळ ठरवा." मी आगरकरांकडे गेलों व त्यांच्याशींहि उपरोक्तप्रमाणेंच बोललों. त्यांनीं बाकी गोष्टी कबूल केल्या पण एकदम निक्षून सांगितलें, "मी टिळकांचे घरीं येणार नाहीं." मी म्हटले, "ते आपल्याच घरीं आले तर त्यांच्याशीं घटकाभर बोलाल ना ? मी त्यांस भेटलों आहें व ते आपल्या घरीं आपण म्हणाल त्या वेळीं येऊन आपल्याशीं बोलण्यास तयार आहेत." आगरकर अत्यंत भावनापूर्ण गृहस्थ होते. ते जितके तिखट तितकेच प्रेमळ होते. माझ्या शेवटच्या बोलण्यानें ते लागलींच

अगदीं मऊ झाले, व म्हणाले, " त्यांना केव्हांहि येऊं द्या, मीं त्यांच्याशीं भेटण्यास व संभाषण करण्यास तयार आहें. " दुसऱ्याच दिवशीं सकाळीं मी बळवंतरावजींसह त्यांच्याचे वाड्यांत गेलों व त्या दोघांची भेट करून दिली. दोघे एका खोलींत बसले व मी लागलींच खालीं गोखल्यांच्या माडींत जाऊन बसलों. उभयतांचें संभाषण चांगलें दोन तास चाललें होतें. माझ्या कल्पनेप्रमाणें वेबनावाचें मुख्य बीज जळून गेलें. नंतर के. दाबीसाहेब खऱ्यास बोलावून पुढील समेट झाला. आगरकरांचे घरून परत जातांना मी बळवंतरावजींस विचारलें, " काय झालें ? घडी अधिक तर बिघडली नाहीं ना ? " ते म्हणाले. " मुळींच नाहीं. आगरकर तर्कशास्त्री आहेत व भावनाबद्ध आहेत. ते जातात कोठें ? " मी थोड्या विनोदानें त्यांस म्हटलें, " आपणास लोक आग्रही म्हणतात तें का ? " बळवंतरावजींनीं तितक्याच विनोदानें उत्तर केलें. " म्हणणारास माहीत ! तुम्हीं तर मला असें म्हणणार नाहीं ना ? "

---

## विष्णु दिगंबर पलुस्कर

[ गायनाचार्य, प्रिन्सिपाल गांधर्व महाविद्यालय, मुंबई. ]

(१) विद्वद्वर्य लोकमान्यांचा व माझा परिचय प्रथमतः कॉंग्रेसचे वेळीं बनारस येथे झाला व तो शेवटपर्यंत टिकला, हा माझ्या भाग्याचा योग असें मी समजतों. त्यांनीं माझ्या गांधर्व महाविद्यालय संस्थेविषयीं मोठ्या कळकळीनें एक गोष्ट सांगितली, ती अशी–" संस्था ही लोकांपुढें आपण आणल्याशिवाय लोक तिकडे लक्ष देणार नाहींत, मग ती संस्था लोकोपयोगी असो वा नसो. करितां संस्थेचे उद्देश, संस्थेचे दैनिक, मासिक, वार्षिक कार्यक्रम सर्व वर्तमानपत्रांतून लोकांचे नजरेसमोर आणण्याचें विसरू नका. " हें एवढेंच लोकमान्यांचें वाक्य मला वारंवार आठवतें. मला असा भ्रम होता कीं, ज्या संस्थेचे हेतू लोकहितकारक असतील त्या संस्थेकडे सहजच लोकांचे लक्ष जाईल; पण सक्रिय लक्ष तर राहिलेंच परंतु निष्क्रिय लक्ष सुद्धां सर्वसाधारण जनता देण्यास तयार नसते, हें लोकमान्याच्या अनुभवाचें व दूरदर्शीपणाचें वाक्य मी यावज्जन्म विसरणार नाहीं. लोकमान्यांनीं पुढें 'केसरी' व 'मराठा' हीं दोन्हीं पत्रें लाहोरचे गांधर्व महाविद्यालयास मोफत सुरू केलीं. शिवाय शंभर रुपये विद्यालयास देऊन ते विद्यालयाचे लाईफमेंबरहि झाले !

( २ ) एकदां मुंबईत डॉ. नानासाहेब देशमुख यांचे घरीं लोकमान्य बसले होते, त्याच वेळीं मीहि तेथें गेलो. विद्यालयाचे वक्षिसलसमारंभास अध्यक्ष होण्याविषयीं लोकमान्यांना मी विनंति केली. लगेच त्यांनीं स्पष्ट सांगितले कीं, " गाणे हा माझा विषय नाही, तुमच्या संस्थेसारख्या पूर्वी जर सस्था निघाल्या असत्या तर मीहि थोडासा खास अभ्यास केला असता; निदान अध्यक्षपदावरून बडबडण्या इतका तरी केला असता; परंतु तसा कांहींच अधिकार नसल्यामुळे मी अध्यक्ष होण्याचें नाकारीत आहें. दुसरा कोणी तरी योग्य अधिकारी अध्यक्ष निवडा. आणि त्या बरोबर हेंहि सांगतों कीं, तसा अध्यक्ष न मिळाला, व मी अध्यक्ष होणे तुमच्या व संस्थेच्या हिताचे वाटत असेल तर अध्यक्ष मी जरूर होईन. मी त्याच्याकरितां चार ग्रंथ चाळून कशी तरी वकीली लढवीन, पण तुमचें काम नडू देणार नाहीं माझेपेक्षा जास्त चांगलें काम करणारा मिळावा, पण न मिळेल तर माझे हातून होईल तसे काम करण्यास अर्ध्या रात्रीं मी तयार आहें. "

( ३ ) विलायतेला जाण्यापूर्वी मी एकदां लोकमान्यांस भेटावयास गेलों होतो. तेव्हां ते म्हणाले, " तुमचा उद्योग तुम्ही जोराने चालवा; तुमच्या गाण्याच्या विषयांत ऐक्याचा धडा अवश्य शिकण्यासारखा आहे. कसा तो पाहाः— तंबुरा, सतार, सारगी, दिलरुबा, बीन. रुद्रविणा, ताऊस, फिड्ल, तबला, मृदंग हार्मोनियम हीं निरनिराळया स्वरूपाचीं वाद्यें आहेत. व वाजविण्याच्या तऱ्हाहि निरनिराळ्या आहेत, व वाजविणारीं माणसेहि निरनिराळीं असतात; परंतु निरनिराळीं वाद्यें निरनिराळ्या माणसांच्या मनांत एकच ध्येय असल्यामुळें ती सर्व परस्परांना उपकारकच होतात. उलट एकाच जातीचीं वाद्यें असून सुद्धां वाजविणाऱ्यांच्या मनांत ऐक्य जर नसेल तर तींच अनुपकारकहि होतील. यावरून धर्मभेद, जातीभेद, पक्षभेद. पंथभेद, असले तरीं ध्येय एकच ठेविलें तर खरोखर कोणतीहि अडचण येणार नाहीं. निरनिराळ्या रस्त्यानें एकाच गावाला जातां येते. पण गाव गाठण्याचें ध्येय नसून एकमेकाचे रस्ते आडविण्याचे किंवा मोडून टाकण्याचें ध्येयच धरल्यामुळें कोणालाहि पुढे जातांच येत नाहीं. तरी आपले कर्तव्य समजून फलाविषयीं निरिच्छ राहून मार्ग क्रमित असले पाहिजे. म्हणून म्हणतों अशा कर्तव्यबुद्धीनें तुमचा तंबुरा छेडला जाऊ दे !"

( ४ ) एकदां पुण्यांत दाणेआळींतील विजयानंद थिएटरामध्ये गांधर्वमहाविद्यालयाचा जलसा झाला; त्यावेळीं लोकमान्य व श्रीयुत विद्वरम् पिळे यांना मी जलशाला बोलाविलें होते. ते उभयताहि वेळ नसतांना सुद्धां आमच्या विनंतीला मान देऊन जलशाला आले. सदरहु जलशांत हिंदि बॅंड, संगीतासह निशाणांची कवाईत ( flag drill with music ) व जोडीचा सगीत व्यायाम ( club drill ) नाच, गायन वगैरे कार्यक्रम झाले. जलसा संपल्यावर

लोकमान्य मला असें म्हणाले कीं, "तुमच्या वाद्याच्या स्वररचनेला सुरवात झाल्याबरोबर पुढें काय कार्यक्रम होईल याची अमुक कल्पना माझे मनांत येत असे व त्याप्रमाणे पुढें नाच, ड्रील वगैरे होत असे, यावरून माझे मनांत एक कल्पना आली. ती अशी,' विलायतेस नुसत्या स्वररचनेनें (Composition of tunes) व अभिनयाने रसाविर्भाव (acting) चांगला करता येतो. इतकेंच नव्हे तर एखादें चरित्र देखील वरील साधनानें लोकांस समजावून देतात, असें माझे वाचण्यांत व ऐकण्यांत आलें आहे. म्हणून मला असें वाटतें कीं, तुमच्या ह्या पद्धतीनें आपल्या संगतीनें व अभिनयानें रसाविर्भाव चांगला करता येईल. तरी या संबधानें आपण एकदां चांगला विचार करू." परंतु दुर्दैवानें तशी संधी आली नाहीं!

(५) चिकोडीच्या परिषदेहून लोकमान्य येत असतां मिरजेपासून मेलमध्यें एके ठिकाणीं बसण्याचा योग आल्यामुळें मुंबईतील विद्यालयाच्या इमारतीसंबधीं लोकमान्यांना प्रश्न विचारला तो असा:—विद्यालयाला कर्ज आहे व आज विद्यालयाला किंमत आठ लाख रुपये येत आहे, तरी तें विकून टाकावे किंवा काय? त्यांनीं उत्तर केलें कीं, "कर्ज संस्थेला नसणें हें जरी अवश्य आहे तरी पण सॅंढर्स्टरोडसारख्या रस्त्यावर सर्वांगसुंदर अशी इमारत पुन्हःपुन्हां मिळणें अशक्य असतें. अशी इमारत विका म्हणण्याचें जिवावर येतें. तरी कर्ज फेडण्याचा प्रयत्न करावा, पण विकू नये असें मला वाटतें." यावरून त्यांची दूरदृष्टी किती होती ती दिसून येईलच.

---

## मोरेश्वर कृष्ण शारंगपाणी

[ बी. ए. एल्एल्. बी., जज्ज, बडोदें. ]

(१) पुण्यास मी माझे मातुल के० का० ब० ऊर्फ बाबासाहेब पेंडसे ह्यांजकडे शिक्षणासाठीं राहिलों होतों. सन १८९३ सालीं न्यू इं० स्कूलमध्यें सहावें इयत्तेत असताना माझा गणित विषय कच्चा असल्यामुळें वडिलांनीं मला पत्र देऊन लोकमान्य टिळक ह्यांजकडे गणित शिकण्यास जाण्याविषयीं सुच विलें होतें. तें पत्र घेऊन मी सदाशिव पेठेंत विंचूरकर ह्यांचे वाड्यात लोकमान्य टिळक ह्यांचे घरीं गेलों व त्यांस वडिलांचें पत्र दिलें. त्यांनीं पत्र वाचून मला प्रथम प्रश्न केला कीं, "तूं व्यायाम काय घेतोस?" तेव्हां "मी नमस्कार घालतों." असें त्यांस सांगितलें. "किती?" "बारा." त्याबरोबर लोकमान्य

म्हणाले कीं, " एवढेच ! आमचा विश्वनाथ तुजपेक्षां लहान आहे. तो रोज १०० नमस्कार घालतो. " नंतर त्यांनीं मला शारीरिक बल वाढविण्याविषयीं उपदेश करून गणित शिकण्यास तेथेंच जवळ बसलेले न्यू इ. स्कूलचे शिक्षक ओकशास्त्री ह्यांजकडे जाण्यास सांगितलें.

( २ ) एकदां मी व पुण्याचे डॉ. वी. एन्. दीक्षित लोकमान्यांकडे कांहीं कामानिमित्त विंचुरकरांचे वाड्यांत सकाळीं भेटावयास गेलो होतों. लोकमान्यांचे टपाल आलें होतें. सुमारे पन्नास एक वर्तमानपत्रे आलीं होतीं. व त्यांतील हरएक डोळ्याजवळ नेऊन वाचून पाहून २–४ मिनिटांत टाकण्याचा त्यांचा सपाटा चालला होता. टपाल वाचून झाल्यावर त्यांनीं डॉ. दीक्षित ह्यांस प्रश्न केला. " कांहो, तुमची कोडाच्या औषधाची जाहिरात आतांशा प्रसिद्ध होते कीं नाहीं ? " डॉ. दीक्षित ह्यांनीं कांहीं वर्तमानपत्रांचीं नांवे घेऊन स्वतःची कोडाची जाहिरात अमृतबझार पत्रिकेंत प्रसिद्ध होत असल्याचें सांगितलें. लोकमान्य म्हणाले, " आजच्या अमृतबझारपत्रिकेंत ती नाहीं. " तेव्हां डॉ. दीक्षित ह्यांनीं कळविलें कीं, " साप्ताहिक अमृतबझारपत्रिकेंत ती प्रसिद्ध होत आहे. " लोकमान्यांजवळ त्यावेळीं असलेला पत्रिकेचा अंक आठवड्यांतून दोनदां प्रसिद्ध होणारा होता. ह्यावरून लोकमान्यांची स्मरणशक्ति किती तीव्र होती तें निदर्शनास येतें.

( ३ ) सन १९०५ चे पूर्वी १–२ वर्षें लोकमान्य बडोद्यास आमचें घरीं कांहीं महत्त्वाचें कामानिमित्त आले होते. त्याच सुमारास रात्रीं ९ वाजतां जैन परिषदेची येथें बैठक होती. परिषदेच्या मंडळींनीं सन्ध्याकाळीं लोकमान्यांस परिषदेस येण्याविषयीं विनति केली. बाहेरून घरीं लोकमान्य ८ वाजतां आले. कै० वडील क्लबांत गेले होते. ते त्यावेळीं घरीं आले नव्हते. लोकमान्यांनीं माजघरांत जाऊन आपल्या हातानें ताट, पाट व भांडीं मांडून घेऊन घरांतील माणसांस मोठ्यानें सांगितलें कीं, " अहो, मला ९ वाजतां सभेस जावयाचे आहे. तुमचे यजमानास उद्योग नाहीं. मला अगोदर वाढा. " पुढें लोकमान्यांचे जेवण चालू असतांना वडील क्लबांतून आले व त्यांनीं लोकमान्यांस म्हटलें कीं, " कां, टिळक, तू अगोदर बसलास ? कुठें जायचे आहे वाटतें. " त्यावर लोकमान्य म्हणाले, " तुम्ही संस्थानचीं माणसें तुम्हाला काय उद्योग आहे ? क्लबांत जाऊन चकाट्या पिटायच्या ! मला आज ९ वाजतां जैन परिषदेस जावयाचें आहे. " ह्यावरून लोकमान्यांचें स्वतःच्या स्नेह्यांशीं प्रेम किती अकृत्रिम होतें तें स्पष्ट दिसतें. पुढें रात्रीं जैन परिषदेंत लोकमान्यांचें जैनधर्मासंबंधानें एक तासभर अस्खलित व माहितीपूर्ण भाषण झालें, तें येथील लोकांस माहीत आहे.

( ४ ) सन १९१८ सालीं गुजराथ राजकीय परिषद गोध्रा येथें भरली होती. त्यामागून तेथेंच सामाजिक परिषद ( जिला गुजराथींत संसारसुधारणा

परिषद म्हणतात ) सौ. शारदाबाई सुमंत मेहेता बी. ए. ह्यांचे अध्यक्षतेखालीं भरली होती. लोकमान्य व रा. रा. दादासाहेब खापर्डे राजकीय परिषदेस गेले व परत आले. त्यावेळीं ते आमचें घरीं उतरले होते. परत जातांना लोकमान्य व रा. रा. दादासाहेब खापर्डे ह्यांस ती० कै० वडिलांनीं विचारलें कीं, "तुम्ही संसार-सुधारणा-परिषदेकरितां थांबला नाहीं!" तेव्हां लोकमान्य म्हणाले, "माझी बायको मेली आहे. तेव्हां माझा संसार संपला आहे. दादासाहेबहि म्हातारे झाले आहेत. त्यांसहि आतां संसार सुधारण्याची गरज नाहीं. म्हणून आम्हीं थांबलों नाहीं!"

---

## रामचंद्र बळवंत टिळक

[ लोकमान्यांचे ज्येष्ठ चिरंजीव, पुणें. ]

(१) लोकमान्यांस आमचेजवळ खाजगी रितीनें बोलण्यास ते व आम्ही सिंहगडावर असतांनाच विशेषेंकरून वेळ होत असे. मी व माझे बंधु प्रीव्हियस्‌मध्यें असता परिक्षेच्या अभ्यासाकरितां त्यांनीं आम्हास सिंहगडावर ठेवलें होतें. ते स्वतः मधून मधून गडावर येऊन आमचा अभ्यास कसा काय चालला आहे यात्री चांचणी घेत असत, व उरलेल्या इतर वेळीं दुसऱ्याहि कांहीं गप्पागोष्टी बोलत. अशा एका प्रसंगीं ते बोलण्याचे भरांत आले असतां म्हणाले, "तुम्ही मला व माझे चळवळीला काय समजतां? तुम्ही अजून पोरें आहात. मी या राजकारणांत प्रथम पडलों त्यावेळीं मला जर राष्ट्रांत सोळा आण्यापैकीं निदान आठ आणे तयारी दिसली असती तर मी या सनदशीर चळवळीच्या भानगडींत न पडतां आठ आणे यशप्राप्ती नशिबावर ठेऊन बंडच उभारलें असतें! परंतु आमचे पिढींतच आतां काय हाताचे बोटांवर मोजण्यापुरत्या व्यक्ती निराळ्या असतील, त्या निराळ्या. परंतु आपलें राज्य गेल्यापासून आमच्या पूर्वीच्या पिढीपर्यंत आपल्या सर्व श्रद्धाळु हिंदु लोकांची, इंग्रज हा जणु देवाचाच अवतार लोककल्याणासाठीं उत्पन्न झाला आहे, अशी समजूत होती. त्यानें आगगाडी, तारायंत्र वगैरे कितीएक अजब सुधारणा आपले बरोबर आणल्या, शांततेचें साम्राज्य स्थापलें, असा त्याला डुरकून जाऊन जिकडे तिकडे त्यांचा उदोउदोच सुरू होता. अशा परिस्थितींत त्याचें उच्चाटन बडाच्या साहाय्या पद्धतीनें कसें करणार? तेव्हां हा सनदशीर चळवळीचा मार्ग पत्करावा लागला."

( २ ) लोकमान्य स्वतः कधीं संध्या अगर पूजा करीत नसत व आम्हांस उपदेश करितांना त्यांनीं कित्येक वेळां असें सांगितलें आहे कीं, "तुम्हांस संध्या करावयाचीच नसल्यास करूं नका. परंतु संध्या व जप त्याकरितां करण्याचा परिपाठ पडलेला आहे त्याकरितां म्हणजे एकाग्र चित्त करावयास शिकणें ह्याकरितां तरी, संध्या करावीशी वाटत नसली तर, दुसरें कांहीं तरी करा. उदाहरणार्थ, आपले थिऑसफिस्ट् गजाननराव वैद्य ज्याप्रमाणें दररोज एकांतांत कांहीं वेळ एकाग्र चित्त करून पाटावर बसतात त्याप्रमाणें ध्यान करा. ध्यानामध्यें प्रथम एकाग्र चित्त ( देवावर, दुसऱ्या कोणत्या तरी एकाच विषयावर किंवा आपणास असणाऱ्या प्रिय व पूज्य वस्तूवर ) करण्याचा प्रयत्न करा; हें नंतर तें साधलें म्हणजे विचारशून्य चित्त करण्याचा प्रयत्न करा. या दुसऱ्या स्थितीलाच समाधी म्हणतात. व अशा प्रयत्नांची वेळ जितकी जास्त वाढवितां येईल तितकी वाढवा म्हणजे जें काम हातीं घ्याल त्यांत खात्रीनें यशप्राप्ती झाल्याखेरीज राहाणार नाहीं. सर्व कामाच्या यशाची किल्ली त्या त्या कामांत एकाग्र म्हणजे तल्लीन होऊन इतर सर्व गोष्टींबद्दल भान विसरण्यांत आहे. मी जरी संध्या करीत नसलो तरी मला तुम्ही कितीकदां तरी माझे ईझिचेअरवर भोंवतालीं काय चाललें आहे हें सर्व विसरून जाऊन तासाचे तास देहभान सुद्धां विसरून पडलेलें पाहिलें असेल. हें ज्याला साधलें त्याला संध्येची काय जरूर ? "

( ३ ) सिंहगडावरच त्यांनीं एकदां आम्हांस असें सांगितलें कीं, "तुम्ही पाहिजे तो धंदा करा. तुम्ही जोडे तयार केले तरी मला वाईट वाटणार नाहीं कीं, माझी ब्राह्मणाचीं मुलें चांभार निघालीं म्हणून. परंतु त्याचबरोबर हेंहि लक्षांत ठेवा कीं, जें कांहीं कराल तें इतकें उत्कृष्ट झालें पाहिजे कीं, त्या धंद्यासंबधीं कोणी विचार करूं लागला तर तुमचें नांव त्याचे मनांमध्यें पहिल्यांदां उभें राहिलें पाहिजे. उदाहरणार्थ, जसें चहाची आठवण झाली कीं, 'लिप्टन्' हें नाव डोळ्यापुढें उभें राहातें, बिस्किटांची आठवण झाली कीं, 'हंटले-पामर' हें नांव डोळ्यापुढें उभें राहातें, शारीरिक शक्तीची गोष्ट निघाली कीं पूर्वींचा 'भीमसेन' सोडून दिला तरी आधुनिक सॅन्डो अथवा 'राममूर्ती' हे डोळ्यांपुढें उभे राहतात, तसें तुम्ही ज्या व्यवसायांत पडाल त्याची गोष्ट निघाली असतां तुमचें नांव लोकांच्या मनःचक्षुसमोर प्रथम उभें राहिलें पाहिजे, व अशा तऱ्हेची मनोवृत्ति ज्या देशामध्यें प्रत्येक धंद्यांत पडणाऱ्या मनुष्यांमध्यें आहे त्या देशाची केव्हांहि भरभराट झाल्यावाचून राहणार नाहीं, हें निश्चित समजा. कारण प्रत्येक धंद्यांतला प्रत्येक मनुष्य आपण आपल्या धंद्यामध्यें वर यावें असा प्रयत्न करूं लागला म्हणजे तो धंदाहि उर्जितावस्थेस येतो व अशा रीतीनें प्रत्येक धंद्याची व प्रत्येक व्यक्तीची सुधारणा झाली म्हणजे राष्ट्राची निराळी सुधा-

रुपा, व्हावयाची ती काय राहिली? व अशा सर्वांगपरिपूर्ण राष्ट्रास कोणी जेपू म्हटलें तरी कोण चिरडूं शकणार?"

(४) वरील सर्व गोष्टी ते सिंहगडावर असताना बोललेले आहेत, परंतु पुणें येथें घरीं असतां जरी आमचे जवळ शिळोप्याच्या गप्पागोष्टी बोलण्यास त्यांस विशेष वेळ होत नसे तरी ज्यावेळीं त्यांतूनहि वेळ काढून ते आमचेपाशीं बोलत तेव्हां इतर खटपटर ख्यालीखुशालीच्या गोष्टी न बोलता ते 'आयुष्य व त्याचें महत्त्व' या विषयींच बहुधा बोलत व त्या विवेचनात 'उद्यमेन हि सिध्यन्ति कार्याणि न मनोरथैः' 'काकोऽपि जीवति चिराय बलिं च भुंक्ते' वगैरे सारख्या उक्तधा म्हणून दाखवून व 'आहारनिद्राभयमैथुनं च। सामान्य मेतत्पशुभिर्नराणाम्॥' तेव्हां तुम्हास जो हा मानव जन्म मिळाला आहे त्याचें कांहींतरी खरे सार्थक करून दाखविलें पाहिजे तरच त्याचे चीज आहे असें सांगून व गीतारहस्यातहि मी एके ठिकाणीं हेंच प्रतिपादन केले आहे असे म्हणून गीतारहस्य आणावयास सांगत व त्यांतून तो भाग आवेशयुक्त रीतीनें वाचून दाखवीत.

---

## आत्मारामशास्त्री ओह्ल्मने

[ विद्यावाचस्पति, आचार्य–हायस्कूल मंगळूर, द० कानडा ]

(१) १९०६ च्या सप्टेंबर महिन्यांतील गोष्ट. पुण्यात ह्या वेळीं गणपतीचा उत्सव मोठ्या थाटानें चालत होता. एके दिवशीं सध्याकाळीं ह० भ० प० भिंगारकरबुवांचें व्याख्यान झालें होतें. व्याख्यानास लोकमान्य अध्यक्ष होते. व्याख्यान संपवून लोकमान्य टिळक रात्रीं ८॥–९ वाजण्याच्या सुमारास घरीं आले. एक दोन मित्रमंडळी त्यांची वाट पाहात बसली होती. आल्याबरोबर व्याख्यानाचा विषय सांगून टिळक पुढें म्हणालेः–" भिंगारकरबुवांचें, कर्मयोगावरचे व्याख्यान संपल्यावरबरोबर समारोप करताना 'हा भिंगारकरबुवाचा कर्मयोग' असें म्हणून त्यांना बटवा समेपुढें ठेवला "! लोकमान्यांच्या तोंडून हे शब्द बाहेर पडताच, सभेंतल्याप्रमाणें आमच्या मंडळींतहि हशा पिकला.

(२) १९१५ सालांत मुबईस राष्ट्रीय सभा भरली होती. त्या सभेस मी व माझे चुलतबंधु असे गेलों होतों. राष्ट्रीय सभा १।२ दिवस पाहून आम्ही पुण्यांत लोकमान्यांच्या भेटीस गेलों. आगतस्वागत झाल्यानतर लोकमान्यांनीं, मंगळूरच्या बाजूस राजकीय जागृति कशी काय आहे असा नेमका प्रश्न टाकला.

त्या वेळीं कानडा जिल्ह्यांत खऱ्या राजकारणाचा अभाव होता. होयबांची व जीहुजूरांची संख्याच जास्त होती. ही एकंदर परिस्थिति सांगितल्यावर आणि कानडी भाषेच्या एका वर्तमानपत्राच्या सहकारि संपादकत्वाचें काम मजकडे असल्याचें सांगितल्यावर टिळकांनीं लोकजागृतीच्या कामांत त्या पत्राचा उपयोग करण्यास सांगितलें.

---

## परशुरामपंत चिंचाळकर

[ 'रहस्यनिरीक्षण' ग्रंथाचे कर्ते, लोकमान्यांचे स्नेही, अमळनेर. ]

( १ ) अशी एक आख्याइका आहे कीं, ऱ्यॉडसाहेबांचा खून झाल्यानंतर राजकीय चळवळींत पुढाकार घेणाऱ्या न्यायखात्यांतील एका वड्या हुद्देदारानें सरकारांत कॉन्फिडेन्शल रिपोर्ट केला किंवा सरकारानें त्यांजकडून करविला कीं, "राजकीय चळवळ करणाऱ्या पुण्यांतील गृहस्थांचा पूर्वी एकविचार होता. परतु पुढें कांहीं गृहस्थांच्या मनाचा कल बंड केल्याशिवाय इंग्रजांकडून आपल्यास हक्क मिळण्याची बिलकुल आशा नाहीं असा झाला. मी या मताच्या विरुद्ध असून इंग्रजांच्या सहकारितेनेंच आपला फायदा होणार असें माझें ठाम मत असल्यामुळें अर्थातच आमच्यामध्ये दोन फळ्या झाल्या. बंडाच्या प्रवृत्तिकडे रा. टिळक, बाळासाहेब नातु, शंकर विश्वनाथ केळकर वगैरे मंडळींचा कल आहे." अशा प्रकारचा रिपोर्ट केल्यावरून त्या आधारावर नातु बंधू यांस धरणें, टिळक, केळकर यांजवर खटले भरणें वगैरे उपद्व्याप सरकारनें केला. हा रिपोर्ट एका वड्या पोलीस अधिकाऱ्यानें प्रत्यक्ष लोकमान्यांच्या नजरेस आणला असूनहि लोकमान्यांनीं अखेरपर्यंत त्या कुऱ्हाडीच्या दांड्याप्रमाणें गोतास काळ झालेल्या वड्या हुद्देदाराच्या कृष्णकृत्याचा कोठेंहि उच्चार केला नाहीं !

( २ ) आम्ही लोकमान्यांच्या गीतारहस्यावर विनोदात्मक विरुद्ध टीका म्हणून 'रहस्यनिरीक्षण' या नांवाचा ग्रंथ लिहिला होता. तो विनोदात्मक असल्यामुळें चित्रशाळेंतील कंपाझिटर कंपोज करण्यापूर्वी सर्व मजकूर आवडीनें प्रथम वाचून मग कंपोज करीत असत. 'मजकूर वाचण्यांत तुमच्या पुस्तकामुळें आमच्या कंपाझिटरांचा विनाकारण वेळ मोडतो, हें चांगलें नाहीं,' असें चित्रशाळेचे मालक वासुकाका जोशी हे आम्हांस विनोदानें बोलले. ही हकीकत लोकमान्यांच्या कानावर गेली तेव्हां लोकमान्यांनीं वासुकाकांना निरोप धाडला कीं, "परशुरामपंतांचें पुस्तक कंपोज करण्याला तुमच्या कंपाझिटराचा मजकूर वाचण्यांत

विनाकारण वेळ जात असेल तर भजपाशीं दोन मुसलमान कंपाशिटर आहेत ते कंपोज करण्यास पाठवून देतों !" यावरून लोकमान्यांचा मार्मिक विनोदी स्वभाव दिसून येतो.

---

## श्रीधर गोविंद काळे

[एम्. ए., प्रमुखाचार्य संस्कृत विद्यालय, नाशीक.]

१९१५ च्या आक्टोबरात सिंहगडावर टिळकांचा पाहुणा म्हणून त्यांच्याच बंगल्यात उतरलों. पहिल्या सलामीस हिंडावयास निघण्याकरितां माझ्या खोलींत आल्यावर मी एम्. ए.च्या परीक्षेकरितां बरोबर आणलेलें वीरमित्रोदयाचे पुस्तक टिळकांनीं पाहिलें. पुस्तक पाहताच म्हणाले कीं, 'अहो, एल्‌एल्. बीचे अभ्यासाचे वेळीं हिंदू लॉची तयारी आम्हीं वीरमित्रोदयादि संस्कृत पुस्तकांवरून केली !' असें म्हणून मधूनच दायभागांतील एका अवघड प्रकरणाचे दहापांच श्लोक व तेथील क्लिष्ट विवेचन, भराभर, पाठ म्हटलेले ऐकतांच मी गार झालों. त्याच्या त्यावेळच्या समजूत देण्यानें मला खरोखरी परीक्षेंत उपयोग झाला. बाहेर पडतांच सहज सुरवात झाल्याप्रमाणें प्रथमच वेदाचें स्थल, त्यांचा काल व गीतारहस्य या ग्रंथाच्या संबंधाच्या मूळ कल्पनेबद्दल विचार निघाला. टिळक म्हणाले, 'वेदांतील स्थलकालासंबंधींचीं वर्णनें काल्पनिक अगर असभाव्य नाहींत असा माझा दृढ भाव पहिल्यापासून असे. ऋग्वेदांतील उषासूक्तें व त्यांतील सूर्य जाराप्रमाणें उषेच्या पाठीमागून सारखा फिरत आहे या वर्णनाची उपपत्ति आरंभीं लागेना. सर्व ऋग्वेद सायणभाष्य दोनदां वाचले, ब्राह्मणें पाहिलीं, शास्त्री मंडळींत चौकशी केली, तथापि पत्ता लागेना व कोडें उकलेना. अशी गोष्ट पृथ्वीवर कोठें घडते कां ? असा विचार आल्यावर मग ध्रुव प्रदेशाची गोष्ट नजरेस आली व बाकीच्या पुराव्यावरून ती गोष्ट सिद्ध वाटल्यावर फार आनंद झाला व मग हा सगळा भाग पुस्तक रूपानें प्रसिद्ध केला. अशीच कालासंबंधीं आलेली कल्पना मृग नक्षत्राच्या इन्वका बरोबर पूर्व दिवस होत्या या वर्णनावरून ज्योतिषशास्त्राच्या साहाय्यानें गणितानें बसविली. वेद हे सूर्याप्रमाणें तेजस्वी, ज्ञानाचे व अनुभवाचे हिरे आहेत. त्याचेकडून स्वतंत्रपणें बुद्धि चालवून प्रत्येकानें आपणास ज्ञान व साहाय्य आतृप्ति मिळवून घ्यावें." वेदांच्या साम्राज्यांतून पुराणांच्या साम्राज्यांत उतरलों. यांहि प्रांतांत सर्व महाभारताचें आलोडन करितां करितां व सर्व पुराणांचे परस्पर संबंध लक्षांत आणितां महाभारतांतील भगवद्गीतेचें रहस्य सांगण्याची

तयारी कसकशी झाली याचें विवेचन झालें. आणखी थोड्या वेळानें प्रकृत राजकारण निघालें. मी विचारिलें, " आपणांस सरकार शिक्षा देणार ही गोष्ट ठरल्यासारखी असतांना आपण इतके कष्ट सोसून आपली बाजू मांडण्याची तसदी का घेतलीत ? तें पालथ्या घागरीवरील पाण्याप्रमाणे झालें नाहीं कां ? " टिळक म्हणाले, " अहो, हाच तर जुन्या व नव्या राजकारणांतला फरक आहे. मी आदिलशहाचे अगर औरंगजेबाचे कारकीर्दींत महाराष्ट्राची व हिंदुस्थानची सेवा करीत असतों तर त्यांनीं मला मारेकऱ्याकडून मारविलें असतें व सांपडलों असतों तर पकडून तोफेच्या तोंडीं दिले असते. त्यांनींहि देशद्रोहि व राजद्रोहि म्हटलें असतें. आज पकडतात, कोंडतात, खटला चालवितात. त्या खटल्याची जगभर प्रसिद्धी होते, त्या प्रसिद्धीला राजकर्त्यांना सुद्धा भ्यावें लागतें. आजची लढाई ही असली आहे. अजून कोठें नुकतें तोंड लागलें आहे. मुख्य व अवघड काम अजून पुढेंच आहे " अशा तऱ्हेचें भाषण होईपर्यंत आम्ही बंगल्यांत आलों व नंतर जेवावयास आलों. भोजनोत्तर सुमारें एक तास भाषण झालें. विषय ' केसरी ' ट्रस्ट व समर्थ विद्यालय हे होते. मध्यंतरीं खेड्यानिहाय एकएक तरुण सुशिक्षित ग्राजुएटानें जाऊन राहून तेथील मर्यादित लोकांचे, सर्व बाजूंच्या हिताचा विचार करून, बऱ्याकरितां खपून त्यांचा पुढारी बनावें व हळूहळू अशा तऱ्हेनें कार्याचा विस्तार करावा याबद्दलची माझी योजना मी त्यांचे पुढें मांडली. त्यांनीं त्याबद्दल सहानुभूति दर्शविली व सांगितलें कीं, " तुम्ही तुमच्या योजनेप्रमाणें कामास लागा. जरा कामास जोर येऊन तेथें तेज उत्पन्न होतेंसें वाटलें कीं, हरतऱ्हेने सरकार तुम्हांस खच्ची केल्याशिवाय राहणार नाहीं. बाबा, स्वराज्याशिवाय सगळें व्यर्थ आहे. अशी तुमच्यासारखीं किती माणसें फुकट जातील कोण जाणें ! तथापि धीरानें करून पहा. डरू नका. काय होतें पाहू. "

केसरीच्या आपल्या मागूनच्या व्यवस्थेबद्दल लोकमान्य म्हणाले, " मी मंडालेस असतांना नरसोपंतांनीं केसरी कसा काय चालविला हे तुम्हां सर्वांना माहित आहे " मी उत्तर म्हणून ' छान चालविला ' असें म्हणालों. ते पुढें म्हणाले, " केसरी महाराष्ट्राचा आहे. मी आणलाहि नाहीं व घेऊनहि जाणार नाहीं. ज्यांचें अंतःकरण खरोखर जळत असेल अशा सर्व राष्ट्रभक्तांनीं तो चालविला पाहिजे. आज जे केसरीचे वर्गणीदार व साहाय्यक आहेत त्यांच्या विचाराबाहेर केसरीनें जावयाचें नाहीं. ते सर्व राखलेच पाहिजेत. येथें कोणाहि योग्य पुरुषास कर्तबगारी दाखविण्यास वाव आहे. नरसोपंतांची माझ्या तुरुंगवासाच्या वेळांतली कामगिरी लक्षांत घेऊन त्यांना केसरी ट्रस्टचे पहिले कायम मेंबर केलें आहे व त्यांच्या व आमच्या विचारांनीं पुढील योजना आंखली आहे."

" आतां आपण पुनः राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न हातांत घेणार ना ? " या

माझ्या प्रश्नास लोकमान्य म्हणाले, " अहो, जें काम झालें होतें व जें या मंडळींनीं आजपर्यंत चालविलें तितपत सबसेला राष्ट्रीय शिक्षणाचें काम आणण्यास मला पुनः दहा वर्षे अविश्रांत खपलें पाहिजे. तें आतां मजकडून होणें नाहीं. अण्णा विजापुरकर तुरुंगांत, मी तुरुंगांत, मार्गे कोणाच्या लक्षांत इंग्रज सरकाराशीं वागण्याची पद्धत आली नाहीं. तरी मी तुरुंगांत जाण्याचेपूर्वी दाजीस ( दाजी आबाजी खरे ) समर्थ विद्यालयाकडे विशेष लक्ष अर्दू देण्यास सांगितलें होतें. पण दाजीचें ऐकतो कोण ! सर लॉर्ड क्लार्कनीं समर्थ विद्यालयाच्या हेतु व कार्याबद्दलचा लेख मागितला होता. त्यापूर्वी विद्यालयांत आलेल्या कलेक्टर साहेबांना या विद्यालयांतील मंडळींना सन्मान्य पाहुणा या नात्यानें खुष करितां आलें नव्हते. गव्हर्नर साहेबांस पाठविण्याचें नियमपत्रक फारच कायदेशीर पाहिजे होतें. दाजीनें जनार्दनपंत ओकांना दोनतीनदां बोलाविलें. ओकांच्या लक्षांत आलें नाहीं. कांहीं तरी लेख दाजीला न विचारितां दिला गेला व आमच्या सगळ्या मंडळीचे श्रम गव्हर्नर साहेबांस सहज फुकट घालवितां येऊन समर्थ विद्यालय बंद पडलें. आता पुनः ती स्थिति आणणें फार मुष्किलीचें व कष्टाचें आहे. तूर्त अशी स्थिति आहे. पाहूं पुढें काय होतें तें. "

चहाचे वेळीं व नंतर त्यांचे श्मश्रूचे वेळीं सकाळभर जर्मन युद्ध व स्वराज्य हे विषयच प्रामुख्यानें पुढें येत होते. मध्यंतरीं सकाळीं श्रीजगन्नाथ महाराजांना दादा ( टिळक ) स्वतः स्टॉक्स व शेअर्सची उदाहरणें सुमारें एक तास शिकवित बसले. मास्तर या दृष्टीनें मी त्यांची शिकविण्याची शैली लांबूनच अवलोकन करीत होतों.

चहाचे वेळीं युद्धासंबंधानें लोकमान्य म्हणाले, " जगताच्या घडामोडींत 'काल' म्हणून एक अजब जिनस आहे. या युद्धाचे मिषानें हिंदुस्थानाला बरे दिवस येतील अशी कालाची घंटा खणखणा वाजत आहे. आम्हांला कळली तर खरी. नाहीं तर हें कालाचें आव्हान फुकट जाईल. क्रूर जर्मनापेक्षां सबईनें व स्वभावानें आम्हांला इंग्रजच जास्त जवळ. मागितल्यास आम्हीं त्यांना मदत दिली पाहिजे व आम्हीं मदत दिल्यास त्याची फेड म्हणून कांहीं राजकीय हक्क आम्हांस देणें इंग्रज सरकारास भाग पडेल. "

---

# विष्णु वासुदेव काणे

[ वरोडा, जि. चांदा, म. प्रांत. ]

( १ ) होमरूल लीगच्या वऱ्हाड नागपुराकडील दौऱ्यांत लोकमान्य वरोडा येथे आले होते. त्यावेळीं निरनिराळ्या संस्थांतर्फे हार अर्पण करते वेळीं मी होमरूल लीगच्या वरोडा शाखेचा अध्यक्ष या नात्यानें हार अर्पण केला होता. शिवाय त्यांचें स्वागतांत शेवटीं येथें सुमारें २५० रु.ची थैली दिली होती. त्या रकमेची हुंडी घेऊन ते गाडींत बसतांना त्यांचे बरोबर आलेले अंतुकाका फडणीस यांस त्यांचें सांगण्यावरून दिली. एवढीच त्यांची ओळख झाली होती. त्यानतर लोकमान्यांचे निधनाचे अगोदरचे दिवसांत एक दिवशीं मी मुंबईचे पैसाफंड संस्थेचे खजिनदार श्री अण्णासाहेब नेने यांचे बरोबर त्यांचे दर्शनास गेलो. त्यावेळीं नेने माझी ओळख करून देत होते. त्या बरोबर लोकमान्य म्हणाले यांना मी ओळखलें. नेने म्हणाले कशावरून ? लोकमान्य म्हणाले " होमरूलचे वऱ्हाडांतील दौऱ्यास वरोड्यास मी गेलों होतों. त्यावेळीं होमरूल लीगतर्फे यांनींच हार घातला होता ! "

(२) वरील दिवसांतच कलकत्याच्या जादा कॉंग्रेसचे अध्यक्ष—योजनेचे संबधांत चर्चा चालू होती. त्यावेळीं श्री. पंडित मालवीय हे, कलकत्ता जादा कॉंग्रेसचे अध्यक्ष आपण व्हाल कां म्हणून लोकमान्यांना विचारून गेलेले असावे असें वाटतें. त्यावर मंडळींत चर्चा चालू असतांना लोकमान्य म्हणाले "आजपर्यंत कधींहि मालवीयानीं कॉंग्रेसचे अध्यक्ष होण्याबद्दल मला विचारिलें नाहीं. यावेळीं ते कां आले तें मीं ओळखलें. अमृतसर कॉंग्रेसमध्यें मॉंटेग्यु—चेम्सफोर्ड सुधारणा अधुऱ्या व निराशाजनक आहेत म्हणून ठराव पास करण्यामध्ये पं. मालवीय चांगलेच विरुद्ध होते. ( त्यावेळीं जालीयनवाला बागेतील कत्तल वगैरे लष्करी अनर्थ गुदरले होते.) त्यानतर खिलापत प्रकरणामुळें व आणखी इतर कारणांमुळे म. गांधी संतापून कलकत्याला असहकारिता पुकारणार आहेत. ती व्यवहार्य असो किंवा नसो तो भाग वेगळा. परंतु या ठरावाला पंडितजी मनापासून विरुद्ध. पण गांधींना राजी करणें हें कठीण तितकेंच गांधींचे विरुद्ध जावे तेंहि कठीण. अशा पेंचांत मालवीय पडले आहेत. हें अरिष्ट परभारें टाळण्याचे हेतूनें मला इरेस घालण्याकरितां आले व म्हणूनच यावेळीं मला अध्यक्ष व्हा म्हणतात !"

## श्रीमंत माधवराव वि. किबे

[ एम. ए., फर्स्टक्लास सरदार इंदूर. ]

(१) इ. स. १८९९ साली मी बी. ए. ची परीक्षा देऊन अलाहाबादचें म्युअर सेंट्रल कॉलेज सोडलें. मी तेथें असतांना डॉ. थीबो नांवाचे प्राच्यविद्यासंशोधक पंडित तेथे मुख्याध्यापक होते. त्यांस मराठी भाषेंतील कै. रा. दीक्षितांचा "ज्योतिःशास्त्राचा इतिहास" हें पुस्तक जाणण्याची इच्छा झाल्यानें त्यांचा परिचय दृढ झाला. व त्यामुळें मलाहि प्राच्य विषयाचा नाद लागला. मी कॉलेज सोडल्यानंतर "वेदविषयक चर्चा" कोल्हापूरच्या ग्रंथमालेंत गुरुवर्य विजापूरकरांच्या उत्तेजनानें सुरु केली. माझे प्रथम तीन लेख प्रसिद्ध झाले. त्यांपैकीं एकांत, उत्तर ध्रुवाकडे आर्यांचे मूळ निवासस्थान होतें अशाविषयीं चर्चा केली होती. म्हणून ते लेख मी लोकमान्यांकडे पाठविले. त्यांचा स्वीकार करतांना त्यांनीं मला एक मोठें उत्साहपर पत्र पाठविलें व त्यात त्यांनीं जो या सबधानें मोठा ग्रंथ प्रसिद्ध केला त्याचा सारांशच दिला होता. माझ्या दुसऱ्या एका लेखात ऋग्वेदाच्या परिशिष्टाविषयीं विचार करून वेदरचनाकालाचा अलिकडील शेवट ठरविला होता. त्या लेखाविषयीं लोकमान्यानीं पूर्ण सहमत प्रदर्शित केलें. पण माझ्यासारख्या नवशिक्याविषयीं त्यांनीं जी सहिष्णुता दाखविली तिचा माझ्या मनावर मोठा परिणाम झाला. त्यानतर त्यांनीं एक तरुण बंगाली गृहस्थ, ज्यानीं योगमार्गात नुकताच प्रवेश केला होता व जे त्या दिवसांत नुसता दुग्धाहार व एखादा पेढा खाऊन राहात होते, त्यास माझ्याकडे पाठविले. गृहस्थ हल्लीं काशीवास करीत आहेत व त्यांनीं इंग्रजींत वेदान्तशास्त्रावर महत्त्वाचीं पुस्तके प्रसिद्ध केलीं आहेत.

(२) लोकमान्य मंडालेहून परत आल्यावर त्यांचें मुंबईस व्याख्यान झालें. तें ऐकण्यास मी गेलों होतों. त्या व्याख्यानाचे वेळीं त्याचें वक्तृत्व किती परिणामकारक असे व त्याची लोकप्रियता केवढी दांडगी होती याचा मला प्रत्यक्ष अनुभव आला. त्यानतर त्यावेळीं अलाहाबादेहून प्रसिद्ध होणाऱ्या Hindusthan Review नांवाच्या मासिक पुस्तकात "हिंदुस्थानांतील वक्तृत्वकला" या विषयावर मी एक निबंध प्रसिद्ध केला, त्यांत सरफेरोजशहा मेथा, सर सुरेंद्रनाथ बानर्जी, डब्ल्यु. सी. बानर्जी, मनमोहन घोस, नामदार गोखले, पंडित मदनमोहन मालवीय, सर नारायण चंदावरकर व मद्रास आणि पंजाबकडील कित्येक वक्त्यांच्या कलेचे वर्णन केलें होतें व म्हटलें होतें कीं, लोकमान्यांच्या इतकें परिणामकारक वक्तृत्व माझ्या ऐकण्यांत आलें नाहीं.

(३) या नंतरचें त्यांचें दर्शन म्हणजे शेवटलेंच होय. इ. स. १९२०च्या जूनच्या मध्यास मी पुण्यास जाऊन लोकमान्यास भेटलों. भेट गायकवाडवाड्यांतच झाली.

मला त्यावेळीं त्यांची प्रकृति बरीच क्षीण दिसली. व गळ्यास एक गळपट्टाहि त्यांनीं सैल असा गुंडाळला होता. मला कांहीं हिंदुस्थानविषयक पुस्तकांची माहिती हवी होती. त्यावेळीं स्वतः उठून मला त्यांनीं आपली सर्व लायब्ररी दाखविली व इंग्लंडांतहि एक गृहस्थ अशा कामीं मदत करतात, त्यांचें नांव व पत्ताहि दिला. मी त्यावेळीं Ancient calenders & constellations by Hon. Emile Plunket या नांवाच्या पुस्तकांत लोकमान्यांच्या Orion ला पुष्टिकारक असा असिरियांतील नक्षत्रचक्राचा पुरावा आहे असें त्यांना कळविलें व तें पुस्तक पाहण्यांत आलें आहे काय म्हणून विचारलें. त्यावेळीं तें पुस्तक पाठवून देण्याविषयीं त्यानीं आज्ञा करून असें सांगितलें कीं, 'ओरायनची दुसरी आवृत्ति काढवयाची आहे; त्यावेळीं त्याचा उपयोग करू. मी इंदुरास परत आल्यावर ते पुस्तक पाठविण्याचा विचार करतो, तों ते आजारी झाल्याचें कळलें. त्याच बैठकींत त्यांनीं असेंहि कळविलें कीं, गीतारहस्याचें इंग्रजी भाषांतर त्यांचे एक स्नेही करीत आहेत. त्या दिवशीं मी नको म्हणत असतांहि ते त्यांच्या वाड्यांत वरच्या मजल्यावर मला पुलावर पोंचविण्यास आले. तेंच त्यांचें शेवटचें दर्शन !

---

## रंगाचार्य बाळकृष्णाचार्य रड्डी

[संस्कृत विषयाचे आचार्य–हायस्कूल, धारवाड.]

लो. बळवंतरावजी टिळक यांचा माझा साधारण परिचय वीस वर्षांपासून आहे. व तोहि केवळ संस्कृत वाङ्मयांतील कांहीं गोष्टींचें विवेचन करण्यासंबंधानें झालेला होता. माझ्या अनुभवांत विशेष गोष्टी दृष्टीस पडल्या त्या ह्या होत.

(१) लो. टिळकांचें संस्कृत वाङ्मयांत बरेंच वाचन झाले असल्यामुळे, व त्यांच्या बुद्धींत विवेचनशक्ति विशेष असल्यामुळें त्यांच्या विचारांस एक प्रकारचा अधिकार प्राप्त झाला होता, व त्यामुळे प्राचीन व अर्वाचीन विद्वानांस एक प्रकारचें आदरयुक्त कौतुक त्यांच्याविषयीं वाटत असे. कोणत्याहि गोष्टीची चर्चा करावयाची असली तर ते कधीं आळस दाखवीत नसत अथवा विचारणारा कोणत्याहि दर्जाचा असला तरी त्याविषयीं तिरस्कारबुद्धि त्यांचे ठिकाणीं कधींहि दृष्टीस पडत नसे. मला पुष्कळदां असा अनुभव आला आहे कीं, त्यांच्या उतारवयांत सुद्धां कांहीं गोष्टींची वाटाघाट निघाली असतां त्याविषयीं साधकबाधक प्रमाणें दाखविण्याकरितां ते स्वतःच पंचवीसदां आपल्या लायब्ररींत जात;

पुस्तकें आणीत, व आम्हांस दाखवीत. या त्यांच्या प्रमाणग्रंथ दाखविण्याचा इतका अतिरेक होई कीं, आम्हांस त्यांच्या उत्साहशक्तीचा व स्मरणशक्तीचा अचंबा वाटे.]

(२) वर्तमानपत्रांतील विवादामुळें लोकाचा असा ग्रह होण्याचा संभव आहे कीं, टिळकांना आपलें तेवढें चांगलें वाटत होतें; व पाश्चात्य संस्कृति टाकाऊ दिसत असे. परंतु ही भ्रांति होय. कारण पुष्कळ वेळा पाश्चात्य विद्वानांची ते मोठ्या प्रेमानें प्रशंसा करीत असत. मॅक्समूलरचे वेदावरील परिश्रम, वेदांचा अर्थ निश्चित करण्याविषयींच्या त्याच्या उपपत्ति, 'इष्टिकालेख', 'ताम्रलेख', 'शिलालेख' यांच्यांतील लिपी उलगडण्याचे त्यांचे प्रयत्न जगांतील सर्व वाङ्मयाशीं त्यांचा परिचय व त्यामुळें तौलनिकशास्त्राचा त्यानें केलेला विकास, सतत परिश्रम करण्याच्या सवयीमुळें विविधशास्त्रात त्यानें मिळवलेलें प्राविण्य, वगैरे गोष्टींबद्दल त्याना अत्यंत कौतुक वाटत असे. व त्या गोष्टी निघाल्या म्हणजे ते मनःपूर्वक त्या त्या विषयाची माहिती देऊन पाश्चात्यांच्या उद्योगाची प्रशंसा करीत असत. व त्यांच्या ग्रंथांच्या वाचनाचा नाद त्यास इतका भयंकर असे कीं, एकेवेळीं प्लेगच्या दिवसात आम्ही त्यास भेटावयास गेलों असतां त्यांचे जवळचेच कोणी आप्त त्यांच्या शेजारच्याच झोपडींत प्लेगला बळी पडले होते. व त्यांच्या और्ध्वदेहिकासंबधानें इतर मंडळी गावांत सामान आणावयास गेली होती. ती मंडळी परत येईपर्यंत बळवंतरावजी एकतान वृत्तीनें एक इंग्रजी ग्रंथ वाचीत बसले होते. आम्हांस हें त्यांचें चित्तस्थैर्य व विद्येविषयींचें प्रेम पाहून फार आश्चर्ययुक्त समाधान वाटलें.

(३) बळवंतरावजी हे विद्वानांचे चहातेहि होते. आम्हीं काहीं दिवसापूर्वी रामजोशी याचा 'छन्दोमंजरी' ग्रंथ छापून काढला. त्यांत छंदःशास्त्रांतील 'प्रस्तर' 'नष्ट' 'उद्दिष्ट' इत्यादिकाविषयीं गणिताचा एक महत्त्वाचा भाग आहे. तो बरेच परिश्रम करून आम्ही बसविला. परंतु त्याच्या उपपत्तीचा उलगडा झाल्यास पाहावें म्हणून विचारात होतों. याच वेळीं बळवंतरावजी दीर्घकालचा कारागृहवास संपवून परत आले होते. आमचे छंदोमंजरीचें पुस्तक कै० कृष्णाजीपंत ओक यानीं वाचावयास घेतलें होतें. त्यानीं वाचल्यावर त्यास पसंत पडलें म्हणून म्हणा, किंवा इतर कोणत्याहि कारणाने असो, त्यांनीं बळवंतरावजी येतांच त्यास तें वाचावयास दिलें; व विशेषतः प्रस्तरादि त्यांतला भाग वाचण्यास सांगितला. आम्ही स्वतः हें पुस्तक घेऊन बळवंतरावजी यांजकडे गेलों नाहीं. याचा हेतु फक्त एवढाच कीं, ते अत्यंत महत्त्वाच्या राजकीय व सामाजिक कार्यांत निमग्न असतात, त्यांस आपण उगीच त्रास देऊ नये. परंतु पुढे रा. कृष्णराव ओक यांची गांठ पडली, तेव्हां त्यानीं होऊन सांगितलें कीं, तुमचें पुस्तक मीं बळवंतरावजीस वाचावयास दिलें व त्यांनीं तें वाचून

त्यांतील गणिताचा भाग कॉलेजांत असतांनाच सोडविला होता असें सांगितलें! त्यामुळें त्यांनीं या विषयाची उपपत्ति कशी केली वगैरे गोष्टींची वाटाघाट करण्यासंबंधानें त्याजकडे आम्ही एकदां गेलों. व प्रसंगानें त्याजपाशीं ही गोष्ट काढून हा प्रस्तरादिकांच्या उपपत्तीविषयीं प्रश्न विचारला. तेव्हां त्यांनीं मोकळेपणानें सांगितलें कीं, सध्या माझा या विषयांवरील व्यासंग सुटला आहे. मी खटपट केली तर याचा उलगडा करीन. तथापि रँगलर परांजपे यांचा हा विषय तयार आहे. तुम्हीं त्यांस विचारलें असतां ते याचा उलगडा करून देतील. आमचा व रँ० परांजपे यांचा अशी वाटाघाट करण्यासारखा परिचय नसल्यामुळें पुढे आम्ही त्यांजकडे गेलों नाहीं. परंतु बळवंतरावजी यांच्या या उत्तरावरून व त्यावेळच्या त्यांच्या वृत्तीवरून ते रँ० परांजपे यांची योग्यता जाणून होते; व त्यांना त्यांच्या बुद्धिमत्तेबद्दल प्रेमहि होतें, हें आम्हांस स्पष्ट कळून आलें. कै. भाऊशास्त्री लेले यांचे व रा. बळवंतरावजींचे ग्रामण्यासंबंधानें वर्तमानपत्रांतून व सभांतून पुष्कळ खटके उडत. तथापि भाऊशास्त्री यांच्या उद्योगप्रियतेबद्दल त्यांनीं आम्हांजवळ प्रशंसोद्गार काढले होते. वे. गोपाळाचार्य अण्णा कऱ्हाडकर हे पुण्यास आले असतां त्यांस भेटून त्यांचा गौरव करण्यांत, तसेंच उत्तरादिमठाधीश पुण्यांत आले असतां, गीतारहस्यासंबंधानें त्यांच्यांत व बळवंतरावजींत जरी मतभेद होता तरी, श्रीपादांच्या विद्वत्तेनुरूप त्यांचा सत्कार करण्यांत बळवंतरावजींची सक्रिय सहानुभूति होती. तात्पर्य मतभेद कितीहि असला तरी, बळवंतरावजी गुणीजनांचें मनःपूर्वक अभिनंदन करण्यास कधींहि मागें घेत नसत.

(४) कोल्हापूरच्या वेदोक्त प्रकरणांतील सर्व हकीगत बळवंतरावजींस अवगत होती; व ज्या ज्या प्रसंगीं त्यांस सल्ला विचारण्यांत आला त्या त्या वेळीं त्यांनीं योग्य मार्गच सांगितला. संस्थानाविरुद्ध व्यक्तीपेक्षां त्याना कोल्हापूर संस्थानाविषयीं विशेष अभिमान असे. व त्यावेळचे व्हाइसरॉय लार्ड कर्झन यांच्या स्वतंत्र विचाराच्या बाण्याविषयींहि विश्वास वाटत असे. त्यामुळें या दोन्ही गोष्टी मनांत बाळगून ते सर्वांस सल्ला देत. परंतु भवितव्यता निराळीच असल्यामुळें त्यांच्या सल्लामसलतीचा उपयोग झाला नाहीं. तथापि एवढी गोष्ट खरी कीं, सार्वजनिक कामाविषयीं अत्यंत आस्था, शिवाजी छत्रपति यांच्या घराण्याविषयीं अभिमान व विनाकारण संकटांत सांपडलेल्या ब्राह्मणवर्गाविषयीं कळकळ हे त्यांचे गुण या प्रकरणांत स्पष्ट दिसून आले.

---

## नारायण जगन्नाथ परांजपे

[ बी. ए,......मुंबई. ]

( १ ) टिळक डेक्कन कॉलेजमध्यें असतानां स्नानानंतर ते सोंवळें नेसून जेवावयास बसत असत. कांहीं मित्रमंडळींनीं चेष्टा करण्याच्या उद्देशानें त्यांचें सोंवळें लपवून ठेवलें. तेव्हां त्यांच्या लक्षांत सर्व प्रकार चट्‌कन आला व ते तसेच ओलेंत्या धोतरानें जेवावयास बसले ! व बाहेरून काहींहि न दर्शवितां आपलें जेवण उरकलें. परंतु ह्या मंडळींना कांहीं तरी हात दाखवावा ह्या हेतूनें सर्व मंडळी संध्याकाळीं बाहेर गेल्यावर प्रत्येकाच्या खोलींत पार्टीशनच्या फळ्यावरून उड्या मारून त्यांनीं त्यांच्या खोल्यांना आतून कड्या लावून घेतल्या व आपल्या खोलींत परत आले ! सर्व मंडळी परत येऊन बाहेरून कुलूप उघडून पाहतात तों आतून कड्या ! कुणाला कांहीं गूढ उकलेना. बरीच गडबड उडून दार फोडीपर्यंत पाळी आल्यावर टिळक आपल्या खोलीच्या बाहेर आले व हंसत टाळ्या वाजवीत "जरा थावा" असे सांगून सगळ्यांच्या खोल्या उघडल्या ! सकाळीं केलेल्या टिळकांच्या थट्टेचा हा परिणाम हें मंडळींच्या लक्षांत येऊन ते बरेच खजील झाले !

( २ ) माझ्या आजोळच्या नातेवाईकाची इनामदारी दत्तक नाकबूल करून सरकारनें रद्द करून टाकली. ती परत मिळावी म्हणून खटपट करण्यापूर्वी सदर नातेवाईक लोकमान्यांचा सल्ला विचारण्यास गेले. सर्व हकिगत ऐकल्यावर लोकमान्य म्हणाले, " सामना कोणाशीं आहे माहीत आहेना ? बाबाशीं कुस्ती खेळावयाची आहे असें समजून आखाड्यांत उतरा. नाहींपेक्षां स्वस्थ बसणेंच चांगलें." शेवटीं, " आपसांत दुही असल्यावर लढण्यांत फायदा नाहीं. " असा सल्ला दिला.

---

## केशव वामन फडणीस

[ आगाशी, जि० ठाणें. ]

इ. स. १९१६ चा मे महिना असावा , त्या वर्षी मी ई० ६ वी मराठी शिकत होतों. आमच्या गांवांतील पुष्कळ मुलांनीं लो. टिळकांचें पुण्यदर्शन घेतलेले नव्हतें. अशा वेळीं आम्हांला बातमी कळली कीं, " लोकमान्य हे मुंबईस आलेले आहेत व ते उद्यां ( त्या दिवशीं शनिवार होता ) पालघर येथे व्याख्यानास जाणार आहेत. तावडतोब माझ्या कांहीं मित्रांनीं व मी विरार येथे गाडीच्या वेळीं त्यांचें दर्शन घेण्यासाठीं जाण्याचा बेत केला.

व्याख्यानाचा विषय " आपले सण व आपला देश " हा होता. आपल्या हिंदूधर्माच्या प्रत्येक सणाची क्रमशः माहिती सांगितल्यावर प्रत्येक सणाचा उपयोग देशाकरितां कसा करून घ्यावा हे सांगितलें. व्याख्यान आटोपल्यानतर त्याना तेथील एक सद्‌गृहस्थ म्हणाले कीं, उठल्या बसल्या, लग्नांत, मुर्जीत, सणांत एकसारखे कसलें स्वराज्य ! तो विषय निघेल तेव्हां त्याच्या गोष्टी. त्यावर लोकमान्य टिळकांनीं मार्मिकपणें असें उत्तर दिले कीं, " कोणत्याहि कार्याला आरम करावयाचा म्हणजे सरकार दोन गोष्टींकडे नेहमीं लक्ष देत असते.

१ ती गोष्ट ( कार्य ) वर–वर पाहणारांस आवडून आपली स्तुती होईल कीं नाहीं.

२ त्याच गोष्टीचा ( कार्याचा ) उपयोग आपली सत्ता येथें ( हिंदुस्थानात ) मकम करण्यात होईल कीं नाहीं.

याच तत्त्वावर रेल्वे, टपाल, तार, वगैरे खातीं निघालीं आहेत. तसे नसतें, तर वरील खात्यांच्या १/१० तरी सरकारनें कालवे, शेतीची दुरुस्ती या खात्यांना खर्च केला असता कीं नाहीं शंका आहे. तसेंच आपणहि कोणतेंहि कार्य करतांना तें बहुजनसमाजाला आवडेल असे करावे. व त्या योगाने राष्ट्रचैतन्य करतां आलें तर तेंहि साधावें."

## गोपाळ रावजी गोगटे

[ न्यू इं. स्कूलमधील लोकमान्यांचे शिष्य, बी. ए. एलएल्. बी
वकील, भुसावळ ]

( १ ) मी धुळें हायस्कुलांत शिकत असतां पुण्याच्या न्यू स्कूलची माहिती असलेल्या एका मुलानें तेथील शिक्षकाचे नावाचा श्लोक म्हटला त्यांत " ठळक टिळक ते आपटे नामजोशी " असा एक चरण होता. तो माझे मनांत ठसला व मी तो तेवढाच चरण वेळीं अवेळीं म्हणत असे. ते " ठळक टिळक " पाहाण्याची उत्कंठा सन १८८९ च्या जानेवारी महिन्यांत सफल झाली. टिळक व नामजोशी दोघेहि एकदमच विश्रामबागेकडे चाललेले मला एका मित्रानें दाखविले. टिळकांचे बद्दलचा आदर दर्शनानें द्विगुणीत झाला व अखेरपर्यंत तो सारखा वाढतच गेला.

( २ ) पुणें न्यू स्कूलमध्यें मॅट्रिकचे क्लासात मी असता टिळक यांचेकडे मेक्यानिक्सचा तास असे. एके दिवशीं गद्रे वाड्यांतील तिसरे मजल्यावर तास चालू असतां वाड्यास लागून असलेले घर एकदम कोसळल्यामुळें मोठा आवाज झाला. त्यासरशीं क्लासातील सर्व मुलें एकदम बाहेरचे गच्चीवर धांवली. खालीं रस्त्यांत ही गर्दी जमली. ३।४ मिनिटें गच्चीवर उभे राहून झाल्यावर शुद्धीवर आल्यासारखीं सर्व मुलें परत वर्गात आलीं. टिळकांनीं खुर्ची सोडली नव्हती. मुलें आंत येतांच जेथें प्रकरण थांबलें होते तेथून पुढें सांगण्यास सुरवात झाली! टिळकांचें हें वर्तन पाहून आम्ही मनांत पुरे शरमून गेलों व ही एक प्रकारची अध्यापन समाधी पाहून थक्क झालों! भाडोत्री शिक्षकाला शिस्तीच्या नांवावर अकांडतांडव करण्यास यांत पुष्कळच अवसर होता.

( ३ ) सन १८९३ चे गणपती उत्सवांत विंचूरकरांचे वाड्यांत एके दिवशीं रात्रीं लॉक्लासचे गणपतीपुढें मेळ्यांच्या गाण्याचा ऐन रंग चालला होता. सुमारें १—१॥ हजार स्त्रीपुरुषांचा जमाव होता. एकदम एका गृहस्थानें खुर्चीवर उभें राहून " दारुवाल्याचे पुलावर हिंदु—मुसलमानांचा दंगा झाला आहे तिकडे मदतीला चलावें " असें जाहीर केलें. एखाद्या चिकार भरलेल्या नाटकगृहास आग लागल्याची ओरड व्हावी तसा प्रकार झाला. सगळ्यांची घांदल उडून सर्वजण किंकर्तव्यतामूढ झाले. सगळ्यांची घांदल, पण टिळकानीं गाडी करून नामजोशांसह थेट दारुवाल्याचे पुलाचा मार्ग धरला. आदितवार पेठेपासून गर्दी फार होती. " मुसलमान सुरे घेऊन कापीत सुटले आहेत " अशी भूमका उठल्यामुळें लोक जीव घेऊन पळत सुटले. तेवढ्या गर्दीतून गाडीवाल्यास धीर देऊन गाडी दग्याचे ठिकाणीं नेऊन सर्व स्थिति टिळकांनीं समक्ष पाहिली. Thy boat Carries Ceasar अर्थातलाच हा प्रकार होता. टिळकांचा हा छातीठोकपणा

पुण्याच्या प्रत्ययाला तेव्हांपासून आलेला होता. दुसरे दिवशीं गाडीभर जोडे व उपरणीं फेटे व पागोटीं वगैरे माल आदितवारचे रस्त्यावर पडलेला फरासखान्यांत पोलिसांनीं आणला होता. लोक किती भेदरले होते याची यावरून कल्पना होईल.

( ४ ) जस्टिस स्ट्रॅची यांच्या निकालाप्रमाणें टिळक तुरुंगात सजा भोगीत असतां त्यांना एक वही टिपणें करण्यास दिली होती. त्या वहीवर शेवटीं या वहींत अमुक पानें आखलेलीं व दोन बिन आखलेलीं अशी पानाची संख्या नमूद करून शेरा जेलरनें मारलेला होता. वही सुमारें १५०।२०० पाव कागदांची होती. उदारमतवादी सरकारनें अशा जगविख्यात पंडिताचे प्रज्ञाविकासालाहि या वहीचा तुरुंगच घातला होता. ह्या वहीच्या आवारांतच आपले विचार नीट बसवून टिळकांनीं स्वतःची सुटका झाल्यावर त्या विचारास मुक्त करून आर्टिक होमसारखा ग्रंथ निर्माण केला. ही वही हल्लीं पुण्यास लोकमान्यांचे पुस्तकसंग्रहांत मला वाटतें आहे. त्या वहीचें दर्शन प्रत्येकानें घेतल्याशिवाय राहूं नये. ह्या वहीवर टिपणे करण्यास दिलेली पेन्सिलहि अर्धी होती, असें टिळक सांगत !

( ५ ) आर्टिकहोमचे पुस्तक लिहून काढण्याकरिता १९०२ सालचे उन्हाळ्यांत लोकमान्यांनीं मला सिंहगडास नेलें होतें. त्यावेळीं महिना सव्वामहिना त्यांच्या निकट सहवासात घालविण्याची सुसंधी मला मिळाली. ते यावेळीं सर्व परिवारासह गडावर राहिले होते. पुस्तकप्रकाशनाचें काम थोडें दिरंगाईवर गेलें असें वाटून यावेळीं गडावर पुस्तक लिहिण्याचें काम पुरें करण्याचा निश्चय करूनच ते आले होते. तितकेंच लिकडीचें काम असल्याशिवाय कोणी गडावर येऊ नये अशी खालीं ताकीद होती. गडावर पोंचल्याचे दुसरे दिवशींच सकाळपासून कामास तावडतोब सुरुवात झाली. मजकूर सांगण्याचा सपाटा चालत असे. कधीं कधीं १४।१४।१५।१५ तास लिहिण्याचें काम चालत असे. हे लिहिण्याचे दालन सोडून ते इकडे तिकडे बहुधा जातच नसत. एखादी नवी कल्पना डोक्यांत आली तर मध्येच इतकी तद्री लागे कीं, मी तासचे तास पुढें कागद व हातात टाक घेऊन तिष्ठत असे. कांहीं मजकूर सांगितला नसतां "झाल" म्हणूनच विचारीत. इतके दिवसात फक्त एकदां सर्वांत धाकट्या ४।५ वर्षांच्या श्रीधरपंतास दोन हातांनीं वर उचलून "काय रे" म्हणून पुन्हां लगेच खालीं ठेवलेला मी पाहिला. मुलाबाळांशीं संभाषण क्वचितच होत असे. घरांत जेवायचें झाले आहे हे सांगण्यास सुद्धां मुलें भीत असत. कारण हा निरोप म्हणजे कामांत मोठा व्यत्ययच असें त्यांस होई. गडावरून खालीं येण्याचे दिवशीं शेवटच्या भागाचें लिहिणे चाललें होतें तें गडावरून निघण्याच्या शेवटच्या मिनिटापर्यंत पुरवलें. पुस्तक लिहून हाताबाहेर काम पडल्याबद्दल त्यांस समाधान वाटलेलें दिसलें. या पुस्तकाबद्दल त्यांस एक प्रकारचा सात्विक अभिमान वाटत असे. हिंदुस्थानांतील लोकांना अशीं नव्या कल्पनेचीं पुस्तके चिकित्सक बुद्धीनें

लिहितांच येणार नाहींत असा पाश्चात्यांस फुकट गर्व वाटतो, असा एखादे वेळीं उद्गार निघे. या पुस्तकाचें खरें महत्त्व व रहस्य समजेल असे पाश्चात्यांत तरी ७।८च पंडीत आहेत असें त्यांचें मत होतें.

लोकमान्यांना मावळे फार पूज्य मानीत. गडावर त्याच्या भेटीकरितां पुष्कळ मावळे येत व कैऱ्या, करवंदें, खवा, केळीचीं पानें नजराणा म्हणून आणीत. त्यांचें शुद्ध प्रेम पाहून लोकमान्य त्यांची नीट वास्तपुस्त करीत. त्यांचा मात्र कामास व्यत्यय आला तरी चाले. आपलेवर झालेल्या दाव्यांचीं समन्सें आणून ते लोक सल्ला विचारीत, पण त्यांस सर्व हकीकत विचारून-हातांतलें लिहिणें बाजूस ठेवून त्यांच्या कैफियती मला लिहिण्यास सांगत व नीट समजूत घालून त्यांस निरोप देत. ते एकदां म्हणाले कीं " मी येथून पायीं रायगडावर निघालों तर हजारो मावळे जमा करीन ! "

बायबलमध्यें सूर्यानें आकाशांत मध्यें घोडे सोडले अशा अर्थाचा कांहीं मजकूर असल्याचें लोकमान्यांस या पुस्तकाचा ६ वा भाग लिहित असतां आठवलें व हें शोधून काढण्यास वेळ मोडणार हें पाहून त्यांनीं एक युक्ती योजिली. गडावर मिशनच्या मडमा एका बंगल्यांत राहात होत्या त्यांजकडे जाऊन तो भाग काढून आणण्याचें काम विश्वनाथपंत ( चिरंजीव ) यांस सांगितलें. १०।१५ मिनिटांतच नक्की पान काढून ते आले. कामास हरकत न होतां त्याचा उपयोग योग्य स्थळीं झाला. पण टिळकांनीं केलेली ही काटकसर त्यांस पचली नाहीं. एके दिवशीं एकदम ४ मडमा त्यांच्या भेटीला आल्या व त्यांचा बराच वेळ त्यांनीं खाल्ला. त्यांना मराठी येतें असें पाहून बायकामुलींकडे त्यांची रवानगी केली तेव्हां टिळक सुटले ! एकंदरींत सूर्याचे घोडे थांबलेले दाखवून आमचे कागदी घोडे या मिशनरी बायांनीं खास मध्यें थांबवले.

गडावर असतां एकदां लो० मा० म्हणाले, कॉलेजचा अभ्यास सोडल्यापासून आतांपर्यंत माझे अभ्यासाची सरासरी ४ ते ५ तास रोजची पडेल मंडालेच्या वर्षांतील अभ्यासाचे तास यांत मिळविले तर ही सरासरी ६।७ तास पडेल. लो० मा० चे अनेक व्यापांपैकीं एकहि व्याप नसलेले किती पदवीधर आपले विद्याव्यासंगाची इतकी सरासरी सांगू शकतील याचा विचार केला म्हणजे त्यांच्या जबर विद्याव्यासंगाची कांहीं कल्पना होईल.

( ६ ) ताईमहाराजांचे खटल्याचे वेळीं खालचे कोर्टांत पुराव्याचें काम संपल्यावर लोकमान्यांनीं लेखी डिफेन्स देण्याचें ठरविलें. रा० शंकरराव देव व मी असे २ लेखक त्यावेळीं होतों. परंतु आम्हांस आळीपाळीनें विसावा देऊन लोकमान्यांनीं दिवसा व रात्रीं मिळून विलक्षण मेहनत करून १२।१३ दिवसात येवढ्या महत्त्वाचे खटल्याचा डिफेन्स तयार केला. इतकी कमिशनें, त्या अपीलांत इतक्या निशाण्या, इतकी शिक्षा होण्याची खात्री, पण अपीलांत त्यांनीं यत्किंचित

कसूर केली नाहीं व सावधानता कधींहि बिघडविली नाहीं. दादासाहेब करंदीकरांनीं डिफेन्स द्यावयाचा होता व एका सोमवारीं तारीख त्याकरितां ठेविली होती. त्या सोमवारीं सकाळीं दादासाहेब सातान्याहून वाड्यांत आले. ते येतांच त्याचे हातांत सर्व संगीन डिफेन्सची लेखी प्रत देण्यांत आली! तिचे आधारें दुपारीं डिफेन्सचें काम सुरू झाले. असलें डिफेन्स लिहून वकीलांचे हातीं देणारे पक्षकार माग्यवान् वकीलांनाच लाभतात ! या स्वतःचे डिफेन्स लिहिण्याचे गर्दीतहि त्यावेळीं २१४ ब्राह्मणमंडळीवर चोरीचा खटला निघाला होता त्याबद्दल सल्ला विचारण्याला त्यांचे नातेवाईक येत असत व त्यांस आपलें काम बाजूस ठेवून लोकमान्य आनंदानें सल्ला देत असत.

---

## श्रीपाद शंकर नवरे

[ बी. ए., कार्यवाह प्राज्ञपाठशालामंडळ, वाई. ]

( १ ) महायुद्ध सुरू असतांना १९१७ च्या फेब्रुवारी महिन्यामध्यें हिंदुस्थानसरकारानें 'भारत सरक्षक सैन्य' ( Indian Defence Force ) काढून हिंदी सुशिक्षितांना लष्करी शिक्षण देण्याचे जाहीर केले. याबद्दल सरकारतर्फेच्या विस्तृत अटी अद्यापि प्रसिद्ध व्हावयाच्या होत्या. परंतु त्या प्रसिद्ध होण्यापूर्वीच लोकमान्यांनीं सरकारचें अभिनंदन केले आणि 'केसरी'तून व पुण्या–मुंबईच्या जाहीर भाषणांतून "यदृच्छेने उघडलेल्या या 'स्वर्गद्वाराचा' तरुणांनीं चांगला उपयोग करून घ्यावा" असा त्यांनीं वीरश्रीजनक उपदेश केला. पुढें थोड्याच दिवसांनीं सरकारनें आपल्या अटी प्रसिद्ध केल्या. सैन्यांत भरती केलेल्या लोकांना कमिशन्सच्या जागा न मिळतां केवळ हवालदारींत व हमालींतच त्यांच्या लष्करी शिक्षणाची इतिश्री होणार हें ऐकून पुष्कळांच्या उत्साहावर विरजण पडले व दिलेलीं नांवे काढून घेण्याविषयीं त्यांच्यांत चलबिचल सुरू झाली ! याविषयीं लोकमान्यांचा खासगी सल्ला घेण्याकरितां आम्ही कांहीं मंडळी त्यांच्याकडे गेलो. आमचा असा अदाज होता कीं, सरकारच्या अपमानास्पद अटी कळल्यावर त्यांचा निषेध करण्याकरितां सैन्यांत कोणीच नांवें नोंदवू नयेत असा टिळक सल्ला देतील. पण पुढें अगदीं उलट प्रकार घडलेला पाहून आम्हांस अत्यंत आश्चर्य वाटलें ! आम्ही म्हणालों, "सैन्यांत जाऊन भय्यांचीं व हमालांचीं हलकटपणाचीं कामें करण्यापेक्षां न गेलेलेंच काय वाईट ?" यावर किंचित् हंसून लोकमान्य म्हणाले, "वेडे आहांत झालें ! अरे, रुसून बसायला

इंग्रज सरकारचे तुम्ही जांवई कां आहांत ? तुमच्या रुसण्याला विचारतो कोण ? असानें तुम्ही स्वतःचें अनहित करून घेत आहा. इंग्रज सरकारच्या घट्ट मुठींतून आधीं कांहीं बाहेर पडायचें नाहीं. महायुद्धाच्या कैचींत सांपडल्याने आज त्याना आपली मूठ किंचित् ढैल करावी लागत आहे, त्याचा तुम्ही फायदा का घेऊं नये ? मिळेल त्या संधीचा फायदा घेऊन अधिक योग्यतेच्या कामाकरितां आपली पात्रता निदर्शनास आणली पाहिजे, व तत्प्रीत्यर्थ चळवळ करण्याचा धोशा अखंड चालवेला पाहिजे. सध्या नुसती हडेलहप्पी का होईना, तिच्यांत वर्ष घालविलेले लाख दीड लाख सुशिक्षित तरुण उद्या जर देशांत वावरू लागले तर तुमच्या होमरूलच्या मागणीस किती वजन येईल याची तुम्हास कल्पना आहे काय ? "

( २ ) एप्रिल १९२१ मध्यें वेश्यवाड्याचा कार्यक्रम पार पाडण्याकरिता अंधेरी–श्रावकाश्रमातर्फे मी बडोद्यास गेलों असता तेथील मुख्य तुरुंग पाहाण्याची सुदैवानें मला संधि मिळाली. त्या तुरुंगामध्यें स्वदेशी चळवळींत जन्मठेपीची शिक्षा झालेला पुण्याचा एक ब्राह्मण कैदी चक्कीवर काम करीत असलेला मी पाहिला. मीहि पुण्याचाच आहे असें त्याला कळल्यावर त्यानें मोठ्या उल्हासानें व उत्सुकतेनें मला विचारलें, " टिळक सुटले कांहो ? " वास्तविक टिळक सुटून त्यावेळपर्यंत त्याचे अवतारकृत्यहि संपलें होतें, याची त्या बिचाऱ्याला काय कल्पना ! त्याच्या वनवासात टिळकांच्या मृत्यूची बातमी कळल्यास त्याला फारच वाईट वाटेल म्हणून मी जड अवाजात ' होय सुटले ' एवढेंच मोघम उत्तर देऊन पुढें गेलों ! !

( ३ ) महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांचा काळ झाल्यावर दुःखप्रदर्शनार्थ रेमार्केटमध्ये पुणें शहरवासीयांची लोकमान्यांच्या अध्यक्षतेखालीं जंगी जाहीर सभा भरली होती. सभेंत पास झालेला ठराव अण्णासाहेबांच्या चिरंजीवास कळविण्याकरिता दुसरे दिवशीं टिळक, शिवरामपंत परांजपे, कै. हरिभाऊ आपटे इत्यादिकांची कमिटी त्यांच्या घरीं गेली. जिज्ञासा म्हणून मीहि बरोबर गेलों. ठराव निवेदन केल्यावर टिळक अण्णासाहेबांच्या चिरंजीवास उपदेश करतांना म्हणाले, " तुमचे वडील दिगंतकीर्ति मिळवून गेले. त्यांची आठवण बुजणें शक्य नाहीं. तथापि तुम्ही आपल्या कर्तृत्वानें लोकाना वडिलांचा विसर पाडाल असा आम्हास भरंवसा आहे. मनूनें म्हटलेच आहे कीं:—

> येनास्य पितरो याताः येन याताः पितामहः ।
> तेन यायात्सतां मार्गं तेन गच्छन्न रिष्यते ॥

( ४ ) एकदां टिळकांची लायब्ररी पाहाण्याकरितां आम्ही गायकवाडवाड्यात गेलो होतो. लोकमान्य उघडेच बाहेर माडीच्या कठड्याला टेकून उभे होते. इतक्यात दक्षिण हैद्राबादचे दोन गृहस्थ तेथें आले व ' टिळक महाराजांना '

वंदन करून म्हणाले, " महाराज, आपली सेवा करून येथेच आपणाजवळ राहावें या उद्देशानें आम्ही येथें आलों आहो. कृपा व्हावी." किंचित् हंसून तिरस्कारयुक्त शब्दांत लोकमान्य म्हणाले, " छे छे ! मठ बांधून दहा पांच सेवेकरी बाळगणारा मी कोणी 'बुवा' नाहीं. माझी सेवा करण्यापेक्षां आपल्या देशाची सेवा केल्यास कांहीं उपयोग तरी होईल. जा !" विचारे हिरमुसले तोंड करून गेले !

(५) टिळकांच्या मृत्यूनंतर दु:ख प्रदर्शित करण्याकरिता मुंबईच्या विल्सन कॉलेजांतील विद्यार्थ्यांची प्रि. मॅकेन्झी यांच्या अध्यक्षतेखालीं सभा भरली होती. त्यावेळीं अध्यक्ष या नात्यानें भाषण करीत असतां प्रिन्सिपाल साहेब म्हणाले, " टिळक व मी एकाच बोटीनें विलायतेहून आलों. बोटींत एकदां टिळकांचें The Arctic Home in the Vedas या विषयावर सुश्राव्य व्याख्यान झालें. त्यांची विद्वत्ता व बुद्धिमत्ता पाहून आमच्यांतील सर्व लोक चकित होऊन गेले. आमची तेथें प्रथमच झालेली ओळख ते कधीं विसरले नाहींत. पुढे त्यांच्या प्रेतयात्रेच्या निमित्तानें चौपाटीवर जमलेला तो अति प्रचंड जनसमूह आम्ही मोठ्या कौतुकानें पाहात होतो. त्यावेळीं टिळकांच्या योग्यतेविषयीं माझ्या मनांत चक्क प्रकाश पडला व मला त्यांच्या नावाविषयीं फार आदर वाटूं लागला!"

(६) विल्सन कॉलेज ही मिशनऱ्यांची संस्था असल्यामुळें तेथे दररोज प्रारंभीं बायबलांतील प्रार्थना करण्यांत येते. लोकमान्य शेवटच्या दुखण्याच्या वेळीं अत्यवस्थ आजारी आहेत ही बातमी वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाल्याबरोबर त्या दिवशीं रोजच्या प्रार्थनेत टिळकांना आराम देण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना करावी अशी वर्गांतील एका मुलानें सूचना केली. त्या सूचनेस सर्वांकडून अनुमोदन मिळालें हें सांगावयास नकोच. वर्गांवरील मिशनरी प्रोफेसरांनीं प्रथम या सूचनेकडे मुद्दाम दुर्लक्ष केलें, पण कांहीं केल्या मुलें ऐकेनात. टाळ्या वाजवून, पाय आपटून, निरनिराळे आवाज काढून, वर्गाचें काम चालवणें त्यांनीं अशक्य केलें. रोजच्या प्रार्थनेला उभे राहण्याचें त्यांनीं साफ नाकारलें. प्रोफेसर साहेबांनीं हजेरीचें रजिस्टर वाचण्यास सुरवात केली, पण मुलें नीट उत्तरेंच देईनात! साहेब चिडून लालबुंद झाले, त्यांनीं मिशा मिसकारल्या, हातांतील रजिस्टर टेबलावर भिरकाऊन दिलें व मुठी वळल्या! या नृसिंहावताराचा मुलांवर काडीमात्र परिणाम झाला नाहीं. शेवटीं एका मुलाचें नांव टिपून घेऊन त्याला दंड करण्याची धमकी घालण्यांत आली. इतक्यांत वर्ग संपल्याची घंटा झाली. प्रोफेसर पाय आपटीत व ओठ चावीत बाहेर पडले. मुलांनीं 'शेम' 'शेम' करून त्यांना निरोप दिला. नंतर कांहीं वेळानें सदर प्रोफेसराशीं माझें खालीलप्रमाणें इंग्रजींत भाषण झालें.

" टिळकांविषयीं प्रार्थना करण्याचें आपण कां नाकारलें, हें मला समजत नाहीं. असल्या प्रार्थनेवर आपला विश्वास आहे ना ? "

साहेब ' होय ' किंवा ' नाहीं ' यांपैकीं निश्चित कांहींच उत्तर देईनात.

" लढाई सुरू असतांना दोस्त राष्ट्रांना जय मिळावा म्हणून आमच्याकडून प्रार्थना करविलेली आपणास माहित असेलच. "

साहेब जागे झाले व म्हणाले, " प्रार्थनेंत सामर्थ्य असतें यांत शंका नाहीं. पण कॉलेजांत सर्वांनीं सामुदायिक प्रार्थना करण्याचा हट्ट धरण्यापेक्षां प्रत्येकानें व्यक्तिशः ती घरीं केल्यास काय बिघडेल ? "

" ठीक आहे. मग कॉलेजमध्यें रोज केल्या जाणाऱ्या प्रार्थनेला हा युक्तिवाद आपण का लावीत नाहीं ? आम्ही दररोज घरीं व्यक्तिशः प्रार्थना करीत असतां ती पुन्हां कॉलेजात एकत्र कां करून घेण्यात येते ? "

बाजू अंगावर येते हें पाहून आंगपलट करून प्रोफेसर जरा मृदु स्वरांत म्हणाले, " टिळक खरोखरच आजारी आहेत हें मला नव्हतें ठाऊक ! "

त्यांना तावडतोब वर्तमानपत्र दाखविण्यांत आलें. आणखी मऊ होऊन ते म्हणाले, " प्रार्थनेंत टिळकांचा उल्लेख असावा असें तुम्ही मला वर्गांत येण्यापूर्वीं आगाऊ कां सुचविलें नाहीं ? "

" आम्हाला तशी आवश्यकता वाटली नाहीं. पण परवानगी नाकारण्याचें एवढेंच कारण असेल तर आम्ही आजच आपणास सूचना देऊन ठेवतों कीं, उद्यांच्या प्रार्थनेंत टिळकांचा उल्लेख असावा. कबूल ? "

आतां मात्र सर्वच्या सर्व धोंडे गळ्यांत आले! विनतक्रार कबुली देण्याखेरीज प्रोफेसरांना गत्यंतरच उरलें नाहीं.

" कबुली असायला हरकत नाहीं. पण ? "

" पण कशाला पुन्हां ? "

" टिळकांच्या पुढारीपणाविषयीं कांहींना शंका आहे. "

" असेल. त्यांच्याशीं आपणाला काय करायचें आहे ? प्रार्थना करणाऱ्या वर्गांतील मुलांना तरी ते लोकोत्तर पुरुष वाटतातना ? "

" मग असे करूया. प्रार्थनेंत ' टिळक ' असे स्पष्ट शब्द न घालतां आमच्या रिवाजाप्रमाणें ' आमचे एक मोठे पुढारी ' या शब्दांनीं त्यांचा उल्लेख करू. त्यांचा अभिप्रेत अर्थ मुलाना ठाऊक आहेच. "

अखेर ही तडजोड मान्य करण्यांत आली व दुसऱ्या दिवशीं तिची अमलबजावणीहि झाली.

उभ्या वर्षांत त्याच दिवशींची प्रार्थना मनःपूर्वक, शांततेनें व गंभीरपणानें पार पडली असें वाटतें ! !

## वासुदेव वामन भोळे

[ बी. ए., एल्एल्. बी. वकील, अमरावती. ]

( १ ) मी इंग्रजी पहिली दुसरींत असतांना लोकमान्यांनीं उमरावतीस प्रथम भेट दिली. गणेश थिएटरमध्यें त्यांचें राजकीय विषयावर व्याख्यान झालें. व्याख्यान सर्व तऱ्हेनें समजणें त्या वेळीं अर्थात् अशक्यच होतें, पण खालीं दिलेलें वाक्य उच्चारते वेळीं, उग्र झालेला लोकमान्याचा चेहरा, त्यांचा आवेश, समोरील लहानशा वाटोळ्या टेबलावर हात आपटून वाक्य उच्चारणें इत्यादि सर्व गोष्टी आज माझ्या डोळ्यासमोर उभ्या आहेत. तें वाक्य असें. " आम्हाला ( हिंदी लोकांना ) आमच्याच देशांत आज मोकाट सोडलेल्या पोळाप्रमाणेंहि नव्हे तर गोठ्यांतील बैलाप्रमाणें वागवण्यांत येत आहे. " टिळकांच्या आवेशा-मुळे त्यावेळीं माझ्या अंतःकरणांत ज्या भावना 'उसळल्या' त्याच वरील प्रसंग केव्हांहि आठवला कीं उद्भवल्याखेरीज राहत नाहींत. लहान वयामुळें वाक्याचा अर्थ कळला नव्हता. पण जाणतेपणीं त्याची जाणीव अंतःकरणाला जाळल्याशिवाय राहात नाहीं.

( २ ) टिळकांच्याविषयीं अंतःकरणांत गाढ प्रेम व आदर असतां केवळ सरकारी नोकरीपुढें तीं व्यक्त करतां येत नाहींत अशीं पुष्कळ माणसें महाराष्ट्रांत सांपडतील. लखनौ कॉंग्रेसनंतर काढलेल्या स्वराज्याच्या दौऱ्यांत टिळक यवत-माळहून अकोल्यास येणार होते. वाटेंत मूर्तिजापूर जंक्शनवर गाडी बदलावी लागते. लोकमान्यांच्या दर्शनाची अनावर इच्छा पूर्ण करून घेण्याकरतां आम्ही दोनतीन जण त्या वेळीं गेलों होतों. गाडी संध्याकाळीं ६ वाजतां येणार होती. लोकमान्यांकरतां लोकांची विकार गर्दी होते व त्यामुळें पहिल्या व दुसऱ्या वर्गांतील युरोपियन उतारूंना फार त्रास होतो म्हणून प्लॅटफॉर्म तिकिटें द्यावयाचीं नाहींत असे सक्त हुकूम अधिकाऱ्यांनीं सोडले होते. ही अडचण लक्षांत घेऊन तेथील स्टेशन मास्तरास आम्हाला प्लॅटफॉर्मवर कसेंहि करून सोडाच अशी आम्ही विनंति करतांच ते म्हणाले " कंपनीच्या बापाचा मी नोकर नाहीं; ज्यांच्याकरतां हा महात्मा एवढे हाल सोसतो आहे त्या जनतेचे अन्न मी खातों आहें. त्या पुण्यपुरुषाच्या दर्शनापासून जर मी तुम्हांला दूर ठेवलें तर खाल्लया अन्नाला मी कृतघ्न होईन; अगोदर राजीनामा लिहून ठेविला आहे आणि मगच तुम्हाला परवानगी देतों आहें ! ' मास्तरांच्या त्या आवेशांत त्या विभूतिविषयींचें खरें प्रेम साठविलेलें आम्हांला पाहावयास मिळालें.

त्या वेळेस लोकमान्यांबरोबर अकोल्यास जाण्याची माझी इच्छा अनावर झाली व जवळ तिकिटें नसतांहि आम्ही लोकमान्यांच्या डब्यांत घुसलों. गाडी चालू झाल्यावर शेजारच्या डब्यांतील एका युरोपियनानें लोकमान्यांसमोर पडलेल्या

हारांच्या ढिगांतून एक हार मागितला. आम्ही लगेच त्यांतला एक काढून दिला. त्यानें एकदां त्याचा वास घेऊन अत्यंत काळजीपूर्वक तो कोटाच्या आतल्या खिशांत ठेविला. त्याच्या एकंदर वर्तनावरून केवळ वासाकरता त्याने हा हार मागितला नसावा अशी आमची खात्री झाली.

( ३ ) कोणत्या वेळीं कोणती चळवळ हातीं घेतली असतां देशाला खरा फायदा होईल या विषयींचे अचुक धोरण फक्त टिळकांनाच जसें साधत होतें तसेंच हातीं घेतलेलें कार्य तन्मयतेनें व चिकाटीनें पार पाडणें हेंहि फक्त तेच करू जाणें. अकोल्यास कांहीं लोकांनीं गीतेवर प्रवचन देण्याचा त्यांना अत्यंत आग्रह केला. टिळकांनीं सडेतोड उत्तर दिलें, "माझें गीतेवरील प्रवचन माझ्या रहस्यांत दिलें आहे तें वाचा. मी प्रवचनाकरता आलों नाहीं. हा महायुद्धाचा प्रसंग म्हणजे एक पर्वणी आहे. एक वर्षभर स्वराज्याशिवाय दुसऱ्या विषयावर एकहि शब्द या मुखावाटें बाहेर पडणार नाहीं. England's need is India's opportunity." मंडळी चकित होऊन परत गेली. वरील उद्गार जानेवारी १९१७ मधील आहेत; व पुढें सात महिन्यांनींच मॅंटेग्यु साहेबांचा स्वराज्यासंबंधींचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला हें आज सात वर्षांनंतरहि सर्वांनीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे. पुढे दुसरे दिवशीं रा. ब. महाजनींच्या आग्रहामुळें त्यांनीं गीतेवर एक तासभर सुश्राव्य व्याख्यान दिलें ही गोष्ट निराळी.

( ४ ) टिळकांच्या स्मरणशक्तीविषयीं व जुना स्नेह अगत्यपूर्वक कायम ठेवण्याच्या वृत्तिविषयीं कित्येकांना अनुभव आलेले आहेत. वऱ्हाडांतील प्रसिद्ध ज्योतिषी व आमचे मित्र रा. दुर्गे वकील यांचे आजोबा कै. दुर्गेशास्त्री यांचा व टिळकांचा संबंध श्री. दादासाहेब खापर्डे यांचेमुळे आला. टिळक अकोल्यास असतां दुर्गेशास्त्री अत्यवस्थ स्थितींत होते. नेहमींप्रमाणें आम्ही महाजनींच्याकडे गेलो. मी व रा. दुर्गे हळूच जवळ बसलों. आमचेकडे नजर जातांच त्यांनीं चौकशी केली "मी—तो दुर्गेशास्त्रयांचा नातू" असें म्हणत दुर्गे नम्रतेनें व विनयानें पुढें झाले. तेव्हा टिळकांनीं शास्त्रीबुवासंबंधींच्या १०।१२ वर्षांपूर्वीच्या कित्येक गोष्टी सांगितल्या. त्यांत "शास्त्रीबुवा नेहमीं स्वतः स्वयंपाक करीत असत. आम्ही त्यांच्या हातचे चवदार फोडणीचें वरण सिंहगडास खाल्लें आहे" इत्यादि बारीकसारीक गोष्टींचा समावेश होता. शेवटीं आमची कल्पनाहि नसतां संध्याकाळीं व्याख्यानापूर्वी मी त्यांच्या भेटीस येईन असें म्हणाले. लोकमान्यांचें स्वागत कसें करावें याविषयीं रा. दुर्गे यांचे मनाची बरीच तारांबळ उडाली होती. लोकमान्यांची आवडती "सुपारी" फक्त भक्तिभावानें समोर ठेवा असें म्हणून विनोदानें सुचविलें. इतर राजकीय कामाचा व्याप असतानाहि ठरल्या वेळेवर लोकमान्य आले. शास्त्रीबुवा बेशुद्धच होते. तरी जवळ त्यांची स्थिति स्वतः बराच वेळ पाहिली व पथ्यपाणी याविषयीं अत्यंत मार्मिक व तपशीलवार सूचना

करून स्वारी अर्ध्यापाऊण तासानंतर गेली. लोकमान्यांच्या या वर्तनामुळें सर्वांना विशेषतः रा. दुर्गे यांना गहिंवर आल्याशिवाय राहिला नाहीं.

---

## गणेश बळवंत मोडक

[ बी. ए , मालक युनियन एजन्सी, मुंबई ]

( १ ) १८९५ सालीं लोकमान्य हा शब्द प्रचारांत आला होता किंवा नाहीं हें स्मरत नाहीं. परंतु टिळक कौन्सिलचे मेंबर झाले तेव्हां त्यांना ऑनरेबल म्हणण्यांत त्यांच्या अनुयायाना मोठा आनंद वाटे. त्यांची निवडणूक झाल्यावर त्यांना व ना. दाजीसाहेब खरे यांना डेक्कन कालेजांतील विद्यार्थ्यांनीं मानपत्र दिलें व त्याला प्रि. सेल्बी साहेबांनीं संमति दिली होती. सेल्बीसाहेबांच्या मनांत मोठें प्रेम होतें असें नव्हे. कारण मानपत्राच्या दिवशींच साहेबमजकुरांनीं सध्याकाळीं मुद्दाम कॉलेजाकडे येऊन खाजगी रीतीनें दहापंधरा विद्यार्थ्यांशीं संभाषणप्रसग आणून न्या० रानडे यांची स्तुति करतांना टिळकांची प्रच्छन्न निंदा केली.

( २ ) १९०३ सालीं ताईमहाराजाच्या खटल्यासंबंधीं लो० टिळक उमरावतीस आले होते; बरोबर केळकरहि होते. मी आकोल्याहून एक दिवस मुद्दाम भेटण्यास गेलो होतों. टिळकांची साधारणतः आमची एकट्यानें गांठ पडणें कठीणच. परंतु असा योग या खेपेस उमरावतीस एकदां आला. सुमारें अर्धा तास आम्ही बोलत होतों. रानडे व टिळक या दोन व्यक्तींसंबंधीं लोकांचे ग्रह पुष्कळ चमत्कारिक असत व उमरावती त्यावेळीं सुधारकांचें आगर म्हणून मी मुद्दाम गोष्ट काढली. तेव्हा रानडे व उमरावतीकर सुधारक यांच्यांत फारसें साम्य नाहीं असें सांगून त्यांनीं रानड्यांच्या संबधीं फारच आदरयुक्त भाषण केलें. अनेक विषय एकत्र घेऊन त्यांचा परस्पर सुसबद्ध असा विचार करणें व तो लोकांपुढें मांडणें, व अनेक गोष्टींचा अभ्यास करून त्यांपासून पुष्कळ वेळां बिनचूक अनुमानें काढणें हे गुण रानड्यामध्यें फार उच्च दर्जाचे होते असें ते फार आदरानें म्हणाले.

( ३ ) लोकमान्य पंढरपूरच्या १९०६ सालच्या प्रदर्शनास व संमेलनास आले होते. तेव्हां तेथें आगगाडी नव्हती. कुर्डुवाडीपासून पंढरपुरापर्यंतचा ३१ मैलांचा रस्ता लोकांनीं फुलून गेला होता. नदी ओलांडून वाळवंटांत येण्यास सायंकाळ झाला. लोकांनीं गाडीचे घोडे सोडून दिले व चार तास . गांवांतून

मिरवणूक काढली. कार्तिकीचा समय; फुलें, आरत्या, व दुकानांतून पानसुपाऱ्या यांची रस्त्यानें एकच गर्दी केवळ अभुतपूर्व होऊन गेली व देवदर्शन करून घरीं येण्यास ११ वाजले. प्रदर्शन, समेलन वगैरे सर्व व्यवस्थित झालें. प्रदर्शनासाठीं गोपाळराव गोखलेहि आमच्या आमंत्रणावरून मुद्दाम आले होते. तीन दिवस रोज वाळवंटांत लोकमान्यांचीं भाषणें झालीं. लोकमान्याचें भाषण वाळवंटात केल्याशिवाय सोयच नसे. त्या वेळीं वारकरी सम्प्रदायाच्या लोकांचाच भरणा फार. कै० ह० प० विष्णुबुवा जोग यांच्या निरूपणानंतर लोकमान्याचें भाषण होई. निरूपणानंतर लोकमान्यांचें भाषण पहिल्या दिवशीं झालें तेव्हा वारकरी मंडळींत थोडी चलबिचल झाली कीं 'निरूपणासाठीं जमलेल्या भक्तमंडळीपुढें भक्तिव्यतिरिक्त संसारिक भाषण कसें केलें ?' लोकमान्य म्हणूनच कोणी गडबड केली नाहीं. तथापि माझेकडे सूचना येऊन थडकलीच. वसईचे कै० काकासाहेब पाटील व मी लोकमान्याना यासबधीं सुचविलें कारण दुसऱ्या दिवशीं फिरून व्याख्यान होतेंच. लोकमान्य म्हणाले "अः, त्यात हो काय आहे !" दुसरे दिवशींहि विष्णुबुवांचें नामस्मरणावर निरूपण झालें; व नंतर लोकमान्य उठले व सुरुवातीस म्हणालेः—आता बुवांनीं "मामनुस्मर" या भगवद्वचनावर निरूपण केलें, व मी त्याच्याच पुढील पायरी म्हणजे "युध्य च" हें सागण्यास उठलों आहे. येवढ्यावर वारकरी मडळी सतोप पावली व त्यांनीं पुढील सर्व "निरूपण" आस्थेनें ऐकिलें.

(४) रात्रीचे १० वाजल्यानंतर चद्रभागेच्या विस्तृत पटांगणात चांदण्यांत आम्ही दहापधरा असामी बसत असूं. त्यांत लोकमान्य, नानासाहेब देशमुख, बाबासाहेब खरे वगैरे असतच. भाषणें उघड उघड असत. यात बाहेरचा आगतुक कोणी नसे. यावेळीं बगालचे अत्याचार सर्वतोमुखीं असल्यानें या खासगी बैठकीचे वेळीं अत्याचारानें हातीं कांहीं लागणार नाहीं असें लोकमान्य व नानासाहेब दोघेहि तऱ्हेतऱ्हेनें समजाऊन सांगत. मी कोल्हापुरास अटकेंत असतां कोल्हापूरचे प्रसिद्ध फरनाडीस हे या खासगी बैठकीविषयीं खोदून व छद्मेपणानें विचारीत. त्यांना वाटे तेथें कांहीं तरी विशेष गुपीत असावें व तें माझेकडून मिळेल. मला हसूं येई दुसरें काय !

(५) १९०७ सालच्या कार्तिकीस लोकमान्य फिरून पढरपुरीं आले तेव्हां माझे येथेंच उतरले होते. एक प्रसंग मला विशेष आठवतो. ताईमहाराजांच्या खटल्यासंबंधीं गोष्ट निघाली असतां मी म्हणालों कीं, 'या सर्व प्रकरणात अनेक अडचणीचें प्रसग आले तेव्हा प्रत्येक गोष्ट इतक्या खबरदारीनें विचार करून करावी लागत असेल, नाहींतर परस्पर विरोधी गोष्टी घडावयाच्या.' लोकमान्याना संगीताची आवड नव्हती हें प्रसिद्धच आहे. त्यांच्या उपमा व उदाहरणें ही त्या विषयांतील नसत. तथापि वरील प्रश्नास उत्तर देतांना टिळक म्हणाले

कीं "यांत तुम्हाला वाटते तितकी अडचण नाहीं. पेटी वाजवितांना जसा एक सूर धरला म्हणजे त्या सुरांत सर्व चालावयाचें. तसे कोणत्याहि कामांत एकदां तत्त्वविचार ठाम ठरवावा व त्याच्या अनुरोधानें सर्व कामें करावीं. त्याच्या बाहेर आपले कृत्य जाऊं लागलें म्हणजे आपल्याला कळतेंच; तेवढी वेळ संभाळली म्हणजे झालें. मात्र पहिली कळ बरोबर दाबली असली पाहिजे. कोणत्याहि कामीं दिशा एकदां बरोबर ठरविली म्हणजे मुद्याला सोडून वर्तणूक सहसा होत नाहीं." प्रिव्ही कौन्सिलचा निकाल झाल्यावर लोकमान्यांच्या या प्रकरणांतील सर्व संगतवार वर्तणुकीवर प्रकाश पडून जगाची खात्री झालेलीच आहे.

( ६ ) कोल्हापूरच्या तुरुंगांत असतां १९१२ सालीं तेथील पोलिटिकल एजंट ××××× यांनीं मला एकदां गाडी पाठवून बोलावून नेलें. उद्देश काय असेल तो असो, परंतु अघळपघळ गोष्टीहि फार झाल्या. टिळक व गोखले यांच्या विषयींहि पुष्कळ तऱ्हेनें भाषणें काढीत. मीहि स्पष्टच सांगत होतों. मी बोलण्याच्या ओघांत एकदां असे म्हणालो कीं ' लोकमान्यांच्यासंबंधीं इतके वेडेवांकडे चमत्कारिक ग्रह तुम्ही करून घेता ते तुम्ही त्याची एकदां गांठ घेऊन त्यांच्याशी बोलत कां नाहीं ? ते सर्वांनां खुल्या दिलानें भेटतात ' तेव्हां साहेब बहाद्दुर म्हणाले " नकोरे बाबा, मला त्यांना भेटण्याची इच्छा नाहीं. माझे कांहीं स्नेही त्यांना भेटले आहेत व नंतर ते त्यांच्या बाजूनेच बोलू लागले! मी सरकारी माणूस, मला त्यांना भेटणें नको ! "

---

## दत्तोपंत कारखानीस

[ कै० श्रीमंत भाऊसाहेबमहाराज छत्रपति, यांचे कारभारी, सातारा. ]

( १ ) कै० श्री० आबासाहेब महाराज यांचे इस्टेटीची खासगी व्यवस्था पाहण्यासाठीं कारभारी म्हणून माझी नेमणूक इ. स. १८९७ चे सुमारास करण्यात आली. या नेमणुकीशीं टिळकांचा संबंध नव्हता. माझेपूर्वी टिळक, तात्यासाहेब मुतालीक, बळवंतराव सहस्रबुद्धे वगैरे मंडळी पंच म्हणून होती. कच्चा कारभार मुतालीक वगैरे स्थानिक मंडळी पाहात. व इस्टेटीची व्यवस्था वगैरे बाबतींत कायदेशीर सल्ला देऊन टिळक मदत वगैरे करीत असत. साताऱ्चे घराणें राज्यभ्रष्ट झालें असल्यामुळें टिळकांचा महाराजांशीं संबंध असला तरी त्यांना महाराजांशीं संबंध ठेऊन कांहीं राजकारण त्यांत साधावयाचें होतें अशां-

बलीहि कांहीं गोष्ट नव्हती. टिळकांची देशभक्ती व विद्वत्ता यांची छाप जशी महाराज यांचेवर होती त्याचप्रमाणें आबासाहेबांचे कांहीं अमोलिक गुण यामुळें टिळकांचे मनांतहि महाराजांबद्दल अतीशय आदर वसत होता. हा स्नेह त्यानीं अखेरपर्यंत कायम राखिला. नष्ट झालेल्या स्वराज्याबद्दल जर टिळकानीं जन्मभर श्रम केले तर स्मृतिशेष झालेल्या छत्रपतींच्या दुर्दैवी वंशजांबद्दल टिळकांचे मनात प्रेमादर असला तर त्यांत आश्चर्य काय !

आबासाहेब महाराज असतांना त्यांचे चिरंजीव भाऊसाहेब महाराज यांचे लग्न करावयाचे ठरलें. त्या प्रसगीं या घराण्याशीं सोयरीक जोडण्याचा प्रयत्न चन्या वाईट हेतूनें अनेक प्रकारच्या लोकांनीं केला. परंतु सामान्य व साधारण प्रतीच्या एकाद्या घराण्याशीं हा संबध घडावा हें टिळकांना पसत नव्हतें. एकाद्या थोर राजकुळाशीं सबध घडून लोकांच्या दृष्टीपथांतून मागें पडलेले छत्रपतींचें घराणें उदयाला यावें व ते श्रेष्ठ पदवीस पोचावें अशी टिळकांची फार इच्छा. म्हणून नेपाळ सस्थानचे आदिराजे यांची कन्या भाऊसाहेब महाराजास करावी म्हणून त्यांनीं फार खटपट केली. आदिराजे यांच्या कोणी गगामाता म्हणून गुरु होत्या, त्यांनींहि हा सबध अवश्य घडवून आणावा म्हणून सल्ला दिली. परंतु अखेर अनेक अडचणींमुळें हा सबध घडून आला नाहीं !

( २ ) श्री० आबासाहेब महाराज दुखणाईत होऊन त्यांचें पुण्यास ऑपरेशन करण्यांत आले व त्यानंतर दोनतीन वर्षे आजार काढून त्यांतच अखेर त्यांचा अत झाला. या सर्व अवधींत टिळकांनीं जी कळकळ, काळजी व परिश्रम केले ते खरोखरच त्यांच्या निरपेक्ष स्नेहाला साजतील असेच होते. महाराज मृत्यु पावले त्या क्षणीं टिळक जवळ नव्हते. परंतु हें वर्तमान कळताच टिळकानीं छत्रपतींची मिरवणूक काढण्याचें ठरविलें व पास काढून महाराज मृत्यु पावले तेथें ससून हॉस्पिटल शेजारच्या बगल्यांत टिळक येऊन दाखल झाले. परंतु राणीसाहेब, दोन मुलें यांचे मतानें सातान्यास माहुली क्षेत्रींच अत्यविधि व्हावा असें ठरल्यामुळें पुण्याचे मिरवणुकीचा बेत टिळकांनीं रहित केला. व महाराजांचें शव व इतर मडळी यांची सातान्यास रवानगी करून दिल्यावर नतर टिळक त्या दिवशीं घरीं गेले. याबाबतींत त्यांनीं अतोनात श्रम घेतले हें सांगण्यास नकोच.

---

## सदाशिव महादेव दिवेकर

[ व्यापारी, इतिहाससंशोधक, कल्याण. ]

( १ ) लोकमान्यांचा व माझा प्रथम परिचय गुरुशिष्य या नात्यानें झाला. गणित शिकविण्यात त्यांचा हातखंडा होताच; पण शिवाय इंग्रजी व संस्कृत हे विषयहि ते उत्तम तऱ्हेने शिकवीत. मी शाळेंत असतांना त्यांचा माझ्यावर लोभ होता व ते माझी प्रेमाने विचारपूस करीत असत.

( २ ) काळावरील खटल्याचे वेळीं दे० म० शिवरामपंत उर्फ अण्णासाहेब परांजपे यांचेसाठीं जामीन वगैरेची तजवीज करण्याकरिता बळवंतराव मुंबईस आले. जामिनास लागणारे रकमेचे तजवीजीकरितां लोकमान्य स्पीशी बँकेचे व्यवस्थापक डॉ० चुनीलाल सरैय्या यांजकडे शेअर गहाण ठेवून रक्कम मिळण्याची सोय झाल्यास पहावी म्हणून गेले होते. हे दिवस कलकत्त्याचे स्वदेशी व बहिष्कार यांचे ऐन अमदानीचे होते. कलकत्त्यास जाणारा स्वदेशी कपडा बहुतेक माझे मार्फत जात असे, त्यामुळें मला स्पीशी बँकेमध्ये रोज रकमेकरिता जावें लागे. बळवंतराव वरील कामाकरितां तेथें आले असता त्यांची व माझी गाठ पडली. मी येण्याचें कारण विचारलें तेव्हां परांजपे यांचे जामिनाचे रकमेचे तजविजीकरितां डॉ० चुनीलाल यांची भेट घेण्याकरितां आलों आहें, असें त्यांनीं सांगितलें. तेव्हां 'भेट घेण्याची जरूरी नाहीं; आपणांस लागेल त्या रकमेची तजवीज करीन' असे मी आश्वासन दिलें. 'ठीक आहे. परंतु मी आलों आहें त्या अर्थीं डॉ० यांस भेटून विचारून जातों. तुम्हीं मला चारपांच दिवसांनीं भेटा' असे ते म्हणाले. त्याप्रमाणे मी भेटण्यास गेलो व सांगितले 'उद्या शनिवार आहे. बँक लवकर बंद होते. आमचे मार्केटांतील सर्व रकमेचा भरणा ११ वाजतांच बँकेंत होतो, करितां उद्या रकमेची जरूर असल्यास मला आजच नक्की कळल्यास अडचण पडणार नाहीं.' त्यावर लोकमान्य म्हणाले कीं रा० बाळासाहेब नातू हे रकम घेऊन येत आहेत, तुम्हांस तजवीज करणें नलगे. परंतु शनिवारीं सकाळीं रा० नातू यांची तार आली कीं 'मी बेळगांवकडे जात आहे. रकमेची तजवीज दुसरीकडे पहावी.' तेव्हां रा० बळवंतराव, उमरावतीचे श्री० खापर्डे व रा० वासुकाका जोशी यांसह १२॥ चे सुमारास आकस्मिक माझे पेढीवर आले व तार आल्याची हकीकत सांगून रकम पाहिजे म्हणून सांगितलें. शनिवार असल्यामुळें व उशीरा आल्यामुळे मी थोडा मनांत साशंक झालों. परंतु रकमेचे तजविजीकरितां पेढीवरून खालीं मार्केटांत गेलो. परमेश्वराच्या कृपेनें व लोकमान्यांच्या पुण्याईनें शनिवार होता तरीहि ५।७ मिनिटांतच मोठी रकम हस्तगत झाली ती त्यांचे हवालीं करून त्यांस निरोप दिला. रकम घेतल्यानंतर जाते वेळीं 'व्यापार सुद्धां आपल्या सुशिक्षितांच्या व देशप्रेमी मनुष्यांच्या हातांत

असला म्हणजे मोठमोठीं अटचणीचीं कामेंहि अति स्वल्प वेळांत कशीं होतात हें तुम्हीं मला आज दाखविलेंत' असे उद्गार त्यांनीं काढले.

नंतर त्याच दिवशीं दोन प्रहरीं मी बळवंतरावांस भेटण्याकरिता सरदारगृहांत गेलों व रा० शिवरामपंत जामीनावर सुटले का म्हणून विचारलें. ते म्हणाले "अजून आले नाहींत, तुम्हीं कोर्टांत जाऊन या." मी म्हटलें कीं, आतां माझ्या अंगांत नुस्ता सदरा व टोपी आहे. लागलीच त्यांनीं स्वतःचा आंगरखा, उपरणें व पागोटें दिलें व मी गेलों यावरून लोकमान्यांच्या प्रसंगावधानाचें व मनाच्या मोकळेपणाचें मला कौतुक वाटलें.

( ३ ) बळवंतराव हे ज्या पेशाचा मनुष्य भेटेल त्यास त्याचे पेशाविषयींच प्रश्न विचारीत व बिकट प्रसंगींहि त्यांची वृत्ती नेहमीं शांत व आनंदी असे. याचा अनुभव मी १९०८ सालच्या खटल्याचे वेळीं ते तुरुंगात असताना त्यांना भेटावयास गेलों होतों त्यावेळीं आला. मी गेल्यावर त्यांनीं मला "कसें काय ! बाजारभाव कसा काय आहे ! स्वदेशी नीट चालली आहे ना !" असें विचारलें.

(४) सुरतेस कॉंग्रेस मोडल्यावर सायंकाळीं एकीकडे मवाळांची कन्व्हेन्शन झाली व नतर दुसरीकडे जहालपक्षाची सभा झाली. रा० चिंतामणराव वैद्य व दादासाहेब करंदीकर यांनीं मवाळांच्या क्रीडवर सही दिली. व जहालपक्षाच्या सभेलाहि ते आले. त्यावेळीं सभेला गर्दी झाली होती. झाडावरूनहि लोक बसले होते. त्यापैकीं काहींजण झाडावरून ओरडले कीं, 'चिंतामणराव वैद्य व दादासाहेब हे वटवाघूळ आपल्या सभेंत नकोत.' लोकमान्य लगेच म्हणाले 'ते तर जरूर असावे, because they are connecting links' ( कारण ते उभयपक्षामधील सांधण्याचे दुवे आहेत ) यावेळच्या लोकमान्यांच्या प्रसंगावधानानें व बुद्धिचातुर्यानें सर्वजण थक्क झाले.

( ५ ) राष्ट्रकल्याणाशिवाय त्यांच्या डोक्यांत नेहमीं दुसरा विषयच नसे. लखनौला संयुक्त कॉंग्रेस होणार होती त्या वेळीं मी व चिंतामणराव वैद्य लखनौला गेलो. तेथे गेल्यावर चिंतामणराव आजारी पडले व 'आता मी कल्याणास परत जातों. येथें राहिलों तर मरेन' असें ते म्हणू लागले. तेव्हां मी लोकमान्यांस ही हकीकत सांगितली तेव्हा ते म्हणाले कीं, त्याना जाऊ देऊ नका व त्याना सांगा कीं "अजारी असलांत तरी हरकत नाहीं. मरण यावयाचेंच असलें तर तें कांहीं चुकत नाहीं मरण येणार असलें तरी तुम्हांला कॉंग्रेस स्टेजवर येऊन मेलें पाहिजे. म्हणजे राष्ट्रावरहि त्याचा इष्ट परिणाम होईल व पुढचा जन्महि हिंदुस्थानांतच येऊन या जन्मापेक्षांहि तुमचे हातून उज्ज्वल राष्ट्रकार्य होईल!"

( ६ ) मॉंटेग्यू—चेम्सफर्ड सुधारणांचे वेळीं मॉंटेग्यूसाहेब हिंदुस्थानात आले होते

व दिल्ली येथें हिंदुस्थानांतील सर्व पक्षांच्या पुढाऱ्यांस त्यांनीं मुलाखतीस पाचारिलें होतें. त्या वेळीं लोकमान्यासहि निमंत्रण होतें. लोकमान्यांची दिल्ली येथील सर्व व्यवस्था करण्याचें काम मी आपले अंगावर घेतलें होतें. आमचे मार्केटांतील दोन व्यापाऱ्यांनीं २।२॥ हजार रुपये लोकमान्यांचे आदरातिथ्याकरितां माझे स्वाधीन केले. मी चार दिवस आगाऊ दिल्ली येथें आल्यावर गुजराथी व दक्षिणी वगैरे मंडळींचें एक स्वागतमंडळ स्थापण्यांत आलें. या मंडळानेंहि तेथें ७।८ हजार रुपये गोळा केले व एकंदरींत स्वागताची तयारी चांगली झाली. लोकमान्य दिल्लीस जाण्याकरितां निघाले. त्याच गाडींत सरकारपक्षाचेहि बडे बडे अधिकारी होते. परंतु वाटेंत दर स्टेशनवर लोकाची अतोनात गर्दी होई व लोकमान्यांचा जयजयकार होई व तिन्हाईत पाहाणारास प्रजेचे खरे कैवारी राज्यकर्ते राजे नसून लोकमान्य हेच आहेत असें अगदीं सहाजिकपणें वाटे. असा लोकांचा जयजयकार घेत घेत लोकमान्य दिल्लीस रात्रीं दाखल झाले. लोकमान्य यावयाचे म्हणून दिल्लीमध्यें चार दिवस अगोदर 'पूनेका पेशवा आनेका है; आता है.' म्हणून एकच गडबड उडून गेली होती !

(७) लोकमान्यांना मुळजी जेठा मार्केटमध्यें येण्याचा प्रसंग दोनदां आला होता. स्वराज्याच्या चळवळीकरितां विलायतेस जाण्यापूर्वी लोकमान्यांचा दौरा सर्वत्र निघाला होता. ठिकठिकाणीं मोठमोठ्या रकमांच्या देणग्यांचा त्यांच्यावर वर्षाव होत होता. त्यावेळीं मार्केटमध्येंहि बरीच चळवळ उडाली व लोकमान्यांच्या भेटीची तेथील व्यापारी अपेक्षा करूं लागले. तेव्हां मी शेट नारायणदास पुरुषोत्तमदास यांचे मदतीनें सुमारें ८।१० तासामध्यें रक्कम जमविली व सर्व व्यापारांच्या मोठ्या सभेमध्यें १५,००० रुपयाची थैली शेट नारायणदास यांचे हस्तें त्यांस अर्पण करण्यांत आली.

(८) दुसरा प्रसंग प्रो. जगदीशचंद्र बोस यांना मार्केटांतील व्यापाऱ्यातर्फे मानपत्र अर्पण करण्याच्या समारमाचे वेळीं आला. त्यावेळीं लोकमान्यांनाहि निमंत्रण करण्यांत आले होतें. त्या प्रसगीं डॉ. बोस यांचे वनस्पतींसृष्टींतील सजीवतेसंबंधींच्या शोधांचे स्वरूप सांगून ते म्हणाले कीं, 'व्यापाऱ्यांनाहि प्रो. बोस यांचे शोधापासून पुष्कळ फायदा होण्यासारखा आहे; कारण कोणत्या झाडाला कोणतें खत उपयोगी आहे हाहि व्यापाराचा एक मार्ग आहे.'

---

## वासुदेव नारायण मुतालीक

[ बी. ए. एल्एल्. बी. सरदार, वकील, सातारा. ]

( १ ) सन १९२० च्या प्रारंभीं मी पुण्यास गेलों असतां, लोकमान्यांच्या भेटीस गेलों होतों. त्यावेळीं म० गांधींची असहकारितेची चळवळ उग्र पावत होती व सुशिक्षित वर्गांत त्याबद्दल पुष्कळ खल चालू असे. तेव्हा मी लोकमान्यांना म० गांधींच्या असहकारितेबद्दल आपणास काय वाटतें असा प्रश्न विचारला. मला लागलीच लोकमान्य त्यांच्या खंड्या आवाजात म्हणाले कीं, "आपण बाहेरहि चळवळ केली पाहिजे, व कौन्सिलामध्येंहि शिरून तेथे सरकाराबरोबर दोन हात सारखे चालू ठेवले पाहिजेत. जें मिळालें ते अपुरें म्हणून टाकावयाचें हें तत्त्व मला मुळींच कबूल नाहीं. जें मिळालें आहे त्याचा पूर्ण फायदा घेतला पाहिजे व जें मिळावयाचें राहिलें आहे त्याबद्दल तें मिळेपर्यंत सारखी जोराची चळवळ चालू ठेविली पाहिजे. आम्ही मागितल्याबरोबर संपूर्ण स्वराज्य कोण आमचे स्वाधीन करणार! आपण भागुबाईसारखे कोपऱ्यात बसलों तर आपणास कोण विचारणार!" याप्रमाणें बोलून शेवटीं लोकमान्य म्हणाले "आपण कौन्सिलांत शिरलें पाहिजे व कौन्सिलेंहि काबीज केलीं पाहिजेत."

(२) लोकमान्यांना साधेपणा फार आवडत असे. त्यांचे व माझे वयांमधील अंतर फार व लोकमान्यांची अलौकिक योग्यता ध्यानात ठेवून वडील मनुष्याबरोबर ज्याप्रमाणें आपण आदरानें वागतो त्याप्रमाणे मी वागत असे. प्रथम गाठ पडली म्हणजे लोकमान्यांना खालीं वाकून नम्रपणानें नमस्कार करण्याचा माझा प्रघात असे, व त्यांच्या बरोबर बोलताना त्यांना उद्देशून "तुम्ही" या शब्दाचा प्रयोग न करता "आपण" या शब्दाचा उपयोग मी नेहमीं करीत असे. याशिवाय माझे वर्तनांत काहीं विशेष असल्याचें मला कांहीं समजून आलें नाही. एके दिवशीं सकाळीं मी लोकमान्यांकडे गेलों होतों. तेव्हां त्यांनीं मला सांगितलें कीं, 'तुमच्याजवळ मला Currency व Finance बद्दल फार बोलावेंसें वाटतें. मला आता वेळ मोकळा नाहीं. सायंकाळीं ४ वाजता चहालाच येथें या म्हणजे आपण तासभर स्वस्थपणाने बोलू." त्यानंतर मी त्यांचेकडे दुपारीं ४ वाजता गेलो. व Council Bills व Gold Standard Reserve याबद्दल बोलणें चालू झालें. काहीं वेळाने लोकमान्य मध्येंच स्तब्ध राहिले व मला एकदम म्हणाले "तुम्ही जहागीरदार मंडळी आमची रीतभात व साधेपणा बिघडवितां. आम्ही बोलून चालून मध्यम वर्गांतील माणसें, तेव्हां वाकून नमस्कार करणे, बोलताना मला उद्देशून नेहमीं "आपण" म्हणणें, जहागिरदारी थाटाची अदबी ठेवणं वगैरे तुमच्या गोष्टी आमच्या मध्यम वर्गांत शिरावयास नकोत.

जर सरळ व सावेपणानें माझ्याबरोबर बोलण्याचा करार करीत असाल तर येथें थांबा; नाहीं तर एकदम जा !!"

त्यानंतर लोकमान्यांबरोबर बोलतांना मला किती अडचण झाली असेल याची कल्पना वाचकांनींच करावी.

लोकमान्यांची देशभक्ति कितीहि निःस्सीम असली तरी जे कोणी त्यांना सार्वजनिक गोष्टींमध्यें सल्ला विचारण्यास जात त्यांना ते फार विचारपूर्वक व विचारणाऱ्या मनुष्याची परिस्थिति ध्यानांत घेऊन सल्ला देत असत. महाराष्ट्र व कर्नाटक यांतील इनामदार-जहागीरदार वर्गांची खालावलेली स्थिति व दिवसानुदिवस नष्ट होणारे हक्क यास आळा घालून सदर वर्गाची स्थिति संघशक्तीने सुधारण्याकरितां एक इनामदारांची मध्यवर्ति संस्था काढावी असें माझे मनांत फार घोळत असे. तेव्हां या बाबतींत एकदां लोकमान्यांबरोबर वाटाघाट करण्याकरिता सन १९१३-१४ सालीं मी मुद्दाम त्यांची गाठ घेतली, व एक मध्यवर्ति संस्था स्थापन करण्याचा विचार मी त्यांना कळविला. त्यांनीं माझें म्हणणें ऐकून घेऊन फार समाधान व्यक्त केले, मला सर्व प्रकारे प्रोत्साहन दिलें, व पूर्वीं पुण्यास असलेल्या सरदार्स असोसिएशनची संपूर्ण माहिती सांगितली; परंतु ती संस्था अल्पायुषी झाली तरी तुम्ही आपली संस्था होऊ देऊ नका असे ते म्हणाले. आमच्या नवीन संस्थेचें सर्वसाधारण धोरण काय ठेवावें याबद्दल लोकमान्य म्हणाले. " आम्ही बोलूनचालून भुकेबगाल लोक. तुम्ही aristocracy मधील मंडळींनीं आम्ही ज्याप्रमाणे उघडपणे प्रत्येक बाबतींत सरकारशीं विरोध करतों त्याप्रमाणे वागणें बरोबर नाहीं. आमची परिस्थिति वेगळी व तुमची परिस्थिति वेगळी. तुम्ही जहागीरदार मंडळींनीं महाराष्ट्राची फार मोठी कामगिरी केलेली आहे हें आम्ही विसरतां उपयोगी नाहीं. मराठ्यांचें राज्य तुमच्या मदतीनें स्थापन झालें व तुमच्या मदतीनें चाललें. राज्य जाण्याची जबाबदारी तुमच्यावर खास नाहीं. तुमची स्थिति सुधारावी व तुमच्यांतील दुर्गुण नाहींसे व्हावेत अशी आमची मनापासून इच्छा आहे. तुमच्या जहागिरी तुमच्या घराण्यांतच कायमच्या राहिल्या पाहिजेत. तुम्ही हल्लींची परिस्थिति ओळखली पाहिजे व त्या अनुरोधानें वर्तन ठेवलें पाहिजे. तुम्ही कारणाशिवाय आमचेप्रमाणें उठल्यासुटल्या सरकारबरोबर विरोधाचें धोरण ठेऊ नये. व आपल्या हक्कासबंधाचे बाबतींत सरकारास कधीं भिऊं नये. जनतेचे पुढारीपणाचा मान पूर्वी तुमचा होता, तेव्हां हल्लीं जनतेच्या योग्य आकांक्षेच्या आड तुम्ही आला नाहीं म्हणजे पुरें झालें."

---

## रामचंद्र शंकर राजवाडे

[ वकील, सोलापूर–प्रां० परिषदेच्या स्वयंसेवक मंडळाचे कॅप्टन, सोलापूर. )

( १ ) आमच्या सोलापूरची १९२० सालची २०वी मुंबई प्रांतिक परिषद अनेक कारणांनीं स्मरणीय अशी झाली. व ती तशी यशस्वी रीतीनें पार पडली ती केवळ त्या थोर पुरुषाच्या पुण्याईनेंच अशीच अनुभविक माणसांची श्रद्धा आहे. परंतु परिषद होण्याच्या अगोदर ब्राह्मणेतरांचा कल्पित व अकल्पित विरोध व स्थानिक मंडळीमध्यें कांहीं औदासिन्य कांहीं दिरगाई वगैरेमुळें परिषद जवळ आली तरी तिच्या जोरकस तयारीची दृश्य चिन्हें तर फारशीं दिसत नव्हतीं. अशा वेळीं मद्रासेस का कोठें लोकमान्य जाऊन परत येतांना सोलापूर स्टेशनावर आम्ही बरीच मंडळी त्याना भेटण्यास गेलों होतों. इतर समाजहि खूपच जमला होता. त्यावेळीं येथील हकीकत त्यांच्या कानावर गेली. तेव्हा थोडेसे क्रोधमिश्रित निश्चयानें पण स्मितवदनानें लोकमान्य आम्हाला उद्देशून म्हणतात, " तुम्ही सोलापूरकर खरोखर परिषद पार पाडतां कीं नाहीं तें सांगा. सोलापूरला परिषद भरली म्हणजे ती कांहीं निवळ सोलापूरची नाहीं, ती सर्व मुंबई इलाख्याची आहे. तुमच्या हातून होत नसेल तर आम्ही सोलापुरीं येऊन पार पाडू. " या " कानपिचकींत " परिषदेचें महत्त्व, आमचा कमजोरपणा व त्याकरितां आम्हाला दिलेला धीर, बाहेरील मंडळींचीहि हिंमत व प्रतिपक्षाला ताकीद हीं सर्व गर्भित होतीं हें सांगावयास नकोच; व त्यांचा योग्य परिणामहि झाला याशिवाय सोलापूरच्या परिषदेच्या वेळीं लोकमान्य आले असतांना, व उन्हाकरितां धरलेली छत्री बाजूस काढून लोकमान्यांचें दर्शन घडावें म्हणून लोकानीं आग्रह धरल्यावरून, त्याला मान देऊन ३ तास भर उन्हांतून वरचेवर थांबत व सावकाश जाणारी मिरवणूक काढू देऊन उन्हाचा मारा सहन करणें, त्याच वेळीं ब्राह्मणेतराचा द्वेष लोकमान्यावर कांहींतरी अपायकारक जिन्नस देखील फेंकण्यास प्रवृत्त करील अशी साधारण भीति वाटण्यासारखी परिस्थिति असून तीं त्यांस सुचविली असता. " मग तर एकवार परिक्षाच पाहू " अशा छातीनें तिकडे दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ति. सकाळीं परिषद. दुपारीं परिषद. रात्रौ व्याख्यान व नंतर चर्चा व सोलापूरचा उन्हाळा यात मिळेल ती विश्रांति घेण्याची ६४ वे वर्षीं मनाची व शरीराची तयारी, व याहि मधून जळत्या चितेवर विडी पेटवून घेणारे एकादे खप्पी चर्चाखोर, कोरून कोरून ओळख काढणारे अगर अनओळखी, खऱ्या अगर खोट्या शंका काढून विचारणारे, संशयानें वाद घालीत बसणारे दुरात्मे, याचेहि समाधान करण्याची कळकळ व यशस्वी हातोटी इत्यादि गोष्टी समक्ष पाहिलेले स्वयंसेवक व परिषदेच्या पोट कमिट्यांतून काम करणारे सुशिक्षित, सुखवस्तु प्रतिष्ठित गृहस्थ पुष्कळ आहेत असें असूनहि

टिळकांनीं लोकप्रियता ' सवंग ' मिळविली असें म्हणणारे खमंग व गणंग कमी नाहींत असें नाहीं.

(२) सोलापूरच्या परिषदेंत प्रतिपक्षी ( ब्राह्मणेतर अशिक्षित व सुशिक्षित ) गुंडांनीं मारहाण व दगडफेक केली त्यांत स्वयसेवक व कार्यकर्ते अशा २।४ मंडळीस मार बसला वगैरे गोष्टी ज्यांस समक्ष माहीत होत्या त्यांचे जबाब-' अतिशयोक्तीची अगर खोटा एक शब्द सांगाल तर माझ्या कामास पडाव-वयाचें नाहीं; त्याचें कांहीं माहीत नाहीं म्हणून साक्ष न दिलीत तरी पत्करलें ' अशी ताकीद देऊन त्रयस्थ मंडळीकडून घेऊन, व नतर साक्षीदारांची उलट तपासणी केल्याप्रमाणें जबाब देणाऱ्यांची उलट तपासणी करून मगच तो मजकूर प्रसिद्धीस योग्य असा लोकमान्यांनीं ठरवावयाचा, हा प्रकार प्रस्तुत लेखकानें स्वतः पाहिलेला आहे.

(३) नाशिक परिषदेच्यावेळीं मुख्य ठरावावर देशभक्त बॅ. जयकर हे भाषण करीत होते. त्यावेळीं 'राजकीय पारतंत्र्यरूपी रोगावर कडक औषधयोजना कोणी केल्यास ती क्षम्य नाहीं असें नाहीं' अशा तऱ्हेचें कांहीं बॅ. जयकर यांच्या बोलण्यांत आलें. त्यावेळीं ही औषधयोजना कडक नसावी असें मध्येंच सुचविण्याच्या इराद्यानें मुंबईचे सुप्रसिद्ध मवाळअग्रणी राजमान्य समर्थ हे जवळून ओरडले " But not alchoholic ( remedies ) " भाषण चालूच असता बॅ. जयकरसाहेब उत्तरले " of course not ". पुढें भाषण चालूं होऊन संपलेंहि. अशा भाषणामधील उपटसुंभ प्रश्नोत्तरानें राजेश्री समर्थांनीं आपल्या मनायोग्य कबुली विद्वान तडफदार परंतु राजाकरणांत विन मुरलेल्या बॅ. जयकरसाहेबांकडून काढून घेतली असे लोकमान्यांस वाटलें असावें. कारण त्यानंतर लागलीच त्या ठरावावर बोलण्याची लोकमान्यांची पाळी आल्याबरोबर त्यांनीं मिस्टर समर्थांचा उघड, व बॅरिस्टर साहेबांचा पर्यायानें समाचार घेतला. ते म्हणाले "आमचे जुने मित्र समर्थ यांनीं मध्येंच विचारलेल्या प्रश्नास एकदम उत्तर देताना आमच्या बॅरिस्टर साहेबांची बॅरिष्टरी घसरली खरी. कारण रोग जसा कहारी तसें औषध जालीम. वायु झालेल्या रोग्याचे कानशीलास चांगलें पलिस्तरच मारावे लागते. तेथें दुसरा विचारच नाहीं. "

## शंकर नरहर जोशी

[ मॅनेजर चित्रशाळा पुणें. ]

( १ ) लोकमान्यांची काम करण्याची पद्धत फारच वाखाणण्यासारखी होती. कोणतेंहि काम करण्यास त्यांनीं सुरुवात केली कीं त्यांना दुसरे कांहीं सुचत नसे, व रात्रंदिवस त्याच कामाचा ध्यास त्यांना लागे. गीतारहस्याची प्रथमावृत्ति ज्या वेळीं छापण्यास त्यांनीं सुरुवात केली त्यावेळीं त्यांची काम करण्याची उत्सुकता विशेषच दिसू लागली. पहिला फॉर्म कपोज करण्याच्या वेळीं तर कंपॉझिटर जवळ ते एकसारखें उभें राहून काम करवून घेत होते. पहिलें पृष्ठ कपोज करीत असतांना कंपॉझिटरचे हातून एकदोन वेळ त्यांनीं सांगितल्याप्रमाणें काम न झाल्यामुळे त्यांनीं स्वतःच कपोजिंग स्टिक हातात घेतली व केसींतील टाइप स्वतःच घेऊन ते कपोज करू लागले ! एक फॉर्म झाल्यानंतर त्यांना मग थोडी शांतता आली. तरी पण रोज सकाळीं कंपॉझिटर छापखान्यांत येण्याचें अगोदर लोकमान्य छापखान्यांत हजर होत. एक दोन वेळां तर असें झालें कीं, छापखाना उघडण्याचे अगोदरच लोकमान्य दाराशीं येऊन उभे राहिले. अत्यंत थंडीचे दिवस पण सकाळीं सहा वाजण्याचें पूर्वी ते ओव्हरकोट घालून म्यानेजर अगर इतर कामकरी लोक येण्याचे अगोदर ऑफिसांत येऊन खेपा घालण्यास सुरुवात करीत. त्या वेळीं तर सर्वांस अगदीं लाजल्यासारखें होई !

( २ ) बोअर युद्ध व रुसोजपानी युद्ध सुरू झाल्यानंतर लढाईचे नकाशे दर 'केसरीं'त लेखांमध्येंच द्यावे असें लोकमान्य व खाडीलकर यांनीं मनांत आणलें. त्या वेळीं चित्रशाळेत नवीनच ब्लॉक करण्यास सुरवात केली होती. नवीनच सुरवात, तेव्हां ब्लॉकहि त्याच मानानें तयार होत व उशीरहि लागे. शिवाय, सोमवारचीं वृत्तपत्रें बघून नकाशे कोणते घ्यावचे तें ठरे. सरासरी दुपारीं १ । २ वाजेपर्यंत नकाशे हातांत पडत. चारपांच तासांत ब्लॉक तयार करावयाचे असल्यामुळे फारच घाई होई. पण ब्लॉक करण्यास नकाशे हातांत आल्यापासून १।२ तासांतच लोकमान्यांची स्वारी मागोमाग यावयाची व ब्लॉक तयार होऊन जाईपर्यंत बहुधा उभ्यानेंच एकसारखी त्यांची गर्दी चालावयाची. ब्लॉक करणारे नवीनच, तेव्हां प्रथम प्रथम ब्लॉक चांगले होत नसत व पुसट उठत. तरी पण करणारांस नाउमेद न करतां लोकमान्य जसे होतील तसेच ब्लॉक 'केसरीं'त छापीत व करणारांस त्यांतील दोष समजावून सांगून पुढील खेपेस सुधारून घेत. त्यांच्याच चिकाटीने पुढें लवकरच ब्लॉकहि त्यांचे म्हणण्याप्रमाणें होऊ लागले. पण त्यांची काम करून घेण्याची चिकाटी फारच विलक्षण व घाई तर मनस्वीच !

( ३ ) गीतारहस्याकरितां स्वदेशीच कागद घेण्याचें लोकमान्यांनीं ठरविलें व त्याकरता गाडींतून भवानी पेठेंत, नौरोजी पदमजीच्या बगल्यावर, जाण्याकरितां आम्हीं निघालों. बरोबर बाबा विद्वांस होते बोलतां बोलतां, लोकमान्याच्या प्रकृतीसबधीं बोलणे निघाले. मधुमेहासारख्या भयकर रोगानें त्यांना पछाडले होतें. खाण्याचे पथ्य जरी कडक होते तरी, बोलतां बोलतां ते सहज म्हणाले कीं, " मी आतां ४।५ वर्षांवर जगत नाहीं. मी प्रकृतीची कितीहि काळजी केली व खाण्याचे पथ्य कितीहि कडक सांभाळलें, तरी माझ्या शरीरांतील Vitality ( जीवनशक्ती ) दिवसें दिवस एकसारखी कमी होत आहे; त्याला पथ्य काय करणार ? रोगाने शरीर रोज पोखरत आहे, अशा स्थितींत डागडुजी करून काहीं दिवस ढकलतील. पण हे शरीर आता जास्त दिवस टिकणार नाहीं. " त्याचे हे शब्द ऐकून आमच्या मनाला चरकाच बसला. पण पुढे २।३ वर्षांनीं दुर्दैवाने त्याचेच म्हणणे खरें झाले !

---

## बाळकृष्ण नारायण ऊर्फ बंडोपंत भाजेकर

[ बी. ए. एलएल. बी , कारभारी, संस्थान देवास ]

( १ ) डेक्कन कॉलेज मध्यें १८७९ सालीं मी गेलो. त्या वेळेस, टिळक यांस मीं पहिल्याने पाहिले. मी एफ्. ए. च्या वर्गात होतो व ते, मनोहरपत कायवटे व शारगपाणी एल्एल्. बी च्या अभ्यासाकरितां डेक्कन कॉलेजमध्यें होते. तालमीचा नाद मला थोडासा होता व टिळकाना मजपेक्षा जास्त होता. मजपेक्षा कांहीं वर्षांनीं ते मोठे असल्याकारणानें ते तालमींत येत असत, त्यावेळेस आम्हास थोडें कौतुक व आनंद वाटत असे. त्याना मी कुस्ती खेळतांना कधीं पाहिलें नाहीं. कारण डेक्कन कॉलेजचा विद्यार्थी या नात्याने मीं सहा महिन्येच तेथें होतों. पण दगडी हत्तीवर हात ठेऊन मी दोनदोनशें जोर त्यांना काढतांना पाहिलें आहे. यामुळेच त्यांची प्रकृति शेवटपर्यंत चांगली होती. तरुणपणात कमावलेलें शरीर होतें म्हणून ती टिकली असे मी समजतों.

( २ ) सुमारे १८८० सालात अण्णा किर्लोस्करांची नाटक कपनी मुबईस आली होती. त्या वेळेस कपनींत दक्षिण भागच्या कमिशनरच्या ऑफिसमधील कारकून वगैरे मडळी होती. त्यावेळेस 'केसरी'च्या जाहिराती नाटक सुरू होण्याच्या पूर्वीं स्वतः टिळकांनीं ! वाटल्या त्यावेळेस कांहीं विद्यार्थी लोकांत 'केसरी' आली असें म्हणत. तें ऐकून टिळकांस फार राग येई. 'केसरी' आला असें म्हणण्याचा पुढें प्रघात पडला !

( ३ ) डेक्कन कॉलेजचें संमेलन पहिल्यांदा बरींच वर्षे डेक्कन कॉलेजमध्येंच मे महिन्यांत होत असे. आम्ही पुण्यात राहाणारे डेक्कन कॉलेजचे विद्यार्थी भोजनास व खेळावयास जात असू. रात्रीं कांहीं वर्षे गाणें व नाटकाचे प्रयोगहि होत असत. एका वर्षी बाळा नाटेकर यांचें गायन चाललें होतें. त्यांचा आवाज फार मधुर असे, व किर्लोस्कर नाटक मंडळींत ते सर्वांत मोहक गाणारे होते असे म्हटलें तरी चालेल. डेक्कन कॉलेजच्या हॉलमध्यें ' जातें कीं, मम शकुंतला ' हें उत्तम मधुर जोगीया रागातलें गाणें म्हणत असतां व आम्ही सर्व प्रेक्षकजन तल्लीन झालों असतां 'अहो, टिळक कोठें आहेत ! ' असा प्रश्न निघाला. टिळकाना शोधावयास आम्ही गेलों तर ते सापडले बाहेर हौदापाशीं ! त्याना विचारलें ' अहो तुम्ही आंत कां चलत नाहीं ! ' तेव्हा ते म्हणाले ' मला बुवा गाण्याचा आहे कटाळा.' ' बाळा नाटेकराच्या गाण्याचा सुद्धां कटाळा ?' असें आम्ही विचारलें, तेव्हां 'हो रे हो !' असें ते म्हणाले ! ही गायनकला वगैरे विषयीं अरुची पुढेंहि तशीच होती असें मला वाटतें.

(४) एका गॅदरिंगमध्यें बळवंतरावाचे पार्शी सहाध्यायी काठेवाड कॉलेजातील गणिताचे प्रोफेसर मि. कॉवसजी हे जेवावयाला आले होते डेक्कन कॉलेजच्या उजव्या वुइंगमध्यें उजव्या दालनांत पाट व केळींचीं पानें व त्यावर सर्व पदार्थ वाढलेले होते. एका पृथक रांगेला दोनच पाने मांडलीं होतीं. त्या दोन्ही पानांवर दोघे पार्शी येऊन बसले होते. बळवंतरावानीं हें पाहिलें व एकदम जेथें कमानीखालीं काळू शिपाई घंटा वाजवीत असे तेथून सोळें नेसलेलें असता धांवत धांवत गंधाची सांखळी रुप्याच्या वाटींत गंधानीं भरलेली त्यांनीं आणली. गंधाची वाटी पानापुढें ठेऊन सोंवळ्यांनीं कपाळभर आडवें गंध कॉवसजींना लावलें. कॉवसजी म्हणत होता " अरे हे काय करते " पण त्यानीं गंध लावून घेण्याला हरकत घेतली नाहीं, व त्या दोघाच्या मुद्रेवर इतके प्रेम दिसले व ते इतके आनंदाने हसले कीं, आम्हा सर्वांना हसू आले. खरे प्रेम असलें म्हणजे रिवाजाचे बंध कसे तुटतात हें आम्हांस कळून आलें.

( ५ ) मद्यपान निषेधासबंधीं माझ्या आठवणींत फार नाहीं. (सुमारें १८८१ कीं १८८५ पुरते साल आठवत नाहीं ) डेक्कन कॉलेजमधें विद्यार्थ्यांच्यामध्यें चळवळ करावी असें मनांत आल्यावरून त्यावेळेस मी सल्ला मिळविण्यास न्यू इंग्लिश स्कूलचे उत्पादकांचेकडे गेलों. वासुदेवराव केळकर व आगरकर यानीं ' आमच्याकडे या प्रश्नासबधानीं येऊ नका, बळवंतराव टिळकाच्याकडे जा ' असें सांगितले. त्याचे कारण मला पुढें समजलें. बळवंतरावाकडे गेलों असता, पूर्ण सहानुभूति मिळाली. पुढें पुण्यामध्ये डॉ. मॅन साहेबांनीं स्मॉल हॉलमध्यें चळवळ करण्याकरितां कांहीं कॉलेजचे व इतर लोकाना बोलाविलें होतें. दुकानापुढें जाऊन दारू पिणारांना व पाजणारांना पराङ्मुख करावे असा यावेळचा हेतु होता.

दोन टोळ्या केल्या होत्या. एका पंधरा जणांच्या टोळीचा मुख्य मी होतों व दुसऱ्या टोळीचे मुख्य रेव्हरंड मॅकनिकेल होते. तिसऱ्या दिवशीं बळवंतराव पांच-पन्नास विद्यार्थी घेऊन आले व नानावी पेठ येथें त्यांनीं विशेष आणीबाणीचा प्रसंग आणला असे आणीबाणीचे प्रसंग आणून परिणामांतीं कांहीं फळ नाहीं व दारु पिणाऱ्याला व दारुचा निषेध करणारास एकच शिक्षा होईल असें आम्हांस वाटले. त्याप्रमाणे करव्हलो मॅजिस्ट्रेट साहेबांनीं शिक्षा दिल्या. त्यावेळीं बळवंतराव टिळक, लवाटे व इतर पुष्कळ लोक कोर्टांत हजर असत. एके दिवशीं एक दारु पिऊन झिंगलेल्या माणसास करव्हलोनें एक रुपया दंड केला व लागलीच एका मद्यपान निषेध करणाऱ्या ब्राह्मण उपदेशकासहि एक रुपया दंड केला. दारु पिणाऱ्या गुरेजनास, दोघांमध्यें कांहींच फरक करतां येऊ नये याजबद्दल आम्हांस फार वाईट वाटलें. उपदेशकास जे दंड झाले त्याचा मुरदंड बळवंतरावांच्या पिशवीलाच बसत असे.

( ६ ) नागपूर येथे सोशल कॉन्फरन्स भरली होती. त्याच्या आधीं प्रास्ताविक सभा माधवरावांनीं भरविली होती व निरनिराळ्या ठिकाणांहून आलेल्या रिपोर्टांची सांगड लाऊन माधवरावांचें रिपोर्टवाचन चाललें होतें. एकदम खुर्चीवरून बळवंतराव उठले व ' This is all a tissue of lies and falsehood ' असे आवेशाने ओरडल्यावर प्रेक्षकामध्यें खळबळ उडाली. त्यावेळीं डॉ. भांडारकरहि तेथें होते व वामनराव कोल्हटकरहि तेथें होते. ' Drive him out. kick him out. Tilak is quite right ' अशी उभय पक्षांचे लोकांत गोलंदाजी चालली होती व ती सोशल कॉन्फरन्सची सभा असल्या कारणानें सामाजिक-सुधारणाभगतच तेथे विशेष होते. पांच मिनिटें एवढा मोठा गोगांट झाला कीं, ह्यूम साहेब गडबडीने उठून सभेंत येऊं लागले व ते येत आहेत असें दृष्टीस पडतांच बरीच शांतता डोकावूं लागली. या सर्व शिमग्याचे वर्षावांत दोनच माणसें समुद्रासारखीं शांत राहिलीं. एक माधवराव व दुसरे वामनराव कोल्हटकर. माधवराव मग उठले व म्हणाले कीं, ' मी वाचलेल्या रिपोर्टांत पुष्कळ अतिशयोक्ति आहे असा टिळकांच्या बोलण्याचा भावार्थ होता एवढेंच आपणच घेऊ या. Tissue of lies & falsehoods इकडे आपण लक्ष देऊं नये. बळवंतरावांनीं ही भाषा नसती वापरली तर बरें झाले असते.' या साध्या शब्दांनीं सर्व लोक अगदी शांत झाले.

( ७ ) पुण्यास ॲस्टनसाहेब जज्ज असतांना एक महिनाभर बळवंतरावांची क्रॉस एक्झॅमिनेशन चालली होती. हा सर्व त्यांचा छल आहे असें आम्हां सर्वांना वाटलें. नारायणराव चंदावरकर, बळवंतरावांचे जन्माचे विरोधी, पण तेहि म्हणाले कीं 'असे जर सरकार करील तर सरकारच्या बाजूचा एकहि मनुष्य राहावयाचा नाहीं.' दुसऱ्या एका बळवंतरावांच्या खटल्यासंबधानें

नारायणराव चंदावरकरांनीं सरकारवर बराच ताशेरा झाडला. 'अशा अविचारानें सरकार जर बळवंतरावावर केसेस काढील तर मीहि बळवंतरावाच्या डिफेन्स फंडाला पैसे देईन' असे ते म्हणाले.

---

## वासुदेव विठ्ठल दास्ताने

[ बी. ए. एलूएल्. बी , खानदेशचे असहयोगी-पुढारी, भुसावळ ]

१९१८ सालची हकीकत आहे. त्यावेळीं माझ्या वकीलीच्या व्यवसायाखेरीज इतर सार्वजनिक कामें नेहमीं असत. त्यासाठीं पुष्कळ वेळा मला रात्रीं ११ वाजेपर्यंत लिहीत बसण्याचा प्रसंग येई. आमचे घरासमोरच माझे चांगले स्नेही कै. केळकर राहात असत. त्यांना भजनपूजनाची गोडी असे. गृहस्थ फार लायक व प्रेमळ असत. मी रात्रीं लिहीत असता ते नेहमीं भजन करीत असलेले मला ऐकू येत असे. तें ऐकून माझे मनांत असे विचार येत कीं, काळाचा सद्व्यय माझे स्नेही केळकर करतात कीं, मी करितों ? मी तर स्वतःकरिता लिहीत बसलों नाहीं. जे काम हातीं घेतलें आहे तें सोडून मीहि भजन केल्यास योग्य होईल किंवा कसें ? निर्णय माझे बाजूनें येई. पण निर्णय बरोबर आहे किंवा कसें हें आपोआपच कै. लोकमान्याचें मुखानें ठरलें.

१९१८ सालीं एक तातडीचा दौरा लोकमान्यानीं काढला होता. अशा वयांत त्यांनीं विलक्षण कष्ट करून तरुणास देखील लाजीं पाहावे लागेल अशा घडाडीनें हा दौरा केला. या दौऱ्यात वऱ्हाड संपल्यावर भुसावळला त्यांना ठेऊन घेतलें. भुसावळचा मुक्काम आरामासाठीं असतांहि संध्याकाळीं सभा व 'पर्स' अर्पण करण्याचा समारंभ वगैरे भानगडी होत्याच !

त्या दिवशीं दुपारीं ४ वाजण्याचे सुमारास कै० लोकमान्य आरामखुर्चीवर पडले होते. मंडळी येत जात होती. केळकर तेथें आले, मीहि होतोंच. निरामय वेळ पाहून केळकरांनीं नेमका मला हवा होता तोच प्रश्न त्यांस केला.

केळकरः—इतके परिश्रम करून आज २५।३० वर्षे चाललेली चळवळ, भगवताचें अधिष्ठान नाहीं म्हणून यशस्वी होत नसावी असे नाहीं कां म्हणतां येणार ?

लो०ः—भगवताचें अधिष्ठान तुम्ही कशास म्हणता ?

केळकरः—या चळवळीचे यशासाठीं ईश्वराची पूजाअर्चा किंवा भजन-आराधना काहीं होत आहे कां ? आपणां स्वतःस यात वेळ खर्च करतां

येत नाहीं त्यामुळें भगवताचें अधिष्ठान त्यास मिळत नाहीं असे होत नसेलना ?

लो०:—भजन, पूजन, आराधना याचें स्वरूप तुम्ही समजतां तेवढेंच नाहीं. ही चळवळ हेंहि आराधानेचें स्वरूप आहे. तसे नसते तर अशी चळवळ चालू ठेवतां येणें शक्यच नसते. होमरूल लीग उद्यां ठार झाली किंवा कांहीं घडले तरी मला मुळींच वाईट वाटणार नाहीं. हल्लीं ईश्वराची उत्कृष्ट आराधना मला अशाच प्रकारच्या यानांत निमग्न राहणे ही दिसत आहे. ईश्वरचिंतनात असताना जें सुख, जी शांति असेल त्याचा प्रत्यक्ष अनुभव घ्यावयास मला सांपडत आहे. लोकांचे दृष्टीनें 'स्वराज्य प्राप्ती' हें फळ आहे! मला या आशेचें विलोभन नाहीं. मी अनेक चळवळी हातांत घेतल्या त्याच निरनिराळ्या प्रकारच्या आराधना होत.

केळकरः—मग भजनपूजन करणें, ईश्वरोपासना करणे, हे चूक आहे काय ? चळवळींत सामील न होतां ईश्वराराधना करीत राहाणे यांत पाप आहे काय ?

लो०:—पाप नाहीं. पण अशा प्रकारचा माणूस स्वतःच्या उन्नतीकरितां हे करीत असतो. व त्यापासून फायदाच आहे नाहीं असे नाहीं. पण ही उन्नति झाल्यावर मग त्यास योग्य दृष्टी येते व मग ईश्वराची पूजा करीत राहाणें— अर्थात् आज पूजेचे जें स्वरूप तुम्हास वाटत आहे तेंच करीत राहाणे— येवढीच कायती पूजा असें त्यास वाटेनासे होतें. पूजा अनंत स्वरूपानें करितां येते हें विसरू नका.

मोठमोठे योगी, भगवद्भक्त वगैरेंचे दाखले देऊन केळकरांनीं विचारले. त्यावरहि वरच्या अशयाचीं अशींच निश्चयात्मक मार्मिक व चटकन उत्तरे लोकमान्यांनीं दिलीं व त्यायोगें आमचें पूर्ण समाधान झाले.

---

## श्रीपाद सखाराम कुंभोजकर

[ लोकमान्यांचे स्नेही, बाबामहाराज यांच्या इस्टेटीचे एक ट्रस्टी, मिरज. ]

( १ ) कोल्हापुरास येण्यापूर्वी धंद्याच्या निमित्तानें मी एका लहानशा तालुक्याच्या गावांत होतों. तेथें काहीं निमित्तानें लोकमान्यांचें येणें घडलें. ते सकाळीं आले, ते आमचे घरींच उतरले. अर्थातच मला फार आनंद झाला व शक्य तितके करून अशा माणसाचें आदरातिथ्य होईल तितकें चांगलें प्रकारें व्हावें ह्या प्रयत्नास मी लागलों. इतक्यांत दादांची स्नानाची वेळ झाली. स्नानाचे

पाणी बंगाळांत काढून मी लोकमान्यांस स्नानास बोलाविलें व ते स्नान करूं लागले. तेव्हां आमच्या गांवांत स्वदेशी साबणाची वडी मिळत होती. त्यावल्या त्यांत जी उत्तम मिळाली ती मी पैदा करून दादा स्नान करीत असतां त्यांच्या पुढें केली. ती पाहून लोकमान्य म्हणाले, "अहो, मला साबण कशाला ? ही सर्व सोंगें साहेब लोकांचीं आहेत. व तींच आम्ही वेडू पाहात आहोंत. साहेब लोक आठचार दिवसांनीं केव्हांतरी एकदां स्नान करणार. तेव्हां आंगावर साठ-लेली घाण घासून काढण्यास त्यांना साबण लागतो, तें ठीकच आहे. पण रोज स्नान करून आंगावर भडाभडा पाणी ओतून घेणाऱ्यास त्याची काय जरूरी आहे ? तो आपला साबण ठेवून द्या. विशेष प्रसंगावांचून मी साबण कधीं वापरीत नाहीं व आतां मला तो नको."

अर्थात्च मी मुकाट्यानें साबणाची वडी जियल्या तेथें ठेविली !

( २ ) अजमासें सन १९०४इ० मध्यें लोकमान्यांची स्वारी, ग्रामण्यासंब-धानें श्रीमत् जगद्गुरु श्रीशंकराचार्य यांजकडे संकेश्वरास गेली होती; तिकडून परत पुण्यास जातांना लोकमान्याचा मुक्काम मिरजेस मजकडे जाहला; तो सबंध दिवस लोकांच्या भेटी, भाषणें यांत गेल्यानें लोकमान्यांस विश्रांति बिलकुल मिळाली नाहीं; तशांत किर्लोस्कर नाटक मंडळीचा मुक्काम मिरजेस असल्यानें सदर मंड-ळीचे मॅनेजर श्री० शंकरराव मुजुमदार यांनीं नाटकास येणेबद्दल लोकमान्यांस फारच आग्रहाची विनंति केल्यानें येण्याचें लोकमान्यांनीं कबूल केलें. नाटकास आरंभ रात्रीं १० वाजतां होणार होता; आमचें भोजन साडेआठ वाजतां झालें, नंतर नाटकास केव्हां जावयाचें म्हणून लोकमान्यांनीं मला विचारलें. त्यावर गाडी साडेनऊ वाजतां बोलावली आहे. ती येतांच जाऊं, असें मी सांगि-तलें. पूर्वी झालेली प्रवासाची दगदग व आल्या दिवशींहि भेटी, संभाषणें वगैरे कार्यक्रम सारखे चाललेले, यामुळें विश्रांतीची फार जरूर होती व त्याप्रमाणें लोकमान्य आंथरुणावर पडले. निजताना गाडी येताच मला उठवा, असे सांगून निजले ते लागलीच घोरूंहि लागले. मी गाडीची वाट पाहात राहिलों, परंतु सांगितल्याप्रमाणें वेळेस गाडी आली नाहीं. लोकमान्य मात्र बरोबर साडेनऊ वाजता जागे झाले आणि त्यांनीं 'गाडी आली काय ?' असा मला प्रश्न केला; त्यावर 'अद्यापि आली नाहीं, पंधरा मिनिटात येईल' असें मीं सांगितलें, तें ऐकून पुन्हा स्वस्थ निजले आणि घोरूंहि लागले. बरोबर पंधराच मिनिटांनीं गाडी आली व लोकमान्यांस मी वर्दी देण्यास निघालों, तों त्यानींच मला हांक मारून गाडीची चौकशी केली; हें पाहून मी तर आश्चर्यचकित झालो. इंग्लंडचे माजी प्रसिद्ध मुख्य प्रधान ग्लॅडस्टन साहेब यांचे झोंपेबद्दल मी पत्रांत वाचलेली गोष्ट मला आठवली. ते आपली झोंप आरामखुर्चीवर पडून वाटेल त्यावेळीं सुरू करीत व सांगितल्यावेळीं अचुक जागे होत. झोंपेच्या आरंभीं फक्त हातरुमाल

तोंडावर टाकला कीं झालीच सुरुवात. दोन्ही अलौकिक पुरुष. शरीरावर व मनावर त्यांचा जसा ताबा होता तसाच जिभेवरहि होता.

---

## केशव लक्ष्मण ओगले

[ बी. ए., लोकमान्यांच्या 'ओरायन'चे भाषान्तरकार, सहसंपादक 'लोकमान्य' मुंबई. ]

( १ ) सुमारे वीस वर्षे झालीं असावीत. श्री० ताईमहाराजांच्या दत्तक प्रकरणाला नुकतांच आरंभ झाला होता. तेव्हा आरंभीं कांहीं तडजोड झाली तर पाहावी म्हणून छत्रपतींची भेट घेण्याकरितां लोकमान्य कोल्हापुरास आले होते. त्यावेळीं चारसहा दिवस त्यांचा तेथें मुक्काम होता. याच प्रसंगीं तेथील एका खाजगी पाठशाळेमध्ये पानसुपारीकरितां लोकमान्यांना निमंत्रण केलें होतें. वेळ सकाळची नऊ वाजतांची ठरली होती. लोकमान्यांचें स्वागत व सत्कार शक्य तितक्या उत्तम तऱ्हेनें करावा या उद्देशानें पूर्व दिवसापासूनच शिक्षक आणि विद्यार्थी यांच्यामध्यें तयारीच्या कामीं सारखी अहमहमिका लागली होती. आपल्या हातून कांहीं तरी सेवा घडावी या हेतूने प्रत्येकजण समारंभाच्या तयारी-कडे मोठ्या उल्हासानें झटत होता. प्रस्तुत प्रसंगाला अनुलक्षूनच शाळेच्या प्रमुखाध्यापकांनीं अत्यंत मेहनतीनें यमकप्रासोपमाश्लेषादि शब्दार्थालंकारांनीं रचून सजविलेल्या अशा लोकमान्यांच्या गौरवपर दहापांच नवीन कविताहि तयार केल्या. तसेंच सांप्रत "मुकुंदराय" या नांवाने संस्कृत व प्राकृत या दोनहि भाषांमध्यें उत्तम कवितालेखक म्हणून नांवाजलेले कवि त्यावेळचे त्या शाळेचे विद्यार्थी होते. त्यांनींहि त्या प्रसंगीं कांहीं नवीन कविता लिहिल्या होत्या. दोन प्रहरीं शेरा आणण्याकरितां प्रस्तुत लेखकच त्यांचेकडे गेला असतां तेथे त्यावेळीं अनेक लोक जमले होते व निरनिराळ्या विषयावर चर्चा चालली होती. सदर चर्चा प्रमुखत्वे राजकीय विषयावरच चालली होती. शेरा लिहिण्याकरितां लोकमान्यांनीं शेरेबुक हातीं घेतलें आणि आतां शेरा लिहिणार तोंच कांहीं स्मरण झाल्यासारखे करून प्रस्तुत लेखकांस त्यांनीं असा प्रश्न केला कीं, 'काय हो! सकाळीं ज्या कविता मला दिल्या त्या कोणी केल्या आहेत? सर्व कविता उत्तम आहेत. परंतु त्या एकाच कवीनें केल्या असाव्यात असे कांहीं दिसत नाहीं.' लाग-लीच लोकमान्यांनीं आपल्या जवळचा छापिल कवितेचा कागद काढला. आणि कवितांचें जे मिश्रण झालें होते त्यांतून निरनिराळ्या खुणा करून दोन्ही कवींच्या

# काशीनाथ खंडो गर्दे

[ बी. ए. एल्एल्. बी., सबजज्ज, नागपूर. ]

इ. स. १८८९ मध्यें फर्ग्युसन कालेजांत लोकमान्य गणित विषयाचे प्रोफेसर होते. त्यावेळीं मी P. E. च्या वर्गांतील विद्यार्थी होतों. लोकमान्यांची गणित विषयांतील पारंगतता किती असामान्य प्रकारची होती याचा प्रत्यय आम्हांस त्यावेळीं उत्तम प्रकारें आला. आमचे दीडशे मुलांचे वर्गांत के. पी. लिमये L. C. E., प्रस्तुत लेखक व आणखी इतर तीन असे पांच विद्यार्थी गणित विषयांत विशेष हुषार असे त्यावेळीं गणले जात असत. आम्हीं पांचजणांनीं एकदां लोकमान्यांची गणितविषयक ज्ञानाची परीक्षा पाहण्याचा निश्चय केला व दररोज कॉलेज लायब्ररींतून एक नवीन बीजगणिताचे पुस्तक आणून त्यांतील अत्यंत भानगडीचें व कठीण असें उदाहरण शोधून काढून ते प्रोफेसर साहेबांस सोडविण्यास विनंति करावयाची. ती कोणत्या वेळीं म्हणाल तर प्रोफेसरसाहेबांचा तास संपून ' डायस ' वरून खालीं उतरून ते आपल्या विश्रांतिस्थलाकडे गडबडीनें चालले आहेत अशा ऐनवेळीं त्यांस गांठवयाचे. असा क्रम आम्हीं एकसारखा आठ दिवस चालविला. परंतु चमत्कार असा होई कीं, लोकमान्य तितक्या गडबडींत १।२ मिनिटांतच खोलींत पाय ठेवण्याच्या अगोदर " अंः यांत तुम्हाला एवढे काय कोडें पडलें आहे कोण जाणे ! अमकें अमकें आर्टिकल ( नियम ) लावा म्हणजे झालें " असे म्हणत हंसत हंसत लीलेनें चट्कन् उदाहरण सोडवून चालते होत ! हा आश्चर्यकारक प्रकार पाहून आमची बुद्धि अगदीं गुंग होऊन जाई. व त्यानंतर गुरूची परीक्षा पाहण्याचा हा मूर्खपणाचा नाद आम्ही सोडून दिला, हे सांगणे नकोच ! ' लोकमान्यासारख्या प्रतिभाशाली प्रोफेसरांच्या हाताखालीं आपल्यास शिक्षण मिळालें हें आपलें केवढें भाग्य ! ' असे उद्गार प्रस्तुत लेखक व तत्कालीन सर्व सहाध्यायी अद्यापपर्यंत काढीत आहेत !

---

## विश्वनाथपंत साळवेकर

[ सरदारगृहाचे मालक, मुंबई. ]

(१) सन १८९८ ची हकीकत. आमचे सरदारगृहाची संस्था नुकतीच आठ-रोडवरील टोपीवाल्याचे बंगाल्यांत सुरू केली होती. रा० महाडकर जोशीबुवा आमचे येथें महिनाभर राहिले होते. मजवर त्यांचा फार लोभ होता. पुढें आमचे येथें ते आजारी पडले व त्यांतून ते बरे होतील असें त्यांना स्वतःला वाटत नव्हतें. म्हणून मी त्यांना विचारलें कीं, घरच्या मडळींना बोलावून घेऊं काय ? त्यांनीं उत्तर दिलें कीं घरची मंडळी न आली तरी चालेल, परतु बळवंतरावजींना मात्र तावडतोब बोलावून घ्या. केवढा लोकमान्यावर त्यांचा विश्वास ! ! लोकमान्यांना तार करून बोलाविलें. त्याप्रमाणें ते दुसरे दिवशीं आले. त्यानतर १५ दिवसांनीं रा० महाडकर जोशीबुवांचा अत झाला. त्यांची आम्ही केलेली शुश्रूषा पाहून लोकमान्य मडळींत बसले असतांना थट्टेनें म्हणाले " जोशीबुवाची शुश्रूषा विसु-भाऊंनीं अप्रतिम केली. खरोखर मरावयाचें असेल तर सरदारगृहांत येऊन मरावें !" परमेश्वरी योगायोग असा कीं, लोकमान्यांचेंहि देहावसान त्यांनीं म्हट-ल्याप्रमाणें सरदारगृहांतच झालें ! आमचे हातून त्यांची शेवटची जी अल्प शुश्रूषा झाली त्याचें चीज लोकमान्य बरे झाले असते म्हणजे खरोखर झालें असतें.

(२) लोकमान्य आमचेकडे राहिले असतांना एक दिवस त्यांची प्रकृति नीट नव्हती; तरी सुद्धां नित्यक्रमाप्रमाणें कामकाज चाललेंच होतें. मी त्यांना सहज म्हटलें " आपली प्रकृति आज बरी दिसत नाहीं. आजचा दिवस बाहेर जाऊं नये व विशेष दगदग करू नये. नाहींतर आजारी पडाल " त्यांनीं उत्तर दिलें कीं, " काय सांगू विसुभाऊ, मी अद्याप अठरा अठरा तास काम करतों, सबब मला आजारी पडण्यालासुद्धां फुरसत नाहीं; तर मी आजारी कसा पडेन ! "

(३) लोकमान्य विलायतेहून परत आले त्यावेळीं आम्हीं सरदारगृहातर्फे त्यांना मानपत्र अर्पण केलें. सर्वांच्या आग्रहावरून लोकमान्य चार शब्द बोलले. ते म्हणाले " आजपर्यंत घराचे बाहेर मला बोलण्याचे प्रसग फार आले. परतु घरांत बोलण्याचा हा पहिलाच प्रसग. तरी मला जास्त कांहींच सांगावयाचें नाहीं. सरदारगृह हें माझें घर आहे. यांत आपण सर्व कांहीं समजावें. " वरील त्यांचे उद्गारावरून सरदारगृहाबद्दल त्यांना किती अभिमान वाटत होता व त्यांचे या सस्थेवर किती उत्कट प्रेम होतें हें निदर्शनास येतें.

(४) सन १९०८ सालीं सरदारगृहाची संस्था सिताराम बिल्डिंगमध्यें होती. एके दिवशीं सध्याकाळचे सुमारास एक युरोपियन कॉनस्टेबल वॉरंट घेऊन मज-कडे आला व टिळकांना भेटावयाचें आहे असें म्हणाला. त्याला ऑफिसमध्यें

असण्यास सांगून मी साधारण चौकशी केली. त्याचे चर्येवरून लोकमान्यांवर कांहीं तरी विकट प्रसंग आहे हें मी ताडले. अत्यंत भीतीयुक्त अंतःकरणानें मी लोकमान्यांचे खोलींत गेलों व साहेब आल्याचा मजकूर त्यांना कसाबसा कळविला. लोकमान्य अगदीं शांत व गंभीर मुद्रेनें मला म्हणाले—"विसूभाऊ, त्यांत भिण्याचें अगर घाबरण्याचें कांहींच कारण नाहीं. आम्ही तयारच आहोंत. साहेबाला आंत पाठवून द्या." साहेब येतांच त्यानें वॉरंट लोकमान्यांचे हातांत दिले. लोकमान्यांनीं तें वाचलें व म्हणाले "ठीक आहे, चला." मला सांगितलें कीं, 'आमची डबी तेवढी सुपारीनें भरून द्या.' आंगरखा पागोटें चढविलें, डबी खिशांत ठेविली व स्वारी साहेबाबरोबर जाण्यास निघाली. आम्हां सर्व मंडळींना अत्यंत वाईट वाटलें. परंतु लोकमान्यांची मुद्रा पूर्वीप्रमाणेच शांत व गंभीर अशी पाहून आम्हांला फार आश्चर्य वाटलें.

---

## गोपाळ अनंत ओगले

[ संपादक 'महाराष्ट्र,' नागपूर. ]

( १ ) १९०७ सालच्या सुरत कॉंग्रेसच्या वेळची गोष्ट. रात्रीं बंगालचे पुढारी व श्री० दादासाहेब खापर्डे वगैरे राष्ट्रीय मंडळी एकत्र बसून आपसांत कॉंग्रेसमध्यें आपलें बहुमत कसें होईल त्याचा विचार करीत होतीं. तेथें वाटाघाटींत अशी कल्पना निघाली कीं, मवाळ प्रतिनिधींची संख्या 'राष्ट्रीयां'-पेक्षां फार तर ६।७ शे जास्त असेल; म्हणून जर आपल्या 'राष्ट्रीय' कॅंपांतील सुमारें एक हजार मंडळीस आपण उद्यांच्या उद्यां प्रतिनिधि बनवून दिले तर मवाळांवर आपणांस मात करितां येईल. एक हजार 'राष्ट्रीयांना' प्रतिनिधि बनविण्यास नियमांची विशेष कांहीं अडचण नव्हती. अडचण फक्त एकच. ती ही कीं, एक हजार प्रतिनिधि बनवावयाचे, तर त्यांची 'डेलिगेशन' फी द्यावयास २० हजार रु. रोख पाहिजेत. ते कोठून आणावे ? 'राष्ट्रीय' पक्षाचे लोक म्हणजे पैशाच्या बाबतींत अकिंचन ! मवाळपक्ष मात्र बराच श्रीमंत होता. सर फेरोजशहा यांसारखे नांवाजलेले जुने पुढारी त्या पक्षांत असल्यामुळें ते मोठमोठ्या धनिकांकडून आपल्या वजनाने सार्वजनिक कार्यासाठीं जरूर तो पैसा सहज मिळवू शकत. 'राष्ट्रीय' पुढाऱ्यांना मात्र श्रीमंत धनिकांचा आश्रय बिलकुल नव्हता. म्हणून, दोन हजार 'राष्ट्रीय' प्रतिनिधि दुसरे दिवशीं करून कॉंग्रेसमध्ये बहुमत करावें, अशी कल्पना निघाली खरी, पण त्यासाठीं लागणारी २० हजार रुपयांची

रक्कम कोठून आणावी, ही अडचण मंडळीच्या पुढें दत्त म्हणून उभी राहिलीच. तेव्हां नानासाहेब देशमुख म्हणाले कीं, " एकहजार प्रतिनिधि करावयाचें असेंच ठरलें, तर रकमेसाठीं कांहीं अडावयाचें नाहीं. तारेनें मुंबईहून उद्यांच्या उद्यां रक्कम बोलावून देतां येईल ! मग ती फेडण्याचा विचार मागाहून करूं. "— परंतु ही कल्पना लोकमान्य टिळकांस मान्य झाल्याशिवाय अर्थात्च रकमेची व्यवस्था होणें अशक्य होतें. त्यांनीं संमति दिली, तरच रक्कम मिळणार ! असा विचार सुरू असतां लो. टिळक सहज आतून बाहेर आले. त्यास कोणी तरी ही कल्पना जाऊन सांगितली; व डॉ० नानासाहेब २० हजार रु. मुंबईहून आणावयास तयार आहेत, असेंहि त्यास कळविण्यांत आलें. पण लोकमान्यांनीं एकदम उत्तर दिलें कीं, "युक्ती आहे चांगली ! पण तिचा कांहीं उपयोग नाहीं. पैशाच्या बाबतींत मवाळ पक्षाशीं चढाओढ करण्याची ताकद तुमच्यापाशीं नाहीं. तुम्हीं २० हजार रु. कर्ज काढून एक हजार प्रतिनिधी बनविले, तर ते एका क्षणात ४० हजार रु. येथल्या येथे मिळवून दोन हजार नवे प्रतिनिधि बनवितील ! तुम्ही त्यांच्या पुढे टिकूं शकणार नाहीं ! शिवाय स्वागत मंडळ आज मवाळांच्या हातीं आहे. तुम्हाला हजार प्रतिनिधि करावयाचे, तर २० हजार रु. रोख द्यावे लागतील. त्यांनीं आपलें दोन हजार प्रतिनिधि नोंदावयाचे म्हटलें, तर त्यांस ते सहज नोंदतां येतील. " पैसे आले " म्हटलें म्हणजे झालें ! मागाहून हिशेब कसा जुळवावयाचा तें ते पाहून घेतील ! तुम्हाला आज एकहजार प्रतिनिधि निवडावयाचे, तर माणसें सुद्धा निवडून जमवावीं लागतील. मुंबईपुण्याहून जास्त माणसें आणवावीं लागतील; व त्यांचा खर्चहि तुमच्यावर बसेल. पण मवाळाचे तसें नाहीं. सर्व सुरत शहर त्यांचें आहे. ते भराभर दोन हजार माणसें डेलिगेट नोंदवून घेतील. मग काय कराल ? तुमचे वीस हजार मात्र तुम्ही गमवून बसाल ! शेवटीं, मेजॉरिटी तुमची नाहीं ती नाहींच ! " लो. टिळकांच्या या उत्तरामुळें तरुण मंडळीची खात्री पटून त्यांनीं तो बेत सोडून दिला ! नंतर लोकमान्य म्हणाले—"मला कॉंग्रेसमध्यें आमचे बहुमत व्हावयास हवें आहे. पण, ते मारून मुटकून तात्पुरतें बहुमत नको. आपोआप झालेलें बहुमत पाहिजे. तें ५।४ वर्षांत होईल. तोंपर्यंत थांबावयास मला धीर आहे. आणखी पुष्कळ लोक आमच्या मताचे झाले कीं, कॉंग्रेसमध्यें आमचें बहुमत झालेंच पाहिजे !"—लोकमान्यांना १९०८ सालीं शिक्षा न होऊन ते मंडलेस अडकले न जाते, व मवाळांच्या कन्व्हेन्शन कॉंग्रेसवर राष्ट्रीयपक्ष बहिष्कार न घालतां, तर त्यांची भविष्यवाणी ५।४ वर्षांतच पुरी झाली असती. ते सुटून आल्यावर १९१६ सालीं राष्ट्रीय पक्षाला बरोबर घेऊन लखनौ कॉंग्रेसला गेले; व त्याच वर्षीं राष्ट्रीय पक्षानें कॉंग्रेस काबीज केली !

( २ ) लो. टिळकानीं कांग्रेसमध्यें आपला स्वतंत्र ' राष्ट्रीय ' पक्ष निर्माण

केला; कॉंग्रेसच्या अगोदर दोन दिवस या 'राष्ट्रीय पक्षा'ची स्वतंत्र परिषद बाबू अरविंद घोष यांच्या अध्यक्षतेखालीं भरवून त्या पक्षास संघटित रूप दिले; आणि स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण, या बाबतींतले कलकत्ता कॉंग्रेसचे चार ठराव बदलले जातां कामा नयेत—पूर्वीसारखेच कायम राहिले पाहिजेत—असा राष्ट्रीय पक्षाचा आग्रह त्यांनीं जाहीर केला. तथापि मवाळ पक्षाशीं तडजोड व समेट करण्याची त्यांची खटपट सुरूच होती. बंगालमधील व इतर ठिकाणच्या कांहीं तरुण 'राष्ट्रीयां'ना मवाळांशीं समेट व तडजोड करण्यापेक्षां आपली स्वतंत्र कॉंग्रेस काढणें चांगलें असें वाटत होतें. तत्कालीन 'वंदेमातरम्' पत्रांत 'स्वतंत्र कॉंग्रेस' काढण्याबद्दल जोराच्या सूचना प्रसिद्ध झाल्या होत्या; व खुद्द 'नॅशनॅलिस्ट कान्फरन्स' मध्यें बाबू श्यामसुंदर चक्रवर्ती यांनीं अत्यंत वक्तृत्वपूर्ण व हृदयस्पर्शी भाषण करून 'राष्ट्रीय पक्षानें' भिन्न्या मवाळांचे नादीं न लागतां आपली स्वतःची 'कॉंग्रेस' काढावी, असें जोरदार रीतीने प्रतिपादिलें. त्या भाषणामुळे महाराष्ट्रांतील राष्ट्रीयांस सुद्धा 'स्वतंत्र कॉंग्रेस'ची कल्पना रुचूं लागली होती. परंतु, त्याच सभेंत लोकमान्यांनीं स्पष्ट जाहीर केलें कीं, "मला स्वतंत्र कॉंग्रेस काढावयाची नाहीं. मी याच कॉंग्रेसमध्यें राहून ती हळूहळू आपलीशी करीन! आज आमचें बहुमत नसले तर मवाळांशीं तडजोड करून 'राष्ट्रीय पक्षाने' याच कॉंग्रेसमध्यें राहिले पाहिजे!" "I am after all a compromise–wallah" हें त्यांचें सुप्रसिद्ध वाक्य त्यांनीं याच वेळीं उच्चारले होतें. बाबू अरविंद घोष यांसहि स्वतंत्र कॉंग्रेस काढण्याची कल्पनाच मनापासून पसंत होती. पण, त्यांचा टिळकांच्या शहाणपणावर नितांत विश्वास होता. म्हणून त्यानीं स्पष्ट जाहीर केले कीं, "मला स्वतःला जरी कांहीं वाटत असलें तरी मी लो. टिळक म्हणतील तसेंच करीन. त्यांना सोडून स्वतंत्र कॉंग्रेस काढण्यास मी तयार नाहीं." इतर पुढाऱ्यांचेंहि तसेंच मत पडून 'स्वतंत्र' कॉंग्रेस काढण्याची कल्पना सोडून देण्यांत आली; राष्ट्रीय पक्षाच्या परिषदेंत लो. टिळक हेच आपले प्रमुख पुढारी म्हणून त्यांच्यासंबंधीं पूर्ण विश्वासदर्शक ठराव पास झाला; व टिळक, बाबू अरविंद, खापर्डे वगैरे पुढाऱ्यांनीं मवाळ पक्षाच्या पुढाऱ्यांस भेटून उभय पक्षास मान्य होतील अशा कांहीं अटीवर जमल्यास तडजोड करावी, असा अधिकार राष्ट्रीय पक्षातर्फे त्यांस देण्यांत आला.

या ठरावाप्रमाणें कॉंग्रेस सुरू होण्याच्या दिवशीं सकाळीं बाबू अरविंद, खापर्डे, मोतीलाल घोष; अश्विनीकुमार वगैरे मंडळींस बरोबर घेऊन लो. टिळक मवाळकॅंपांत नेमस्त पुढाऱ्यांस भेटावयास गेले. तेथें कांहीं पुढारी बाहेर गेल्यामुळें त्यांस भेटले नाहींत. सुरेंद्रबाबू भेटले; त्यांस तडजोडीची कल्पना रुचली; व "गोखल्यांशीं बोलून नंतर कळवितों" असें ते म्हणाले. परंतु त्यांच्याकडून पुढें कांहींच उत्तर आलें नाहीं. यावरून गोखलेप्रभृति पुढारी समेटास कबूल नसावेत

असाच तर्क करण्यांत आला. स्वा. म. चे अध्यक्ष श्री. मालवीय यांच्या घरीं टिळक वगैरे मंडळी समेटाचें बोलण्यास गेली होती. पण "आपण देवपूजा करीत आहों. आतां बोलावयाला वेळ नाहीं." असें बेमुर्वतखोर उत्तर त्यानीं आंतूनच पाठविलें. तेव्हां लो. टिळकप्रभृति मंडळी समेटासंबधीं कांहींशीं निराश होऊन परत आपल्या कॅंपांत आली.

तथापि, त्या दिवशीं कॉंग्रेस कॅंपात एका सिंधी प्रतिनिधीचा मृत्यु झाला; व त्यामुळें त्या दिवशीं कॉंग्रेसची बैठक आयते वेळीं बंद ठेवण्यांत आली. अशा प्रकारें सुरवात एक दिवस लांवणीवर पडल्यामुळें पुन्हा समेटाची खटपट करण्याचें ठरलें. लजपतराय, हरकिसनलाल, कै० रा० चुनीलाल सरय्या, वगैरे मंडळींस समेट व्हावा असें वाटत होतें. म्हणून ते आपापलेपरी दोन्ही पक्षास भेटून समेटाची खटपट करीत होते. शेवटीं पुन्हां दुसरे दिवशीं सकाळीं आपण पुन्हां मवाळ पुढाऱ्यांची गांठ घेऊन समेटाचा आणखी एक प्रयत्न करावा असें लोकमान्यानीं ठरविलें.

लो. टिळक, मोतीलाल, बाबू अरविंद, इ. आपले सन्मान्य पुढारी मवाळ पुढाऱ्यांच्या दारीं समेटासाठीं खेटे घालीत असतां ते बेमुर्वतपणें त्याना भेटत सुद्धां नाहींत, श्री. मालवीय यांनीं तर त्यांना देवपूजेची सबब सांगून वाटेस लाविलें, हें राष्ट्रीय पक्षाच्या कॅंपांतील तरुण राष्ट्रीयाना अर्थातच आवडलें नाहीं. मवाळ पुढाऱ्यांस जहालांशीं समेट करावयाचा नाहीं, असें स्पष्ट दिसत होतें. म्हणून त्या दिवशीं रात्रीं आम्ही राहात होतों त्या वाड्यांच्या दिवाणखान्यात बरीच महाराष्ट्रीय तरुण मंडळी जमली; व त्यानीं या समेटाचा प्रश्नाचा पुष्कळ खल केला. या खासगी सभेंत नाव घेण्यासारखा मोठा पुढारी कोणीच नव्हता. सर्वच तरुण व होतकरू मुत्सद्दी होते. ते महाराष्ट्र, मध्यप्रांत, वऱ्हाड, व कर्नाटक येथील मुत्सद्दी तरुण होते. त्यातील पुष्कळ मंडळींचीं नांवें आतां आठवत नाहींत. पण त्यांत पुण्याचे श्री. गणपतराव मराठे, अच्युतराव कोल्हटकर वगैरे मंडळी प्रमुख होती. बराच वेळ चर्चा केल्यावर बहुतेक एकमतानें असें ठरलें कीं, "कॉंग्रेसमध्यें काय होईल ते होवो. दुफळी झाली तरी पत्करली, पण आमच्या लोकमान्यासारख्या पुढाऱ्यांनीं समेटाची भिक्षा मागण्याठीं मवाळ पुढाऱ्यांच्या दारीं खेटे घालणें चांगलें नाहीं. त्याना मवाळ कसपटाप्रमाणें लेखून त्यांची भेटसुद्धां घेत नाहींत. त्याचा उपमर्द करतात. आपल्या पूज्य पुढाऱ्याचा असा उपमर्द झालेला आम्हांस सहन होत नाहीं. म्हणून उद्यां सुप्रभातींच उठून लो० टिळक, बाबू, अरविंद घोष वगैरे मंडळी समेटाच्या प्रयत्नासाठीं निघण्यापूर्वीं त्यांस जाऊन विनंति करावी कीं, 'आपण समेटासाठीं मवाळांच्या दारीं जाऊं नका. आपला तेथें अपमान होईल. तो आम्हांला सहन होणार नाहीं. मवाळांना समेट नको आहे. म्हणून भर कॉंग्रेसमध्यें रीतसर भांडून जो काय

जयापजय होईल तो पत्करला, पण आतां समेटाचा प्रयत्न सोडून द्यावा." हा ठराव झाल्यानंतर ही विनति लोकमान्यांस कळवावयास सकाळींच कोणी जावें याबद्दल प्रश्न निघाला; आणि सर्वानुमतें ते काम माझ्याकडे सोंपविण्यांत आलें!

त्याप्रमाणें मी मोठ्या सकाळींच उठून कोट टोपी घालून जवळच जेथें लो० टिळक राहिले होते, तो बंगला होता, तेथें गेलो. रात्रींस निजावयास उशीर झाल्यामुळें लवकर उठतां आलें नाहीं. म्हणून उशीर होईल या भीतीनें प्रात-र्विधी उरकतांच मी घाईघाईनें तिकडे गेलो. भीति ही कीं, उशीर झाल्यास लोकमान्य निघून जातील व मंडळीची विनंति त्यांस वेळेवर कळणार नाहीं. मी जिना वर चढलों. तोंच लोकमान्य आंगरखा पागोटें घालून व हातांत काठी घेऊन सुपारी खात खात जिन्याच्या टोकाजवळ बाहेर जाण्याच्या तयारीनें दादा-साहेब खापर्डे वगैरे पुढाऱ्यांची वाट पाहात उभे होते. त्यांस पाहून मी हळूंच वर जाऊन उभा राहिलो. नंतर मी विचारलें "आपण कॉंग्रेस कॅंपांत समे-टाच्या खटपटीसाठीं चाललात वाटतें?" लोकमान्य म्हणाले:—"होय, तिक-डेच चाललों आहोत; पण आमच्या दादासाहेबांचा पोषाख वगैरे आटोपला पाहिजेना?"

अशा तऱ्हेनें विषयाला सुरवात होतांच, मी म्हटलें:—"काल रात्रीं आमच्या तेथील हॉलमध्ये बरीच मंडळी जमली होती......त्यांचे असें म्हणणें पडलें कीं, मवाळांना समेट बिमेट कांहीं नको आहे! ते आपली भेट सुद्धा घेत नाहींत. मग आपण तरी पायपीट कशाला करितां?......कॉंग्रेसमध्ये काय होईल ते होईल. आपण मोठ्या उत्सुकतेनें समेटासाठीं जावें—व त्यांनीं बेफिकिरपणें आपली गांठहि घेऊं नये—हा केवढा उन्मत्तपणा! तेव्हां आपण आज समेटाच्या खटपटीस जाऊंच नये, अशी मंडळीची नम्र विनति आपणास कळविण्यांस त्यांनीं मला सांगितलें, म्हणून मी ती कळविण्यास आलो आहें. आपला अपमान झाला तर तो पुष्कळांस सहन होणार नाहीं!"

माझ्या तोंडून हीं वाक्ये पुरीं निघतात न निघतात, इतक्यांत लोकमान्य बरेच रागावून व एकदम उसळून म्हणाले, "मग? समेटाची खटपट करा-वयास जाऊं नको म्हणतां, तर तुमच्या नागपूर-वऱ्हाडकरांच्या मनांत आहे तरी काय? मारामारी कां करावयाची आहे? कीं, डोकीं फोडावयाचीं आहेत? असेल तर, मग समेट नको! तसें ठरवा म्हणावें, मग मी हा सोटा घेऊन तुमच्या पुढें होतो! होऊन जाऊं द्या एकदां!"

हे शब्द बोलतां बोलतां लोकमान्यांचा आवाज रागामुळें उंच वाढला व डोळेहि क्रुद्ध होऊन ते माझेकडे पाहूं लागले! इतकें रागीटपणाचें उत्तर मिळेल अशी माझी अपेक्षा मुळींच नव्हती. एका क्षणांत मी जिन्याच्या टोंड्याजवळ

त्यांच्यापाशीं उभा होतों, तो निरुत्तर होऊन, खिजल्यासारखा होऊन व कांहींसा भिऊन हळूहळू मागें सरकत भिंतीकडे जाऊन उभा राहिलों! लोकमान्य रागानें मजकडे पाहात होते.

अशा स्थितींत एक मिनिट अर्धे मिनिट गेलें. तोंच तो लोकमान्यांचा आवेश कमी झाला; व मुद्रा पुन्हां प्रसन्न होत चालली. ५।४ सेकदांत ते तेथून पुढें आले व मला समजूत घालण्याच्या सौम्य स्वराने म्हणाले, "समेट होवो वा न होवो, आपण खटपट केलीच पाहिजे! माझा अपमान झाला, तरी मला त्याचें कांहींच सुखदुःख वाटणार नाहीं. माझी कार्यावर दृष्टि आहे. माझा अपमान होऊन माझें काम साधत असले, तर मला अपमानाचें कांहींच वाटणार नाहीं! मी कांहीं स्वतःच्या कामासाठीं समेटाची याचना करावयास जात नाहीं. देशाचें काम आहे. या कामीं हजार वेळां माझा अपमान झाला, तरी पत्करला, त्याची मला फिकीर नाहीं; व तुम्हींहि फिकीर करूं नका! अपमान सोसण्यास मीं खंबीर आहें! मवाळांशीं भांडतांना शक्य तितकें ताणूं—पण तुटेपर्यंत ताणण्यांत अर्थ नाहीं. आपलें खरें भांडण सरकारशीं आहे; मवाळांशीं नाहीं. म्हणून त्यांच्याशीं समेट झाला तर बरा!"

लोकमान्यांचे हे शब्द ऐकून त्यांच्या धोरणाच्या शहाणपणाविषयीं माझी एका क्षणांत समजूत पटली व समाधानहि झालें. एक मिनिटापूर्वीच त्यांचे रागीट भाषणावरून मी भिऊन खट्टू झालों होतों, पण, त्यांनीं एका क्षणांत आपला राग बदलून प्रसन्नता धारण केली, आणि माझें शांतवन केलें! लोकमान्य समेटासाठीं बाहेर निघत असतां, मी त्यांस जाऊं नको म्हणून सांगावयास गेलों; त्यामुळें क्षणभर ते संतापून गेले. पण, मी सांगावयास आलों, तों सद्धेतुपूर्वकच आलों होतों, हें लक्षांत येतांच एका क्षणांत त्यांनीं प्रसन्नता धारण केली, व माझी समजूत घातली; तो प्रसंग मी केव्हांहि विसरणार नाहीं!

सकोप दिसती गुरु, क्षणभरीच जें तसलें।
जल ज्वलन संगमें त्यजिन हौत्य तें आपलें॥

या पंतांच्या वचनाची मला आठवण झाली; लोकोत्तर पुरुषांचीं अंतःकरणें 'वज्रादपि कठोराणि, मृदूनि कुसुमादपि' कशीं असतात, याचाहि प्रत्यय आला!

(३) १९१९ च्या नोव्हेंबर अखेरीस लोकमान्य विलायतेहून परत आले त्या दिवशीं रात्रीं सरदारगृहांत वरच्या गच्चीवर लोकमान्य टिळक आराम खुर्चीवर पडले होते; व त्यांस भेटण्यासाठीं आलेली ठिकठिकाणची लेही मंडळी जवळ जमून विलायतेंतली हकीगत त्यांस विचारीत होती. बोलतां बोलतां चिरोल केसची गोष्ट निघाली. मी लोकमान्यांस म्हटलें:—" चिरोलच्या खटल्यांत विल-

यतेस तरी आपणांस न्याय मिळेल, असें आपणास वाटत होतें काय ? आपणास पासपोर्ट नाकारून कोलंबोहून परत पाठविण्यांत आले, तेव्हांच आम्हास वाटलें कीं विलायतेंत सुद्धां हिंदुस्थान सरकारची 'इभ्रत' चिरोलला बचावण्यासाठीं आपल्या आड येणार !"

लोकमान्य टिळक म्हणाले:—"अहो, चिरोलवर मी खटला केला, तो महायुद्ध सुरू झालें म्हणून केला ! विलायतेंतील जज न्याय देतील, या आशेनें केला नाहीं ! परंतु, युद्ध चालू आहे—आणि इंग्रज सरकारला हिंदुस्थानच्या मदतीची जरूरी आहे, तोंपर्यंत धडधडीत अन्याय करून हिंदुस्थानच्या असंतोषांत आणखी भर घालण्याची ब्रिटिश मुत्सद्यांना छाती होणार नाहीं, या अंदाजानेंच मी चिरोलवर फिर्याद केली. हिंदुस्थानांतले जज्ज हिंदुस्थान सरकारच्या अगदींच मुठींतले. त्याच्यापेक्षां विलायतेचे जज्ज थोडे अधिक स्वतंत्र—तेथें हिंदुस्थान सरकारला हस्तें परहस्तें वजन पाडावे लागेल, म्हणून खटला हिंदुस्थानांत न करितां विलायतेंत केला इतकेंच ! हिंदुस्थान सरकार चिरोलचा पक्ष घेऊन उघड उघड त्याला मदत करील, हें मला ठाऊकच होतें. कारण हा खटला दिसावयास चिरोल विरुद्ध असला, तरी वस्तुतः तो सरकारविरुद्धच होता. चिरोलने पुस्तक लिहिले, तें मुंबई सरकारच्या बड्या बड्या गोऱ्या कामदारांनीं दिलेल्या माहितीवरून लिहिलें. तेव्हा चिरोल हरला, तर मुंबई सरकारची फद्फजिती होणार, ती होऊ नये, म्हणून हिंदुस्थान सरकार आटोकाट प्रयत्न करील, हें मला ठाऊक होतें. पण, महायुद्धामुळें हिंदुस्थान सरकारला धडधडीत अन्याय करणें जड जाईल, अशा अंदाजानें मी खटला केला. महायुद्ध सुरू असे तोपर्यंतच त्याचा निकाल लागेल, असा माझा अंदाज होता. पण,...त्यांनीं खटला मुद्दाम युद्ध संपेपर्यंत लांबविला ! आम्ही विलायतेस पोंचून पंधरा दिवस होतात न होतात, तोंच एक दिवस 'आर्मीस्टिस' (युद्धतहकुबी) झाल्याची बातमी आली ! ती ऐकूनच आम्ही गार झालों ! युद्ध तहकुबीची बातमी आली, ती रात्र मी व दादासाहेब करंदीकर यांनीं शर्दीत कुडकुडत आणि चिंतेंत घालविली. मी दादासाहेबांना तेव्हांच म्हटले कीं, आतां खात्री समजा कीं खटला आमच्यावर उलटणार व आमच्या डेप्युटेशनचेहि बारा वाजणार ! 'गरज सरो आणि वैद्य मरो !' अहो युद्ध संपल्यानंतर कोण हिंदुस्थानच्या असंतोषाची पर्वा करितो ? हिंदुस्थान सरकारची इभ्रत मध्यें आडवी पडली, व खटला आमच्या विरुद्ध झाला !"

---

## वामन मल्हार जोशी

[ एम्. ए., माजी सहसंपादक 'मराठा,' प्रोफेसर महिलामहाविद्यालय, हिंगणें. ]

( १ ) ऑफिसमध्यें काय चाललें आहे काय नाहीं हे पाहण्याकरितां एक दिवस टिळक आले असतां त्यांच्या दर्शनाकरतां म्हणून कोणी एक म्हातारासा मनुष्य अस्सल कोंकणी पोषाक करून कोकणांतून आला होता. टिळकांना भेटावयाचें म्हणजे कार्डाबिर्डाची फारशी भानगड नव्हतीच; त्यांतून ते त्यावेळीं ऑफिसमध्यें चार लोकांच्या जाण्यायेण्याच्या मार्गांतच उभे होते, त्यामुळें ' दर्शन ' होण्याला फारशी पचाईत पडली नाहीं. टिळकांना पाहिल्याबरोबर त्या गृहस्थानें त्यांचे पाय धरले व आपले दर्शन झालें, फार आनंद झाला इत्यादि इत्यादि गोष्टी बोलण्यास आरंभ केला. त्याचें तें पाय धरणें टिळकांना आवडलें नाहीं, किंबहुना त्यांच्या मनाला त्यामुळें कष्ट झाले हें मी त्यांच्या चर्येवरून ओळखलें. टिळकांच्या मनात असे चाललें असावें असे मला वाटलें कीं, " हा वृद्ध मनुष्य माझे पाय धरतो आहे हें किती खुळेपणाचें आहे ! पण त्याला हें स्पष्ट सांगून तरी काय उपयोग ? तो उगाच कांहीं तरी बोलत राहावयाचा आणि आपला वेळ मात्र दोनचार मिनिटें अधिक घ्यावयाचा ! त्यापेक्षां त्याच्या गांवची वगैरे चौकशी करून एक दोन मिनिटांत त्याला वाटेला लावले म्हणजे ठीक. पूजा करून घेऊ नये हे खरें, पण या लोकाशीं हुजत घालीत बसण्यांत काय अर्थ आहे ! त्यातला तात्पर्यार्थ ओळखून, युक्तीनें उगाच चढून न जातां आपला मार्ग चोखाळीत जावा हें उत्तम. " टिळकांनीं अर्थात् त्या मनुष्याच्या गांवाची, तेथील हवापाण्याची वगैरे चौकशी करून लवकरच—एका मिनिटातच असेल—त्याला संतुष्ट करून वाटेला लावले. व ते स्वतः आपल्या कामाला गेले.

( २ ) एक दिवस दुपारीं ऑफिसमध्येंच पण आम्हीं दोघेजण रस्त्यावरील खिडक्याशीं उभे राहून बोलत असतां ' पिकेटिंग ' चा प्रश्न निघाला. टिळकांनीं मला विचारलें कीं, "दारूचें ज्याला व्यसन लागले तो मनुष्य दारू महाग केली असतां तेवढ्यानें आपलें व्यसन सोडील असें तुम्हांला वाटतें का ? " मी म्हटलें, " नाहीं; दारूबाजाला दारू जोपर्यंत मिळते आहे तोपर्यंत त्याचें व्यसन सुटणें शक्य नाहीं. " " माझेंहि असेंच मत आहे. " असे टिळक म्हणाले. " दारूबाजी बंद करावयाची असेल तर दारू मिळणें अशक्य होईल असें केलें पाहिजे. " " पण सरकार दारू मिळणें अशक्य होईल असें कधीं करील असें मला वाटत नाहीं, आणि म्हणून हा प्रश्न लवकर सुटेलसें दिसत नाहीं. " असे मी म्हणालो. " असें निराश होऊन कसें चालेल ? " असें टिळक म्हणाले.

मी म्हणालों "पण हा मार्ग धोक्याचा आहे; कारण प्रथमारंभीं जरी तो गैरसनदशीर किंवा गैरकायदेशीर नसला तरी कालांतरानें झगडा जोरांत आल्यावर त्याला तसें स्वरूप येण्याचा संभव आहे. शिवाय अशा मार्गासंबधानें सर्व जनतेची खरी-खुरी सहानुभूति पाहिजे. ती जर नसली तर तो यशस्वी होत नाहीं. कांहीं काळ आरडाओरड होते, मग लगेच सामसूम होऊन पुनः पूर्वीसारखा प्रकार सुरू होतो." "लोक म्हणजे कोण ?" टिळक किंचित् खेंकसून म्हणाले. "लोक, लोक म्हणजे काय ? तुम्ही आम्ही, तुमचे व आमचे आप्त, इष्टमित्र व त्यांचे आप्त इष्टमित्र अशाच प्रकारें 'लोक' होतात."

"ते सर्व खरं; पण मला असं वाटतं कीं, माझे आप्त इष्टमित्र जे आहेत, ते कांहीं असल्या मार्गाला अनुकूल नाहींत; फार काय मला माझ्या भोंवती खरेखुरे अनुकूल असे कोणीहि दिसत नाहींत." टिळक म्हणाले, "खरेखुरे म्हणजे काय ?" मी म्हणालों, 'खरेखुरे म्हणजे खरी श्रद्धा असलेले, संकटांना न डगमगणारे, चिकाटी असलेले." "असे किती लोक तुम्हाला दाखविले म्हणजे तुम्ही अनुकूल व्हाल ?" असें टिळकांनीं विचारलें. "शंभर दाखविलेत तर मी एकशेएकावा आहे असें समजा" असें मी उत्तर दिलें. टिळक म्हणाले, "बरें, शंभर नाहीं मिळाले तर ?" मी म्हणालों "तर मी अनुकूल नाहीं." टिळक म्हणाले, "मी आज कांहीं तुम्ही म्हणतां तसे खरेखुरे १०० लोक दाखवूं शकणार नाहीं, पण असे शंभर लोक गोळा करायला नको का ? आजपासूनच आपण या कामाला लागू या. मी पहिला, तुम्हीं दुसरे होतां का ? शंभर लोक जमल्यावर कामाला लागूं. आणि त्या वेळेस देखील सगळ्यांच्यापुढें मी होईन. काय धोका असेल तो पहिल्यानें मला बाधा करील, मागून इतरांना. आजपासून मी अशी शंभर मंडळी मिळतात का नाहीं हे पाहूं लागतो. मी पहिला ठरलोच; तुम्ही दुसरे होतांना ?......कां, बोलत कां नाहीं ?......विचार करा... शंभर मिळाल्यावरच काम करावयाचें. आतां नुसतें नांव द्यावयाचें. काय ? शंभर मिळाल्यावर एकशेएकावे होण्याला देखील इतका विचार ?......"
—यानंतर मी कितीवेळ किंवा किती दिवस विचार केला व काय उत्तर दिलें हे माझ्या मनाची पारख करणाऱ्यालाच महत्त्वाचें वाटेल. पण ही पारख करण्याची इच्छा असणारा एकादा दुसराच हरीचा लाल भेटण्याचा संभव आहे, म्हणून ते न सांगतां टिळकांविषयीं जें महत्त्वाचें मला वाटलें तें सांगून मी ही आठवण संपवितों.

---

## खंडो कृष्ण ऊर्फ बाबा गर्दे

[ लोकमान्यांचे स्नेही, वेदान्ताभ्यासी, अमळनेर. ]

(१) लोकमान्य मागें एके प्रसंगीं बेळगाव–धारवाडकडे दौरा करीत असतां, आम्हीं त्यांस आमचे गांवचे म्हणजे गुर्लासूर येथील श्री चिदंबराचे वार्षिक उत्सवास येण्याविषयीं आग्रहाची विनति केल्यावरून ते तेथें आले होते. तेथें आमचे वाड्याचे शेजारीं किर्लोस्कराचे वाड्यांत ते उतरले होते. त्याच दिवशीं उत्सवाचे अधिकाऱ्यांनीं मंडाराचे प्रसादाकरितां त्यांस निमंत्रण दिलें. लोकमान्यासारखा पूज्य पाहुणा आपल्या उत्सवसमारंभास आलेला पाहून मालकानें त्यांच्याकरितां मुद्दाम नेमिलेल्या उच्चस्थानीं बसण्यास विनंति केली. पण तसें करणें लोकमान्यांस न आवडल्यामुळें ते सामान्य लोकांच्याच पंक्तींत जाऊन बसले. हा विनय पाहून तेथें भोजनास आलेल्या मंडळीस मोठें कौतुक वाटलें! भोजन झाल्यावर आम्ही उभयतां वेदान्त विषयावर बोलत असतां "बाबा, आम्हाला सध्या हा तुमचा पुळपुळीत वेदान्त नको आहे" असें लोकमान्य हसत हंसत म्हणाले. आणखी एका प्रसंगीं केरहार्डी M. P. यांजविषयीं बोलणें चाललें असतां मी लोकमान्यांस असा प्रश्न केला कीं, 'काय हो बळवंतराव, या केरहार्डीसारख्या परद्वीपस्थ गृहस्थाविषयीं आपल्या 'केसरी' पत्रांत अलीकडे बरेंच अनुकूल लेख येत असतात; पण ह्या लोकांचें अन्तःकरणांत हिंदुस्थानाविषयीं खरी कळकळ व सहानुभूति असू शकेल काय?' यावर लोकमान्य म्हणाले "अहो, जोंपर्यंत त्यांचे असे उद्गार निघत आहेत, मग ते कोणत्याहि हेतूनें असोत तोंपर्यंत ते खरे आहेत असें धरून चालण्यास काय हरकत आहे? ज्यावेळीं त्यांत कांहीं चलविचल दिसू लागेच त्यावेळीं त्यांचा नाद सोडून दिला म्हणजे झालें! ये यथा मां प्रपद्यन्ते" या वरून लोकमान्यांचे राजकारण कसें वस्तादगिरीचें होतें याची ओळख पटते.

(२) आमचे बंधु कै० डॉ० गणपतराव गर्दे व लोकमान्य यांचा स्नेहसंबंध व घरोबा पुण्यांतील आबालवृद्धांस मशहूर आहे त्यांचें परस्परावरील प्रेम अत्यंत निरपेक्ष असे. कारण उभयतांची बुद्धिमत्ता व कल्पकता व कोणत्याहि शास्त्रीय विषयाविषयीं अभिरुचि यांमध्यें बरेंच साम्य असल्यामुळें त्यांच्यामध्यें शास्त्रीय विषयावर होत असलेली चर्चा आम्हीं अनेक प्रसंगीं पाहिलेली आहे. असो; गणपतरावांनीं श्रीविष्णुसहस्रनामावर "ईशगुणादर्श" नांवाची एक पद्यात्मक टीका महाराष्ट्रभाषेंत लिहिली आहे; व ती त्यांचे मरणोत्तर त्यांच्या ज्येष्ठ चिरंजीवांनीं प्रसिद्ध केली आहे. हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यापूर्वी त्यास एक छोटीशी प्रस्तावना लिहिण्याबद्दल त्यांनीं लोकमान्यास विनंति केली होती व त्या विनंतीला मान देऊन लोकमान्यांनीं एक आठ पानांची प्रस्तावना तेथल्या तेथें

लिहून दिली ! ह्या प्रस्तावना लेख किती विद्वत्ताप्रचुर, मार्मिक, सरस व चटकदार वठला आहे हें वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं. विशेष आश्चर्य करण्याची गोष्ट हीच कीं, अशा प्रकारचा सर्वांगसुंदर लेख लिहीत असतां ते दुसऱ्याशीं संभाषण करीत होते व तो पुरा करण्यास त्यांस अर्ध्या तासाचाहि अवकाश लागला नाहीं !

( ३ ) एके दिवशीं पुणें मुक्कामीं गणपतराव लोकमान्यांचे घरीं कांहीं कामानिमित्त भेटावयास गेले होते. कांहीं वेळ बैठकींत उभयतांचें संभाषण झाल्यावर गणपतराव घरीं जाण्यास निघाले. तेव्हां त्यांस पोंचविण्यास लोकमान्य चार पावलें जिन्याचे तोंडापर्यंत आले. व गणपतराव खालचे पायरीपर्यंत येत आहेत तोंच पुनः एका शास्त्रीय प्रश्नाविषयीं उभ्याउभ्याच—ऐन जेवायची वेळ झाली असून—सारखा अर्धा तासपर्यंत उभयतांचा वादविवाद चालला !

त्या दिवशीं गणपतराव यांजला घरीं येण्यास बराच उशीर झाल्यामुळें त्यांस त्याचें कारण विचारतां त्यांनीं ही गोष्ट मला सांगितली. ती ऐकून त्या उभयतांचा हा नादिष्टपणा पाहून आम्हास फार कौतुक वाटलें.

---

## श्रीपाद रामचंद्र टिकेकर

[ टिकेकरवाडी, जि० सोलापूर. ]

१९२० सालच्या सांगलीस भरलेल्या ज्योतिषसंमेलनांतच लोकमान्यांशीं त्यांना न कळत असा माझा संबंध आला. ते वेळीं विलिंग्डन कॉलेजमध्यें मी होतों. लोकमान्य सांगलीस येणार ही बातमी कळतांच कॉलेजच्या सर्व विद्यार्थ्यांनीं प्रिन्सिपॉलकडे एक लेखी विनतिअर्ज पाठविला कीं, ' डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे एक आद्य संस्थापक म्हणून लोकमान्यांस कॉलेजमध्यें आणून त्यांस योग्य तो मान देऊन विद्यार्थ्यांस उपयुक्त असा उपदेश त्यांचे तोंडून ऐकण्याचा मिळावा.' बहुतेक सर्व विद्यार्थ्यांच्या सह्या होत्या. त्या अर्जास उत्तर म्हणून प्रिन्सिपॉल माटे यांनीं कॉलेजचें काम संपतांच सभा भरवून लोकमान्य टिळकांस कॉलेजमध्यें कां आणतां येत नाहीं याचीं कारणें सांगण्यास सुरवात केली. पण बोलण्याच्या भरांत कां त्यांची तशी समजूत म्हणून कोण जाणे—त्यांनीं भलतीं-सलतीं विधानें करून नाहीं ते आरोप लोकमान्यांवर लादले. विद्यार्थ्यांस साहजिकच हें न आवडून ' शेम ' ' शेम ' च्या आवाजांत सभा बरखास्त करावी लागली !

एकदरींत कॉलेजच्या अधिकाऱ्यांचा रोख कळून आला. इतक्यांतच संस्थानचे अधिकारीवर्गाने काढलेली नोटीस आम्हां सर्वांस वाचून दाखविण्यात आली. 'कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं अथवा अधिकाऱ्यांनीहि 'पाहुणे' म्हणून येणाऱ्या बड्या लोकांशीं कोणत्याहि तऱ्हेचा संबंध येऊ देऊ नये' अशा अर्थाची ती नोटीस होती!

कॉलेजमध्यें सभा होणें अशक्य झाल्यामुळे सर्व विद्यार्थ्यांनीं श्री० छापखाने याचे घरीं लो० टिळक उतरले होतें तेथें त्यास भेटावयास जाऊन त्यांचा उपदेश ऐकण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें छापखाने याचे घरीं सर्व जमले.

ती सभा नसल्यानें सभेची शिस्तहि गैरहजर होती. आमच्यापैकीं एकानें आमची इच्छा सागतांच लोकमान्यांनीं 'बसूनच बोलतों--काहीं हरकत नाहीं ना?' असा प्रश्न केला. त्यांस "बिलकूल नाहीं" असा जवाब आला. नतर लोकमान्य बोलू लागलेः—

"मी येथें ज्योतिषसमेलनाच्या कामासाठीं आलो हें तुम्हांस ठाऊक असेलच. व्यवहारांत ज्योतिषी याचा अर्थ हात पाहून भविष्य वर्तवणारा असा आहे. आम्हांस ती विद्या--फलज्योतिष अवगत नाहीं. तरी पण व्यावहारिक अर्थानें ज्योतिषी म्हटला कीं, त्यानें आपला हात पाहून भविष्य सांगावें अशीच सर्वांची इच्छा असते. त्याच अपेक्षेनें तुम्हीं आपले हात दाखविण्यास मजकडे आला आहांत!

तुमचें भविष्य मी काहीं सागत नाहीं. पण परिस्थिति बदलेली आहे तिचा फायदा घेऊन आपली उन्नति करुन घेणें, हें केवळ तुमच्या हातीं आहे. स्वदेशप्रेम--देशसेवा वगैरे शब्द घोकत राहिल्यानें काम होतें असें नाहीं किंवा माझ्या सारख्या मदाचा राष्ट्रकार्यांत कांहीं उपयोग होणार नाहीं म्हणून आत्महत्या करून घेण्यात काय हशील आहे? मनाचा कमकुवतपणा मात्र यानें दिसतो. परवांच पुण्यात गोडबोले म्हणून कोणी एक विद्यार्थी होता त्याने आत्महत्या करून घेतली, ती सविस्तर हकीगत तुम्ही वाचलीच असेल. त्यावरून काय शिकायचे? देशाची तरुण पिढी--जिच्यावरच देशाचा पुढील भार असावयाचा--ती जर अशी 'माझ्या हातून काय होणार?' असे निराशेचे उद्गार काढू लागली तर मग काय इंग्लंडमधील तरुण लोक भाड्यानें आणायचे कीं काय? सध्यां तर आहेतच; पण आणखी जास्त आणावे लागतील! हिंदुस्तानला स्वतःचें सरक्षण करण्याला इंग्लंड-आयर्लंड-स्कॉटलंडमधील तरुण भाड्यानें आणावें लागतात, हा दोष तुमचा नव्हे. पण अशा गोडबोल्यासारखें जर तुम्हीं केलेत तर आणखीही दूरदूरच्या देशांतील तरुणांकडून देशकार्यें करवावीं लागतील, कां? तर तुम्हांला मला कांहीं करतां येईल कीं नाहीं याची शंका आहे म्हणून. तुमची शक्ती तुम्हांलाच अजमावतां आली नाहीं तर कोणाला येणार?

मी वेदान्ताचा थोडाबहुत अभ्यास केला आहे. त्यांत एक पुरे निराशावादी व्हा असा उपदेश आहे. पुरे निराशावादी होणें किंवा पूर्ण आशावादी-दोन्हीं-पैकीं कांहींहि व्हा-तुम्हांला त्या गोडबोल्यासारखी आत्महत्या करावी असें कधींहि वाटणार नाहीं.

( ३ ) ज्योतिषसंमेलनाचे स्वयंसेवक होण्यांत आमचा मुख्य हेतु लोकमान्यांचें भाषण ऐकण्याचा होता. भाषणाशिवाय मधून मधून ज्या शंकाकुशंका निघत, त्यांचे निरसन ते किती तावडतोब व समाधानकारक करीत हें त्यावेळेस कळून आलें.

संमेलनाची बैठक चालू असतां व विषयनियामक कमेटींत देखील बरेच मनोरंजक प्रसंग घडून येत. अशा गंमती पाहण्यापेक्षा आम्हांस दुसरी करमणूक कांहींच नसे. कारण विषय कधींहि परिचित नाहीं असा. तरी " बाणवृद्धि, रसक्षय, निःशर, रेवती, योगतारा-झीटापीशियम-चैत्रपक्ष-रैवतपक्ष" अशासारखे कानांला नवीन वाटणारे व चटकन लक्षांत न येणारे शब्दप्रयोग मात्र अजून विसरलों नाहीं.

कोणत्या विषयावर वाद चालला होता हें कळणें कांहीं शक्य नव्हते. मध्येंच एक ज्योतिषी सभासद उठून अर्धवट हिंदींत अध्यक्षांस उद्देशून म्हणाला कीं, " अध्यक्षमहाराज, कृपा करून लोकमान्य टिळकांना आपल्यामध्यें येऊ देऊ नका. ते आल्यावरोबर पाहा कसा एकदम फरक झाला तो. मघाशीं नुकतीच मतें घेतलीं तेव्हां सर्वजण विरुद्ध होते. आतां टिळक आल्यावरोबर लोच तीं मतें चटसारीं फिरलीं." त्यांचें राजकीय वजन याठिकाणीं काय कामाचें ! त्यांना मेहेरबानी करून आपलें काम झाल्यावर या म्हणावें.

यावर सभेंत फार हंशा झाला. त्या बिचाऱ्याला लोकमान्यांच्या राजकीय अगाधेंच ज्ञान होतेसें दिसलें. यावर अध्यक्षांनींहि नुसतें हंसून " बरं " " बरं " असें म्हणून आपलें काम पुढें चालविलें. हा सर्व प्रकार लोकमान्यांच्या देखतच चालू होता. तेहि हसतच होते !

## गोपाळ रामचंद्र वाळेकुंद्रीकर

[ रावबहादुर, पेनशनर डि० डे० कलेक्टर, हल्लीं कारभारी संस्थान रामदुर्ग ]

( १ ) कै० बाबामहाराजांच्या इस्टेटीचे लोकमान्य हे एक ट्रस्टी असल्यामुळें बेळगांव जिल्ह्यांतील बाबामहाराजांच्या इस्टेटीची व्यवस्था पाहण्याचें काम त्यावेळीं त्या जिल्ह्याचे कलेक्टर यांजकडेच होतें. म्हणून त्या बाबतींतील कांहीं कामाकरितां लोकमान्य बेळगांवास सन १९०६ सालीं आले होते. त्यावेळीं आम्ही कलेक्टर साहेबांचे चिटणीस होतों. लोकमान्यांस कलेक्टर साहेबांकडून कांहीं काम करून घ्यावयाचें होतें. म्हणून त्यांनीं आपल्या विश्वासाच्या माणसा-मार्फत आम्हांस वर्दी पाठविली. त्यांचेविषयीं आम्हांस आदर असल्यामुळें, आम्ही त्यांजकडे गेलों व त्यांस पाहिजे होती ती सर्व माहिती त्यांस दिली. त्यांजकडे जाण्यापूर्वी आम्ही कलेक्टर साहेब यांस ही हकीगत मुद्दाम कळविली; व टिळक ही व्यक्ती कशी आहे हें सर्व मशहूर असतांहि व त्यावेळची विशिष्ट परिस्थिति लक्षांत घेतां त्यांस मदत करण्याविषयीं आम्हांस आनंदानें सांगण्यास कलेक्टर साहेब यांचीहि कशी छाती झाली, याचें आम्हांस मोठें आश्चर्य वाटलें.

( २ ) लोकमान्यांच्या या भेटींत ते कलकत्त्याहून त्यावेळीं नुकतेच परत आल्यामुळें, सहज गप्पागोष्टी निघतां निघतां त्यांनीं कलकत्ता येथें बंगाली लोकांनीं त्यांच्याकरितां केलेल्या गंगास्नानाच्या अपूर्व समारंभाची हकीगत सांगितली. त्यांतील मुद्दा इतकाच कीं, ते तेथें स्नान करीत तेथें लोकांची कांहीं विलक्षण गर्दी होई; हेतु हा कीं, त्यांचें सलग दर्शन घडावें व त्यांच्या स्नानोदकानें पावन व्हावें. पण लोकमान्यांस हें अगदीं बिलकूल न पटून ते म्हणाले, "पण काय करावें? भावनाप्रधान लोकांचा बुद्धिभेद करणें हेंहि अयोग्य व असले प्रकार वाढूं देणें हें तर त्याहीपेक्षां अयोग्य. तथापि अशा प्रसंगाचाहि कोणत्या रीतीनें उपयोग करून घ्यावा, व त्यांतून उद्दिष्ट हेतु कसा साधावा, याकडेच लक्ष देऊन वागावें हें मी यापुढें ठरवत असतों."

## रामराव कृष्णराव ऊर्फ बाळासाहेब विंचूरकर

[ फर्स्ट क्लास सरदार पुणें. यांचे वाड्यांत लोकमान्य पुष्कळ दिवस रहात होते. ]

( १ ) एकदां आमच्या जमिनीच्या कॉम्पेनसेशनच्या कामासाठीं बळवंतरावजी मनमाड मुक्कामीं आमचेकडे मुद्दाम आले होते. तेथील काम आटोपून ते औरंगाबादेस जाण्यासाठीं स्टेशनवर गेले. त्यांस पोहोचविण्यास आम्हीहि स्टेशनवर गेलों होतो. त्याच वेळेस गव्हर्नर जनरल लॉर्ड कर्झन यांची स्पेशल ट्रेन तेथें आली होती. त्यावेळचा पोलीसचा बंदोबस्त काय विचारावा. तो पाहून हांसत थट्टेने बळवंतराव म्हणाले, " जर कां या वेळेस कोणी चुकून एखादा खडा नुसत्या गाडीवर टाकला तर एकदम प्रथम हे मला पकडतील ! "

( २ ) बळवंतरावजी जरी पुष्कळ दिवस आमच्या वाड्यांत राहात होते तरी त्यांनीं आपला उपसर्ग आम्हांस कधींहि लागू दिला नाहीं. राजकीय दृष्ट्या आपला संसर्ग दुसऱ्यास बाधूं नये ह्या बाबतींत ते फार जपत. अशाविषयीं त्यांच्या लहानमोठ्या कितीतरी गोष्टी सांगतां येतील. पण नमुन्यकारतां येथें फक्त तीनच सांगतों. ( १ ) ते आमच्या वाड्यांत राहात असतांना एकदां सर्व टिळकाभिमानी मंडळीचा एकत्र फोटो काढावा असें रा० वासुदेवराव जोशी यांनीं ठरविलें. व वाड्यांतील पटांगणांत याबद्दल तयारीहि चालविली. पण हें बळवंतरावांस कळताच त्यांनीं सर्व बेत एकदम रहित केला व वाड्याच्या मालकास व्यर्थ उपद्रव देण्यांत काय अर्थ आहे असेंहि ते जरा रागानें बोलले ! ( २ ) बळवंतरावजी मंडाल्याहून सुटून आल्यावर कांहीं काळ सरकारनें त्यांचेवर विशेष नजर ठेवली होती. यामुळें ते आपण होऊन कोणास भेटण्यास जात नसत. कारण आपल्या भेटीनें दुसऱ्याचे नुकसान होऊं नये हा विचार त्यांचे मनांत जागृत असे. पण त्यांना भेटण्याची आमची व आमच्या कुटुंबाची फार इच्छा आहे असे त्यांस कळतांच मुंबईस सरदारगृहांत आम्ही उभयतां राहात होतों हा प्रसंग साधून दाजी अबाजी खरे यांचे बंगल्यावरून ते सरदारगृहाचे मालक यांस भेटण्याचे निमित्तानें रात्रीं सरदारगृहांत आले, व आम्हां उभयतांस भेटून परत गेले! ( ३ ) विलायतेस जाऊन ते परत आले तेव्हां राजकीय परिस्थिति पुष्कळच बदललेली होती. तथापि आमच्यासारख्या लोकांशीं संबंध ठेवण्याची त्यांची दृष्टी मात्र होती ती तशीच कायम होती. म्हणून त्यावेळींहि त्यांनीं माझी भेट अशाच मार्गानें म्हणजे श्रीयुत् × × × यांच्या बंगल्यावरच घेतली !

( ३ ) मुंबई हायकोर्टांत आमचें कांहीं काम चाललें असतांना हिंदुधर्मशास्त्राचा प्रश्न कोर्टापुढें उत्पन्न झाला. या कामीं आम्हीं कै० सर नारायणराव चंदावरकर यांस वकीलपत्र दिलें होतें. चंदावरकर यांस सदहु केस व मुख्यतः

हिंदुधर्मशास्त्रांतील तो प्रश्न नीट समजावून देण्यास बळवतरावच पाहिजेत असें आमच्या मनानें घेतलें होतें. चदावरकर व टिळक यांचें सख्य किती होतें हें सर्वांस माहीतच आहे. तेव्हां ही गोष्ट घडून कशी आणावी या विचारांत आम्ही होतों. हें बळवतरावजीस कळताच ते आम्हांस म्हणाले, " अहो! इतक्या संकटांत तुम्ही कां पडतात ? मीच चदावरकर यांजकडे जातों म्हणजे झालें. यात मानापमानाचा कांहीं संबंध नाहीं. कोणीकडून आपलें काम झालें म्हणजे झालें." त्याप्रमाणें आम्ही उभयतां त्यांचे घरीं गेलों. पण आश्चर्य हें कीं, एवढ्या मोठ्या माणसास त्या भल्या गृहस्थानें या बसा देखील म्हटलें नाहीं! पुढें सर्व कज्जा टिळकांनीं चदावरकर यास उत्कृष्ट रीतीनें समजावून दिल्यावर त्यांच्या विलक्षण बुद्धीचा प्रभाव चदावरकर यांचे मनावर पडून मग परत येतांना मात्र ते त्यांच्याशीं बोलत त्यांना बाहेर गाडीपर्यंत पोहोंचविण्यास आले!

पुढें सदर्हु कामांत हायकोर्टमध्यें कज्जा चालत असतांना आमच्या उलट बाजूचे वकील—हे उलट बाजूचे वकील म्हणजे बळवतरावांचे जिवलग स्नेही दाजी आबाजी खरे—यांनीं आमचे वकील चदावरकर यांस अडविलें, तेव्हां चदावरकर आम्हास म्हणाले, ' टिळकांची आता पुन्हां गाठ पडली पाहिजे. हे जमेल कीं, नाहीं! ' ' पण यावेळेस टिळक पुण्यास आहेत व तेथें प्लेगनें त्यांचा मुलगा नुकताच वारल्यामुळें ते आतां येथें येऊं शकणार नाहींत. ' असें आम्ही त्यांस सांगितलें. तेव्हां ते म्हणाले, ' तर मग मीच पुण्यास येतों; आपण उभयतां त्यांस जाऊन भेटू. ' त्याप्रमाणें चदावरकर पुण्यास आले. प्लेगमुळें बळवतरावजी फर्ग्युसन कॉलेजकडे झोंपडींत राहात होते, तेथें जाऊन त्यांनीं सदर कज्जासंबधी सर्व माहिती त्यांस पुन्हां विचारली. त्यावेळेस बळवंतराव त्यास म्हणाले, " छेः अजूनहि तुम्हांस ही केस जशी समजावी तशी नीट समजली नाहीं असें मला वाटतें " असें म्हणून त्यांनीं मुद्दाम उलट बाजू घेऊन त्यास प्रश्न केला. पण त्याचें उत्तर चदावरकर यांस देता येईना. तेव्हां बळवंतरावजींनीं त्यास उत्तर काय द्यावयाचें तें सांगितलें. या सर्व प्रकारास तब्बल तीन कलाक लागले. पुढें अखेर हायकोर्टमध्यें कज्जा टिळकांचे म्हणण्याप्रमाणें झाला. त्यावेळीं वकील चदावरकर यांनीं फार उत्तम रीतीनें केस स्टडी करून कोर्टास समजावून दिली याबद्दल जज्जसाहेबांनीं त्याची प्रशंसा केली. परंतु चंदावरकरानीं मात्र मी हें ज्ञान कोणाकडून संपादन केलें याचा एका शब्दानेंहि उल्लेख केला नाहीं. आमच्या उलट बाजूचे वकील दाजीसाहेब खरे हे बळवतरावजींचे जिवश्च स्नेही असल्यामुळें ते एकमेकांशीं आमच्या कज्जासबधानें नेहमीं चर्चा करीत. हे पाहून मी बळवतरावजींना एकदां म्हणालों, ' आपण दाजीसाहेबांशीं मोकळ्या मनानें वाटाघाट करतां, पण आपले मुद्दे त्यांस कळतील मग कसें ? ' तेव्हां ते म्हणाले, " अहो, माझें म्हणणें इतकें कायदेशीर व कुंठित करणारें आहे कीं, ते

कोणालाहि खोडून काढणें शक्य नाहीं. त्याची काळजी तुम्हांस नको. ती जबाबदारी माझ्यावर आहे." हें ऐकून मी गप्प बसलों. या बाबतींत एकदां दाजीसाहेबहि मला म्हणाले, 'माझ्या स्नेहाचा फायदा मला न मिळतां तुमच्यामुळें तो त्या चदावरकरास मिळत आहे!'

---

## दामोदर सावळाराम यंदे

[मालक इंदुप्रकाश छापखाना, लोकमान्यांचे एक स्नेही, मुंबई.]

(१) प्रसिद्ध नाट्यकथार्णवकार कै० शंकर मोरो रानडे हे सन १९०३ मध्यें कैलासवासी झाले. आणि त्यांचे सर्व कुटुंब उघडें पडलें. कै० शंकरराव यांस बळवंतराव गुरुस्थानीं मानीत असत; आणि त्यांच्या मराठी भाषाशैलीसंबधानें त्यांस मोठें कौतुक वाटत असे. आपल्या मित्राचें निधनवृत्त ऐकतांच ते बडोद्यास धांवून गेले. त्यांनीं शंकररावांच्या कुटुंबांतील मंडळीची योग्य ती तरतूद लावली. श्रीगायकवाड सरकाराकडे विनति करून त्यांच्या अल्पवयी मुलास स्कॉलरशिप मिळवून दिली, आणि चार दिवस मुक्काम करून स्वतःच्या कुटुंबांतील मंडळीप्रमाणें काळजीपूर्वक कै० रानड्यांच्या कुटुंबाची व्यवस्था केली. कै० शंकरराव रानडे हे श्रीसयाजीविजय पत्राच्या त्यावेळच्या संपादकांपैकीं मुख्य संपादक असल्यानें त्यांच्या नांवानें कांहीं तरी स्मारक करावें, अशी पृच्छा आम्हीं बळवंतरावजींस केली; आणि कै० रानडे यांच्या अपुऱ्या राहिलेल्या दोन कादंबऱ्या--शिलादित्य व मथुरा--पुऱ्या करून छापल्यास त्यांचा खप चांगला होईल; व कोणावरहि फाजील बोजा न पडतां कै० रानडे यांचें स्मारक होऊन त्यांच्या कुटुंबासहि थोडेंबहुत साह्य मिळेल असें सांगितलें; आणि ह्या दोन कादंबऱ्या पूर्ण करण्याविषयीं विनति केली. ही गोष्ट बळवंतरावजींनीं तत्काळ कबुल केली, आणि या दोन कादंबऱ्या पुऱ्या करून देण्याचें त्यांनीं आश्वासन दिलें. अर्थात् छापण्याची आणि प्रकाशनाची जबाबदारी आम्ही घेण्यास तयार होतों. तसें झासे असतें तर लोकमान्यांच्या ग्रंथकर्तृत्वांत दोन कादंबऱ्यांची अधिक भर पडून, एक कादंबरीकार या दृष्टीनेंहि महाराष्ट्र वाचकांस त्यांचे गुणानुवाद गाण्याचा प्रसंग येणार होता. परंतु कार्यबाहुल्यामुळें आणि विशेषतः ताईमहाराजांच्या नवीन उपस्थित झालेल्या यातायातीमुळें ती इच्छा तितक्यावरच राहिली. पुढें १९०८ सालीं तर त्यांजवर राष्ट्रीय संकटच ओढवलें! अशा दैवदुर्विलासामुळें कै० शंकरराव रानड्यांच्या ज्या दोन कादंबऱ्या बळवंतरावांच्या लेखणींतून तयार

होऊन मराठी वाचकांच्या पदरात पडावयाच्या होत्या त्या अंतरल्या. सांगावयाची गोष्ट अशी कीं, या गोष्टीची स्मृति मात्र त्यांच्या हृदयात शेवटपर्यंत जागृत होती. ते विलायतेहून परत आले, त्यावेळीं सरदारगृहांत त्यांच्या भेटीस आम्ही गेलों असतांना त्यांनीं होऊनच ही गोष्ट काढली; आणि म्हणाले:—" विलायतेच्या हवेपासून प्रकृतीवर चांगला परिणाम झाला आहे. आता सवडींत सवड करून एकदां बाबांची कामगिरी (कै० शंकर मोरो ऊर्फ बाबासाहेब रानडे यांस सर्व ' बाबा ' या नावानेंच संबोधित असत.) पुरी केली पाहिजे, माझ्या लक्षात आहे. "

(२) कै० शंकर मोरो ऊर्फ बाबासाहेब रानडे हे पुनर्विवाहाचे पुरस्कर्ते व आगरकराप्रमाणें पूर्ण सुधारणावादी होते. अनेक प्रसंगीं मतभेद होऊन त्याचा व टिळकांचा खडाजंगी वादहि होत असे. परन्तु त्याच्या मित्रप्रेमात किंचित्‌हि कमतरता झाली नव्हती. या प्रसंगीं लोकमान्याचे बडोद्यातील आगमन, दुसऱ्या खटल्यांतून मुक्त झाल्यानतर प्रथमच असल्यानें त्यांच्या सन्मानार्थ श्रीसयाजीविजय ऑफिसच्या भव्य पटांगणांत, बडोद्याचे नगरशेट श्री० हरिभक्ति यांच्या अध्यक्षत्वाखालीं बडोदरवासी जनांची एक जाहीर सभा भरविण्यांत येऊन त्यास मानपत्र अर्पण करण्यांत आलें होतें. ह्या प्रसंगीं लोकमान्यांनीं आपल्या भाषणांत असा उपदेश केला होता, कीं, " कोणतेंहि श्रेष्ठ कार्य करताना संकटें हीं यावयाचींच. तीं न आलीं तर कार्यास महत्त्व नाहीं; परन्तु संकटसमयीं कार्यकर्त्या माणसाने डगमगतां उपयोगी नाहीं. संकटें येतील, व त्यांस तोंड द्यावें लागेल, ही कल्पना जागृत ठेवून जो कार्यास आरंभ करतो, त्यांस संकटाची फारशी पर्वा वाटत नाहीं. मनांतील आशा जागृत ठेवून नेहमीं कार्य करीत राहाणें, हेंच मानवी कर्तव्य सर्वांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. "

---

## श्रीशंकराचार्य

[ महाभागवत डॉ० कुर्तकोटी, संस्थान करवीर मठ. ]

लोकमान्य टिळकांबद्दल भिन्न भिन्न लोकांचे भिन्न भिन्न तऱ्हेचे अनुभव आहेत, त्यांची व्यवहारांत मुरलेली ज्ञान व धर्म या बद्दलची निष्ठा खालील दोन गोष्टींवरून सहज व्यक्त होण्यासारखी आहे.

(१) सन १९०८ सालीं त्याना जबर शिक्षा जस्टिस दावर यांनीं मुंबई हायकोर्टात रात्रीं सांगितली. जस्टिस दावर यांचे चिरंजीव ' बॅरिस्टर दावर '

हे आपल्या वडिलांना घरीं येण्यास इतका उशीर कां लागला म्हणून आतुरतेनें चौकशी करण्यासाठीं हायकोर्टांत येतात. इतक्यांत शिक्षा झालेले टिळक पाहाऱ्या मधून हायकोर्टाचे जिन्यावरून खालीं उतरत होते. टिळकांवरील पूर्वीच्या खट-ल्यात त्यांचेतर्फे अनेकांपैकीं एक बॅरिस्टर दावर यांनीं काम केलेलें असल्या मुळें, प्रस्तुतच्या प्रकरणांत आपलेकडून त्यांना कांहीं मदत करितां आली नाहीं ही गोष्ट लक्षांत येऊन आणि लोकमान्यांवर आलेला प्रसंग पाहून बॅरिस्टर दावर याना खेद वाटणें स्वाभाविक होतें. त्यामुळें अशा स्थितींत लोकमान्यांची दृष्टि चुकविण्याचे उद्देशाने त्यांनीं एका बाजूस होण्याचा प्रयत्न केला. त्यांची ती मनाची स्थिति ओळखून आपल्यावरील प्रसंगाची गुमान न करितां उलट त्यांचेंच सांत्वन करण्याचे हेतूने टिळकांनीं पहारेकऱ्यांना बॅरिस्टर दावर यांच्याशीं बोल-ण्याची परवानगी विचारली. त्याप्रमाणें ती मिळतांच बॅरिस्टरांचेकडे वळून टिळक म्हणाले " अहो, आपण असे मनाला कां लावून घेता ? परिक्षेसाठींच मनुष्यावर असे प्रसंग येत असतात. त्यास न जुमानण्यांतच पुरुषार्थ आहे. तुम्ही पूर्वीच्या खटल्यांत मला किती मदत केली याची मला पूर्ण जाणीव आहे. आतां या खटल्यांत तुम्ही मला मदत कां करू शकला नाहीं याला तसेंच योग्य कारण आहे. तुम्ही त्याबद्दल कष्टी होऊं नका. मनांतलें सर्व टाकून पूर्वीप्रमाणें माझ्यावर लोभ असूं द्या. सहा वर्षें हा हां म्हणतां जातील व पुनः तुमची व माझी गांठ पडेल." याप्रमाणे प्रेमयुक्त निर्मय अंतःकरणानें बॅरिस्टरांचें सांत्वन करून त्यांचें मुख प्रसन्न झाल्याचें पाहिल्यावर लोकमान्य पहाऱ्यावरोबर पुढें चालते झाले!

( २ ) एकदां लोकमान्यांचे घरीं कांहीं घरोब्याची मंडळी भोजनास बसली असतां, जेवतां जेवतां संध्येच्या महत्त्वाबद्दल गोष्ट निघाली. टिळकांनीं संध्या-वंदनाची फार प्रशंसा केली, इतक्यांत एकानें " आपण तर संध्या केलेली आम्ही कधीं पाहिली नाहीं आणि तिची इतकी स्तुति करितां हें कसें ?" असे विचा-रिलें. त्यावर टिळकांनीं जोरानें उत्तर दिले कीं, " कोण म्हणतो मी संध्या करीत नाहीं ! एक कल्पना जाऊन दुसरी कल्पना येण्याचा जो संधिकाल असतो त्याचे मी नेहेमीं अनुसंधान करीत असतों. बाह्य क्रिया पाळावयास मला फुरसत नाहीं, त्याला नाइलाज आहे; पण ज्यांना फुरसत मिळते त्यांनीं क्रियाहि अवश्य पाळली पाहिजे."

## विष्णु गोविंद विजापूरकर

[ एम. ए., माजी प्रो० राजाराम कॉलेज कोल्हापूर, श्रीसमर्थ विद्यालयाचे संस्थापक, तळेगांव. ]

( १ ) मी १५ वर्षे कोल्हापूर कॉलेजांत नोकरी केल्यानतर ता. २२ सप्टेंबर १९०५ रोजीं कोल्हापूर दरबारनें त्या कामावरून मला दूर केल्यामुळें आतां स्वतंत्रपणें चळवळींत पडण्यास हरकत नाहीं, असें माझ्या मनांत आलें. या संधीस लोकमान्य मुंबईस होते आणि तारीख २५ रोजीं म्हणजे तीन दिवसांनीं रा० शंकरराव ढवळे सिव्हिल सर्व्हिस परीक्षेंत पास झाल्याची मजकडोन डॉ० नानासाहेब यांस तार गेली. त्यावेळीं लोकमान्य डाक्टरसाहेबांचे घरीं होते. त्यांनी आपण होऊन मसुदा केलेली तार मजकडे उत्तर म्हणून पाठविण्यास सांगितल्यावरून डाक्टरसाहेबानीं ती पाठविली असें मला पुढें कळलें. ती तार अशी " कॉंग्रॅचुलेशन्स ऑन ढवळेज सक्सेस ॲंड युअर फ्रीडम ! "

( २ ) बळवंतरावांचे अंगीं प्रसंगावधान हा मोठा गुण होता. त्यामुळें कसल्याहि बिकट प्रसगीं ते गांगरून जात नसत. अगदीं सामान्य प्रसंगीं हजर-जबाबीपणाच्या रूपानें हा गुण व्यक्त झाल्याची एक स्पष्ट आठवण मला आहे. सुरत राष्ट्रीय सभेचा घनघोर प्रसंग सर्वांस आठवत असेलच. त्यावेळीं तडजोड करण्यासाठीं आमच्या म्हणजे राष्ट्रीय पक्षाकडोन कमालीची खटपट झाली. परंतु हा कांटा राष्ट्रीय सभेतून काढून टाकावा व ती एकमुखी करावी असा संकल्प नेमस्त मडळींचा झाला होता. त्या तडजोडीसाठीं आमच्या गांवांतील छावणींत वरचेवर सभा होत असत. त्यावेळीं झालेलीं लोकमान्यांचीं भाषणें फार परिणाम कारक होत. तडजोड करण्यासाठीं मुखत्यार मडळ नेमण्याची त्यानीं सूचना केली. त्या मंडळाचे चिटणीस रा० नरसिंह चिंतामण केळकर असावेत असें त्यांनीं म्हटलें; तेव्हां श्रोत्यापैकीं एकजण म्हणाला, " त्यांचे दोन चिटणीस आहेत, तेव्हा आमचेही दोन असावेत. " त्याबरोबर एक पळहि न थांबतां लोकमान्य ठासून म्हणाले, " नको हो, एक पुरे. आमचा एक त्याच्या दोघांबरोबर आहे. " यांत हजरजबाबीपणा तर दिसलाच. पण आपल्या माणसांविषयीं अभिमान व त्याचा गौरव करण्याची सहज साधलेली लकब आणि प्रतिपक्षापेक्षां आपली श्रेष्ठता असल्याबद्दलची खात्री त्याचे ठिकाणीं आहे हेंहि व्यक्त झाल्यानें लोकानीं कौतुकदर्शक टाळ्यांचा गजर केला.

( ३ ) १९०७ च्या डिसबर अखेर सुरत कॉंग्रेस झाली. त्यावेळेस आमचें समर्थ विद्यालय तळेगावांत एक दोन घरात जबर भाडें भरून स्थापलें होतें. एक महिन्यात तट्ट्याच्या झोंपड्या करून आम्ही माळावर राहण्यास आलों. त्या ठिकाणीं पूर्वी वस्ती नव्हती. थंडी अतोनात. विहीर एक होती, तिला उपसा

नव्हता. गाळ फारच होता. अशा वेळीं येथील विद्यार्थ्यांत तापाचा आजार फार होता. तेव्हां सुरत कॉंग्रेस आटपून आल्यानंतर लगेच पधरावीस दिवसांनीं मी लोकमान्याकडे गेलों आणि त्यांना म्हटलें, "आमच्या विद्यालयाला राहाण्यास इमारती नाहींत. शिक्षकांच्या स्वार्थत्यागामुळें कसाबसा चालू खर्च मी प्रचार करून मिळविल्या पैशावर भागत आहे. माझे स्नेही गोपाळराव गोखले आपल्या इमारतीपुढें उत्तम बगीच्या करण्यासाठीं पैसे नाहींत म्हणून तळमळत आहेत; आणि आमची लहान लहान मुलें थडीनें कुडकुडत आहेत. आपली लोकप्रियता घेऊन काय करावयाची ? रुपये–आणे–पैच्या रूपांत तिची कांहीं किंमत केली तर खरें !" असे मीं म्हटले मात्र, तों आपल्या ईझीचेअरवरून ( आराम-खुर्चीवरून ) बळवंतराव उठून उभे राहिले. "काय म्हणतां हो, चला आपण दौरा काढू ! पैसेच पैसे ! सगळी व्यवस्था तुम्ही करा आणि वाटेल त्या ठिकाणा-हून तार द्या, मी तेथें येतो. व्याख्यानें देईन. घरोघर भिक्षा मागूं. ठरवा कार्य-क्रम." त्यावेळीं वासुकाका जोशी होते. त्यांनीं सुचविलें कीं, 'महाराष्ट्र विद्या-प्रसारक मंडळाच्या सर्व म्हणजे प्रमुख सभासदांचाच दौरा काढावा म्हणजे पुष्कळ बोलबाला होऊन देखावा होईल. मिरवणुकी वगैरे काढतां येतील म्हणजे सरस्वती देवीची सेवा करण्यास लोक तयार होतील. हा विचारहि सर्वांस पसत पडून त्या सालच्या श्री दासनवमीसच प्रथम सोलापुराकडे आम्ही गेलो. त्यावेळचा समारंभ, लोकांचा आदर आणि त्यावेळीं झालेलीं लोकमान्यांची एकापेक्षां एक मुद्देसूद व आवेशाचीं व्याख्यानें आणि त्यांस लोकांनीं देऊ केलेली १५।२० हजारांची रकम हें सर्व सरकारी अधिकारी मंडळीच्या डोळ्यावर आल्याशिवाय राहिलें नाहीं. त्यावेळीं सरकारास भिणाऱ्या एका माणसानें म्हटलें, "का हो ! इतक्या स्वातंत्र्याच्या बाण्यानें काढलेली तुमची शाळा सरकारानें बुडविली तर ? तेव्हां असला प्रयत्न नच करावा हे बरें." तेव्हां "यांचे उत्तर सायंकाळीं व्याख्यानांत देईन, तेथें या आणि ऐका." असें लोकमान्यांनीं त्यास सांगितलें. हे गृहस्थ व्याख्यानास कसचे येतात ! पण उत्तर मात्र क्षणक्षणीत भर्तृहरीच्या 'प्रारभ्यते न खलु विघ्नभयेन नीचैः प्रारभ्य विघ्नविहिता विरमंति मध्याः । विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः प्रारब्धमुत्तमजना न परित्यज्यति ॥ या श्लोकाचें घोळून घोळून दिलें, आणि "आपण हातपाय गाळून स्वस्थ बसणारे नीच नाहीं, एवढे तरी सिद्ध केलें आहे. पुढचे सर्व प्रकार परमेश्वराधीन आहेत पण 'आरम-शूराः खलु दाक्षिणात्याः' हें वचन खोटें करण्याच्या बुद्धीने तुम्हां सर्वांवर हा भार टाकण्यासाठीं आम्ही ही भिक्षेची झोळी पुढें ठेवली आहे." अशा तऱ्हेनें लोकमान्य बोलले. सरकारनें करावयाचें तें केलें. परतु लोकमान्यांच्या पुण्याईनें व श्रीसमर्थांच्या कृपेनें त्यांचें त्यावेळचें भाषण खऱ्या सात्त्विक आत्मविश्वासाचें होतें हें त्यांच्या हयातींतच सिद्ध झालें !

(४) सोलापूरनंतर बार्शी व कल्याण या-खेरीज इतर ठिकाणीं जाणें घडलें नाहीं. लोकमान्यांवर खटला झाला. त्यावेळीं मी एकटाच प्रचार करीत होतों. परंतु खटला चालू असतांना आपण हजर असावें, निदान मुंबईत असावें, म्हणून घाईघाईने कामे आटोपून अखेरचे दोनतीन दिवस मुंबईस आलो. स्वतः लोकमान्य आपला बचाव करीत होते. खटल्याचे वेळीं कोणास आत सोडीत नव्हते. त्यांची गांठ घेण्याची एक युक्ती सुचली. त्यांच्या कामास लागणारे कागदपत्र किंवा पुस्तके नेणाऱ्या मंडळींस मोकळीक असे. म्हणून मीहि अनेक दुसऱ्यांच्या पैकीं एक काखोटीस मारून हायकोर्टांत अगदीं वरपर्यंत प्रवेश केला. ते दिवशींच निकाल होणार होता. मला पाहिल्याबरोबर लोकमान्य हसत म्हणाले, " कां, आम्हाला पोंचवावयाला आला वाटतें ?" निकालाविषयीं इतकी खात्री व बेफिकीरी त्यांची होती.

(५) 'मरे एक त्याचा दुजा शोक वाहे। अकस्मात तोहि पुढें जात आहे ॥' या न्यायानें बरोबर एकच महिन्यानें मजवरहि तसलाच प्रसंग आला. परंतु पुढें, त्यांच्या अगोदर सुटून आल्यावर पुढे सिडनहॅमी फत्तरांना पाझर फुटला म्हणून मी खटपट करीत राहिलों. अर्थात् ती व्यर्थच गेली. लोकमान्य सुटून आल्यावर पुढें नाना रंग पालटून आमचे प्रयत्न सुरू होतेच. इच्छा खरी कीं, महाराष्ट्र विद्याप्रसारक मंडळ तेंच नांव कायम ठेवून, मंडळी तशीच राहून, मंडळास संघटीत कायदेशीर रूप द्यावें. या गोष्टीस लोकमान्य सर्वथा विरुद्ध होते. ते म्हणत कीं, या मंडळाला आतां कांहीं करता येणार नाहीं. तुम्ही निराळेंच मंडळ करा. त्याला आम्ही मदत करू. वर्तमानपत्रांत अनुकूल लेख लिहू. पण आता काहीं केलें तरी जुन्या मंडळाकडोन कांहीं होणार नाहीं. त्याप्रमाणे सर्व नवीन घटना केली. त्याला लोकमान्यांनीं पूर्ण साह्य दिलें. आलेल्या अडचणी कशा दूर केल्या हें आठवणीच्या प्रथम खंडांत रा० बाबा पोतदारांनीं आपल्या एका आठवणींत लिहिलेंच आहे. पुढे लोकमान्यांचा व माझा काहीं बाबतींत तीव्र मतभेद झाला, तथापि समर्थ विद्यालयाच्या पुनरुज्जीवनाच्या कामीं त्यांनीं मनोभावानें मला साहाय्य केलें, हें त्यांच्या थोरपणास धरूनच झाले. मला त्याचा कधींहि विसर पडणें शक्य नाहीं.

---

# विठ्ठलदास जेराजेनी

[ मालक—खद्दर स्टोअर, मुंबई. ]

( १ ) बंगालच्या फाळणीमुळें सबंध देशभर जी स्वदेशीची चळवळ फैलावली त्यावेळेस लोकमान्यांशीं माझा प्रथम परिचय झाला. ही चळवळ बंगाल्यांत सुरू होताच मुंबईसहि त्याच आठवड्यांत सुरू झाली. आम्ही मुंबईस जाहीरसभा भरविल्या व लोकमत वळविण्याचा फार प्रयत्न केला; पण ती वेळ अशी होती कीं, आम्हास कोणीहि सभेस अध्यक्ष मिळूं नये, सभेकरितां जागा देऊं नये, लोक जमूं लागल्यास त्यांस तेथे राजद्रोह आहे असे सांगून भिववून सोडावें ! अशा विकट वेळीं काय करावें, कसें करावे म्हणून लोकमान्यांचा सल्ला घेण्यास आम्ही त्यांजकडे गेलो. तेव्हां त्यांनीं आम्हांस नुसता शाब्दिक, पोकळ सल्ला न देतां ते स्वतः श्रीमंत खापर्डे यांस गुजराथी बोलतां येते म्हणून त्यांस बरोबर घेऊन मुंबईस येऊन राहिले. व त्यांनीं तेथें स्वदेशी चळवळ यशस्वी करण्याचा आटोकाट प्रयत्न केला. ही चळवळ यशस्वी व्हावी म्हणून त्यांनीं रात्री बारा बारा वाजेपर्यंत अनेक प्रकारें उद्योग करीत राहावे, शेंकडों व्यापारी लोकांच्या गांठी भेटी घ्याव्या, अनेकांच्या घरीं स्वतः हेलपाटे घालावे वगैरे त्यांचे कष्ट व दीर्घोद्योग पाहून माझा जीव थक्क होत असे.

( २ ) लोकसंग्रह करण्याकरितां स्वतः झिजून लोकमान्य एकहि प्रसंग कसा वांया जाऊं देत नसत, याबद्दल एक गोष्ट सांगतों. आमच्या गुजराथी समाजांत नवरात्रामध्ये स्त्रिया फेर धरून गाणे गात असतात. हा प्रसंग फार बहारीचा असतो. तो एकदां लोकमान्यांनीं पाहावा अशी माझी फार इच्छा होती. म्हणून मी त्यांस आमंत्रण दिले. लोकमान्य या समारंभास हजर राहाणार असें कळल्यामुळें, सदर समारंभ रात्रीं फार उशीरा होणारा असतांहि, लोकांची अतोनात गर्दी झाली. लोकमान्यांस बोलविण्यास स्वयंसेवकास पाठविलें. परंतु त्यावेळीं अपरात्र झाल्यामुळे व ते दमून गेल्यामुळें झोंपी गेले होते. स्वयंसेवकाने दारावर बोट वाजविलें. इतक्यांत एक मनुष्य आंतून येऊन त्यानें 'दादा झोंपी गेले आहेत, त्यांस उठवूं नका.' असें सांगितलें. स्वयंसेवक निराश होऊन तेथून निघणार तोंच वरल्या बोलण्यानें लोकमान्य जागे झाले व झालेल्या प्रकाराबद्दल स्वयंसेवकाची माफी मागून, झटपट पोषाख करून, समारंभास ते हजर राहिले. वरील गोष्टी सारख्या किती तरी त्यांच्या गोष्टी माझ्या अनुभवास आलेल्या आहेत.

( ३ ) स्वदेशी मालाच्या प्रसारार्थ मुंबई येथें लोकमान्यांनीं शेट मनमोहनदास रामजी यांच्या साह्यानें बॉम्बे स्वदेशी स्टोअर्स सुरु केलें. लोकमान्य हे एक

डायरेक्टर होते, व मी स्टोअर्सचा मॅनेजर होतों. यामुळें त्यांचा माझा फार दाट संबंध येत असे. एकदां डायरेक्टरांच्या बोर्डाच्या सभेमध्यें 'शिलाई' खात्यासंबंधानें वादविवाद चालू होता. तेव्हां ते म्हणाले "यांत्रिक बलानें शिवणकाम करून तयार केलेल्या कपड्याचा आपला एक स्वतंत्र स्टोअर्स इल्लींच्या स्टोअर एवढा होईल तेव्हां निदान मुंबईस तरी स्वदेशीनें परदेशीवर मात केली असें मी म्हणेन व हें होणें निदान मला तरी अशक्य दिसत नाहीं."

( ४ ) लोकमान्य सहा वर्षांची शिक्षा भोगून परत आल्यावर लगेच एके दिवशीं मी त्यांस भेटून विचारलें, 'आपण फिरून चळवळींत पडणार काय ?' तेव्हां ते किंचित् हंसून म्हणाले, "जित्याची खोड मेल्याशिवाय जाईल काय ! तथापि मी नुकताच बाहेर आलों आहे. तेव्हां निदान सहा महिने तरी माझेच लोक माझ्याशीं निर्भय व खुल्या अंतःकरणानें बोलण्यास धजणार नाहींत. त्यानंतर मला माझ्या प्रयत्नानें वातावरण तयार करून मग कार्यास लागलें पाहिजे."

( ५ ) लोकमान्य विलायतेस जाण्याचे वेळीं मुंबईत ठिकठिकाणीं व्यापारी पेठांतून त्यांच्या सन्मानार्थ सभा होऊन त्यांचीं जाहीर व्याख्यानें होत. ज्या ज्या ठिकाणीं त्या सभा होत त्या त्या ठिकाणची ते अगोदर बारकाईनें सर्व माहिती विचारून घेत असत. व तेथील लोकांस पटेल व उमजेल अशा पद्धतीनें ते भाषण करीत. ज्या त्या समाजाच्या पात्रतेप्रमाणे त्यांस विषय समजून देण्याची त्यांची हातोटी विलक्षण असे. एकदां दाणा बाजारवर प्रचंड सभा झाली. हें ठिकाण व्यापाऱ्यांचे आगर, तेथील बहुतेक लोक अशिक्षित. त्यांस 'स्वराज्य' हा शब्दहि अगदीं नवीनच असेल. पण लोकमान्यांनीं अशा कांहीं खुबीनें त्यांस 'स्वराज्य' या विषयाची ओळख करून दिली कीं, तेथील प्रमुख लोक म्हणाले "आजपर्यंत बम्बईत चळवळ चाले; पण हें काय चाललें आहे हें आम्हां लोकांना कांहींच समजत नसे. पण आज टिळक महाराजांनीं जें सांगितलें तें आम्हां सर्व लोकास आतां चांगलेंच कळलें. आजपर्यंत असें दुसऱ्या कोणीहि कधींच सांगितलें नाहीं. मग आम्ही तरी काय करावें ?"

 

## गणेश रामचंद्र मराठे

[ चित्रकार, वसई. ]

बरेच वर्षांपूर्वी बेळगांव येथून रा० रा० लक्ष्मणराव किर्लोस्कर यांजकडून सुताच्या यंत्राचा पेटंट अर्ज तयार करवून परत येतांना पुण्यास उतरलों. कायद्याचे बाबतींत लोकमान्य याची फार ख्याती असल्यामुळे हा अर्ज त्यांस एकदां दाखवावा असें मनांत येऊन, त्यांची माझी ओळख नव्हती तरीहि, त्यांजकडे जाऊन त्यांस विचारिलें कीं, माझा एक अर्ज तपासून द्याल काय ? त्यांनीं विचारिलें कशाबद्दल अर्ज आहे. मीं म्हटलें सुताच्या यंत्राचें पेटंट घेण्याचें बाबतीचा. त्यांनीं सांगितले, त्यासंबंधाचे पारिभाषिक शब्द पाहाण्यासाठीं उद्यां कांहीं डिक्शनऱ्या आणवून ठेवितों, तुम्हीं परवां सकाळीं ६ वाजतां या. त्याप्रमाणें मी नियमित वेळीं गेलों तों ते माझीच वाट पाहात होते. आम्ही उभयतां माडीवरील एका खोलींत बसलों. त्यांनीं आतून कडी लावून बाहेर ताकीद देऊन ठेविली कीं, कोणी जरी आलें तरी मी कामात आहे, भेट होणार नाहीं म्हणून सांगा. या प्रकारें बसल्यावर त्यांनीं आमचे कागद व नकाशे वगैरे पाहिले, व म्हटलें कीं, तें यंत्र मला पाहिलें पाहिजे. मी यंत्राचा लाहनसा नमुना घड्याळाचे स्प्रिंगनें चालणारा बरोबर घेतलाच होता. त्यांत त्यांचे देखत कापूस घालून त्यास किल्ली देऊन त्यांचे समोर यंत्र चालू करून ठेविलें. तें यंत्र चालू असतां व त्यांतून आपोआप बारीक सूत निघत असतांना पाहून त्यास अति आनंद झाला. व त्या भरांत त्यांनीं मला उद्देशून म्हटलें, "मराठे, चाळीस कॉंग्रेस व हें तुमचें यंत्र बरोबर आहे. हिंदुस्थानभर खेड्यापाड्यांतूनहि हीं यत्रें घरोघर चालूं लागलीं म्हणजे कापडाच्या व्यापारांत मोठी क्रांती घडून येईल. आजपर्यंत जें काम केवळ हातांत होतें तें तुम्हीं यंत्रांत आणलें हे हिंदुस्थानावर फार मोठे उपकार झाले आहेत." हीं तीन वाक्येंच त्यांनीं उच्चारलीं. पण तीं तिन्ही वाक्यें इतकीं यथार्थ मार्मिक व इतकीं मुद्देसूद आहेत कीं, तज्ज्ञ मनुष्यांनाहि तीं लाजवितील. आजपर्यंत हजारों लोकांनीं यंत्र चालू असतां व सुतें निघतांना पाहिलें आहे. पण इतका मार्मिक, स्पष्ट व चोख अभिप्राय सांगणारा एकहि गृहस्थ भेटला नाहीं. ही त्यांची यंत्रांसंबंधाचीं भाषणें ऐकून लोकमान्यांच्या सर्वव्यापी कुशाग्रबुद्धीचें व मार्मिकतेचें फारच कौतुक वाटून माझें अंतःकरण अगदीं भरून आलें. सकाळीं ६ पासून १२ वाजेपर्यंत एका बैठकींत सर्व अर्ज तपासून झाला. नमस्कार करून निरोप घेतांना मीं त्यांस नम्रतेनें विचारलें कीं, याबद्दल मी काय द्यावें ? त्यांनीं मजकडे पाहून हसून म्हटलें, "ज्या ज्या वेळीं तुम्हांला ह्याबद्दल कांहीं विचारण्याची जरूर येईल त्या वेळीं अगदीं संकोच न करितां जरूर मला येऊन विचारीत जा. म्हणजे मला सर्व कांहीं पोहोंचलें !!"

# रामचंद्र विनायक पटवर्धन

[ मॅनेजर–प्रो० देवल यांची . सर्कस व लोकमान्यांचे भक्त ]

(१) लोकमान्यांचा व माझा प्रथम परिचय सर्कसीमुळेंच झाला. सर्कस-सारख्या शारीरिक सामर्थ्याची जोपासना करणाऱ्या संस्थेबद्दल व त्यात काम करणाऱ्या माणसांबद्दल लोकमान्यांना मनापासून आदर वाटत होता, असें आढळून आल्यावरून सर्कशीचे बाबतींत सल्लामसलत घेण्यासाठीं मी त्यांचेकडे वारवार जातयेत असे. १९०७ सालीं इंडियन सँडो प्रो० राममूर्ती हे आपल्या अचाट शक्तीचे प्रयोग पुण्याचे नागरिकाना दाखविण्यासाठीं पुण्यास आले होते. त्यावेळीं त्यांची सांपत्तिक स्थिति फार हलाखीची होती. तवू फाटलेला असून त्यांचे जवळ कोणी हुपार मॅनेजरहि नव्हता. लोकमान्यांनी प्रो० राममूर्तीचा एक खेळ पाहिला व तो पाहून त्याना त्याच्या अंगच्या अचाट शक्तीचें मोठें कौतुक वाटलें. एखाद्या अनुभविक व कर्तबगार मनुष्याचे स्वाधीन राममूर्तीस केल्यास देश-कार्यांत त्यांचा चांगला उपयोग करून घेता येईल असा एक विचार लोक-मान्यांचे डोक्यांत घोळू लागला. अशा वेळीं लोकमान्यांना माझी सहज आठवण झाली; व माझा शोध करून त्यांनीं मला पुण्यास बोलावून नेले. मी पुण्यास आल्यावर राममूर्तीविषयीं थोडीशी हकीकत मला सांगून त्याचे व्यवस्थापकत्व पत्करण्याबद्दल लोकमान्यानीं मला आज्ञा केली. लोकमान्याची आज्ञा शिरसा-मान्य करून प्रो० राममूर्तीचा मी मॅनेजर झालो व पुढील व्यवस्थेसाठीं पुण्याहून निघालों. पुणे सोडतेवेळीं लो० टिळकांनीं मला सांगितलें कीं, " प्रो० राममूर्तीला सर्व महाराष्ट्रभर हिंडवून ठिकठिकाणच्या विद्यार्थ्यांपुढे त्यांची व्याख्यानें करवून जागोजाग तालीमखाने स्थापन करा व तरुणपिढीचें लक्ष जेणेंकरून शक्ती संपादन करण्याकडे लागेल असा उद्योग करा "

(२) सन १९०६ सालीं लोकमान्यांच्या आज्ञेवरूनच ' धि बाम्बे स्वदेशी को ऑपरेटिव्ह स्टोअर्स ' मध्यें मी काम शिकण्यासाठीं राहिलों होतों. त्या वर्षी पुण्यास प्लेग असल्यामुळें लोकमान्य मुंबईस विन्हाड करून राहिले होते. दर आठवड्यास 'केसरी'चा अग्रलेख मुंबईहूनच ते लिहून पाठवीत असत व तो अग्र-लेख लिहिण्यास दर रविवारीं दुपारीं ते मला आपल्या बिन्हाडीं बोलावीत असत. लिहिण्याचे काम सुरू असतांना मध्यंतरीं पुष्कळ लोक लोकमान्यांचे भेटीस येत असत. तथापि त्यांचा हिरमोड न करिता आपले लिहिणें क्षणभर थांबवून लोकमान्य त्यांची भेट मोठ्या प्रेमानें घेत असत. मंडळी निघून गेल्यावर मज-कूर कोठपर्यंत आला आहे हें मला न विचारता पूर्वी सांगितलेला मजकूर चट-कन लक्षांत आणून पुढील मजकूर एकदम सांगण्यास सुरवात करीत असत. इतकेंच मजकूर तोंडानें सांगतांना शुद्धलेखनाप्रमाणें विरामासह मजकूर सांगत

असंत ! अशा रीतीनें मजकूर सांगण्याची व लेखांना मथळे घालण्याची लोकमान्यांची विलक्षण शैली पाहून मला मोठें आश्चर्य वाटत असे.

(३) मुंबईस राहात असतांना लोकमान्यांचे हेलपाटे पुण्यास वारवार होतच असत. गाडी सुटण्यास अगदीं थोडा अवकाश उरला होता. आम्ही उभयतां पहिल्या वर्गाचे डब्याजवळ गेलों. लोकमान्य डब्यांत शिरूं लागले तों डब्यांतील एका गोऱ्या उतारूनें दाराशीं आडवा हात करून लोकमान्यांना आडविलें. परंतु लोकमान्य खंबीर मनाचे व निर्भय वृत्तीचे असल्यामुळे त्यांनी त्या गोऱ्या उतारूचा आडवा आलेला हात आपल्या हातानें बाजूस सारून मर्दाप्रमाणें डब्यांत प्रवेश केला व सामान चटकन देण्यास मला सांगितलें. सामान आंत घेऊन वरच्या बर्थवर त्यांनीं आपलें अंथरूण पसरून मला निरोप दिला. गाडी सुटतां सुटतां डब्यांत लोकमान्याचा व गोऱ्या उतारूचा वाटेंत कांहीं तटा वगैरे होऊन लोकमान्यांना त्रास सोसावा लागेल अशी भीति माझे मनांत येऊन मी लोकमान्यांना म्हटलें–'पुण्यास सुखरूप पोंचल्याचें पत्र मला तावडतोब पाठवा.' त्यावर लोकमान्य म्हणाले–" एकदां डब्यांत शिरल्यावर कसली भीती आली ! तुम्ही कांहीं काळजी करू नका. मी सुखरूप पोंचतों व तुम्हास पत्र घालतों. वाटेंत कांहीं अडचण आली तर ती निवारण करण्याइतका मी खंबीर आहे ! " लोकमान्य पुण्यास सुखरूप पोंचून त्यांचें पत्रहि आलें.

(४) १९१७ सालचे मे महिन्यांत प्रो० परशरामराव यांची सर्कस मुंबईस मस्तान तलावावर खेळ करीत होती. त्यावेळीं मी मुंबईपुरता सर्कसीचा मॅनेजर होतों. कै० गजानन भास्कर वैद्य यांनीं स्थापिलेल्या ' हिंदु मिशनरी सोसायटीचे मदतीसाठीं ' प्रो० परशरामराव यांनीं एक खेळ केला. त्या खेळाला लोकमान्यांना हजर ठेवून त्यांचें हस्ते प्रो० परशरामरावाना हिं० मि० सो० च्यातर्फे सुवर्णपदक अर्पण करण्याचें कै० अनंत निळकंठ पिटकर यांनीं ठरविलें होतें. लोकमान्य त्यावेळीं उत्तर हिंदुस्थानांत फिरतीवर गेले होते. तथापि कै० पिटकर यांच्या तारेसरशीं ते मुंबईस आले व ना० दादासाहेब खापर्डे यांच्यासह खेळाला हजर राहून त्यांनीं प्रो० परशरामराव यांना सुवर्णपदक नजर केलें. पदक अर्पण करतांना लहानसें गौरवपर भाषण करून लोकमान्य म्हणाले–' हिंस्त्र पशूना माणसाळून त्यांचेकडून वाटेल तीं कामे करून घेण्याचें बाबतींतील प्रो० परशरामरावाचें कौशल्य केवळ अपूर्व आहे. मुंबईच्या पोलीस कमिशनरांनीं परवानगी दिल्यास प्रो० परशरामराव हे पिंजरा न लावितां खुल्या जागेंत सिंहव्याघ्रादिकांचीं कामें करून दाखवितील. प्रो० परशरामराव हे सर्कसीचे सिंह आहेत;" लोकमान्यांचे तोंडून सहजगत्या निघालेल्या उद्गारांचा फायदा घेऊन प्रो० परशरामराव यांनीं ' सर्कशीचे सिंह ' हे नामाभिधान स्वतः धारण केलें आहे !

(५) रा० रा० जोशी या नांवाचे गृहस्थ एक वेळी रेल्वेंत नोकर आहेत. रेल्वेची नोकरी सोडून रेल्वेच्या तक्रारी लोकांपुढें व्यवस्थित रीतीनें मांडणारें एक वर्तमानपत्र काढावें अशी त्यांना इच्छा झाली व त्या बाबतींत लोकमान्यांचा सल्ला घेण्याविषयीं ते मला लोकमान्यांकडे घेऊन गेले. रा० रा० जोशी यांनीं आपलें म्हणणें पुढें मांडल्यावर लोकमान्य म्हणाले:—'तुमची कल्पना ठीक आहे; परंतु असलें वर्तमानपत्र काढण्यापेक्षां विलायतेंतील टॉमस कुक आणि कंपनीसारखी एखादी आपली कंपनी सर्व हिंदुस्थानभर स्थापून प्रवाशांची सोय कराल तर जास्त चांगलें.' असें सांगून टॉमस कुक कंपनीचा मुळापासूनचा साद्यंत इतिहास लोकमान्यांनीं रा० रा० जोशी यांना सांगितला व अशा प्रकारची कंपनी तुम्ही काढणार असल्यास तुम्हाला मी वाटेल ती मदत करण्यास तयार आहें असें आश्वासन दिलें. लोकमान्यांना कोणत्याहि विषयाची माहिती नव्हती असें नाहीं.

---

## सुंदरराव भास्कर वैद्य

[ एल्. एम् ई, मुंबई. ]

(१) पहिल्यानें 'केसरी'ला मुंबईचीं बातमीपत्रें टी.के. पी. हे लिहीत असत. पहिल्यापहिल्यानें ते प० वा० गजाननभास्कर वैद्य बी. ए. यांनीं तपासल्यावर पाठवीत. पुढें ते स्वतंत्र पाठवीत असत. पुढें त्यांचीं पत्रें येणें बंद झालें. एकदां आम्ही चौघे भाऊ १ गजाननराव, २ रामराव भास्कर वैद्य, ३ सुंदरराव भास्कर वैद्य, एल्. एम्. ई, ४ आत्माराम भास्कर वैद्य, एल. सी. ई व अनंत निळकंठ पिटकर असे मुंबई येथील फोटांत ब्लॅव्हॅटस्की लॉज थिऑसफिकल सोसायटीमध्यें तिचे अध्यक्ष मि. डेविड गॉर्स्लिंग यांचें गीतेवरील व्याख्यान ऐकण्यास गेलों होतों. श्री० अनंत यांनीं परत येतांना म्हटलें कीं, हें व्याख्यान आपण 'केसरी'कडे पाठवू या. सर्वांनीं होय म्हटलें. दुसऱ्या दिवशीं श्री० अनंत यांनीं तें लिहिलें व श्री० गजाननराव यांच्याकडे तपासण्यास व पाठविण्यास दिलें. श्री० गजाननरावांनीं तें तपासून त्यावर 'अनंत' अशी सही घालून व अनंत हे सरकारी नोकर म्हणून जबाबदार गजाननराव अशी सही करून ते 'केसरी'कडे पाठविलें. अशीं मुंबईचीं बातमीपत्रें केसरींत येऊं लागलीं व प. वा. गजाननराव व केसरीकर्ते कै० वा० बळवंतरावजी टिळक यांचीं पत्रोपत्रीं ओळख झाली.

( २ ) एकदां हेमतोत्सवांत प्रो० कर्वे यांचे पुनर्विवाह या विषयावर एक व्याख्यान होतें व अध्यक्ष न्या० मू० रानडे होणार होते. प० वा० गजाननराव त्या वेळीं फार तापट स्वभावाचे होते. त्यांनीं ठरविलें कीं, न्या. मू. रानडे यांनीं अध्यक्ष होऊं नये असें सभेंत सांगावयाचें. न्या० मू० रानडे अध्यक्षाची सूचना वगैरे न होतांच अध्यक्षाच्या खुर्चीवर जाऊन बसले व त्यांनीं व्याख्यानास सुरवात करविली. गजाननरावांनीं भरसभेंत सांगितलें कीं, आजचे अध्यक्ष नालायक आहेत. ह्याचा रिपोर्ट नेहमीप्रमाणें 'केसरी'कडे गेला. परंतु पुण्यास त्याच रात्रीं लोकमान्याकडे एका गृहस्थाची रवानगी करण्यांत आली. लोकमान्य सकाळीं उठतात इतक्यांत हे गृहस्थ गेले व सांगूं लागले कीं, ह्या व्याख्यानाचा रिपोर्ट केसरींत छापू नये अशी न्या० मू० रानड्यांची इच्छा आहे. लोकमान्यांनीं रिपोर्ट आल्यानंतर काय करावयाचें तें करीन असें उत्तर दिलें. पुढें रिपोर्ट जसा गेला तसा 'केसरीं'त कांहीं न गाळतां त्यांनीं प्रसिद्ध केला व प. वा. गजाननराव यांच्या बाजूचें एक स्फुट प्रसिद्ध केलें. 'केसरी' व 'कामगार' ह्या दोन पत्रांखेरीज सा- । मराठी पत्रांनीं गजाननरावांच्या विरुद्ध लेख लिहिले. ह्यानंतर ज्या वेळीं लोकमान्य मुंबईंत आले त्यावेळीं त्यांनीं गजाननरावांस भेटण्यास बोलाविलें व बजावलें कीं, न्या० मू० शीं वागतांना फार जपून वागा.

(३) न्या० मू० रानडे परलोकवासी झाले त्या वेळीं 'केसरी'चा नमुनेदार अंक काढण्याचा त्यांनीं निश्चय केला व त्याकरतां चित्र तर अवश्य पाहिजे. अर्थातच तें काम आमच्याकडे आलें. त्या ब्लॉककरिता त्यांनीं निरनिराळे मिळत तसे फोटो पाठविले व केसरींत छापण्याकरितां व तें चांगलें उठावें म्हणून तें अशा तऱ्हेनें कोरून पाठवा म्हणून त्यांनीं स्वतः लिहिलेलीं पत्रें प्रत्येक डांकेला आमच्याकडे आलीं. इतकी त्यांस काळजी लागली आहे हें आम्हांस स्पष्ट दिसलें. त्या वेळीं आमची केरळकोकीळ, बाळबोध वगैरे मासिकामुळें उत्तम एन्प्रेव्हर म्हणून अति प्रसिद्धी झाली होती. आम्हांस त्या कामाचें विशेष कांहीं वाटलें नाहीं. तें आम्ही सहज करून पाठविलें. परंतु आम्ही त्यांस आणखी मदत करण्याचें ठरवून अनंताचें मुंबईचें बातमीपत्र सचित्र करून पाठविलें. आम्ही स्वतः स्मशानांत जाऊन न्या. मू. चें चित्र पेन्सिलीनें काढून आणलें होतें. त्यावरून ब्लॉक करण्याचा आम्ही बेत केला व हे एक आणखी चित्र करून पाठविलें. अशीं न्या. मू. चीं दोन चित्रें त्या अंकांत आलीं. आम्हांस वाटतें आपल्याइकडे मृत्यूनंतर प्रसिद्ध झालेलें हें पहिलेंच चित्र होय.

( ४ ) 'केसरी' हें हेडिंग सचित्र करावें असें ठरलें व आमच्याकडे लिहून आलें. त्या वेळीं सिंह कसा काढावा याविषयीं अनेक सूचना होत्या. एक सूचना अशी होती कीं, सिंहाच्या झेपट्या अक्षरांत गुंतवाव्या. परंतु आम्हांस तें कांहीं बरोबर वाटेना. आम्ही जागा जास्त न घालवितां थोड्या जागेंत व हजारो प्रती

जरी छापल्या तरीं स्पष्ट उठावें असें हेडिंग करण्याचा निश्चय केला. लोकमान्य मुंबईस आले होते तेव्हां आम्हांस सिंह दाखविण्यास आपल्याबरोबर प्रो० काशिनाथपंत छत्रे यांच्या सर्कशींत घेऊन गेले व आपल्याजवळ बसविलें. आम्ही काढलेला डिझाइन पसंत झाला व त्याप्रमाणें आम्ही ब्लॉक करून दिला. त्यांत अक्षरें जुनीं होतीं तशींच ठेवलेली आहेत. हल्लींचें हेडिंगसुद्धां आम्हीच कोरलेलें आहे.

( ५ ) ज्या ज्या वेळीं गजाननराव हे योगासंबंधानें लोकमान्यांजवळ बोलत त्या त्या वेळीं ते म्हणत कीं, "मला योगविषय समजत नाहीं." त्यामुळेंच थिऑसफी शिकविणारीं युरोपियन माणसें त्यांस धार्मिक विषयांतील पुढारी म्हणून मान्य नसत. इतर गजाननरावाचीं धार्मिक मतें त्यास मान्य होत असत. पुण्यास गजाननरावांचें व्याख्यान झालें त्यावेळीं त्यांनीं सांगितलें होतें कीं, 'हिंदुधर्म साऱ्या जगांत शिकविण्यास येथील ब्राह्मण हिंदुस्तानाच्या बाहेर गेले पाहिजेत.' हा विचार त्यांस इतका पटला होता कीं, त्यांनीं तोच विचार इंग्रजींत अलाहाबादेस बोलून दाखविला. त्याचा सारांश त्यावेळीं साऱ्या देशभर अॅ० प्रेसनें सर्व वर्तमानपत्रांस पाठविला होता.

( ६ ) मुंबईस थिऑसफी या विषयावर एका सोमवारीं गेइटी थिएटरांत डॉ० आनी बेझंट यांचें एक व्याख्यान होतें. तें सबंध मंगळवारच्या केसरींत द्यावयाचें असें आधीं कळवून ठेविलें होतें. व्याख्यान आठ वाजतां संपलें व अनंत हे नवाच्या गाडीनें व्याख्यान नेण्यास निघाले. गाडींत त्यांनीं लिहावयास सुरुवात केली. त्या वेळीं त्यांस मे. वैद्यब्रदर्स यांनीं लिहितां यावें म्हणून अमेरिकेच्या सायंटिफिक अमेरिकन पत्रांत आलेल्या युक्तीप्रमाणें एक फळी तयार करून दिली होती. त्यांनीं बराचसा मजकूर गाडींत लिहिला व रात्रीं तीन वाजतां ते केसरी ऑफिसांत पोहोंचले त्यावेळीं लोकमान्य त्यांचें स्वागत करण्यास तेथें हजर होते. बाकीचा मजकूर तेथें लिहून साडे तीन कॉलम सोमवारच्या व्याख्यानाचा मजकूर असलेला मंगळवारचा केसरी घेऊन ते सकाळीं अकरा वाजतां ऑफिसांत दाखल झाले. !

( ७ ) आम्ही वैद्य ब्रदर्स म्हणून चौघे बंधु होतों. लोकमान्य गजाननरावांबरोबर बोलूं लागले म्हणजे नेहमीं धर्म विषयावर बोलत. आमचे कनिष्ठ बंधु आत्माराम हे सिव्हिल एंजीनियर होते, त्यांजबरोबर ते त्या विषयावर बोलत. आमच्याबरोबर बोलूं लागले म्हणजे छापखाना टाईप, एन्ग्रेव्हिंग वगैरे विषयांवर बोलत. 'लोकमान्य' पत्राच्या गेल्या महाराष्ट्र अंकात आमचा टाइपावर एक लेख आला आहे. त्यांतील टाईप दाखविण्यास आम्ही मुद्दाम सरदारगृहांत लोकमान्यांच्या मृत्युपूर्वी दोन महिन्यांवर गेलों होतों. तेथें त्यांस ते

दाखविले. आम्ही क्ष व श हीं अक्षरे क्ष व श्न अशीं लिहिलीं होतीं तीं तशीं न देतां क्ष व श अशींच ठेवण्यास त्यांनीं आम्हांस सांगितलें.

त्यावेळीं मराठी मोनोटाइपासंबंधीं गोष्टी निघाल्या. ते म्हणाले कीं, मी विलायतेस मोनोटाईपवर मराठी अक्षरें बसविण्यास दिलीं आहेत. त्यांच्याकडून नमुने आले आहेत त्यांत अक्षराच्या भागांत फटी असतात असें त्यांनीं सांगितलें. आम्ही त्यांस आमच्या मताप्रमाणें सांगितलें कीं, अर्धें व्यंजन व त्याला जोडलेले स्वरचिन्ह हीं निरनिराळीं लिहिलीं जातील तर मराठी मुद्रणकलेवर फार उपकार होतील. असे जर झालें तर मराठी मुद्रणकला व इंग्रजी मुद्रणकला ह्या अगदीं सारख्या होतील. इंग्रजी मुद्रणकलेपासून जितके फायदे आहेत तितके मराठी मुद्रणकलेला प्राप्त होतील. मराठी थोड्या अक्षरांचे टाईपरायटर, स्वल्पाच्या टाइपांच्या पेट्या, नकशीचे मराठी टाईप, मराठी अगदीं बारीक टाईप वगैरे सर्व साध्य होईल. साराश, माणसें पाहून ते त्यांच्याशीं त्यांच्या आवडत्या विषयावर बोलत.

---

## कृष्णशास्त्री नारायण कवडे

[ बी. ए., वैद्यपंचानन, पुणें. ]

( १ ) श्रीगणेशोत्सवांत लोकमान्यांचे व्याख्यान आपल्या गणपतीपुढें व्हावें अशी प्रत्येक गणपतीवाल्याची इच्छा असे, व लोकमान्यहि शक्य तितक्या ठिकाणीं व्याख्यानें देऊन लोकांची इच्छा पूर्ण करीत असत. मंडाले येथील शिक्षा भोगून १९१४ सालीं लोकमान्य परत आल्यावर त्यांचे घरावर पोलिसांचा पाहारा बसला व त्यांचे भेटीस येणाराजाणारांचीं नावें टिपून घेण्याचा क्रम सुरू झाला; अर्थात्च या वर्षीं लोकमान्यांचे व्याख्यान आपल्या गणपतीपुढें झालेंच पाहिजे, त्यासाठीं वाटेल तो त्रास झाला तरी तो सोसण्यास आम्ही तयार आहों असें म्हणणारे कोणकोण पुढें येतात व लोकमान्यांविषयींची आपली भक्ति प्रगट करितात हें पाहण्याची वेळ आली. दरसालप्रमाणें लोकमान्यांच्या व्याख्यानाविषयीं गणपतीवाल्यांकडून मागणी झाली. श्रीगणेशोत्सवाचा चिटणीस या नात्याने मी लोकमान्यांस विनंति केली. तेव्हां ते म्हणाले कीं, " व्याख्यान ठरविण्यापूर्वी गणपतीवाल्यांस पूर्ण विचार करून व्याख्यान ठरविण्यास सांगा. एकदां व्याख्यान जाहीर झाल्यानंतर कांहींहि त्रास झाला व कोणीहि हुकुम केला तरी मी आपलें व्याख्यान बंद ठेवणार नाहीं. याबद्दल जो कांहीं त्रास

त्याचा पूर्ण अभ्यास करून तें उत्तम तऱ्हेनें करावयाचें हें त्यांचें बाळकडूच होतें असें म्हटलें तरी चालेल.

( ६ ) च्यवनप्राशांतील औषधांचे गुणधर्मांवरून बोलतां बोलतां सहज गोष्ट निघाली व पूर्वी औषधांचे गुणधर्म जाणण्याचे कामीं वैद्यांकडून किती मेहनत घेण्यांत येत असे याचें उदाहरण म्हणून त्यांनीं जीवक नावाच्या वैद्याची गोष्ट मला सांगितली. ती येणेप्रमाणेः— जीवक हा वैद्यक शास्त्र पढण्यासाठीं तक्षशिला नगरींत गुरुगृहीं राहात असे. वैद्यशास्त्राचें अध्ययन झाल्यावर त्यानें गुरुजी-जवळ घरीं जाण्यास परवानगी मागितली. तेव्हां त्याचें अध्ययन पुरें झालें आहे कीं नाहीं हें पाहण्यासाठीं गुरुजींनीं परीक्षा घेण्याचें ठरविलें. गुरुजी म्हणाले कीं, 'जीवका, या नगराच्या आसपास पांच कोसाच्या आत ज्या वनस्पतीचे गुणधर्म तुला माहीत नाहींत अशी वनस्पति घेऊन ये.' गुरुजींची आज्ञा ऐकून जीवक नगराभोंवती हिंडला व परत येऊन म्हणाला कीं, 'गुरुजी, आपण सांगितल्या-प्रमाणें मी आसपास चोहोंकडे हिंडून आलों. जिचे गुणधर्म माहित नाहींत अशी एकही वनस्पति मला आढळली नाहीं.' हें उत्तर ऐकताच गुरुजीनें जीव-कास घरीं जाण्याची परवानगी दिली. आयुर्वेदाची परीक्षा पूर्वी याप्रमाणें घेत असत असें लोकमान्यांनीं सांगितलें.

( ७ ) लोकमान्यांच्या ६१ व्या वाढदिवशीं येथील गायकवाड वाड्यांत लोकमान्यास एक लक्ष रुपयांची पिशवी समर्पण करण्यांत आली. ह्या समा-रंभाचे दिवशीं षष्ट्यब्दिपूर्तिनिमित्त जो धार्मिक विधि करावयाचा तो सकाळीं करण्यांत आला. समारंभाच्या सभेच्या पूर्वी लोकमान्य हे ऋषिवर्य अण्णासाहेब पटवर्धन यांच्या दर्शनास गेले. त्यावेळीं लोकमान्य अण्णासाहेबास म्हणाले कीं, "आज मला नमस्कार करण्यास आपल्याशिवाय कोण आहे ?" हे लोक-मान्यांचे शब्द ऐकून अण्णासाहेबांसही प्रेमाश्रु आले. समारंभाचें अध्यक्षस्थान अण्णासाहेब यांजकडेच होते. सभेस येतांना अण्णासाहेब पटवर्धन म्हणाले कीं, 'कनक आणि कांता या दोन बाबतींत बळवंतराव पूर्ण सोंवळा आहे हा त्याचा मोठा गुण आहे. असा लोकोत्तर पुरुष मिळणें दुर्मिळ ! त्याच्या तपश्चर्येमुळेंच त्याला आजचा दिवस पाहावयास मिळाला आहे !'

---

# वामन गोविंद काळे

[ एम्. ए., प्रोफेसर फर्ग्युसन कॉलेज, टॅरिफबोर्डाचे सभासद, पुणें. ]

(१) १८९९ सालची राष्ट्रीय सभेची बैठक लखनौ येथे बाबू रमेशचंद्र दत्त ह्यांचे अध्यक्षतेखाली झाली. मुंबईचे गव्हरनर लॉर्ड सँडहर्स्ट ह्यांच्या कारकीर्दीचें तें अखेरचें साल होतें. त्यांची अमदानी लोकास अप्रिय झालेली होती आणि त्या संबंधाचा अप्रियतादर्शक एक ठराव राष्ट्रीय सभेने पास करावा असें टिळकांस वाटत होते. सदरहु सालीं सातान्यास भरलेल्या प्रांतिक परिषदेत असला प्रयत्न त्यांनीं केला होता व त्यामुळे परिषदेंत मोठें वादळ झाले होते. जें सातान्यास शक्य झाले नाहीं ते लखनौस घडवून आणावे असे टिळकाच्या मनानें घेतलें. प्लेगदूषित भागातून आल्याकारणाने पुण्यामुंबईच्या प्रतिनिधींस लखनौच्या स्वागत-मंडळानें गावापासून काहीं अंतरावर 'पुर्णिया कॅंप'मध्ये तंबू—झोपड्यांत रहाण्याची व्यवस्था करून दिली होती. सामाजिक परिषदेसाठीं रानडे राष्ट्रीय सभेच्या आवारात हजर असावयाचे हा नियम ठरलेलाच होता. त्याप्रमाणे न्यायमूर्ति पुर्णिया कॅंपमध्ये तंबूत उतरले. लखनौस नाताळची थंडी मनस्वी पडलेली. अशा स्थितींत आपण दुसरीकडे निर्वात ठिकाणी राहावे, आपणांस प्लेगचे नियम बंधनकारक नाहींत अशी स्वागतमंडळातल्या व इतर पुढाऱ्यांनीं आग्रहपूर्वक विनति केली असता आपल्या पुण्यामुंबईच्या मित्रांस येथें थंडींत सोडून मी एकटा दुसरीकडे जाणार नाहीं असें रानडे यानीं उत्तर दिल्याचे प्रसिद्धच आहे. राष्ट्रीय सभेमध्ये अजून टिळकाचें फारसे वजन नव्हतें. त्याच्या बाजूस थोडे लोक असून सभेच्या कामात 'बीचमें मेरा चादमाई' करण्याची त्यास खोड आहे अशीच जुन्या राष्ट्र-भक्ताची कल्पना होती. आपल्या ठरावाचा मसुदा रानड्याच्याकडून पसंत करून घेतला असता विषयनियामक कमिटींत आपलें काम सुकर होईल या बुद्धीनें टिळक त्याच्या तंबूत सकाळीं येऊन त्यानीं आपलें म्हणणे थोडक्यांत पुढें माडलें. परंतु रानडे त्यावर काहींच बोलले नाहींत आणि रात्रीं त्याच्या मेहमींच्या चिका-टीनें, टिळकानीं विषयनियामक कमीटींत एका मद्रासी मित्राकडून आपला ठराव पुढें आणवला. कमिटींत त्यास पाठिंबा देणारीं फारशीं माणसें नव्हतीं. बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी अध्यक्षाचे डावे बाजूस बसले होते, त्यांनीं ठरावास प्रति-कूल भाषण केलें. ही प्रांतिक बाब असली तरी तिला एकप्रकारचें अखिल भार-तीय महत्त्व आहे असा त्यांनीं प्रस्ताव केला आणि त्या संबधानें असलेल्या तीव्र मतभेदांचा उल्लेख करून ( but if there is a single dissentint voice, if there is a single discordant note. ) राष्ट्रीय सभेने असला ठराव हातीं घेऊ नये असें सांगितलें. त्याचा कमीटीवर परिणाम झाला व ठराव राष्ट्रीय सभेपुढें आला नाहीं.

(२) १८९१–९२ साली पुण्यांत चोकाळलेल्या ग्रामण्य प्रकरणीं श्रीमच्छंकराचार्यांनीं नेमलेल्या शास्त्रीद्वयाच्या कमिशनपुढें, शनवारवाड्याजवळील श्री. सांगलीकरांच्या वाड्यांत चौकशी झाली. तिची गंमत पाहण्याकरितां गर्दी जमत असे. चेष्टा, आरडाओरड असले प्रकार चालून चौकशीच्या दालनांत खडे फेंकण्यापर्यंत मजल गेली. त्यामुळें हजर कोणी राहावें ह्याबद्दल निर्बंध घालण्यात आला. रानड्यांच्या घरचा माणूस म्हणून मला आत जाता येत असे. कमिशनरांच्या उजव्या हातास वादी व डाव्या हातास प्रतिवादी अशी व्यवस्था होती. वादीपक्षाच्या बाजूनें रा० नारायण बापूजी कानिटकर वकील प्रमुख असून त्यांच्या सामन्यास रावापत नगरकर आणि टिळक बसत. वादाच्या भरांत विनोद, उत्तरें, प्रत्युत्तर आणि कोट्या–प्रतिकोट्या ह्यांची गर्दी होत असे. असल्या बाबतींत प्रतिपक्षास चीत करण्यांत टिळकांचा हातखंडा असे. पागोट्याच्या ऐवजीं पगडी घातली म्हणून किंवा पंचपात्रीच्या ऐवजीं चिनीपेल्यातून पाणी प्याल्याने हिंदूचा खिस्ती होत नाहीं. अशीच गोष्ट चहा प्रकरणाची आहे, असला युक्तिवाद तर त्यानीं केलाच, परंतु मोठमोठीं माणसें वादांत पडलीं म्हणजे अगदीं पोरकट कोट्याहि कशा करतात याचा मासला उत्तम पहावयास सांपडला. टिळक बोलत असतां पुढें आडव्या ठेवलेल्या काठीकडे साहजिकच त्यांचा हात जात असे. त्यांस उद्देशून रा० कानिटकर एकदां म्हणाले:–" सोटा हातात असला म्हणजे कांहीं आपल्या बाजूनें समर्थन होत नाहीं. " टिळकांनीं तात्काळ प्रत्युत्तर केलं:—" चष्मा सावरांत बोललें म्हणजे तरी बाजू बळकट होते असे कोठें आहे ! "

(३) १९०५–०६ सालाचे सुमारास, ज्यामध्यें सर्व पक्षांच्या, जातींच्या व विचारांच्या लोकांचा समावेश होईल असा एक ' सोशल क्लबाच्या ' स्वरूपाचा मोठ्या प्रमाणावर जिमखाना पुण्यांत असावा ही कल्पना रा० बडोपंत भावेकर ह्यानीं काढिली. त्यावेळीं येथें अस्तित्वांत असलेल्या यगमेन्स क्रिकेट क्लब आणि पूना यंग क्रिकेटर्स क्लब ह्या संस्थांनीं त्याला मिळून प्रारंभ व्हावा अशी त्याची इच्छा होती. चांगली चाललेली संस्था मोडून तिच्या चालकांचा उत्साहभंग केला जाऊं नये आणि एक मोठी व दुसरी लहान अशा दोन संस्था चालल्या तर अधिकच चांगलें असे पी. वाय. सीच्या लोकांचं म्हणणें होतें. त्यांच्यामध्यें कै० वा० श्रीमन भाऊसाहेब विंचूरकर हे प्रमुख असून टिळकांचें त्यांच्यावर विशेष प्रेम असे त्यानीं आपली बाजू टिळकांस चागली समजाऊन दिली होती. वरील प्रश्नाची वाटाघाट करण्याकरितां डॉ० देशमुखांचे माडीवर दोन्ही क्लबाचे प्रतिनिधी, टिळक व आणखी एक दोन प्रमुख गृहस्थ अशी मंडळी रा० बडोपंतांनीं बोलाविली होती. पुण्यांत एक सोशल क्लब असावा ही सूचना पुढें येतांच टिळकानीं आपलें ठाम बनलेलें मत स्पष्टपणें व्यक्त केलें. ते म्हणाले:—

"I can prove to the hilt that a social club in Poona is an impossibility." टिळकांनीं पी. वाय्. सी. क्लबाची बाजू पुढेहि शेवटपर्यंत उचलून धरली.

( ४ ) श्री० तात्यासाहेब केळकर ह्यांनीं आपल्या टिळकचरित्राच्या ५४७ पानावर, ता. २७ जुलै, १८९७ रोजीं "नित्यक्रमाप्रमाणें टिळक हे त्यांचे स्नेही दाजी आबाजी खरे हायकोर्ट वकील यांच्या घरीं गिरगांवांतील आंग्रेवाडींत उतरले होते; व रात्रीं जेवणखाण करून ते दोघे बाहेर येऊन बसतात तोंच युरोपियन पोलिस अधिकारी येऊन त्यानें टिळकांस वारंट दाखविलें." अशी हकीकत, १२४ अ. कलमाखालीं टिळकांवर झालेल्या खटल्याचें प्रारंभीचें वर्णन देताना सांगितली आहे. ह्या बाबतींत घडलेल्या एका गोष्टींत माझा संबंध आला असून ती प्रत्यक्ष माहीत असलेल्या चारपांच व्यक्तींपैकीं दुसरें कोणी आज हयात नसल्यानें तिचें महत्त्व जाणून खालील माहिती देण्याचें मी योजिलें आहे.

ह्या सुमारास मी कॉलेजांतील टर्म्स भरीत असून मुंबईंत न्यायमूर्ति रानडे यांचे घरीं राहून त्यांचेपाशीं लिहिण्यावाचण्याचें काम करीत असें. न्यायमूर्तींचें खाजगी आणि सार्वजनिक टपाल येईल तसें फोडून महत्त्वाचीं पत्रें त्यांस सबंध वाचून दाखवावीं आणि किरकोळ पत्रांचा त्यांस मी सारांश सांगावा असा रोजचा क्रम असे. पहिल्या प्रकारच्या पत्रांचीं उत्तरें त्यांच्या शब्दांतच मी उतरून घेत असें व इतरांचीं उत्तरें न्यायमूर्तींनीं त्यांचा मथितार्थ सांगितल्यावर मात्र लिहित असे. बहुतेक टपाल खबालाहिलवरील त्यांचे बंगल्यावर येई; परंतु क्वचित् एखादें दुसरें पत्र न्यायमूर्तींस हायकोर्टांत मिळत असे. याप्रमाणें, ता. २६ जुलै १८९७ रोजीं तिकडे आलेलें एक पत्र त्यांनीं आपले बरोबर आणून सध्याकाळीं घरीं परत आल्यावर माझे हातीं दिलें. सदरहु पत्र अमृतबझारपत्रिकेचे प्रसिद्ध संपादक बाबू मोतीलाल घोस यांचेकडून आलें असून चांगलें लांबलचक होतें.

पत्राचा आशय खालीलप्रमाणे होताः—"महाराष्ट्रांत लोकपक्षात दुफळी होऊन मोठा खेदकारक बखेडा माजून राहिला आहे. टिळक आणि गोखले ह्यांच्यासारखीं देशाभिमानी व कर्तृत्ववान माणसे विरुद्ध पक्षाची पुढारी असून त्यांचे दरम्यान विलक्षण तेढ उत्पन्न झाली आहे ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट आहे. ह्या दोन पुरुषांस चार समजुतीच्या गोष्टी सांगून व जरूर पडल्यास त्यांचे कान उपटून वाटेवर आणण्याचा अधिकार व पात्रता ह्या देशांत फक्त तुमच्याच ठिकाणीं आहे. करितां महाराष्ट्रांत बोकाळलेल्या पक्षभेदास आळा घालण्याची खटपट आपण करावी अशी विनति आहे."

बाबू मोतीलाल घोष यांचें पत्र येण्याचा व टिळक त्याच दिवशीं मुंबईस असण्याचा योग झाला असल्याने त्याचा लागलाच फायदा घेण्याचे न्यायमूर्तीनीं ठरविले आणि पत्र घेऊन टिळकाकडे ताबडतोब जा आणि उद्यां मला येऊन भेटा असा त्यांस निरोप सांग, असें त्यांनीं मला सांगितलें. त्याप्रमाणें आम्यांच्या वाड्यांतील खऱ्यांच्या घरीं मी तात्काळ गेलों, व पाहुणे आणि यजमान बाहेर गेले होते त्यांची परत येण्याची वाट पहात मी बसलों. बऱ्याच वेळानें ते आल्यावर खिशातलें पत्र मी टिळकांस दाखविलें. त्यानीं ते वाचून, न्यायमूर्ति सकाळीं फिरावयास केव्हा जातात आणि परत घरीं केव्हा येतात ह्या सबधाने चौकशी केली. मुंबईस असतांना ते सकाळीं फिरावयास जात नाहींत आणि उद्यां ६॥–७ वाजण्याचे सुमारास तुम्हीं आल्यास ठीक होईल असे मी उत्तर दिलें. "बरें आहे. उद्या ७ वाजता मी येऊन भेटेन असे न्यायमूर्तीस कळीव" असें टिळकानीं मला सांगून मोतिलाल बाबूचें पत्र माझे हातीं दिले. आपले काम अर्धवट न होता ते यथासाग झालें पाहिजे ह्या विचारानें, उत्तरादाखल दोन ओळी कागदावर लिहून द्याल तर बरे असें मी टिळकास म्हटलें, "त्याहायला कशाला पाहिजे! तोंडी सांग म्हणजे झालें" असे त्यानीं सांगितलें. तरी दोन ओळींचा मी आग्रह धरला आणि त्याप्रमाणे टिळकानीं एक चिठ्ठी लिहून मला दिली.

मी बंगल्यावर परत आलों. तेव्हां बरीच रात्र झाली होती. घरातील जेवणखाण आटोपलें असून न्यायमूर्ति निजावयास गेले होते. त्याना मी टिळकाची चिठ्ठी दाखविली. परंतु चमत्कार असा कीं, मी गिरगावातून चालत घरीं जाऊन पोहोंचण्यापूर्वीच टिळकास भकडल्याची बातमी, रानड्यांच्या घरीं कधींहि न जाणाऱ्या एका गृहस्थाने न्यायमूर्तीस जाऊन सांगितली होती. हा प्रकार कसा झाला याचें मला मोठें कोडें पडलें. तें पुढें उकलले असलें तरी त्याची हकीकत येथें सागण्याचें प्रयोजन नाहीं. ठरल्याप्रमाणे न्यायमूर्ति व टिळक यांची गाठ पडली असती तर तीमधून काय निष्पन्न झालें असतें हें सांगतां येत नाहीं. तथापि वरील गोष्टीवरून टिळक आणि रानडे ह्यांचीं चरित्रें आणि महाराष्ट्रातील सार्वजनिक तटे ह्यावर थोडा तरी प्रकाश पडेल असा भरवसा आहे.

(५) १९१६ चे सुमारास गांधींच्या लोकनायकत्वाचा रवि अजून उदयास यावयाचा होता आणि टिळकाच्या लोकमान्यतेचा पारा पुष्कळ वर चढलेला होता. त्या वर्षी एकदां ऑल् इंडिया कॉंग्रेस कमीटीच्या बैठकीस हजर रहाण्यासाठीं मी मुंबईच्या काहीं मित्रांसह कलकत्ता मेलमध्यें बसलों असतां, त्याच गाडींत शेजारच्या फर्स्टक्लासच्या डब्यांत टिळक आणि दूरच्या थर्डक्लासांत गांधी असा योग आला. टिळक कलकत्यास जात असल्याची बातमी स्टेशनोस्टेशनीं पसरल्या कारणानें प्रत्येक ठिकाणीं रात्रीं, पहांटे, दिवसा, लोकांच्या झुंडी येऊन त्यांना प्रेमानें सन्मान करीत. गांधींच्या विषयींहि क्वचित चौकशी होत असे, परंतु

त्यांच्या बाजूला गर्दी दिसून आली नाहीं. हा प्रकार मुंबईपासून थेट कलकत्त्या-पर्यंत चालला होता. कलकत्त्याहून परत येतांना गांधी गाडींत नव्हते; बाकी पूर्वी-सारखाच सर्व नमुना. टिळकांचा भक्तिपूर्वक केला जाणारा सन्मान अनेक स्टेश-नावर आम्हीं कौतुकानें पाहिला. सकाळीं १० वाजण्याचे सुमारास गाडी एका मोठ्या जंक्शनवर ( गोंदिया असावें ) आली. टिळकांस पथ्य होतें तरी, त्यांच्या साठीं स्टेशनच्या इमारतींत मेजवानीचा थाटाचा बेत करण्यांत आला होता. गाडींतील महाराष्ट्रीय शेजारी ह्या नात्यानें आम्हांस आमंत्रण झाल्यावरून आम्हीं मेजवानीस गेलो. टिळकांच्या बरोबर दादासाहेब खापर्डे होते, आणि एकंदर चारच मंडळी होती तरी जेवणास चांगला रंग आला. गाडी स्टेशनवर त्या दिवशीं नेहमींपेक्षां अधिक वेळ थांबली आणि भोजन, पानसुपारी आणि फोटो झाल्यावर चालू लागली. पुढे दुपारीं कोणत्याशा स्टेशनावर एका गवळ्यानें आमच्या फर्स्टक्लासच्या डब्यात दूध विकत दिले आणि तो आमचे डब्यासमोर आला असतां माझ्या बरोबर प्रवास करणाऱ्या विनोदी मित्राचें व त्याचें हिंदींत खालील आशयाचें संभाषण झालें:—

मित्रः—दूध कसें देतोस ?

गवळीः—चार पैशा पावशेर.

मित्रः—शेजारच्या डब्यात कसें दिलेस ?

गवळीः—( चाचपडत ) तीन पैशा पावशेर.

मित्रः—त्या लोकांना तीन पैशा आणि आम्हांला चार पैशा, काय ? त्या डब्यांत कोण आहे रे ?

गवळीः—तेथे टिळकमहाराज आहेत.

मित्रः—टिळकमहाराज कोण आहेत रे ?

गवळीः—ते मोठे योगी आहेत.

मित्रः—आ ! योगी आहेत ! आणि ते काय करतात ?

गवळीः—त्यांनीं कोणास म्हटलें कीं राजा हो तर तो राजा बनतो !

मित्रः—असें आहे काय ? ( इतक्यांत गाडी चालूं लागते ).

---

## नारायण हरी ऊर्फ दाजीसाहेब नातू

[ सरदार, म्युनिसिपल कौन्सिलर, पुणें. ]

( १ ) सन १९१४ सालची गोष्ट. लोकमान्य टिळक नुकतेच सुटून आले होते. त्यावेळेस माझे चुलते कै० श्री० बाळासाहेब नातू व माझे वडील कै० श्री० तात्यासाहेब नातू हे त्यास भेटावयास गेले होते. त्यावेळीं कै० अण्णासाहेब पटवर्धन यांचे अध्यक्षतेखालीं गायकवाडवाड्यांत अभिनंदनपर सभा झाली. त्यावेळेस वरील नातुबंधूनीं हजर रहावें अगर नाहीं अशाबद्दल चर्चा झाली. तेव्हां लोकमान्य एकदम म्हणाले, " अहो, बाळासाहेब भिण्याचें काय कारण आहे ? सरकारनें जोपर्यंत तुम्हांस अशा तऱ्हेची बंदी केली नाहीं तोंपर्यंत तुम्ही खुशाल सभेस या. सरकारचे कायद्यास जपलें म्हणजे झालें. " अशा प्रकारचे उद्गार निघताच माझे चुलते व वडील त्या समारंभास हजर राहिले.

( २ ) माझे वडील सन १९१४ चे सप्टेंबर महिन्यात वारले. त्यावेळीं मी लोकमान्य टिळक यांस भेटावयास गेलों असतां त्यांस अत्यंत वाईट वाटलें. त्यावेळीं त्यानीं काढलेले उद्गार अजून माझे कानात दुमदुमत आहेत. " काय करावें ! पेशवाईचा काल असतां तर तात्यासाहेब हे एका पथकाचे सेनापती झाले असते. घोड्याची विद्या इतक्या उत्तम तऱ्हेनी अवगत असून तिचा व्यर्थ दुरुपयोग मात्र झाला. " एवढे झाल्यावर ते मजकडे वळून म्हणाले, " त्यांचें रायडिंग स्कूल चालू ठेवा बरें. " परिस्थितिमुळें मला ती गोष्ट करता येत नाहीं याबद्दल अत्यंत खेद होतो आहे. पण हे शब्द जिवास लागून राहिले आहेत.

( ३ ) कै० श्री० बाळासाहेब व लोकमान्य हे एकमेकाचे अत्यंत जिवलग दोस्त. त्यांचे अंतकालचे दुखण्यांत लोकमान्य रोज आमचे वाड्यांत येत असत. कै० बाळासाहेबांचे अखेरचें मृत्युपत्र लोकमान्यांचे आग्रहामुळेंच झालें. ज्या दिवशीं बाळासाहेब वारले त्या दिवशीं लोकमान्य आमचे वाड्यात ही बातमी समजताच आले. एका खांबाशीं डोके टेकून विषण्ण चित्तानें बसले. त्यावेळीं त्याचे डोळ्यां-तून टपटप अश्रुबिंदु पडत होते. त्यानीं काढलेले दुःखोद्गार अजून मला स्मरत आहेत. " आज माझे विश्वासाचा सरदार नाहींसा झाला. " खरोखरच टिळ-कांचा व आमचे दादांचा अकृत्रिम स्नेह. वरील उद्गारानें आमचें सर्वांचें डोळे पाण्यांनीं भरून आले.

---

## सीताराम विष्णु ळळीत

[ माजी 'लोकसेवक' पत्राचे संपादक, 'मुंबई कौन्सिल–स्वराज्यपक्षा'चे अ० सेक्रेटरी, पुणें. ]

( १ ) सन १९१४ सालीं लोकमान्य मंडालेहून सुटून परत आले त्यावेळीं ते अमुक दिवशींच परत येतील असें प्रथम निश्चितपणें प्रसिद्ध करण्याचा मान 'लोकसेवक'कडे होता. कारण बहुताची समजूत आणखी ४।५ महिने लोकमान्यांची सुटका लांबेल अशीच होती. माझे मित्र रा० मंडलीक हे त्यावेळीं 'लोकसेवक'मध्यें लेख देत असत. त्यानीं जेल मॅन्युअलवरून हिशेब केला व आम्हां दोघांतिघास तोच योग्य वाटून आम्हीं त्याप्रमाणें प्रसिद्ध केले. लोकसेवकाच्या या कृतीनं त्यावेळीं एक दिवसाकरितां जी थोडी गमत उडाली ती पुण्यांतील सर्व मंडळींच्या माहितीचीच असल्यानें त्याबद्दल सविस्तर हकीकत देणेचें कारण नाहीं. असो. सुटका होऊन लोकमान्य मुंबईस आल्यानंतर त्यांनीं आपल्या लहानसान सर्वच अनुयायास भेट दिली त्यातच त्यांनीं 'लोकसेवक' कार्यालयासहि, पानसुपारी स्वीकारून भेट दिली होती. त्यावेळीं आरंभीं सांगितलेल्या लोकमान्यांच्या सुटकेचा अदाज प्रसिद्ध करण्याच्या अपराधाबाबतच अलस्थ कळ फिरून तत्वविवेचक छापखान्यास 'लोकसेवक' पत्र यापुढें प्रसिद्ध करू नये अशी तबी मिळाली होती. व म्हणून एका स्नेह्यांचे मदतीनें एक हॅंडप्रेस चवथे मजल्यावर स्वयपाकघरात बसवून कसे तरी वर्तमानपत्र काढीत होतों. लोकमान्यांनीं मुद्दाम स्वयपाकघरापर्यंत जाऊन ती सर्व व्यवस्था पाहून उपदेश केला कीं, "तुम्हा तरुण मडळीला निराश होणेंचें कांहींच कारण नाहीं. आम्हास यापेक्षांहि मोठमोठ्या अडचणींतून जावें लागलें आहे." असें म्हणून स्वतःच्या तरुणपणची हकीकत सांगितली कीं, "मला स्वतःला डोकीवरून केर्सास वाहून नेणेचें प्रसग आलेले आहेत. दिवसा तसें केल्यास लोक हंसतील म्हणून रात्रौ काळोख पडेतों थाबून मग वाहून नेत होतों इतकेंच !"

( २ ) योग्य व इष्ट कार्य घडून येत असले तर सत्याचे फाजील स्तोम माजवावयाचें नाहीं हा लोकमान्याचा बाणा सुप्रसिद्धच आहे. या धोरणाचें वाजवी स्वरूप निःसदेहपणे पटवून देण्यासारखा एक प्रसंग लखनौस घडला. राष्ट्रीयसभेंत परत घुसण्याचा प्रयत्न राष्ट्रीय पक्षाने लखनौसच प्रथम केला. व त्यावेळच्या नियमाप्रमाणें ऑल इंडिया कमिटीच्या सभासदांशिवाय तितकेच आणखी सभासद विषयनियमक मंडळीकरितां प्रतिनिधींनीं निवडून द्यावे अशी वहिवाट असल्यानें, व मुंबई इलाखाच सर्व तंट्याचें मूळ म्हणून मुंबईचे मतास विशेष प्राधान्य असल्यानें तें मत आपल्या हातचें जाऊं नये याबद्दल लोकमान्य स्वाभा-

भिकपणेंच हजर होते. ऑल इंडिया कमिटीचे जे सभासद त्यावेळीस हजर होते ते निवडणुकीच्या मंडळाचे सगळेच सभासद असल्यानें व सर्व नेमस्त पक्षाचे असल्यानें त्या पक्षाचीं तेरा मतें आयतींच सिद्ध होतीं. असें असून प्रतिनिधींनीं निवडायच्या पंधरा सभासदांपैकीं निम्मेनिम् जागा वाटून घ्यावा असें ते म्हणूं लागले. हा डाव लोकमान्य कसचा चालू देतात! महात्माजींनीं मध्यस्थीचा उपक्रम केल्यामुळें एकामागून एक अनेक सूचना पुढें येऊं लागल्या. पण प्रांतिक मत आपल्या हातचें जाऊं द्यावयाचें नाहीं हा लोकमान्यांचा निश्चय असल्यानें त्या सर्व सूचना नापास झाल्या. अखेरची म्हणून तडजोड लोकमान्यांनीं अशी सुचविली कीं, 'तुमचे तेरा सभासद हजरच आहेत. व एक सकाळीं येणार. मिळून चौदा. तरी आमचीं आमचीं चौदा मतें कायम ठेवून मध्यस्थ म्हणून महात्माजींस पंधरावें घालू. म्हणजे ते ज्या बाजूस मत देतील त्या बाजूचें बहुमत.' अशा रीतीनें सर्व जबाबदारी महात्माजींवर टाकण्याचें योजिलें. पण त्यांत अट अशी ठरली होती कीं, ही सूचना पसंत असल्याबद्दल रात्रीं बारा वाजेपर्यंत तरी जबाब आला पाहिजे. नाहींतर ( महात्माजी त्यावेळेस स्वराज्यसंघास सामील होण्यास नाखूष असल्यामुळें ) पूर्वीचें तिकीट कायम समजून महात्माजींचें नांव दाखल करितां येणार नाहीं. कर्मधर्मसंयोग कीं, परत निरोप आलाच नाहीं. अर्थात् महात्माजींचें नांव न घालताच पूर्वीचें तिकीट कायम झालें. सकाळीं निवडणुकीचे वेळीं मंडळी अर्थात् तिकीटांतील नांवें पाहून मत देऊं लागली. महात्माजींचें नांव पुकारताच तिकीटांत नांव नसल्यानें बहुमत विरुद्ध गेलें व कांहीं नेमस्त बंधूंनीं शेमशेम म्हणून गिल्लाहि केला. पण लोकमान्यांचे प्रसंगावधान कायम होतें. त्यांनीं महात्माजी निवडून आले असाच निकाल जाहीर केला! मंडळी तोंडाकडेंच पाहात राहिली! पण लोकमान्यांचा हेतु व दूरदृष्टि जाणून तक्रार कोणीच केली नाहीं. निर्भेळ सत्यच श्रेष्ठ कीं. लोकमान्यांची ही सत्कार्यनिष्ठा श्रेयस्कर हा वाद थोरामोठ्यांचा आहे. पण सामान्य जनांनीं सामान्य बुद्धीनें केलेल्या व्यवस्थेकडे दुर्लक्ष करून आपल्या मोठेपणास साजेल असेंच लोकमान्यांनीं याप्रसंगीं वर्तन केलें, असें म्हटल्यावांचून राहावत नाहीं यासच 'शाठ्य' म्हणावयाचें असेल तर इलाज नाहीं.

---

## नारायण चिं. आठवले

[ कॉन्ट्रॅक्टर, पुणें. ]

लोकमान्य विलायतेहून परत आल्यावर थोड्याच दिवसांनीं येथील प्रसिद्ध गजानन मॅचेलार्कचे मालक रा० रा० एस्. जी. येवलेकर यांनीं श्री कसब्याच्या गणपतीच्या देवळांत लोकमान्यांप्रीत्यर्थ चतुर्थी केल्यावेळीं तेथें मी प्रसादाकरितां गेलों होतों. त्यावेळेस भोजनोत्तर आहेर व पानसुपारी झाल्यानंतर तेथील प्रमुख मंडळींनीं दोन शब्द बोलण्याबद्दल विनंती केल्यावरून श्रीगजाननासंबधानें लोकमान्यांनीं मार्मिक चार वाक्यें उच्चारलीं तीं संस्मरणीय असल्यामुळें आठवणींच्या पुस्तकांत घालण्याकरितां मुद्दाम देत आहे.

"श्रीगजानन हा विघ्नहर्ता आहे. प्रपंचांत विघ्नें आल्याशिवाय तो हरण तरी काय करणार? कोणत्याहि कार्यास आरंभच केला नाहीं तर विघ्नें येतात कशाला? ज्याअर्थीं गजानन हें दैवत विघ्न हरण करण्याकरितां जाग्रत आहे, त्याअर्थीं प्राणिमात्रानें कार्यारंभ केलाच पाहिजे हे सिद्ध होत आहे. याकरितां विघ्नें हीं येणारच व तीं गजाननमहाराज निवारण करणारच. यावरून ह्या देवतेचें अस्तित्व असें सुचविते कीं, आपण फलाची आशा न करतां, व विघ्नें येतील म्हणून न घाबरतां सदैव कर्म करीतच राहिलें पाहिजे."

---

## विनायक विष्णु बापट

[ एल्. एम्. अँड एस्. डॉक्टर, वर्धा ]

( १ ) श्रीगणेशोत्सवांतील व्याख्यानांत एक वेळ लोकमान्य म्हणाले कीं, 'संत तुकाराममहाराज यांस होऊन गेल्यास अडीचशें वर्षे झालीं तरी अद्यापपावेतों त्यांचे पाठीमागेंसुद्धां पंढरपुरास दरवर्षी लाख दोन लाख यात्रा जमते व आम्ही आज इतकीं वर्षे राजकीय चळवळ करीत आहोत, परंतु आमचे राष्ट्रीय सभेस पुरते पांच हजार लोकहि जमत नाहींत!'

( २ ) लोकमान्यांचे ज्युबिलीचे प्रसंगीं गायकवाडवाड्यांत त्यांस पोषाख समर्पण करण्याचा समारंभ झाला. त्यावेळीं प्रख्यात देवल सर्कसचे मालक तेथें हजर होते व त्यांस अनुलक्षून देशभक्त कृ० आ० गुरुजी म्हणाले कीं, कित्येक नाठाळ व दांडग्या घोड्यांस रा० देवल यांनीं आपले मनाप्रमाणें उत्तम काम करावयास लाविलें आहे, परंतु लो० टिळक हे आज इतकीं वर्षे त्यांचे मनाजोगता

राजकारणी पुरुष तयार करण्याचा प्रयत्न करीत आहेत, परंतु त्यास तसा पुरुषच मिळत नाहीं.

( ३ ) होमरूल लीगचे वार्षिक अधिवेशनाच्या वेळेस कांहीं टीकेस उत्तर देताना कांहीं बन्हाडी लोकांनीं मर्यादा सोडून भाषणें केलीं. रा० न० चिं० केळकर यांचें भाषण मात्र मुद्देसूद व सडेतोडीचें झालें. सभा संपल्यावर कोणी लोकमान्यांस प्रश्न केला कीं, 'आपण अध्यक्षस्थानीं असतांना वक्त्यांस असें कां वाहवूं दिलेत?' त्यावर ते म्हणाले, "अहो, ही तुमच्याकडचीच मंडळी होती, आपलेच दांत व आपलेच ओंठ, तेव्हां मला त्याना लगाम घालतां येईना. स्वतः बोलणारानें तरी कांहीं विवेक केलाच पाहिजे कीं नाहीं?"

( ४ ) महात्मा गांधी व खिलाफतीचे पुढारी यांत बोलणीं सुरू झालीं होतीं. 'केसरीं'त महात्मा गांधींच्याविरुद्ध एक शब्दहि येत नसे. परंतु असहकारितेला सबळ पाठिंबा दिला जात नसे. याचें कारण लोकमान्यांस विचारता ते म्हणाले, 'जर मुसलमान लोक आपणास पूर्णपणें येऊन मिळाले तर मी या चळवळीस पूर्ण पाठिंबा देईन, तोंपर्यंत मी तिऱ्हाईतपणा स्वीकारला आहे.'

( ५ ) माझे भाचीचें लोकमान्यांच्या घावस्या चिरंजीवाशीं लग्न ठरविण्याकरितां मी लोकमान्याकडे गेलों होतों. मुलगी पसंत झाल्यावर साहजिकच मी हुंड्याचा प्रश्न काढला. त्याबरोबर त्यांनीं ताडकन् उत्तर दिलें कीं, "तुम्ही काय करावयाचें तें करा; मला हुंडा नको." मी म्हणालों, ' बरें, पण करणीसबधानें तरी खुलासा व्हावा म्हणजे पुढें रुसवारुसवीस जागा राहाणार नाहीं. ' त्यावर ते म्हणतात, "अहो, तुम्ही दोन्ही बाबतींत निर्धास्त असा. आमचे येथें रुसावयाला कोणी नाहीं; व तसं काहीं झाल्यास मी पाहून घेईन. बोलक्या सुधारकांना मला अनुभव आहे. एका मित्राचे कार्यांत तो असाच नाडला गेल्यामुळें ऐनवेळीं मला सावकाराचें घर पाहून समजूत काढावी लागली." या गोष्टीवरून सोशल कान्फरन्सची आठवण होऊन ते म्हणाले कीं, "तुमचेकडील एक बडे गृहस्थ हुंड्याचे ठरावावर संमत भाषण करणार होते, हें मला कळतांच मी सेक्रेटरीस कळविलें कीं, हुंजोरा देणाऱ्याचे यादींत माझे नाव घाला. हे त्या गृहस्थास समजताच ठराव पुढें घेण्याचे वेळेस हे गृहस्थच हजर राहिले नाहींत!"

---

## श्री० सारजाबाई बापट

[ काव्यकल्पता B, P. N. A. पुणें. ]

सन १९१७–१८ सालची गोष्ट. माझी भाची काव्यचंद्रिका सौ० राधाबाई आपटे यांनीं सचित्र कीर्तनसुधा नावाचें एक पुस्तक लिहिलें आहे. त्यावर लोकमान्यांचा अभिप्राय असावा अशी तिची भारी इच्छा होती. हें अवघड कार्य होणार तरी कसें या विवचनेंत आम्ही पडलों. वैद्यपंचानन कवडेशास्त्री यांचे मार्फत काम झालें तर पाहावें असें वाटून त्यांना विचारलें. त्यांनीं सांगितलें कीं, ' हें काम तुम्ही स्वतः गेल्यास जेवढ्या सुलभ रितीनें होईल तितकें तें दुसऱ्या मार्गानें होणार नाहीं.'

यानंतर मी, स्वतः सौ० राधाबाई आपटे व माझा भाऊ (रा० ग० श्री० आठवले स० ओव्हरसिअर) इतकेजण गायकवाडवाड्यात गेलों. मी येण्याचे कारण आपल्याकडून थोडक्यात सांगितले; मी म्हणालें " पुस्तक भाऊबीजेला बाहेर पडलें पाहिजे याकरिता आपला अभिप्राय मिळाल्यास फार उपकार होतील."

यावर ते सौ० राधाबाईकडे पाहून म्हणाले " मी यांना कुठेंतरी पाहिलेसे वाटतें. मला वाटते मी यांना १९०६ सालीं बेळगावीं पाहिलें असावें. भास्करराव ओंकार याच्या ह्या कोण ?"

मी उत्तर दिले " ही त्याची मुलगी आहे."

नंतर ते म्हणाले–" आतां बरोबर. राधाबाई चांगलें कीर्तन करतात असें मी ऐकलें आहे. स्तुत्य उद्योग आहे. मला कीर्तन फार आवडतें. स्त्रियांनीं उगीच समान हक्काच्या भानगडींत पडून राजकारणासारख्या गुतागुंतीच्या विषयांत न लुडबुडता आमचा धर्म त्यांनीं संभाळावा हेंच उत्तम व हितकर आहे असें माझें मत आहे. तुळशीचीं रोपटीं जर कोणी जतन अजूनपर्यंत केलीं असतील तर तीं आमच्या बायकानींच. स्वार्थ व परमार्थ साधण्यास अगदी जवळचा मार्ग म्हणजे कीर्तन होय. प्रपंच साधून परमार्थ साधून देण्यास कीर्तन हें उत्तम साधन आहे. धार्मिक आख्यानाबरोबर ( राधाबाईकडे वळून ते म्हणाले ) तुम्ही ऐतिहासिक आख्यानेंहि थोडींथीं बसवा. त्या आख्यानद्वारा तुम्हास सहजासहजीं जनतेस आपल्या कर्तव्याची ओळख पटवून देतां येईल. शिवाजीचें आख्यान कीर्तन विषयास सर्व तऱ्हेनें बोधप्रद असें आहे. तसल्या आख्यानाची राष्ट्रास फार जरूरी आहे. कीर्तन हा माझा जिव्हाळ्याचा विषय आहे. (नंतर मजकडे वळून ते म्हणाले) द्या तें तुमचें कीर्तनाचें पुस्तक मजकडे. मी तें वाचून उद्या अभिप्राय लिहून तुमचेकडे पाठवून देतों. यानंतर त्यांनीं माझ्या काव्यासंबधीं उत्तेजनपर चार शब्द बोलून आम्हास निरोप दिला.

इतक्या सुलभ रीतीनें आमचें कार्य झालें,याबद्दल आम्हांस फार आनंद झाला. एवढे मोठे गृहस्थ परंतु आमच्या सारख्या अगदीं सामान्य जनाशीं इतक्या सलो-ख्यानें व आपलेपणानें बोलतांना पाहून त्यांच्या बद्दलची आमची पूज्यबुद्धि दृढ-तर झाली. आम्हास त्यांच्या स्मरणशक्तीचें कौतुक वाटलें. १९०६ सालीं त्यांनीं माझ्या भाचीला ती अवघी दहावर्षांची असताना बेळगांवीं श्री० नरगुंदकर वकिलांचे येथें पाहिली होती त्याचे त्यांना या वेळीं नेमकें स्मरण झालें, याचें आम्हास नवल वाटलें.

---

## गणपत अंबादास जोशी

[ उमरखेड, वऱ्हाड ]

(१) इसवी सन १९१८ सालची गोष्ट. लो० टिळकांची स्वराज्याची मोहीम वऱ्हाडात सुरु झाली, त्यावेळीं लोकमान्य पुसदला येणार असें जाहीर झालें होतें. लोकमान्यांच्या सेवेकरतां ज्या स्वयंसेवकाची निवडणूक झाली होती, त्यांत मी एक होतों. स्नान करीत असतां लोकमान्यांनी सहज आम्हास प्रश्न केला "तुम्ही शाळेंत असाल, नाहीं ?" त्यावर मी 'होय' म्हटलें. लोकमान्य आश्चर्यानें म्हणाले, "मग तुम्ही आमच्या कामास कसे आलांत ?" मी पुन्हा म्हटले "आम्ही सर्वजण (कांहीं एकदोघे सोडून) उमरखेड येथील संस्कृत पाठशाळेंत शिकत असतो." हे ऐकतांच लोकमान्यांस पराकाष्ठेचा आनंद झाला व पाठशाळेविषयीं काहीं माहीती विचार-ल्यावर ते मोठ्या प्रेमानें व अभिमानानें आम्हास म्हणाले:—

"तुम्ही संस्कृत विद्यालयात शिकतां हे ऐकून मला फार आनंद झाला. केवळ इंग्रजी शिक्षण घेऊन पौर्वात्य विद्येस नावे ठेवणाऱ्या सुशिक्षितांच्या डोळ्यांत अंजन घालून व त्यांना आपल्या ऋषींच्या अपूर्व ज्ञानाची जाणीव करून देऊन त्यांच्यांत स्वाभिमान उत्पन्न करण्याची जबाबदारी तुमच्यावर आहे, हें लक्षांत ठेऊन अभ्यास करा. तुम्ही भावी समाजाचे वसिष्ठ—वामदेव झाले पाहिजे. जुन्या शास्त्रीपंडितांप्रमाणें एकांगी शिक्षण घेऊं नका. पुढच्या काळात समाजास तुमचा फार उपयोग होईल. व त्यावेळीं जुन्या विद्येची आवश्यकता भासेल तेव्हां ती विद्या शिकलेले लोक दुर्मीळ होतील. लवकरच लोकांत जागृती होईल जेव्हां धार्मिक शिक्षणाच्या शाळा निघून त्या विषयास फार महत्त्व येईल. तेव्हां तुमचें फार महत्त्व वाटेल. आमच्या कार्याचे खरे आधारस्तंभ विद्यालयात पूर्व-विद्येचें शिक्षण घेतलेले लोकच होत." याप्रमाणें बराच वेळ उपदेश सुरू होता.

हा उपदेश करीत असतांना लोकमान्यांचे अर्धे आंग भिजलें होतें. मध्येंच स्नान थांबवून ते आमच्याशीं बोलत आहेत हें पाहून एक गृहस्थ लोकमान्यांस म्हणाले– 'आधींच आपली प्रकृति बरोबर नाहीं. तशांत हे ओल्याने बसणें सोसवणार नाहीं.' लोकमान्य किंचित् अभिमानानें म्हणालेः–"अहो, दोन दोन तास पाण्यांत डुबण्यानें जर मी एकहि दिवस आजारी पडलों नाहीं, तर आता घटकाभर अर्धे-ओलें बसल्याने मला काय होणार ?" लोकमान्यांचा हा आत्मविश्वास पाहून सर्वांना त्यांच्याविषयीं मोठें आश्चर्य व आदर वाटला.

(२) वऱ्हाडांतील जनता साधारण बरीच अशिक्षित आहे. लोकमान्य कोण काय वगैरेंची संपूर्ण माहिती असलेले लोक अद्यापहि शे० २५ पेक्षां जास्त सांपडतील असे वाटत नाही. तथापि त्यांचे नाव मात्र सर्व आबालवृद्धांच्या तोंडीं आहे. लोकमान्य पुसदला येणार असें कळतांच हजारो लोक कोणी बैल-गाडीनें, कोणी चालत असे बरेच लांबून त्यांच्या दर्शनाकरतां आले होते जवळ जवळ एकंदर लोकसमुदाय पधरा हजारांच्यावर असेल. लोकमान्य मोटारींतून उतरतांच लोक त्याच्या पायांवर नमस्कार घालण्याकरता जाऊं लागले. पण त्यांच्या पायास कांहीं दुखापत झाली असल्यामुळें कोणीहि त्यांच्या पायास स्पर्श करूं नये असे ठरविले होतें व सर्वांना सागण्यांत येत होते. तरी पण लोक ऐकेनांत हें पाहून त्याच्या बरोबरच्या एका गृहस्थानें आपल्या हातातील छडीने एकदोघास कांही तडाखे देऊन दूर केलें. लगेच लोकमान्यांनीं त्याना थांबविले व पुढे गेले. घडलेला प्रकार पाहून त्यांना जो कळवळा आला त्यामुळे घटकाभर त्याच्या तोंडांतून शब्द निघेनात व डोळ्यात पाणी खेळू लागले ! ते म्हणालेः– 'माझ्या करता आपण मार सहन करीत आहात अं ! ' हें वाक्य बोलताच त्याचा कंठ सद्गदित झाला. व त्यांना जो प्रेमाचा उमाळा आला त्यामुळे बराच वेळ पुढे बोलता येईना. नतर त्याचें व्याख्यान वगैरे झाले.

( ३ ) लोकमान्याच्या गोष्टीच अशा कांहीं आहेत कीं, त्या पाहतांच अथवा ऐकतांच त्याच्या अलौकिकत्वाची साक्ष पटते. लोकमान्य पुसदला आले तेव्हां तेथें यवतमाळ जिल्हा परिषदेचे अधिवेशन ठरले होते. व त्याकरता तयार केलेल्या मंडपांतच लो० टिळकांचें व्याख्यान ठरलें होतें. त्यामुळें मंडप अगदीं चिकार भरून गेला होता. हजारो लोक बाहेर उभे होते. आंत लोकमान्यांचें व्याख्यान सुरू झाले. तेव्हां बऱ्याच लोकांस असे वाटू लागले कीं, आपण इतक्या लांबून येथे येऊनहि आपणांस लो० टिळकांचे शब्द ऐकवयास सांपडत नाहींत. व त्यांची मूर्तीहि दिसत नाहीं.

लोकांनीं मंडपाचे भोवताली बांधलेले पत्रे व तट्टे पार सोडून टाकले तरीहि सर्वांना दिसण्याची व ऐकू जाण्याची व्यवस्था झाली नाहीं. हें पाहून लो० टिळकांनीं आपले मंडपांतील व्याख्यान संपविले. व उन्हानें तापलेल्या वाळ-

तंटांत पुन्हां दुसरें व्याख्यान देण्याची तयारी केली. ती वेळ अगदीं भर दोन प्रहरची असून लोकमान्य उपाशी होते. हें पाहून एकदोघा जणांनीं ' आपणास फार श्रम होतात, आपली प्रकृति नादुरुस्त आहे ' असें सुचवून व्याख्यान न देण्याविषयीं सांगितलें. ( त्यावेळीं लोकमान्य केवळ फळें व सातू यावर राहात असत.) पण लोकमान्य निश्चयानें व विनोदानें म्हणालेः—"अहो, आजचा दिवस स्वराज्याच्या पंढरीचा आहे. नदीच्या कांठीं आपण सर्वांनीं मिळून भजन केल्यास आपणास विठोबाचें दर्शन लवकर होईल. आपण त्रास न पडूं देता एवढ्या लोकांची निराशा केल्यास देव आपणावर रागवणार नाहीं का ?" हें ऐकून सर्व-जण स्तब्ध झाले व घामाच्या धारा अंगांतून सारख्या चालत असतांना सुद्धा लोकमान्यांनीं उन्हांत उभें राहून दुसरें व्याख्यान दिलें व सर्वांची इच्छा पूर्ण केली.

( ४ ) लोकमान्यांचें स्नान फराळ वगैरे सर्व आटोपल्यावर उमरखेडचे कै० श्री० रामशास्त्री पंचपुत्र यांनीं लिहून आणलेलें संस्कृत मानपत्र त्यांना समर्पण केलें. मानपत्र छापलें नव्हतें तरी हस्ताक्षर इतकें सुंदर लिहिलें होतें कीं, क्षणभर लोकमान्यांस सुद्धा तें छापीलच वाटलें. मानपत्राची भाषा संस्कृत व प्रौढ असल्यामुळें इतरांस तें समजणें शक्य नव्हते. तथापि तें वाचून दाखविलें. लोकमान्यांच्या हातांत मानपत्र येताच त्यांनीं तें एक वेळ साग्र वाचलें. व शास्त्रीबुवांच्या संस्कृत भाषेबद्दल सानंद समाधान व्यक्त केलें. मानपत्रांत लेखकांनीं सहेतुक असो वा निर्हेतुक असो. एक शब्द अगदीं नवीनच असा ' मषिप्रसू ' हा लेखणीवाचक लिहिला होता, चटकन लोकमान्यांच्या गरुड—दृष्टींत तो शब्द आल्याबरोबर त्यांनीं त्याबद्दल शास्त्रीबुवांस विचारलें व असले नवीन शब्द बनविण्याच्या हातोटीबद्दल त्यांचें अभिनंदन करून लोकमान्य म्हणाले:—"संस्कृत-भाषा ही किती पूर्णत्वाला पोंचली आहे याचें हे नवीन शब्द उत्तम द्योतक आहेत." या विषयावर त्यांनीं बराच वेळ आपला वाक्प्रवाह सुरू ठेवला होता. तें सर्व पाहून त्यांच्या अवलोकनशक्तीचें सर्वांना आश्चर्य वाटलें.

---

# जनार्दन सीताराम जोशी

[ बी. कॉम्, गव्हर्मेंट ऑफ इंडियाकडे नोकर, सिमला-दिल्ली. ]

(१) सन १९०७ सालचे २७ मार्च रोजीं लोकमान्यांचे भाचे धोंडोपंत विद्वांस यांच्या ज्येष्ठ कन्येचा विवाह करण्याचें ठरलें होतें. व्याही मंडळी त्याच दिवशीं मुंबईहून आदल्या रात्रीं मद्रास मेलनें निघून पुण्याच्या स्टेशनवर पहांटे १॥ वाजण्याचे सुमारास यावयाची होती. त्यांस उतरून घेण्यास तेवढ्या पहांटेस धोंडोपंतांबरोबर एकट्या टिळकांस आलेले पाहून व्याहीमंडळीस साभिमान कौतुक वाटलें ज्या लोकमान्यांचा आदरसत्कार करण्याकरितां किंबहुना त्यानां निव्वळ एकवेळ डोळेभरून पाहण्याने आपल्या डोळ्यांचें पारणें फेडण्याकरितां हजारों लहानथोर मंडळी तासाचे तास तिष्ठत राहाण्यात सुख मानतात तेच लोकमान्य त्या दिवशीं पहाटे लोकमान्यांपेक्षां लोकप्रियतेंत कमी योग्यतेच्या व्याहीमंडळींकरितां स्टेशनवर तिष्ठत बसलेलें पाहून त्यांस लोकमान्यांच्या निराभिमानीपणाबद्दल सादर कौतुक व अहेतुकपणें का होईना तिष्ठत रहावें लागल्याबद्दल संकोच वाटावा यात नवल काय !

( २ ) १९०८ सालीं टिळकांवरील राजद्रोहाबद्दल झालेल्या खटल्यापूर्वी त्यांचे स्नेही ना० दाजीसाहेब खरे यांच्या मुंबई येथील बंगल्यावर त्यांची गांठ पडली असतां मी कॉमर्स ( व्यापारी शिक्षण देण्याऱ्या ) कॉलेजमध्यें शिकत असल्यामुळें त्यांनीं मला जे अनेक प्रश्न विचारले व विधानें केलीं त्यांवरून त्यांच्या हरएक विषयांत दिसून येणाऱ्या बुद्धीच्या कुशाग्रतेबद्दल, उच्च शिक्षण घेऊन विश्वविद्यालयांतून बाहेर पडणाऱ्या पदवीधरांची कशा प्रकारची लायकी असावी याबद्दल व पांढरपेशा तरुणांनीं नवीन यांत्रिक युगात कशा प्रकारचे धंदे करणें त्यांस पसंत होतें याबद्दल नीट कल्पना आली.

( ३ ) इंटर कॉमर्स परीक्षेला Double-entry Elementary Accountancy हा विषय शिकवितात परंतु Advanced Accountancy & Auditing हा विषय B. Com. डिग्री परीक्षेला अनेकांपैकीं एक ऐच्छिक विषय म्हणून ठेवलेला आहे डिग्री परीक्षेकरितां त्यावर्षी तो विषय पुष्कळच मुलांनीं घतलेला असून पुष्कळ मार्क मिळवून पहिल्या वर्गात पास होणें तो विषय पसंत करणाऱ्या मुलांस सुलभ जातें. तरी पण मी स्वतः फारच थोड्या मुलांनीं पसंत केलेला परंतु देशाच्या आर्थिक परागतीबद्दल ज्ञान प्राप्त करून देणारा Advanced Economics हाच ऐच्छिक विषय पसंत केला असल्याचें ऐकून लोकमान्य म्हणाले, ' परीक्षेंत पहिल्या वर्गात पास होणें न होणें यावर पुढील आयुष्यक्रमातील यशापयश जरी अवलंबून नसलें तरी पण नवीन आयुष्याच्या सुरवातीच्या वेळीं त्याचा थोडाबहुत

फायदा होतो हें मानणें चुकीचें नाहीं. करितां ऐच्छिक विषय पसंत करताना शक्य तर पहिल्या वर्गात पास होण्यास अनुकूल असा विषय पसंत करणें श्रेयस्कर होय. तथापि आपल्या 'कॉलेजांत जितके 'म्हणून' विषय शिकविले जात असतील तितके सगळे त्या कॉलेजातून पास होऊन बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांनें आपलेसे करावे' व त्यानिमित्त शक्य तर त्या त्या विषयात परीक्षा द्याव्या.

उद्या माझ्या बी० ए० व एल्‌एल्० बी० च्या (डिग्रीज) पदवी काढून घेतल्याचे सरकारनें किंवा तदनुरोधानें चालणाऱ्या मुंबई विश्वविद्यालयानें ठरविल्यास त्याचा मला थोडाहि विषाद वाटावयाचा नाहीं, कारण त्याचा मला माझ्या व्यवसायात काडीइतकाहि फायदा नाहीं. मला कोणी कोणच्याहि विषयावरचें पाचशेंपर्यंत पानें असलेलें पुस्तक आणून 'दिल्यास व त्याला पूर्ण विषयानुक्रमणिका व सूची असल्यास तें मी दोनतीन तासात सहज वाचून टाकीन; कारण पुस्तक कसे वाचावे व कोणते भाग वाचल्यास सर्व पुस्तक वाचण्याचे कार्य अल्प काळात होईल हें मला चांगलें कळतें. अशा तऱ्हेने पुस्तकें वाचता येणें हीच विश्वविद्यालयातून पसार होणाऱ्या पदवीधराच्या योग्यतेची कसोटी होय असे मी समजतों." त्यांच्या सदर उद्गारावरून विश्वविद्यालयाच्या पदव्यांच्या थोरवीची मर्यादा काय याचा वाचकानीं बोध घ्यावा व आपणा पदवीधरांपैकी कितीजणास लोकमान्यांनीं दर्शित केलेली योग्यता प्राप्त झाली आहे याचा आत्मप्रत्यय घ्यावा.

(४) बी० कॉम्० पदवीपरीक्षा पास झाल्यावर मी अमुकच करण्याचे निश्चित केलेलें नसल्यामुळें काय करावें अशाबद्दल सल्ला विचारला असता लोकमान्य म्हणाले, "ब्राह्मणवर्गामध्यें कारकुनापासून प्रधानमन्त्र्यापर्यंत सर्व दर्जाच्या जागेवर लोक होऊन गेलेले आहेत; न्यायखात्यात वकील, बॅरिस्टर, ॲडव्होकेटपासून हायकोर्ट जजाच्या जागेपर्यंत चढलेले ब्राह्मण कमी नाहींत, शिक्षणखातें व शास्त्रीय ज्ञान यामध्यें पारंगतता मिळविलेलेहि पुष्कळ आहेत; व्यापकअर्थी दलालीचे, देवघेवीचे, व किरकोळ उत्पादक धंदे करणारे विपुल जरी नाहीं तरी थोडेबहुत लोक आहेत. परंतु कापसाच्या किंवा लोंकर, रेशीम, ताग वगैरेंच्या गिरण्यात Mill-manager, managing director वगैरे विशेष जबाबदारीचीं कामें करणारा ब्राह्मण इसम अगदीं विरळा आहे, ही गोष्ट माझे मनाला लागून राहिली आहे." त्यांनीं मला त्या दिशेनें प्रयत्न करण्यास सांगितलें व तशा तऱ्हेचें काम शिकण्यास प्रवेश मिळवून देण्याचें अभिवचनहि दिलें. मला श्वासविकार असल्यामुळें कापसाच्या गिरणींत काम करणें अहितावह असल्याकारणानें त्याचा उपदेश माझ्या बाबतींत सफल झाला नाहीं, परंतु तो उपदेश येथें नमूद करून पुढील पिढीपैकीं कोणी होतकरू इसम त्यांची इच्छा सफल करो असें मी मनापासून इच्छितों.

---

## बळवंत गणेश दाभोळकर

[ केसरी ऑफिसांतील पहिले कारकून, प्रकाशक दाभोळकर-पुस्तकमाला, पुणें. ]

( १ ) सुमारें ६।७ वर्षांपूर्वी टिळकांकडे मी बसलो असतां कर्नाटककडील एक सामुद्रिक पाहाणारा मनुष्य आला होता. आपला फार लौकिक आहे, करितां आपला हात दाखवा असें तो टिळकांस म्हणाला. टिळकांनीं त्याला माझा हात प्रथम पाहण्यास सांगितलें. माझा हात पाहून कांहीं गोष्टी सांगून झाल्यावर त्याने टिळकांचा हात पाहण्याविषयीं पुनः पृच्छा केली. तुम्हांस ७५ वर्षांचें आयुष्य आहे म्हणून त्याने त्यांस सांगितलें. मध्येंच तो म्हणाला कीं, तुमच्या मनातलें मी जाणतों: मला काय द्यावें, म्हणून तुम्ही आतां विचार करीत आहा; काय देणार तेहि मी सांगू शकतों. टिळक म्हणाले, लिहा एका कागदावर. त्यानें कागदावर लिहिल्यावर, टिळकांनीं त्यास एक कोरें पाकीट देऊन त्यात बंद करून त्याचेच हातून टेबलाचे ड्रावरमध्यें तो कागद ठेविला, व आपण कागदावर एक चिठी लिहून ती पाकिटांत बंद करून खालीं कारकुनाकडे त्याला जाण्यास सांगितलें. टिळकांनीं कारकुनास लिहिलें होतें कीं, चिठी घेऊन येणारास सव्वासात आणे द्यावे. त्याप्रमाणें ७। आणे घेऊन तो पुन्हां माडीवर टिळकांकडे आला. टिळक म्हणाले, 'कां आलांत? मला वाटलें तुम्ही गेलां असाल!' सामुद्रिक पाहणारा म्हणतो, 'महाराज! आपणासारख्या थोरांनीं एक रुपाया तरी द्यावा.' टिळकांनीं पाकीट पाहिलें व म्हणाले, 'तुम्हीं एक रुपया लिहून न ठेवतां जर प्रथमच असें बोलला असतां तर मी दिला असतां; परंतु तुमचे ठिकाणीं कांहीं एक गुण नाहीं, सबब मला आणखी कांहीं देतां येत नाहीं!'

( २ ) एके दिवशीं मी टिळकांकडे गेलों असतां, ते पांच वर्षांच्या पंचांगाचे पुस्तकांतील वधुवरांच्या गुणसमेलनाचें कोष्टक पाहात होते. वराचे गुण कोष्टकाचे माथ्यावर होते, व वधूचे गुण एकाखालीं एक ओळींत होते; मात्र त्यांस वराचे गुण व वधूचे गुण अशीं नांवे लिहिलेलीं नव्हतीं. मी म्हटलें 'वराचे गुण कोणते समजावयाचे, व वधूचे कोणते समजावयाचे?' टिळक म्हणाले "अरे! पचांगांत वर तो 'वर!' मथळ्यांत जरी 'वधुवरां-'च्या असें होतें तरी खरोखर वरांचेच गुण वर म्हणचे आधीं दिले होते.

( ३ ) सुमारें २५।३० वर्षांपूर्वी पुणें शहरातर्फे कॉंग्रेसचे प्रतिनिधी निवडून देण्याकरितां रविवारांत फडके ह्यांचे वाड्यांत सभा भरली होती. मवाळांच्यातर्फे रा० ब० विष्णु मोरेश्वर भिडे ह्यांस अध्यक्ष नेमण्याचें अगदीं ठरलें होते. टिळकांनीं रा० जोग ह्यांस अध्यक्षांचे खुर्चीपलीकडे एक खुर्ची टाकून बसवून ठेविलें होते. सभेची वेळ झाली. विष्णु मोरेश्वर भिडे येताहेत, आलेच, म्हणून एकानें

निमंत्रणपत्रिका वाचून दाखविली. इतक्यांत वासुदेवराव जोशी ह्यांनीं सूचना केली कीं, आजच्या समेचें अध्यक्षस्थान रा० जोग ह्यांनीं स्वीकारावें. 'स्वीकारावें' शब्द संपतो न संपतो तों बेहेरे ह्यांनीं अनुमोदन दिलें व अनुमोदन देतां देता सूण करून जोगास अध्यक्षाचे खुर्चीवर बसवून टिळकांनीं बोलावयास सुरुवात केली! इतक्यांत विष्णु मोरेश्वर आले व सभेंत गडबड उडाली तरी टिळकांनीं ही सभा शिस्तवार आहे असें ठरवून समेचें काम पुरें करून घेतलें! मवाळांनीं बराच त्रागा केला, परतु कांहीं उपयोग झाला नाहीं.

( ४ ) मंडालेहून सुटून आल्यावर टिळक प्रथम प्रथम एकटेच लकडीपुला-पलीकडे फिरावयास जात असत. ते माझे दारावरून जातांना मीहि कधीं कधीं निघे, व त्याचेबरोबर बोलत जाई. मी ग्रंथप्रकाशक असल्यामुळें माझ्या अनुभवावरून गीतारहस्याच्या किती प्रती काढाव्या व किती प्रति खपतील म्हणून त्यांनीं मला प्रश्न केला. मी म्हटलें '१०००० दहा हजार प्रति हा हा म्हणतां उडतील; इतक्या काढण्यास कांहीं हरकत नाहीं.' टिळक म्हणाले, " पैसे मिळण्याच्या दृष्टीनें मी जर हें पुस्तक छापतों तर तुझें म्हणणें बरोबर आहे. परतु माझ्या पुस्तकावर टीकांचा भडिमार होणार असल्यामुळें प्रथमावृत्तीच्या २।३ हजार प्रति काढाव्या, काय टीका येतात त्या येऊं द्याव्या, व मग दुसरी किंवा तिसरी आवृत्ति काढावी लागली तरी चालेल."

---

## विनायक महादेव भुस्कुटे

[ लोकमान्यांचे एक लेखक, केसरीचे माजी रिपोर्टर, हल्लीं उपसंपादक स्वराज्य, पुणें ]

(१) लोकमान्यांचा व माझा जो संबंध आला तो फक्त लोकमान्य मंडालेहून सुटून आल्यानंतरच काय तो आला. केसरी ऑफीसमध्यें मी त्यावेळीं रिपोर्टरचें काम करीत असें. कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पार्टी स्थापण्याकरिता गायकवाडवाड्यात महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांची सभा झाली. त्यावेळीं आपल्या पक्षातर्फे काढण्यांत येणाऱ्या मॅनिफेस्टोंत कोणकोणत्या गोष्टींचा समावेश करावयाचा या संबधानें चर्चा चालली असतांना मी पहिल्यापासून शेवटपर्यंत हजर होतों. निरनिराळ्या पुढाऱ्यांकडून निरनिराळ्या सूचना पुढे येत. त्यावेळीं 'मवाळाच्या मॅनिफेस्टोपेक्षा तुमच्यांत कांहीं वेगळेपणा दिसेल. तुमच्यात कांहीं तडफ दिसेल असें त्यात कांहीं घालाल. कीं नाहीं?' असें त्यांनीं कितीदा तरी बोलून दाखविलें आणि इतकें करूनहि हा मॅनिफेस्टो त्यांच्या मनाजोगा तयार झाला नाहीं.

पुण्यांतील राष्ट्रीयपक्षाच्या पुढारी लोकांच्या कांहींना कांहीं निमित्तानें नेहमीं बैठकी भरत, त्यावेळीं " तुम्ही काय करतां ! एकादें नवीन कार्य अंगावर घेऊन तें तडफेनें पार पाडण्याची हिंमत तुम्हां कोणाला कधीं वाटतें कां !" असें त्यांनीं नेहमीं म्हणावें.

( २ ) वऱ्हाडांतील स्वराज्याचा दौरा संपवून आल्यानंतर एके दिवशीं आपल्या वाड्यांतील मधल्या गच्चीवर फिरत असतांना " गेल्या सहा महिन्यांत मी काय केलें ? मॉंटेग्यु-चेम्सफर्डची ही सुधारणा अपुरी आहे, असमाधान-कारक आहे, असें एवढेंच सांगत मी देशभर फिरलों. याच्याशिवाय दुसरें कोणतें महत्त्वाचें काम मी केलें ? " असें त्यांनीं काढलेले निराशेचे उद्गार अद्याप माझ्या कानांत घुमघुमत आहेत. " राजकीय चळवळीसंबंधानें कोणतीहि नवीन गोष्ट काढा, ती समजून देण्यास मी दौरे काढले पाहिजेत, त्यांच्या फंडाकरितां मीच फिरलें पाहिजे, एकादी नवीन योजना काढून तिच्यासंबंधानें चळवळ करण्याकरितां सर्व हिंदुस्थानभर हिंडण्याची ताकद माझ्या ठिकाणीं आतां उर-लेली नाहीं " असें कैलासवासी होण्यापूर्वी लोकमान्य म्हणूं लागले होते. " मी सांगतों त्याचीच 'री' ओढत बसूं नका, कांहीं तरी नवीन चळवळ सुरू करा " असें ते आपल्या अनुयायांना नेहमीं सांगत. पण लोकमान्यांच्या इतका आत्म-विश्वास व हिंमत कोणाच्या ठिकाणीं दिसणार ! विलायतेहून परत आल्यानंतर पुणेंशहरवासीयांतर्फे त्यांना मानपत्र देण्यांत आलें त्याप्रसंगीं आपल्या पक्षाच्या अनुयायांत उडालेली गडबड पाहून लोकामान्यांना संताप आला होता. "मंडईत जाऊन मी उभा राहावें. कोण कोण माझ्यावर शेण फेंकतो हेंहि मला पाहा-वयाचें आहे." असें म्हणून त्यांनीं धैर्यानें त्या दिवशीं विरोधकांस आव्हान केलें.

( ३ ) 'केसरीं'तील अग्रलेख ते सांगूं लागले म्हणजे फिरत फिरत हावभावा-संकट ते सांगायचे व एकादी समर्पक कोटी सुचली किंवा एकादें समर्पक अवतरण आठवलें म्हणजे " कसें काय ठीक आहे कीं नाहीं ? " असे ते लेखकाला विचारीत. 'केसरी' ऑफिसांत केळकर, खाडिलकर व लोकमान्य यांच्या लेखकाचें काम मी करीत असल्यामुळें मला हा अनुभव नेहमीं येई. प्रतिपक्षी मग तो स्वकीय असो वा परकीय असो त्याच्यासंबंधानें दयामाया त्यांच्या अंतःकरणांत कधींहि उत्पन्न झालेली नाहीं व प्रतिपक्षी आटोक्यांत आल्यावगेनर त्याला पाण्याहूनहि पातळ केल्यावांचून त्यांनीं सोडलें नाहीं. आपल्या तेजानें सर्वांना काळोखांत पाडणाऱ्या लोकमान्यांचा प्रखरपणा त्यांचा त्यानांच साजेसा होता.

( ४ ) पुणें, नगर वगैरे ठिकाणीं केलेल्या भाषणाबद्दल त्यांच्याकडून जामीन मागण्यांत आला. त्या खटल्याच्या संबंधांत कायद्यांचीं पुस्तकें चाळतांना " अहो, कायदा म्हणजे काय कॉमनसेन्स. सर्व सामान्य दक्षता ठेवून बोलत असले म्हणजे त्याच्या समर्थनार्थ कायद्यांत हवे तेवढे आधार सांपडतील. नाहीं तर प्रत्येक शब्द

उच्चारतांना कायद्याचे कोणतें कलम या ठिकाणीं लागूं पडेल असा का कोणी बोलताना विचार करीत असतो ?" असें त्यानीं बोलून दाखवितांच महळींत एकच हशा पिकला.

---

## बालकृष्ण पांडुरंग जोशी

[ ज्योतिर्भूषण, येवलें. ]

(१) श्रीजगन्नाथमहाराज यांच्या दत्तकप्रकरणांत लोकमान्यांतर्फे माझी साक्ष—औरंगाबादेस होण्याचेपूर्वी श्री० ताईमहाराजास साह्य करणारा अधिकारी वर्ग, कोल्हापूर व सातारा येथील नाशाबित झालेल्या दत्तकाचे आतेष्ट ( त्याची सर्वांचीं नावें मला आठवत नाहींत, ) पण ज्याच्या डाव्या मनगटांत पांच सात वाटकीं सोन्याचीं सलकडीं नेहमीं खळखळ करीत असत असे अनेक गृहस्थ मला येऊन सांगत कीं, ' तुम्हीं लो० टिळकांचे विरुद्ध साक्ष द्या. तुम्ही उलट साक्ष दिल्यास आम्ही तुम्हास चांगलें बक्षीस देऊं. ' मी त्याचे सांगण्याप्रमाणेंच वागेन अशी त्याची खात्री नसल्यानें ते पुनः "लो० टिळक हे सरकारास अप्रिय आहेत, व तुम्ही जुन्या वळणाचीं माणसें; तेव्हां त्यांचा हा सबंध नसलेला चांगला " अशीहि समज देऊं लागले. पण माझा अखेर " सत्यमेव जयते " या तत्त्वावर आत्मविश्वास असलेमुळें मी त्याचे भुलथापास न भुलता वरील दोन दिवशीं समक्ष हजर असताना झालेली हकीकत जशी होती तशीच साक्षींत सांगितली.

( २ ) औरंगाबादेस एके दिवशीं ते आपली कुंडली काढून म्हणाले " या कुंडलींत आणखी कारागृहवासाचा योग आहे काय ? " ते वेळीं त्याचें स्वतःचें भविष्य सांगण्यास दोन्ही बाजूनें अडचण उत्पन्न झाल्यानें मी गोंधळलो. लोकमान्य म्हणाले, " आपण कोणतीहि शंका न धरिता मला सांगा. व हा योग आहे असें मलाहि वाटते. " मी म्हणालो ' आपणास मी काय सांगणार ? ' लोकमान्य म्हणाले ' मला प्रत्यंतर पाहाणें आहे. ' तसा योग होता व तो मिळालाहि.

---

## राजाराम दामोदर देसाई

[ बी. ए, मुख्याध्यापक-प्राज्ञपाठशाळा, वाई. ]

गीर्वाण—लघु—कोशाचें काम चालले असतां उपनिषदांतील एक दोन शब्दांचा व महाभारतांतील एका शब्दाचा अर्थ निश्चितपणे ठरविता येईना म्हणून लोकमान्य टिळकांना विचारण्याकरितां एके दिवशीं दुपारीं ३ ते ४ च्या दरम्यान मी गेलों, आणि ह्या शब्दांचा अर्थ काय असे विचारलें. उपनिषदांतील शब्दांचा अर्थ चटकन सागून ते म्हणाले कीं, "मलाहि तो प्रथम वाचतांना अडला होता. महाभारतांतील त्या शब्दावर मी खूण केलेली आहे" असें म्हणून लगेच उठले व ग्रंथालयांत गेले. मीहि त्यांच्या बरोबर गेलो. त्यांनीं कपाट उघडून महाभारताचा तो भाग काढला आणि विवक्षित श्लोक काढून मला दाखविला आणि अर्थहि सांगितला. त्या श्लोकावर खूण केलेली होती. त्याच्या स्मरणशक्तीची व तत्परतेची मनांत तारीफ करीत मी परत गेलों.

---

## गणेश सदाशिव आळतेकर

[ एम् ए एल्एल् बी वकील, कराड. ]

( १ ) राष्ट्रीय सभेच्या शिष्टाईचे काम करून लोकमान्य विलायतेहून परत आले तेव्हां, कायद्याचा अभ्यास करणाऱ्या सरदारगृहांत राहाणाऱ्या विद्यार्थ्यांनीं त्यांना पानसुपारी केली. सदर्हु प्रसगीं, शिक्षण संपवून आयुष्याच्या दुसऱ्या भागास प्रारंभ करणाऱ्या तरुणांना लोकमान्यांनीं केलेला उपदेश महत्त्वाचा होता. तो वर्तमानपत्रांत कोठें प्रसिद्ध न झाल्यामुळें त्यांतील लोकमान्यांच्या विवेचनशक्तीचे वैशिष्ट्य दाखविणारा तेवढा भाग खालीं देत आहें.

ते म्हणाले कीं, " आपला अभ्यास—क्रम पुरा करून तुम्ही आतां आयुष्याच्या द्वितीय भागास सुरुवात करणार. विद्यार्थिदशेमध्ये तुम्ही राष्ट्रकार्य करणेचे बाबतींत नानाप्रकारच्या कल्पना करून मनामध्यें मोठमोठे संकल्प केले असतील; परंतु त्यांतील अल्पांश जरी कृतींत उतरला तरी तुम्ही पुष्कळ कार्य केले असें मी समजेन. त्यावेळचीं उच्च ध्येये व्यवहाराशीं प्रत्यक्ष संबंध आला असतां मनांतल्या मनांतच विलयास जातात. स्वार्थत्याग करून देशकार्य करण्याचा ज्यांनीं निश्चय केला असेल त्यांच्यापुढें पहिला मोठा प्रश्न म्हणजे आपल्या वडील मडळींच्या आग्रहाचा होय. वडिलांचें मत साहजिकपणेच असें पडणार कीं, तुम्ही

वकिली अगर नोकरी करून चागलें द्रव्यार्जन करावें. स्वार्थत्यागपूर्वक सर्व आयुष्य राष्ट्रकार्यास वाहाण्याचा विचार त्यांना पसंत पडणार नाहीं. वडिलांच्या विचारास मान देणें हें तुमचें कर्तव्यच आहे. अनेक सकटें सोसून व चारपाच हजार रुपये खर्च करून ज्यांनीं तुमचे शिक्षण पुरें केलें त्यांच्या ऋणातून तुम्हास मुक्त झालेच पाहिजे. पण त्याबरोबर हेहि ध्यानांत ठेवा कीं, तुम्हांस मिळालेलें शिक्षण हें तुमच्याच वडिलाचे पैसे व श्रम एवढ्यानीं साध्य झालें नाहीं. ज्या शिक्षणसस्यातून तुम्ही शिक्षण घेतलें त्या संस्थांकरितां राष्ट्रानें आजपर्यंत किती पैसे खर्च केले व या सस्था उदयास आणण्यास किती विद्वान् लोकांना स्वार्थावर तिलाजलि देऊन खपावें लागतें याचा विचारहि तुम्हास करावयास पाहिजे. तुमच्या डोक्यावर जसें पितृऋण आहे तसेंच आचार्यऋण व राष्ट्रऋण हीं ऋणें आहेत हे जाणून कार्य हें ठरविलें पाहिजे."

यानंतर स्वार्थत्यागाचा निश्चय करणाऱ्या विद्यार्थ्यास त्यानें आपल्या मनाची किती खंबीर तयारी करावी लागते याबद्दल त्यांनीं कै० गोपाळराव आगरकर यांचें उदाहरण दिलें; ते म्हणाले कीं, "गोपाळराव हे माझे सहाध्यायी व जिवलग मित्र असल्यामुळें त्याच्या मनाची पूर्ण तयारी मला पूर्णपणें ठाऊक आहे. कॉलेजमध्यें असतांनाच त्यानीं असें ठरविले होते कीं, 'राष्ट्रकार्यांत पडल्यावर कसल्याहि दारिद्र्यावस्थेंत दिवस कठावे लागले आणि कसलींहि सकटे सोसावीं लागलीं तरी तें मी आपले भाग्यच समजेन.' आणि याप्रमाणेंच त्यांची वृत्ति अखेरपर्यंत होती." स्वतःचें उदाहरण दृष्टिआड करून कै० आगरकरांचें पुढें करण्यात लोकमान्याची निरभिमानता, प्रतिपक्षाविषयीं आदरबुद्धि व सौजन्य हीं आमचे प्रत्ययास आल्यावांचून राहिलीं नाहींत.

(२) याच सुमारास मुबई नॅशनल युनियन क्लबमार्फत लोकमान्याना सरदारगृहांत मेजवानी देण्यांत आली. त्यावेळीं मिक्षांदेहीच्या आक्षेपास त्यांनीं दिलेलें उत्तरहि मोठें मार्मिक आहे. ते म्हणाले कीं, " अर्ज, विनत्या व विलायतेंत चळवळ करणें या गोष्टींबद्दल मी पूर्वी प्रतिकूल असता आता विलायतेंत शिष्टाईस जाऊन तेथें हिंदुस्थानच्या राजकीय चळवळीस दुजोरा देणे, इंडिया पत्राची चागली व्यवस्था करणे व मजूर पक्षाशीं सख्य जोडणें हें परस्परविसगत वर्तन आहे, असा मजवर कांहीं लोकांचा आक्षेप आहे. त्यास माझें असें उत्तर आहे कीं, पूर्वी मी अर्ज विनत्याचे विरुद्ध होतों याचे कारण त्यावेळीं तुमच्या मागण्यांस भीक घालण्यास विलायतेंत कोणी तयार नव्हते. आतां काल पालटला असून स्वयनिर्णयाच्या तत्वाविरुद्ध उघडपणे बोलण्याचें धारिष्ट विलायतेंतील मुत्सद्यांचे अंगीं नाहीं. शिवाय लढाईमधील हिंदुस्थानचे कामगिरीमुळे हिंदी लोकांना कांहीं तरी देणे प्राप्त आहे हें ब्रिटिश राजकारणी पुरुषांस अपरिहार्य वाटत आहे. अशा वेळीं विलायतेंत हिंदुस्थानाविषयीं जागृति करण्यानें व आपल्या मागण्या

शक्य तितक्या नेटानें मांडल्यानें कांहीं तरी अधिक फायदा झाल्याशिवाय राहाणार नाहीं. तेव्हां एके काळीं त्याज्य वाटणारा मार्ग बदललेल्या परिस्थितींत ग्राह्य वाटला यांत कांहीं विसंगतपणा नाहीं. निश्चितपणा ध्येयामध्यें असतो; साधनें परिस्थितीप्रमाणें भिन्न असूं शकतात. शरीरस्वास्थ्याकरितां थंडीचे दिवसांत लागणारा लोंकरीचा कोट त्याच कारणाकरितां उन्हाळ्यांत त्याज्य ठरतो. "

---

## दत्तात्रय विनायक पटवर्धन

[ एल्. एम्. अँड एस्, (नॅ.) डॉक्टर, सुप्रसिद्ध राष्ट्रीय हरिदास, वांई ]

(१) १९२० सालीं मिरजेच्या नाटकगृहांत लोकमान्यांना पानसुपारी करण्यांत आली. कै० वासुदेव शास्त्री खरे यांनीं प्रास्ताविक भाषणांत सांगितलें कीं, 'लोकमान्य विलायतेहून स्वराज्याचें गाठोडें घेऊन आले आहेत.' यावर भाषण करतांना लोकमान्य म्हणाले "शास्त्रीबोवांचा वेदान्ताचा व्यासंग उत्तमच आहे, परन्तु स्वराज्य ही वस्तु आणण्यासारखी नाहीं हें त्यांच्या ध्यानांत आलेलें दिसत नाहीं. वेदान्तशास्त्रदृष्ट्या मोक्ष कोणी कोणास देत नाहीं. आपल्या जवळच तो आहे. मायेचें पटल दूर झालें कीं मोक्ष. शिवगीतेंत म्हटलें आहे.

मोक्षस्य न हि वासोऽस्ति न ग्रामान्तरमेव वा।
अज्ञानहृदयग्रन्थिनाशो मोक्ष इति स्मृतः ॥

तसेच तुकोबा म्हणतात, 'नाहीं देवापाशीं मोक्षाचें गाठोडें। आणोनि निराळें द्यावें हातीं' म्हणून म्हणतों "नाहीं बादशहापाशीं स्वराज्याचें गाठोडें। आणोनी निराळें द्यावें तुम्हां !!"

( २ ) मुंबईहून पुण्यास रात्रीच्या शेवटच्या गाडीनें लोकमान्य जाण्यास निघाले. दुसऱ्या वर्गाचें त्यांचें तिकीट होतें. तरी जागा नव्हती. गाडी सुटण्यास वेळ अगदीं थोडा होता. त्यांच्या बरोबरीचे गृहस्थ तिकीट बदलून आणण्यास धांवले, ती रविवाराची रात्र. सोमवारीं 'केसरी'करितां म्हणून पुण्यास पोंहोचणें जरूर होतें. लोकमान्य पहिल्या वर्गाचे डब्यांत चढले. आंतील गोऱ्या गृहस्थानें दाराला हात लावून प्रतिबंध केला. तिकीट घेऊन वरील गृहस्थ आले. लोकमान्यांनीं सदर गोऱ्या गृहस्थांचा हात जोरानें बाजूला सारला व आंत जाऊन बसले. तिकीट काढून देणारे गृहस्थ मी पुण्यापर्यंत बरोबर येतों असे आग्रहानें म्हणाले. तेव्हां लोकमान्य म्हणाले, 'चिंता करूं नका. हा मला काय करणार !

तशीच वेळ आल्यास पाहून घेण्याइतकें सामर्थ्य माझे ठिकाणीं आहे. फिर्याद मांडण्यास मी जाणार नाहीं. येथेंच प्रश्न मी सोडवीन. तुम्ही निर्धास्त जा." गाडी सुटली. लोकमान्य सुखरूप पुण्यास पोंहोचले. पुढे पुन्हा गांठ पडल्यावर त्यांस विचारतां ते म्हणाले, " त्या दिवशीं रात्रभर मला त्या गोऱ्यानें झोंप येऊ दिली नाहीं, फारच सख्य जमलें. गोष्टी बोल बोलून अखेर उजाडलें. " यावरून कोणावरहि छाप ठेवण्याची कला लोकमान्यास पूर्ण अवगत होती हें दिसून येईल.

( ३ ) दादासाहेब करंदीकरांचे वाढदिवसास लोकमान्य साताऱ्यास गेले होते. त्यावेळीं वांईहून लिंबास ते गेले. लिंबकर मंडळी माझ्या परिचयाची म्हणून तेथील अल्पस्वल्प सेवा मजकडे आली होती. लिंबकरांनीं एक चौवाकी गाडी मिरवणुकीकरतां तयार ठेवली होती. पण मी हा सर्व कार्यक्रम रहित करविला. मोटारीमधून ते उतरतांच लोकमान्यांना घरून इष्ट स्थळीं नेलें. आसनस्थ झाल्यावर ते मला हळूंच म्हणाले, "बुवा, आज संतोष वाटला. मिरवणुकीच्या हालांतून सुटलों. तुम्ही सोडविलेंत. मनापासून सांगतों कीं, मला त्यामुळें फार त्रास होतो. आज तुम्ही फार उत्तम केलेंत. शिवाय, बुवा, या लोकांच्या करण्यानें पुण्याचा क्षय होतो. आधीं आमचें पुण्य अल्प, त्यात हा व्यय. प्रसिद्ध सुभाषित तुम्हांस ठाऊकच आहे.

'असंमाने तपोवृद्धिः संमानाच्च तपःक्षयः ।
पूजया पुण्यहानिः स्यान्निंदया सद्गतिर्भवेत् ॥'

काय ही जाणीव व किती लीनता ! यालाच ज्ञानी म्हणावें.

( ४ ) बेळगांव जिल्ह्यांत लोकमान्य सचारार्थ गेले असतां निपाणी व चिकोडी यांच्यामध्यें असलेल्या कुठाळी गांवच्या लोकांनीं आदरातिथ्य करण्याचें योजिलें. त्यांनीं, पगडी घातलेले लोकमान्य एवढें ऐकिलेलें. एका मोटारींत पुढें एक पगडीवाले बसले होते म्हणून लोकांनीं ती मोटार आडविली. 'पाठिमागें आहेत लोकमान्य' असें सदर पगडीवाल्यानें त्यास सांगितलें. अल्पावकाशांत लोकमान्यांची गाडी आली. लोक अडवेपर्यंत वेळ नव्हता. तथापि सर्व लगोटे, पण त्यांची तरफदारी करणारा त्यांचा निर्मल भाव पाहून लोकमान्य थांबले. खालीं उतरलें पाहिजे असा त्या बिचाऱ्यांचा आग्रह. बरोबरचे अश्रद्ध लोकांनीं त्यांना धुडकाविलें; परंतु लोकमान्य एकटेच खालीं उतरले. व तयार केलेल्या आसनावर लोकांनीं त्यांस बसविलें. कण्हेरीच्या व पाढऱ्या चाफ्याच्या फुलाचा हार गळ्यांत घातला. दुधाची ताजी साय नैवेद्यादाखल हातावर दिली. पण लोकमान्यांना मधुमेह, गोड वर्ज्य व प्रेमळ भक्ताचा आग्रह तर सेवनाचा. पण बरोबरीची मंडळी नको म्हणत असताहि लोकमान्य त्या लगोट्यांच्या निष्कलंक भावाला वश झाले व ती साय त्यांनीं खाल्ली ! त्यावेळीं सर्वजण रोमांचित झाले.

( ५ ) याच संचारांत बेळगांव जवळील पाच्छापूर गांवीं लोकमान्य गेले. तेथें त्यांच्या दर्शनास हजारों लोक उत्सुक होते. ती पढरीच बनली होती. एक वृद्ध धोगळ्या लोकमान्यांच्या दर्शनास धांपा टाकीत होता. कोण बिचाऱ्याची दाद लावणार ! सारखा टाहो फोडीत होता. पण त्याची लोकमान्यांच्या कानावर आरोळी गेली. व त्यांच्यासारख्यांच्या कानावर ती जावयाची. लोक बाजूला सारून त्या म्हाताऱ्या बोवाला पुढें आणा, असा लोकमान्यांचा आग्रह. मग तो कोण मोडणार. तेव्हां चमत्कार असा कीं, तो धांवत आला व त्याने त्यांस एकदम मिठीच मारिली ! नतर त्याने त्यांच्या पाठीवरून व तोंडावरून हात फिरविला. व मग घट्ट पाय धरले. हें पाहून सर्व लोक विस्मित झाले. इतकेच काय पण, लोकमान्यहि गहिवरले व म्हणाले, " हें प्रेम तुम्हां सुशिक्षितांत मिळावयाचें नाहीं. "

( ६ ) पुणें येथील श्रीशिवराज्याभिषेकाचे उत्सवांत मी कीर्तन केले. लोकमान्य श्रवणाला आले होते. बुक्का लावण्याचें वेळीं मला घालण्यासाठीं आणिलेला हार माझ्या इच्छेप्रमाणें लोकमान्यांच्या गळ्यांत घालण्यांत आला. पुढे कीर्तन संपल्यावर मी त्यांचे पायीं लीन होऊन बसलों. त्यावेळीं लोकमान्य हार माझे गळ्यांत घालू लागले. मी नको नको असें म्हटलें, तेव्हां ते बोलले, " हा पुष्पांचा हार तुमचे गळ्यांत मी घालीत नाहीं, तर ही राष्ट्रसेवेची माळ तुमचे गळ्यात घालीत आहे, हे ध्यानांत वागवा ! "

( ७ ) बेळगांवीं परिषदेचे वेळीं प्रारभीं ' वन्देमातरम् ' पद्य म्हणण्याचा योग मला आला होता. गावांत अनायसें एक प्रसिद्ध नाटक मंडळी असल्यानें त्यांतील एक मुख्य गायकासहि त्याच वेळीं ईशस्तुतिपर पद्य गाण्यासाठीं बोलावण्यांत आले होतें. दुसरें दिवशीं लोकमान्यांची भेट झाली, तेव्हां ते म्हणाले, " कां हो बुवा, काल नाटकांतील गृहस्थास पद गाण्यास कशाला आणिलें होते ? अशा प्रसगीं राष्ट्रगीत दडकून म्हणून राष्ट्रवीरांच्या अगांत राष्ट्रभक्तीचा सचार उत्पन्न करण्याचें मुख्य काम. तेथें गायन-प्राधान्य नव्हे, खरें कीं नाही ? "

( ८ ) पुणें येथें शके १८४२ च्या श्रीशिवजन्तीच्या उत्सवात मी कीर्तन केलें. त्यावेळीं तेथें लोकमान्यांचे साठीं आरामखुर्ची ठेवली होती. पण त्यांचे त्यावेळीं येणें घडले नाहीं. सध्याकाळीं त्यांच्या दर्शनास मी गेलो. पायावर डोकें ठेविले. उभा राहिलों तेव्हा ते म्हणाले, " बुवा, आज कीर्तनाला आलों नाहीं, कारण मला बसवत नाहीं. अशक्तपणा फार आला आहे. " मी म्हटलें, ' मुद्दाम आरामखुर्ची ठेवली होती. ' त्यावर ते बोलले, ' बुवा, तें कीर्तन आहे, व्याख्यान नव्हे. कीर्तनांत लोडाला टेकणें, सुखासनीं बसणें, हें मला अगदीं आवडत नाहीं. अशानें त्या गादीची अप्रतिष्ठा होते. "

(९) एकदां लोकमान्यांच्या दर्शनाकरतां म्हणून वाड्यांत गेलो. श्रीरामनवमीच्या उत्सवाकरतां येथें आलों आहें असें त्यांस सांगितलें. तेव्हां ते म्हणाले, " बुवा, श्रीरामचरित्र कीर्तनांत तुम्ही कसें सांगतां ? राम देव होते असें सांगत जाऊं नका. कारण श्रीरामाचें चरित्र अत्यंत यत्नप्रधान आहे. आमच्या लोकांना असें म्हणण्याची संवय अनेक जन्म हाडींमासीं खिळून गेली आहे कीं, ' राम देव होते, कृष्ण देव होते, आम्ही काय पामर, आमचे हातून काय होणार ! ' पण ही दुर्बल विचारसरणी राष्ट्राचा घात करते; म्हणून श्रीरामचंद्राचें चरित्ररहस्य यत्नप्रधान कसें आहे, यावर जोर देऊन तें सांगत चला. ' यत्न तोचि देव ' अशीच रामदासस्वामींची शिकवणूक आहे असेंच नेहमीं प्रतिपादीत जावें. "

(१०) लोकमान्यांच्या एका स्नेह्याच्या मुलानें गुप्त पोलीस खात्यांत नोकरी धरली होती. १९१४ सालीं ते सुटून आल्यावर वाड्याच्या चौबाजूस पोलीसांचा पाहाऱ्याचा सुळसुळाट होता. वाड्याजवळ विडीवाल्याच्या दुकानांत टेहळणीस बसलेल्या सदर गृहस्थास एकदां लोकमान्यांनीं सहज पाहिलें. म्हणून त्यास वाड्यांत मुद्दाम बोलावून आणवून ते म्हणाले, " तूं माझ्या XXX स्नेह्याचा मुलगा आहेस. गुप्तपोलीसखात्यांत शिरलास तो शिरलास. आतां एवढें तरी कर कीं, निदान खोटी नांवें तरी कळवूं नकोस व असल्या हलक्या दुकानीं चोरून बसूं नको. तुझ्या रोजच्या डायरीसाठीं जी माहिती तुला लागेल ती रोज समक्ष मलाच विचारीत जा. तुला जें पाहिजे असेल तें मी आनंदानें सर्व सांगेन ! "

( ११ ) मी माझा दवाखाना सोडून, कीर्तनकार व्हावें अशी माझी इच्छा होती. म्हणून लोकमान्यांना याबद्दल विचारण्याकरितां गेलों. प्र०:—डॉक्टरीचा धंदा सोडून कीर्तनकार व्हावें अशी इच्छा आहे. कसें करूं ? उत्तरः—फार उत्तम आहे. परंतु तो त्रास तुम्हांस सोसेलना ? कारण दवाखान्यात खास्यानें द्रव्य मिळविण्याची चटक लागते, आणि हा व्यवसाय तर लाचारीचा व निष्कांचनपणाचा. प्र०:—कीर्तनावर द्रव्य कसें घ्यावें ? साशंक वृत्ति होते. उ०:—हा प्रश्न वेडेपणाचा ! मोल करू नका. ' मोलें कीर्तन करूं नये ' हेंच खरें. भरतखंड भाविक आहे. मागूं नका. ' अमृतं यद् अयाचितम् ' देतील तें आनंदानें घ्या. ईश्वरावर निष्ठा ठेवा. कांहीं कमी पडणार नाहीं. थाटमाट करीत बसूं नका. उद्योगास लागा.

( १२ ) एक राष्ट्रकार्येच्छु गृहस्थ मजबरोबर लोकमान्यांकडे सल्ला घेण्याकरिता म्हणून आले होते. ' काम काय करावें ? ' असा त्यांनीं लोकमान्यास प्रश्न केला. त्यावर त्यांनीं त्यास अनेक मार्ग सुचविले. त्यांनीं जो मार्ग त्यांस सुचवावा, तो त्यांस पसंत पडूं नये असें एकसारखे चाललें होतें. शेवटीं थोडें हंसत पण जरा रागावून लोकमान्य म्हणाले, " मग काय भंड करतां, तोफा

जागवां, बॉम्ब गोळे उडवितां, यांपैकीं काय करण्याची इच्छा आहे? असेल तर तें तरी करा, पण करा!" हें ऐकून ते निष्क्रिय तरुण गृहस्थ मनांत खजील झाले.

( १३ ) १९०७ सालीं सुरतेस भरलेल्या राष्ट्रीय सभेचे वेळीं लोकमान्य जेथें उतरले होते, तेथेंच त्याचेजवळ राहण्याचें भाग्य मला लाधलें होतें. सभेच्या आदलें रात्रीं दोन वाजतां लोकमान्यांच्या एका भक्तानें येऊन, त्यांस सांगितलें कीं, 'आपल्याला उद्यां मारण्याचा बेत विरुद्ध पक्षानें केला आहे. सबब काय तजवीज करावयाची?' चटकन लोकमान्य म्हणाले, "मारूं देत; खुशाल मारूं देत. मी करीत आहें तें सत्कार्य आहे. मला कोण मारणार? आमचें रक्षण करण्यास ईश्वर समर्थ आहे."

दुसरें दिवशीं नियोजित गुंडांनीं मंडपांत घुसून मारामारी केलीच. लोकमान्यांना सर्वांनीं विनविलें, 'महाराज, आपण पाठीमागील तंबूत चला.' यावेळीं ते छातीठोक उभे राहून म्हणाले, "मी बायकांच्या त्या दरवाज्यानें पळून जाणारा नाहीं. काय होणें असेल तें होईल!"

( १४ ) शहापूर ( जि० बेळगांव ) येथे व्याख्यानांत बोलतां बोलतां सहज लोकमान्य म्हणाले, "सरकारनें मला जबर एकान्तवासाची सहा वर्षांची शिक्षा दिली. म्हातारा तुरुंगांत मरणार असेंहि त्यास वाटलें असेल! परन्तु ईश्वर रक्षक असल्यावर सरकार झालें म्हणून तरी ते काय करणार!"

---

## दिनकर धोंडो साठ्ये

[ डॉक्टर, एफ्. आर. एफ्. पी. एस. ( ग्लासगो ), मुंबई नॅशनल यूनियनचे संस्थापक, मुंबई. ]

( १ ) लखनौ कॉंग्रेस अनेक दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची झाली हें सर्वांना माहित आहेच. लखनौ येथे राष्ट्रीय पक्षाचे सर्व प्रतिनिधी एके ठिकाणीं मोठ्या हवेलींत उतरले होते. एके दिवशीं रात्रीं १० चे नंतर बेळगांवाहून आलेले एक गृहस्थ वरच्या मजल्यावरून पाय घसरून खालीं पडले, एक दोन ठिकाणीं त्यांना जबर दुखापती झाल्या व थोडा पायहि दुखावला. टिळक विषयनियामक कमिटींतून बारा वाजतां परत आल्यावर त्यांना हें वर्तमान कळलें. त्याबरोबर जेवण वगैरे न घेतांच त्यांनीं अपघात झालेल्या खोलींत येऊन चौकशी केली आणि एक तासाभ्यावर त्या गृहस्थांजवळ बसून त्याची त्यांनीं शुश्रूषा केली व

डॉक्टरांचा सल्ला व मदत मिळाल्यानंतर ते वर आपल्या खोलींत गेले. अशा रीतीनें कधीं लहान सहान अनुयायाचीहि काळजी ते घ्यावयास चुकले नाहींत.

( २ ) टिळकांची राहणी नेहमीं साधी असे. मुंबईंत ते असतांना इतर मोठ्या लोकांना भेटावयास जाण्याचे वेळींहि ते नेहेमीं घोड्याच्या गाडीनें जात. लंडनमध्यें असतांना सुरवातीला ते गाडीने जाऊं लागले. एकदां ते म्हणाले 'मी ट्रॅमधूनसुद्धा जाईन. लोकांच्याकडून राष्ट्रकार्याकरितां घेतलेला पैसा उधळणें बरोबर नव्हे.' पण ते लंडनमध्यें कांग्रेसडेप्युटेशनचे प्रमुख व प्रेसिडेन्ट या नात्याने वावरत असतांना त्यांनीं मोठ्या लोकाकडे भेटावयास जातेवेळीं मोटार ऐवजीं साध्या गाडीनें जाणें मला तरी बरोबर वाटलें नाहीं. तेव्हां मी त्याना म्हटलें 'आपण बाहेर जाण्याचे वेळीं मला गाडी आणावयाचें काम द्या म्हणजे मी ते बरोबर बजावीत जाईन.' तेव्हापासून ते मोटारमध्यें जाऊं येऊं लागले. लंडनमध्यें असताना मला ते नेहमीं थट्टेनें म्हणत 'टॅक्सीवाले डॉक्टर कोठें आहेत ? त्यांना बोलवा !'

( ३ ) कॉंग्रेस डेप्युटेशनसमयीं मि. पटेल डेप्युटेशनचे सेक्रेटरी होते. त्या वेळची त्यांची साक्ष उत्तम झाली. टिळकांना पटेलची चिकाटी पटली होती. आणि कोणतेंहि काम त्यांच्याकडे सोपविलें कीं तें नक्की व्हावयाचेंच अशी त्यांची खात्री असे. एकादें भानगडीचें अगर ब्राह्मण–ब्राह्मणेतर तत्वाचें काम उपस्थित झालें तर लंडनमध्यें असताना टिळक म्हणत "आपला पाटील आहे. तो खरा (non–Brahmin) ब्राह्मणेतर आहे. तो हें काम कसें मख-लाशीनें करील !"

---

× × × ×

[ कोल्हापूरहद्दींतील एक वतनदार कुळकर्णी. ]

( १ ) करवीर दरबारने आपल्या हद्दींतील कुळकर्णी वतनें खालसा केल्या-नंतर त्या हद्दींतील कुळकर्णी मंडळींनीं ता० २८ एप्रिल १९१८ रोजीं कुळकर्णी असोसिएशन स्थापन केली. त्यानतर संस्थेची अंतर्व्यवस्था झाल्या-नंतर करवीर दरबारच्या धोरणाचा कायदेशीर प्रतिकार कसा करावा हा प्रश्न आम्हां मंडळींपुढें आला व साहजिकच लोकमान्यांची आठवण झाली. त्या-नंतर वरील संस्थेतर्फे लोकमान्यांचें मत घेण्याकरतां म्हणून माझी नेमणूक झाली. व ता० ६ मे १९१८ रोजीं लोकमान्यांकडे मी गेलों. त्या वेळीं लोक-

मान्य सिंहगडावर उन्हाळ्यानिमित्त राहात होते. 'केसरी' ऑफिसमध्यें जरूर ती चौकशी करून सिंहगडावर जाण्याची तयारी केली आणि ता० ८ मे रोजीं सकाळीं किल्ल्याच्या पायथ्याशीं गेलो. तेथील एका हमालास मी विचारलें कीं, 'लोकमान्य यांच्या बंगल्यास जाणें आहे तर वाट दाखवण्यास चल.' तो म्हणाला 'लोकमान्य म्हणजे कोण ? पुण्याचे महाराज कीं काय ?' मी थोडा घोटाळ्यांत पडलों व थोडा विचार केल्यानतर, येथील लोक लो० टिळक यांनाच पुण्याचे महाराज म्हणत असतील असें समजून "महाराजाच्या" बंगल्यापर्यंत त्या हमालास मी घेऊन गेलो. सुमारें एक तास करवीर दरबारच्या धोरणासंबंधीं भाषा झाल्यावर लोकमान्यांनीं कुलकर्णी सभेस एक अर्ज तयार करून दिला व सांगितलें कीं, 'सदरचा अर्ज एकवार तात्यासाहेब केळकर यांच्या नजरेखालीं घालून नंतर दरबाराकडे दाखल करा."

यानंतर पुनः कोल्हापूरच्या राज्यपद्धतिविषयीं थोडा वेळ लोकमान्य बोलले व तत्कालीन मुंबई गव्हर्मेंटचा उल्लेख करून शेरा मारला कीं, "वरच्या देवाची शेंडी तुटल्याखेरीज खालचे देव पायाशीं लागत नाहींत !"

या नंतर मी निरोप घेण्यास गेलो. व आणलेला हार अर्पण करू लागलो. तें पाहून लोकमान्य म्हणाले. 'माझ्यापेक्षां फार अधिक योग्यतेचा पुरुष तानाजी येथें जवळच निजला आहे त्याच्या शय्येवर फुलें पसरा जा !" मी तसाच मुकाट्यानें परतलों व तानाजीचें दर्शन घेऊन पुण्याच्या मार्गास लागलो.

(२) 'कुलकर्णी लोक विवक्षित मुदतींत आपली दप्तरें तलाठी यांना न देतील तर वतनें जप्त होतील' असा करवीर दरबारनें निकराचा हुकूम काढला. कुलकर्णी लोकांनीं सदर हुकुमाविरुद्ध सत्याग्रह करण्याचें ठरवलें व याबाबद लोकमान्य यांचें मत घेणेंस्तव सभेनें मला पुण्यास पाठविलें. त्या वेळीं लोकमान्य फर्ग्युसन कॉलेज-नजीक लिमये यांच्या बंगल्यांत राहात होते तो महिना जुलैचा असून तारीख १८ ते २० असावी. तीन वाजतां भेट घेतली. लोकमान्यांनीं कुलकर्णी सभेची हकीकत ऐकून घेतली व श्री करवीर पीठाधीश जगद्गुरू ( डॉ० कुर्तकोटी ) यांनीं संस्थेचे काम हातीं घेतल्याचें ऐकून समाधान व्यक्त केले. पुढें ते म्हणाले कीं, "कुलकर्णी लोक सत्याग्रह करणार असतील तर श्रीजगद्गुरू यांच्या नेतृत्वा-खालीच त्यांनीं वागावें. कारण सत्यग्रह करणें ही गोष्ट सोपी नाहीं. शिवाय कै० कोल्हापुरचे महाराज यांची राज्य करण्याची शैली, त्यांचे मुंबई सरकाराशीं असलेले संबंध व चळवळींत फूट पाडण्याची त्यांची हातोटी वगैरें सर्व गोष्टींचें चित्र त्यांनीं आम्हापुढें उभें केलें. व सभेनें खालील गोष्टी अमलांत आणण्यास विसरू नये असें बजावून सांगितलें (१) छत्रपतीच्या गादीशीं राजनिष्ठ राहा. (२) आपसांत फूट पडू देऊ नका. ( ३ )जगद्गुरूंची आज्ञा प्रमाण माना. ( ४ ) कुलकर्णी दप्तरें स्वतः हातानें देऊं नका व सरकार जप्त करण्यास येईल तर शारीरिक प्रतिकार

करू नका. (५) दरबार दप्तरें जप्त करील त्यावेळीं सर्व कुलकर्णी लोकांनीं मुंबई सरकार, व्हाईसरॉय, स्टेट सेक्रेटरी यांच्याकडे तारेनें आपल्यावरील अन्याय कळवा.

नंतर थोडा वेळ कुलकर्णी व करवीर दरबार यांच्या हक्कासंबंधीं बोलून लोकमान्य म्हणाले 'करवीर दरबाराला कुलकर्णी वतन खालसा करण्याचा हक्क नाहीं. पण करवीर दरबार आपल्या मर्यादेचें अतिक्रमण करील तर त्यास विचारणारें ब्रिटिश सरकार सध्या युद्धांत गुतलें असल्यानें करवीर महाराजांच्या इच्छेविरुद्ध मुंबई सरकार जाणार नाहीं शिवाय संस्थानिकांच्या 'प्रेस्टीज'ला जपण्याकरतां त्यांच्या अन्यायाकडे कानाडोळा करण्याचें ब्रिटिश सरकारचें सध्यांचें धोरण आहे त्याशिवाय रिक्रूट व लोन कशीं मिळावयाचीं ?"

एवढें भाषण झाल्यानंतर आम्ही निरोप घेतला.

---

## जयकृष्ण केशव उपाध्ये

[ 'लोकमान्यचरितामृतकर्ते,' नागपूर. ]

श्रीयुत गणपतराव बर्वे ( मास्टर मनहर बर्वे याचे वडील ) यांचेकडे मी आपलें 'श्रीलोकमान्यचरित्रामृत' त्यांना देण्याकरितां गेलों असतां त्यानीं चरित्रामृताच्या पुढील खंडांत समाविष्ट करण्याकरितां म्हणून एक आख्यायिका लोकमान्यांविषयीं सांगितली. ती आपल्या आख्यायिकांतच प्रथम प्रसिद्ध व्हावी असें वाटल्यावरून पुढें देत आहें.

श्री० गणपतराव बर्वे म्हणाले, "आम्ही ब्रह्मदेशांत गेलों असतां मंडालें मुक्कामीं आमच्या मनहरचा एक जलसा झाला. त्या वेळेस तेथील एक पारशी गृहस्थ फार खूष होऊन म्हणाले, 'तुमची मी कोणत्या प्रकारानें सेवा करू ? कांहीं तरी आपलें प्रिय करावें असें माझ्या मनांत फार आहे.' तेव्हा त्याला आम्ही म्हणालों "आमचे लोकमान्य येथें सहा वर्षें तुरुंगात होते. त्यांच्या पवित्र वास्तव्यानें पवित्र झालेली तुरुंगाची खोली जर पाहावयला मिळेल तर मला फार धन्यता वाटेल. सारखा सहा वर्षांचा सहवास ज्या जागेला लाभला ती जागा धन्य होय. ती एकवार येथें आल्यासारखी पाहून घ्यावी ही अत्यंत उत्कट इच्छा आहे" त्यावर ते पारशी गृहस्थ म्हणाले, "हल्लींचा येथील जेल सुपरिंटेंडेंट अत्यंत व्रात्य युरोपियन मनुष्य आहे. तेव्हा त्याला वळवून, पाहाण्याचे कसें जमेल याचीच काळजी आहे. तरी प्रयत्न करून पाहू." पुढें दोनचार दिवसानीं एका जल झाला ते पारशी गृहस्थ त्या युरोपियन गृहस्थाला घेऊन आले. त्या दिवशीं

जलशांत युरोपियन पद्धतीचीं वाद्यें वाजवून दाखविण्यांत आलीं होतीं. तो युरोपियन गृहस्थहि खूष झाला. त्याला खुषींत पाहून त्या पारशी गृहस्थांनीं टिळकांचें नांव न सांगतां माझी जेल पाहाण्याची मनीषा असल्याचें त्याला सांगितले. व त्यानेहि तें आनंदानें कबूल केलें.

मग आम्ही दोनतीन दिवसांनीं वेळ ठरवून जेल पहावयाला गेलो व अत्यंत आतुरतेनें जेथें लोकमान्यांना ठेवण्यांत आले होते त्या जागेकडे गेलों त्यावेळेस ती जागा मोकळीच होती. तेथें कोणीच कैदी वगैरे नव्हतें. पण तेथे एक म्हातारा मुसलमान पाहारेकरी मात्र होता. त्यानें आम्हाला ती जागा वगैरे दाखवून म्हटलें.

" देखिये महाराज, आज एक साल होगया, यहां एक अवलिया क़ैद मे रखे गये थे ! छे सालतक वे यहां थे ! मराठा जात के थे ! क्या इन्सान था ! कैसी दमकदार आंखें थीं और कैसा शेर बब्बर सरीखा चेहरा था ! मैं यहां रहते रहते बूढा होगया, लेकीन ऐसा कैदी मेरे देखने में इतनी उमरतक नहीं आया ! देखिये जनाब ! ये दरख्त जो आप सामने देख रहे हैं ये सब आज मुरझाये दीखते हैं ! उनको पानी डालते हैं। और सब तरहकी उनकी निगाह की जाती हैं। लेकीन उनपर तजेलाहि आतां नहीं। वे अवलिया यहां आने के पेशतर भी थे झाडों का यही हाल था। लेकीन जब वे महात्मा यहां आये तो एक महिनेमें ये सब झाड ताजे ताजे दीखने लगे और फूल और फलोंसेभी भर गये। ऐसा हाल जबतक वे महात्मा यहां थे तबतक हमेषा चला रहा। लेकीन जबसे वे यहांसे चाले गये तबसे ये झाडोंको ना फूल और ना फल आता हैं। और सबके सब जैसा कोई उनका रिश्तेदार मरगया हो ऐसे दिखाई देते हैं। सब बिचारे मुरझा गये हैं। वैसाहि अथक पानी डाला जाता हैं। और वैसींहि उनकी निगाह कीं जाती हैं। लेकीन मैं एक सालसे देखरहा हू कीं, एक बी दिन ये झाड मुझे हरेभरे नहीं दिखे। कोन महात्मा थे मैं नहीं जानता। उनसे बोलनेकी भी मुमानियत थी। इसलिये उनका नाम या गांव भी मेरेको मालुम नहीं हुआ ! " इतकें बोलून तो थांबला.

त्याने सांगितलेली हकीकत ऐकून अंतःकरण गहीवरून आलें ! कंठ सद्गदित झाला व डोळ्यावाटे अश्रुबिंदुहि टपकले. ते तसेच उपरण्याच्या पदरानें पुसून आनंद, खेद, आश्चर्य, आदर इत्यादि विकारमिश्रित अंतःकरणाने, मनानेंच त्या पवित्र भूमीला साष्टांग नमस्कार करून आम्ही परत फिरलो.

निसर्गावरहि टिळकांच्या सहवासाचा किती प्रसन्नता–दायक परिणाम होत होता याचें त्यावेळीं आम्हाला प्रत्यंतर आले.

## यादव बाळकृष्ण भाग्यवंत

[ मुळावा, ता० पुसद, वऱ्हाड. ]

( १ ) इ० स० १९१८ सालची गोष्ट. त्यावेळेस वऱ्हाडात लोकमान्यांचा स्वराज्य–दौरा निघाला होता. अशा समयींच लोकमान्यांच्या पुण्यदर्शनाचा योग पुसदकरास आला. वऱ्हाडांत अगदीं कोंपऱ्यातच पुसद असल्यामुळें लोकमान्यांच्या दर्शनार्थ " न भूतो न भविष्यति " असा जनसमाज लोटला होता.

पूस नदीच्या विस्तीर्ण वाळवंटावर मोटार उभी करण्यात आली. भोवताली मुग्यांसारखा लोकसमाज पसरला होता. ' लोकमान्य टिळक महाराज की जय ' असा जिकडे तिकडे जयजयकार सुरू झाला. लोकमान्यांच्या वऱ्हाडातील दौऱ्यात पुसदसारखा लोकसमाज कोठेंच नव्हता असें म्हणतात.

पुसदास गणपत रेवणराव नांवाचे सद्‌गृहस्थ आहेत. त्यांच्या आईच्या मनात लोकमान्यांचें दर्शन घ्यावें अशी फार इच्छा होती. तिचें वय सत्तरपाऊणशें वर्षांचे असावें. लोकमान्य पुसदास आले आहेत असें तिला समजल्यावरून ती त्यांच्या दर्शनासाठीं ते ज्या मार्गावरून जेवावयास जाणार त्या मार्गात तिष्ठत बसली. अतुकाका इत्यादि मंडळींसह लोकमान्य जेवावयास चालले होते. म्हातारी मार्गात बसलेली पाहून अतुकाका म्हणाले, " बाई रस्ता सोड " बाई म्हणाली, " टिळक महाराजांचें दर्शन झाल्याशिवाय मी मार्गांतून उठणार नाहीं. " म्हातारीचा भाव आणि दृढनिश्चय पाहून लोकमान्य पुढें झाले आणि म्हातारीनें आपले मस्तक लोकमान्यांच्या चरणावर ठेविलें. त्यावेळेस तिला खरोखरच धन्यता वाटली. तिनें एका पायावरून मस्तक काढून दुसऱ्या पायावर ठेवावें असे झपाझप सातआठ वेळां केलें तेव्हा लोकमान्य म्हणाले, " बाई, तुम्ही आज माझा पुण्यक्षय केला. पण तुमचा आत्मा संतुष्ट झाला असेल तर निदान पाप तरी मी केलें नाहीं म्हणून मला बरें वाटेल. "

( २ ) नाशीक येथें सन १९१७ सालीं मुंबई प्रांतिक परिषद भरली होती. त्यावेळेस स्वराज्य संघासाठीं दोन दिवसांचा कार्यक्रम ठरला होता.

परिषदेस एक दोन दिवसांचा अवकाश असल्यामुळे तपस्वी डॉ० बाबासाहेब परांजपे गांवाला गेले होते. त्यांच्या गैरहजेरींत दोन दिवसाचा कार्यक्रम एकाच दिवसांत उरकून घेण्याचे ठरलें. बाबासाहेब परत आले. तेव्हा त्यांना वरील हकीकत समजली त्यावेळेस त्यांना थोडा राग आला आणि त्यांनीं तेथें हजर असलेल्या सर्व पुढारी मंडळींस विचारलें कीं, " आपण दोन दिवसाचा कार्यक्रम एका दिवसांत उरकून घेण्याचें कां ठरविलें ? आपणास इतकी कशाची घाई झाली होती ? " या प्रश्नास कोणीच उत्तर देत नाहीं, हें पाहून लोकमान्य

उभे राहिले व विनोदानें म्हणाले, " आता विचाराचे दिवस जात आहेत व कृतीचे दिवस येत आहेत. आणि म्हणूनच स्वराज्यासाठीं दोन दिवसांचा कार्य-क्रम एका दिवसात आटोपून घेण्याचें ठरविलें. विचारांत आपणांस दिवस घाल-वावयास फुरसत नाहीं ! "

( ३ ) सन १९१५ च्या सुमारास गणपतराव कुळकर्णी मुळावेकर हे पुण्यास डॉ० पराजपे यास घेऊन लोकमान्यांच्या भेटीसाठीं त्यांच्या घरीं गेले होते. त्या महात्म्यास पाहून गणपतरावानीं प्रेमाने व भक्तीने लोकमान्याचे चरणावर मस्तक ठेविले. लोकमान्यानीं बाबासाहेबास गणपतरावाविषयीं माहिती विचारली व नंतर ते म्हणाले, " तुमच्यासारखी विकलीसवरलेली मडळी जर पायावर डोकें ठेऊ लागलीं तर मग अशिक्षित लोकानीं तसेच केल्यास त्यात नवल नाहीं. मी कांहीं देव नाहीं अगर साधूहि नाहीं, तुमच्यासारखाच प्रापचिक मनुष्य आहे. व अशाच्या पायावर डोकें ठेवण्यानें तुम्ही आपला स्वाभिमान नष्ट करतां, हें बरें नव्हे."

---

## कृष्णाजी लक्ष्मण सोमण

[ केसरींतील एक जुने प्रसिद्ध लेखक ' किरात ', बेळगांव.]

( १ ) इ. स. १८९४ चा पुण्यांतील गणपती उत्सव पार पडण्यास एक दिवस उरला होता. त्या रात्रीं दारूवाल्याच्या पुलावर-एका मुसलमानाचा खून झाला म्हणून-१३ जणांस पोलीसानीं पकडून त्यांचेवर खटला केला. त्यामध्यें माझा धाकटा भाऊ रघुनाथ लक्ष्मण सोमण हाहि धरला गेला. त्या वर्षी तो बी. ए. च्या परीक्षेस बसावयाचा होता. रास्त्याचे पेठेतील गणपती पाहून परत घरीं येत असतां पोलीसानीं त्यास अचानक पकडले ! मला काय करावें ते सुचेना. म्हणून मी लोकमान्यांच्याकडे गेलों व त्यांना सर्व हकीगत सांगितली. ते बडो-द्यास-बापटांच्या खटल्याकरिता-जाण्याच्या तयारींत होते. मी गडबडून गेलों आहे असें पाहून ते मला म्हणाले:-" भिण्याचें कांहीं एक कारण नाहीं. तुम्ही आमडेकर वकीलांचेकडे जा; त्यांना माझें नाव सागा म्हणजे ते सारी व्यवस्था करतील. मी या बाबतींत मला काय सांगावयाचें तें माधवराव नामजोशांना सागून ठेवतों. आणि इतकेंहि करून तुम्हाला माझीच जरूर वाटली तर मला बडोद्यास तार करा. म्हणजे दुसरे दिवशीं मी येथे ठेवलेला आहें असें समजा." हे लोकमान्यांचे आश्वासनपूर्ण शब्द ऐकून मला किती तरी धीर आला. त्याला आपला म्हटलें त्याला आपला अभयहस्त देण्यास त्यांची वृत्ति कशी आपोआप सरसावत असे याचें हें एक अल्पसें उदाहरण आहे, असें मला वाटतें.

(२) तें बङ्गभङ्गाच्या चळवळीचें वर्ष होतें; व इ.स.१९०५ चा सप्टेंबर महिना होता. " बङ्गभङ्गप्रकोप अथवा दिव्य अरुणोदय " असें नांव योजून मी एका पंचांकी गद्यनाटकाचा अकवार आराखडा काढला होता. आणि तो घेऊन मी पुण्यास गेलों. हेतु हा कीं आपली कल्पना लोकमान्यांच्या पुढें ठेवावी व त्यांची पसती पडल्यास, व त्यांनीं कांहीं सूचना केल्यास त्यांचा फायदा घेऊन, आपलें नाटक लिहून काढावें. मी गायकवाडवाड्यांत त्यांना भेटण्यास गेलों. कां आला होतां म्हणून विचारितां मी माझ्या येण्याचें कारण त्यांना सांगितलें. त्यावर ते म्हणालेः—"तुमची कल्पना ठीक आहे. पण या नाटकांतील नायक व नायिका यांचेकडून तुम्हीं कोणचें कार्य करविणार आहां ? " त्यावर मी सांगितलें कीं, " नायक राष्ट्रीय विद्यालय स्थापण्याकरितां आपलें सर्वस्व वेंचित असल्याचें मी दाखविणार आहें व नायिकाहि तिच्या पित्याकडून तिला मिळालेली सर्व संपत्ती देशी वस्तूंच्या निर्मितींत वेंचणार असून, त्या दोघांनाहि आपापल्या अंगीकृत कार्यांत यश आल्याशिवाय, परस्परांचें प्रेम जुळलें असतांहि—लग्न करावयाचें नाहीं असा निश्चय करितात. व यशःसिद्धी येईपर्यंत अत्यंत कडकपणानें व्रतस्थ राहण्याच्या प्रतिज्ञा करितात. " माझ्याकडून नाटकांतील नायकनायिकेच्या स्वभावांची ही रूपरेषा ऐकतांच लोकमान्य एकदम म्हणालेः—" जा, बेलाशक नाटक लिहा. यापेक्षां जास्त ऐकण्याची कांहीं जरूर नाहीं!"

( ३ ) १९०७ सालीं मी व रा० रा० विश्वनाथपंत राजवाडे एकदां लोकमान्यांना भेटावयास गेलों. त्यांना भेटून कांहीं मंडळी नुकतीच बाहेर पडली होती, तोंच आम्हीं आंत गेलों. औपचारिक प्रश्न झाल्यावर राजवाडे यांनीं प्रत्यक्ष राजकारणांत पडण्याची आपली इच्छा दर्शविली. तेव्हां टिळक म्हणालेः— " तुमचें इतिहाससंशोधनाचें काम झालें काय ? झालें असेल तर इकडे या. तुमच्या सारख्या झटून काम करणाऱ्या लोकांची आम्हांला जरूरच आहे. खरे workers आहेत कोठें ?" नंतर राजवाडे यांनीं दादाभाई नौरोजी, लजपतराय, अरविंद बाबू, पाल वगैरे लोकनायकांच्या संबधानें त्यांचें मत विचारिलें. त्यांनींहि तें स्पष्टपणें अगदीं मोजक्या शब्दांत सांगितलें. कोणत्याहि प्रकारचा आडपडदा ठेविला नाहीं. तें प्रत्येकाच्या स्वभावाचें पूर्ण द्योतक असेंच होतें. कांहीं वेळ बसून आम्हीं जावयास निघालों, तेव्हां लोकमान्यांनीं पुन्हा विचारिलें.:—"मग तुम्ही कधींपासून येणार? " यावर राजवाड्यांनीं काय उत्तर दिलें तें मला आतां स्मरत नाहीं. पण तदनंतर राजकारणांत ते पडल्याचे कोणाच्या ऐकिवांत नाहीं, एवढी गोष्ट खरी. ' मग तुम्हीं कधींपासून येणार ?" हा प्रश्न जो लोकमान्यांनीं केला त्यांतच ते येणार नाहींत हें आपण जाणून आहों, हा ध्वनि होता !

(४) इ. स १९१६ च्या बेळगांव येथील प्रांतिक सभेच्या प्रसगीं सबजेक्ट कमिटीच्या बैठकी होत. तेथें कामकाज कोणच्या प्रकारें चालतें तें पाहाण्यास मी असत असें. तेव्हां सभेपुढें मांडलेले ठराव केव्हां केव्हां अवजड असत. त्यांना सुटसुटीतपणा देऊन ते सर्व सभासदांस पटतील अशा प्रकारें कांटेतोल शब्दांत मांडण्यांत रा० रा० न० चिं० केळकर उर्फ तात्यासाहेब यांची विलक्षण हातोटी बहुतेक प्रत्येक ठरावाचे वेळीं निदर्शनास येत असे. पण त्याबद्दल त्यांचे कोणी आभार मानल्याचें मला स्मरत नाहीं. यासबंधानें लोकमान्यांचे आभार मानले गेले. या प्रसंगीं लोकमान्यांच्या तोंडून "The lion's share goes to Mr. Kelkar" असे केळकरांच्या सबंधाने प्रशंसोद्गार बाहेर पडले! हें ऐकून मला किती तरी आनंद झाला. कारण सत्य गोष्ट होती तीच प्रेमभरांत त्यांच्या तोंडून आपोआप बाहेर पडली.

(५) लोकमान्यांच्या संबंधानें रायगडावर घडलेली मी एक गोष्ट ऐकिली ती अशी आहे. तेथें असलेल्या मोठ्या तलावावर मंडळी स्नानार्थ गेली. पण तलाव अपरिचित असल्यामुळें त्यांत उडी टाकण्याचा कोणास धीर होईना. तें पाहून लोकमान्यांनीं तळ्यांत प्रथम उडी टाकली. जो तो तळ्यांत खडक वगैरे असल्यास आपला कपाळमोक्ष होईल म्हणून भीत असे. ही त्यांची भीति पाहून लोकमान्य म्हणाले:—"येथें एवढें मोठ मोठे वाडे उठल्याचें स्पष्ट दिसतें, त्याला ह्या तळ्यानेंच सारे दगड पुरविलेले असले पाहिजेत. मग ह्या तलावामध्यें खडक असणें शक्य तरी कसें आहे?" तेथें असलेल्या सर्व जणांना लोकमान्यांच्या या अचुक अनुमानाचें आश्चर्य वाटलें आणि मग सर्व जणांनीं अगदीं निर्भयपणें त्यात उड्या घातल्या.

---

## गणेश सदाशिव सहस्रबुद्धे

[एल्. एम्. अँन्ड एस्. डॉक्टर, पुणें.]

लोकमान्य कैलासवासी होण्याचे पूर्वी दोन वर्षें, त्यांचा व माझा रोगी व वैद्य ह्या नात्यानें संबंध आला होता. गायकवाडवाड्यांत रहाणाऱ्या मंडळींना मलेरियाचा ताप वरचेवर येत असे. लोकमान्यांनाहि हा विकार मधून मधून होत असे. आजारी पडले असतांना अगदीं शांत व कांहीं एक न बोलतां स्वस्थ पडण्याची लोकमान्यांना संवय होती. एके वेळीं त्यांना बराचसा ताप येऊन ते अशा स्थितींत पडले होते. मला तो अनुभव नसल्यामुळें व शिवाय त्यांना मधु-

मेहाचा विकार असल्यामुळे मधुमेहाच्याच विषानें त्याची ही स्थिति असेल कीं काय असें मला वाटूं लागलें. व अशा स्थितींत मलेरियासाठीं कीनाईनचे इंजेक्शन त्यांना मधुमेह आहे अशी माहिती असतानाहि द्यावें कीं काय ह्या विचारांत मी होतों. परंतु थोड्याच वेळांत त्यांनीं स्वतः जागें होऊन " मला असें स्वस्थ पडून राहाण्याची सवय आहे " असें मला सांगितलें. त्यांच्यात व माझ्यांत वयाचें फार अंतर होतें. शिवाय दोघांच्या योग्यतेमध्यें फारच मोठें अंतर ! तरी वैद्यानें अमुक खावें, किंवा अमुक तऱ्हेनें वागावें अशी सूचना त्यांस दिल्यावर त्याचें उल्लंघन मात्र ते कधींहि करीत नसत. रोगी ह्या नात्यानें लोकमान्यांची वैद्याशीं वागणूक अगदीं प्रशंसनीय होती. मग इतर बाबतींत ते हट्टी कितीहि असोत! शिवाय एकदां एका वैद्याच्या हातांत रोगी दिल्यानंतर त्याची त्यावर श्रद्धा पूर्ण असे. दहा वैद्य व डॉक्टर भेटायला व चवकशी करायला आले तरी त्यांच्या वृत्तींत कांहीं चलबिचल होत नसे.

---

## यशवंत नारायण आठवले

[ कॉन्ट्रॅक्टर, पुणें. ]

( १ ) सन १९१७ च्या मे महिन्यांतील गोष्ट. लोकमान्य त्यावेळीं विश्रांती साठीं सिंहगडावर राहिले होते. ताईमहाराज प्रकरणाचा निकाल होऊन येथील श्रीबाबामहाराज यांच्या वाडादुरुस्तीचें काम, लोकमान्यांनीं आम्हास दिलें होतें, त्यामुळें वाडा साहजीकच आमच्या ताब्यांत होता. त्याचवेळीं माझें स्वतःचें लग्न निघालें म्हणून, गडावर निरोप पाठवून, वाडा जानोशाला घेण्याबद्दल त्यांची परवानगी विचारली. त्यास त्यांनीं खालील लेखी उत्तर पाठविलें. " आज वाडा तुमच्याच ताब्यांत आहे; तेव्हां तो तुम्हांस वापरण्यास हरकत कोणती ? पण एकास दिल्यानंतर, दुसऱ्या कोणी मागितल्यास त्यास नाहीं कसें म्हणता येईल ! व मग तसा देत गेल्यास. आपल्याच कामाची खोटी होईल; सबब रागास येऊ नये. " वरील क्षुल्लक गोष्टींतहि " लोक राजी राखणें " हें त्यांचे व्रत दिसून येतें.

( २ ) सदर वाड्याच्या दुरुस्तीच्या कामांत, मागील एक चादईची भिंत, शेजारच्या मालकाच्या समाईक खर्चानें बांधण्याचा प्रश्न निघाला असतां, लोकमान्यांनीं आम्हास विचारलें, " भिंतींत कच्चेपणा कोठेंहि न राहू देतां, ठरलेल्या निम्म्या खर्चाच्या आंत तुम्हांस ही भिंत बांधतां येईल काय ? " आम्हांस

काहीं सुचत नाहीं असें पाहून लोकमान्य म्हणतात, "अहो, आंतील बाजूनें कमानी देऊन बांधकाम बांधेल, कमानींत सामान ठेवण्याची सोय होईल, शोभा दिसेल आणि आपल्या हिश्शांतील खर्चही पुष्कळ कमी होईल ! " वरील गोष्टीवरून त्यांचें इंजिनिअरिंग शास्त्रांतील ज्ञान व हातीं असलेल्या दुसऱ्याच्या खर्चांत योग्य काटकसर करण्याची बुद्धि, हे गुण प्रामुख्यानें अनुभवास येतात.

( ३ ) वरील वाड्याच्या दुरुस्तीचें सर्व काम संपून, श्रीजगन्नाथ महाराज यांचें लग्न ठरल्यावेळीं, इकडील जुन्या पद्धतीप्रमाणे, वाड्यांत सर्वत्र देवादिकांचीं व शिपाईप्याद्यांचीं चित्रें भिंतींवरून काढण्यांत आलीं होतीं. वाड्याची पाहणी करण्याकरितां एक दिवस लोकमान्यांची स्वारी तेथे आली. मनाप्रमाणे सर्व कामें झालेलीं पाहून, खूष होऊन स्वारी घरीं परत चालली. दरवाज्याच्या बाहेर दोन्ही बाजूंच्या भिंतीवर चितान्याने लढाऊ शिपायांच्या चित्रांची अगदीं गर्दी करून सोडली होती. त्याचवेळीं पुण्यांत रिक्रूटच्या प्रश्नाला फार जोर होता. गाडींत बसतां बसतां लोकमान्य म्हणतात, "अहो आठवले, हे शिपाई इतके कशाला काढलेत ? कलेक्टरसाहेबांना कळवा कीं, रिक्रूटभरतींत आमच्याकडून ही मंडळी घेऊन जा. त्यांचा तुम्हाला फार उपयोग होईल ! "

( ४ ) गीतारहस्य प्रसिद्ध झाल्यावर, तें वाचून, कांहीं शंका उत्पन्न झाल्या त्यांचें टांचण केलें व कांहीं वेळ तरी या थोर पुरुषाच्या सहवासांत जावा या हेतूनें, शंकासमाधानाचें निमित्त करून मी एक दिवस त्यांजकडे गेलों. टांचणें वाचून पाहून कांहींचीं उत्तरें त्यांनीं दिलीं व जगताचा कर्मारंभ त्यावेळीं झाला त्यावेळींच मनुष्य जातीवर सुखदुःखाचा बोजा कां लादला ? हा प्रश्न ऐकून ते पुढें म्हणतात, "एक गृहस्थ एका गांवाहून दुसऱ्या गांवीं जाण्यास निघाले. वाटेंत एक नदी लागली; तेव्हां हे गृहस्थ नदीच्या कांठावर बसून विचार करूं लागले व भेटणाऱ्या मंडळीस विचारूं लागले कीं, 'कायहो, ही नदी येथेंच कशी आली ? ती त्या गांवाच्या पलीकडूनच कां नाहीं गेली ? बरें, आली तर आली, पण मी येण्याच्या वेळींच हिला इतकें पाणी कां ? ही कोरडी कशी झाली नाहीं ? ' हें ऐकून दुसरे एक गृहस्थ विचारतात, 'अहो, तुम्हांस पलीकडच्या गांवीं जावयाचें आहेना ? मग या गोष्टींचा विचार करून तुमचा त्या गांवीं पोंहोचण्याचा हेतु कसा सिद्धीस जाणार ? कोठें तरी नदीला उतार पाहा, किंवा होडीनें अगर येत असल्यास पोहून पलीकडे जा; पण येथें बसून व वरीलप्रमाणें नुसता विचार करून, तुमचें पलीकडे जाणें कसें होईल ? " लोकमान्य मला पुढें म्हणतात, "तर अशाच तऱ्हेचा तुमचा 'प्रारब्धशोधनाचा व जगत्कर्मारंभाचा' प्रश्न आहे. वरील प्रश्न मलाहि उत्पन्न झालेला आहे, पण चिकित्सा किंवा तर्कपद्धतीनें तो सोडवूं गेल्यास, जीवन्मुक्तीचें साध्य आपणांस

कधींहि लागणार नाहीं व परगांवीं जाळ इच्छिणाऱ्या वरील गृहस्थाच्याच आपत्तींत आपण सांपडूं."

( ५ ) वरील शंकानिरसनप्रसंगींच येथील एक विद्वान वैदिक शास्त्री लोकमान्यांजवळ राहून ग्रंथवाचन करीत होते. माझ्या शंकांपैकीं कांहीं वैदिक-कर्मकांडांपैकीं होत्या. त्यांचें समाधान करण्यास लोकमान्यांनीं शास्त्रीबुवांस सांगितलें. त्यांनीं मला बाजूस नेऊन प्रश्न केला कीं, "तुम्ही रोज संध्या, वैश्वदेव, ब्रह्मयज्ञ वगैरे विनचूक करतां कां ? तो विधी जर सार्थ करीत नसाल तर सर्वं करीत चला, म्हणजे त्यांतच तुमच्या प्रश्नांचीं उत्तरें आहेत !" शंकासमाधान अशा विपरीत तऱ्हेनें झालेलें पाहून, लोकमान्यांचा निरोप घेण्यास त्यांच्याकडे गेलों व त्यांनीं विचारतांच, झालेली हकीकत त्यांस सांगितली. तसेंच खुर्चीवरुन उठून, पुढल्या दिवाणखान्यांत शास्त्रीबुवांजवळ येऊन त्यांना म्हणतात, "हे पाहा शास्त्रीबुवा, अलीकडे ब्राह्मणाचीं शेंकडा ५०।७५ मुलें संध्या वैश्वदेव वगैरे ब्रह्मकर्म करीत नाहींत. यांचे कारण, खरोखरीच तुम्ही आहांत. त्या त्या कर्माचें महत्त्व मुलांचे पालक अगर गुरुजन जर त्यांस समजाऊन देत नाहींत तर त्या कर्मविन्मुखतेबद्दल त्यांना दोष देण्यांत काय अर्थ आहे ! 'संध्या करण्यापासून सूर्याची उपासना घडून, त्याजपासून तेजाची प्राप्ति, जलदेवतापासून औषधींची प्राप्ति, दिक्पालांपासून अभय व गायत्री ही मंत्रमाता असल्यामुळें तिजपासून सर्व सुखांची समृद्धि व आयुरारोग्य हीं मिळतात' अशा तऱ्हेनें पालकांनीं व तुमच्यासारख्या धर्मरक्षक वैदिकांनीं जर मुलांना लहानपणींच समंजुतीनें शिकविलें तर माझी खात्री आहे कीं हल्लींच्या धर्मग्लानीच्या काळांत सुद्धां शेंकडा ९० मुलें अगदीं हौसेनें ब्रह्मकर्म पाळूं लागतील ! यांच्यासारख्या होतकरू मंडळीच्या शंका तुम्ही सांगितल्याप्रमाणें बाटाण्याच्या अक्षता लाऊन जर आपण दूर करूं लागलों तर ती नाउमेद होऊन वैदिक आचारापासून अधिकच दुरावतील व धर्मऱ्हासाला पर्यायानें आपणच कारण होऊं !"

---

## त्र्यंबक भिकाजी हर्डीकर

[ एम्. ए., गणित विषयाचे प्रोफेसर, न्यू पूना कॉलेज, पुणें. ]

लोकमान्यांच्या शेवटल्या भयंकर दुखण्यांतील गोष्ट! लोकमान्य कधीं शुद्धीत कधीं गैरशुद्धींत असे बोलत असत. आम्ही बरेच जण रात्रपाळीसाठीं म्हणण्यापेक्षां, मनाच्या व्यग्रतेमुळें, झोंप येत नव्हती म्हणून, शेजारच्या खोलींत जागत बसलों होतों. मध्यरात्रीचा दोन अडीच वाजण्याचा सुमार होता. औषध देण्याची वेळ झाली म्हणून डॉक्टरांनीं लोकमान्यांना थोडें सावध केलें. त्यावेळीं त्यांना शुद्धी चांगली होती व अम्मळ हुशारीहि वाटत होती. डॉक्टरांनीं न बोलतां मुकाट्यानें 'डोस' दिला. 'काय दिलें' म्हणून लोकमान्यांनीं विचारलें तेव्हां घशाला शोष पडूं नये म्हणून येथल्या नळाच्या पाण्याचा थोडा घोट घातला असावर डॉक्टरानीं भ गविण्याचा प्रयत्न केला. औषधांत कडूपणा बिलकुल नव्हता; उलट साखरेचा थोडा गोडपणाच कळे न कळेसा होता म्हणून एवढी फसवणूक सहज खपून जाईल असें डॉक्टरसाहेबाना साहजिकपणेंच वाटलें. नळाच्या पाण्याचा घोट म्हटल्याबरोबर "तुमच्या मुंबईच्या म्युनिसिपालिटीला माझ्यासारखा मधुमेहाचा रोग केव्हांपासून जडला?" असा खोंचदार प्रश्न लोकमान्यांनीं डॉक्टरांना तत्क्षणीं विचारला. तशाहि परिस्थितींत लोकमान्यांच्या विनोदाचें आम्हा सर्वांना कौतुक वाटलें व शेजारीं असणाऱ्या आम्हा लोकांची ही लहानशी आठवण कधीं बुजेल असें वाटत नाहीं.

---

## जगन्नाथ गणेश गुणे ऊर्फ कुवलयानंद

[ एम्. ए., संपादक 'योगमीमांसा,' कुंजवन, लोणावळें, जि० पुणें. ]

(१) १९०४ सालीं मी डेक्कन कॉलेजांत पहिल्या वर्षांत अभ्यास करीत होतों. उपांत्य परीक्षेनंतर मिळणाऱ्या चारपांच दिवसांच्या विश्रांतीच्या वेळांत सिंहगडावर दोन दिवस राहून यावें असें मी व माझ्या कांहीं स्नेह्यांनीं ठरविलें. सिंहगडावर असलेल्या लोकमान्यांच्या बंगल्यांत राहतां आलें तर फारच उत्तम असें वाटलें; आणि आम्ही सफरीला निघण्यापूर्वी पांचसहा दिवस लोकमान्यांची परवानगी विचारण्यास त्यांच्याकडे गेलों. लोकमान्यांची स्वारी त्यावेळीं कामाच्या विशेष गर्दींत होती. तथापि आमच्याशीं चार शब्द बोलून आम्ही सिंहगडावर नक्की कधीं जाणार तें विचारून बंगल्यांत राहाण्याबद्दल आम्हांस त्यांनीं मोठ्या

आनंदानें परवानगी दिली. ' रखवालदारास माझें नांव सांगा म्हणजे तो तुम्हाला तेथें राहूं देईल ' असें लोकमान्यानीं सांगितलें.

ठरल्याप्रमाणें आम्ही गडावर गेलों, परतु तेथें पोंचतों तों बंगल्याचा रखवालदार आदल्या दिवशीं पुण्यास गेल्याचें समजलें! आम्ही बाहेरच्या पडवींत सामान ठेवलें आणि थोडी विश्रांति घेऊन फराळ करतों न करतों तों रखवालदार आमचा तपास करीत आला! आम्ही गडावर कधीं जाणार हें बरोबर लक्षांत ठेवून लोकमान्यांनीं आमची गैरसोय होऊ नये म्हणून त्या रखवालदारास आल्या पावलीं परत पाठविलें होतें!!

( २ ) हिंदुस्थानविषयक चळवळ परदेशांत होणें लोकमान्यास अत्यंत इष्ट वाटत असे. एवढेंच नव्हे तर परदेशातील लोक हिंदुस्थानाबद्दल काय बोलतात व काय लिहितात हेंहि हिंदवासीयांस उत्तम प्रकारें माहीत असावें असा त्यांचा कटाक्ष होता. ज्या अनेक कामांकरितां ' केसरी ऑफिस'तर्फे मला मुंबईस ठेवण्यांत आलें होतें, त्यांतील एक महत्त्वाचें काम पुढीलप्रमाणें होतें. आताप्रमाणेंच त्यावेळींहि परदेशची डाक दर शुक्रवारीं मुंबईस येत असे. परदेशची डाक येतांच तावडतोब तिकडच्या नियतकालिकांतील हिंदुस्थानविषयक चर्चा वाचून त्यावरील टीकेसह तिचा गोषवारा त्याच आठवड्याच्या ' मराठ्यां'त व ' केसरीं'त पाठवा अशी लोकमान्यांची मला आज्ञा होती.

( ३ ) आपण करीत असलेल्या राजकीय चळवळीस व्यापारीवर्गाचें पाठबळ असावें अशी लोकमान्यांची प्रबळ इच्छा होती. मुंबईचा व्यापारी वर्ग अनुकूल झाल्यास इतरत्र कार्य सुकर होईल असें त्यास वाटे या दृष्टीनें खुद्द लोकमान्यांच्या देखरेखीखालीं संघटित झालेलें एखादें राजकीय चळवळीचें केंद्र मुंबईस असावें, व मुंबईकरिता ' केसरीं'त एक स्वतंत्र विभाग ठेवावा व अशा रीतीनें मुंबईच्या व्यापारीवर्गापर्यंत चळवळ नेऊन भिडवावी अशी त्यांची मनीषा होती. या कार्याचा उपक्रम करणें हाहि मला मुंबईस ठेवण्यात लोकमान्यांचा एक हेतु होता व त्याकरितां त्यांनीं कांहीं प्रसिद्ध व्यापाऱ्यांची व माझी ओळखहि करून दिली होती. यावरून व्यापार व राजकारण यांच्या निकट संबंधाची जाणीव लोकमान्यांस कशी होती हें सहज लक्षांत येईल.

---

# मोरेश्वर नारायण आगाशे

[ एल्. एम्. अँड एस्. डॉक्टर, कै॰ नानासाहेब आगाशे वकील यांचे चिरंजीव, सातारा. ]

लो॰ टिळकांसंबंधानें मला प्रत्यक्ष अशी फारशी माहिती नाहीं; पण वडिलांचे सांगण्यांत एक गोष्ट आली ती आठवते.

( १ ) १९१६ सालीं लखनौस कॉंग्रेस भरली होती व कॉंग्रेस नियमबद्ध झाल्यावर कॉंग्रेसला जाण्याचा माझा हा योग पहिलाच होता. या वर्षी कॉंग्रेसमध्यें अपूर्व उत्साह दिसून आला. डेलिगेटांच्या व प्रेक्षकांच्या मानानें मंडप लहानच पडल्यानें खुर्चीला खुर्ची खेटून मांडली होती तरी गर्दी अगदीं धिकार झाली होती. आज काय कॉंग्रेसचा पहिला दिवस, उद्या काय सर जेम्स मेस्टन येणार, परवां काय तर होमरूलच्या प्रश्नांवर प्रसिद्ध वक्त्यांचीं जगी सणसणीत भाषणें होणार अशा कांहीं ना कांहीं कारणानें दर दिवशीं लोकांचा वाढता उत्साह दिसून येत होता. मेस्टनबरोबर सर व्हॅलेंटाईन चिरोल येणार अशी प्रथम दाट बातमी होती. मुंबईस वुइल्सन कॉलेजांत आगरकर–डे साजरा करण्यांत आला, त्या वेळीं टिळक व चंदावरकर–सामाजिक वादांमधील वादी व प्रतिवादीच ते–हे एकाच व्यासपीठावर येण्याचा सुयोग किंवा कुयोग मुंबईच्या लोकांस पहावयास मिळाला होता. चिरोलसाहेब मेस्टन यांजबरोबर येता तर लोकांना असेंच एक दृश्य पाहावयास मिळणार होतें. इतक्यांत अशी एक बातमी पसरली कीं, चिरोलसाहेब व्यासपीठावर आला तर त्याला ‘ हिसिंग ’ व ‘ धिकार ’ यांचा आहेर करण्यांत येणार ! मनुष्याचें मन सूचनाग्राहि असतें व सभांमधील असले प्रकारहि ससर्गजन्य असतात. टिळकांपर्यंत ही बातमी पोंचतांच त्यानीं ताबडतोब पेन्सिलीनें सर्क्युलर लिहिलें व थोड्याच वेळांत तें मुंबईच्या डेलिगेटांत फिरूं लागलें. या सर्क्युलरांत मुंबईच्या एकाहि डेलिगेटानें असें वर्तन करूं नये अशी विनंति केली होती. चिरोल आलाच असता तर तो सर जेम्स मेस्टन यांचेबरोबरच येता व त्यामुळें असा प्रकार होणें हें अमळ कठीण व गैरशिस्तच होतें. चिरोलसाहेब खरोखरच कॉंग्रेसमध्यें व्यासपीठावर दिसता तर लोकांचा कल कोणीकडे झुकता हें सांगणें कठीणच आहे. पण चिरोलसाहेब न आल्यामुळें हा प्रकार टळला येवढें मात्र खरें.

---

## दाजीशास्त्री चांदेकर

[ प्रसिद्ध हरिदास व शास्त्री, नागपूर. ]

॥ यास्तेषां स्वैरकथास्ताएव भवंति शास्त्राणि ॥

(१) लोकमान्य टिळकांना साठावें वर्ष लागलें त्यावेळीं महाराष्ट्र, मध्यप्रांत व वऱ्हाड येथील त्यांची स्नेही व अनुयायी मंडळी लोकमान्यांची जयंति साजरी करण्याकरितां पुण्यास आली. जयंतीचे दिवशीं निरनिराळ्या जिल्ह्यांतून व प्रांतांतून आलेली मंडळी एकमेकाशीं बोलण्यांत अगदीं दंग झाली होती. इतक्यांत बेळगांव, नगर वगैरे ठिकाणीं लोकमान्यांचीं होमरूलवर जीं व्याख्यानें झालीं होतीं त्यासंबंधीं लोकमान्यावर नोटीस बजावण्यांत आली. झाले हां हां म्हणतां ही बातमी सर्व वाड्यांत पसरली. सर्व मंडळी माडीवरील एका खोलींत लोकमान्य बसले होते तेथें जमली. लोकमान्य दाजीसाहेब खरे यांना उद्देशून म्हणाले—" हे पाहा दाजीसाहेब, माझ्यावर यावेळीं खटला करून नोकरशाहीनें मजवर उपकारच केले असें मी समजतों. कारण मी आतां वृद्ध झालों आहें. गांवोगाव होमरूलवर व्याख्यानें देऊन त्यासंबंधीं माझें मत जाहीर करण्यास मी असमर्थ आहें, अशी माझी कींव जाणूनच नोकरशाहीनें हा खटला भरला असें मला वाटतें. आतां असें होईल, या खटल्यांत होमरूलसंबंधीं मला जें काहीं सांगायचें होतें तें सर्व मी माझ्या स्टेटमेंटमध्यें सांगून टाकीन. अनायासेंच वर्तमानपत्रद्वारें त्याची सर्वत्र प्रसिद्धि होईल." लोकमान्य शेवटीं असें म्हणाले, " तुम्ही कांहींहि म्हणा दाजीसाहेब, पण या खटल्याचा अखेर निकाल माझ्या राष्ट्राला शुभ व कल्याणकारच होणार अशी माझी मनोदेवता मला साक्ष देत आहे !"

(२) डॉ० ॲनी बेझंट यांना हद्दपार केल्यानंतर पुढील कार्याची दिशा ठरविण्याकरितां जी ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी मुंबईस भरविण्यात आली होती त्यावेळीं सरकारच्या अन्यायी कृत्यानें चिडून जाऊन मद्रासचे सी० पी० रामस्वामी अय्यर वगैरे मंडळी सत्याग्रहाचा ठराव पास करून घेण्याच्या निश्चयानें मुंबईला आली. लो० टिळक नेहमीप्रमाणें सरदारगृहांतच उतरले होते. मी, माझे मित्र कै० श्यामरावजी देशपांडे व आणखी काहीं माझे प्रांतांतील मंडळी त्यावेळीं सरदारगृहांतच होतों. कमिटीची बैठक ज्या दिवशीं होणार होती त्या दिवशीं सकाळची गोष्ट. मी व कै० श्यामरावजी देशपांडे लोकमान्यांना भेटण्याकरितां त्यांचे खोलींत गेलों. लोकमान्य त्यावेळीं वर्तमानपत्र वाचीत बसले होते. लोकमान्यांना नमस्कार करून आम्ही खालीं बसलों. कै० श्यामरावजी देशपांडे लो० टिळकांना म्हणाले—'आज दुपारीं कमेटीचे बैठकींत काय ठरण्याचा संभव आहे ?'

लो० टिळक म्हणाले:—पहावें, नकी सांगणें कठीण आहे. मद्रासची मंडळी फार जोरांत आलेली दिसत आहेत.

कै० शामरावजी देशपांडे म्हणाले:—मी असें ऐकतों कीं, आजचे कमेटींत सत्याग्रहाचा ठराव पास होणार आहे.

लो० टिळक:—पास होईल किंवा नाहीं सांगतां येत नाहीं. बाकी मद्रासची मंडळी तो ठराव आणून पास करुन घेण्याचा प्रयत्न करणार आहेत.

मी थोडेसें हसुन म्हटलें:—नाहीं तरी सत्याग्रहाचा ठराव येणारच आहे. तेव्हां कमेटीचे वेळीं आपली परवानगी असल्यास हॉलमध्यें समासद नसतांहि घुसण्याचा आम्ही सत्याग्रह करतो इतकेंच नव्हे, यशस्वी करून दाखवितों!

लो० टिळक हंसून—परवानगी देऊं शकत नाहीं, पण यंदा मिळणार ही खात्री वाटते. हिंदुस्थान याच वृत्तीने बुडालें आहे.

कै० शामरावजी देशपांडे:—आपले म्हणणें आम्ही समजलों नाहीं.

लो० टिळक:—आमची मंडळी आपापसांतील सत्याग्रहाच्या सामन्यात चांगला नेट दाखविण्यात पटाईत आहे हें मला माहीत आहे. पण प्रश्न काय तो सरकारविरुद्ध सत्याग्रहांत काय करतील हा आहे. आज बेझंट बाईला हद्दपार केल्यामुळें उत्पन्न झालेलें हे तात्कालिक स्मशानवैराग्य आहे. हें वैराग्य टिकाऊ नाहीं. एखाद्या गोष्टीच्या तात्कालिक परिणामाला बळी पडून एकदम मोठ्या हत्याराला हात घालणें म्हणजे त्या हत्यारानें स्वतःलाच आपण जखमी करून घेणें आहे. माझ्या लोकांची मला तशी तयारी दिसून येतांच सत्याग्रहाचें निशाण हातांत घेऊन पहिल्यानें मी समोर होईन. आज मी सांगेन त्या विहिरींत एका क्षणाचाहि विलंब न लावतां उडी घेणारीं फक्त शभर माणसें महाराष्ट्रांत दाखवा. मला तात्कालिक परिणामानें हुरळून जाणारीं नकोत, टिकाऊ वैराग्याचीं पाहिजेत.

---

## पांडुरंग रामचंद्र कुळकर्णी

[ वैद्य, कोऑपरेटिव्ह सोसायट्यांचें लोकांस ज्ञान करून देणारे-एक परोपकारी सद्गृहस्थ, कासेगांव जि० सातारा. ]

लोकमान्यांच्या भेटीचे तीन प्रसंग खालीं लिहून पाठवीत आहें. तीनहि प्रसंग लोकमान्यांची मंडालेहून सुटका होऊन गीतारहस्याची पहिली आवृत्ति छापून झाल्यावरचे आहेत.

( १ ) कोऑपरेटिव्ह सोसायट्यांचे बाबतींत सरकारचा हेतु काय असावा व त्यांत लोकांनीं पडावें कीं नाहीं हें विचारण्याकरितां मी लोकमान्यांस मुद्दाम भेटलों होतों, व पुढीलप्रमाणें प्रश्नोत्तरें झालीं:—

प्र०:—कोऑपरेटिव्ह सोसायट्यांना उत्तेजन देण्याचे बाबतींत सरकारचा काय हेतु आहे व आम्ही त्यात पडावें कीं नाहीं ?

उ०:—सरकारास कच्चा माल विपुल उत्पन्न व्हावयास पाहिजे व तसें होण्यास शेतकऱ्याची स्थिति सुधारणें जरूर आहे. व त्याकरितां सरकार स्वतःस झीज लाऊन घेण्यास तयार नाहीं. म्हणून त्यांचेमध्येंच भांडवल उभारून व त्यांतच सवलती वगैरे देऊन परभारें त्यांची स्थिति सुधारण्याचा सरकारचा प्रयत्न आहे. यामध्यें आमच्या व्यापारीलोकांस चट्टा बसतो व शेतकऱ्याची स्थिति सुधारते. अशा रीतीनें आमच्यांतच एकाचे खिशास चट्टा बसून दुसऱ्याची स्थिति सुधारण्याचा हा सरकारचा डाव आहे. आम्हाला त्याविरुद्ध कांहीं लिहावयाचें नाहीं. आमच्याआमच्यांतच एकाचा फायदा होत असेल व एकाचें नुकसान होत असेल तर त्याबद्दल आम्हांस लिहित बसावयाचें नाहीं. एकदरींत सोसायट्यांत पडण्यास आज कांहीं हरकत दिसत नाहीं.. .

प्र०:—मग आपण उघड सोसायट्यांचा पुरस्कार करून तसें लिहीत का नाहीं ?

उ०:—आमचें धोरण सरकारनें सोयी काय केल्या आहेत व कायदे काय झाले आहेत याचें वर्णन करीत बसण्याचें नसून सरकार काय करीत नाहीं हें दाखविण्याचें आहे. आम्हाला नेहेमीं असंतोष जागृत ठेवावयाचा आहे. उदाहरणार्थ पोस्टखातें आमच्या सोयीचें आहे तर आम्ही त्याचें वर्णन करीत बसणार नाहीं, तर त्यांतील गैरसोयी व उणीवा दाखवून असंतोष जागृत ठेऊं !

( २ ) दुसऱ्या एका प्रसंगीं आम्ही त्यांजकडे गेलों त्यावेळीं लोकमान्य जिन्यासमोरील अलीकडचे दालनांत गादीवर बसले होते. सुमारें तीन वाजण्याची वेळ होती. मी व माझे एक स्नेही बाबूराव रेमणे असे गेलों होतों व आणखीहि कांहीं मंडळी तेथें होती. सातारा जिल्ह्यांत सत्यशोधकांची चळवळ सुरू आहे त्या बाबतींत ते काय म्हणतात, काय सांगतात, लोकांस काय त्रास होतो वगैरे बाब-

तींत बोलणे चालले होते. त्यावेळीं यास काय उपाय करावा असा मी व बाबूराव यांनीं त्यांस प्रश्न विचारला त्यावेळीं अगदीं जोराने व तुच्छतापूर्वक ते म्हणाले कीं:—

" अमेरिकेहून येथें मिशनरी लोक येतात व येथे तुमच्याकरिता शाळा काढतात, दवाखाने घालतात, व इतऱ्हेने तुमच्या उपयोगी पडून तुमचीं मनें ओढून घेतात व तुम्ही येथले असून तुम्हास कांहींहि करावयास नको. आपल्याचे लोकांचीं मनें तुम्हांस मिळवून घेता येत नाहींत याला काय म्हणावे ! "

( ३ ) लोकमान्य माडीवरील दिवाणखान्यांत आरामखुर्चीवर पडून एकाग्रमनानें अद्वैतशास्त्रविषयक मजकूर लिहावयास सांगत होते व एक गृहस्थ लिहिण्याचे काम करीत होते. आम्ही खालीं दरवाजांतून आंगणात जाऊन चौकशी केली तों ते माडीवर असल्याचें कळलें; शिवाय तेथे लोकमान्यांचा सिंहासारखा मोठा आवाज ऐकू येत होताच, त्या अनुरोधानं आम्ही दिवाणखान्यांत गेलों. याहि वेळीं बाबूराव रेमणे व मी असे दोघे होतों. बाबूराव यांना गीतारहस्याबद्दल कांहीं बोलावयाचे होतें. त्यांना 'विचारा' असें लोकमान्य म्हणतांच खालील प्रश्नोत्तरें झालीं:—

बाबूराव:—आपल्यास काहीं साक्षात्कार, अनुभव आहे काय ? आचार्य हे साक्षात्कारी होते यामुळे त्यांचे सांगण्यास जास्त महत्त्व आहे.

लो०:—तुम्हास कोणी अनुभवी भेटले आहेत काय ?

बा०:—होय, असें म्हणून त्यांनीं एक नांव व पत्ता सांगितला.

लो०:—( थोडा विचार करून ) पण आम्हांला अनुभव नसला तरी गीताशास्त्र हें आमच्यासारख्या अनधिकारी व अज्ञानी लोकांकरितांहि सांगितलेलें आहे. तें अनुभवी लोकांकरितांच आहे असें नाहीं. उलट मी म्हणतो की, अनुभविक लोकांपेक्षा अज्ञान्यांकरिताच त्यांचा अवतार आहे. म्हणून आम्हांस त्याचा अर्थ करण्याचा अधिकार आहे. शब्दाचा अर्थ करण्याचें एक शास्त्र आहे. त्या शास्त्राप्रमाणें त्याचा अर्थ काय होतो हें समजावून घेण्याचा व तसें लोकास सांगण्याचा अर्थातच सर्वांस अधिकार आहे !

## हरि रघुनाथ भागवत

[ बी. ए., संपादक माजी 'वन्देमातरम्' पुणें. ]

( १ ) १९०५ सालीं कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांतून प्रोफेसर विजापूरकरांना काढण्यांत आलें तेव्हां त्यांनीं " विश्ववृत्त " व " आक्रोश " या नवीन मासिकांची जाहिरात दिली. लोकमान्यांनीं रा० घोंडोपंत विद्वांस यांना सांगितलें कीं, " आपलीं पत्रें मोबदल्या जातात तीं चालू ठेवून शिवाय विजापूरकरांच्या सर्व पत्रांची वर्गणी आमीं पाठवून द्या. "

( २ ) मंडालेस असतांना गीतारहस्य लिहून झालें. पण गणेशगीता, शिवगीता वगैरे गीता लोकमान्यांना तेथें पाहाण्यास पाहिजे होत्या. म्हणून १९१३ मध्यें त्यांनीं विद्वांस यांजकडेस गीतांची यादी पाठवून त्या गीता पाठविण्याविषयीं लिहिलें. याच वेळेस माझें गीतासंग्रहाचें पुस्तक छापण्याचें काम चाललें होतें म्हणून मला रा० घोंडोपंतांनीं विचारलें. तेव्हां लोकमान्यांना पाहिजे असलेल्या गीतांचा समावेश करून पुस्तक लवकर छापून मी त्यांच्या हवालीं केलें व ती प्रत लोकमान्यांकडे रवाना झाली. ती पोंचतांच भागवतांचे आभार मानण्याबद्दल मुद्दाम त्यांनीं घोंडोपंतांस लिहिलें व त्याप्रमाणें रा० घोंडोपंतांनीं मी परगांवीं होतों तेथें मला पत्र पाठविलें. मी यांत कोणतेंहि मोठें कृत्य केलें नव्हतें; पण या छोट्या उदाहरणावरून लहानसान बाबतींत देखील लोकमान्य किती दक्ष असत तें दिसून येतें.

( ३ ) अरविंदबाबूंनीं 'कर्मयोगिन्' पत्र काढलें होतें. याची बातमी लोकमान्यांना नव्हती. ती माझ्या तोंडून निघाल्याबरोबर त्यांना त्या शब्दानेंच एक प्रकारचा आनंद होऊन ते म्हणाले—'We are all karmayogins.' ( आम्ही सगळे कर्मयोगी आहों. )

( ४ ) सिंहगडाहून गीतेचें भाषांतर तपासून परत आल्यावर छपाईचें काम फारच जोरांत चालविण्याचें लोकमान्यांनीं ठरविलें. मे महिन्यांत पुण्यास प्रांतिक परिषद् भरावयाची होती, त्यापूर्वी एप्रिलांत छपाई संपविली पाहिजे असें ठरवून चित्रशाळा छापखान्यांत लोकमान्यांनीं तसा हुकुम सोडला व रोज दोन फार्मांचीं प्रुफें तपासून फार्म मशीनवर जाईपर्यंत माझी सुटका व्हावयाची नाहीं असें ठरलें. मध्यंतरी एकदां खुद्द त्यांच्याकडे प्रुफें न्यावीं लागत. अर्थात् सकाळपासून संध्याकाळपर्यंत माझा वेळ चित्रशाळा छापखान्यांत व गायकवाडवाड्यांत जात असे. पहिल्या दिवशीं चार वाजण्याचे सुमारास दोन फार्म मशीनवर चढले व मी एकेक प्रत लोकमान्यांस नेऊन दिली. माझ्याकडे पाहून त्यांनीं विचारलें. " तुम्ही जेवलांत केव्हां ? " मला

त्या दिवशीं जेवणाकरतां घरीं जाण्यास वेळ मिळाला नव्हता. व तसें मी बोललों. त्यांनीं प्रथम मला दूध पिण्यास देवविलें व सांगितलें कीं, " उद्यांपासून हें काम आटपेपर्यंत रोज १० वाजल्यापासून दोन वाजेपर्यंत तुम्ही जेव्हां वाट्यांत याल तेव्हां येथें जेवीत जा!" छपाईचें काम ठरल्याप्रमाणें एप्रिलांत संपलें.

(५) लोकमान्यांची भेट घेणें कोणालाहि कधीं अशक्य नसे. असें असतां त्यांच्या माहितीच्या पुण्यांतल्या एका गृहस्थांनीं त्यांना पोष्टानें पत्र पाठविलें कीं, " मला आपली भेट घेण्याची इच्छा आहे. मी केव्हां येऊं ? " हें पत्र वांचून लोकमान्य म्हणाले, " माझी भेट केव्हां होईल हें विचारावयाला कशाला पाहिजे ? या गृहस्थांना माझ्या हातचें एक पत्र पाहिजे आहे, दुसरें कांहीं नाहीं ! " त्याप्रमाणे पत्र रवाना झालें.

---

## रामचंद्र विनायक कुलकर्णी

[ मस्तिष्कशास्त्रज्ञ, तासगांव, जि० सातारा. ]

( १ ) वाळव्यास ह्यूम साहेब यांच्या अध्यक्षतेखालीं एक मोठी कॉंग्रेसची सभा भरली होती, त्या वेळीं श्रीयुत बाळ गंगाधर टिळक यांचा व माझा प्रथम परिचय झाला. त्यावेळीं मी माझ्या बरोबर ५—७ विद्यार्थी घेऊन सभेला गेलों होतो. आम्हांला चांगली ऐकूं ऐण्यासारखी जागा नव्हती, ती देण्याबद्दल मी त्या वेळीं तेथल्या तेथें व्यवस्थापकाला एक चिठी लिहिली. ती त्यांच्याकडे गेल्याबरोबर लो० टिळक यांच्या दृष्टीस पडली. तेव्हां त्यांनीं "मुलांना तर अगोदर पुढें घेतलें पाहिजे. हेच पुढें मोठे होणारना ? " असें म्हणून ह्यूम साहेबांच्या मागेंच वर्तमानपत्रांचे बातमीदार बसले होते त्यांच्या बाकामागेच आम्हांस बोलावून घेतलें. या वेळीं रा० अनंत वामन बर्वे यानीं मी फ्रेनालजीचा अभ्यास केल्याबद्दलची त्यांना माहिती दिली. मी रा० बर्वे यांनीं नुकत्याच काढलेल्या ' बालमित्र ' मासिकांत त्याबद्दल लेख देत होतों. नंतर रा० बर्वे यांनीं मजला त्यांच्या बिऱ्हाडीं नेलें व तेथें मी लो० बळवंतरावजींचें मस्तक पाहून मस्तकसामुद्रिक ( फ्रेनालजी ) शास्त्राप्रमाणें त्यांचे कोण—कोणते भाग किती प्रमाणांत वाढले आहेत त्याबद्दलची कांहीं माहितीहि सांगितली. ती सर्व ध्यानांत नाहीं. तथापि कॉम्बॅटिव्हनेस, कॉशसनेस, सीक्रेटिव्हनेस, फर्मनेस व इनव्हेंटिव्हनेस हे भाग चांगले वाढलेले असल्याचें सांगितलेलें मात्र पक्कें ध्यानांत आहे.

(२) त्यानंतर पुढें एकदां मी पुण्यास गेलो असता भेटण्यास गेल्या-वेळीं मी लिहीत होतों तें पुस्तक लोकमान्यास दाखविल्यावर ते म्हणाले "तुम्ही रा० गर्दे यांच्या इकडे प्रयोग करण्यासाठीं राहिल्यानें आज जरी २० रुपये मिळ-तील तरी 'झाडा खालीं झाड वाढत नाहीं' हें पक्के ध्यानात ठेवून चालविलेला ज्ञानसंपादनाचा प्रयत्न चालू ठेवलेला बरा." हा त्यांचा उपदेश मी रा० कोंडोपंत छत्रे डॉक्टर यांना कळविला व तेथें डॉ० गणेश कृष्ण गर्दे यांच्याकडे नोकरीस राहाण्याचा बेत रहित करून गावीं येऊन माझा शास्त्रीय ज्ञान मिळवून पुस्तकें लिहिण्याचा उद्योग अव्याहत चालू ठेविला. हाच उपदेश शेवटीं मला उपयोगी पडला.

---

## विठ्ठल व्यंकटेश जोशी

[ लोकमान्यांच्या लॉ क्लासमधील विद्यार्थी, वकील, धारवाड. ]

(१) सन १९०७ सालीं लोकमान्यांची स्वारी धारवाडास आली होती. तेथून परत जातांना गुर्लहोसूरास जाण्यापूर्वी वाटेत सात मैलांवर अमिनभावी म्हणून खेडें आहे. तेथील वतनदार राघवेंद्रराव देशपांडे यांनीं लोकमान्यांस आपले घरीं उतरून घेऊन त्यांचें तेथे अपूर्व स्वागत केलें. व लोकमान्यांच्या चरण-रजानें आपला गांव पुनीत झाला असे त्यास वाटून ते गहिंवरून आले. तेव्हां लोक-मान्य म्हणाले, "अलीकडे असले बाणेदार वतनदार फारच थोडे आढळून येतात. वास्तविक बाणेदारपणामुळे हीं वतनें मिळालीं. पण आता तीं राखण्यास नेमळटपणा व भ्याडपणा यांचीच जरूरी वाटूं लागली आहे." नंतर गुर्लहोसूरास दोनप्रहरीं दोन वाजता लोकमान्यांची स्वारी पोहोंचली. तेथील मलप्रभा नदीस आपण स्नानास जाणार असें ते म्हणतांच त्याचेबरोबर शेंकडो लोक नदीवर स्नानास गेले. सर्व कामात लोकमान्य श्रेष्ठ असावयाचे तद्वत् पोहोण्याचे बाबतींतहि व इतक्या उतारवयात त्यांचें अत्यंत सफाईनें पोहोणें व पोहण्यात निरनिराळे प्रकार करणें हें पाहून सर्व मंडळी चकीत झाली.

(२) १९१५ सालीं बेळगावास भरलेल्या प्रांतिक परिषदेचे वेळीं लोक-मान्य आले असता त्यांनीं कांहीं निवडक मंडळी बोलावून स्वतंत्र होमरूल लीग काढण्याचें ठरविलें. त्यावेळीं त्यांस कांहीं मंडळी म्हणाली ॲनी बेझंटबाईंनीं होम-रूल लीग यापूर्वीच काढलेली आहे, त्यातच आपण मिळावें व त्याच्याच चोहोंकडे शाखा काढाव्या. स्वतंत्र संस्था कशाला हवी ! हें ऐकून जरा हासत

लोकमान्य म्हणाले, " बाई आपल्या चांगल्या परिचयाच्या आहेत. त्या केव्हां बदलतील हें सांगतां येणें फार कठीण आहे. करितां आपण या बाबतींत स्वतंत्र राहू या. बाई जोपर्यंत आपल्याला अनुकूल आहेत तोपर्यंत आपण त्यांचा पूर्ण फायदा घेऊन त्यांचे मार्गे जाऊंच; पण त्यानी जर उलट खाल्ली तर आपली सभा तयार आहेच." हे ऐकून बॅप्टिस्टासाहेब खूप हसले व थट्टेनें त्यास म्हणाले "टिळक, तुम्ही मोठे कावेबाज आहात असें मवाळ म्हणतात तें खोटें कां ?" हे ऐकून सर्व मंडळी पोट धरधरून हसूं लागली.

---

## वामन गणेश फडके

[ न्यू इं० स्कूलमधील लोकमान्यांचे शिष्य, वकील, कऱ्हाड. ]

(१) सन १८९० चा मार्च महिना असावा, त्यावेळीं शिमग्याच्या सुटींत मुलांनीं घराबाहेर पडू नये, कोणत्याहि खेळांत व सोंगांत भाग घेऊ नये म्हणून न्यू इं० स्कूलच्या मॅट्रिकच्या वर्गावरील सर्व मास्तरांनी ( गोपाळराव गोखले, आपटे, भाटे, ) शिमग्याच्या सुटींत भरपूर अभ्यास नेमून दिले त्यावेळीं शेवटीं टिळकांचा तास झाल्यावर त्यांसहि सेक्रेटरीनीं कळविलें कीं, सर्व मास्तरानीं सुटींत अभ्यास नेमून दिले आहेत; आपले अभ्यास काय करावयाचे ते सांगावे. त्यावर टिळकांनीं उत्तर केलें कीं, " सुट्टी ही अभ्यासाकरितां नसते, खेळण्याकरितां असते; खेळून व करमणुकी करून मन ताजेतवाने अभ्यासक्षम करण्याकरितां सुटी आहे. त्या खेळण्यानें जरी अंगाला माती लागली तरी हरकत नाहीं; कारण माती लागलेली धुऊन निघेल पण निरुत्साहि व दुर्बल मन झालें कीं त्या मनुष्याचा कोठेंच उपयोग नाहीं. तो विद्वान असूनहि व्यर्थ. अशा तऱ्हेचें स्वछंद आचरणाचे, ज्यांत श्रीमंत, गरीब, विद्वान अविद्वान, लहानथोर, असा भेदाभेद पाळला जात नाहीं, असे सण व खेळ राष्ट्रांत नेहमीं लागतात, आणि तशा तऱ्हेचा हा शिमग्याचा सण आपला असतांना त्याचा पूर्ण फायदा घेण्याचें सोडून त्यावेळीं आणखी अभ्यास करण्यास लावणें ही विघातक कल्पना आहे, माझें तर सांगणे कीं, अभ्यास विसरला तरी चालेल ! समाजांत असतांना शरीराला घाण लागली तरी ती निघेल, परंतु घरकोंबड्यासारखे घरीं बसूं नका मनमुराद खेळा व उत्साही मनाने पुनः शाळेंत या. "

(२) मुंबई प्रांतिक कॉंग्रेसची सन १९१७ ची बैठक नाशीक येथें झाली. त्या वेळीं रात्रीं घाटावर पुढाऱ्यांचीं सार्वजनिक व्याख्यानें होत असत. एके

दिवशीं रात्रीं श्रीयुत दादासाहेब खापर्डे व दादासाहेब करदीकर यांचीं स्वराज्या-वर व्याख्यानें झालीं, समाज बराच जमला होता व व्याख्यानें लांबल्यामुळे लोकहि कंटाळले होते. श्रीयुत दादासाहेब खापर्डे व दादासाहेब करदीकर यांचीं भाषणे संपल्यानंतर लोकमान्य समारोपास उठले व लोकांची मनःस्थिति जाणून विनोदपूर्ण भाषेत सुरवात करून म्हणाले कीं, " इतका वेळ ' दादा–दादा'नीं तुम्हांस उपदेश केलाच आहे, आतां मी ' बाळानें ' अधिक काय सांगावें ? " असें म्हणून व थोडक्यांत समयोचित भाषण करून त्यांनीं कंटाळलेल्या समाजास हसत घराकडे पाठविलें !

---

## कृष्णशास्त्री घुले

[ विद्याभूषण, ऋग्वेदाचे मराठी भाषांतरकर्ते, गीतारहस्यावरील आक्षेपांचे शास्त्रीयरीत्या खंडनकर्ते, नागपूर ]

( १ ) माझी व लोकमान्यांची प्रथम भेट १९०४ सालीं मुंबई येथे झाली. मी आणि माझे मित्र रा० नारायणराव अळेकर असे आम्ही मुंबईस गेलों असतां तेथें लोकमान्य आहेत असें कळल्यावरून त्यांच्या भेटीकरितां त्यांच्या बिऱ्हाडीं गेलों. लोकमान्य आंगरखापागोटें घालून बाहेर जाण्याकरिता निघाले होते. आमची व त्यांची दारांतच गांठ पडली. आम्हाला पाहातांच आमचा नमस्कार घेऊन ते परत फिरले. आमचा परिचय झाल्यावर आम्ही आल्यामुळे त्यांच्या कामांत व्यत्यय आल्याबद्दल आम्ही दिलगिरी प्रदर्शित केली. तेव्हां ते म्हणाले, " अहो ! आमचें काम नेहमींच असायचें. निघालो होतों पञ्चांग संशोधनासंबंधीच्या सभेला. आमच्या प्रतिपक्षीयांना तत्त्व कबूल झालें, पण तपशीलांत अजून एकमत होत नाहीं. पांच कबूल, पण ते दोन आणि तीन मिळून पांच, कीं सात उणे दोन, पांच अशा तऱ्हेचा काहींसा वाद आहे. तोहि मिटून जाईल. त्याचें कांहीं विशेष नाहीं." असो. पुढें मी करीत असलेल्या ऋग्वेदाच्या भाषांतरासबंधीं बोलणें निघालें. तेव्हां ते म्हणाले, ' युरोपियन विशेषतः जर्मन लोकांनीं वेदांचा इतका अभ्यास केला आहे व त्यांवर इतके ग्रंथ लिहिलेले आहेत कीं, त्याचा परिचय करून घेतल्याखेरीज आज भाषांतर करणें म्हणजे आपण जगाच्या शंभर वर्षें मागें आहोंत हें याहि बाबतींत सिद्ध करून देण्यासारखें आहे. आपण ते ग्रंथ जरूर वाचा. आपणांजवळ नसल्यास मजजवळ काहीं ग्रंथ आहेत ते मी आपणांस देतों. पण पाश्चात्य शोधकांनीं केलेले वेदांवरील परिश्रम भाषांतर

करतांना अवश्य नजरेखालून गेले पाहिजेत. त्यांनीं वेदाच्या शब्दाशब्दावर विचार केलेला आहे. व त्यांतील शब्दांच्या एकेका विभक्तीवर विचारपूर्वक ग्रंथ लिहिले आहेत. तेव्हा ते ग्रंथ आपण वाचून भाषांतर केल्यास तें उपयुक्त आणि सग्राहक होईल."

अशाप्रकारे उद्बोधक, उत्तेजक आणि कळकळीचे आमच्याशीं त्यांनीं भाषण केले. मग आम्हीच त्यांना जाण्यास खोटी होईल म्हणून नमस्कार करून निघून आलों.

( २ ) त्यानंतर दुसऱ्या वेळीं, उमरावती मुक्कामीं लोकमान्य श्रीशिवजयंती-करिता आले असतां श्रीमंत दादासाहेब खापर्डे यांचे येथे त्यांची भेट झाली. त्यावेळीं त्यानीं खाल्डियन वेदांसबधीं आपली कल्पना बोलून दाखविली. ते म्हणाले, "खाल्डियन भाषेतील पुष्कळसे शब्द, ऋग्वेदांत आढळतात. ऋग्वेदांत पुष्कळसे शब्द परकीय भाषेतील आहेत असा मला बरेच दिवसापासून संशय होता. तो संशय खाल्डियांतील उपलब्ध झालेले इष्टिकालेख वाचून दृढ झाला. उदाहरणार्थ, ऋग्वेदात येणारा 'उर' हा खाल्डियन भाषेतलिच आहे याबद्दल मला संशय नाहीं. असेच आणखीहि पुष्कळ शब्द आहेत. परतु त्यांबद्दल अद्यापि खात्री करून देण्यालायक प्रमाणे मला मिळालीं नाहींत. त्यांच्या मी शोधांत आहें. तीं जसजशीं मिळतात तसतशीं मी तीं डोक्यांत सांठवून ठेवीत असतो व तीं पुरेशीं झाल्यास एकदा केव्हां तरी माझी ती कल्पना, 'Arctic home in the Vedas' या ग्रथाचे परिशिष्ट म्हणून लिहून काढीन." त्यावर श्रीमंत दादासाहेब विनोदानें म्हणाले, "हाच तर बळवतरावजी तुमचा दोष आहे. एकदां डोक्यांत सांठवून ठेवलेली गोष्ट तेथे कायमची राहाते. आमचे तसें नाहीं. कालची गोष्ट आज कांहीं तेथे सांपडणार नाहीं." असो.

ही त्यावेळीं सांगितलेली आपली कल्पना, लोकमान्यांनीं भांडारकर मेमोरियल व्हॉल्यूममध्यें ग्रथित केलेली आहे. ती त्यांची कल्पना तज्ज्ञांच्या अत्यादरास पात्र झाल्याचें प्रसिद्धच आहे.

---

## प. वि. महाजन

[ महाराष्ट्र प्रा. कॉं. क. चे व स्वराज्य पक्षाचे चिटणीस, म्यानेजर ' लोकमान्य ' कल्याण. ]

(१) 'केसरी'चे मुंबई येथील एजंट श्री० नारायणराव दातार यांच्या कन्येच्या लग्ना करितां लोकमान्य कल्याणास उभ्या उभ्या आले होते. अहेर वगैरे करून झाल्यावर जेवणाची तयारी झाली. लोकमान्यांस मधुमेहाचा विकार असल्या कारणानें ते सातूच्या अन्नाशिवाय त्यावेळीं कांहीं खात नसत, म्हणून सातूचे पदार्थ त्यांच्या बरोबरच असत. जेवणाबद्दल विचारितां त्यांनीं सांगितलें कीं "हा पाहुणा जेवण्याचा भारहि यजमानावर घालूं इच्छित नाहीं. त्याचे जेवणहि त्याच्या बरोबरच आहे!"

(२) सन १९२० च्या जून महिन्यात लोकमान्यांनीं महाराष्ट्रांतील प्रमुख गृहस्थांस कौन्सिलकार्यक्रमाचा विचार करण्याकरितां मुद्दाम बोलाविलें होतें. कौन्सिलांतील कार्यक्रमांत *Prohibition of foodstuffs* हाहि एक विषय होता. कर्मधर्मसयोगानें सदर विषयाच्या चर्चेस सुरवात होण्यास व मधल्यावेळच्या चहाची व फराळाची वेळ येण्यास एक गांठ पडली व फराळाचें व चहाचें सामान येऊं लागलें. तें पाहतांच लोकमान्य म्हणाले "वा इकडे Prohibition of foodstuffs या विषयाचा विचार व एकीकडे फराळाची तयारी! थांबा, हा विषय पुरा झाल्याशिवाय मीं कोणाला फराळ करून देणार नाहीं!"

(३) अमृतसर काँग्रेसला जातांना स्पेशल ट्रेन गंगापूर स्टेशनवर जेवणाकरितां थांबली. परतु स्पेशल फार लेट झाली होती व स्नानें करून स्वस्थपणे जेवण्यांत मडळी गुतल्यास स्पेशल आणखी लेट होण्याचा संभव; म्हणून लोकमान्यांनीं सर्वांस असें बजावले (जवळ जवळ हुकूमच केला म्हणण्यास हरकत नाहीं) कीं, कोणीहि स्नानाकरितां फार वेळ न मोडतां अर्ध्या तासाच्या आंत स्नान व जेवण आटोपले पाहिजे. लोकमान्यांचा जवळ जवळ हा हुकूमच होता व आश्चर्याची गोष्ट ही कीं रावबहादूर चिंतामणराव वैद्यांसारखी बडी बडी मडळीहि जे मिळालें तें जेऊन गाडींत बसली!

(४) चोवीस तासांत एकवीस हजार रुपये ज्या कल्याण, भिंवडी, ठाणे व पनवेल ह्या ठिकाणच्या दौऱ्यांत मिळाले त्या दौऱ्यांत लोकमान्यांबरोबर राहण्याचा मान मला मिळाला होता. त्यावेळीं लोकमान्यांच्या नियमितपणाचा व झोपहि स्वाधीन असण्याचा मला अनुभव आला. कल्याणचें व्याख्यान सकाळीं १० वाजतां आटोपलें व घरीं येतांच लोकमान्य म्हणाले, 'मी आतां थोडा वेळ निजतों.' व ५।७ मिनिटांच्या आंत त्यांस गाढ झोंप लागली. निजण्यापूर्वी ते एकदां कार्य-

क्रम विचारून घेत व आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट ही की, दुसऱ्या मुक्कामाला जाण्याच्या वेळेला कोणीहि न उठवितां ते अगदीं बरोबर उठत! पनवेलला आम्हीं रात्रीं २ वाजतां पोहोंचलों. निजण्यास इतका उशीर झाला होता तरीहि ते दुसऱ्या दिवशीं अगदीं बरोबर वेळेवर उठले. झोंप त्यांच्या अगदीं ताब्यांत होती असें म्हणण्यांत बिलकूल अतिशयोक्ति नाहीं. ते म्हणत तेव्हां त्यांस पांच मिनिटांच्या आंत गाढ झोंप लागत असे.

---

# मल्लिकार्जुनप्पा आप्पाराव पाटील

[ लोकमान्यांचे एक अभिमानी व चहाते–सोलापूर. ]

( १ ) सन १८९१ सालापर्यंत लोकमान्याची माहिती सोलापूरकरांस फारशी नव्हती. या सालीं संमतिवयाचे बिलाचे बाबतींत देशांत जें रण माजून राहिलें होतें त्यांत कायदा पाहिजे म्हणणारा रानडेपक्ष व कायदा नको म्हणणारा टिळकपक्ष असे दोन पक्ष प्रमुख होते. लोकमान्यांनीं आपले पत्रद्वारे व आपले प्रतिनिधि पाठवून महाराष्ट्रांत जागृति केली. सोलापूरकरांचें मत सरकारपक्षाकडून पुढे केलेल्या संमतिबिलांत नमुद असलेली सुधारणा आमची आम्हीं करूं; त्या बाबतींत सरकारनें हात घालूं नये असें होतें व त्याप्रमाणें जाहीरसभा भरवून आपलें मत प्रदर्शित करण्याचें ठरविलें होतें. त्या संधीस येथील प्रमुख पुढारी कै० रा० ब० वारद यांचा मुलगा व कुटुंब एकाच दिवसाचे अंतरानें निवर्तलें. त्यामुळे सभेची तारीख पुढें ढकलण्यांत आली होती. या संधीचा फायदा येथील सुधारक–पक्षाचे पुढारी रा० नागपूरकर वकील यांनीं घेऊन तावडतोब त्यांनीं आपल्या कंपूतील लोकांची सभा भरवून एकमतानें "सरकारनें संमतिवयाचा कायदा पास करावा" असा ठराव पास केला. ही गोष्ट कै० दिनकरपंत चक्रदेव वकील यांस कळतांच त्यांनीं कै० अप्पासाहेब वारदांस कळविली व लागलीच त्या दिवशीं कार्यदक्षतेमुळें आपला पुत्रपत्नीशोक मागें टाकून त्यांनीं सभा भरविली व त्या सभेमध्यें खऱ्या लोकमताची ही सभा असून आम्हांस कायदा नको आहे व आमचे धार्मिक व सामाजिक प्रश्नामध्यें सरकारनें हात घालूं नये असा ठराव करून त्या ठरावाच्या नकला तारेनें ना० व्हाइसरॉय साहेब, ना० गव्हर्नर साहेब, ना० स्टेटसेक्रेटरी साहेब यांचेकडे व प्रमुख इंग्रजी व मराठी वर्तमानपत्रकर्त्यांकडे पाठविण्यांत आल्या. त्यामुळें या प्रश्नाची चर्चा सर्वतोमुखीं होऊन सर्वांचें लक्ष सोलापुरा-

कडे वेधलें. त्यावेळीं लोकमान्यांनीं सोलापूरकरांबद्दल आदर व्यक्त करून दाखविला व विशेषतः कै० आप्पासाहेब वारद यांच्या राष्ट्र-कार्यावरील प्रेमामुळें व सार्वजनिक कामाचे कळकळीमुळें या दोघांचा परस्परांशीं असलेला संबंध निकट झाला व ते एकमेकांस आपले कुटुंबातील माणसाप्रमाणें लेखीत असत हें सर्वश्रुत आहेच.

(२) १८९६ सालीं पडलेल्या दुष्काळांत लोकमान्यांनीं सार्वजनिक सभेमार्फत चळवळ करून 'सर्व धंद्यांचे दुष्काळपीडित लोकांस सरकार सरसास खडी फोडण्याचे काम सांगतें तें अत्यंत गैर होय, सबब धंदेवाले लोकास त्यांच्याच धंद्यांतील काम देण्यांत यावें' असें सरकारला सुचविले, व ह्या कामास मूर्त स्वरूप यावें म्हणून ते देण्यासाठीं ते स्वतः सोलापुरास आले. सोलापुर मुक्कामीं साळी व कोष्टी या वर्गाचा भरणा विशेष असून भांडवलाचे अभावीं त्यांचा धंदा बसला होता. सर्व बाबतींत सरकारचे तोंडाकडे पाहाणें ही सवय वाईट आहे ही गोष्ट त्यांनीं येथील व्यापारी लोकांचे मनावर बिंबविली. येथील धनिक व्यापाऱ्यांचें व जुने गिरणीवाल्यांचें साहाय्य मिळवून व साळी व कोष्टी लोकांस सूत पुरवून त्याचेकडून मोबदला माल तयार करून घ्यावा व तो माल व्यापाऱ्यांनीं प्रथम घेऊन त्यांना मदत करावी याकरिता एक कमेटी स्थापन केली. ती 'वीव्हर्स गिल्ड' "Weavers' guild" या नावानें अद्याप प्रसिद्ध आहे. या गिल्डमुळें साळी-कोष्टी लोकांस खडी फोडण्याचा प्रसंग तर आला नाहींच, परंतु त्याना भरपूर काम मिळून त्यांची स्थिति सुधारत चालली आहे, व १९०० सालच्या दुष्काळ त्या लोकांस मुळींच जाणवला नाहीं व हल्लीं ते लोक मजुरीपेशा सोडून स्वतंत्र आपआपला धंदा करून संपन्न स्थितींत आहेत; त्यामळे लोकमान्यांचे नाव विशेषतः या वर्गात सर्वतोमुखीं झालें आहे.

(३) येथें टिळक या उपनांवाचा गृहस्थ स्टॅंप लिहिण्याचा धंदा करीत असे. तो नेहमीं आपले जवळ कुऱ्हाड बाळगी, त्यामुळे त्यास "कुऱ्हाडी टिळक" असें म्हणत असत. त्यांचा व येथील रेवचंद रायचंद नावाचे गुजराथ्या एके दिवशीं कांहीं कारणावरून तंटा झाला. त्यात सदरहु टिळकानें त्या गुजरास कुऱ्हाडीनें मारिलें. त्यामुळें त्याचेवर सिटी मॅजिस्ट्रेटच्या कोर्टात फौजदारी खटला चालू होता. सदरहु टिळकांस येथें कोणाचेंहि पाठबळ नव्हते. यामुळे त्याने लोकमान्यांस पत्र लिहून कळविले कीं 'आपला माझा पूर्वपरिचय व संबंध नाहीं; फक्त आडनाव एक आहे, यामुळे मी आपल्या कुळांतला म्हणवितों. तरी माझ्यावरील प्रसंग मनांत आणून मला संकटांतून सोडवा. मी आपले भरवशावर आहें.' हे पत्र पावतांच लोकमान्यांनीं त्यांचे येथील दोघां परिचित वकिलांस—दिनकरपंत चक्रदेव व दुसरे एक वकील यांस-पत्रें पाठविलीं की 'सदरहु टिळकाचे वकीलपत्र घेऊन त्यास जरूर ती मदत करा व चौकशीची तारीख मला कळवा म्हणजे मी निघून

येतों.' लोकमान्य चौकशीचे वारखेस स्वतः कोर्टांत हजर राहिलेहि! याप्रमाणें सदरहु इसमास कायद्याचें बाबतींत उत्तम मदत मिळाल्यामुळें या आरोपांतून तो इसम दोषमुक्त होऊन सुटला! साधारणतः मोठ्या योग्यतेस चढलेला पुरुष आपले निकट सबंधांतील आप्तेष्टावर असा प्रसंग आला असतां आपले नांवास कमीपणा येईल या भीतीनें त्यास मदत करण्यास कचरतात व त्यापासून दूर राहातात; परंतु लोकमान्यांचें सर्वच लोकोत्तर! केवळ त्याने आपला धांवा केला म्हणून, पूर्वीचा कांहीं एक संबध नसतांना, लोकमान्यांनीं निःस्वार्थबुद्धीनें आपलीं सर्व महत्त्वाचीं कामें एका बाजूस सारून येथें येऊन त्यास मदत केली.

---

## रामचंद्र नारायण मंडलीक

[ बी. ए., माजी संपादक 'लोकमान्य,' मुंबई. ]

(१) लो० टिळक हे लोकमान्य होण्यापूर्वी नामदार असतांना प्रो० परांजपे, प्रो० साठे व रा० आपटे या त्रिवर्गावर, कुलाब्याचे असिस्टंट कलेक्टर मि० ब्रूक यांच्यापुढें मद्यपानप्रतिबंधाचे बाबतींत त्यांनीं केलेल्या कांहीं भाषणांबद्दल खटला चालू असतां, त्याच्या कामाकरितां पेण येथें माझ्या गांवीं आले होते, त्या वेळीं मी त्यांना प्रथम पाहिलें. मला वाटतें ही १८९६–९७ च्या दुष्काळी सालांतली गोष्ट आहे. टिळकांबरोबर त्यावेळीं सुप्रसिद्ध बाजीराव पटवर्धन महाडकर ज्योतिषी हेहि आले होते.

लो० टिळकांच्या आगमनामुळें पेणमध्यें त्या सालीं ज्या प्रचंड सभा झाल्या त्यांची आठवण त्या पाहाणारे जन्मभर विसरणार नाहींत. कमींत कमी दहा हजार लोकांचा समुदाय या सभांना जमत होता. खटल्याच्या पहिल्या दिवशीं ब्रूकसाहेबांच्या तंबूला हजारों लोकांचा जेव्हां गराडा पडला व 'टिळक महाराज की जय'च्या आरोळ्यांनीं जेव्हां दशदिशा दुमदुमून गेल्या तेव्हांचा देखावा माझ्या डोळ्यांसमोर अजून उभा आहे. बाहेर जमलेला प्रचंड जनसंमर्द पाहून व त्यानें चालविलेला टिळकांचा जयघोष ऐकून ब्रूकसाहेब त्या वेळीं चकितच नव्हे तर थोडे भेदरल्यासारखेहि दिसले. लोकांना गप्प करण्याचा प्रयत्न पोलीस पुष्कळ करीत होते; पण त्यांत त्यांना यश येईना! तेव्हां अखेर ब्रूकसाहेबांनीं 'आपण तरी लोकांना दोन शब्द सांगून गप्प करण्याचा प्रयत्न कराल काय?' अशी टिळकांना विनंति केली. तेव्हां 'प्रयत्न करून पाहातों' असें म्हणून ते तंबूबाहेर आले व 'बाहेरच्या गडबडीमुळें कोर्टाच्या कामाला व्यत्यय येत आहे तरी

लोकांनीं शांत राहावें ' अशी विनंति त्यांनीं लोकांना केली. ते बोलण्याकरितां बाहेर येतांच त्यांच्या नांवाचा जयजयकार प्रथम झालाच; पण हात वर करून ते बोलू लागतांच एकदम जिकडे तिकडे इतकी शांतता झाली कीं, त्यांचा प्रत्येक शब्द सर्वांना स्पष्ट ऐकू आला व पुढें खटल्याचें काम आटोपेपर्यंत सर्वांनीं अशीच स्मशानशांतता धारण केली होती. लोकांना शांत करून टिळक तबूत आल्यानतर दाजीसाहेब खऱ्यांना प्रो० शिवरामपंत परांजपे आरोपी नं. १ यांच्या-तर्फे पांच मिनिटे सुद्धां बोलावें लागले नाहीं. त्यांना दोषमुक्त केल्याचें व इतरांचा खटला लावणीवर टाकल्याचें त्यांनीं तावडतोब जाहीर केलें. ब्रूकसाहेबांनीं यानंतर टिळकांना मुद्दाम भेटीस बोलावलें होतें. " शेतकरीवर्गांतील अशिक्षित लोकांचा इतका प्रचंड जमाव एकाद्या खटल्याच्या निमित्तानें जमल्याचें उदाहरण हिंदुस्थानात तर माझ्या पाहाण्यांत नाहींच, पण विलायतेंतहि नाहीं. मला हा जमाव पाहून इंग्लिश इतिहासांतील ' सात बिशपांच्या खटल्याची ' आठवण झाली. तुमच्या लोकप्रियतेचीच हा प्रचंड लोकसमुदाय ही साक्ष आहे. या लोक-प्रियतेबद्दल मी तुमचें अभिनंदन करतों " अशा आशयाचे उद्गार त्यांनीं सदर भेटींत टिळकांजवळ काढले असें मी त्याच वेळीं ऐकल्याचें मला पक्कें स्मरण आहे.

(२) टिळक १८९६ सालीं पेणला आले असतांना तेथें जो प्रचंड लोक-समुदाय भक्तीनें त्यांच्या दर्शनाकरितां व त्यांचीं भाषणे ऐकण्याकरितां जमलेला पाहिला त्याची आठवण ते पुढें अखेरपर्यंत विसरले नाहींत. पेणेंतील ज्या व्यक्ति त्यावेळीं त्यांच्याशीं परिचित झाल्या त्यांच्यावर त्यांचा लोभ पुढें अखंडीत राहिला. ' पेण हें कोकणांतलें पुणें आहे व तेथील मडळी आम्ही पुण्यांत जें करू त्यांचे अनुकरण तेथें करतील व त्यांच्या पाठिंब्यावर आपण बेलाशक विसंबण्यास हरकत नाहीं ' असें ते म्हणत.

( ३ ) टिळकांवरील खोटा दस्तऐवज केल्याचा व खोटा पुरावा दिल्याचा खटला जेव्हां पुण्यास बेटावर मि० क्लेमन्ट्स यांच्यापुढें चालला होता, त्या-वेळीं मी फर्ग्युसन कॉलेजांत रेसिडेन्सीमध्येंच राहात होतों. खटल्याचा निकाल ज्या दिवशीं झाला त्या दिवशीं नित्याप्रमाणें आम्ही कॉलेजांतून खटला ऐकण्याकरितां जे आलों ते कोर्टाच्या आवाराबाहेरील देखावा पाहून थक्कच होऊन गेलों. कोर्टाच्या आवाराबाहेर बरेचसे माउन्टेड पोलीस उभे असलेले व आंतहि कित्येक सशस्त्र असलेले पोलीस दृष्टीस पडले. हा सर्व कडेकोट बदोबस्त कशाकरितां आहे हें आम्हाला कोणी सांगावें लागलें नाहीं. हा मॅजिस्ट्रेट आज आमच्या परमप्रिय व परमपूज्य पुढाऱ्याला आमच्या देखत बेड्या ठोकवून अन्यायानें येरवड्यांत सक्तमजुरी करण्याला पाठविणार, हें दृश्य आमच्या दृष्टीपुढें तात्काल उभें राहिलें. त्यावेळीं आमच्या मनांत काय काय विचार आले असतील याची कल्पना करणें मी सहृदय वाचकावरच

सोंपवितों. दरवाज्याबाहेर ज्यावेळीं आम्ही घोडेस्वार पोलीसांचा गराडा पाहिला तेव्हां आज आम्हांला आंत जाऊ देतात कीं नाहीं अशी पहिली शंका आम्हांला आली. पण आम्हांला कोणी बंदी केली नाहीं व आम्ही नित्याप्रमाणें कोर्टाच्या खोलींत जाऊन बसलों. टिळक, दादासाहेब वगैरे मंडळी अजून यावयाची होती. एकदां मनांत येई कीं, पुढे काय वाढून ठेवलेलें आहे तें स्पष्ट दिसत असतांना येथें थांबून काय करावयाचे आहे, निघून जावें हे बरें; पण लागलींच मन असेंहि सांगे कीं, असला दुबळेपणा काय कामाचा? शिक्षा ज्याला भोगायला लागणार तो आमचा आदर्श गुरु जर बेफिकीरपणाने व मर्दासारखा ती भोगण्याला उभा आहे, तर आम्ही घाबरटपणानें तेथून निघून जाण्यांत आमचा पुरुषार्थ तो काय? अखेरीस आम्ही सर्वांनीं मन घट्ट करून शेवटपर्यंत तेथें राहाण्याचें ठरविले व राहिलोंहि. पुढें व्हावयाचें तें अपेक्षेप्रमाणें सर्व झालें. क्लेमन्ट्स साहेबांनीं टिळकांना शिक्षा ठोठावली व ते तावडतोब तेथून अदृश्य झाले. शिक्षा ऐकून टिळकांच्या चेहऱ्यावर विकाराची छटाहि उमटल्याचे आमच्या नजरेस आलें नाहीं. मनानें वरलेला हा आपला गुरु प्रत्यक्ष गुरूच्या नात्यानें आपल्याला पाठ देण्याला मिळण्याचें सद्भाग्य आपल्याला लाभेल, असें मी त्यांच्या वाड्यांत पहिल्यानें ज्या दिवशीं त्यांच्या दर्शनार्थ गेलों, त्या दिवशीं माझ्या मनांत मुळींसुद्धां आलें नाहीं. पण ईश्वराच्या अकल्पित लीलेने तसें सद्भाग्य मला पुढे लाभलें. कै० भास्करराव फडके यांच्यावर 'विहारी' पत्राचे संपादक या नात्याने सन १९०७मध्यें खटला झाल्यावर त्यांच्या जागीं दुसरा संपादक नेमून पत्र मरू न देणे अवश्य होतें. हा दुसरा संपादक होण्याचा मान मला मिळाला व याच संबधांत त्यांचें व माझे गुरुशिष्याचें नातें जमण्याचा योग येतांच मी तो फुकट जाऊ दिला नाहीं. देशसेवेची लालसा असणारा तरुण मनुष्य आपल्याकडे येतांच त्याला उत्तेजन देऊन आपल्या छापेंत पूर्णपणें घेण्याच्या कलेंत टिळकांचा हातखंडा होता, असा अनुभव मला 'विहारी' प्रकरणांत मी त्यांची सिंहगडावर जाऊन जेव्हां प्रथम भेट घेतली तेव्हांच आला.

---

## व्यंकटेश लक्ष्मण भिडे

[शिक्षक नू० म० वि० पुणें.]

(१) लोकमान्य ज्यावेळीं पुण्यास विलायतेहून परत आले त्यावेळीं त्यांची मोठी मिरवणूक निघाली होती. मिरवणूक पासोड्या मारुतीपाशीं आली. पासोड्या मारुतीच्या समोरच्या दुकानांत एक पाटी लावली होती; त्यावर 'मी फेरूमनांचा शिष्य आहें' म्हणून असें होतें. दुकानांतील मालक ज्यावेळेस लोकमान्यांस हार घालण्यास पुढें आला त्यावेळीं लोकमान्य त्यास हंसून म्हणाले 'अहो शेटजी, तो हक्क फक्त माझाच आहे, असें मला वाटत होतें !'

---

## रामचंद्र विठ्ठल तळाशीकर

[न्यू इं० स्कूल व लॉ क्लासमधील लोकमान्यांचे शिष्य, वकील, पुणें.]

(१) सन १८९५।९६ सालीं कै० महादेव गोविंद रानडे सकाळीं बहुतकरून फिरण्यास जात असत. तेव्हां ते रोज सकाळीं ८-८॥ च्या सुमारास लो० टिळक यांजकडे काम होतें म्हणून विंचुरकरांच्या वाड्यांत लो० टिळक तेव्हां राहात असत म्हणून बळवंतराव, बळवंतराव असे हांका मारीत आले. तेव्हां मी पुढें जाऊन क्लास घेत आहेत असें सांगितलें. तेव्हां इक्विटी विषय चालला होता. व त्यावर ते लेक्चर देत होते. तेव्हां मी रानडे यांस विचारलें कीं, आपण आलां आहांत हें कळवूं कां त्यांना? तेव्हां ते नको म्हणाले. मी थोडा वेळ थांबतों असें म्हणून मागच्या बाकावर बसले. सुमारें १०।१५ मिनिटांनीं क्लास संपला तेव्हां ते दोघे बोलत गेले. मी पुस्तक ठेवण्याकरितां मागेंच होतों. तेव्हां रानडे त्यास बोलले कीं, 'बळवंतराव, फार सुरेख लेक्चर चाललें होतें. You have satisfactorily dealt with the subject, I am quite pleased.' असें म्हणून ते कांहीं वेळ बोलत बसले.

(२) कै० माधवराव नामजोशी हे लो० टिळकांचे अतीव परम स्नेही असत. त्यांच्या जो मृत्यूचा लेख लिहिला तो रात्रीं त्यांनीं लिहिला. त्यांच्या डोळ्यांतून अश्रू येत होते. तेव्हां ते म्हणाले "मला आजन्मांत इतकें दुःख कधींही झालें नाहीं. माधवराव माझ्या जिवाचा कांहीं भाग गेला."

(३) प्रो० जिनसीवाले हे लोकमान्यांचे गुरु होते. व त्यांचें परस्परांवर फार प्रेम असे. लोकमान्यांचे घरीं बहुतेक उन्हाळ्यांत वसंतपूजा होत असे. तेव्हां सर्व मोठे

मोठे लोक येत असत. परंतु जिनसीवाले यांचें फार कडकडीत सोंवळे असे. तेव्हां ते आले नाहींत म्हणून लोकमान्यांनीं आपल्या भार्येस सांगितलें कीं, सर्व सामान एका घरांतील निरनिराळें ठेऊन द्यावे. व मजला सांगितलें कीं, स्वच्छ हातपाय धुऊन सोवळ्यानें त्यांस नेऊन दे. त्याप्रमाणें मी त्यांस चित्रशाळेच्या खालच्या घरीं राहात असत तेथे त्यांस नेऊन दिलें. त्यांना तें सोवळ्यानें आणिलें आहे असें पाहून फारच आनंद झाला व फराळ करून ते तासाभराने लोकमान्यांकडे आले. व मोठ्या प्रेमानें व सद्‌गदित अंतःकरणानें लोकमान्यांस म्हणाले, " बाबा, असा जिवलग आतां कोण आहे ! मजला फार फार आनंद झाला. जर तुमच्या ठिकाणीं स्नानसंध्या, सोंवळेंओवळें असते तर किती उत्तम झाले असते. " त्यावर लोकमान्य त्यास म्हणाले कीं, "तुम्ही नाक धरून बसतां, मी बसत नाहीं. मी dry emotion चा माणूस आहे. परंतु भक्ती नाहीं असें नाहीं. तुम्ही कोंवळ्या हृदयाचे, पाहिल्या बरोबर तुम्हांस रडें येतें येवढाच भेद आहे. "

---

## गणपतराव पांडुरंग किर्लोस्कर

[ कै० अण्णासाहेब किर्लोस्कर यांचे बंधु, गुर्लहोसूर, जि० बेळगाव. ]

(१) गुर्लहोसूर हें एक सामान्य खेडें असून ते बेळगांव जिल्ह्यांत मोडते. रेलवेपासून अनेक मैल दूर असणाऱ्या या खेडेगांवात देशस्थितीबद्दलचे गाढ अज्ञानच पसरलेलें असेल हें सांगावयास नकोच. त्यांतहि मी लिहिणार आहें ती हकीकत १९०७ सालची. एके दिवशीं असें वाटले कीं, लोकमान्य टिळकांना जर कर्नाटकांत आणलें तर सारा कर्नाटक खडबडून जागा होईल. टिळकांना कर्नाटकांत आणावयाचें हें तर मी निश्चित ठरविलेंच आणि त्याच्या योजनेविषयीं विचार करितां गुर्लहोसूरच गांव मी पसत केले. येथे चिद्‌बरेश्वराची यात्रा भरते. त्यासाठीं दूरदूरचे लोक या यात्रेस येतात. टिळक येणार म्हणून समजले म्हणजे यात्राहि मोठी जमेल असे वाटून मी हाच माझा बेत निश्चित केला आणि चिदंबराच्या उत्सवांत सर्व भार अंगावर घेऊन उत्सव पार पाडणाऱ्या कैवल्यस्वामींची मी भेट घेतली. स्वामींना माझें म्हणणें आणि विचार पटले आणि त्यांनीं आपले दोन शिष्य लोकमान्यांना आमत्रण देण्यासाठीं पाठविले. ते शिष्य येथून गेले. इकडे टिळक येणार, टिळक येणार म्हणून साऱ्या बेळगांव, धारवाड जिल्ह्यांत एकच हूल उठली. सारा कर्नाटक उल्हसित झाला. पण काय ! स्वामींचे शिष्य रडगाणें गात परत आले ! टिळकांची स्वारी यंदा

प्रकृती बरी नसल्यानें येऊ शकत नाहीं असें त्यांच्या परत येण्यानें निश्चित कळलें. मंगळवारच्या रात्रीच्या जेवणास बसणार तों टिळक येत नाहींत ही बातमी मला समजली. मी जेवण तसेंच टाकलें. टिळकांना मी आणीन तेव्हांच अन्न घेईन असा मी निश्चय केला. पंचवीस रुपये फक्त बरोबर घेतले आणि पायींच हुळे-भावी स्टेशनवर आलों. तेथील स्टेशनमास्तरांना मी सांगितलें कीं, 'टिळकांना इकडे आणण्यासाठीं मी जात आहें.' स्टेशनमास्तर म्हणाले, 'टिळक येणार येणार अशी वदता होती, पण टिळकाची प्रकृती बरी नसल्यानें यदा ते येत नाहींत असें कळतें. तें कांहीं असो; तुम्ही जेवा आणि नतर पुण्यास जाण्यासाठीं निघा.' मी त्यांना सांगितलें कीं, 'मी टिळकांना आणण्यासाठीं निघालों आहें. त्यांना इकडे आणल्यावाचून मी अन्न तर काय पण पाणीहि घेणार नाहीं. ते येत नाहींत असेंच ठरलें तर मी परत कर्नाटकात परतणार नाहीं. सन्यासच घेईन व मग अन्न ग्रहण करीन,' स्टेशनमास्तराना माझें निश्चयी भाषण ऐकून नवल वाटलें. त्यांनीं येवढेंच सांगितलें 'बाकी काय असेल तें असो आणि होवो, तुम्ही टिळकाना कर्नाटकांत आणण्यासाठीं जात आहांत, हें कांहीं तुमच्या एकट्याच्या लाभाचें काम नव्हे; इतर कांहीं नसलें तरी पुण्यापर्यंतचें हे तिकीट मी देतों ते घ्या.' मी पुण्यास जाऊन पोंचलों तों तडक टिळकांच्या घरीं गेलों. टिळक सिंहगडावर. मी तसाच सिंहगडास गेलो. दोनप्रहरचे १२-१ च्या दरम्यान मी सिंहगडावर पोंचलों व तात्काळ लोकमान्याच्या समोर उभा राहिलों. लोकमान्यानीं कोठून आलां, कां आला वगैरे विचारतांच मी सांगितलें, 'मी गुळेहोसूर येथून आलों. तुम्हांला तिकडे मी नेईपर्यंत अन्नच ग्रहण करणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून मी येथें आलों आहे.' लोकमान्यानीं माझें हें म्हणणें ऐकून घेतलें आणि म्हटलें "ठीक आहे. दोनप्रहर झाली आहे. जेवून घ्या मग बोलू." लगेच जेवण तयार करण्यास सांगितलें. मी स्नानाकरितां उठलों. स्नान होऊन जेवण करून पुन्हा टिळकांजवळ येऊन बसलों आणि विचारलें 'मग कधीं निघणार कर्नाटकात यायला?' टिळक म्हणाले "खरें सांगू गणपतराव, यदा कांहीं मला तिकडे येतां येत नाहीं. पुढच्यावर्षी मी येईन. माझी प्रकृती बरी नाहीं." त्यानीं मला स्वचातुर्यानें फसविलेंसें वाटून राग आला. टिळकांवर १९०७ च्या कॉंग्रेस नतर वर्तमानपत्रद्वारा पुष्कळानीं पुष्कळ रीतीनें तोंडसुख घेतलें; पण त्यांच्याच तोंडावर त्यांच्याच घरात त्यांना तुम्ही 'अट्टल लबाड' आहांत असें म्हणणारी व्यक्ती मजवाचून विरळा असेल! त्या बिचाऱ्या साधूला 'तुम्ही अट्टल लबाड आहात' हे माझे शब्द ऐकून मोठें आश्चर्य वाटलें, पण रागावल्याचें चिन्ह मात्र मला मुळींच दिसलें नाहीं. टिळक म्हणाले 'मी बोवा काय लबाडी केली?' मी म्हटलें 'अलबत लबाडी केली. मी आलों तेव्हांच तुम्हाला माझी प्रतिज्ञा सांगितली. ही प्रतिज्ञा ऐकूनहि तुम्ही म्हणाला, 'ठीक आहे. जेवून घ्या मग बोलू'

तेव्हां सांगा लोकांची प्रतिज्ञा आपल्या कपटानें मोडून काढणारे लबाड नव्हेत का ?' टिळक म्हणाले "या लबाडींत पाप आहे कीं पुण्य ? तुम्ही दमलेले भागलेले, त्यातहि तुम्ही दोनतीन दिवसांचे उपवासी. तुम्हाला जेवावयास घालणें हें अर्थात् पुण्य नव्हे काय ?" मी सांगितलें 'जेव्हां मी आलों आणि तुम्हास नेण्याची प्रतिज्ञा करून आलों असे सांगितलें तेव्हांच तुम्ही कां नाहीं सांगितलें कीं, तुमची प्रतिज्ञा व्यर्थ आहे. मी कांहीं यदा येणार नाहीं. तुम्हाला हें बोलण्याचें धैर्यच झालें नाहीं आणि आम्हा भोळ्यांना फसविण्याची तुम्ही युक्ती काढिली. अहो कार्य अगोदर कीं जेवण अगोदर ? तुम्ही जेवण अगोदर ह्या मतापैकीं असतां तर तुम्ही आडनांवानेंच टिळक राहाता. हिंदुस्थानचे टिळक खचित झालां नसता.' शेवटीं लोकमान्य लोकांच्या सेवकापुढें हरले 'येतों बाबा' असे टिळकांनीं अभिवचन दिलें आणि मग ते म्हणाले "आतां तिकडे यावयाचें ठरलें; पण आतां तुम्ही मला एक दिवस माझ्याकरितां द्या. मी अमुक दिवशीं अमुक गाडीनें निघून धारवाडास येतों." असें सांगून निघण्याची, धारवाड स्टेशनवर येण्याची तारीख लिहून गाडी लिहून स्वदस्तूरचें पत्र मजजवळ दिलें आणि मग म्हणाले "गणपतराव, तुम्ही तिकडे मला बोलावतां आणि मी आतां येतों हेंहि खरें; पण मला कानडी मुळींच येत नाहीं. माझे भाषण कानडी लोकाना काय समजणार ? पांचशें तरी लोक माझ्या व्याख्यानाला जमतील काय ?" मी टिळकांना येवढेंच सांगितलें कीं, 'कर्नाटकच्या जागृती-प्रीत्यर्थ मी तुम्हाला तिकडे नेत आहे. तुम्ही येणार येणार येवढ्याच वदंतेनें लोकांचा उत्साह किती वाढला आहे ह्याचें मी वर्णन करू शकत नाहीं. तुमच्या व्याख्यानास शेंपांचशें लोक जमतील काय म्हणून विचारतां ? अहो तुम्हाला पाहाण्याकरितां गुर्लहोसूरपासून पन्नास पन्नास मैलांवर दूर असलेले लोक तुम्ही येणार या वदंतेवर विश्वासून तेथे येतील. शेंपांचशें नव्हे पांचपन्नास हजार लोकसमूह तेथें जमेल.'

( २ ) टिळकांना वाटलें शें पांचशें माणसें जमतील कीं नाहीं कोणास ठाऊक ? पण टिळकांची कर्नाटकांतील ही स्वारी यशस्वी करण्यांत लिंगायत–जैन आणि इतर सर्व जातींनीं सारखाच उत्साह दाखविला व कार्यभाग उचलला. लोकमान्य टिळक, देशभक्त परांजपे, बेळगांवचे देशपांडे, धारवाडचे सारे पुढारी माझ्याच वाड्यांत उतरले होते. आज हा वाडा स्मरणवस्तु झाला आहे. मलप्रभेस महापूर येऊन त्यांत हा वाडा आंतील सामानासुमानासह रसातळास पोंचला. थोडा भाग वाचला व मी त्या भागांत कांहीं दिवस राहात असे. पण लोकमान्यांनीं हें जग सोडल्याचें ज्या दिवशीं कळलें त्याच दिवशीं लोकमान्यांच्या स्मरणार्थ हा अवशिष्ट भाग मी अर्पण केला ! मी कोणाच्या मदतीची अपेक्षा केली नाहीं आणि कोणाला विचारिलें नाहीं. लोकमान्यांच्या इहलोकसमाप्तीची बातमी

आली त्याच दिवशीं मी टिळकवाचनमंदिर या इमारतीचा पाया घालून त्या इमारतीस माझ्या वाड्याच्या अवशिष्ट भागानें सजविलें.

( ३ ) गुर्लहोसूर येथून टिळकांची स्वारी बेळगांवकडे गेली. हाहि प्रवास बैलगाडींतूनच होता. धारवाडाहून गुर्लहोसूरला वाटेंत जसे स्वागत झालें तसेंच स्वागत याहि मार्गावर झालें रस्त्यांत बायका टिळकांना ओंवाळीत आणि टिळक प्रत्येक ओंवाळणींत एक रुपया टाकीत. टिळकाचे असे सुमारें तीनशे रुपये स्वतःचे खर्च झाले! टिळकांची दुसरी गोष्ट म्हणजे आगगाडीची येण्या-जाण्याचीं तिकीटे देखील टिळकांनीं स्वतःच्याच पैशानें घेतलीं होतीं!

---

## वामन केशव दातार

[ वैद्य, येवलें, जि० नाशीक ]

( १ ) लोकमान्य टिळक नाशिकास १९०६ सालीं आपल्या नातवाच्या मुंजीकरितां आले होते. त्यावेळेस कै० शंकर दाजीशास्त्री पदे हेहि नाशिकासच राहात असत. व त्यांच्या धार्मिक चळवळी तेथें सुरू असत. दरभंग्याच्या महाराजाचे आश्रित विद्वान् पंडित गोपिनाथ हे पद्यांच्या निमंत्रणावरून तेथें आले होते, व त्यांचींहि व्याख्यानें चालू होतीं. कै० पदे याच्या मनात लो० टिळकांचीं सामाजिक मतें एकदां जनतेसमोर स्पष्टपणें यावींत असे होतें. कारण एकीकडे सुधारक मंडळी लोकमान्यास समाजसुधारणेचे कट्टे विरोधक म्हणून जसे समजत त्याप्रमाणें कट्टे सनातन धर्माभिमानीहि लो० टिळकास सुधारक समजत असत. प्रच्छन्नबौद्ध म्हणविल्या जाणाऱ्या आद्य शंकराचार्यांप्रमाणेंच प्रच्छन्न सुधारक हाच किताब लोकमान्यास त्या मंडळींनीं मनांतून दिला होता. ह्या मंडळींतच उपरिनिर्दिष्ट पदे यांची गणना होत असल्यानें त्यानीं विशिष्ट हेतूनेंच लोकमान्य टिळकांचें याप्रसंगीं व्याख्यान ठरविलें. हें व्याख्यान विधवाविवाह या विषयावर प्रो० राममूर्ति नायडु यांच्या तंबूत झालें. सदरहु प्रसंगीं पंडित गोपीनाथहि हजर होते. लोकमान्य आपल्या भाषणांत म्हणाले " विधवाविवाहासंबधानें शास्त्रनिषिद्धता सांगून संकटकालीं अक्षतयोनि अशा गतधवांचा पुनर्विवाह खुशाल करावा किंवा ज्यांना अशा विवाहाची आवश्यकताच वाटते त्यांना तो करू द्यावा. समाजात अशा लोकांना फार तर थोडें गौणत्व द्यावें, परतु समाज-बहिष्कृत करू नये. समाजसुधारक या विषयाला जितकें महत्त्व देतात व ही सुधारणा

झाल्याशिवाय राष्ट्रीय ध्येय साध्य होणार नाहीं असें जें प्रतिपादन करतात तितकें महत्त्व त्या विषयास नसून एक वेळेस ही सुधारणा हल्लीं जरी न झाली तरी राष्ट्रीय ध्येय प्राप्त होण्यास कांहींहि अडचण येणार नाहीं. 'जेथें राष्ट्रांतील सर्वच लोक 'विधवा' झालेले आहेत तेथें एक विधवेचा उद्धार झाला काय आणि न झाला काय याची फारशी किंमत नाहीं. तेव्हां राष्ट्राचें वैधव्य घालविण्याकडे सर्वांनीं लक्ष द्यावें" असे सांगून त्यानीं आपले भाषण संपविलें.

अशा रीतीनें कै० पद्यांचा हेतु मात्र सफल न होऊन पदे जागचेजागींच विरमले आणि लोकमान्यांचें निर्भीड मतप्रतिपादन लोकांस कळून आले.

(२) सन १९०६ मधील गोष्ट. लोकमान्य टिळक नाशिकास आमच्या मंडळींच्या बोलावण्यावरून गणपति उत्सवाकरितां आले होते. लोकमान्यांचे त्यावेळेस नाशिककरांनीं अपूर्व स्वागत केले. तो काल स्वदेशी चळवळीच्या ऐन उमेदीचा होता. व बंगाल्यांतील बारिसालप्रमाणे महाराष्ट्रांत नाशिकनें या चळवळींत पुढाकार घेऊन भयकर खळबळ उडवून दिली होती. त्यावेळचा तो नाशिकचा जोम. त्यावेळची ती तरुणांची धडाडी कांहीं अजब होती. इतर ठिकाणीं 'वंदेमातरम्' 'स्वदेशी माल वापरा' असे जयघोष होत; तर नाशिकास पूर्ण स्वातन्त्र्याची लालसा दर्शविणारे 'स्वातन्त्र्य देवी की जय' असे सूचक जयघोष होत. या जयघोषात लोकमान्यांचे स्वागत होऊन लोकमान्य विजयानद थिएटरांत आले. तेथें नाशिकचे प्रख्यात कवि गोविंद यांची विख्यात 'लोकमान्यांची भूपाळी' लोकमान्यांसमक्ष म्हटली गेली. त्या भूपाळींत दर्शविले गेलेले विचार, तरुणांच्या मनांत वसत असलेले विकार, व या विकार आणि विचारांनीं गजबजून गेलेलें नाशिकचें वातावरण पाहून लोकमान्यांस खरोखर आनंद झाला. व त्यानीं भाषण करतांना, "स्वातन्त्र्य देवी की जय येथवरच थांबा, इतकें पुरे आहे" असे उद्गार काढले. पुढें लोकमान्यांची व नाशिकच्या तरुण मंडळींची झालेली खाजगी भेट ही मागच्या पुस्तकांतील डॉ० भटांच्या आठवणींत आलीच आहे. लोकमान्य त्या भेटींत जरी मडळींच्या विचारांना बिलकुल वश झाले नाहींत तथापि मडळींचा तो उद्देश व ती देशाकरितां स्वार्थत्यागाची वृत्ति ही लोकमान्यांना सर्वस्वी मूर्खपणाचीच वाटत होती असें मात्र मला वाटत नाहीं. देशाकरितां वेळप्रसगीं रशियन टेरॉरिझमची पद्धति स्वीकारणें हे प्राप्त होतें व त्यापासून देशाचे फायदेहि होतात, असे विचार ध्वनित करतांना स्थल, काल, परिस्थिति, शक्याशक्यता व अत्यत गुप्तता यांचाहि अवश्य विचार झाला पाहिजे, असेंहि त्यांनीं निक्षून सांगितलें व या सर्व गोष्टींचा नीट विचार करा म्हणून बजावलें. यावरून आणि कटाच्या खटल्यांत पांच वर्षांचा तुरुंगवास भोगून सरकारच्या दोषास सर्वस्वी पात्र झालेल्या डॉ० भट यांस, तसेंच अलिपूर बॉब केसमध्यें सशयीत या सदरांत पडलेल्या व पुष्कळच दिवस सरकारच्या करड्या नजरे-

खालीं असणाऱ्या महर्षि बापट यास इतर ठिकाणीं थारा मिळत नसतांनाहि आश्रय देणाऱ्या लोकमान्यांचें अंतःकरण स्वातन्त्र्येच्छु, स्वार्थत्यागी तरुणांविषयीं सहानुभूतिपर नव्हते किंवा त्या तरुणांचे विचार त्यांना मानवत नव्हते असे म्हणतां येत नाहीं.

( ३ ) १९१४ सालीं आपला सहा वर्षांचा भयंकर तुरुगवास संपवून लोकमान्य परत आले व १९१५ सालीं त्यांनीं होमरूल लीगची स्थापना बेळगावास केली. या स्वराज्य सभाच्या शाखा हलके हलके सर्व ठिकाणीं लवकरच स्थापन झाल्या, परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, १९१७ ची नाशिक येथील प्रांतिक परिषद होईपावेतों सभाची शाखा नाशिक येथें स्थापन झाली नव्हती. मि० जॅक्सनच्या खुनानंतर नाशिक हें इतकें हादरलें व गारठलें कीं, त्याचा गारवा लोकमान्यांच्या १९१७ मधील आगमनानेंच नाहींसा झाला ! मध्यंतरीं कसल्याहि चळवळी नाशिकास होत नसत. प्रांतिक परिषद भरविण्याची संधि साधून नाशिकने आपलें डोकें पुन्हां वर काढण्यास भीत भीतच सुरुवात केली. कारण लोकमान्यांचे स्वागत प्रांतिक परिषदेकडून न होता खाजगी वर्गणी काढूनच करावे लागले. असो; लोकमान्य आले व पंचवटींत उतरले. सकाळची वेळ होती. लोकमान्य बसले होते. मीहि जवळच होतो. सर्व ठिकाणीं स्वराज्य-सभाच्या शाखा असतांना नाशिकासच का नाहीं याची चौकशी लोकमान्यांनीं त्यावेळेस केली. समाधानकारक उत्तर कोणाकडूनहि त्यावेळीं मिळेना. कारण सभाविषयीं त्यावेळेस तरी नाशिककरांना थोडीशी भीतीच वाटत असावी असें वाटते. लोकमान्यांच्या ही गोष्ट लक्षांत येतांच त्यांनीं मला उद्देशून सांगितलें कीं, " मी येथे आलों आहे. ज्या गोष्टी करणें असेल त्या सर्व करून घ्या. मागें पुढें पाहू नका. व पूर्वीचा जोम या शहरांत उत्पन्न करा " असें सांगून व श्रीयुत अप्पासाहेब केतकर यांस सभाचे अध्यक्ष ठरवून स्वराज्य सभाची एक शाखा नाशिकास स्थापविली. लोकमान्य प्रांतिक-परिषदेच्या सिद्धीकरितां वास्तविक आले होते, परंतु त्यांनीं परिषदेच्या कार्यापेक्षांहि आम्हीं ठरविलेल्या व्याख्यानमालेच्या स्वतंत्र कार्यक्रमास इतकें प्रोत्साहन दिले व अनेक सन्मान्य पुढाऱ्यांकडूनहि देवविले कीं, त्यामुळे थिजलेलें नाशिक खडबडून उठले व पुन्हां राजकारणांत भाग घेऊ लागलें. ह्याच वेळीं मला लोकमान्यांच्या काम करवून घेण्याच्या हातोटीचा चांगला अनुभव आला.

---

# धुंडिराज दीक्षित बापटशास्त्री

[ आहिताग्नि, सोमयाजी, मु० पांचवड, जि० सातारा. ]

(१) डॉ० मुंजे ( नागपूर ) यांचे आग्रहास्तव धर्मशास्त्रविषयक एक सर्वमान्य ग्रंथ लिहिण्याचें लोकमान्यांनीं ठरविलें होतें. उपलब्ध असलेलीं सर्व वेदांचीं गृह्य व धर्मसूत्रें एकत्र करून त्यांचें विषयवार पृथक्करण करावयाचें आणि नंतर त्यावर सर्वांगपरिपूर्ण असा ग्रंथ लिहावयाचा असा त्यांचा विचार होता. लोकमान्य दाखवून देतील त्या विशिष्ट दृष्टीनें सर्व गृह्यसूत्रांचें निरीक्षण करून निरनिराळ्या विषयावरील वचनांची एकवाक्यता व पृथक्त्वदर्शक टिप्पणें तयार करण्याचे कामासाठीं त्यांना एक आधुनिक दृष्टीच्या शास्त्र्याची जरूर होती. श्रीमंत सरदार तात्यासाहेब मेहेंदळे यांनीं लोकमान्यांकडे माझी शिफारस केली, व त्यांनीं " माझ्याकडे बापटांना एकदां समक्ष भेटण्यास पाठवा. ते काम कसें करतील याची थोडी चाचणी घेऊन मला पटल्यास मी त्यांना काम देईन " असें मेहेंदळ्यांना कळविलें. त्याप्रमाणें मी लोकमान्यांकडे एके दिवशीं रात्रीं ८-८॥ वाजतां गेलों. त्यावेळीं पुढें दिल्याप्रमाणें त्यांनीं माझी तोंडीं परीक्षा—नव्हे चांचणी—घेतली.

लो०—वैदिक धर्माविषयीं आस्तिक्यबुद्धि असणाऱ्यालासुद्धां सध्याच्या देशकाल परिस्थितींमध्ये पूर्वीच्या इतकी विस्तृत स्नानसंध्या करावयास अवसर नाहीं. अनवश्यक विस्तार छाटून आमचीं कर्में थोडक्यांत, व सुटसुटीत अशीं असलीं पाहिजेत. आजच्या संध्येचा प्रयोग बराच वाढलेला आहे त्याची छाटाछाट तुम्ही काय कराल हे सांगा पाहूं ?

मीः—संध्येमध्यें अर्घ्यप्रदान, गायत्री जप व उपस्थान या तीन गोष्टी मुख्य व अवश्य आहेत. बाकीच्या गोष्टी कमी करतां येण्याजोग्या आहेत.

लो०—निरवश्यक विधींचा थोडक्यांत खुलासा करा.

मीः—स्मार्ताचमन केल्यास केशवादि चोवीस नांवांच्या उच्चाराचा वेळ वांचेल. गायत्री जपापूर्वीच्या—आसनविधी, षडङ्गन्यास, मुद्रा वगैरे गोष्टी तंत्रपद्धतींतून संध्येमध्ये मिश्र झाल्या आहेत; त्याहि कमी करतां येण्याजोग्या आहेत.

यानंतर काहीं विशिष्ट सूचना लोकमान्यांनीं मला दिल्या व काम करण्यास परवानगी दिली. श्रीमंत मेहेंदळे यांचे वाड्यांतच मी टिप्पणें तयार करीत असे व ४।८ दिवसांनीं लोकमान्यांकडे जाऊन झालेलें काम दाखवी व पुढच्या कामाची माहिती विचारून येई.

( २ ) 'मीमांसा महाविद्यालय' या नांवाची एक संस्था पुण्यास अस्तित्वांत आहे हे सर्वांस माहितच आहे. ही संस्था लोकमान्यांच्या

सहाय्यानें व पुरस्कारानेंच निर्माण झाली होती. वे० शा० किंजवडेकरशास्त्री, मी, कै० रामकृष्ण वासुदेव बर्वे आणि श्री० शंकर रामचंद्र राजवाडे गीताभाष्यकार असे चौघेजण या संस्थेचे संस्थापक होतों. संस्थेमध्ये पुढे अनेक कारणांनीं मत भेद होऊन कै० बर्वे आणि मी संस्थेंतून अलग झालों. ही संस्था स्थापन झाली तेव्हां तिच्या उद्घाटन समारंभानिमित्त किर्लोस्कर थिएटरांत लोक-मान्यांच्या अध्यक्षतेखालीं श्री० राजवाडे यांचें व्याख्यानास सुरवात झाल्यापासूनच पावसाची थोडथोडीं चिन्हें दिसत होतीं. परंतु समारोपादाखल भाषण करण्यास लोकमान्य उठायला व पावसाचे थेंब येऊं लागायाला योगायोगानें बरोबरच सुरवात झाली तेव्हां "यज्ञात्भवति पर्जन्यः असें गीतावचन आहे. आपण एवढा वेळ यज्ञाचाच विचार केला आहे. अर्थात् पर्जन्यानें आपल्या आगमनाने यावेळीं औचित्यच दाखविलें आहे." अशीं वाक्यें बोलून लोकमान्यांनीं आपलें भाषण सुरू केले तेव्हा सर्व प्रेक्षकाना टिळकांच्या समयोचितपणाबद्दल कौतुक वाटलें.

---

## शाम (पूर्वाश्रमींचे श्रीयुत शिवरामपंत ओक)

[ अपरिग्रहवृत्तीनें राष्ट्रसेवा करणारे. ]

(१) सन १९०५ सालीं स्वदेशीची दीक्षा एक महिन्याकरिता घेऊन शेवटचे व्याख्यान पुण्यास देण्याकरिता गेलों. लोकमान्य टिळक हे नांव मात्र तोंपर्यंत माहीत होतें. पुण्यात कोणाची ओळख नव्हती, म्हणून गायकवाडवाड्यांत गेलों. तेथें टिळक राहात नव्हते. गायकवाडचे वाड्यातून एक मनुष्य घेऊन, त्यांचें घरीं गेलो. कोण काय वगैरे सागून त्यांनीं उत्तर दिलें "ठीक आहे, वाड्यात जागा आहे, वाड्याचे लगत हौद आहे, सध्याकाळीं ४ वाजतां गायकवाडचे वाड्यात मी भेटेन." मी त्यांस सांगितलें 'मला जेवण पाहिजे आहे,' मिनीटभर थांबून ते म्हणाले "माझे घरीं फार अडचण आहे, मी तुमची व्यवस्था खाणावळींत करितो." ठीक आहे इतके म्हणून मी त्यांचेपासून निघालों. कबूल केल्याप्रमाणें चार वाजता ते आले, व्याख्यानाची सोय लावली, गणपतीकरिता डायस तयार केलेला होता त्यावर ते टेकून बसले होते; मी त्यास विनंति केली कीं, बुक्या आणि चपी ही मला चांगली करिता येते असे माझे वडीलमातोश्रींनीं मला सर्टिफीकेट दिले आहे. म्हणून माझेकडून ती अल्प सेवा तुम्ही घ्यावी. ते म्हणाले "जी गोष्ट सागण्याचा प्रसंग आजपर्यंत कोणी मजवर आणलेला नाहीं, तो तुम्ही आज आणलात, म्हणून मी तुम्हास सांगतो कीं,

जिच्यांशीं मीं लग्न लावले तिचा हस्तस्पर्श अजूनपर्यंत माझे पायास नाहीं; याचे पलिकडे तुमची इच्छा पाय दाबणेची असलेस दाबा !" अनेक पापें माझे हांतून झालीं असलेमुळे त्यांचे पायास स्पर्श करण्याची हिंमत झाली नाहीं. पण यामुळें माझे आयुष्यांत विशेष मोठी क्रांती घडली.

(२) टिळकांनीं एका भाषणांत "स्मृतिकार निर्माण झाला पाहिजे, स्मृति बदलण्याचा काळ आतां आला आहे" असें सांगितलें यावरून मी त्यांस विचारिलें कीं, 'स्मृतिकार निर्माण झाला पाहिजे असें आपण म्हणता त्या आपणास स्मृतिकार होतां येत नाहीं ?' ते म्हणाले "नाहीं." 'याचें स्पष्टीकरण कराल काय ?' असें विचारतां त्यांनीं सांगितलें "माझे हातून कांहीं झालें नाहीं आणि त्यांतून कांहीं झालें असलें तर ते समाजाचे पाठिंब्याने मी केलेलें आहे. त्या समाजाचे आणि माझे दोन दिवस राहिले आहेत तेव्हां त्याला असंतुष्ट करून झालेल्या कार्याचा विध्वंस करणें माझें काम नाहीं. स्मृतिकार पुढे होईल" सर्वांना ही गोष्ट चांगला धडा शिकवील असें मला वाटतें. मी यापासून योग्य धडा शिकलों.

---

## एकनाथ तुकाराम हदगांवकर

[ उमरखेड, जि० यवतमाळ, वऱ्हाड. ]

(१) १९१८ च्या वऱ्हाडांतील दौऱ्यांत पुसदला प्रथम जिल्हा सभेच्या मंडपांत व नतर नदीच्या वाळवटांत लो० टिळकांचीं हजारों प्रेक्षक व श्रोतृसमाजासमोर स्वराज्यावर दोन जाहीर व्याख्यानें झाल्यानतर १–२ वाजण्याच्या सुमारास त्यांना त्यांच्या निवासस्थानीं नेण्यांत आलें. थोडीशी विश्रान्ती घेतल्यानंतर लोकमान्य स्नानास बसले. व आम्ही कांहीं स्वयंसेवक व तरुण मंडळी दर्शनार्थ सर्वांच्या पुढें येऊन आंत जाऊं लागलों. तेव्हां तेथे आमची गर्दी झालेली पाहून तेथील व्यवस्थापक मंडळी आम्हांस बाहेर घालवून दार लोटून घेण्याचा प्रयत्न करूं लागली. त्याच्या त्या इतराजीने आम्हांपैकीं, एक दोन तरुणांस त्यावेळीं मातृभूमीस लोटांगण घालावे लागलेले पाहून लोकमान्य बरेच रागावून पण विनोदानें म्हणाले, " इतक्या पुरतीच का होईना, आपल्या हातात सत्ता आहे म्हणून मलतेंच कांहीं करू नका बरे ! त्याना शांततेनें सांगून पाहा, ऐकत नसतील तर आंत येऊन त्यांना येथें बसूं द्या. मी स्नान करीत असलेला त्यांनीं पाहू नये कीं काय ? अहो, त्यांच्याशींच तर माझें काम आहे. माझें कार्य त्यांच्या वांचून पुढें कोण चालवणार आहे. हीच तर आमची सेना आहे. तिला दूर करून कसें

होईल." व्यवस्थापक व इतर मंडळी, त्यांचे इतके सौजन्य पाहून अर्थातच ओशाळ-ल्यासारखी झाली.

( २ ) याच प्रसंगीं दहापांच तरुणांस पुढें बोलावून त्यांनीं प्रेमानें विचारलें, "कां हो ! मी सांगितलेलें काम तुम्ही सर्वजण कराल कीं नाहीं?" तरुण मंडळींतून एकच 'हो' म्हणून उत्तर आल्यावर त्यांचे नेत्र अभिमानानें व आनंदानें पूरित झाल्याचें दिसत होतें. नंतर हंसून ते म्हणालेः—" तुम्हां तरुणांपैकीं, एकाचें तरी माझ्या सारखें शरीर आहे कां ? मी आतां वृद्ध झालों आहे, पण अजून देखील दोघांस हार जाणार नाहीं ! अशानें तुम्हीं भांडणें कशीं करणार ? दूध, तूप खाऊन कसरत करून शत्रूशीं झगडण्यास मैदानावर तयार असले पाहिजे. माझी व्याख्यानें तुम्हीं ऐकलीं कीं नाहीं ? "

या प्रश्नाचें उत्तर परस्परात कुजबुजण्यापलीकडे एकाच्यानेंहि धैर्यानें देणें झालें नाहीं.

---

## शेट पोपटलाल रामचंद शहा

[ सेक्रेटरी—व्यापारी हितेच्छु मंडळ व नगर कॉंग्रेस कमिटी, पुणें.
अध्यक्ष—महावीर मित्रमंडळ. ]

( १ ) भारत सेवक समाजाचा सेक्रेटरी या नात्यानें एके दिवशीं मी लोक-मान्याकडे गेलों होतों. कारण आमच्या समाजाने 'चंद्रग्रहण' या नावाच्या ऐतिहासिक नाटकाचा प्रयोग करून त्याचें उत्पन्न जालियनवाला बागेच्या स्मारक फंडास देण्याचें ठरविलें होतें. या प्रसंगीं लोकमान्य अध्यक्ष लाभले तर उत्पन्न बरेंचसें होईल असें आमच्या समाजापैकीं प्रत्येकास वाटत होतें. आणि म्हणूनच मी लोकमान्याच्याकडे विनंति करण्यास गेलो होतो. मी म्हणालों 'दादा, आमच्या भारत सेवक समाजानें 'चंद्रग्रहण' नावाचें ऐतिहासिक नाटक करून त्याचें उत्पन्न जालियनवाला बाग—स्मारक फंडास देण्याचे ठरविले आहे. तरी आपण अध्यक्षस्थान स्वीकारावे अशी आमची विनंति आहे.' यावर लोक-मान्य म्हणाले, "कारे, अजून आम्हाला किती त्रास देणार ? तुमच्याचपैकीं कोणी तरी अध्यक्ष करा, तुम्हाला मागें राहून कसें चालेल ? तुम्ही पुढे येऊन आमच्या कार्यास हातभार लावला पाहिजे, खरें ना ? यावर मी म्हणालों, " दादा, खरें, पण आपण अध्यक्ष झालेच पाहिजे. नाटक शिवकालीन ऐतिहासिक असून सद्यः-स्थितीला पोषक असे असल्यामुळें फारच प्रेक्षणीय झालें आहे. आपण 'चंद्र-ग्रहण' पाहाच." यावर लोकमान्य म्हणाले " हिंदुस्थानाला लागलेलें ग्रहण कसें

सुटेल व स्वराज्यसूर्य केव्हां उदयाला येईल याचा रात्रंदिवस विचार करण्या-पलीकडे मला कांहींच सुचत नाहीं. पाहिजे असल्यास माझें नांव इंडबिलमध्यें घाला, माझी हरकत नाहीं. माझ्या नांवानें जर एकाद्या सत्कार्यास मदत होत असेल तर मला न विचारतां देखील माझें नांव खुशाल घालीत जा. माझी त्याला मुळींच हरकत नाहीं. मला कांहीं कामाकरितां बाहेर गांवीं जावयाचें आहे. सबब मला हजर राहावा येत नाहीं. निराश होऊं नका. जेथें आशा आहे तेथें यश हटकून ठेवलेलेंच आहे. "

(२) महावीर मित्रमंडळातर्फे उघडल्या जाणाऱ्या महावीर मोफत वाचनालयाचा समारंभ लोकमान्यांच्या अध्यक्षतेखालीं करावा म्हणून मंडळाचा सेक्रेटरी या नात्यानें मी व इतर मंडळी लोकमान्यांच्याकडे विनंति करण्यास गेलों होतो. त्यांनीं मोठ्या आनंदानें अध्यक्ष होण्याचें कबूल केलें. नंतर सहा-जिकच महावीर या शब्दावरून जैन धर्मासंबधीं चर्चा निघाली. तेव्हां मी म्हणालो, 'दादा, आपलें जैन धर्मासंबधीं काय मत आहे ?' त्यावर त्यांनीं आठवण केल्यासारखें करून म्हटले, " बडोद्यास जैन श्वेतांबर कॉन्फरन्सची बैठक भरली होती. श्रीमंत सयाजीराव महाराज हजर होते. त्यावेळीं जैन समाजापुढें माझें तेथे जाहीर व्याख्यान झालें. त्यावेळीं मी सदर प्रश्नाचा उहा-पोह केला होता. वास्तविक जैनधर्म हा स्वतंत्र धर्म असून बुद्धधर्माचा त्याच्याशीं अर्थाअर्थी कांहीं संबध नाहीं. जैनधर्म ही बुद्धधर्माची शाखा आहे असा उल्लेख शाळेंतील क्रमिक पुस्तकांत आढळतो. तो अगदींच चुकीचा आहे. ऐतिहासिक दृष्टीनें हें सिद्ध झालें आहे कीं, जैनधर्म बुद्धापूर्वी होता. तेव्हां जैनांच्या प्राचीन-त्वाबद्दल शंका घेणे चुकीचें आहे. दुसरी गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, वैदिक हिंसा ज्यावेळीं हिंदुस्थानांत विशेष प्रचलित होती त्यावेळीं जैन आणि बुद्ध या दोन्ही धर्मांचा विशेष प्रचार झाला. आम्ही जर आज खरोखर अहिंसक बनलों असू तर त्याचे सर्व श्रेय जैन आणि बुद्धधर्माकडे आहे. अहिंसा धर्म आम्हांला जैनांनींच शिकविला. "

(३) एका गांवांत दुर्व्यसनी म्हणून ठरलेल्या एका नवीन वकिलाला लोक-मान्यांनीं हातीं धरला. वकील जातीचा हुषार आणि सार्वजनिक कामांत मोठ्या कळकळीनें पडणारा असा होता. कांहीं गांवगुंडांनीं लोकमान्यांकडे अशी तक्रार केली कीं, 'ज्या माणसाला शील नाहीं, तो मनुष्य नुस्ता विद्वान आहे म्हणून तुम्ही त्याला पुढे कां आणतां ?' लोकमान्य म्हणाले, "एक गोष्ट मी तुम्हांस सांगतों ती हीच कीं, कोणीहि पहिल्यानें बाजीराव होऊन दाखवावें व नंतर खुशाल मस्तानी ठेवावी. त्याला माझी हरकत नाहीं. " हे उद्गार ऐकून चहाडखोर गुंड लोक जागच्याजागीं थिजले व लोकमान्यांची क्षमा मागून त्यांचा निरोप घेतला.

---

## विनायक विष्णु रानडे.

[ बी. ए. एल्. एल्. बी., प्रसिद्ध कॉन्ट्रॅक्टर, पुणें. ]

( १ ) सन १८९५ च्या मे महिन्यांत डेक्कन कॉलेजांतील जुन्यानव्या विद्यार्थ्यांचें गॅदरिंग भरल्यावेळीं सकाळचे कार्यक्रमापैकीं कॉलेजचे मागले बाजूस मुळानदीवर पोहोण्यास जाणें ही एक बाब असे. गॅदरिंग मे महिन्यांत त्यावेळीं भरत असल्यानें बहुतेक जुने विद्यार्थी जमत असत. कारण चालू विद्यार्थी उन्हाळ्याचे सुट्टीनिमित्त आपआपल्या गांवीं जात. जी १०।१५ मंडळी पोहण्यास जावयास निघाली त्यांत बळवंतरावजी अग्रगण्य होते असें म्हणावें लागतें. कारण त्या दिवशीं ते व मी असे दोघेच पोहोण्याचे जागेपासून सुमारें ५ फर्लांग होळकर ब्रिज लांब आहे तेथपावेतों पोहत जाऊन पुलाचे मच्छास हात लावून न दमतां जेथून पोहण्यास निघालो त्या जागेवर परत येऊन पोहोंचलो व त्यावेळीं ते मुळींच दमलेले अगर थकलेले दिसले नव्हते. ह्यावेळीं त्यांचें वय सुमारें चाळीशीच्या आंत बाहेर होतें. ते कॉलेजांत असतांना पोहणें हा त्यांच्या आवडत्या व्यायामापैकीं एक होता, ह्याची साक्ष वरील गोष्टीवरून सहज पटणारी आहे.

( २ ) १९०१ सालात अगर त्या सुमारास जी कलकत्यास कॉंग्रेस भरली त्या कॉंग्रेसला जातांना ज्या गाडीनें प्रवास केला त्याच गाडीनें नागपूरपासून कलकत्यास पोहोंचेपावेतों मीहि त्यांचें बरोबर होतों. व त्यावेळीं दूरदूरचे प्रांतांतील लहान मोठ्या सर्व स्टेशनवर जेथें जेथें गाडी उभी राहात असे तेथें तेथें त्याचे स्वागत करण्याकरितां तेथील लोक किती उत्सुक असत व एक वेळ त्यांचें दर्शन व्हावें म्हणून तासनतास थंडी-उन्हास न जुमानतां त्याच्या येण्याची मार्गप्रतिक्षा करीत हें पाहून आम्हा महाराष्ट्रीयांस मोठें कौतुकच वाटत असे. कॉंग्रेसची बैठक नेहमीप्रमाणें संपल्यावर बळवंतरावजींस स्वामी विवेकानंद याचे मठास त्याचे निमंत्रणावरून भेट द्यावी लागली. त्यावेळची ती भेट म्हणजे एखाद्या देशकार्यास निघालेल्या देशभक्तास त्याच्या सांप्रदायिक गुरूनीं आशीर्वाद देऊन चार दोन महत्त्वाच्या उपदेशाच्या गोष्टी सांगावयाकरितांच कीं काय, परस्परांची भेट घडवून आणिल्या सारखीच होती. बळवंतरावजी व त्यांचे बरोबर आम्ही १०।१२ दक्षिणी मंडळी अशी गंगेचे पालातून नौकेनें सुमारे १-१॥ मैल गेल्यावर गंगापार होऊन गंगेचे कांठींच असलेल्या त्या शांत आश्रमास जाण्याकरितां कांठावर नौकेंतून उतरलों. त्यावेळीं बळवंतरावजींचें स्वागत करण्याकरितां खुद्द स्वामीजींनीं नौकेंतून उतरून घेण्याकरितां त्यांना हात दिला व कांठावर ते पोहोंचल्यावर त्यांनीं कडकडून प्रेमालिंगन देऊन प्रेमाश्रूनीं एकमेकांस स्नान घातलें! त्यावेळचा तो देखावा म्हणजे महाराष्ट्राची व बंगालची अंतःकरणमय सप्रेम भेट मूर्तिमत

(२६) सातारचे कै० राजे श्रीमत आबासाहेब महाराज यांस विंचूरकर वाड्यांत लोकमान्यांनीं पानसुपारी केली. त्या समारंभाच्या गडबडींत श्रीमंतांच्या एका हुजऱ्यानें सर्वांचा डोळा चुकवून एक चांदीची वाटी मोठ्या चपळाईनें गुपचुप खिशात टाकली. तेथील सर्व लोकांत एकट्या लोकमान्यांचे नजरेस हें कसें आलें न कळे. स्वारी तेथून हलणार इतक्यांत ते हुजऱ्याजवळ गेले व हसत विनोदानें त्यास म्हणाले, " तुमच्या यजमानांच्या–सरकारस्वारींच्या–छत्रपतींच्या हक्कावरो-बरच तुमचाहि हा हक्क आतां गेला आहे ! उगाच खिसा जड करून कां घेतां ? " हे ऐकतांच चपापून त्या हुजऱ्यानें खिशांतून वाटी काढून परत दिली !

(२७) सन १८९१ मधील पुण्यांतील चहाबिस्कुट प्रकरणामुळें लोकमान्यांच्या घरची नित्यनैमित्तिक धार्मिक कृत्यें वैदिक ब्राह्मण कांहीं दिवस करीत नसत. अशा मुदतींत श्रावणीचे दिवस आले. लोकमान्यांचे भाचे बाबासाहेब विद्वांस यांस मोठी पंचाईत पडली. अजीबात श्रावणी न करणें, ही कल्पना बाबासाहेब यांस पटेना. व करावी तर उपाध्ये–ब्राह्मण मडळी येईनात. तेव्हां काय करावें या सकटांत ते पडले असता, लोकमान्य त्यांस म्हणाले, " अरे, यांत काळजी करण्यासारखें काय आहे ! नेहमींप्रमाणें श्रावणीची सर्व तयारी कर. श्रावणी चाल-विण्यास बाळभटच येणार आहेत. " हे बाळंभट कोण याची बाबासाहेब यांस कल्पना होईना. कारण सर्व भिक्षुक मडळींतून फुटून राजरोस येणारे असे हे धैर्यवान् बाळंभट कोण ? याचा ते विचार करूं लागले. तेव्हां लोकमान्य म्हणाले, " असा पाहातोस काय ? बघ, उद्यां अगदीं तुझ्या नेमलेल्या वेळेवर पळी पंचपाली घेऊन, बाळंभट येथें हजर आहेत. तूं आपली सर्व तयारी कर म्हणजे झालें. " व त्याप्रमाणें दुसरे दिवशीं ठराविक वेळीं एका हातांत दर्भ, व दुसरें हातांत पळी पंचपात्री घेऊन आंवून 'बाळभट' ( लोकमान्य ) तेथें आले; व पोथीच्या सहायानें या स्वावलंबी आणि करारी बाळभटजींनीं सर्व श्रावणी यथा-सांग पार पाडली !

( २८ ) सदर बहिष्कृत मुदतींतच एकदां लोकमान्यांच्या वडिलांची कां मातोश्रींची श्राद्धतिथी आली. त्यावेळींहि त्यानीं अजीबात् श्राद्ध न करण्याचें मनात न आणता, भोजनास येण्यास तयार असलेल्या एका सामान्य ब्राह्मणास खरी वस्तुस्थिति स्पष्ट सांगून व दुसऱ्या ब्राह्मणाबद्दल देवाचें पंचायतन ठेऊन पोथीवरून त्यांनीं स्वतः चटावर श्राद्ध केलें !

( २९ ) लोकमान्यांचे बालस्नेही रा० ब० अण्णासाहेब देशपांडे पे० डु० डे० कलेक्टर यांजकडे मी पुन्हां गेलों असतां त्यांनीं सांगितलेल्या कांहीं आठव-णींपैकीं फक्त दोन पुढें देत आहें. ते म्हणाले:–( १ ) " सरकारी ऑफिसांतून महत्त्वाच्या गुप्त बातम्या बळवंतरावास कशा मिळत याचें आम्हांस अजूनहि आश्चर्य वाटतें. एकदां एक राजकीय गुप्त सरक्युलर सरकारनें काढलें होतें. तें

निघाले आहे असें त्यांस कळलें होतें; पण प्रत्यक्ष तें त्यांस मिळणें अशक्य होतें. पण पुढें पाहावें तों एके दिवशीं त्यांतील विधानाबद्दल ते जोरजोरानें बोलू लागले. त्यावेळीं आम्ही पुणे येथे सिटी मॅजिस्ट्रेट असून बळवंतराव व मी एकाच वाड्यात म्हणजे सरदार विंचूरकरांचे वाड्यांत राहात होतों. व टिळकांशीं आमचा स्नेह असल्याचें सरकारास पूर्ण माहीत असल्यामुळें सदर सरक्युलरांतील गुप्त मजकूर त्यांस आम्हीच कळविला अशी सरकारास जबरदस्त शंका आली. पण बळवंतरावांचा स्वभाव व त्यांचें शील सरकारास कसें कळणार ? मी त्यांचा इतका जिवलग स्नेही ना, पण त्यांनीं होऊन मला सरकारी बातमीविषयीं कधीं चुकूनहि कांहीं विचारिलेलें नाहीं, व कधीं स्नेहीपणाचा भलतांच फायदा घेतला नाहीं! पण हे कोणास खरेंहि वाटणार नाहीं. असो; सदर सरक्युलर त्यांस प्रत्यक्ष न मिळतां नुसत्या अनुमानधबक्यानेंच स्वारी बोलत आहे असें मला वाटलें. सरक्युलर मुळीं निघालेंच नाहीं, असें क्षणभर त्यांस मी मुद्दाम म्हणतांच, त्यांनीं त्या सर्क्युलरची कॉपी आपल्या कपाटांतून काढून माझे हातांत ठेवली, तेव्हां मी अगदीं गार झालों!" (२) एकदां न्यायमूर्ति माधवरावजी रानडे यांस भेटण्यास मी त्यांचे घरीं गेलों होतों. त्यावेळीं रावबहादुर जठार हे तेथें होते. मला पाहातांच कपाळास आठ्या घालून ते माधवरावजीस म्हणाले, 'कालच्या केसरींत बळवंतरावांनीं तुम्हांस खूप शिव्या दिल्या आहेत.' त्यावर रावसाहेब म्हणाले, "बळवंतरावांच्या मनगटांत सामर्थ्य आहे, म्हणूनच ते तसे लिहितात. सरकारशीं आम्ही कारणापेक्षांहि जास्त संबंध ठेवतो हा खरोखर आमचाच कमकुवतपणा आहे; व याचाच त्याना फार राग येतो. तो मनुष्य मर्द आहे. त्यांस हें स्वाभाविकच आवडत नाहीं. तेव्हां त्यानें त्याबद्दल आम्हांस नांवें ठेविल्यास, नव्हे मनापासून शिव्या दिल्यास तें त्यांस शोभण्यासारखेंच आहे. अहो, दुसरा तरी असा मर्द व निर्भिड मनुष्य आपणांत कोण आहे ?"

(३०) १९०८ सालीं लोकमान्यांस मुंबई येथें सरदारगृहांत पकडून, पोलीस कचेरींत नेण्याकरितां सरदारगृहाचें खालीं पोलीसनें गाडी बोलावून आणली व त्यांतून त्यांस घेऊन गेले. त्यावेळीं तेथें जवळ असलेले विजापूरचे रा० रामचंद्र केशव भिडे यांचे सांगण्यांत पुढील गोष्ट आली. ते म्हणाले, "त्यावेळीं तो गाडीवाला बोलला, 'अशा प्रसंगीं टिळकमहाराज माझ्या गाडींत बसणार हें गेल्या जन्मींचें माझें पुण्य कीं पाप ? त्यांना गाडींत घालून, सरकारच्या हवालीं करण्याचें माझ्या नशिबीं आलें खरें!' असें म्हणून तो व जवळची मंडळी गहिंवरून आली!"

(३१) श्री० नारायणराव कृष्ण देशपांडे तडवळेकर म्हणाले, "लोकमान्यांचा वाटेल त्यानें वाटेल तसा फायदा करून घेतलेला आहे. जो कायद्याचा सल्ला वकीलास पैसे देऊन सहज मिळावयाचा, तो कित्येकांनीं लोकमान्यांकडून

फुकट घेतलेला आहे. इतकेंच नव्हे तर, उलट त्यांचे घरीं जाऊन वर पाहुणचाराची दक्षिणाहि त्यांनीं घेतलेली आहे. एकदा सोलापूर जिल्ह्यांतील एक गृहस्थ लोकमान्य सिंहगडास असतां कायद्याचा सल्ला घेण्याकरिता तेथें गेले होते. त्याचा व लोकमान्याचा वस्तुतः कांहींहि संबंध—ओळखपाळखहि—नसता, ते त्याजकडेच उतरले. ते दिवाळीचे दिवस होते. सदर गृहस्थास लोकमान्यांनीं कायद्याचा बहुमोल सल्ला तर दिलाच, पण उलट त्यांनीं त्यास तेथें राहून घेऊन घरच्या माणसाप्रमाणें त्यांचें अभ्यंग स्नान, फराळ, भोजन, खेळ, वगैरेंनीं आदरातिथ्य केल्याचें सदर गृहस्थ स्वतः आम्हांस सांगत होते !"

( ३२ ) रा० ब० शंकर केशव साठे पे० डे० कलेक्टर पुणें, यांच्याशीं बोलण्याचा योग आला असतां ते म्हणाले, "न्यू इं० स्कूलच्या अगदीं पहिल्या अमदानींत प्रथम कांहीं काळ मी एक शिक्षक होतों. टिळक वगैरे मंडळींनीं नुकत्याच काढलेल्या फ० कॉलेजांतील ज्या प्रोफेसरांस एम्० ए० ची पदवी असेल तो अधिक विद्वान् व श्रेष्ठ असे कांहीं जणांस वाटूं लागलें. म्हणून टिळकांनींहि एम्० ए० च्या अभ्यासास सुरवात केली. त्याचे जोडीदार ढेकणे—हे पर्वापर्यंत ग्वाल्हेरचे सुभे होते—हे कांहीं विषयात फार मागें असल्यामुळे, त्यांस टिळकांनीं शिकवून त्या त्या विषयांत तयार केले. पण परिक्षेचे पेपर लिहिण्याच्या टिळकांच्या विलक्षण पद्धतीमुळें अखेर परीक्षेंत विद्यार्थी ढेकणे पास व गुरूजी टिळक नापास झाले ! तेव्हांपासून 'परीक्षा ती परीक्षा, त्यांत अखेर साधेल तोच व्यवहारचतुर' असेंच टिळक म्हणत."

( ३३ ) दिवाणबहादुर गोडबोले यांचे बोलण्यांत लोकमान्यांविषयीं कांहीं गोष्टी आल्या. त्यापैकीं येथें फक्त एकच देत आहें. ते म्हणाले, "आमच्या कामानिमित्त मी पुणें जिल्ह्यांत हिंडत असता घोडे गांवीं एकदा आमचा मुक्काम पडला. गांवकरी लोकांशीं बोलत असतां, त्या खेडवळ लोकांनीं टिळकांनीं स्वराज्यावर दिलेल्या व्याख्यानाची हकीगत मला सांगितली. ती ऐकून अशा लोकाची टिळकांनीं एवढ्या प्रचंड विषयाची अगदीं थोडक्यांत इतक्या उत्कृष्ट रीतीनें समजूत तरी कशी घातली याचें मला आश्चर्य वाटलें. लोकांचीहि त्यांच्याविषयींची विलक्षण श्रद्धा मला पाहावयास मिळाली. त्या लोकापैकीं कोणी म्हणाले, 'कुठल्याशा त्या ब्रह्मदेवाच्या देशांतून ( बर्मा ) आपल्या देशास येण्याची टिळकमहाराजांना इच्छा होतांच तुरुंगाचे कुलूप एकदम खाडकन् खालीं गळून पडलें व मग टिळकमहाराज इकडे आपल्या देशांत आले !"

( ३४ ) लोकमान्य कर्मठ नसले व ते कितीहि तार्किक, बुद्धिवादी व केवळ प्रयत्नवादीच असले तरी त्यांचें मन व अंतःकरण श्रद्धाविहीन होतें, असें म्हणणें अयुक्त होईल. यास पुरावा म्हणून पुणें येथील प्रसिद्ध 'लोहदेही'

भाऊसाहेब गोखले यांच्या सांगण्यांत आलेल्या किती तरी गोष्टी देतां येतील. पण त्या सर्व एकाच स्वरूपाच्या म्हणून त्यांचा संक्षेप करून त्यांपैकीं फक्त एक-दोनच येथें देतों. ( १ ) सन १८९६।९७ सालीं पुण्यांत प्लेगचा कहर उडाला. लोकमान्य प्रयत्नवादी तर खरेच; त्याप्रमाणें त्यांनीं सदर बाबतींत लौकिक अशा अनेक आधुनिक मार्गांचा अवलंब केला. पण त्याबरोबरच, भाऊसाहेब म्हणतात, " त्या परोपकारी व दयेनें थबथबलेल्या अंतःकरणाच्या पुरुषानें दैविक उपाय योजण्यासहि कमी केलें नाहीं. त्यांनीं मला एकदां एका बाजूस घेऊन सांगितलें कीं, 'या आधिदैविक संकटाच्या निवारणार्थ ग्रामदेवता श्रीजोगेश्वरीलाहि मला अभिषेक करणें आहे. त्याची सर्व व्यवस्था तुम्ही करा. व लागेल तो खर्च मागून घ्या. " ( २ ) तसेच १९०८ सालीं लोकमान्यास मुंबईस पकडल्यावर, भाऊसाहेब म्हणाले, " आम्ही सर्व हतबल झालों. यावेळीं आम्ही काय करावें, असें लोकमान्यास विचारले असतां तशा त्या विकट स्थितींतूनहि येथील मंडळींस त्यांचें पत्र आले कीं, ' मी चालविलेला मार्ग पुढें चालू ठेवा; त्यांत चूक होऊं देऊं नका; व सर्वांस सद्बुद्धि देण्याबद्दल श्रीओंकारेश्वरास रुद्राभिषेक करा.' त्याप्रमाणें लोकमान्यास शिक्षा होईपर्यंत आम्ही श्रीओंकारेश्वरास अखंड रुद्राभिषेक चालवून श्रींचा तीर्थप्रसाद व अंगारा रोजच्या रोज मेलगाडीनें रा० कृष्णाजी मोरेश्वर फाटक वकील, मुंबईस घेऊन जात. व लोकमान्य त्याचा भक्तिपूर्वक स्वीकार करीत. "

( ३५ ) व्यंकटेश बापूजी केतकर या लोकमान्यांच्या प्रसिद्ध ज्योतिषी स्नेह्या कडे आठवणीकरितां मी गेलों असता त्यांनीं मोठ्या सहानुभूतीनें माझेशीं बहुत वेळ संभाषण केलें ! व लोकमान्यांच्या थोर गुणाविषयीं बारीकसारीक अशा कांहीं गोष्टी सांगितल्या. पैकीं एकच येथें देतो. केतकर म्हणाले, " आमच्या घरीं आमच्या नातवाचें लग्न होतें. त्याची छापील आमंत्रणपत्रिका अनेक लोकांस पाठविण्यात आली; त्यांत एक सहज बळवंतरावजींसहि पाठविली गेली. आमंत्रणपत्रिका पाठविल्या दिवसापासून लग्नदिवस बराच दूर होता. पण सदर दिवस त्यांनीं नेमका लक्षांत ठेवून व लग्नघर—ज्याह्यांचे घर—ठाऊक नसतांहि शोध करीत करीत घर धुंडीत अखेर स्वारी पानसुपारीस येण्यास चुकली नाहीं !"

( ३६ ) लोकमान्याचे बालमित्र रावसाहेब श्रीधर बाळकृष्ण उपासनी यांचा व लोकमान्यांचा विशिष्ट प्रकारचा स्नेहसंबंध असल्यामुळें व तो शेवटपर्यंत तसाच टिकल्यामुळें त्यांजकडून आठवणी मिळविण्याबद्दल गेलीं दोन वर्षें मीं आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली. परंतु प्रत्यक्ष त्यांचे हातून मजकूर लिहून मिळणें आतां अशक्य आहे असें दिसून आल्यानंतर त्यांच्या सहज बोलण्यात आलेल्या कांहीं किरकोळ गोष्टींवरच आता निरुपायास्तव समाधान मानून घेणें भाग आहे. ते म्हणाले, " बौद्धिक गुणांत बळवंतराव आमच्या सर्वांत फार श्रेष्ठ होते. कांहीं

मित्रमंडळी त्यांस 'हा कठोर' आहे असें म्हणत, पण ज्यांस त्याचा पुरा स्वभाव माहीत झाला होता, त्यांस ते फणसासारखे आहेत असेंच शेवटीं वाटे. त्यांची अभ्यासाची रीत अगदीं वेगळी असे. कोणत्याहि विषयाच्या अगदीं खोल मुळांत जाऊन ते त्याचा विचार करीत. १९०८ सालच्या खटल्यांत काय, किंवा वेळोवेळीं उत्पन्न झालेल्या कायद्याच्या प्रश्नांत काय, त्यांचे जे ज्ञान व तेज दिसून आलें त्याचा उगम एल्एल्. बी.चा अभ्यास करण्याच्या वेळेपासूनच झालेला होता. समर्थ व शिवाजी ह्या जशा दोन स्वतंत्र शक्ती अगर स्फूर्ती राष्ट्रांत एकाच वेळीं निर्माण झाल्या, तद्वत् चिपळुणकर व टिळक होत असें मी व माझी मित्र-मंडळी नेहमीं म्हणत असे. बळवंतरावांच्या मनाची उत्क्रांति कसकशी होत गेली हा तरुणांना मोठा अभ्यास करण्यासारखा विषय आहे पण यास मुख्य कारण त्यांचे भगवद्गीतेचें चिंतन होय अशी माझी खात्री झाली आहे. सरकार-संबंधीं त्यांनीं कडक भाषणें केलीं म्हणजे मी त्यांस म्हणावें, हे असें पचणार कसें ? तेव्हां ते म्हणत ' हें आमचें उटाचें पिलू आंत एकदां शिरकलें आहे, यांतच आतां आमचा मोक्षमोक्ष-अंत व्हावयाचा ! ' मंडालेहून सुटून आल्यावर मी त्यांस एकदां कळकळून म्हणालों ' बळवंतराव, आतां हें बस्स झालें बुवा ! राजकारणच सोडून द्या. आम्ही नाहीं कां पेन्शन घेतलें ! तसेंच आतां तुम्हीहि करा. ' तेव्हां ते म्हणाले, " सोडणें, धरणें आणि चालू ठेवणें ह्या क्रियांत मला आतां कांहीं अंतरच कळत नाहीं. कर्म करितां करितां मरण येणें एवढेंच मला आतां कळतें. व हीच स्वर्गप्राप्ती आहे, होय कीं नाहीं ? "

( ३७ ) जुन्नरचे रा० रामचंद्र मार्तंड खत्री यांनीं लोकमान्यांच्या बारीक सारीक अशा बऱ्याच आठवणी मला सांगितल्या. त्यांपैकीं कांहींचा पुढें निर्देश करतों. ते म्हणाले, (१) " जुन्नरास लोकमान्यांस आणण्याबद्दल गांवकऱ्यांची किती तरी दिवसांपासूनची इच्छा होती. अखेर १९०४ सालीं प्रथम हा योग जुळून आला. त्यावेळीं त्यांचें तेथें अपूर्व स्वागत झालें. मिरवणूक चालू असतां एका खिडकींतून मामलेदार साहेबांनीं मुद्दाम बोडक्यानें आपल्या सरकारी गुरमीच्या ऐटींत लोकमान्यांस नुसती मान हालवून ताठ्यानें नमस्कार केला. पण लोकमान्यांनीं त्यांस अशा विलक्षण रीतीनें उलट नमस्कार केला व त्यांज-कडे पाहून हास्य केलें कीं, त्याचा विलक्षण परिणाम मामलेदार साहेबांवर होऊन अखेर ते त्यांस तेथें एकांतीं भेटावयास येऊन ' मिरवणूकींत मी आपला उपमर्द केला' असें म्हणून त्यांनीं दिलगिरी प्रदर्शित केली ! " (२) मामलेदारसाहेब परत गेल्यावर जवळच्या मंडळीजवळ लोकमान्य म्हणाले, ' मला जुन्नरहून एका एल्एल्. बी.चें पत्र आलें होतें कीं, तुम्ही येथें येऊं नका, तुमचा मान राहा-णार नाहीं. हा सर्व पोरासोरांचा उद्योग आहे. ' हें वाचून तर जुन्नरास जरूर जावयाचें असें मीं ठरविलें. आणि त्याप्रमाणें येथें येतांच मधाशीं सदर एल्एल्.

श्री. नें त्याबद्दल माझेकडे क्षमेचें पत्र पाठविलें. पण मला हीं दोन्ही सारखींच आहेत. (३) मिरवणूक शेट रामलाल खत्री यांचे दारापुढें आली असतां त्या व्यापाऱ्यानें लोकमान्यांवर खरीं मोतीं व पोवळीं उधळलीं. तो देखावा काय वर्णन करावा! (४) मिरवणूक जरा पुढें जातांच एक वृद्ध मुसलमान गृहस्थ आपल्या डोळ्यांतील आनंदाश्रु पुसीत पुसीत पुढें आले आणि 'जैसा तुमारा नाम सुना ऐसाहि तुमकु देखके मेरेकु बहोत बहोत आनंद हुवा' असें लोकमान्यांस म्हणून गर्दीत भर रस्त्यावर त्यांनीं गुडघे टेकून लोकमान्यांस कुर्निसाद केला! (५) लोकमान्य जेथे उतरले होते तेथून गर्दीतून कोणी त्यांचा जोडा चोरून नेला. पण नेहमींच्या नीच चोरीप्रमाणें ही चोरी केली गेली नसून पूजेकरितां आपण त्यांच्या ह्या पादुका चोरून आणिल्या आहेत व त्याबद्दल अडीच रुपये आपण त्या ओटीवरील कोनाड्यांत पुडी करून ठेविले आहेत असें दुसरे दिवशीं टपालानें आलेलें पत्र लोकमान्यांचे हातांत देण्यांत आलें! (६) सदर मुक्कामांत लोकमान्य शिवनेरी किल्ला पाहाण्यास गेले होते. गड चढतां चढतां वाटेंत जरा थांबून मागें वळून बरोबर असलेले मार्तंडराव खत्री यांस लोकमान्य म्हणतात, 'काहो! महिनापंधरा दिवस लढविण्यासारखा हा किल्ला आहे, नाहीं? पण आपल्या हयातींत आतां असले दिवस कसले येतात!' (७) यानंतर १९१७ सालच्या जिल्हासभेच्या अधिवेशनाकरतां लोकमान्य जुन्नरास आले होते. त्यावेळीं तेथील त्यांचे जुने व वृद्ध मित्र मार्तंडराव खत्री यांजकडे उतरण्याचें प्रथम त्यांनीं ठरविलें होतें; पण मधल्यामध्यें टिळकभक्त रघुनाथराव जोशी व सावकार जोगळेकर यांनीं त्यांस आपल्या वाड्यांत नेलें. हें पाहून मार्तंडराव यांस वाईट वाटलें; व न जाणो ते व लोकमान्य समवयस्क असल्यामुळें त्यांस मार्तंडराव कदाचित् आपले घरीं घेऊन जातील म्हणून वाड्याच्या त्या टिळकभक्त मालकांनीं वाड्याचे पुढील दरवाज्यास मलें मोठें कुलुपहि लावून टाकलें! हें सर्व प्रकरण लोकमान्यांचे कानावर गेलें तेव्हां ते म्हणाले, 'मी कॉम्प्रमाईजवाला आहे. म्हणून आतां असें करतों कीं, मार्तंडरावांचे घरीं जेवावें व या वाड्यांत निजावें, मग तर झालें ना!'

(३८) लोकमान्यांचें टाईपरायटिंगचें काम रा० दत्तात्रय वामन भाटवडेकर करीत असत. भाटवडेकर म्हणाले, "चिरोल केसचे बाबतींत लोकमान्यांचें मी टाइपरायटिंगचें पुष्कळच काम केलें, त्यावेळीं ते फर्ग्युसन कॉलेजकडे लिमये यांच्या बंगल्यांत राहात होते. तेथें ज्या ठिकाणीं टाईपरायटरचें यंत्र ठेविलें होतें, तेथें यंत्रावर चांगला प्रकाश पडेना; यामुळें काम भराभर होण्यास जरा पंचाईत पडे. पण ही गोष्ट लोकमान्यांचे लक्षांत कशी आली असावी याचें मला अजूनहि आश्चर्य वाटतें. कारण ते एकीकडे तोंडानें मजकूर सांगण्यांत गुंतले असतांहि हातानें तेथेंच दुसऱ्या खिडकीजवळ मोठमोठीं जड

खोर्का एकमेकांवर ठेवण्याचा उद्योग करीत होते. तें काम यथास्थित झाल्यावर ते मला म्हणाले, 'त्या ठिकाणीं प्रकाश उलटा पडत आहे. त्यामुळें यंत्राची अक्षरें चकाकतात व तुमचें काम झपझप होत नाहीं. आपले येथे या बगल्यांत तर दुसरें टेबल नाहीं. तेव्हां तुमचें यंत्र या मी बनविलेल्या टेबलावर ठेवा म्हणजे काम सुरळीत चालेल!' हें ऐकून मी चकीत झालों इतक्या बारीक गोष्टी यांच्या लक्षांत आल्या कशा व सर्व अवधान ठेवून हें यांनीं केलें कसें याचें मला अजूनहि नवल वाटत आहे. (२) लोकमान्यांच्या विलक्षण स्मरणशक्तीच्या अनेक गोष्टींचा मला त्यावेळीं अनुभव आला. टाईपरायटिंगचे करितां ते तोंडानें मजकूर सांगत असतां, जवळ नसतांहि शेकडों पुस्तकांतील व मराठा वगैरे पत्रांतील महत्त्वाचे उल्लेख ते भराभर सांगत; व पाठीमागून म्हणत कीं, भट ( विष्णुपंत भट, त्यावेळचे मराठ्याचे एडिटर ) येथें आल्यावर त्यास हे उल्लेख बरोबर असल्याबद्दल पाहण्यास सांगा. व चमत्कार असा होई कीं, भटांनीं तीं तीं पुस्तकें व फायली काढून पाहाव्या तों त्यांत नेमके उल्लेख असलेले आढळून येई! (३) सदहू बगल्यांत दोन प्रहरीं टाईपरायटिंग करिता मी गेलों असतां लोकमान्यास झोंप लागली होती. त्यांजकडे पाहून 'या शरीरास जरा विश्रांति मिळू दे' असें म्हणून मी अगदीं हलक्या पावलानें तेथून दुसरीकडे गेलों. पुढें कांहीं वेळानें ते जागे झाल्यावर मी त्यांजकडे येऊन गेलों हें त्यांस कळल्यावरून, मी त्यांजकडे पुन्हा जातांच ते म्हणाले, 'अहो, अज्ञानाची बहीण झोंप हिच्या संगतींत तुम्ही मला टाकून जावें हें तुम्हीं मोठें पाप केलेंत! पाय न वाजविता चोरासारखे मजकडे तुम्ही कां आलांत? दरवडेखोराप्रमाणें तुम्ही यावयास पाहिजे होतें!!' (४) लोकमान्यांस कोणती गोष्ट व तीहि पूर्णत्वानें माहीत नव्हती असें म्हणणे कठीण आहे. यःकश्चित् टाईपरायटिंग यंत्र व त्यावरील काम ना, पण त्यांना या बाबतींतील सर्व कांहीं मर्म माहीत होतें; इतकेंच नव्हे तर, पधरा पंधरा वर्षे हा एकच धदा करणाऱ्या आम्हांस त्यांनीं या बाबतींत आमच्या लक्षांत पूर्वी न आलेल्या अशा किती तरी उपयुक्त व नवीन कल्पना सुचविल्या!"

(३९) नागपूरचे श्रीयुत धुंडिराजपंत ठेंगडी इंजीनियर हे राष्ट्रीय पक्षाचे कट्टे अभिमानी असल्याचें मला माहीत असल्यामुळें मी त्यांजकडे लोकमान्यांच्या आठवणी मागण्यास गेलो होतों. तेव्हा ते म्हणाले "जन्मभर माझ्या लक्षांत राहील अशी फक्त टिळकांची एकच आठवण मला माहीत आहे. कारण तिचा माझ्या मनावर विलक्षण परिणाम झाला असून माझ्या राष्ट्रीय विचारसरणीस त्यामुळे निराळें वळण लागलेलें आहे. १९०५ सालची ती गोष्ट असावी. देशात स्वदेशी चळवळीस नुकताच प्रारंभ झालेला होता. व बळवंतरावजींनीं तिचा विलक्षण रीतीनें पुरस्कार चालविला होता. मी युरोप वगैरे देशातून आऊन

असल्यामुळें व आमचें अर्थशास्त्राचें ज्ञान केवळ पुस्तकी विद्येपलीकडे न गेलें असल्यामुळें, मला देशांतील या ' स्वदेशी ' चा अर्थच कळत नसे. अर्थशास्त्राच्या दृष्टीनें मला ' स्वदेशी ' हा विषय अखेर जगतांतील मानवजातीच्या अपकर्षास कारणीभूत होणारा आहे असेंच वाटे. म्हणून मी एकदां लोकमान्यांकडे गेलों व त्यांस खसखशीत विचारिलें कीं, ' या चळवळीनें आपण मानवजातीच्या उत्कर्षास विघ्न आणीत आहांत. खुल्या व्यापाराचें तत्त्व आपणांस मान्य असूं नये हा चमत्कार आहे ! कोणत्या दृष्टीनें आपण ' स्वदेशीस ' उचलून धरतां ? ' हें ऐकून लोकमान्य हंसले. व माझी समजूत घालण्याच्या हेतूनें गंभीर मुद्रेनें व शांतपणें म्हणाले ' हो, तुम्ही म्हणतां तें अगदीं बरोबर आहे. सर्व मानवजातीच्या दृष्टीनें विचार कराल तेव्हां तुमचेंच म्हणणें खरें आहे. पण आज प्रथम आपणास आपल्या देशापुरताच विचार करावयाचा आहेना ? शरीराच्या एकाद्या अवयवां-तून रक्तस्राव होत असल्यास, बाकीच्या सर्व अवयवांकडे दुर्लक्ष करून प्रथम लक्ष याच अवयवाकडे द्यावें लागतें. हें तुम्हांस कबूल आहे ना ? त्याचप्रमाणें सरकारनें नामशेष केलेल्या व धुळीस मिळविलेल्या आपल्या देशांतील उद्योग-धंद्यांचें प्रथम संरक्षण करून, त्यांस उत्तेजन देऊन, नतर त्यांची भरभराट झाल्या-वर मग तुम्ही म्हणतां त्या तत्त्वज्ञानास प्रारंभ होतो. एरवीं हा वेदान्त खोटा आहे. व म्हणूनच स्वदेशी चळवळ केल्याखेरीज गत्यंतर नाहीं. ' लोकमान्यांच्या या उपदेशानें माझी पूर्ण समजूत पटली व तेव्हांपासून शरीरानें व मनानें मी पूर्ण ' स्वदेशी ' बनलों ! " ( २ ) " १९०७ सालीं सरदारगृहांत लोकमान्यांस पकडण्यांत आलें त्यावेळीं मी ( ठेंगडी ) तेथेंच होतों. जिना उतरून पोलिसांच्या गाडींत बसण्याकरितां लोकमान्य खालीं जाऊं लागले तेव्हां समोंवतालच्या सर्व लोकांचे डोळे टप् टप् अश्रु ढाळूं लागले. तेव्हां लोकमान्य म्हणाले "तुम्ही जोपर्यंत असे बायकांसारखे नुसते रडतां, तोंपर्यंत आम्हांस असेंच निमूटपणें तुरुंगांत जात राहिलें पाहिजे ! "

( ४० ) लोकमान्यांच्या श्मश्रुकाराने आपली एक आठवण सांगितली. तो म्हणाला, "एकदा दादा श्मश्रू करवीत असतां, वासुकाका तेथें आले. इकडील तिकडील त्यांच्या मौजेच्या गप्पा गोष्टी झाल्यावर, वासुकाका लोकमान्यांस म्हणाले, 'आतांच मी XXX यांचेकडून जाऊन आलों. त्यांची मी आपल्याकडून, तुम्ही सांगितल्याप्रमाणें पुष्कळ समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण ते कांहीं ऐकेनांत. तेव्हां अखेर मग मी भीडमुर्वत न धरतां, त्याची चांगली उलटीसुलटी केली !' लोकमान्य हांसत म्हणाले, ' हा जशी आमची आतां करतो आहे तशीच कीं, नाहीं ! "

( ४१ ) वरिष्ठ दर्जाच्या एका सरकारी नोकरानें आपली लोकमान्यांविषयीं एक आठवण सांगितली ती पुढें देत आहें. " सन १८९१ सालचे खानेसुमा-

रीचे वेळीं सरकारनें पुणें शहरातील अन्याम्य सरकारी नोकरांकडे कांहीं छापील प्रश्न काढून त्यांचीं उत्तरें देण्याकरितां ते पाठविण्यांत आले होते. त्यांत आमच्याकडे चित्पावन ब्राह्मणांची उत्पत्ति, त्यांच्या देव-देवता, त्या देवतेस आवडणारीं फुलें व प्रत्येक वारासंबंधीं माहिती या बद्दलचे प्रश्न आले होते. आम्ही सदर विषयासंबधानें ग्रंथांतरीची माहिती मिळविण्याकरितां येथील आनंदाश्रमातील ग्रंथसंग्रह व विद्वान शास्त्री, तसेंच गांवांतील इतर शास्त्री व नवीन तऱ्हेनें शिकलेल्या पदवीधरांकडे गेलों. परंतु कोणाकडूनहि समाधानकारक माहिती मिळेना. म्हणून अखेर आम्ही टिळकांकडे जाऊन प्रयत्न करून पाहावा असें म्हणून त्यांजकडे गेलो. या वेळीं ते त्याजकडे आलेल्या एका खेडवळ माणसाची यशस्वी शेतकी सबधानें समजूत पाडण्यांत गढून गेले होते. तथापि त्यांनीं आमचें सर्व म्हणणें शांतपणें ऐकून घेतलें व चटकन उठून आंतील खोलींत जाऊन हिंदुधर्मशास्त्राचीं तीन चार इंग्रजी पुस्तकें आणिलीं व सांगितलें कीं, यात तुमच्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें आहेत. चित्पावनांची उत्पत्ति याची माहिती काशीखंड पुस्तकाच्या पाचव्या अध्यायांत तुम्हांस सापडेल. तें पुस्तक पुणें शहरांत कोठेंहि मिळणार नाहीं. फक्त डॉ० भांडारकर यांचे लायब्ररींत एक प्रत आहे. त्यांत तुम्हांस पाहिजे आहे ती माहिती सांपडेल. वरील सर्व ग्रंथ आम्ही घरीं आणिले. व वाचून पाहिल्यानतर त्यांत सर्व प्रश्नांचीं उत्तरें अगदीं बरोबर टिळकांनीं सांगितलेल्या सारखीं सापडलीं ! ! टिळकांची अलौकिक बुद्धिमत्ता व त्यांच्या एकदा नजरेखालून गेलेल्या गोष्टींचें कधींहि न होणारें विस्मरण याबद्दल आश्चर्य वाटल्याखेरीज राहात नाहीं. ”

( ४२ ) हल्लीं सरकारी नोकरींत असलेल्या पण न्यू० इं० स्कूलमध्यें टिळक यांचे हाताखालीं शिकलेल्या एका सद्गृहस्थानें पुढील आठवण सांगितली.

“ इ० स० १८८३-८४ सालीं श्रीमंत गायकवाड सरकारांनीं न्यू० इं० स्कूलला भेट दिल्यानतर विद्यार्थ्यांस खाऊ करितां म्हणून त्यांनीं कांहीं रकम दिली होती. त्याप्रमाणें शाळेंतील सर्व मुलांस हिराबागेंत एके दिवशीं दुपारीं बोलाविलें होतें. तेथें सर्व मुलें व शिक्षक मडळी जमल्यावर, मुलांस केळीं, सत्रीं, पेरू, बोरे वगैरे देण्यास आरंभ केल्यावर आपणांस अगोदर मिळावें या इच्छेनें मुलें पुढें घुसावयास लागलीं; त्यामुळें लहानलहान मुलें चेंगरू लागलीं. या मुलांत इंग्रजी सहाव्या इयत्तेंतील कांहीं प्रौढवयाचीं मुलें होतीं. त्यांस टिळक, धारप वगैरे मास्तर मंडळींनीं पाहिल्यावर म्हटलें, ‘ तुम्ही मोठीं मुलें आहांत, लहान मुलांस अगोदर येऊं द्या, तुम्ही सर्वांचे मागाहून आलां तर बरें पडेल. ’ येवढें म्हणतांच तीं मुलें कांहींशा अभिमानानें तेथून निघून दूर विहिरीचे कांठीं जाऊन बसलीं. सर्व मुलांस खाऊं मिळाल्यावर तीं घरीं गेलीं; पण हीं मुलें तेथेंच बसलीं होतीं. त्यांस धारप मास्तर यानीं स्वतः बोलाविलें व विचारिलें कीं, ‘ तुम्ही येथें

अजून कां बसलां आहांत, व तुम्हांस खाऊ वगैरे कांहीं मिळाला नाहीं काय ?' तेव्हां मुलांनीं झालेली वस्तुस्थिति त्यांचे नजरेस आणली. म्हणून त्यांनीं त्यास उरलेले पदार्थ देण्याची तजवीज केली. पण त्यांपैकीं चांगले जिन्नस सरल्या कारणानें राहिलेले गाळ जिन्नस मुलें घेईनात. तेव्हां ही तक्रार टिळकांचे कानावर गेली. ते बंगल्यांतून बाहेर आले, व मुलांस म्हणाले, 'तुम्हांस सर्व जिन्नस देतां येत नाहींत खरें; कारण सर्व संपले आहेत. तथापि त्या पुष्कळ पदार्थांबद्दल तुम्हांस दुसरा चांगला एक जिन्नस दिला म्हणजे झालें कीं नाहीं ?' मुलांनीं होय म्हणतांच, त्यांनीं शिपायास बगल्यात असलेलीं पेढेबर्फीचीं ताटें आणून मुलांचे पुढें ठेवण्यास सांगितलीं. हें टिळकांचें बोलणें वामनराव आपट्यांनीं ऐकताच ते म्हणाले, 'अहो, बळवतराव, हें काय करतां ? मुलांपुढें ताटें ठेवू नका. प्रत्येक मुलांस फक्त दोन दोन पेढे व एक एक बर्फीची वडी द्या म्हणजे झालें.' रा० आपटे हे सुपरिंटेंडेंट असल्याने, टिळकाच्या शिस्तप्रियतेमुळें, त्यांचे हुकुमाची येथें बजावणी झाली. परंतु टिळकास ही गोष्ट न आवडून त्यांनीं आपटे यास न कळत, आपल्या जवळचे पैसे शिपायाजवळ देऊन नवीन मिठाई आणिली आणि ती वांटून घेण्यास मुलास परस्पर सांगितलें ! मुलें टिळक मास्तरांच्या मनाचा मोठेपणा, औदार्य व शिस्त यांची स्तुति करीत घरीं गेलीं."

(४३) एका जबाबदार सरकारी नोकरानें लोकमान्यांची पुढील आठवण सांगितली. "गायकवाडवाड्याबद्दलचा दस्त रजिस्टर केलेला नाहीं. गायकवाड-सरकारकडून एक आण्याच्या पावतीवें तिकीट लावून घेतलेली पावतीच लोकमान्यांनीं रजिस्टर करण्यास दिली. स्टँप वाचविण्याची ही युक्ती आहे, तेव्हां एक आण्याची पावती रजिस्टर करावी कीं नाहीं, अशी शंका रजिस्ट्रार साहेबांस आल्यामुळें त्यांनीं सदर बाब वरिष्ठाकडे पाठविली. सरकारच्या तज्ज्ञांनीं वाटाघाट करून असें ठरविलें कीं, जरी स्टँप वाचविण्याकरितां ही युक्ती लढविण्यांत आली आहे, तरी सदर पावती रजिस्टर करण्याचें नाकारण्यास कायदेशीर आधार नाहीं, यामुळे पावती रजिस्टर करणें भाग आहे. अखेरीस ही पावती रजिस्टर करण्यांत आली. गायकवाडवाडा लोकमान्यांचा झाल्याबद्दल सरकारास फक्त एक आणा देऊन लोकमान्यांनीं हें कार्य करून घेतलें !"

(४४) पुणें येथें हुंडीवाले साठे यांचें घराणें सुप्रसिद्धच आहे. गेलीं शंभर वर्षे पुणें येथें त्यांची पेढी चालत आली होती परंतु कालचक्राच्या दुर्निवार्य भोंवऱ्यांत ती सांपडल्यामुळें तिचे शेवटचे पुरुष कै० नरसो काशिनाथ साठे हे त्या बाबतींत कांहीं संकटांत आहेत असें लोकमान्यांस कळतांच, जुन्या पद्याच्या बचावाकरितां व एका घराण्याच्या दानतीच्या रक्षणाकरितां, लोकमान्यांनीं आपले मित्र रा० बाळुकाका जोशी यांचे मार्फत रा० नरसोपंत साठे यांस निरोप धाडविला कीं, तुम्हांस अशा प्रसंगीं माझ्या मदतीच्या फुलाच्या पाकळीनें कांहीं

उपयोग होऊन तुमचें मस्तान सावरत असेल तर मग काय वाटेल तें करून तुम्हांस मी पंचवीस हजार रुपये देण्यास तयार आहें ! परंतु साठे यांच्या फाट-लेल्या पेढीच्या आकाशास या लहानशा ठिगळाचा फारसा उपयोग होणार नस-ल्यामुळें, त्यांनीं कृतज्ञबुद्धीनें लोकमान्यांस नकारात्मक कळविलें; पण या गोष्टाचा नरसोपंतांचे मनावर कायमचा कसा विलक्षण परिणाम झाला होता हें, आपल्या उतार वयांत, त्यांनीं लोकमान्यांस पाठविलेल्या एका पत्राची नक्कल खालीं देत आहें, त्यावरून कळून येईल.

॥ श्री ॥ पुणें नारायणपेठ,
तारीख २ जानेवारी १९२०.

श्रीमत लोकमान्य बळवंतरावजी दादा टिळक स्वामींचे सेवेशीः—शिरसाष्टांग नमस्कार, विज्ञापना; आतांपावेतों आपले कृपेंकरून क्षेम आहां.

माझी प्रकृति अलीकडे सहा महिने ताप येऊन फार अशक्त झाली आहे. केव्हां काय होईल ह्याचा नेम नाहीं. शक्ति बिलकुल नाहीं.

कांहीं रोजांपूर्वीं आपले वाड्यांत येऊन समक्ष मजकूर कळविलाच आहे. हल्लीं प्रकृतीस हवा पालटण्यासाठीं मी निरा कॅनालवर आशाकडे राहाण्यास जात आहे.

प्रकृतीमुळें देहावसान केव्हां होईल याचा नेम नाहीं असें आतां माझे मनास वाटूं लागलें आहे. यासाठीं माझे देहावसान झाल्यास माझे मागें माझ्या वधूवर कृपा करून आमचे घराण्याचा बचाव आपण करालच ही चिठ्ठी लिहून ठेवण्याचें कारण कदाचित् देहावसानाची वेळ आल्यास, सुखानें प्राणोत्क्रमण व्हावे.

आमचें घर जावें आणि तें मिळण्याविषयीं बहुत लोकांची इच्छा माझ्या दृष्टीस पडली, तेव्हा मी त्यांस सांगितलें कीं, 'माझ्या बापाप्रमाणें जे परमेश्वरी अवतारी पुरुष विलायतेस गेले आहेत ते परत आल्यावर तुम्हास घर कसें जातें तें दाखवितो.' अशा दमावर आजपावेतों जीव धरला. आपली गांठ पडून सर्व बोलणे होऊन निर्धास्त झालों आहे. आतां केव्हांहि मरण आलें तरी आपलें स्मरण करून निष्काळजीपणानें प्राण सोडीन. प्रत्यक्ष चालता बोलता देव आमच्या हुंडीवाले घराण्यास भेटला ही त्यांच्या बापाची पुण्याईच. आपणहि माझे बाप आहांत. ही विज्ञापना.

( सही ):—नरसो काशिनाथ साठ्ये.

वरील आठवण कै० नरसो काशिनाथ साठ्ये यांचे विद्यमान वयोवृद्ध बंधु श्रीयुत् गोविंदराव काशिनाथ साठ्ये यांनीं अत्यंत अगत्यपूर्वक मला सांगितली याबद्दल त्याचा मी ऋणी आहें.

---

## कृष्णाजी गणेश फुलंब्रीकर ऊर्फ मास्तर कृष्णा

[ गवई, गंधर्व नाटकमंडळींतील एक प्रमुख नट, पुणें. ]

सन १९१४ च्या गणपत्युत्सवांत, गायकवाडवाड्यांत श्रीगजाननासमोर, बुधवार ता० २ सप्टेंबर रोजीं गुरुवर्य भास्करबोवा बखले, श्रीयुत नारायणराव राजहंस व मी अशा तिघांचें गायन झालें होतें. प्रथम मी गायलों, नंतर बालगंधर्व यांचें गाणें झालें व शेवटीं गुरुवर्य बोवासाहेब गायनास बसले; त्यावेळीं गर्दी अतिशय झाल्यामुळें लोक गडबड करूं लागले, तेव्हां स्वतः लोकमान्य उठून त्यांनीं लोकांना आपल्या खणखणीत आवाजांत सांगितलें कीं, 'ठरलेला कार्यक्रम हा यथासांग पार पडलाच पाहिजे; ज्यांना बसावयाचें नसेल त्याना रस्ता मोकळा आहे!' या त्यांच्या अधिकारयुक्त वाणीचा लोकांवर विलक्षण परिणाम होऊन बोवासाहेबांचें गाणें यथास्थित होईपर्यंत सर्व लोक अगदीं तटस्थ बसले होते. गाण्याचा हा कार्यक्रम झाल्यानंतर लोकमान्यांनीं आम्हांस दुग्धपानाकरितां आपल्या घरांत नेलें; व बोवांच्या गाण्याची प्रशंसा करून ते म्हणाले कीं, "भास्करबोवा, मला जरी गाण्याची विशेष आवड व शोक नाहीं तरी एकेकाळीं आपल्या या भरतवर्षांत उत्कर्षाच्या शिखरास पोहोंचलेल्या या पंचम वेदाबद्दल मला फार आदर आहे; आणि या गहन व ईश्वरदत्त कलेमध्यें आपण परिश्रमपूर्वक यश मिळविल्याबद्दल मला फार आनंद होतो व अभिमान वाटतो. मला या गायनशास्त्राकडे लक्ष देण्यास मुळीं कधीं फुरसतच झाली नाहीं; व मुळापासून माझें लक्षहि पण तिकडे गेलें नाहीं तथापि, आपलें गाणे ऐकल्यानतर या विद्येची अपूर्वता आज मला कांहींशी कळली" असें म्हणून मोठ्या प्रेमानें लोकमान्यांनीं एक जरीचें उपरणें भास्करबोवांच्या अंगावर घातलें! गुरुवर्यांनीं त्या विभूतीचा तो प्रसादच समजून शेवटपर्यंत ते उपरणे तसेंच आपणाजवळ मोठ्या काळजीनें जपून ठेविलें होते. व "या प्रसादामुळेंच तेव्हांपासून आपला उत्तरोत्तर उत्कर्षच होत चालला आहे व उत्तरहिंदुस्थानांत विशेषतः पंजाबामध्यें आपली कीर्ति वाढण्यास याच महात्म्याचा आशिर्वाद कारणीभूत झाला" असेंहि ते नेहमीं म्हणत असत. 'गुणी गुण वेत्ति' हें वचन कसें खरें आहे व गुणीजनांचा परामर्ष लोकमान्य कसे घेत हें यावरून स्पष्ट होतें.

---

## माधव वासुदेव समुद्र

[ अकोला, वऱ्हाड. ]

लोकमान्यांविषयीं माझी पहिली आठवण म्हणजे ते १९१६ सालीं अकोल्यास आले होते त्यावेळची आहे. त्यावेळीं मी इंग्रजी पांचवींत होतों. लोकमान्यांचें पहिले दिवशीं 'होमरूल' या विषयावर व्याख्यान होते, व दुसरें दिवशीं लोकांच्या आग्रहावरून त्यांनीं कर्मयोगावर व्याख्यान देण्याचें कबूल केलें होतें. आमच्या हायस्कूलच्या हेडमास्तराची आम्हांस कोणत्याहि राजकीय व्याख्यानास हजर राहाण्याची सक्त मनाई असे. अर्थात्च पहिले दिवशींच्या व्याख्यानास आम्हां विद्यार्थ्यांना हजर राहातां आलें नाहीं. त्याच दिवशीं रात्रीं नवाच्या सुमारास लोकमान्यांस ब्राह्मण आळीतर्फे पानसुपारी होती. त्यावेळीं लोकमान्यांना अत्तर लावीत असतां मी सहज म्हणालों, आज आपल्या व्याख्यानास आम्हां विद्यार्थ्यांस हजर राहातां आलें नाहीं; परंतु उद्यांच्या व्याख्यानास मात्र आम्ही खात्रीनें येऊं. तेव्हा लोकमान्य म्हणाले "कां ? आजच्या व्याख्यानास का नाहीं आलांत ?" मी म्हणालों कीं, 'राजकीय व्याख्यानास जाण्याची आम्हां विद्यार्थ्यांना हेडमास्तराची सक्त मनाई आहे.' त्यावर लोकमान्य म्हणाले "अरे, मग तर हें अगदींच सोपें होतें; तुम्ही सर्व विद्यार्थ्यांनीं आज व्याख्यानास यावयाचें होतें व हेडमास्तरांनीं त्याबद्दल विचारलें असतें तर त्यांना सांगावयाचें कीं, आम्हांला राजकीय व्याख्यान काय किंवा सामाजिक अगर धार्मिक व्याख्यान काय हें मुळींच समजत नाहीं. हें ऐकतों आहोंत हें राजकीय व्याख्यान आहे असें जर कोणी येऊन आम्हांस सांगतें तर आम्ही तात्काळ उठून आलों असतों. असो; आता उद्याच्या कर्मयोगावरच्या व्याख्यानास अवश्य या. ते धार्मिक व्याख्यान आहे असें मी तुम्हाला सांगतों." दुसरे दिवशींच्या व्याख्यानास विद्यार्थ्यांची चिकार गर्दी होती हें निराळें सांगावयास नको.

---

## नारायण रघुनाथ जोशी--मिरजकर

[ अखिलभारतीय बुद्धिबळक्रीडा सामान्यांत यशस्वी झालेले,
इंडियन चॅम्पियन, पुणें. ]

सन १९०७ सालची गोष्ट. त्यावेळीं 'केसरी'मध्यें पुण्याचे विनायक राजाराम टोपे हे बुद्धिबळाच्या डावांतील कोडीं देत असत. ते वारल्यानंतर तोच क्रम पुढें चालविण्याबद्दल मला 'केसरी' ऑफीसकडून सुचविण्यात आलें. त्याप्रमाणें मी बरेच दिवस तें काम चालूं ठेवल्यावर एके दिवशीं लोकमान्यांनीं मला भेटीस बोलाविलें. त्याप्रमाणें मी गेलों. त्यांचें माझें बराच वेळ बोलणें झालें. मी म्हणालों, आपल्या देशी पद्धतीचा खेळ हल्लीं फार मागें पडला आहे; कारण त्याचा कोणी पुरस्कर्ता नाहीं. मला तर वाटतें कीं, तो आतां लवकरच नामशेष होणार. तथापि 'केसरी' सारख्या वजनदार व लोकप्रिय पत्रामध्यें आतां निव्वळ देशी पद्धतीचेच डाव देऊन भागणार नाहीं; तर आतां इंग्लिश पद्धतीचेहि डाव देण्यास सुरवात केली पाहिजे. व पुढील आठवड्यापासून तें काम मीच करणार आहें. असें करण्यानें युरोपिअन पद्धतीच्या खेळाची आपल्या लोकांस चांगली माहिती होईल असें मी म्हणून त्या खेळांतील ते डाव (कोडीं) कसे असतात हें समजण्यासाठीं माझे जवळील चारपांच प्रॉब्लेम त्यास दाखविले. पण नवलाची गोष्ट ही कीं, त्यांपैकीं सर्वांत अवघड असलेला एक डाव त्यांनीं पांच सहा मिनिटांतच मला सोडवून दाखविला! व म्हणाले, 'खरोखरच आपल्या या प्यादीच्या डावापेक्षा हे प्राब्लेम फार मजेदार पण बिकट आहेत यांत शंका नाहीं.' लोकमान्यांनीं इतक्या लवकर सोडविलेला तो डाव पाहून मी आश्चर्यचकित झालों असल्यास नवल नाहीं. त्यावेळीं ते स्वतः संबंधानें मोकळेपणानें म्हणाले कीं, "केसरींत असले डाव देण्याचे काम मी स्वतःच केलें असतें; परंतु हल्लींच्यासारख्या कामाच्या दिवसांत या गोष्टी करण्यांत कोणी वेळ व डोकें खर्च करावें ! त्याला निराळाच मनुष्य पाहिजे. वाचन, मनन व इतर चळवळी यात आमचा सर्व वेळ जावयाचा आणि शिवाय असल्या विषयांतहि डोकें घालावयाचें, अशा गोष्टी कशा व्हाव्या ! खेळास झालें तरी, थोडेंबहुत डोकें हें खर्च केलेंच पाहिजे; पण तें आतां आमच्या हातून होणें नाहीं. करितां तुम्हीच तें काम नेटानें करून लोकांत त्याची अभिरुची उत्पन्न करा. त्याकरितां मी 'केसरी'चें आणखी एक पान ( चेसपेज म्हणून ) वाढविण्यास तयार आहें." परंतु पुढें त्यांच्यावर व केसरीवर आलेल्या संकटामुळें हें सर्व तसेंच राहून गेलें. तथापि, या विषयांत माझी प्रगति होण्यास व मिळणाऱ्या यशास लोकमान्यच कारणीभूत आहेत, व त्यांच्याच कृपेचें हें फल आहे, अशी माझी श्रद्धा आहे.

---

## दिनकर लक्ष्मण कानडेशास्त्री

[ एम्. ए. (अमेरिका) वेदान्ती व गीताभ्यासी ]

ता. २७।१०।१९२४.

( १ ) बंगालचे फाळणीचा निषेध करण्याकरितां १९०५ चे आगस्टमध्यें बंगाल्यात जोराची चळवळ सुरू झाली. एकदोन दिवसांतच बंगाल्यांतील विद्यार्थ्यांनीं तींत भाग घेतल्याच्या बातम्या प्रसिद्ध झाल्या. त्या वाचून पुण्यांतील महाराष्ट्र विद्यालयांतील ५।६ विद्यार्थ्यांनीं विद्यालयांतील विद्यार्थ्यांची सभा भरवून बंगालचे विद्यार्थ्यांस सहानुभूति दाखविण्याचा विचार चालविला. कांहीं विद्यार्थ्यांचे असं मत पडलें कीं आपण इतर सर्व शाळांतून खटपट करून 'पुणें विद्यार्थ्यांची सभा भरवून सहानुभूति दाखवावी.' हें मत मान्य झालें पुढाऱ्यांचा सल्ला घेऊन सभा भरवावी असं ठरलं. विद्यार्थ्यांनीं लोकमान्यांचे कानावर आपला बेत घातला. त्याबरोबर लोकमान्य म्हणाले " वा, फार फार चांगलें, कधीं सभा भरवता, लवकर भरवा. बंगाली लोकांस सहानुभूति लवकर दाखविलीच पाहिजे. कालपरवांपासून माझेंहि मनांत सर्व पुणेंकराची जंगी सभा रे मार्केटांत भरवावी असें आलें आहे. पण तुमची सभा आधीं होत असेल होऊ द्या; आम्ही येत्या रविवारीं भरवू " हें टिळकांचे उत्साही उत्तर ऐकून विद्यार्थ्यांस आनंद झाला. त्यांनीं तेथे लगेच दुसरे दिवशीं सभा भरविण्याचें ठरवून, लोकमान्यास निमंत्रण देऊन, जागेकरितां सार्वजनिक सभेचे जागेची परवानगी मागितली. " सभा सुरु झाल्यावर मी एकदां येऊन जाईन " असे लोकमान्यांनीं सांगितलें. दुसरे दिवशीं ५॥ वाजतां सभेचे जागीं पुण्यातील सर्व शाळा कालेजांतील मिळून अडीचतीन हजार विद्यार्थ्यांचा प्रचंड समुदाय सभेस लोटला. तो तरुणाचा समूह पाहून त्यावेळचे इतर जमलेले देशभक्त थक्कच होऊन गेले. व लोकमान्यांस खास निमंत्रण पाठवून ते येईपर्यंत सभा सुरु होऊ शकली नाहीं. लोकमान्य येताच त्यांस अध्यक्ष करूनच सभेचे कार्यास सुरवात झाली. अध्यक्ष म्हणाले " एवढा विद्यार्थ्यांचा प्रचंड समूह या पुण्यांत आजच मी प्रथम पाहात आहें, तुम्ही अद्यापि मिसु न फुटलेले तरुण आहा, आतां तुम्हास मिशा फुटतील त्या पौरुषत्वाच्या फुटू द्या म्हणजे आज जे ठराव तुम्ही पास कराल त्यांची नीट अम्मलबजावणी कधीं तरी करू शकाल. " ही पुण्यांतील स्वदेशीची पहिली सभा होय; यानंतर सभांचा सर्वत्र सुळसुळाटच झाला, व लोकमान्यांची मार्केटांतील जंगी सभा भरण्याचीहि जरूरी राहिली नाहीं.

( २ ) राष्ट्रीयशिक्षणाची चळवळ १९०५ त सुरू झाली. बनारस कॉंग्रेसचे वेळीं प्रो० विजापुरकर यांनीं पंडित मालवीयांचे विश्वविद्यालयांत काम करण्याचें

ठरले. पण लवकरच तो बेत बदलला, व अण्णासाहेबांचे मनांत कोल्हापुरासच राष्ट्रीयशिक्षणाची शाळा काढावी असें आलें. टिळकांचा सल्ला घ्यावा म्हणून एक चिठी देऊन मला पुण्यास रवाना केलें. मी टिळकांस भेटून चिठीहि दिली व तोंडी वृत्त सांगितलें. लोकमान्य म्हणाले "विजापुरकरांस सांगा, बाजरीची भाकरी व आमटी दोन वेळां खाऊन सारा दिवस, वर्ष, जन्मभर काम करणारे ग्रॅजुएट शिक्षक मिळाल्याशिवाय शाळा काढूं नका. प्रथम लोक कबूल करितात; मागाहून कुरकुरी व तटे सुरू होतात. आमचेपुढें न्यू स्कुलचा अनुभव आहेच. असे शिक्षक मिळण्याची वेळ अद्याप आलेली दिसत नाहीं; ते मिळेपर्यंत स्वतंत्र शाळा चालणें अशक्य आहे. शिवाय संस्थानांत तर अशा चळवळीस सुरवात मुळींच करू नका, 'समूल च विनश्यति.'" प्रो० विजापूरकरांनीं कोल्हापुरांत शाळा सुरू केली, लवकरच ब्रिटिश हद्दींत स्थलांतर केलें; शिक्षक उत्तम मिळाले; लोकमान्यांनीं एका फेरींतच २५।३० हजार रुपये जमविले; पण इंग्रज सरकारनें नमुनेदार चालविलेली शाळा 'बे कायदा संस्था' ठरवून उचलून लाविली.

(३) लोकमान्य १९१४ सालीं सुटून आल्यावर १०।१२ दिवसांनीं एकदां वर्तमानपत्राचे खोलींत ते उभे होते; सातारचे एक दोन गृहस्थ त्यांचेपाशीं बोलत होते, बोलतां बोलतां पूर्वीच्या ४।५ वर्षांतील दडपशाहीचा विषय निघाला. तेव्हां लोकमान्य म्हणाले "नरसोपंतांनीं म्हणूनच 'केसरी' जिवत राखला. मी बाहेर असतों तरी मलाहि 'केसरी' टिकवणें अशक्यच झालें असतें. नरसोपतांचा गोडवा स्वभाव अशावेळीं राष्ट्राचें व 'केसरी'चे उपयोगी पडला व म्हणूनच आज आपणास येथें उभें राहायास जागा राहिली आहे." यावेळीं लोकमान्य गहिंवरून आलेले दिसले. तात्यासाहेब केळकर तेथें हजर नव्हते. लवकरच तात्यासाहेबांचा कांहीं तरी जाहीर गौरव करण्याचा आपला उद्देश असल्याचें लोकमान्य त्यावेळीं बोलले.

(४) गीतारहस्य प्रसिद्ध होतांच कांहीं मंडळी त्याचें खंडण करण्यास पुढें सरसावली. त्यांतच वे० बापट शास्त्री हे एक होते. 'लोकमान्यांनीं फार कडक भाषा सन्याशांविरुद्ध वापरल्यामुळें आपणास फार राग आला आहे' असे शास्त्री बोवा बोलले. 'दुसरे आवृत्तींत टिळक भाषा सौम्य करतील तर आमचा विरोध राहाणार नाहीं, आम्हांस त्यांचें बहुतेक म्हणणें पसंत आहे.' हें म्हणणें टिळकांचे कानांवर पडतांच ते म्हणाले "अंः त्यांत काय? कडक भाषेमुळेंच त्यांस राग येतो ते लवकरच मऊ पडतील; आजची कडक भाषा उद्यां नरम ठरते. गीता तात्पर्याशीं विरोध असणारांचेंच खरें महत्त्व!"

(५) 'गीतारहस्यावर एका प्रसिद्ध शास्त्र्याशीं जाहीर वाद करण्याचा प्रसंग मला आला. या वादांत 'टिळकांच्या शेंकडों घोडचुका' म्हणून त्या प्रतिपक्षीयांनीं पुढें केल्या, त्यांतील १।२ मला पटल्या. अर्थात् वादाचे वेळीं त्या मह-

त्यांच्या नसल्यानें मी त्यांचा उल्लेख केलाच नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं पुण्यास आल्यावर लोकमान्यांशीं बोलतां बोलतां, पुढील आवृत्तीचें वेळीं संदिग्धस्थानीं स्पष्ट भाषांतर करण्यास सुचविलें; तो श्लोक म्हणजे १८ व्या अध्यायांतील "धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः " धारयते हा कर्तरि प्रयोग असून टिळकांनीं कर्मणी समजून त्याचें भाषांतर केलें आहे; तें दुरुस्त व्हावयास पाहिजे. लोकमान्यांस तें पटलें व त्यांनीं दुरुस्ती करण्याचें कबूल केले. पण लगेच ते म्हणाले " पंडित झाला म्हणून काय चुकत नाहीं, असें आहे कीं काय? अशी व्याकरणाची चूक होते एकादे वेळीं. श्रीशंकराचार्य सुद्धा चुकले आहेत, तुमच्या नाहीं लक्षांत?" असें म्हणून लगेच ते खुर्चीवरून उठले, लायब्ररींत जाऊन आचार्यकृत गीताभाष्य घेऊन आले, व वाल्शीट स्वतः लावून पुस्तक उघडून माझे हातात देऊन म्हणाले " हें पहा आचार्य सुद्धां चुकले आहेत. वाचा. गीतेचे ११ वे अध्यायातील 'प्रियः प्रियायार्हसि देव सोढु,' या ठिकाणीं आचार्यांनीं 'प्रियायाः अर्हसि,' अशीं पदें पाडलीं तीं व्याकरण दृष्ट्या चूक आहेत. किरकोळ चुकी सांपडल्यानें अगर एकाद्या शब्दाचा अर्थ भिन्न लावल्यानें रहस्यसिद्धांत चूक ठरत नाहीं." रहस्यासंबधीं एकदां बोलतां बोलतां लोकमान्य मला म्हणाले " धर्म म्हणजे निवळ स्वस्थ बसणें नव्हे, धर्म म्हणजे कर्म; कांहीं तरी करावयास पाहिजे एवढें सांगत बसलां तरी गीतेचें कार्य होईल."

( ६ ) एकदां परदेशात जाण्यास निघालेले एक गृहस्थ लोकमान्यांचें दर्शन घेण्यास आले. रात्रीचे दहा वाजले होते व लोकमान्य जरा आजारी म्हणून बिछान्यावर पडले होते. हे गृहस्थ येतांच लोकमान्य उठून बसले व थोडा वेळ बोलणें चालणें झाल्यावर स्वतः हातात दिवा घेऊन जिन्यापर्यंत पोंचविण्यास आले; शेवटचा आशीर्वाद म्हणून म्हणाले " जगांत कोणत्याहि देशांत गेला व कांहींहि उद्योग करीत असला तरी हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून नित्य वागत व राहात जा; जग तुमचे वरूनच तुमचे देशाची किम्मत ठरवील."

---

# अनंत हरि गद्रे

[ संपादक ' मौज ', मुंबई. ]

( १ ) १९१६ सालची लखनौची कॉंग्रेस झाल्यानंतर लोकमान्य टिळकांनीं वऱ्हाडांत एक लहानसा दौरा काढला. अकोला येथें लोकमान्यांची उतरण्याची व्यवस्था रावबहादुर विष्णु मोरेश्वर महाजनी याच्या घरीं करण्यांत आली होती. रावबहादुर हे मवाळपक्षांत मोडत होते व लोकमान्य टिळकांचा पक्ष जरी जहाल अगर राष्ट्रीय होता तरी लखनौला समेट झाल्यामुळें दोन्ही पक्षांत आतां एकी नांदू लागली होती. रावबहादुरांनीं लोकमान्यांचें उत्तम आदरातिथ्य केलें व पाहुणचारांत कोठेंहि न्यून पडूं दिलें नाहीं. पहिल्या दिवशीं लोकमान्यांची जंगी मिरवणूक निघाली व दुसऱ्या दिवशीं त्यांचे अफाट श्रोतृसमूहापुढें व्याख्यान झालें. व्याख्यान आटोपल्यावर रावबहादुरांनीं व्याख्यानाचा सारांश आपल्या थोरल्या चिरंजीवांकडून समजावून घेतला. त्यावेळच्या लोकमान्यांच्या व्याख्यानांत स्वराज्याच्या विषयाचें साधें व सोपें विवेचन असून ते जहाल भाषा होतां होईतों वापरीत नसत. व्याख्यानाचा सारांश ऐकतांच जहालपणाच्या अभावामुळें रावबहादुर व्याख्यानावर खूष झाले व उद्गारले:—"आतां आम्ही व बळवंतराव राजकीय बाबतींत खरोखरच एक झालों आहों. त्यांच्या आमच्यांत जो थोडा भेद आहे तो सामाजिक विषयापुरता ! तेवढा भेद नष्ट झाला म्हणजे झालें ! ! "

रावबहादुरांचे हे उद्गार मला विशेष मौजेचे वाटले व म्हणून मी त्यांचे ते उद्गार रात्रीं लोकमान्यांच्या कानावर घातले. रावबहादुरांचे उद्गार ऐकून घेतल्यावर लोकमान्य म्हणाले:—" स्वराज्य पाहिजे याविषयीं सर्व पक्षांत एकवाक्यता झाली हें ठीक; पण एवढ्यावरून सामाजिक बाबतींत मवाळांची व आमची एकवाक्यता होणें शक्य नाहीं. उत्तम शीलाचा प्रतिनिधीच तेवढा कॉंग्रेसमध्यें घ्यावयाचा असा आम्ही निर्धार केला तर तसे उत्तम शीलाचे दहापांच लोक तरी कॉंग्रेसला लाभतील कीं नाहीं याची शंका वाटते. ' तुला स्वराज्य पाहिजे ना ? ' असें आम्हीं प्रत्येकाला विचारणार आणि तो होय म्हणाला कीं त्याला कॉंग्रेसमध्यें घेणार—मग तो कोणत्याहि पक्षाचा असो किंवा कसल्याहि शीलाचा असो ! अहो, रावबहादुरांचें—आमचें इतकेंच जमायचें ! पण मी म्हणतों कीं तूर्त इतकें जमलें तरी काय थोडें झालें ! "

(२) लोकमान्य टिळक मॉंटेग्युसाहेबांच्या दरबारासाठीं दिल्लीस गेले, तेव्हांची एक छोटीशी गंमत मला आठवते. मॉंटेग्युसाहेबांच्या भेटीसाठीं त्यांनीं जो पोषाख केला तो सारा 'एकदम परीटघडीचा' केला. पोषाख झाल्यावर त्यांनीं ट्रंकेंतून एक नवा कोराकरकरीत पुणेरी जोडा काढला व पायांत घातला. तेव्हां मला थोडें आश्चर्यच वाटलें. पोषाखासबंधाची इतकी काळजी घेतांना मी त्यांना

हें प्रथमच पाहिलें. पोषाख झाल्यावर मी त्यांस म्हणालों:—"मी तर असें ऐकतों कीं, महात्मा गांधी हे दरबारला नेहमींच घोंगडी पांघरून व नेहमींचाच पचा नेसून जाणारे आहेत आणि तुम्ही तर नवा कोरा पोषाख आणलात!" माझ्या प्रश्नांतील खोंच तत्काल ओळखून लोकमान्य म्हणाले:—"आपण कसें झालों तरी मराठे गडी! आपणाला दरबारचा मान राखलाच पाहिजे. मी आज बादशहांच्या खास प्रतिनिधींची भेट घेणार आहें हें तूं विसरलास वाटतें! शिवाय दरबारी पोषाख केला तरी भाषा कडकच बोलेन!" या भाषणांतील मन मोकळेपणाच त्यांच्या थोर मनाची साक्ष देतो. भाषणांतील मुद्दा सरळ आणि स्पष्टच आहे!

( ३ ) लोकमान्य कलकत्ता—काँग्रेससाठीं कलकत्त्याला गेले असतां तेथील कोट्याधीश मारवाड्यांनींच त्यांच्या आदरातिथ्याची व्यवस्था ठेविली होती. कॉंग्रेसनतर लोकमान्यांचे एक जाहीर भाषण 'स्वराज्य' या विषयावर झालें. व्याख्यानात त्यांनीं "मला होमरूलच्या खटपटीसाठीं प्रत्येकीं रुपया आठ आणें देणारींच हजारो माणसें पाहिजेत" असें सांगितलें. त्यांची ही रुपया आठआण्याची मागणी ऐकून एक मारवाडीशेट आश्चर्यचकित झाले व संधी साधून लोकमान्यांच्या कानात हळूच म्हणाले:—'तुम्हांला फंडाची जरूर असेल तर आम्हांला गुप्त इशारा द्या. आम्ही तुम्हाला लाखों रुपये मध्यरात्रीं आणून देऊ. असें प्रत्येक माणशीं रुपया—आठ आणे कशाला मागता?' त्यावर लोकमान्य म्हणाले:—"तूर्त जी होमरूलची खटपट आम्हाला करावयाची आहे तिला 'स्वराज्य पाहिजे' म्हणणारीं व स्वराज्याच्या खटपटीला प्रत्येकीं रुपया—आठ आणे देणारीं माणसें मिळालीं तरी पुरे! ज्यावेळीं स्वराज्याच्या लढ्याची धुमश्चक्री माजेल त्यावेळीं प्राण देणारीं माणसें व लाखों रुपये देणारे धनिक कोठून मिळतील ही मला काळजीच नाहीं. त्या धुमश्चक्रीच्या वेळीं पैसा आणि माणसें 'मागत' बसण्याचीच वेळ येणार नाहीं. मी सध्यां तूर्तच्या खटपटी पाहातों आहें." लोकमान्यांचें उत्तर ऐकतांच शेटजी थंड पडले हें सांगावयास नकोच!

( ४ ) कलकत्त्याचीच गोष्ट! काँग्रेसच्या धामधुमींत एका बड्या संस्थानिकानीं एका रात्रीं 'हळूच' लोकमान्याच्या मुलाखतीचा योग साधला. मुलाखत वगैरे संपल्यावर ते संस्थानिक लोकमान्याना पोंचविण्यासाठीं दरवाजापर्यंत आले व त्यानीं अत्यादरपूर्वक लोकमान्यांना निरोप दिला. लोकमान्य नंतर मोटारींत बसले व मोटार चालू झाली तरी त्यांच्या डोक्यांत त्या मुलाखतीचेच विचार घोळत होते. लोकमान्य सदर विचारांत गढून गेले असतां सहज उद्गारले:— "हे संस्थानिक सुद्धां आमचेच आहेत. स्वराज्याची खरी खटपट मात्र सुरू झाली पाहिजे!" या उद्गारांतील मर्म कळावयाला आमच्या स्पष्टीकरणाची कांहीं जरूरी नाहीं!

× × × ×

[ लोकमान्यांचे एक भक्त, अकोळ; ]

( १ ) १९१७ च्या चिकोडी जिल्हासभेस लोकमान्य आले होते. सभेमध्यें कुळकर्णीवतनाचा ठराव यावयाचा होता. या ठरावासंबंधानें लोकमान्यांचा काय अभिप्राय पडतो पाहू या म्हणून मि० कलोळकर व मी शहाडे वकील त्यांचे माडीवर गेलों. तो लोकमान्य एक पांढरा जुन्या पद्धतीचा सदरा घालून माडीवर येरझाऱ्या घालीत होते. आम्हास पाहतांच कोण पाहिजे असा त्यांनीं प्रश्न केला. तेव्हां आमच्या स्नेह्यांनीं, कुलकर्णीवतनाच्या ठरावापासून कांहीं उपयोग होईल काय? न झाल्यास यास काय करावें लागेल? असा विनयपूर्वक त्यांस प्रश्न केला. तेव्हा ते म्हणाले "या सभा व ठराव याचा उपयोग तूर्त तरी लोकमत व्यक्त करणें इतकाच आहे. सरकार इतकें बलिष्ठ व बेफिकीर आहे कीं, ते विनति. अर्ज सभा व ठराव यांकडे न पाहातां मनास येईल तेंच करणार. तेव्हां प्रत्येक वतनदारानें सरकारवर दावे करून आमच्या इकडील खोतीप्रकर्णाप्रमाणे निकाल करून घेतला पाहिजे. आरंभीं दावे वरेचसे विरुद्ध झाले तरी त्याने निराश न होतां प्रत्येकानें गव्हर्नमेंटवर दावा करूनच दाद मागितल्यावर गव्हर्नमेंट खोतांच्या प्रकरणाप्रमाणें तडजोडीस येईल. कदाचित् वतनदारांच्या कबुल्या सरकार अनंत मार्गांनें मिळवील व तसें न साधल्यास तुमचीं वतनें तें जबरीनेंहि घेईल हें लक्षांत ठेवा.

( २ ) गीतारहस्यांतील कांहीं मुद्यासंबधानें वाद करण्याकरितां वैष्णव साम्प्रदायी श्री वैष्णवस्वामींचा मुक्काम मुद्दाम तेथें झाला होता. म्हणून त्यांच्याशीं लोकमान्य जाहीर चर्चा करणार होते. श्रींच्या मुक्कामावर म्हणजे धर्मशाळेसमोर मोठा जनसमूह जमला होता. श्री व त्यांचें शास्त्रीमंडळ उत्तराभिमुख स्थानापन्न झालें; नतर लोकमान्य आले. ते येताच श्रीखेरीज सर्वांनीं उठून त्यांस खडी ताजीम दिली. लोकमान्यांनीं श्रींस नम्रभावानें नमन करून पूर्वपक्ष करण्यास विनति केली. नंतर त्यांस आरंभी दे० खाडीलकर व परांजपे यांनीं उत्तर देण्याचा प्रयत्न केला. त्यानंतर लोकमान्य गीतारहस्याची प्रत घेऊन त्यांतील ज्या विधानावर त्यांचा आक्षेप होता ते वाचून दाखवून त्यावर त्यांनीं सुंदर भाषण केलें. याच कामासाठीं त्यांनीं आदले दिवशीं किंजवडेकर शास्त्री यास जरूर ते ग्रंथ घेऊन येण्यास तार दिली होती; परंतु मेल आजहि लेट असल्यानें ते वेळेवर आले नाहींत. मध्यंतरीं एकवार लोकमान्यांच्या प्रश्नास श्रींच्या शास्त्रीमंडळाकडून चांगलेंसें उत्तर न आल्यामुळें लोकांकडून त्यावेळीं टवाळी झाली. त्यावेळीं लोकमान्यांनीं उठून लोकांना बजावलें कीं, ही नेहेमींची सभा नव्हे, ही शास्त्रीय चर्चा आहे. कोणत्याहि योगें श्रींचा मानभग होईल, श्रींची थोडीशीहि अमर्यादा होईल असें

वर्तन घडले तर आपण स्वराज्यासच नव्हे तर जरूर ते शिष्टाचार पाळण्याच्या कामांत नालायक ठरू, अशा अर्थानें खडसून बजावलें. व यापुढें ज्यांना स्वस्थ ऐकतां येईल त्यांनीं ऐकावें नसल्यास इथली गर्दी कमी करावी, अशी सूचना करून आपलें विवरण पुढें चालविलें. तेव्हा विलक्षण शांतता झाली. तोंच, किंजवडेकर शास्त्री आले. परतु वेळ वरीच झाल्यानें याची विशेष चर्चा श्रींचा मुक्काम पुण्यास झाल्यास सविस्तरपणे करू असें सांगून हा कार्यक्रम आटोपला.

---

## गंगाधर व्यंकटेश देशपांडे

[ चिटणीस टिळक-स्मारक कमिटी, झाडगाव, वऱ्हाड. ]

( १ ) एकोणीसशें आठच्या खटल्याच्या वेळची गोष्ट. अकोला-मराठी ट्रेनिंग कॉलेजचे एक शिक्षक श्रीयुत रामचद्र गगाधर भागवत, लोकमान्याना मुबईस पकडल्याची बातमी कानीं येताच, त्यांनीं एक चिठ्ठी लिहिली व ती लखोटा-बद्द करून ठेविली. पुढें शिक्षा झाल्याचे कळताच आपल्या मित्रमडळी-समोर तो लखोटा फोडला. चिठ्ठीवर शिरोभागीं " यदृच्छयाचोपपन्नम् " हा गीतेंतील श्लोक असून त्याखाली असा मजकूर होताः— " या खटल्यात जर लोकमान्यास शिक्षा झाली तर नोकरीचा राजीनामा देईन. " या प्रतिज्ञेप्रमाणे त्यांनीं राजीनामा लिहिला. परतु स्नेहीमडळींच्या व स्वजनाच्या कळवळ्याच्या आग्रहामुळें व आणाशपथामुळे लोण्याप्रमाणे मऊ अतःकरणाच्या या एकनिष्ठ टिळक-भक्ताचे हृदय द्रवलें व केवळ भीडेखातर तो राजीनामा वरिष्ठांकडे पाठविला नाहीं. परतु त्या दिवसापासूनचा एक एक दिवस एकेका वर्षासमान-शाळेंत काम करीत असताना-वाटू लागला. ' मी या बंधनापासून केव्हां एकदां मोकळा होईन ' ही सारखी तळमळ. ' सत्य सत्कमाचा दाता भगवान ' म्हणतात ते कांहीं खोटे नाहीं. थोडक्याच दिवसांत त्या कॉलेजमध्यें एक उत्सव झाला. त्यांत सदर शिक्षकानीं प्रसगोचित् चार शब्द बोलावे असा त्यांच्या शिष्यमडळींनीं प्रेमाचा आग्रह केल्यावरून आमचे हे टिळक-भक्त बोलावयास उठले व असे कांहीं सुदर भाषण केलें कीं, त्याचा रिपोर्ट शाळाधिकाऱ्यांकडे जातांच त्यांनीं तात्काळ यांना नोकरींतून मुक्त केलें. व आमचे मित्र श्री० भागवत यांना पुत्रोत्सवाप्रमाणे आनद झाला ! तेव्हांपासून ते उघड उघड राजकीय चळवळींत भाग घेऊ लागले. आज ते वणी तालुक्यातील सार्वजनिक चळवळीचे एक आधारस्तभ आहेत. निर्वाहाकरितां नोकरी करण्यासारखी गृहस्थिति असतांहि साठ-सत्तर

रुपयांच्या व पुढें दोनशेपर्यंत वाढत जाणाऱ्या सरकारी नोकरीवर लाथ मारून केवळ टिळकप्रेमाकरितांच हा गृहस्थ राजकीय आखाड्यांत उतरला. लोकमान्यांसारख्या विभूतीला वृद्धापकाळीं काळेपाणी दाखविणाऱ्या सरकारची नोकरी करून चैन करण्यापेक्षा जन्मभर दारिद्र्य पुरवलें, ही एकच भावना हृदयापाशीं धरून आज ते आहेत त्या स्थितींतच अगदीं मजेनें काम करीत आहेत. लोकमान्य स्वर्गस्थ झाल्यापासून " राष्ट्रगुरु " या नात्यानें सद्‌गुरु श्री० भागवत हे त्यांना नित्याच्या पितृतर्पणांत ' तिलोदक ' अर्पण करीत असतात व पितरांच्या श्राद्ध प्रसगीं लोकमान्यांच्या नांवानें एक ब्राह्मण जास्त बसवून ते भगवान तिलकांना पिंडोदकानें तृप्त करीत असतात, ही गोष्ट आमच्या या बाजूला सर्वविश्रुत आहे. त्याचप्रमाणें लोकमान्यांचें वाङ्मयश्राद्ध म्हणून त्यांनीं एक " तिलकायन " नांवाचा सुंदर ग्रंथ लिहिला असून तो ते लवकरच प्रकाशित करणार आहेत.

( २ ) मि० मॉंटेग्यु यांची मुलाखत आटोपून लोकमान्य दिल्लीहून परतले. मार्गांत एका स्टेशनवर गाडी उभी असतांना ( मला पक्कें आठवतें, तें स्टेशन मथुरा असावें ) तेथील लोकांनीं त्यांना उतरण्याविषयीं आग्रह केला. जवळजवळ सत्याग्रहच का म्हणाना ! गर्दी अतोनात, त्यामुळें लोकमान्यांना गाडींतून उतरून स्वतःच्या पायानीं मोटारींत जाऊन बसणें अशक्य होतें. भगवान विष्णूला खांद्यावर वाहून नेणाऱ्या गरुडाप्रमाणें एका स्वयंसेवकानें लोकमान्यांना आपल्या स्कंधावर बसवून त्यांच्या वाहनांत नेवून—मोठ्या मुष्कलीनें—बसविलें ! गर्दींत अर्थात्च लोकमान्यांच्या पायांतील जोडा गळून पडला. तेथें मुक्कामास असतांना दुसरे दिवशीं प्रातःकाळीं अंगावर भरजरी मोलवान शालजोडी पांघरलेला, वेदशास्त्रसंपन्न असा एक शुचिर्भूत ब्राह्मण लोकमान्यांच्या मुक्कामाच्या दाराशीं येऊन त्यानें " भगवान तिलक कोठें आहेत ? " म्हणून विचारलें. कर्मधर्मसंयोगानें दारांत लोकमान्यच होते. " मीच तो टिळक " असें त्याला उत्तर मिळालें. तात्काळ त्या ब्राह्मणानें आपल्या काखोटींत असलेली एक वस्तु लोकमान्यांच्या पायांपुढें ठेवून साष्टांग नमस्कार घातला. गहिंवरलेल्या लोकमान्यांनीं, "महाराज हें काय ?" असें म्हणून त्या ब्राह्मणास अत्यंत प्रेमपूर्वक आपल्या हातांनीं उठवून प्रणामपूर्वक आपल्या आसनावर बसविलें. ब्राह्मण उद्गारला " महाराज, पूर्वपुण्यानें आपलें दर्शन कालच घडलें. आज सडकेवर हा दक्षिणी जोडा मला मिळाला. आमच्या या उत्तरहिंदुस्थानात हा पुण्याचा जोडा पाहून मला मोठा चमत्कार वाटला व तो कालच्या गर्दींत आपल्याच पायांतून पडलेला असावा असें मला वाटलें आणि तो आपला आपल्याच चरणांला अर्पण केला आहे. यांत मी विशेष तें काय केलें, महाराज, तो आपलाच आहे हें पाहून मला धन्यता वाटते. "

## वासुदेव कृष्ण भावे

[ बी. ए., उपसंपादक केसरी, पुणें. ]

(१) लो० टिळकांच्या निकटसहवासाचें महद्भाग्य मला १९०८ सालींच थोडेसें लाभलें. लो० टिळकांवर खटला होण्यापूर्वी दोन तीन महिने पुण्यात दारुबंदीचें बाबतींत पिकेटिंगची चळवळ जारीनें सुरू होती. सदर चळवळींत मी स्वयंसेवकाचें काम करीत असतां गणेश पेठच्या गुत्यावर त्या वेळचे पुण्याच्या कलेक्टरचे पर्सनल असिस्टंट मि० अंडरसन यांजबरोबर मारामारी केल्याच्या आरोपावरून सिटी मॅजिस्ट्रेट मि० कारव्हालो यांच्या कोर्टांत मजवर खटला भरण्यांत आला. त्या वेळीं माझ्या बचावाचा पुढाकार लो० टिळकांनींच घेतला होता. खटल्यांत माझ्या वतीनें डॉ० मॅन व मि० मॅक्निकल प्रभृति काहीं साक्षीदार देण्यात आले होते. माझ्या वतीचा साक्षीपुरावा घेण्याच्या दिवशीं डॉ० मॅन यांस वेळेवर हजर राहातां न आल्यामुळें तें काम संपल्यावर कोर्टाचा जिना चढू लागले. लो० टिळक जिना उतरण्यास आणि मॅनसाहेब जिना चढण्यास एकच गांठ पडली. लोकमान्यांनीं मॅन यांस कोर्टांत झालेली हकीकत सांगितली. दोघांचें समाषण चाललेलें पाहून साहाजिकच त्यांजभोंवती प्रेक्षकांचा घोळका जमला. त्या दिवसात पोलिस बंदोबस्त शहरांत मोठा कडक असून कोणीहि चार माणसें रस्त्यांत एकत्र जमलीं तर त्यांवर बेकायदा जमाव (unlawful assembly) केल्याचा आरोप येण्याची धास्ती असे. ही धुलमाची गोष्ट मॅन यांच्या नजरेस आणण्याकरतां लोकमान्य विनोदानें म्हणाले कीं, "आपण येथें असें जमून उभे राहू तर आपल्यावरहि बेकायदा जमाव केल्याबद्दल खटला होईल!" असें म्हणून ते जिना उतरून चालते झाले.

(२) १९०८ सालच्या सुमारास सार्वजनिक कामांत पडण्यास माणसें बहुधा मिळत नसत. पिकेटिंगमुळें स्वयंसेवकांवर भराभर खटले होऊन फडाफड दंड द्यावे लागले असतां, लोकमान्यांच्या साहचर्यांतील एक निस्सीम भक्त व अनुयायी त्यांस म्हणाले, 'अशा रीतीनें तरुणांच्या आयुष्याची नासाडी होणें बरें नव्हे.' त्यावर लोकमान्यांनीं तत्क्षणीं उत्तर दिलें, "अहो, हींच मुलें उद्या आपल्यास देशकार्यास उपयोगी पडतील!" तरुणपणीं राजकीय खटले होण्यात आयुष्याची खरी नासाडी नसून ते देशकार्याचे धडे होत असेच लोकमान्य समजत व त्यांच्या या म्हणण्याची सत्यताहि सभोंवार दृष्टि टाकणारांस पटल्यावाचून राहाणार नाहीं.

# महेश्वर रामचंद्र कुळकर्णी

[ शिक्षक, मुंबई. ]

( १ ) लोकमान्य जेव्हां लखनौ काँग्रेसकरतां गेले होते तेव्हां एके दिवशीं कानपूरचे कोणीएक गृहस्थ येऊन बसले व त्यांची इच्छा लोकमान्यांचें अंग दाबावें अशी होती. लोकमान्यांनीं मला अंग दाबून घेण्याची संवय नाहीं व आपण हें काम करण्याची इच्छा धरूं नये असे सांगितलें. परंतु त्या इसमानें फारच आग्रह धरला तेव्हां ते म्हणाले " तुम्ही माझें अंग तर दावूं शकणार नाहींच पण फारच आग्रह असेल तर आमचे हे नवाबसाहेब बसले आहेत ( दादा-साहेब खापर्डे ) त्यांचें आंग पाहिजे तर दाबा. " यावरून शारीरिक सेवा करून घेण्याचा त्यांना किती तिटकारा होता हें कळून येतें.

(२) गोवे प्रांतांतील जे० आबासाहेब रामचंद्र या नांवाच्या कोणी गृहस्यानें स्वावलंबनाच्या तत्त्वावर धदेशिक्षणाची शाळा काढल्याचें १९०८ सालीं 'केसरीं'तून आम्हा चारपांच विद्यार्थ्यांना समजलें. सबब त्या शाळेंत जाण्याचा नक्की बेत करून त्यावर लोकमान्यांचें मत घेण्याकरतां गेलों. त्यावेळीं ते म्हणाले " अद्याप मला त्या शाळेची पुरी माहिती नाहीं. तुम्ही आपल्या परीक्षा पास व्हा, तोंपर्यंत मी पुरी माहिती मिळवीन. तसेंच तळेगांव मुक्कामींहि अशी शाळा निघाली आहे, तेव्हां तुम्ही पुरी माहिती मिळाल्याशिवाय गोव्याच्या शाळेंत जाऊं नये असें मला वाटतें. " अर्थातच आमचा बेत आम्हीं रहित केला. तेव्हां विद्यार्थ्यांना वाटेल तें सांगून त्यांचे आयुष्य लोकमान्यांनीं खराब केलें यांत किती सत्य आहे हें वरील गोष्टीवरून दिसून येईल.

( ३ ) १९१४ मध्यें लोकमान्य सुटून आल्याची बातमी मला सकाळीं सहा वाजतां समजली. लगेच मी वाड्यात त्यांच्या दर्शनाकरितां गेलों. तेव्हां त्या वेळीं दहापांच इतर गृहस्थ आले होते. त्यांतच एक २५ वर्षें वयाचे गोड-बोले हे होते. लोकमान्यांना किती दिवस लौकर सोडलें यावर कोणी एक गृहस्थ त्यांच्याशीं बोलत होते. त्यावर सदरील गोडबोले म्हणाले 'पहिल्यानदांच चांगली ६॥ वर्षांची शिक्षा दिली व मागाहून म्हणे ६ महिने सूट दिली यांत काय मोठें केलें. '

लोकमान्य लगेच उद्गारले " मागील गोष्टीचा खल नको. झाली गोष्ट झाली. आतां पुढें काय करावयाचें तें बोला. "

यानंतर लगेच इतर प्रश्न सुरू झाले व मंडळी बरोबर गेली. सुटकेनतर पहिल्याच दिवशीं पुढच्या मार्गाचा विचार करतांना पाहून त्यांचें धैर्य व मोठे-पणा याबद्दल मला फारच आदर वाटला.

---

× × × ×

[ लोकमान्याचा एक अज्ञातवासी भक्त. ]

( १ ) माझा संचार चोहोंकडे असल्यामुळें लोकमान्यांच्या अलोट लोकप्रियतेचीं अनंत उदाहरणें मला पाहावयास सांपडलीं. ज्यांनीं त्यांचें फक्त छायाचित्रच पाहून आपल्या मनाचें शांतवन करुन घेतलें अशा लोकांत काहीं वेळ घालविण्याचा प्रसंग प्रस्तुत लेखकास बंगाल्यांत, पंजाबांत, संयुक्तप्रांतांत वगैरे कडे आल्यावेळीं त्या लोकांनीं किती आतुरतेनें या महापुरुषासंबधीं मला माहिती विचारली व त्याचेबद्दल त्यानीं कसा आदर व्यक्त केला याबद्दल एकच गोष्ट सांगितली असतां पूर्ण कल्पना होईल. 'मला या विभूतीच्या हाताखालीं लहानपणीं शाळेंत शिकण्याचा मान मिळाला होता, ते माझे गुरु होते' एवढें मी त्यास सांगितलें मात्र, तों लगेच ते भाविक टिळकप्रेमी लोक माझ्या पाया पडले व 'तुम्ही धन्य आहांत' असें म्हणाले !

( २ ) लोकमान्यांच्या दौऱ्याचे वेळीं त्याचे पादस्पर्शनपूर्वक दर्शन घेण्याकरतां आषाढी एकादशीस पंढरीनाथाचे दर्शन घेतांना भक्तांची जशी स्थिति होते तशी लोकाची कशी स्थिति होई हे शब्दानीं वर्णन करणें अशक्य आहे. अशा प्रसंगीं लोकांस लोकमान्य एक सारखे म्हणत, " मी साधु नाहीं, माझ्यांत विशेष काहीं नाहीं, तुम्हासारखेच मला हात, पाय, कान परमेश्वराने दिले आहेत. तुम्ही माझे पायां न पडतां भगवन्ताचे पाया पडा व त्याजजवळ स्वराज्य मागा."

( ३ ) कित्येक वेळा जनतेच्या दृष्टीनें अधम, दुराचारी अशा माणसास सुद्धा आपण जवळ कां करावें, असा त्यांस एकदा प्रश्न केला असता ते म्हणाले कीं, " कोणी कसाहि असो, त्याचेकडून अमकें विशेष काम होण्यासारखें आहे व त्याचा देशकार्यास फायदा होणार आहे ना, तर मग घ्या त्याचा उपयोग करून. मधमाशीस काय, फुलांतील मध तेवढा मिळाला म्हणजे झालें ! "

( ४ ) एका प्रसिद्ध खटल्यांत लोकमान्याच्या एका स्नेह्याने एक विलक्षण पुरावा मिळविला व त्याचा अवश्य उपयोग करून घ्यावा अशी लोकमान्यांच्या त्या हितचिंतकाने त्यांस विनंति केली. तो पुरावा एका फोटोचा होता. तो पुढारण्याने सर्व खटला तावडतोब टिळकांच्या तर्फेचा सहज झाला असता. पण ज्या गृहस्थानें फार परिश्रम करून तो फोटो मिळविला त्याबद्दल त्याचे त्यानीं प्रथम आभार मानून "असा पुरावा दाखल करून खटला जिंकण्यापेक्षा तो माझ्या विरुद्ध झाल्यास परमेश्वरी इच्छा म्हणून मी समाधान मानून स्वस्थ राहीन पण जेणेंकरून समाजास कलंक लागेल, एखाद्या घराण्याची अब्रू जाईल व मृताचा आत्मा अखंड दुःखी होईल अशी गोष्ट मी कालत्रयींहि करणार नाहीं.

मग माझें काय वाटेल तें होवो." असे म्हणून त्यांनीं तेथल्या तेथें त्या फोटोचा नाश केला !

( ५ ) सन १८९८ च्या लोकमान्यांचे खटल्याचे वेळीं मुंबईस हायकोर्टा-बाहेर समुद्रासारखी पसरलेली जनता अति उत्सुकतेनें खटल्याची हकीकत समजावी म्हणून कित्येक तास तिष्ठत उभी राहिलेली दिसत असे. त्या समाजांत गोव्याकडील खिस्ती, रोटीवाले, शिंपी, वगैरे लोकहि असत. ' तुमचे रे येथे काय काम आहे ? ' असें आम्ही त्यांस विचारतांच ते म्हणाले ' आम्ही हिंदी नव्हे काय ? तुम्हांस टिळकांचा जितका अभिमान वाटतो तितकाच किंबहुना त्याहिपेक्षां जास्त आम्हांस तो वाटतो ! ' हें ऐकून आम्ही चकित झालो. शिक्षेच्या निकालाचे दिवशीं रेल्वेचीं सर्व तारायंत्रें, रेल्वेच्या लोकांनीं याच कामाच्या उपयोगास आणिलीं; इतर तारा पडून राहिल्या !

( ६ ) १९०६ सालीं कलकत्त्याचे कॉंग्रेसकरतां लोकमान्य गेले असता, एक दिवस ते गंगास्नानास गेले. तेव्हां त्यांचेबरोबर हजारो बंगाली लोक स्नानास गेले होते. लोकमान्य फार चांगले पोहोणारे होते. यथेच्छ जलक्रीडा करून परत येत असतां घाटाजवळ ते थोडे चिखलात रुतले; पण ते तसे जोरानें निघून वर घाटावर येऊन उभे राहिले तो त्या भाविक व प्रेमळ बंगाली बाबूंनीं त्यांचे पायापासून तो कंबरेपर्यंतचा चिखल काढून घेतला व आपले ललाटीं लाविला ! असे करण्यानें लोकमान्य अनायासेंच स्नान केल्याप्रमाणेंच निर्मल झाल्याचे आम्ही पाहिलें !

( ७ ) अमृतसरच्या कॉंग्रेसचे वेळीं हजारो स्त्रिया लोकमान्यांच्या दर्शनाकरतां मंडपाबाहेर तासचेतास तिष्ठत उभ्या रहात. लोकमान्य बाहेर आले म्हणजे त्यांच्या पायांवर त्या आपलीं लहान बाळें घालीत, त्यांचे अनन्यभावानें पदरज कपाळीं लावीत व त्यांस भक्तिभावानें नवसहि करीत ! !

( ८ ) लोकमान्य अजमीरला गेले त्यावेळीं त्यांचे दर्शनार्थ दिल्लीपासून अजमिरापर्यंत रात्रीं व दिवसा सर्व स्टेशनावर लोकांचा तोबा उडत होता. ज्या अजमीरच्या प्रख्यात दर्ग्यांत जहांगीर बादशहाच्या जन्माचा नवस अकबरानें पायीं चालत येऊन फेडला, त्या ऐतिहासिक दर्ग्यांत या अनभिषिक्त लोकमान्यमहाराजाचा अपूर्व जयजयकार सर्व मुसलमान बधूंनीं केला ही खरोखरच मोठ्या भाग्याची गोष्ट होय. अजमीरच्या इतिहासांत ही गोष्ट नमूद झाल्याखेरीज खास राहाणार नाहीं.

( ९ ) आपणावर अहोरात्र नजर ठेवण्याची सरकारने व्यवस्था केलेली आहे असें त्यांस एकदा सांगण्यांत आलें. तेव्हा ते म्हणाले, " स्वराज्य झाल्यावर आम्हीहि असेंच करूं. किंबहुना स्वराज्य होतें तेव्हां आम्ही तसेंच केले व यापुढें आम्ही तसें न करूं तर राज्य लवकरच बालवूं. अनादिकालापासून जी गोष्ट

शिष्टसंमत म्हणून ठरली ती केल्याशिवाय राज्य सुरळीत चालणें शक्य नाहीं. महाभारत–काळींहि ही हेराची कल्पना अमलांत होतीच. व जोंपर्यंत परमेश्वरानें मनुष्याच्या स्वभावांत फरक केला नाहीं तोंपर्यंत हें असेंच चालणें अपरिहार्य आहे."

( १० ) मुंबईस लोकमान्याचा अन्त होण्याचे वेळीं ते मरणोन्मुख असल्या-बद्दलची तार सिमल्यास आली. सर्व जनता अत्यंत दुःखी झाली. इतक्यांत कांहीं वेळानें प्रकृती बरी आहे अशी दुसरी तार आली. ती ऐकून लोकमान्यास पूर्वी कधींहि न पाहिलेल्या तेथील एका लालास इतका हर्ष झाला कीं, त्यानीं तात्काळ आपल्या घरच्या उत्तम सवत्स गाईची पूजा करून तीं लोकमान्याच्या आरोग्यार्चितनार्थ एका ब्राह्मणास दान दिली !

---

## दत्तात्रय रघुनाथ देव

[ पाटण, गुजराथ. ]

(१) सन १९०१ सालीं आम्ही पुणें येथें नारायण पेठेंतील मुंजाबाच्या बोळांत राहात होतों; हुताशनीचे दिवस होते. रंगपंचमीच्या दिवशीं बोळाच्या सार्वजनिक होळीवरच रंगाचें भांडें तयार होतें व आळींतलि आम्हीं सर्व बाल गोपाळ मंडळी आनंदानें वांबूच्या पिचकाऱ्यांतून रंग उडवीत होतों. सायंकाळचा सुमार झाला. कै० लोकमान्य लगबगीनें आमच्या होळीवरून जात होते. अंगात अंग-रखा, डोकीला त्यांचें नेहमींचे लाल पागोटें, पायांत जोडा व हातात काठी अशा वेषानें लोकमान्याची स्वारी क्रीडाभुवनांत व्याख्यानाकरिता जात होती. आम्हा पोरास लहानथोर सारखेच; पण त्यांचे अंगावर रंग टाक-ण्याचा धीर आम्हास झाला नाहीं. पुढें सोट्या म्हसोबाच्या मंडळींनीं त्यास रंगविलें म्हणून रा० तात्यासाहेब केळकर यांचे घरीं जाऊन त्यांस कपडे बदलून व्याख्यानास जावें लागलें ! त्यावेळीं जाहीर प्रसंगीं प्रथमच त्यांनीं कोट अंगांत घातला असे त्यांचें सांगण्यात आलें.

( २ ) बडोद्याचे डॉक्टर सुरतकर, मुंबईच्या प्रिंटर्स एम्पोरियमचे चालक रा० रामभाऊ सप्रे, रा० तुळजापुरकर वकील, वऱ्हाडांतील रा० वामणगांवकर व आणखी कांहीं स्नेही मंडळी जमून मुंबईस ' पिपल्स युनीयन ' नांवांची सभा काढण्याचे ठरवून नियमाचा मसुदा रा० तुळजापुरकर वकील यांनीं तयार करून दिला; त्याची एक प्रत घेऊन पुण्यास मी लोकमान्यांचा सल्ला घेण्यासाठीं गेलों. त्यांनीं मामुली कुशल प्रश्न केल्यावर सायंकाळीं मला बोलाविलें.

सायंकाळींहि त्यांस फुरसद मिळाली नाहीं. तेव्हां शेवटीं रात्रीं येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें रात्रीं मी गेलों. लोकमान्य वाचनांत अगदीं गढून गेले होते. वाड्यांतील गच्चीवर शेजारच्या खोलींत एका आरामखुर्चीवर लोकमान्यांची स्वारी बसली होती. त्यांस माझ्या येण्याचें कारण सांगितलें तेव्हां ते म्हणाले कीं " संस्था वगैरे गोष्टींवर माझा विश्वास नाहीं. मनुष्यानें स्वतःची पूर्ण तयारी करून कोण-त्याहि कामास हात घालावा; त्यांत दुसऱ्याच्या मदतीची अपेक्षा केली कीं, अनेक वेळां ठोकर खाण्याचे प्रसंग येतात. आवेशाच्या भरांत कित्येक मंडळी एखादी संस्था काढतात, पण एकदां उत्साह ओसरला म्हणजे सर्व कांहीं जागचे जागीं राहातें. तेव्हां प्रत्येकानें स्वतःच्या मनाची पूर्ण तयारी करावी व मगच कार्यास लागावें. " पुढें गोष्टी वरून गोष्ट निघतां कै० नामदार गोखले यांच्या सर्वंट्स ऑफ इंडिया सोसायटी सारखी संस्था आपण कां काढित नाहीं असें त्यांस विचारलें असतां त्यांनीं जबाब दिला कीं, " माझ्या आयुष्यांत मी एक मोठी संस्था काढली ती 'केसरी' ही संस्था होय. तिच्याकरितां माणसें मिळविण्यासाठीं केलेल्या प्रयत्नाचें त्यांनीं विवेचन केलें. त्यांत त्यांनीं सांगितलें, मीं 'केसरी' करितां उत्तम उत्तम माणसें मिळविण्यासाठीं पुष्कळ खटपट केली. दरसाल युनिव्हर्सिटीच्या पदवीधरांपैकीं पुष्कळांस विचारिलें आणि पगारहि चांगला देऊं केला तरी आप-ल्याला माणसें मिळालीं नाहींत. एक तात्यासाहेब केळकर शब्द टाकल्याबरोबर आपणांस येऊन मिळाले. " ह्या बद्दल मात्र त्यांस अभिमान वाटला. प्रो० अण्णा-साहेब कर्वे यांच्या कामगिरीसंबंधानें लोकमान्यांचा अभिप्राय फारच उत्तम पडला. अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत त्यांनीं केलेलें कार्य खरोखरच वाखाणण्याजोगें आहे यांत संशय नाहीं असें लोकमान्य म्हणाले.

---

## शंकर रामचंद्र शेंडे

[ कायद्यांच्या पुस्तकांचे एजंट, सुरत. ]

(१) १९१५ सालची गोष्ट. कांहीं स्वदेशीचें कार्य व्हावें अशी इच्छा असलेल्या आम्हां दोघा तरुणांना एकदां मुंबईच्या कोऑपरेटिव्ह स्टोअरची मांडणी, व्यवस्था, टापटीप, मालाची बहुविधता व एकंदर भव्यपणा पाहून, आम्ही दोघा तरुणांनीं, अशा थाटाचें एक स्वदेशी दुकान काढल्यास स्वदेशीचें गिऱ्हाईक व बोलवाला वाढेल अशा विचारांत असतां आपल्या उद्देशसिद्धीसाठीं आपणांस मोठ्या नांवाचा पाठिंबा व तोहि " मु० को० स्व० स्टोअर्स " ची शाखा या

नावांचा मिळाल्यास या दिशेनें प्रयत्न करण्याचें ठरविलें; व पुढे एकदा आम्हीं दोघे पुण्यास गेलों असतां लोकमान्य तेथें आहेत असें पाहून ह्या कामास त्यांचा आशीर्वाद व सल्ला घ्यावा ह्या हेतूनें गायकवाडवाड्यांत गेलों. व आमचा उद्देश कळविला. त्यावर लोकमान्यांनीं आपले मनोगत पुढीलप्रमाणे व्यक्त केलें:–

" तुमचा हेतु स्तुत्य आहे व अशा प्रकारचे प्रयत्न ठिकठिकाणीं व्हावयास पाहिजेत. तुमचे भांडवल घेतल्यास स्टोअरची शाखा हें नांव घेतां येणार नाहीं. कारण आम्ही शाखा काढल्या तर त्या स्वतःच्या मालकीच्या ठेवतों. तुम्हांस तुमच्या गांवीं स्टोअरची शाखा व्हावी असे वाटत असल्यास तुम्हीं स्टोअरमध्यें सेल्समनची नोकरी धरा. तुमच्या कामाची योग्यता पाहून तुम्हाला वरच्या जागा देऊ व तुमच्या अगांत स्वतन्त्र शाखा चालविण्याची धमक आली म्हणजे तुम्हास येथील अधिकारी करून शाखा स्थापन करू. आमचे नांव व तुमची मालकी व भांडवल अशा दोहातीं कारभाराची पद्धत आमच्या स्टोअरमध्यें नाहीं आणि ती यशस्वी व्हवयाचीहि नाहीं. तुम्हाला स्वतःचे दुकान चालवावयाचें असल्यास आम्ही तुम्हाला एक टक्क्यावर माल पुरवू, कारण आमचे मॅनेजर सर्व देशातील कारखान्यांत स्वतः जाऊन माल खरेदी करितात यामुळें तो तुम्हाला स्वस्तच पडेल."

या प्रमाणें लोकमान्यानीं आपला सल्ला दिल्यानतर देशी दुकानांच्या हला-खीच्या स्थितीबद्दल त्यांच्या ओठाच्या आड थबकून राहिलेले विचार बाहेर पडले. ते म्हणाले:–"व्यापारात व उद्योगधद्यात दक्षिण्यानीं आपलें लक्ष घालावे तसे घातलें नाहीं व पुढें घालतील अशी आशा वाटत नाहीं. व्यापारात पडावे असें त्याना वाटत नाहीं, कारण त्यांत खाव्या लागणाऱ्या खस्ता, जोखीम व धडाडी, ही जितकी टाळता येईल तितकी टाळण्याकडे त्याचें लक्ष फार. दक्षिणी उठला कीं नोकरीचा अर्ज घेऊन बाहेर पडतो. शिकण्याचा पहिला उपयोग म्हणजे तो नोकरीचे अर्ज खरडणें हाच समजतो. ११ ते ५ ऑफीसचें काम केल्यानतर उपरणें झाडून घराकडे निघाला म्हणजे आपल्या कर्तबगारीवर आपल्या मालकानें केवढी कमाई केली हें जाणण्याची जिज्ञासा न बाळगतां एक तारीख केव्हां येते व पगाराचा दिवस केव्हां उजाडतो हें पाहात असतो. फार मोठी महत्वाकांक्षा म्हणजे बढतीची बाळगतो. व्यापारांतल्या सोळा–बारा चा धक्का त्यास सहन होत नाहीं. अल्प कां असेना, पण महिन्याच्या काठीं मिळणाऱ्या रकमेच्या ठराविकपणावर ते सतुष्ट असतात. ह्याचा परिणाम दक्षिणी हे दरिद्री. व दारिद्र्य हें सर्व आपत्तीचें उगमस्थान. कोणतेंहि कार्य करावयास पैसे लागतात व त्यासाठीं लक्ष्मीपुत्र जे गुजराथी मारवाडी यांच्या तोंडाकडे पाहाणें भाग पडतें. आम्हासारख्यांच्या सर्व आकांक्षा पैशाच्या अभावामुळें मनांत जिरवाव्या लागतात. पैसाफडासाठीं इतकी धडपड करीत असतांहि प्राप्ति किती थोडी पाहता ना ! हाच फंड गुजरा-

त्यांत असतां तर आतांपर्यंत त्यांनीं ७।८ प्रयोगशाळा स्थापन केल्या असत्या. हें आम्हा दक्षिण्यांच्या दारिद्र्याचें प्रत्यक्ष उदाहरण. दारिद्र्य नको असल्यास व्यापाराची तागडी, लोकलज्जा, आळस, ऐदीपणा, रिकामा मोठेपणा हें सोडून दिलें पाहिजे."

---

## नरहर शिवराम परांजपे

[ तपस्वी, डॉक्टर, बृहन्महाराष्ट्राचे स्वयंप्रचारक. ]

( १ ) लोकमान्य फार भोळे होते अशी पुष्कळांची समजूत झालेली आहे. पण वस्तुतः ती त्याची चूक होय. लोकमान्यासारखा चाणाक्षपणा व कार्यसिद्धी करिता साधनाची बेफिकीरी क्वचित् ठिकाणींच आढळेल. त्यांचे सर्व लक्ष ध्रुव ताऱ्याप्रमाणें केवळ ध्येय सिद्धीकडेच असल्यामुळें ते इतर गोष्टींकडे दुर्लक्ष करीत इतकेच. एका गृहस्थाकडे त्यांनीं कांही लिहिण्याचे काम दिलें. त्या गृहस्थास पानसुपारी खाण्याची अतिशय संवय होती यामुळे त्यांचे पानसुपारीवांचून अडलें. पण ही गोष्ट त्यांस उघड बोलतां येईना. तथापि लोकमान्यांचे लक्षात ही गोष्ट आली. म्हणून स्वतः त्यांनीं पानसुपारीचें तबक तयार करून त्या गृहस्थापुढें आणून ठेवलें व म्हणाले, " आता तुमच्या कामात व्यत्यय येण्यासारखी कोणतीहि गोष्ट राहिली नाहीं ना ! तर मग आतां काम झपाट्याने चालू द्या !"

(२) लोकमान्यांच्या एका परगांवच्या मित्रास अपेयपानाचे व्यसन होते. हे गृहस्थ लोकमान्याकडे कामानिमित्त मधून मधून येत असत त्यावेळीं त्याच्या निजावयाच्या खोलींत लोकमान्यानीं ××× बाटली पाहिली; पण काहीं बोलले नाहींत. याचा अर्थ त्यांना त्या गोष्टी आवडत होत्या असा मात्र नाहीं. कारण तो मनुष्य कर्तबगार आहे असें त्यांना वाटलें व देशकार्यास आपण त्यांचा शक्य तितका उपयोग करून घेऊ या हेतूनेच ते अशा गोष्टींकडे दुर्लक्ष करीत.

(३) मुंबईस भरलेल्या एका सभेंत टिळकांचे समक्ष एकदा अ० दा० काळे यांनीं टिळकांवर व 'केसरी'वर सडकून टीका केली. नतर लोकांनीं काळे यांस अशी भीति घातली कीं, 'केसरीं'त तुमच्या विरुद्ध मजकूर आल्यास तुमचें सार्वजनिक आयुष्य सपले ! यामुळें काळे घाबरले; पण पुढें 'केसरीं'त केव्हांहि टीका न आल्यामुळे त्यांना आश्चर्य वाटून ते लोकमान्यास भेटले व त्यांना वाटत असलेली भीति त्यांनीं त्यांस निवेदन केली. तेव्हां लोकमान्य म्हणाले, " कार्यकर्त्या मनुष्यांनीं आपला ओबडधोबड स्वभाव व व्यवहाराचें अज्ञान व्यक्त केले म्हणून त्यांना मागे खेचणें युक्त नाहीं. कार्यकर्ती माणसें अत्यत दुर्मिळ असतांना

त्यांच्या विरुद्ध मी लिहीन ही तुम्हांस कल्पना झाली तरी कशी ! राष्ट्रकार्यांत मानापमान माझे मनांत येईल हे तुम्हांस वाटले तरी कसें ? " हें ऐकून अताशी-पत यांस लोकमान्यांच्या थोर स्वभावाची प्रतीति आल्यानें ते अगदीं थंड-गार झाले !

(४) कोणत्या कसल्याहि गहन विषयासबधानें उत्कृष्ट समजूत पटवून द्यावी तर ती लोकमान्यांनींच. एकदां मी धुळे येथे गेलों असतां तेथील लोकांनीं मला सांगितलें कीं, मॅंटेग्यू सुधारणेसबधाने लोकमान्यांचें मत आम्हीं त्यांस विचारिलें असतां त्यांनीं सूत्रमय वाक्यांत पण सर्वांस समजेल अशा रीतीनें त्या सुधारणा-संबंधीं आपले मत व्यक्त केले. ते हांसत म्हणाले, " सरकार—हे माटेग्यूसाहेब—लोकांच्या हातावर चार आण्याचा माल ठेवून त्याबद्दल रुपाया मागत आहेत; मी त्यास चार आण्यांची पावती देऊन बाकीच्या बारा आण्याचें बिल त्याच्या हातावर ठेवीत आहे, इतकाच काय तो फरक ! ! "

---

## केशव विश्वास फणसे

[ ऑनररी मॅजिस्ट्रेट, जमीनदार, सिहोरा, जि० जबलपूर. ]

' सुधारक ' पत्र निघाले तेव्हांपासून मी तुलनात्मक दृष्टीने ' केसरी ' वाचू-लागलों. प्रथम माझा कल आगरकर—रानड्याकडे विशेष होता. पण समतोल दृष्टीचे गुरु कै० हरि माधव पडित यांच्या सहवासांत राजकीय—सामाजिक सुधारणांकडे म्हणजे टिळक—आगरकरांकडे मीहि समबुद्धीनें पाहू लागलों. पुढे लो० टिळकावर अनेक कठीण व चमत्कारिक प्रसंग येऊन ते त्यांतून अलौकिक धैर्यानें व अजब कर्तबगारीनें पार पडले. तेव्हा आगरकर—रानड्यांपेक्षां लो० टिळकांकडे माझा अधिकच ओढा झाला. 'ओरायन'—'आर्कटिक होम'—'गीता-रहस्य' या अलौकिक ग्रथत्रयामुळे तर ह्या थोर पुरुषांबद्दलचा माझा आदर उत्तरोत्तर वाढत जाऊन भक्तिरूपात परिणत झाला.

( १ ) ता० १७।९।१८९८ रोजीं जबलपूरच्या पत्रांत सुप्रसिद्ध वीरश्री शकर-शास्त्री सोमण लो० टिळकांच्या सुटकेबद्दल त्यास खालील श्लोक पाठवितातः—

क्वणंतौ मंजीरौ यदपि पदशोभां प्रकुरुतो ।
रणत्कांची शाटीमभिच कटिभूषां वितनुते ॥
वरौ तौ केयूरौ करकमलकांतिं कलयतः ।
तथाप्येतत्सर्वं ललितयति भाले सुतिलकः ॥ १ ॥

अर्थ:—कोणी बोलके देशभक्त पैंजणासारखे देशभूमीला शोभवितात, पण त्यांची पोंच पायांपर्यंतच. कोणी बोलक्या देशभगिनी साडीवरील कंबरपट्या-प्रमाणें मध्यप्रांत शोभविण्या इतक्याच योग्य असतात. कोणी याहून वरिष्ठ पुरुष बाजूबंदासारखे देशलक्ष्मीच्या उदार हस्ताची शोभा वाढवितात. पण या सर्वांवर ताण करणारा, भाग्यवंतांचा माग्यवत, अलकारांचा अलंकार, सरस शोभन तिलक याची महती कांहीं वेगळीच !

( २ ) सन १८९९ च्या लखनौ कॉंग्रेसनतर लो० टिळक ब्रह्मदेशचा प्रवास आटपून काशीवरून जबलपुरास आले. ते जबलपुरास येत तेव्हां रा० गणपतराव साने यांजकडे उतरत. त्यांचे बरोबर बोलण्यास, फिरण्यास व राहाण्यास साने मला ठेऊन घेत. मला ते इष्टच होतें. आम्ही रा० गोळवलकरांचे वाड्यांत 'ब्रह्मदेश प्रवासा'वर लोकमान्यांचें व्याख्यान करविलें. त्यांत ब्रह्मदेश व हिंदुस्थान यांच्या स्थितीची तुलना करून लोकमान्यांनीं सामाजिक सुधारणेवर प्रतिकूल टीका केली ( केळकरकृत टिळकचरित्र पाहा. पृ. ६५२ ). त्याच सुमारास सान्यांचे दुकानीं लोकमान्य एक मजेदार गोष्ट बोलले. ते म्हणाले—"काशीचे पंडित म्हणतात कीं सुधारकांनीं रूढीवर टीका करताना उतावीळपणाने आमच्यावर तुटून पडू नये. आम्हीं हळू हळू त्याला येऊन मिळू" इ० त्यावर संधि पाहून आम्ही त्यांचीं सामाजिक मतें विचारलीं. तेव्हां 'मी त्यावर फारसा विचार केला नाहीं' असें लोकमान्यांनीं उत्तर देऊन आमची निराशा केली. या व्याख्यानाचा व संभाषणाचा सविस्तर रिपोर्ट मी बातमीदार या नात्यानें नागपूरच्या 'देशसेवक' पत्रांत प्रसिद्ध केला. त्यावर अर्थात् पुण्याचे 'सुधारकां'त टीका आली. तिला उत्तर म्हणून लोकमान्यांनीं पुण्यास वसत व्याख्यान मालेत ता० ७।६।१९०० रोजीं या प्रवासासंबंधीं एक सविस्तर व्याख्यान देऊन जबलपूरच्या व्याख्यानाची सुधारलेली आवृत्ति काढली. ( टिळकचरित्र पृ. ६५० ) रिपोर्टांत किंवा टीकेंत गैरसमजामुळें लोकमान्यांस 'विपर्यास' वाटला असें दिसतें. अन्याय म्हटला म्हणजे तो राजकीय असो कीं सामाजिक असो, तो सारखाच. तो पुढाऱ्यांचे लक्षांत येऊन त्याचा त्यास तिटकारा वाटला पाहिजे. कोणता प्रधान, कोणता गौण या वादांत व्यर्थ वेळ न घालवितां, त्याचा प्रतिकार स्वतः कांहीं कारणांनीं केला नाहीं, तरी दुसरे करीत असतां निदान विरोध तरी करूं नये. ह्यावर नम्रपणें भीतभीत चांगल्या हेतूनें लोकमान्यांचें मत विचारिलें असतां त्यांनीं आम्हांला फेंटाळून लाविलें. म्हणून निरुपायास्तव आम्ही आपले गाऱ्हाणें वेशीवर टांगलें. यामुळे परस्पर टीका होऊन सामाजिक सुधारणा लोकमान्यांस थोडी तरी मान्य झाली व आमचाहि हेतु थोडा तरी साधला. रा० नरसोपंत केळकरांनीं हा भाग टिळकचरित्रांत सविस्तर दिला आहे, त्यांत वरील माहिती प्रसंगस्पष्टीकरणास अवश्य म्हणून आम्हीं दिली आहे.

( ३ ) सन १८९९ च्या सुमारें ' आर्क्टिक होम ' ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वीच त्याची कीर्ति ऐकून तो वाचण्याची मला उत्कट इच्छा झाली. सुदैवानें लोकमान्य जवलपुरास येऊन रा० सान्याकडे उतरले. मलाहि सान्यानीं ठेऊन घेतलें. पण हस्तलिखित प्रत लोकमान्य देतील कीं नाहीं ही शंका येऊन ती मागणें मला योग्य वाटेना. तेव्हां युक्ति केली. विद्यार्थ्यांप्रमाणें ' ओरायन'वर खूप शंका विचारून ग्रंथ सूक्ष्म वाचल्याची खात्री पटविली. लोकमान्य खूष झाले व त्यांचा आपल्यावर विश्वास उत्पन्न झाला असें पाहून हळूच ' आर्क्टिकहोम'ची कल्पना ( theory ) विचारिली. त्याबरोबर त्यानीं विश्वस्तपणें सबंध हस्तलिखित प्रतच माझ्या स्वाधीन केली ! इतकेंच नाहीं तर सर्व ग्रंथ एका दिवसात वाचणें अशक्य म्हणून मधलीं महत्त्वाचीं दोन प्रकरणें दाखवून तीं वाचा म्हणजे मुख्य सिद्धांत समजतील असें त्यानीं सांगितलें. मी अर्थात् साश्चर्य आनंदात जिवाशीं तो ग्रंथ लाऊन घरीं आलों व जाग्रण करून तीं दोन प्रकरणें मी व माझ्या भाच्यानें वाचून सकाळीं एकमेकांला आपआपल्या वाचनाचा गोषवारा सांगून तो अद्वितीय ग्रंथ सुरक्षित परत केला. ती प्रत आम्ही गबाळपणानें हरवली असती तर लोकमान्यांची मिल्लसारखी हानि होती. तरी त्यांनीं विश्वासानें ग्रंथ दिला याची मला हमेशा साश्चर्य आठवण होते, व त्यांच्या गुणप्रिय स्वभावाचें कौतुक वाटतें. त्यांच्या मागे त्यांचा ' वेदांगज्योतिषा'वरील अप्रसिद्ध निबंध वाचण्यासहि मिळण्याची मारामार पाहून तर जास्तच कौतुक वाटते.

( ४ ) १९१६ सालीं मुंबईस मी माझे व्याही कै० दाजीसाहेब खरे यांचे घरीं उतरलों असतां त्यावेळीं लोकमान्यहि तेथेंच उतरले होते. न्या० मू० शहा व बॅचलर यांच्यापुढें राजद्रोहाचे खटल्यांत ४०००० रुपयांच्या जामिनावर अपील असून त्या दिवशीं निकालाची सुनावणी होती. जेवण झाल्यावर लोकमान्य म्हणाले, ' येतां का हायकोर्टांत ? ' मीं म्हटले, ' नको विरुद्ध निकाल ऐकावयास. पण आपण म्हणता तर येतो. ' लोकमान्य म्हणाले, ' चला, गमत पहा. निकाल कांहीं होवो. ' मी बरोबर जाऊन कोर्टांत एका वकीलाजवळ बसलों. बराच वेळ प्रश्नोत्तरे ऐकून मी, कटाळून एका बाजूला बाहेर बारेवशी जाऊन खालचा देखावा पाहात बसलों. इतक्यांत निकालसुनावणी केव्हां झाली ती आम्हा पुष्कळांस गर्दींत कळली देखील नाहीं. न्यायमूर्तिद्वयानें जामीन–हुकूम रद्द केला. घाईघाईनें बाबा विद्वांस आले. ते व मी गर्दींतून गपचिप बाहेर पडून मोटारींत हार, तुरे व मिठाई घेऊन परत हायकोर्टांत आलों. ना० पटेलच्या चेंबरमध्ये लोकमान्यांस हार घालून पेढे वाटले. छोटा अभिनंदन समारंभ झाला. तेव्हां हळूहळू लोकांना विजयवार्ता कळली. लोकमान्यांची वृत्ति प्रथमपासून अखेरपर्यंत ' सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ' याप्रमाणें पाहून त्यांचेविषयीं अधिकच आदर व कौतुक वाटलें.

(५) एकदां लोकमान्य जबलपुरास आले. तेव्हां लोकांनीं आग्रहाने व मोठ्या थाटानें त्यांची मिरवणूक काढली. लोकसमूह अफाट समुद्रासारखा दिसत होता. लाटांप्रमाणे जयघोष सारखे आदळत होते सर्व जातींच्या लोकांनीं त्यांचा अपूर्व सन्मान केला. जणूं घटकाभर स्वराज्य मिळाल्याप्रमाणे आपल्या अनभिषिक्त राजाला प्रेमाश्रूंनीं अभिषेक घालीत हौस फिटेतो लोकांनीं त्यांस मिरवीत नेलें. त्यावेळीं लोकमान्य उत्तर प्रांत काबीज करण्यापूर्वी औदीच्यांचीं मनेच काबीज करीत होते असे भासले. 'अलफखांच्या तलैया' स त्या दिवसापासून 'टिळक मैदान' म्हणतात. तेथें लोकमान्यांचें स्वराज्यावर इग्रजींत व्याख्यान झाले. अध्यक्ष मवाळाग्रणी आमदार शुक्ल होते. कॉलेजचे विद्यार्थी, प्रिन्सिपालची बंदी होती तरी, ह्या थोर पुरुषाच्या दर्शनाला व व्याख्यानाला आले होते. डी. एस. पी० व १,२ इंग्रेजहि कौतुकाने येऊन ह्या मराठा वीराकडे सस्मित सादर पाहात होते, व समारभाचे पुढारी रा० म० कृ० गोळवलकर यास व्यवस्थेत मदत करीत होते. प्रयाणाचे वेळींहि ते फाजील गर्दी होऊन लोकमान्यांस त्रास होऊं नये व निवडक लोकांना तर लो० मा० चे डब्याजवळ दर्शनाला जातां यावे, म्हणून गोळवलकरांचे इच्छेप्रमाणें इष्ट त्यास प्लॅटफार्मवर सोडीत होते. शेवटीं प्रचंड जयघोषांत गाडी सुटली. जबलपुरची 'तिलकमैदान,' 'तिलकमंदिर,' व 'तिलकपुस्तकालय,' हीं उत्तर हिंदुस्थानातील विजयस्मारकें महाराष्ट्रास अभिमानास्पद आहेत.

(६) सन १९२० जूनच्या सुमारास अलाहाबादेस होमरूल सभेला जाताना वाटेत जबलपूर स्टेशनावर लोकमान्यांस अल्पाहाराकरितां लोकांनीं आग्रहानें उतरून घेतले. प्लॅटफार्मवर इतकी चेंगराचेंगरी झाली कीं, त्यांचे स्नेही रा० साने त्यांना भेटू शकले नाहींत. ते गर्दीत सांपडून बेशुद्ध पडले. तें गाडींत ऐकून लोकमान्यांस फार वाईट वाटले. परततांना लो० मा० कोणालाहि न कळवितां अचानक जबलपुरास आले. ते सान्यांचे दाराशीं टांग्यांतून उतरतांना पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. मागच्यासारखी चेंगराचेंगरी होऊन अपघात होऊ नये म्हणून न कळवितां आलों असें लोकमान्य म्हणाले !

एकदां जबलपुरास शुद्धपंचांगप्रसारार्थ, प्रमुख ज्योतिषी कोण आहेत, त्यांस भेटावयाचे आहे, असें लो० मा० बोलले. तेव्हां वृद्ध वेलापूरकरांचे नांव सांगून लोक त्यांस बोलावयास जाऊं लागले असें पाहून लोकमान्य म्हणाले—'नको, आपणच त्यांचे घरीं जाऊ या' हा साधेपणा पाहून लोक चकित झाले !

---

## दत्तात्रेय परशराम चिंचाळकर

[ बी. ए एल् एल् बी, वकील, अमळनेर. ]

( १ ) लोकमान्यांचें पहिलें पुण्यदर्शन मजला माझ्या वयाच्या १० व्या वर्षी घडलें. तें दर्शन ज्या परिस्थितींत घडलें त्या परिस्थितीचा माझ्या मनावर व मजसारख्या त्यावेळच्या लहान विद्यार्थ्यांच्या मनावर चिरस्थाई असाच परिणाम होण्याजोगा होता. ही परिस्थिति म्हणजे पहिल्या राजद्रोहाच्या खटल्यातून लोकमान्यांची १८९९ सालचे सुमारास मुक्तता झाली ती वेळ होय.

( २ ) १९०५ सालीं बगभग होऊन बहिष्काराची चळवळ देशांत सुरू झाली. त्यावेळीं जी पहिली जाहिरसभा, सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत झाली ती विद्यार्थ्यांचीच होती व या विद्यार्थ्यांच्या पहिल्या राजकीय समेचे अध्यक्ष, लोकमान्यच होते. ही सभा घडवून आणण्यात पुण्यातील सर्व शाळा व कॉलेजें यांतील विद्यार्थ्यांनीं भाग घेतलेला होता. त्यात प्रस्तुत लेखकहि फर्ग्युसन कॉलेजातील एक विद्यार्थी म्हणून भाग घेणारा होता. लोकमान्यांच्या नेतृत्वाखालीं ही सभा अत्यत यशस्वी झाली हे सांगणें नकोच. मागाहून स्वदेशी चळवळीसंबधानें पुण्यांत शेंकडों सभा झाल्या, परतु पहिली सभा त्या वेळीं विद्यार्थ्यांनीं घडवून आणलेली होती, व सभेतील ठरावांवर सर्व भाषणे विद्यार्थी वक्त्यांचींच झालीं होतीं हे लक्षात घेण्यासारखें आहे. 'लोकमान्य' ही पदवी १९०५ सालींहि पुष्कळच रूढ झालेली होती असें दिसतें. कारण या सभेच्या सुरवातीस देशभक्त शिवरामपत परांजपे यांनीं सूचना केली होती कीं, 'लोकमान्य' टिळक यांनीं आमच्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारावें. या सूचनेस देशबधु विनायकराव सावरकर यांनीं एकाच चटकदार वाक्यात अनुमोदन दिलेलें होतें व तें वाक्य अद्याप प्रस्तुत लेखकाच्या कानात घुमत आहे. तें असे कीं " एका लोकमान्यांकडून दुसऱ्या लोकमान्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी आलेली सूचना योग्य आहे तिला मी अनुमोदन देतो." या सभेतील आपल्या प्रास्ताविक भाषणांत लोकमान्यांनीं सांगितलें कीं " विद्यार्थ्यांच्या सभेचें अध्यक्षस्थान मी स्वीकारलें यांत विसगतपणा वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. मीहि आपल्या स्वतःला एक विद्यार्थीच मानीत असतो. फरक एवढाच आहे कीं, मी एक दाढीमिशा असलेला प्रौढ विद्यार्थी आहें. एका दृष्टीनें विचार केला तर राजकीय प्रगतीच्या बाबतींत आपण हिंदुस्थानांतील सर्व लोक विद्यार्थीच आहोंत. विद्यार्थी या नात्यानेंच तुमच्या सभेंत भाग घेण्याचा मला हक्क आहे म्हणून मी अध्यक्षस्थान स्वीकारलें आहे."

( ३ ) श्री० मळेकरांच्या वाड्यात ग्रथकारांचें समलेन झाल्यावेळीं त्यात लोकमान्यांचें एक अत्युत्कृष्ट भाषण झालें. अध्यक्ष रावसाहेब कानिटकर पेन्शनर

सवजज्य होते व सभेस कित्येक सरकारी नोकर व पेन्शनर असे ग्रंथकार आलेले होते. अशा सभेंत राजकारण वगळून केवळ साहित्यसेवेवर भाषण करण्याबद्दल कोणा तरी खेही सभासदानें लोकमान्यांस अगाऊ इषारा दिला असावा असें वाटते. त्यास अनुलक्षून लोकमान्य आपल्या भाषणांत म्हणाले " राजकारणाशीं कांहीं एक संबंध न येतां साहित्यसेवेबद्दल सांगितले पाहिजे अशी अट घालणें म्हणजे भाजींत तिखट व मीठ हे पदार्थ घालण्याची मात्र मनाई करून ती भाजी चांगली चवदार झाली पाहिजे असें सांगण्याप्रमाणेंच आहे! मनुष्याचें अगर राष्ट्राचें कर्तव्य-क्षेत्र व व्याप ज्या मानानें वाढेल त्या मानानेंच त्या राष्ट्राच्या भाषेचीहि अभि-वृद्धि होत असते. देशाचा राजकीय व्याप वाढेल तर त्यावरोबर भाषेची प्रगतीहि वाढेल. केवळ कृत्रिम राजाश्रयानें भाषेची खरीच अभिवृद्धि होऊं शकत नाहीं.... आपल्या बांधवांस कळविण्यासारखा देशाच्या हिताचा असा कांहीं तरी संदेश जर आपल्या हृदयात असेल व त्याबद्दल आपणास अतीशय तळमळ उत्पन्न झालेली असेल तर त्याच वेळीं खरी भाषा निर्माण होते व ती वाढत जाते. " वगैरे.

---

## दत्तात्रय वामन जोशी
## व
## विठ्ठल वामन घाणेकर

[ सेक्रेटरी महाराष्ट्रीय मोफत वाचनालयसंघ. ]

( १ ) न्यू इंग्लिशस्कूलमध्ये असतांना माझे मित्र रा० भोपळे वगैरे मित्रांच्या साहाय्यानें येथील शनवार पेठेंत ' सहकारी मोफत वाचनालय ' ही संस्था आम्ही काढली. सदरहु वाचनालय आतांपर्यंत श्री. श० स० मराठे M. A. Act-uary) यांच्या नेतृत्वाखालीं चालूं आहे. १९१६ सालीं वाचनालयाच्या वाढ-दिवसा निमित्त छोटा समारंभ करावा असें स्वयंसेवकांच्या मनानें घेतलें. लोक-मान्य टिळकांनीं आपल्या वाचनालयांत यावें व आमची बालसंस्था पाहावी अशी माझी बलवत्तर इच्छा होती. वाचनालयाशीं संबंध असलेल्या वडील मंडळींचा सल्ला घेतला, तेव्हां ते म्हणाले " टिळक कसले वाचनालयांत येतात! तुला शक्य असल्यास त्यांना बोलाव व घेऊन येण्याची व्यवस्था कर. " असें म्हणून हेटाळणी केली. मी लोकमान्यांना भेटावयास जाण्याचा निश्चय केला. 'केसरी'

ऑफिसांत गेलो व श्री० तात्यासाहेब केळकरांना आमचा मनोदय निवेदन केला आणि त्याना विनति केली कीं, आमच्या तर्फे आपण टिळकांना निमंत्रण करून त्यांना कबूल करावयास लावावें. त्यावर तात्यासाहेब मला म्हणाले ' हे पहा, या बाबतींत तूं स्वतः टिळकांच्या समोर जाऊन त्यांना वाचनालयांत येण्याची विनति केलीस तर तावडतोब नक्की काम होईल मी गेल्यानें एखादे वेळेस ' नाहीं ' म्हणतील. टिळकांना तरुण विद्यार्थ्यांशीं बोलणे फार आवडतें ते खास हो म्हणतील ' झालें, मी टिळकाच्या पुढें जाण्याचा हिय्या केला; पण एक क्षणमात्रपर्यंत तोंडातून शब्द उमटेना. नंतर त्यांना चारपांच मिनिटात वाचनालयाविषयीं माहिती सागितली व पानसुपारीस येण्यास विनति केली. तो दिवस दिवाळींतील लक्ष्मीपूजनाचा असल्यामुळे त्याना पुष्कळ ठिकाणीं पानसुपारीस जावयाचे होते. 'प्रथमतः तुमच्या वाचनालयात येऊन नंतर मी दुसरीकडे जाईन' असें आश्वासन मिळाल्यावरोबर आम्हास अत्यानद झाला.

( २ ) लखनौ येथें गेल्यावर टिळकाना पुष्कळ पुढाऱ्याकडे स्वतः भेटावयास जाणें भाग पडलें· आणि त्यात त्याना कधीं मानहानीहि झाली असें वाटले नाहीं. राष्ट्रकार्याकरितां लहान सहान व्यक्तीकडेहि स्वतः जाणे कमीपणाचें वाटलें नाहीं. लखनौला मवाळ पक्ष व जहाल पक्ष कॉंग्रेसमध्यें एकवटले. राष्ट्रीय पक्षामध्ये टिळक हेच प्रमुख आणि त्याच्या जोडीला त्यांच्या तोडीने दुसरा कोणीच खरें कार्य करणारा नसल्यामुळें सर्व मुख्य जबाबदारीचीं कामे त्याच्या एकाट्याच्या शिरावर पडलीं होतीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ऑल इण्डिया कॉंग्रेस कमिटीची निवडणूक होती आणि त्याकरितां राष्ट्रीय पक्षानें आपले १५ गृहस्थ सदरहु पधरा जागाकरितां उभे केले होते; त्यात महात्मा गाधींचे नाव नव्हतें कारण गाधींचा समावेश मवाळपक्षामध्यें करण्यांत आला होता. ऑल इण्डिया कॉंग्रेस कमिटीची निवडणूक सकाळीं होणार होती. त्याच्या आदल्या रात्रीं लोकमान्य मिसेस बेझट बाईकडे २—३ तास चर्चा करून नुकतेच परत आले होते. थोडयाच वेळानें सुमारें ११ वाजतां महात्मा गांधी ( त्यावेळीं मिस्टरच होते ) अचानक तेथे आले. त्यांचा पोशाख व पेहराव अत्यत साधा असून ते अनवाणीच आले होते. डोक्याला गुजराथी फॅशनचा रुमाल बांधलेला होता आणि त्यावेळेस थडी जबर असल्यामुळें त्यांनीं एक घोंगडीं काखोटींत आणली होती. टिळक एका आरामखुर्चीवर बसले होते. गांधींनीं आंत येतांच टिळकांना विनयपूर्वक वदन केले आणि खालीं बैठकीवरच ते बसले. टिळकांचें व त्यांचे दीड दोन तास बोलणें होऊन टिळकांचें म्हणणें त्यांस पटलें. सकाळीं निवडणुकीच्या वेळेला राष्ट्रीय पक्षाच्या उमेदवारांच्या यादीमध्यें गांधींचा समावेश नसल्यामुळें प्रथमतः ते निवडून आले नाहींत. परंतु टिळकांनीं अध्यक्ष या नात्याने गांधीं कमिटीमध्ये निवडल्याचें जाहीर केलें, तेव्हां ते निवडून आले ! !

( ३ ) लखनौच्या राष्ट्रीय सभेचे अधिवेशन संपलें त्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं महाराष्ट्र कॅम्पाच्या गच्चीवर एक छोटासा गोड समारंभ झाला. अहमदनगरचे कै० हरिभाऊ पटवर्धन यांनीं डॉ० साठ्ये–वेलकरांचें अभिनंदन करून त्यांच्या गौरवपर भाषण केलें. " डॉक्टर साठ्यांच्या स्पेशल ट्रेनच्या योजनेमुळे निरनिराळ्या जिल्ह्यांतील पुढारी एकत्र प्रवास करूं शकले; आणि परस्परांमध्यें विचारविनिमयास अवसर मिळाला. सर्वांत महत्त्वाचें कार्य म्हणजे पुष्कळांना एक समयावच्छेदेंकरून लोकमान्यांच्या सहवासाचा अपूर्व लाभ व संधि मिळाली. कॉंग्रेस स्पेशलच्या योगानें राष्ट्रीय सभेविषयीं जास्त बोलबा झाला. " शेवटीं लोकमान्याना पुष्पहार समर्पण झाल्यानंतर ते म्हणाले–" डॉ० साठ्ये यानीं बॉम्बे नॅशनल युनियन काढली; आणि त्याचप्रमाणें इतर वैद्यकविषयक लोकोपयोगी कामेंहि ते करीत आहेत. पण त्यांची स्पेशल ट्रेनची टूम मात्र और असून ती त्यानीं पूर्ण यशस्वी करून दाखविली. डॉ० साठ्येवेलकरांच्यासारखे उत्साही, स्वार्थत्यागी आणि संयोजक ( organizers ) आपल्या राष्ट्रीय पक्षांत जास्त प्रमाणाने सामील झाल्यास आपल्या हातून होमरूलचें कार्य जोमाने व धडाडीने होईल असा मला भरंवसा आहे. " टिळकाना गुणाची पारख किती होती हें यावरून स्पष्ट समजलें. कॉंग्रेस डेप्युटेशन इंग्लंडहून परत आल्यानतर एके दिवशीं डेप्युटेशन सबधीं माहिती सांगत असतांना ते म्हणाले " डॉ० साठ्ये याचा कॉंग्रेस डेप्युटेशन प्रसगीं इंग्लंडमध्यें वेळोवेळीं अत्यंत उपयोग झाला. अशा तऱ्हेचे कल्पक व कार्यपरायण लोक मला मिळाल्यास मला फार मदत होईल. "

( ४ ) लोकमान्याना पुणे शहरातर्फे मानपत्र देण्याचा दिवस मुक्रर ठरला. त्याच्या अगोदर दोन दिवस टिळकाच्या अनुयायांनीं सदरहू मानपत्र टिळकांच्या चहात्या लोकातर्फे देण्यांत येणार असें ठरविलें; आणि समारंभाच्या आदल्या दिवशीं जाहीर केलें. कारण मानपत्र–समारंभ निर्विघ्नपणे पार पडेल किंवा नाहीं याबद्दल त्यास जबरदस्त भीति वाटली होती. सत्यशोधक पक्ष जोरांत होता. अशी परिस्थिति होती खरी; पण लोकमान्यांच्याविषयीं प्रेम व आदर असणाऱ्या तरुण मडळींना ही मानहानि सहन होणें अशक्य होतें. कोणताच निकाल लागण्याचें चिन्ह दिसेना. दुपारीं दोन अडीचच्या सुमारास लोकमान्यांचें या बाबतींत काय मत आहे हें अजमाविण्यास आम्ही गेलों. त्यांना टिळकांच्या चहात्यांच्या तर्फे होणाऱ्या मानपत्रसमर्पणसभेची छापील बातमी सांगितली मात्र. ते म्हणाले. " आणा पाहूं ज्ञानप्रकाश व लोकसंग्रह. या लोकांना मानपत्र देण्यास सांगितलें होतें कोणी ! " लोकमान्यांना मजकूर वाचून विस्मय व उद्वेग उत्पन्न झाला. ते म्हणाले " पुण्यांत मला लोकांना मानपत्र देतां येत नाहीं तर बाहेर हे काय दिग्विजय लावणार व करामत करणार ! वीस वर्षांपूर्वी गोखले,

बॅरिस्टर गाडगीळ वगैरेंनीं रेमार्केटांत एक प्रचंड जाहीरसभा बोलाविली होती. मला निमंत्रण होतें व मी सभेला गेलों होतों. त्यांनीं भाषणें केल्यानंतर मला बोलण्याची परवानगी मिळाली. माझें म्हणणें लोकांना पटलें तेव्हां मी लोकांना सवाल टाकला आणि सर्वांनीं हात वर केले. त्याबरोबर गोखले व बॅरिस्टर गाडगीळ याना सभास्थान सोडून पोबारा करणें भाग पडले. मी एकटा असूनहि मी ती सभा काबीज केली ! आणि हे लोक इतके असून माघार घेताहेत हें आश्चर्यच आहे." यानंतर लगेच मानपत्र सभेच्या सेक्रेटरीकडून रॅंग्लर परांजपे यांच्याकडे मानपत्र समर्पण पुणें शहरांतील सर्व नागरिकांच्या तर्फे होणार आहे अशा आशयाचें पत्र रवाना करण्यात आले; आणि टिळकांनीं स्वतः ठरवून दिलेल्या योजनेप्रमाणें मानपत्रसमारंभ यशस्वी रीतीनें पार पडला.

( ५ ) टिळक डेप्युटेशनहून परत आल्यानंतर पुण्यांत त्यांना अनेक ठिकाणीं मानपत्रें मिळालीं व त्यांचा सन्मान झाला. पुणें शहरांतील मोफत वाचनालयांच्या तर्फे किर्लोस्कर थिएटरमध्यें त्यांचा सन्मानकरण्यांत आला. त्यावेळीं ते उपरादाखल झालेल्या भाषणात म्हणाले, " मोफत वाचनालयें ज्ञानलालसा व तृष्णा तृप्त करू शकतात. पुरातन काळापासून पाणपोया बांधून तृषा शमन करण्याचें श्रेय राजे व श्रीमान् लोक करीत आले आहेत. पाणपोईवर धनवान व साधनसंपन्न गृहस्थ पाणी पिण्यास कचरतो; परंतु मुक्तद्वार वाचनालयामध्यें गरीब, श्रीमंत, वृद्ध, तरुण, पुरुष, स्त्रिया, ब्राह्मण, ब्राह्मणेतर वगैरे भेदाभेद नाहीं. वाचनालयें पुढे लवकरच एकीकरणाचीं केंद्रें होऊ शकतील असा मला विश्वास आहे. वाचनालयांच्या प्रसारामुळें लोकजागृती झपाट्यानें होऊ शकणार आहे. "

(६) एकदां आमचे एक स्नेही टिळकांना भेटावयास गेले असतांना आपला मॉटो motto काय आहे याविषयीं प्रश्न केला आणि सदरहु मॉटो टिळकांनीं त्यांनीं बरोबर आणलेल्या नोटबुकांत स्वहस्ताक्षरानें लिहावा अशी विनंति केली. लोकमान्यांनीं नोटबुकांत खालील मजकूर लिहिला. ' Trust in God and do your duty. '—' ईश्वरावर पूर्ण विश्वास ठेऊन आपण आपलें स्वकर्तव्य करावें ' या खालीं त्यानीं आपली सहीहि केली.

# शंकर विष्णु फडणीस

[ प्रोफेसर नॅशनल कॉलेज-मुंबई, संस्थापक व चिटणीस ' धर्ममंदिर ' मुंबई. ]

(१) १९१४ सालीं मी पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजांत दाखल झालों. त्या वेळीं लोकमान्य मंडालेसच होते. मी एकदोन कर्नाटकीय मित्रांबरोबर सदाशिवपेठेंत राहात असे. टिळक सुटल्याची बातमी आली व त्यांना गायकवाडवाड्यांत पहावयास जावयाचा बेत ठरला. टिळक हे ' राजद्रोही ' असल्यामुळें विद्यार्थ्यांनीं त्यांना भेटणें अनुचित होय, असा युक्तिवाद मी लढविला. पण इतर सोबत्यांनीं माझी विचारसरणी खोडून काढली. टिळक हे फर्ग्युसन कॉलेजचे संस्थापक व आम्ही त्याच कॉलेजचे विद्यार्थी आणि म्हणून आपल्या ज्ञानगंगेच्या संस्थापकाचें दर्शन घेणें आमचें पवित्र कर्तव्य होय, या विचारसरणीमुळे मीहि टिळकांचें दर्शन घेतलें.

( २ ) १९१५ सालीं लोकमान्यांचें गीतारहस्य प्रसिद्ध झालें. कॉलेजमध्यें जिकडे तिकडे गीतारहस्याचा विषय निघे. त्यांतून कॉलेजमधील--विद्वत्तेबद्दल नावाजलेले गुरुवर्य प्रो० रानडे--हे गीतारहस्याची फारच तारीफ करीत असत. या सर्व कारणांमुळें गीतारहस्याचें सांगोपांग अध्ययन करण्याची लालसा उत्पन्न झाली. ' गीतारहस्य ' समजण्याइतकी तत्त्वज्ञानादि विषयाची माहिती नसल्यामुळें ग्रंथातील प्रतिपादनाचें आकलन करतां येत नसे. तशांतून प्रामाणिक व अप्रामाणिक टीकांचा भडिमार. ' गीतारहस्य व टीकाकार ' या विषयावर लोकमान्य व्याख्यान देणार आहेत हें समजतांच मला आनंद झाला. मी व्याख्यान ऐकिलें. लोकमान्य शांतपणें, सोपपत्तिक व शास्त्रीयपद्धतीनें व युक्तिवादानें बुद्धीला पटवून देणारें विवेचन करतात, हें पाहून मला अत्यंत आश्चर्य वाटलें. त्यापूर्वी माझी समजूत अशी असे कीं, टिळक हे केवळ भावनोद्दीपक भाषणें करून लोकमान्य झाले असावेत. ज्याला आपण इंग्रजींत (Demagogue) डेमॅगॉग म्हणतों अशा प्रकारचें कांहींहि लोकमान्यांत पाहावयास सांपडलें नाहीं. अशा प्रकारें प्रत्यक्ष अनुभवानें त्यांच्याविषयीं हलकें--हलकें आदर वाटू लागला.

( ३ ) १९१७ सालीं कॉलेजमधील फि० ॲसोशियेशनचा मी चिटणीस होतो. त्यावेळीं बेझंट व लोकमान्य हे जहाल लोकाग्रणी समजले जात असत. युक्तीनें व मुत्सद्दीपणानें बेझंटचें व्याख्यान करविण्याला प्रि० परांजप्यांची लेखी परवानगी मी मिळविली होती. कै० लोकशिक्षणकर्ते ओक व बेझंट यांची व्याख्यानें करविल्याबद्दल कॉलेजमधील कांहीं प्रोफेसर मजवर नाराज झाले होते, हा भाग वेगळा ! ' मनुष्याचा धर्मातून विकास ' या विषयावर मिसेस बेझंट यांचें व्याख्यान कॉलेजमध्यें १९१८ मधील मार्च महिन्यांत प्रि० परांजपे यांच्या

अध्यक्षतेखालीं झालें. बेझंटचें व्याख्यान लोकमान्यांच्या अध्यक्षतेखालीं व्हावें, अशी विद्यार्थ्यांची इच्छा; पण सगळेंच मुसळ केरांत जाईल या भीतीनें लोकमान्यांचें स्वतंत्र व्याख्यान करविण्याचें आश्वासन देऊन त्या अडचणींतून मी मोकळा झालों. बेझंटबाईचें व्याख्यान व्हावयाच्यापूर्वीच लोकमान्यांना भेटलों व बिन राजकीय विषयावर फर्ग्युसन कॉलेजातील विद्यार्थ्यांपुढें एक व्याख्यान द्यावें, अशी विनति केली. " एकूण अराजकीय विषयावर माझ्या व्याख्यानाला कॉलेजच्या अधिकाऱ्यांची सम्मति आहे ! ठीक आहे. ' खाल्डियन संस्कृति ' या विषयावर माझें भाषण जाहीर करा; मग तर चालेल ना ?" असें ते म्हणाले. असो. दुर्दैवेंकरून व्याख्यानाचा योग जुळून आला नाहीं व त्याच सुमारास माझा कॉलेजचा अभ्यासक्रमहि संपला !

( ४ ) एकदा गीतारहस्यासंबधानें बोलत असता लोकमान्य म्हणाले, "अहो, माझें राजकारण सुद्धा गीतारहस्यांत तुम्हाला आढळेल. ' स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे ' हे जे मी म्हणतों तें कार्याकार्य शास्त्रातील आत्मस्वातन्त्र्याच्या सिद्धांतापासून निष्पन्न होतें. पापपुण्याची जबाबदारी जशी ईश्वरानें आम्हांवर टाकिली आहे तशीच कुराज्य अगर सुराज्य याबद्दलची जबाबदारीहि त्यानेंच आम्हांवर टाकिली आहे. ती हिरावून घेण्याचा हक्क नोकरशाहीस अथवा इंग्रजास कसा पोंचेल ? मवाळांच्या राजकारणाला ईश्वराचा व आत्मस्वातन्त्र्याचा पाठिंबा नाहीं, त्यामुळेंच त्यांच्या चळवळींत चैतन्य नाहीं. ना० समर्थादिकांचें स्वराज्यार्थ पात्रता सिद्ध करण्यांत व्यर्थ कालापहरण होत आहे. "

---

## श्रीधर विष्णु परांजपे

[ बी. ए., माजी प्रोफेसर, हनुमानगड, वर्धा ]

( १ ) माझे मित्र हरिभाऊ परचुरे बी. ए. यांचा पुनर्विवाह पुण्यास झाला, तेव्हां पुनर्विवाहितांबरोबर उघड पंक्तिव्यवहार करण्यास तयार असलेल्या मंडळींना भोजनास बोलावण्याचें ठरलें. ' पन्नास माणसें उघडपणे पुनर्विवाहितांशीं पंक्तिव्यवहार करण्यास तयार असल्यास आपण तयार आहों असें टिळकांनीं सांगितल्याचें माझे आतेभाऊ प्रोफेसर धोंडोपंत कर्वे यांनीं कळविलें. त्यावरून पुनर्विवाहाशीं सहानुभूति बाळगणाऱ्यांच्या यादींतून उघडपणें जेवणास तयार असणारांचीं नांवें टिपून कर्वे व मी असे उभयतां बळवंतरावजींकडे गेलों. आपल्या म्हणण्याप्रमाणें पन्नास ब्राह्मणमंडळी उघडपणें पुनर्विवाहितांच्या पंक्तीस

जेवण्यास तयार आहेत, तेव्हां आपण भोजनास या म्हणून आम्ही त्यांस आमंत्रण केलें. त्यावर ते म्हणाले "पन्नास ब्राह्मणमंडळी सभासद खरोखरीच पंगतीस जेवण्यास तयार असतील तर माझी हरकत नाहीं. मात्र मी तीं नांवें 'केसरीं'त छापीन." आम्ही 'हो' म्हटल्यावरून ते आम्ही केलेली यादी तपासूं लागले. तीं सुमारें उणीपुरीं शंभर नांवें उघडपणें जेवणाऱ्यांचीं भरलीं. तेव्हां ते चकित झाले व 'मी विचार करून काय तें कळवीन, मला तुम्ही खाजगी भेटा' असें मजकडे वळून म्हणाले. त्यावर त्यांच्याकडून कांहीं निरोप न आल्यावरून मी त्यांच्या भेटीस गेलों. तेव्हां त्यांनीं प्रथमतःच "मी 'केसरी'चा संपादक या नात्यानें तुमच्याशीं भाषण करीत नसून खाजगी रीतीनें बोलत आहें. 'केसरीं'त लिहिण्याचें आमचें धोरण ठरीव व वेगळें आहे. मला स्वतःला पुनर्विवाहितांबरोबर पंक्तीस भोजन करण्यास कांहीं हरकत नाहीं. परंतु मी तसें केल्यास माझ्या कृतीचा सुधारक लोक विपर्यास करून त्यामुळें माझ्या सार्वजनिक कार्यास बाध येईल." यावर मी त्यांना म्हटलें कीं. 'आपण कृतीनें पक्के सुधारकच नव्हे तर कित्येक बोलघेवड्या सुधारकांच्याहि पुढें गेलेले आहांत. मग आपल्या केसरींतील लेखांत व स्वतःच्या कृतींत विसंगतता काय म्हणून असते? आपण 'बंगाली' पत्राचे संपादक सुरेंद्रनाथ बानर्जी यांच्याप्रमाणें आपण आपलें धोरण कां ठेवीत नाहीं? बानर्जी जसे पक्के समाजसुधारक आहेत तसेच ते राजकीय सुधारकहि आहेत. परंतु ते आपल्या पत्रांत समाजसुधारणेविषयीं न लिहितां जसें राजकीय गोष्टीं-विषयीं तेवढें लिहितात, तसें आपण कां करीत नाहीं? मला बोलण्याची माफी करावी. परंतु यामुळें आपल्या लिहिण्यांत व कृतींत दुटप्पीपणा दिसत नाहीं काय?' यावर त्यांनीं शांतपणें सांगितलें कीं. "सुधारक लोकांचे मार्ग मला पसंत नाहींत. सामाजिक सुधारणा करतांना ते सरकारचें साहाय्य मागतात त्याच्या मी विरुद्ध आहें. लोकांना घेऊन सुधारणेची आवश्यकता त्यांना पटवीत सुधारणा करावी असें माझें मत आहे. मागें पुनर्विवाहाच्या वादाच्या वेळेस अक्षतयोनी विधवांच्या पुनर्विवाहास संमति देण्यास शंकराचार्यादि मंडळी तयार होती, पण विष्णुशास्त्र्यादि मंडळीनें सरसकट स्त्रियांच्या पुनर्विवाहास संमति मिळावी म्हणून आग्रह धरल्यामुळें तें काम बिनसलें. अगदींच विरुद्ध ठराव झाला. आपल्या हिंदुधर्माचे आचार्य व शास्त्रीमंडळी यांस वगळून, लोकांस खवळून, सरकाराच्या साह्यानें सामाजिक सुधारणा करूं पाहाणाऱ्या सुधारकांच्या मी विरुद्ध असल्यामुळें मी तसें लिहित असतों. काय जें करणें तें लोकांस घेऊन हळुंहळुं करावें असें मला वाटतें." नंतर मी त्यांना नमस्कार करून त्यांचा सप्रेम निरोप घेतला. यावरून लोकांस घेऊन त्यांना हळुंहळुं तयार करीत करीत सामाजिक सुधारणा करावी असें लोकमान्यांचें मत असून त्याप्रमाणें त्यांचें धोरण होतें हें अगदीं स्पष्ट होतें.

( २ ) केकावलीची सटीक द्वितीयावृत्ति छापून प्रसिद्ध होण्यापूर्वीच त्याची एक आगाऊ प्रत मी बळवतरावजींकडे पाठविली होती व तीवर 'केसरीं'त सविस्तर अनुकूल अभिप्रायहि आला होता. त्यानतर मी मद्रासकॉंग्रेसला न्यायमूर्ति रानडे यांजबरोबर जात असतांना बळवतरावजी त्याच गाडींत दुसऱ्या डब्यात आहेत असें कळल्यावरून त्यांना भेटण्यास त्याच्या डब्यात मी गेलों. तेथें त्यांचे रा० माधवराव गोळे यांच्या ' ब्राह्मण आणि त्याची विद्या ' या ग्रथाचें वाचन चाललें होतें. नमस्कार कुशलप्रश्नादि झाल्यावर मजकडे पाहून वासुदेवराव जोशी चित्रशाळेचे मालक विचारतात, ' काय हो पराजपे ! केकावलींत मोरोपतानीं ' गदारिदरनदकाब्जधरा नमस्ते सदा ' असें म्हणून विष्णूस नमस्कार केला आहे. यात गदा, चक्र, शख, नदकखड्ग व कमळ अशा पाच वस्तु सागितल्या आहेत. विष्णूचे हात चार असून त्यात शख. चक्र, गदा व कमळ अशा चार वस्तु दिलेल्या आढळतात. मग पाचव्या नदकखड्गाला जागा कोठली ?' यावर मी उत्तर देणार तोंच बळवतरावजी म्हणतात " अहो ! त्यांत काय अडचण आहे ? शखचक्रगदापद्म ह्या चार वस्तु चार हातात देऊन नदखड्ग विष्णूच्या कमरेस खोचावे म्हणजे झाले, " यावरून बळवतरावजींची समयसुचकता चांगली दिसून येते.

( ३ ) बळवतरावजी हे वेदान्ताचे मार्मिक अवलोकन करणारे असून ते आपल्या उच्छृखळ बनणाऱ्या अनुयायी गृहस्थाना आवरून त्याना योग्य मार्गानें नेत अशाविषयीं एक उदाहरण मला आठवतें. काशीस नामदार गोपाळराव गोखले याच्या अध्यक्षतेखालीं १९०५ सालीं कॉंग्रेस भरली. तेंव्हा गोखले व टिळक या दोन्ही पक्षाची पुष्कळ मडळी काशीस जमली होती. कॉंग्रेसच्या बैठकीच्या एके दिवशीं मी पुण्याच्या मडळींस भेटण्यास डेक्कन क्यापमध्यें गलों. तेथें इतर मडळींना भेटल्यावर मी बळवतरावजी उतरले होते तेथें गेलों. त्यावेळीं ते एका खाटेवर बसले असून त्याची इतर मित्रमडळी त्याच्या भोवतीं होती. कॉंग्रेसपुढें येणाऱ्या ठरावासंबधीं चर्चा चालली होती माझे मामा केळशीचे मोरोबा भट यांचा व बळवतरावजी व त्यांचे भाचे बाबा विद्वास याचा दाट परिचय होता, म्हणून मीहि टिळकाना मामांच्या ठिकाणीं समजत असे. शिवाय त्यांच्याबद्दल माझ्या मनात फार आदर असल्यामुळें मी मुकाट्याने टिळकाच्या पायापाशीं बसून त्यांची चरणसेवा करीत होतो. वासुदेवराव जोशी यानीं मला पाहून 'तुम्ही समाजसुधारक असून धर्मविचारांकडे कसे वळले ? तुम्ही एकदा आमच्या क्यांपात बळवतरावजीपुढे कीर्तन करून तुमच्या मतात एवढा फरक कशानें झाला ते आम्हांस सांगा ' म्हणून मला आग्रह करूं लागले. त्यावर मी ' हे दिवस गडबडीचे आहेत. पुढें एखादेवेळीं जुळल्यास मी तुमची कीर्तनरूपानें सेवा करीन' असें सांगितलें. तेव्हां बळवंतरावजी म्हणालेः—"त्याचें म्हणणें बरो-

वर आहे. त्यांना सध्यां आग्रह करूं नका. शिवाय मनांत फरक पडण्याचीं कारणें तरी ते नवीं कोठून सांगणार ? जुन्या धर्मग्रंथांत वेदान्ताच्या अधिकाऱ्याविषयीं लिहिताना विवेकवैराग्यादि साधनचतुष्टयसंपन्न जीव होतो तेव्हां तो परम पदाचा अधिकारी होतो असें सांगितलें आहे. त्यांत सर्व आलें. अशाप्रकारचे कांहीं अनुभव यांना आले असतील. यापेक्षां जास्त काय असणार ! " नंतर कांहीं वेळानें कॉंग्रेसच्या ठरावाविषयीं बोलणें चालू झाले व कॉंग्रेसची घंटा वाजली, तशी बरीच मंडळी कॉंग्रेसच्या मंडपांत निघून गेली. बळवंतरावजी त्यांच्या बरोबर न जातां कांहीं वेळ क्यांपांतच बसले होते. थोड्या वेळानें त्यावेळीं जहालांत गणले गाणारे एक नागपुरवऱ्हाडप्रांतांतील पुढारी कॉंग्रेस मंडपांतून संतापून परत येऊन बळवरावजींस आवेशानें म्हणाले " बाळासाहेब, आम्हाला आणावयाची उपसूचना अध्यक्ष शोखले आणू देत नाहींत. तुम्हीं सांगाल तर आतां मी त्यांना खुर्चीवरून खालीं ओढतो;" यावर बळवंतरावजी त्यांस शांत करीत म्हणाले " अहो ××××× तुम्ही संतापतां कां ? असें भलतेंच कांहीं करू नका. आपण शांततेनेंच सर्व गोष्टी करू. मी सांगतो त्याप्रमाणें करा म्हणजे आपली उपसूचना कॉंग्रेसपुढे येऊन आपला कार्यभाग होईल. " नतर त्या गृहस्थांना शात करून बळवतरावजी त्यांच्या बरोबर कांग्रेसमंडपांत गेले व त्यांनीं तेथें शांततेनेंच इष्ट गोष्ट घडवून आणिली ! यावरून टिळक आपल्या अनुयायी लोकाना प्रतिपक्षाविरुद्ध भडकवितात हे म्हणणें खरें ठरत नसून उलट ते त्यांना शांत करण्याचा यत्न करीत असत असें दिसून येते !

---

× × × ×

[ पुणें भारतइतिहाससंशोधक मंडळाशीं विशेष संलग्न असलेले
एक सद्गृहस्थ, पुणें. ]

( १ ) बॅरिस्टर बॅप्टिस्टा याच्या अध्यक्षतेखालीं पुण्यास प्रांतिक परिषद भरली. त्यावेळीं पुण्यास जमलेल्या लोकांस मंडळाबद्दल माहिती सांगून समासद करून घेण्याची कल्पना निघाली. तेव्हां थोडा वेळ थिएटर सभेपुरतें वापरूं देण्यास मंडळाचे सभासद व परिषदेचे चिटणीस रा० न. चिं. केळकर तयार होते. पण परिषदेस आलेल्या सर्व निदान बहुतेक माणसांनीं हजर राहावें अशी तोड काय करावी हा प्रश्न पडला. यास तोड एकच कीं, टिळक हजर राहून भाषण करणार आहेत असें अगाऊ जाहीर करणें ! मंडळाचे अध्यक्ष रा. ब.

साने व इतर सभासद व्यासपीठावर हजर होते. घरीं उभयतांनीं ठरविलेल्या धोरणावर लोकमान्यांचें भाषण अर्धातास झालें. त्यांत कीर्तन्यानीं ॲडफच्या पुस्तकावर लिहिलेल्या निबंधापासून सुरवात करून सर्व इतिहास-संशोधकाची थोडथोडी माहिती सांगून ते म्हणाले "हे प्रयत्न वैयक्तिक झाल्यानें तुटक झाले. एकाच्या कामाच्या अनुभवाचा अगर संग्रहांचा दुसऱ्यास उपयोग होत नसे. शिवाय एकाग्रा व्यक्तींच्या स्वाधीन कागदपत्र करण्यापेक्षां संस्थेच्या हवालीं करण्यांत ज्यास्त सुरक्षितता आहे. येथें कोणत्याहि तऱ्हेच्या पक्षाभिमानास वाव नाहीं. आमच्या पक्षाचा व 'केसरी'चा आरंभापासून या संस्थेस पाठिंबा होता. आमचे मित्र केळकर सुरवातीपासून सभासद आहेत. मी येथें नव्हतोंच. तेव्हां सभासद होण्याचा प्रश्नच नव्हता. पण आज आपणासमक्ष प्रवेश-पत्रिकेवर सही करून देऊन सभासद होत आहें."

( २ ) मंडळासाठीं मंदिर बांधण्याचा ठराव तृतीय संमेलनात झाला. तो सोमवार होता. त्या दिवशीं १०।११ हजाराचे आंकडे सभेतच प्रसिद्ध केले. दुपारची सभा संपल्यावर व तो ठराव व आकडे मंगळवारच्या 'केसरीं'त प्रसिद्ध करण्यासाठीं सर्व कागद बरोबर घेऊन माझ्याबरोबर चला असें केळकर म्हणाले व आम्ही त्यांच्याबरोबर वाड्यांत गेलों दारात पाऊल ठेवताच सिंहगडावरून लोकमान्य, दाजीसाहेब खरे व दादासाहेब खापर्डे परत येऊन चौकातल्या चौरंगावर बोलत असलेले पाहून केळकर म्हणाले 'असेच परत जा व तात्यासाहेबांस घेऊन या. हजार रुपये ज्यास्त Announce करावयास सांपडतील.' नंतर तात्यासाहेब मेहेंदळे यास दारात पाहून लोकमान्य तात्याच्या खोलीपर्यंत आले. तेथे दोघानीं ठराव दाखवून लोकमान्यास केळकर आकडे वाचून दाखवीत होते. बाळ गंगाधर टिळक १००० म्हणून वाचतांच लोकमान्य उद्गारले 'अ!' केळकर म्हणाले 'आकडा मी घातला आहे.' टिळक म्हणाले 'पण मुखत्यारपत्र मी हजर नसताना वापरावयाचें ना?' केळकर म्हणाले "हो, आंकडा घातला तेव्हा you were not in Poona, had you been present you would have put two!" येवढे आमचें काम उत्साहानें झालें. पुढे तो ठराव व आकडे घेवून लोकमान्य पुढे व तात्यासाहेब मेहेंदळे व केळकर पाठीमागे असे व्यासपीठाजवळ गेले. लोकमान्य म्हणाले 'पुणेकरांचा वऱ्हाड-मुंबईवर हल्ला आहे. व जय मिळवल्याशिवाय परत फिरणार नाहीं' असें सांगून ठरावाचा मतलब व आंकडे लोकमान्यांनीं सांगितले व तात्याना उद्यांच्या केसरींत प्रसिद्ध करावयास तुमचे आकडे पाहिजे आहेत म्हणून म्हणाले. दादासाहेब म्हणाले 'हे पुणेकर आंतून सर्व आपआपसात कसे सामील असतात पाहा!' लोकमान्य म्हणाले "वाटले तर 'त्र्याणा धूर्तांना' समजा, पण आंकडे लिहून मोकळे व्हा. तात्यांची खोटी नको, हल्ला कांहीं परत-णार नाहीं!" दाजीसाहेब व दादासाहेब यांचे आकडे दुसऱ्या दिवशीं प्रसिद्ध झाले.

(३) मंडळाचे सभासद झाल्यावर त्यांच्या हातीं जेधे यांचे कागद आले होते, तेव्हां ते परत करण्यापूर्वी याचा तुम्हास उपयोग होतो कां पाहा म्हणून सांगून-शकावलीची वही मंडळाचे स्वाधीन केली. ती सरदार तात्यासाहेब मेहेंदळे यांचे ताब्यांत कांहीं दिवस होती. नक्कल मंडळांतच झाली आहे. ज्या दिवशीं मंडळांत शकावली वाचावयाची म्हणून प्रसिद्ध केलें होतें त्या दिवशीं दोन सरकारी लघुलेखक मंडळांत हजर झाले. 'टिळक आज सिंहगडावर आहेत, त्यांच्या नांवावर वाचला जाणारा कागद हा '-असे म्हणून कागद दाखविल्यावर लघुलेखक निघून गेले!

(४) डेक्कन बँकेच्या डायरेक्टरांनीं आपला रोजगार गुंडाळण्याचा विचार ठरवला. व बँकच त्याचे वकील, भालेराव व R, D, Setna असे लिक्विडेटर नेमणार होते. पण असें करण्यात भागीदारावरोबर ठेविदाराचेंहि नुकसान होणार होतें. कारण या लिक्विडेटर्सच्या हातून कंपनीचा व्यवहार नीट तपासला जाणार नाहीं, अशी कल्पना होती. तरी हे लिक्विडेटर्स न नेमतां रा. ब. इच्छारामभाई व रा. ब. अण्णासाहेब देशपांडे यांस लिक्विडेटर्स नेमावे अशी टिळकाची सूचना होती. पण ते भागीदार नसल्यामुळें त्यास हा ठराव मांडतां येत नव्हता. तेव्हां 'तसा ठराव तुम्ही मांडाल कां' असे त्यांनीं सरदार ख० चिं० मेहेंदळे यास विचारावयास पाठवलें; 'सभेंत हें साधत नसेल तर ही सभा पुढे ढकलली जाईल अशी खटपट करा, म्हणजे तेवढ्या मुदतींत आपण proxies मिळवू व जमल्यास पुढील खेपेस तुमचा ठराव पसार होईलसें करू.' सरदार ख० चिं० मेहेंदळें यानीं सांगून पाठविले कीं:-" माझ्या शेअर्स पैकीं आपणास हवे असतील ते शेअर्स आपल्या नांवावर व आणखी १।२ इसमांचे नावावर चढवून देतों. म्हणजे यापुढें आपणास स्वतःस हजर राहातां येईल. तसेंच या सभेंतहि आपले लेखी म्हणणें-ठेवीदारांचे वतीनें-विचारांत घ्यावें असें मी सभेत सांगेन-आपण सभेस हजर राहावे." त्याप्रमाणें शेअर्स टिळकांचे नावावर चढवून दिले. टिळक स्वतः हजर राहिले. त्यांनीं आपलें म्हणणें वाचून दाखवलें. त्या दिवशीं ९-९॥ पर्यंत सभा लांबवीत नेली. पण डायरेक्टर्सच्याजवळ मतांची संख्या जास्त असल्यामुळें त्यांचाच ठराव पास झाला. टिळकांच्या म्हणण्याचा सभेत विचार होत होता. तेव्हां टिळकांस बाजूस नेऊन भालेराव वकिलानीं दाजीसाहेब खरे यांच्या कायदे-कौन्सिलांतील निवडणुकीबद्दल टिळकांचें मन गुतविण्यासाठीं बाजूला नेऊन गोष्ट काढली. "मी येथें दाजीसाहेबांसाठी आलों नाहीं" असे सांगून टिळक चटकन परतून भागीदारांची सभा बसली होती तेथें आले. सभा संपून परततांच 'डेक्कन बँकेचा बोजवारा' या मथळ्याखालीं मजकूर सांगून त्या दिवसाचें काम संपलें. त्या दिवशीं घरीं येई तों १० वाजले होते. त्यानंतर येवढा मजकूर दुसऱ्या दिवशींच्या 'केसरीं'त आलेला पाहून इच्छाराममाईस फार आश्चर्य

वाटलें. दुसऱ्या दिवशीं हा ठराव बाजूस सारण्यासाठीं कोर्टांत अर्ज करण्यासाठीं भागीदारांच्या व ठेवीदाराच्या मिळून दोन लाखांवर ठेव भरेल ऐवढ्या सह्या पाहिजे होत्या. त्यासाठीं टिळक कांहीं ठिकाणीं स्वतःच हिंडले. 'केसरी'च्या लेखातील मजकूर सेटनाच्या नजरेस येतांच ठेवीदारास व भागीदारांस नको असेल तर लिक्विडेटर म्हणून काम करण्याची माझी इच्छा नाहीं असें 'केसरी'स पत्र आलें; तें पत्र हातीं पडतांच आपल्या हातात हें चांगलें शस्त्र आलें, असें वाटून एका क्षणाचाहि विलंब न लागावा म्हणून टळटळीत उन्हात बारा साडेबाराच्या सुमारास एकटेच टिळक आप्पाबळवताचे वाड्यांत पायीं आले. याना अचानक आलेले पाहून आम्हा सर्वांसच आश्चर्य वाटलें. पण "हें महत्त्वाचें शस्त्र आमच्या हातीं आलें, तुम्ही पडलात वकील; तेव्हा तें तुमच्या स्वाधीन करण्यासाठीं आलों," असें सांगून तें पत्र दाखवून त्यावर थोडी चर्चा करून आम्ही गाडी आणून दिली. त्यातून स्वारी परत गेली. टिळकानीं डायरेक्टराचा पिच्छा पुरवला. लिक्विडेटर्स याना हवे होते तेच नेमले गेले. व ठेवीदाराचे पदरात ९।१० आणे पडले.

( ५ ) पुण्यातील जाड्या विद्वानाचा असा एक विशेष होता कीं, ते कोणाच्या वक्तृत्वानें वहावत नसत. अगर त्याच्या बारीक नजरेंतून कांहींहि सुटत नसे. शिवाय इतर ठिकाणच्या माणसाचा वरचष्माहि ते चालू देत नसत. कै० माधवराव रानड्यानीं डॉ० पेन्टिकास्टला दिलेल्या उत्तराची त्यावेळचे श्रोते अति तारीफ करतात. १९०५-६ चे सुमारास स्वामी अभेदानंदाबरोबर मिसेस स्टॅनर्ड म्हणून एक अमेरिकन शिष्यीण आली होती. तिनें राष्ट्रसेवकाचा एक संघ स्थापावा, त्याची अशी अशी व्यवस्था असावी म्हणून रसभरीत वर्णन केलें होतें. त्या मुद्यावर बोलताना टिळक म्हणाले "या कल्पना नव्या नाहींत. आम्ही अशा संस्था स्थापल्या आहेत. व्याख्यात्रीनें सांगितल्याप्रमाणें—We have worked such institutions We have been doing all the things which the lecturer advised us to do and what is more we appoint a treasurer even though we have nothing to keep with him" ( हशा व टाळ्याच टाळ्या ). खजिनदार नेमावा येवढें सांगावयाचें मिसेस् स्टॅनर्ड विसरल्या होत्या. यास उद्देशून हा टोमणा होता. याच व्याख्यानांत—Action and reaction are equal and opposite is a law not only applicable in mathematics but even in politics—हें तत्त्व प्रतिपादून टिळकानीं अर्धा तासपर्यंत अस्खलितपणें इंग्रजींत याच तत्त्वाचें विशदीकरण केलें होतें.

(६) एके दिवशीं सकाळींच एका पुराणमताभिमान्यांकडे जाऊन तेथून बाहेर कोठें कामास जावयाचे ठरलें होतें, त्याप्रमाणें टिळक सकाळींच दाखल झाले. त्यावर या पुराणमताभिमान्यानीं तुम्हाला ना स्नान ना संध्या म्हणून चिडवून समोरील शिवालयांकडे हे गृहस्थ आढ्यतेनें जावू लागले. तेव्हा टिळक उद्गारल्याचें सांग-

तात कीं "आम्हांस कांहीं सकाळीं उठल्यावर नित्याचे व्यवहार सुरू करण्यापूर्वी शिवाचें दर्शन घेण्यासाठीं दारांत सांभाचें देऊळ स्थापावें लागत नाहीं. त्याची जरूरी 'प्रातःकाले शिवं दृष्ट्वा'प्रमाणें श्रीमंतांना असते."

( ७ ) कै० बाळासाहेब नातूंचा जगांत कोणावर विश्वास नव्हता. पण अंतः-काळ समीप आलेला दिसतांच वहीवर स्वतः कच्चे लिहिलेलें will अखेर नीट व्यवस्थितपणे लिहिण्याचे काम त्यांनीं टिळकांवरच सोपविलें. व मी लिहिल्या प्रमाणे व तुम्हास तोंडी सांगितल्याप्रमाणे बरोबर आहे ना? असें विचारून स्वतः वाळून वाचून त्यावर सही करून सुरक्षित ठेवण्यासाठीं will टिळकांजवळ दिले. तेव्हां मी अद्याप एका घोरपडींतून सुटलों नाहीं तर ही दुसरी घोरपड माझ्या-जवळ कशाला ? म्हणून टिळकांनीं म्हणतांच 'मी सांगतों म्हणून ठेवा' असें बाळासाहेब गहिवरून म्हणाले. तेव्हां टिळकांना will घरीं घेऊन जावे लागलें.

( ८ ) नामदार गोखले यांचे निधनानंतर आपली व आपल्यानतरचीहि पिढी नाहींशी झाल्यासारखें वाटून आतां आजवर पुण्यास दोन्हीपक्षांत अग्र-स्थान होते तें संभाळले कसें जाईल या विवचनेनें कांहीं दिवस टिळकांचें मन ग्रासलें होतेसें दिसतें. या स्थितींत केळकरांकडून त्यांनीं कांहीं १२।१५ नूतन पदवीधरांस एके रात्रीं वादविवादासाठीं बोलाविलें. त्यावेळीं वादविवाद सुमारें २—२॥ तास अति मोकळेपणानें झाला. "माझीं माडणें तुम्ही मांडत रहावींत, अगर माझेंच धोरण पुढें चालवावेत म्हणून सांगण्यासाठींहि तुम्हांस बोला-वलें नाहीं; तर राष्ट्रकार्यकर्ते व्हा. आजवर पुण्याकडे Lead होती ती घालवू नका, तुम्ही जो उद्योग आरभाल त्यांत मागाल ते साहाय्य करीन" हें सर्व संभाषणाचे ध्रुपद होतें. इतर वादविवाद जो झाला तो बहुतेक सर्व विषयावर साधकबाधक-पणें झाला. त्या दिवशीं अमूक एक विषय सुटला होता असें सांगतां येणार नाहीं. पण स्मृतीवर अवलबून त्यांतील तुटक तुटक भाग देणें म्हणजे हिस्टे-रिकसला अकलेचे तारे तोडण्यास मुद्दाम बोलावणे केल्यासारखे होईल. 'बंड-खोरीचा बाष्कळ आरोप' या केळकरांच्या लेखानें या वादविवादाची स्मृति जागृत केली. व जेव्हां असेच इतर विषयांवर टिळकांचे वेळोवेळीं प्रसिद्ध झालेले विचार व क्वचित् प्रसगीं परस्परांशीं विसगंत दिसणारे विचार याचा मेळ घालून तोंड मिळवणी केळकर करतील त्यावेळीं यथार्थ टिळकदर्शन होईल. त्या दिवशीं हजर असणाऱ्या मडळीस हें टिळकदर्शन (Tilak's point of view) तेव्हां झालें.

---

## लक्ष्मण राजाराम अत्रे

[ बी. ए., एलूएल्. बी. वकील, वर्धा. ]

( १ ) गीतारहस्याचें वाचन करीत असतां पृष्ठ ३४५ मध्यें, " ज्ञानोत्तर, कर्मसंन्यास केल्याखेरीज मोक्ष मिळणें शक्य नाहीं, असा शंकराचार्यांचा ठाम सिद्धांत असून, त्यास सर्व उपनिषदें अनुकूल आहेत असें दाखविण्याचा आपल्या भाष्यातून त्यांनीं प्रयत्न केला आहे " असें वाक्य आहें. तें वाचण्यांत आलें. इतर ठिकाणीं ज्याप्रमाणें लोकमान्य टिळकांनीं विस्तृत आधार दिले, त्याप्रमाणें या वाक्याचें समर्थनार्थ आधार दिले नाहींत, तेव्हां त्याबद्दल माहिती लोकमान्यांकडून मिळवावी अशी इच्छा झाली. परंतु त्यांना पत्र लिहिण्याचें धाडस होईना; म्हणून माझे परिचयाचे तात्यासाहेब केळकर यांचे मार्फत लोकमान्यांना वरील वाक्याचें समर्थनार्थ असलेल्या आधाराबद्दल माहिती विचारावी असा विचार करून, पत्र लिहिलें. लोकमान्यांनीं ता० ४।११।१९१५ ला माझें पत्राचें उत्तर पाठविलें. त्यांत " गीताभाष्यांत सांख्य अथवा संन्यास याची व्याख्या जेथें केलेली आहे तेथें आधार सांपडतील. आचार्यांचें छांदोग्य उपनिषद् व बृहदारण्यकोपनिषद् यांत आधार सांपडतील, व ब्रह्मसूत्रांतील भाष्यांतहि आधार सापडतील " असें कळविलें. त्याचप्रमाणें " विवक्षित उतारे (passages) पाहिजे असल्यास कळविण्याचें करूं" असें लोकमान्यांनीं पत्रांत कळविलें. यानंतर मी पाठविलेल्या पत्राला उत्तर ता० १५।११।१५ ला आलें. " संन्यास व मोक्ष याबद्दल पुणें येथें बराच वाद चालू आहे, त्याबद्दल वे० शा० स० काशिनाथ वामन लेले ( हल्ली कैलासवासी ) यांनीं सुमारें तीनशें वेंचे (Extracts) शंकराचार्यांच्या ग्रंथांतून काढले आहेत व सदरील उतारे लवकरच छापावयाचे आहेत" असें या पत्रांत लोकमान्यांनीं लिहिलें आहें. सदरील उतारे पुढें छापले किंवा नाहींत हें मला माहीत नाहीं. यावरुन एकाद्या साधारण गृहस्थाकडून लोकमान्यांना विवेचनात्मक पत्र गेल्यास त्याचे उत्तर देऊन त्यांची समाधान करण्याची प्रवृत्ति व्यक्त होत असून त्यांची कार्यक्षमता व कार्यव्यापृतत्व सिद्ध होतें.

( २ ) सन १९१८ सालांत लोकमान्यांचा दौरा वऱ्हाड व मध्यप्रांतांत झाला. त्यावेळेस ते वर्धा येथें यावयाचें ठरलें होतें. परंतु वर्धा येथें दोनतीन तासच मुक्काम ठरलेला असून व्याख्यानाची वेळ तिसरा प्रहरीं गैरसोयीची ठरली होती. येथून सायंकाळीं सिंदी स्टेशन ( एक लहानसा कसबा ) येथें रेल्वेनें जावयाचें असून दुसरे दिवशीं तेथून नागपूरकडे जावयाचें ठरलें होतें. सिंदी येथेंहि व्याख्यानाचा कार्यक्रम ठरला होता. वर्धा येथें जनसमूह बराच मोठा

जमेल व व्याख्यानाची वेळ तर गैरसोईची; तेव्हां ती बदलविण्याकरितां येथील स्वागतकमेटीनें मुक्काम शेगांव ( जि० आकोला ) येथे जाऊन लोकमान्यांची भेट घेऊन वेळ बदलवून घेण्याकरितां मला पाठविलें. वऱ्हाडांतील दौरा संपल्यानतर लोकमान्य मध्यप्रांतांत यावयाचे होते. मी शेगांव येथे गेलों त्या वेळेस लोकमान्य सुमारें ५ वाजता इतर ठिकाणीं व्याख्याने देऊन शेगावीं आले व ते अगदीं थकले होते. त्यांचेकरितां रावसाहेब मोटे यांचे घरीं मुद्दाम राखून ठेविलेल्या खोलींत ते गेले व थोडी विश्रांति घेत बसले. 'मला स्वस्थ असूं द्या' असा त्यांनीं त्यांचेबरोबर असलेल्या मडळींना निरोप पाठविला. शेगांव येथें व्याख्यानाचा कार्यक्रम ठरला नव्हता. रावसाहेब मोटे यांचे येथें थांबून दुसरे दिवशीं दौऱ्यावर जावयाचे होते. परंतु लोकमान्य आले असें समजल्यावर गावांतील व आजुबाजूचे खेड्यांतील बराच लोकसमुह मोट्यांचे थेथ जमला. लोकमान्यांच्या प्रकृतीला स्वास्थ्य नसले तरी त्यांचें आम्हाला दर्शन झालें पाहिजे व त्यांचे तोंडून पांच मिनिटें तरी चार शब्द ऐकावयाला सापडले तरी आमचें समाधान होईल अशी जमलेल्या लोकांनीं आग्रहाची विनति केली. जमलेल्या सुमारें दीडहजार लोकांचा आग्रह पाहून स्वतःचे कष्टाकडे व थकलेल्या शरीराकडे न पाहातां लोकमान्यांनीं अशा अत्यत थकलेल्या स्थितींत ' स्वराज्य ' या विषयावर सुमारें ५० मिनिटें अडाणी ( निरक्षर ) लोकांना समजेल असें व्याख्यान दिलें. व जमलेल्या लोकांची इच्छा तृप्त केली. जनतेचें आराधन करणे हें लोकमान्यांचें बाळकडूच होतें व त्यापैकींच हें एक उदाहरण होय असें म्हणतां येईल.

( ३ ) स्वराज्यसंघाची बैठक पुण्याला १९२० सालीं मे महिन्यांत लोकमान्यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. होमरूल फडापैकीं कांहींहि रकम शिल्लक न ठेवितां ज्या कार्याकरितां फड जमविला त्याकरितां म्हणजे राष्ट्रीय प्रचाराकरितां फडापैकीं सर्व रक्कम खर्च करण्यांत यावी असें रा० सदाशिवराव केळकर वकील अकोला यांचें मत होतें. परतु या मताविरुद्ध उमरावतीचे रा० बाबासाहेब खापर्डे व पुण्याची कांहीं मंडळी होती. रा० सदाशिवराव केळकर बोलावयास उठले असतां मंडळी त्यांना बोलावयाला हरकत करूं लागली व सभेंत बरीच गडबड सुरू झाली. सदरील सभा गायकवाडवाड्याच्या भव्य पटांगणांतच भरली होती. व "वक्त्याला (रा० सदाशिवराव केळकर यांना) बोलूं देण्याची मी परवानगी देतों" असें लोकमान्यांनीं सांगून व वक्त्याचे भाषणाला मध्यंतरी कोणीहि हरकत करू नये अशी ताकीद देऊन वक्त्याला पूर्णपणें बोलूं दिलें. भाषणस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य याला हरकत करणें लोकमान्याना खपत नसे व त्याचप्रमाणें त्यांना तें आवडतहि नसे हें यावरून दिसून येतें.

त्याच सुमारास गायकवाडवाड्यांत स्वराज्यासंबंधाची कार्यकारी मडळाची सभा भरली होती. त्यांत लेजिलेटिव्ह असेंब्लीचे समासद लोकमान्यांनीं व्हावें

याबद्दल रा० बेळवी, गंगाधरराव देशपांडे वगैरे त्यांची स्नेही मंडळी आग्रह करीत होती. आपण नुसते सभासद राहा, आम्ही सर्व माहिती देऊ व आपणाला कांहीं तकलीफ पडणार नाहीं, असें लोकमान्यांची स्नेही मंडळी म्हणत होती. परंतु लोकमान्य टिळक सभासद होण्याकरितां अखेर कबूल झाले नाहींत. नंतर लोकमान्यांचे नेहमींचे जिन्याजवळील बसण्याचे खोलींत रा० रा० दादासाहेब खापर्डे, मी व लोकमान्य एवढीच मंडळी असतांना रा० दादासाहेब म्हणाले कीं, "Legislative assembly" लेजिस्लेटीव्ह असेंब्लीमध्यें सभासद होऊन If (जर) चे ठिकाणीं But (परंतु) व But (परंतु) चे ठिकाणीं If (जर) करण्यांत काय पुरुषार्थ आहे ? जर सरकार आज लोकमान्यांना Governor ची प्रांताधिपतीची-जागा देत असेल तर मी त्यांना ती पत्करण्यास आज राजी करितों. कारण त्यांत खरें लोककल्याण तरी त्यांना करतां येईल. कौन्सिलमध्ये आमच्या सारख्या second rate दुय्यम दर्जाच्या किंवा third rate तिय्यम दर्जाच्या माणसाचें काम आहे. लोकमान्यांचें नाहीं.

---

## शंकर गणेश देशपांडे

[ बी. ए. एल् एल् बी., कालिदासकृत कुमारसंभव ( सर्ग १ ते ६ ) काव्य व त्यावरील टीका वगैरेचे संपादक, वकील, वर्धा. ]

( १ ) मराठी शाळेंत विद्यार्थी होतों तेव्हांपासून कै० विष्णुशास्त्री चिपळूणकरांची 'निबंधमाला' वाचण्याची अतिशय आवड मला असे. 'केसरी' पत्र निघणार म्हणून निबंधमालेच्या अकाच्या मलपृष्ठावर जाहीरात फडकली ! त्यावेळीं बाळ गंगाधर टिळक बी. ए. एल्एल्. बी. हें नांव मी प्रथमच वाचलें. वकीलीसारखा त्याकाळीं मान, प्रतिष्ठा व द्रव्य देणारा धंदा किंवा तितकाच लाभ देणारा खाविंद-सेवाधर्म सोडणारा हा तरुण विलक्षण स्वार्थत्यागी असला पाहिजे असें मला वाटलें व टिळकांविषयीं आदर माझ्या मनांत उद्भवला.

( २ ) इ. स. १८८३-८४ सालची गोष्ट. मी डेक्कन कॉलेजांत विद्यार्थी होतों. टिळक एम. ए. चा अभ्यास करण्याकरितां कॉलेजांत थोडे दिवस राहिले होते. त्यावेळीं कॉलेजांत मला कै० बापूजी नारायण ढेकणे सहाध्यायी होते. डेक्कन कॉलेज लायब्ररीहॉलमध्यें पुस्तकसमूह धुंडीत असतां मी त्यांस प्रथम पाहिलें. ती तेजस्वी मुद्रा, ती उतावीळ वृत्ति, ते चंचल व पाणीदार डोळे, तो मनाचा मोकळेपणा व दृढनिश्चय पाहतांच माझ्या मनावर जो परिणाम झाला

तो मी कधीं विसरणार नाहीं. कांहीं गप्पागोष्टी नतर मी म्हटलें ' बळवंतराव, एम्. ए. ची परीक्षा पास होणें आपणांस अवश्य वाटतें काय ? ' ते म्हणाले "आमच्या शाळेचा शिक्षक वर्ग सरकारी कॉलेजच्या शिक्षकवर्गापेक्षां द्रव्यानें नाहीं तरी युनिव्हर्सिटीनें दिलेल्या पदवीनें श्रेष्ठ असावा हा माझा परीक्षा देण्यांत हेतु आहे. " त्यावेळीं डेक्कन कॉलेजांत गणित शास्त्राचे प्रोफेसर फारेस्टसाहेब होते, ते बी. ए. होते. त्यांस पगार भरमक्कम होता, व गणित विषयाचें ज्ञान त्यांस बहुतेक शून्य होते. या गोष्टी माझ्या मनांत लागलींच उभ्या राहिल्या !

( ३ ) सन १८८४ मध्ये बी. ए. झाल्यावर टिळक–आगरकरांबरोबर आमरण देशसेवा करावी या हेतूनें त्याचेकडे मी गेलों. त्यावेळीं दोघे शनवारात तांबे याच्या वाड्यात राहात असत. प्रथम आगरकरांस भेटलों व त्यास माझी मनीषा कळविली. आगरकरानीं माझे स्वागत आदरपूर्वक केलें व माझ्या इच्छेसंबंधीं पसती दर्शविली. नतर शेजारच्या माडीवर आम्ही टिळकांकडे गेलों; व सर्व हकीकत कळवितांच टिळक म्हणाले कीं, ' आमच्या मडळीबरोबर आमरण काम करण्याचा निश्चय आजच तुम्ही करू नका. तुम्हास जगाचा अनुभव फार थोडा आहे ! १।२ वर्षें काम करून पाहा व ते आवडल्यास नतर Life member व्हा." लोकमान्यांस मानवी स्वभावाची परीक्षा कितपत होती व समयोचित उपदेश किती तत्परतेनें ते करीत असत हें यावरून स्पष्ट होते. कारण शिक्षकाच्या व लेखकाच्या धद्याचा व स्थितीचा कटाळा पुढें मला लौकरच आला व टिळकांच्या उपदेशाचा खरेपणा पटला !

( ४ ) सन १८८५ सालांत टिळक व मी न्यू स्कूल व फर्ग्युसन् कॉलेज या मध्यें दिले जाणाऱ्या शिक्षणाच्या धोरणासबंधीं बोलत होतो. त्यावेळीं मीं म्हटले कीं ' सरकारी धोरण सोडून शिक्षणाचें भिन्न धोरण असावें अशा हेतूने शास्त्रीबुवानीं व तुम्ही शाळा काढिली ना ? मग ते धोरण मला शाळेत तर दिसत नाहीं. शिवाय, सस्थेस फर्ग्युसन् कॉलेज हें नाव देखील कसेसे दिसते. ' टिळकांनीं उत्तर केलें कीं ' अहो ! आम्हांस ग्रँट ( Grant ) चे पैसे हवे आहेत ना ? म्हणून धोरण सोडले व न्यू स्कूलच्या नांवाला न शोभणारें व विजोड नांव कॉलेजास दिलें ! "

( ५ ) सन १८८५ ते १८९१ या अवधींत कांहीं काळ श्रीकालिदासकृत कुमारसभव ( सर्ग १ ते ६ ) काव्य भाषांतर व टिपणे यासह मी लिहिलें व प्राच्य भाषाध्यापक गुरुवर्यांचा मदतनीस ( Assistant to the Professor of oriental languages Deccan College ) या नात्यानें माझे परम पूज्य गुरुवर्य प्रसिद्धकीर्ति डॉ. सर भांडारकर यांच्या हाताखालीं काम केलें. या दोन्ही कार्यांत गुतलों असता टिळकांकडे माझें जाणें असे. या निकट परिचयाने त्यांच्या विषयीं माझा प्रेमादर वाढतच गेला. टिळकांचें वर्तन व भाषण मना-

पासून आवडलें नाहीं असा एकहि प्रसंग मला आज स्मरत नाहीं. दोन्ही कार्यांत वर सांगितल्याप्रमाणें मी गुतलों असतां वेदशास्त्रपुराणादि ग्रंथांसंबधीं व विशेषतः श्रीकालिदासाच्या ग्रंथांसंबधीं विविध माहिती मला ते मोठ्या हौसेनें देत. ते काव्याचे मर्मज्ञ व रसज्ञ होते. एका प्रसगीं मला त्यानीं म्हटलें कीं, "कुमारसंभव सर्ग ३ पद्य १५ व सर्ग ५ पद्य १५ यावरील तुमचीं टिपणें दाखवा." तीं दाखविल्यानंतर त्यानीं तपासून पाहिलीं व संतोष प्रदर्शित केला. ते कालिदासमय झालेले टिळक मला अद्याप दिसताहेत !

( ६ ) कुमारसंभवाचें शिवपुराणाशीं व पार्वतीपरिणय नाटकाशीं कल्पनेचें व भाषासरणीचें जे सादृश्य दृष्टीस पडतें त्या संबधीं बोलताना टिळक म्हणाले कीं, "कुमारसंभवाचा उतारा या पुराणिकबोवानें व नाटककारानें घेतला आहे अशी माझी समजूत आहे." परंतु या विषयाची चर्चा करण्यास पुरेसा वेळ मिळाला नाहीं.

(७) टिळकानीं शाळेचें काम सोडल्यावर त्यांच्या साह्यानें नवें कॉलेज काढावें अशी इच्छा कै० वामन प्रभाकर भावे ( पूना नेटिव इन्स्टिट्यूशनचे प्रिन्सिपाल ) यांस झाली, व त्यानीं हा बेत टिळक यास एका मित्राकडून कळविला त्यावेळीं टिळकांनीं सांगितलें कीं, "न्यू 'स्कूल व फर्ग्युसन् कॉलेज या संस्थांच्या उत्कर्षास ज्यानें बाध येईल असें काम माझ्यानें होणार नाहीं."

( ८ ) याच सुमारास "पुढें आपण काय करणार ?" असें टिळकांस मीं विचारलें असता ते म्हणतात "श्रीधर विठ्ठल दाते व इतर मंडळी मला म्हणत होती कीं, '*मुंबई येथें हायकोर्टांत तुम्ही वकिली करा; तेथें तुमची भरभराट* चांगली होईल यांत शंका नाहीं. There is always room at the top श्रेष्ठ स्थान सर्वांस मोकळें आहेच. तुम्हाला तर आहेच. आणखी, बडोद्याकडे मला मोठी नोकरी मिळण्याचा संभव आहे, परंतु माझें एकच उत्तर सर्वांस आहे कीं, ' मराठा ' व ' केसरी ' यास टाकून मला कोठेंहि जावयाचें नाहीं."

(९) १८९१ च्या नागपूर येथील राष्ट्रीय सभेसाठीं पुण्याचे डेलिगेट म्हणून टिळक, नामजोशी व इतर मंडळींपैकीं मी असे होतों, त्यावेळीं त्या सभेच्या ठरावासंबधीं व विशेषतः सामाजिक परिषदेच्या ठरावासंबधीं महाराष्ट्र कपूत रानडेपक्षानुयायी व टिळकपक्षानुयायी यांच्यांत जी लढाजगीं उडे ती पाहाणें गमतीचें असे. एका ठरावासबधीं रावसाहेब रानड्यांनीं टिळकाचें सडेतोड बोलणें शांतपणें ऐकून घेतलें व त्यांस सांगितलें कीं, 'तुमच्या म्हणण्यांत पुष्कळच अर्थ आहे असें मला वाटतें. तुमचें म्हणणें आमच्या मंडळीस कळवितों. मग काय होतें ते पाहू.' नंतर दुपारीं रावसाहेबांच्या तबूंत मी गेलो तों तेथें उभय पक्षांतील मंडळी त्या ठरावाची चर्चा करीत होती. परंतु कोणाचा कोणाशीं मेळ जमेना ! रावसाहेब तोंडावर उपरणें घेऊन उशीवर आडवे पडले होते. १||–२

तास दंगल झाल्यावर आतांपर्यंत स्तब्ध असलेले रावसाहेब, टिळकांस प्रथमच म्हणाले कीं 'टिळक हे कांहीं जमत नाहीं.'

(१०) याच वर्षी सामाजिक परिषदेचे अध्यक्ष श्रीयुत दादासाहेब खापर्डे होते. त्या दिवशीं तरी मला ते रानडेपक्षानुयायी दिसले. सकाळीं सामाजिक परिषदेची प्रास्ताविक सभा एका तबूत भरली होती. सामाजिक परिषदेच्या रिपोर्टात Gross misrepresentations of the worst kind आहेत हे किंवा या अर्थाचे शब्द टिळक बोलले. लागलींच एका मद्रदेशीय गृहस्थांनीं आवेशानें आग्रह धरिला कीं,Tilak ought to withdraw these words ह्या बाचाबाचीनंतर दुपारीं सामाजिक परिषद भरली. अध्यक्ष श्री० खापर्डे यांस आधार (support) देण्याकरितां रावसाहेब रानडे उत्तमासनावर बसले होते ! रावसाहेबांस आधार देण्याकरितां वीर—महावीर मंडळी आपलीं जिव्हाखड्गें उपसून अवळच बसली होती. दादासाहेबांचें भाषण नेहमींप्रमाणें फार चांगलें झालें. नतर ठरावामागून ठराव जोरदार भाषेत सभेपुढे मांडले गेले व त्यांस दुजोरे मिळत चालले ! ! सभेनें (अर्थात् टिळकपक्षीयांनीं) हुशहुशचा मारा चालू ठेविला. अध्यक्ष रावसाहेबांशीं कानगोष्टी करीत व म्हणत 'Gentlemen, if you do not agree, this resolution is dropped.' अशा रीतीनें शेवटीं अध्यक्षांनीं एकामागून एक कांहीं ठरावांचा निकाल लावला !

(११) र्‍हँडची केसच्या सकटांतून टिळक मोकळे झाल्यानंतर त्याच्या व माझ्या भेटीचा योग आला. त्यावेळीं टिळकांस मीं म्हटले कीं, 'तुमच्या राजकारणापासून देशाचा कोणता फायदा झाला आहे ? सरकारचे नवे नवे कायदे मुस्कटदाबी व गळेचेपी अधिकाधिक करीत आहेत.' टिळक आवेशाने म्हणताव, "माझें राजकारण तुम्हांला अद्याप समजत नाहीं ! अहो, ५० वर्षांनीं या देशाची जी स्थिति झाली असती व प्रजेस जे प्रश्न सोडविणें भाग पडले असतें ती स्थिति मी आज आणिली आहे व तेच प्रश्न सोडविण्यास प्रजेस मीं भाग पाडलें आहें ! याशिवाय अधिक चागली देशसेवा दुसरी कोणती ?" या मार्मिक उत्तरावर प्रत्युत्तर कोणतें द्यावें ?

---

## बाळकृष्ण शिवराम मुंजे

[ एल्. एम्. अँन्ड एस् डॉक्टर, आमदार, नागपूर. ]

( १ ) १९०७ सालची गोष्ट आहे. येथें मवाळ व जहालांमध्यें मोठा वाद माजून राहिला होता मवाळांचें म्हणणें कीं, त्यावर्षी येथें भरणाऱ्या राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान लो० टिळकांस देण्यात येऊ नये. जहालाचें म्हणणें त्यांच्याशिवाय दुसरा अध्यक्षच निवडण्यांत येऊ नये. हा वाद शेवटीं ता० २२ सप्टेंबर रोजीं जेव्हा येथील स्वागतकारणी सभेची सभा टाऊन हॉलांत भरली होती त्यावेळेस निकरास जाऊन प्रसंग हातघाईवर आला. टाऊन हॉलच्या भोवतालीं नागरिकांची फार गर्दी जमली आणि नागरिकामधील परस्परविरुद्ध पक्षांच्या तरफदार लोकांमध्ये बाचाबाची व दगडफेकी होऊन काहीं लोकांचीं डोकीं फुटलीं व रक्तप्रवाह सुरू झाला, आणि कै० वामनराव कोल्हटकर यांच्यावरहि काहीं लोकांनीं हल्ला करून धूळ फेंकली रा० नीळकंठराव उधोजी. रा० अळे-कर, रा० धुंडीराज ठेंगडी व कै० डॉक्टर गद्रे वगैरे गृहस्थांच्या समजु-तीनें लवकरच लोक शान्त झाले व गर्दीतील लोक आपापल्या घरीं निघून गेले. रात्रौ कै० श्रीमंत गोपाळराव बुटी यांच्या वाड्यात जहाल पुढाऱ्यांची सभा भरली. त्यामध्ये ठरलें कीं. ' सर्व सविस्तर हकीकत लो० टिळकास कळवून, मवाळांनीं यापुढें कॉंग्रेस येथे न भरवितां दुसरीकडे नेण्याचेंच जर ठरविले तर पुढे काय करावें व येथेच कॉंग्रेस भरेल अशी काय व्यवस्था करण्यात यावी, याबद्दल यांची सल्ला घेण्यास एक माहीतगार मनुष्य पाठविण्यात यावा ' याप्रमाणें लोकमान्यास तार करण्यांत आली व दुसरे दिवशीं उत्तर आलें कीं, 'वर्तमान-पत्रात सर्व वर्तमान वाचून राष्ट्रीयपक्षानें पुढें कसें वागावें याबद्दल सल्ला देण्यास पुण्याहून एक मनुष्य अगोदरच पाठविला आहे. आम्ही आश्चर्यानें चकित झालों. त्याची जरूरी आम्हांस येथे भासूं लागली होती तीच कल्पना करून त्याप्रमाणें आम्हांस साह्य करण्यास टिळकास एक क्षणाचाहि विलंब लागला नाहीं. काय ही समयसूचकता व अपल्या अनुयायास मदत करण्याची तत्परता ! येथें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं कीं, केवळ त्याच्या नांवाकरितां प्रसंग या निकरास आला हे त्यास आवडलें नाहीं.

( २ ) पुढे लवकरच येथील मवाळ पुढारी कै. वामनराव कोल्हटकर यांनीं कै० सर फेरोजशहा मेहता यांस लिहून कळविलें कीं, 'नागपुरास कॉंग्रेस भरविणें अशक्य झालें आहे आणि कॉंग्रेस नागपुरासच भरविली व टिळकांना अध्यक्ष नेमलें नाहीं तर येथील जहाल मंडळी काय करतील व काय नाहीं याचा नियम नाहीं.' पुढे मुंबईस या गोष्टींचा विचार करण्याकरितां कै० सर फेरोजशहा मेहता

यांच्या बंगल्यावर कांहीं निवडक मंडळींची सभा झाली. त्या सभेंत मलाहि बोलावण्यांत आलें होतें. इतर मंडळी जी ठळक ठळक हजर होती तीं—कै० सर गोकुळदास पारख, रा० डी० जी० पाध्ये, कै० वामनराव कोल्हटकर व आणखी दोन चार मंडळी. या सभेस जाताना लो० टिळक मला म्हणाले—(आम्ही दोघेहि सिताराम बिल्डिंग मधील जुन्या सरदारगृहांत उतरलो होतो )— " सांभाळा, फेरोजशाहा मेहता हे मोठे युक्तिबाज व वादविवादात प्रतिपक्षास झटकन् पकडतात आणि केव्हां केव्हां दरडावून बोलून भेवडावण्याचाहि प्रयत्न करतात. तेव्हां तुम्ही आपलें म्हणणें थोडक्यांत व मुद्देसूद मांडून त्यांच्याशीं वाद करण्याचें मोहांत पडूं नका. वादाच्या आडरानांत तुम्हांस नेण्याचा ते व इतर तेथें हजर असलेले लोक पुष्कळ प्रयत्न करतील. तुम्ही त्या वादाच्या जाळ्यात सापडू नका. थोडेंच बोला, पण मुद्दा सोडू नका. भिऊ नका. आणि तडजोड करण्यास म्हणतील तर सुरेन्द्रनाथ बानरजी व इतर एकदोन नावे ( जीं टिळकांनीं सुचविली होतीं.) यावर तडजोडीस कबूल व्हा." मी म्हणालों " तडजोड हा शेवटचा प्रयत्न. मी आपलें नांव शेवटपर्यंत सोडणार नाहीं. प्रसंग आल्यास, कॉंग्रेसच्या खर्चाची सर्व जबाबदारी मी घेईन आणि मवाळांस असे म्हणूं देणार नाहीं कीं, त्यांच्या द्रव्यसाह्याशिवाय कॉंग्रेस नागपुरास भरणें अशक्य होय." पुढे मी फेरोजशाहा मेहतांच्या बंगल्यावर गेलों. मंडळी जमली होती. सर फेरोजशाहा मध्ये आरामखुर्चीवर पाय लंबे करून पडले होते इतर मंडळी जी खुर्च्यांवर बसली होती ती त्यांच्या समोर पोरांप्रमाणे दिसत होती. त्यांच्यावर सर फेरोजशाहांचा वचकच बसा होता. मला सर्व विचारण्यांत आले. अथपासून इतिपर्यंत टिळक अध्यक्ष होऊं नयेत म्हणून मवाळांनीं केलेल्या युक्त्या मी सांगितल्या आणि ठासून म्हणालों कीं, " नागपुरास टिळकाशिवाय दुसरा अध्यक्ष होणें शक्य नाहीं. परतु टिळकांना गैरकायदा अध्यक्ष करावे असें आमचे म्हणणे नाहीं. स्वागत सभेच्या मेंबरांची उघड सभा बोलाविण्यांत यावी आणि 'बॅलट'ने मतें देण्यास सांगावें. असें केले असता टिळक निवडून न येतां कोणीहि अध्यक्ष झाला तरी ते आम्ही कबूल करूं. परंतु टिळकच निवडून आले तर रा० वामनराव कोल्हटकर आणि त्यांच्या मित्रांनीं तें कबूल करावे." सर फेरोजशाहा म्हणाले—" वामनरावांनीं पैशाची मदत न केली तर ? " मी—" स्वागत सभेची सर्व वर्गणी त्यांच्याच ताब्यात आहे. त्यांना तो पैसा द्यावा लागेल." सर फेरोजशाहा—" समजा, ते पैसा देऊ इच्छित नाहींत." मी—"तर त्यांची पै घेऊं इच्छित नाहीं. कॉंग्रेसचा सर्व खर्च आम्ही करूं" सर फेरोजशाह—" सर्व सोंगें आणतां येतील पण पैशाचें सोंग आणणें कठिण. तुम्ही कोठून पैसा आणणार ? " मी—" मी ब्राह्मणाचा मुलगा आहें. टिळकांच्या नांवानें भिक्षा मागितली तर पैशास वाण नाहीं ! आपण परीक्षा घेऊन पाहावी." सर फेरोजशाहा—" तुम्हांस टिळकच कां

म्हणून हवेत अध्यक्ष ! डॉ० रासबिहारी का नकोत ! " मी —" ही आमची पसती होय." या खणखणीत उत्तरावर सर फेरोजशाहा रागावलेसे दिसले आणि या प्रश्नांचा कमेटींत विचार करावा लागेल असे म्हणून त्यांनीं सभा बरखास्त केली.

( ३ ) पुढें यानतर सर फेरोजशाहा मेहता यांच्या घरीं कमेटीची एक दिवस सभा झाली. कमेटीचा मी मेंबर नसल्यामुळें मला अर्थात्च आमंत्रण नव्हतें. कित्येकांस वाटत होतें कीं, नागपुरास होत असलेल्या कॉंग्रेस सबधीं घडामोडीची दोन्ही पक्षाकडून माहिती करून घेण्याची संधी कमेटीला मिळवून देण्यात येईल. परतु कै० रावबहादुर वामनराव कोल्हटकर हे तर मेंबरच होते. मला मात्र आमत्रण नसल्यामुळे कमेटींत राहातां आलें नाहीं. लोकमान्य टिळक हे कमेटींत होतेच. कमेटीच्या सभेस जाण्याचे वेळीं लोकमान्य टिळक माझ्याजवळ दहा हजार रुपयाच्या नोटा देऊन म्हणाले कीं, " माझ्याबरोबर सर फेरोजशाहांच्या बंगल्यावर चला आणि बाहेर व्हरांड्यात बसा. जरूर पडल्यास कमेटीची परवानगी घेऊन कमेटीच्या सभेस तुम्हास बोलावण्यात येईल. प्रश्न विचारल्यावर कॉंग्रेसचा सर्व खर्च भागविण्यास आम्ही समर्थ आहोत असे सिद्ध करून दाखविण्यास ह्या दहा हजाराच्या नोटा कमेटीसमोर ठेवा." मी लोकमान्यांच्याच गाडींत बसून गेलों. लोकमान्य आंत कमेटीच्या खोलींत शिरले आणि मी आणि माझे स्नेही रा० नारायणराव अळेकर आणि धुंडीराज ठेंगडी असे आम्ही तिघेजण बाहेर व्हरांड्यांत बांकावर बसलो. आम्ही बाहेर बसलों आहों हें सर फेरोजशाहास कळतांच त्यांनीं आपल्या चपराश्याकडून तेथून आम्हांस बंगल्याबाहेर जाण्यास सागून पाठविले ! आम्ही बाहेर जाऊन आपल्या व्हिक्टोरियात लोकमान्य टिळक परत येईपर्यंत वाट पाहात बसून राहिलो. कांहीं वेळानें लोकमान्य परत आले व म्हणाले " कॉंग्रेस भरविण्यास तुमच्या द्रव्यशक्तीची ते परीक्षाहि पाहात नाहींत आणि कॉंग्रेस नागपूरला भरवीतहि नाहींत. कॉंग्रेस आता सुरतेस भरणार!"

( ४ ) अशा प्रकारें नागपुरास कॉंग्रेस न भरवितां सुरतेस भरविण्याचे ठरावामुळें येथील लोकांत तीव्र असतोष पसरला. असो; पुढें सुरतेस १९०७ सालीं कॉंग्रेस भरली. कॉंग्रेसच्या पहिल्या दिवशीं बाबू सुरेन्द्रनाथ बानर्जी यास जमलेल्या मंडळींनीं ओरडाओरड करून बोलू दिलें नाहीं. ही ओरडाओरड करावी अशी आमच्या मनांत कल्पनाहि नव्हती. परतु ही Midnapur Traitor ची ओरड पहिल्यांदा बगाली मडळींत सुरू झाली आणि नतर आम्ही ती जरा विशेष त्वेषानें उचलली. असो, त्या दिवशींचा कार्यक्रम अशा प्रकारें बन्द पडल्यावर आम्ही जेव्हां बिऱ्हाडीं गेलो, तेव्हा टिळक आमच्यावर आम्ही गलबला केला म्हणून फार रागावले आणि आम्हास बजावून सांगितले कीं, उद्या तुम्ही दगडाप्रमाणे थड रहा. " You must be calm like a block of stone " हा त्यांचा हुकूम पाळण्याचा आम्ही निश्चय केला आणि त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशीं

बोलावयास उभे असलेल्या टिळकांच्या डोक्यावर प्रत्यक्ष खुर्ची फेकण्यांत येई-पर्यंत आम्ही खरोखरच block of stone प्रमाणें थंड बसलों. परंतु आज कांहीं तरी विशेष होणार अशी बातमी मिळूं लागली होती. त्या दिवशीं आम्ही ज्यावेळेस कॉंग्रेसच्या पटांगणांत शिरून एका मित्राकरितां तिकीट घेण्यास जवळच्या तंबूत शिरलों, त्यावेळेस तेथील मुख्य स्वयंसेवक हळूच कोणास नकळत मला म्हणाला, " डॉक्टरसाहेब, आज आपण सांभाळा. काल आपण मध्यप्रांतांतील मंडळींनीं बरीच धामधूस केली म्हणून आपणास समज देण्याकरितां आणि आपला ठीक बन्दोबस्त ठेवण्याकरितां मुसलमान गुंड ठिकठिकाणीं, विशेषतः मध्यप्रांताच्या ब्लॉकच्या भोंवतालीं, ठेवले आहेत. तरी सावध राहा व आपणांस सांभाळून राहा. " नंतर मी तंबूच्या बाहेर आलों व आपल्या सोबत्यांस व प्रतिनिधींस ही धोक्याची सूचना दिली व मी हे टिळकांसहि सांगितलें. पण त्यांना हें खरें वाटलें नाहीं व व्यर्थ भीतीचे हे कल्पनातरंग आहेत असाच त्यांचा ग्रह झाला व ते मला पुनः म्हणाले, " कांहींहि होवो, तुम्ही मात्र स्वस्थ बसा व कांहीं गडबड करू नका. " आम्ही आपल्या ब्लॉकमध्ये आपल्या बंदोबस्ताने बसलो. आमच्या मंडळींस ही बातमी मी कळवितांच कांहीं जणांनीं कांहीं काठ्याहि मिळविल्या आणि कै० डॉक्टर गद्रे, कै० विष्णु सावजी मलकापूरवाले, कै० नागपूरचे सरदार मोहिते व पवार व अशीच हातापायाची मजबूत अशी कांहीं इतर मंडळीहि आपल्या मध्यप्रांताच्या ब्लॉकचें प्रसंगीं संरक्षण करण्यास सज्ज बसली. लगेच आमच्या ब्लॉकच्या भोंवताली उभे असलेले गुंडांसारखे दिसणारे दोनचार मुसलमान, ज्यांच्याजवळ डेलिगेटचे तिकीट नव्हते. यांस आम्ही पेंडालच्या बाहेर काढले. पुढें कार्यक्रम सुरू झाला. आम्ही स्वस्थ बसलों. टिळक कांहीं वेळानें बोलावयास उठले. मंडपांत ओरडाओरड सुरू झाली. लोक त्यांना बोलू देईनात. टिळक तसेच आपले दोन्ही हात छातीवर आडवे एकांतएक घालून छाती वर करून बोलावयाला सज्ज असे उभे होते. चेहऱ्यावर दृढनिश्चय व निर्भयतेची छटा पूर्ण उमटलेली दिसत होती. मंडपांत एकच गोंगाट; तरी आम्ही हुकुमान्वयें स्वस्थचे स्वस्थ बसलों होतों. नंतर थोड्याच वेळांत हवेंत एक खुर्ची उडाली व ती नेमकी बळवंतरावांच्या डोक्यावर जाऊन पडणार, इतक्यांत जवळचे एक उंच व धिप्पाड पंजाबी गृहस्थ माझे स्नेही बॅरिस्टर मधुसूदन भगत हे ताडकन उभे झाले व ती खुर्ची त्यांनीं वरच्यावर झेलून बाजूस केली. तरी बळवंतराव तसेच उभे व आम्हीहि अगदीं स्वस्थ. पुढें खुर्च्यांची फेंकाफेंक सुरू झाली. लोक हातांत कांठ्या घेऊन प्लॅटफार्मवर धावून येऊं लागले. कोणी टिळकांस शिव्या देत तर कोणी फेरोजशाहा मेहता यांस शिव्या देत. अशी एकच गर्दी माजली. आम्ही दूर असल्यामुळें काय चाललें आहे हें आम्हांस नक्की समजेना. ही अशी गर्दी माजली म्हणून आमच्यानें पुढें स्वस्थ बसवेना. आम्हीहि हातांत कांठ्या घेऊन प्लॅटफार्म-

वर काय चालले आहे हें पाहाण्याकरितां धावत पुढें चाललों. प्लॅटफार्मच्या खालीं जवळच प्रेसरिपोर्टर्समध्यें मि० आल्फ्रेड नदी बसले होते. त्यांच्या खुर्चीवर एक पाय ठेऊन व दुसरा त्यांच्या डोक्यावरून प्लॅटफार्मवर ठेऊन ताडकन उडी मारून प्लॅटफार्मवर चढलों मि० नदीसाहेब माझा निषेधच करीत राहिले. माझ्या समागमे रा० धोंडीराज ठेंगडी, कै० डॉ० गद्रे, कै० विष्णु सावजी, कै० सरदार मोहिते आणि रा० पवार वगैरे मंडळी होती. माझ्यावर मागून एकानें काठी उगारून मारण्याचा प्रयत्न केला. जवळच बाजूस व मागें धोंडीराज ठेंगडी व कै० डॉ० गद्रे होते त्यांनीं मला माझ्या नकळत बचावलें. त्या बचावाच्या प्रयत्नात कै० डॉ० गद्रे यांच्या भिंवईस काठी लागून रक्त वाहू लागले ही गोष्ट त्यांनीं मला मागाहून सांगितली. पुढून एका पारशी गृहस्थाने माझ्यावर खुर्ची फेंकली ती वाचवून त्या गृहस्थाच्या हातावर मी आपल्या हातातील काठीचा एक टोला दिला. त्यासरसा तो इतरांबरोबर मंडपाच्या बाहेर गेला. आम्ही सर्व मंडळी बळवंतरावांच्या भोंवताली गराडा घालून उभे राहिलों. प्लॅटफार्मवर खुर्च्या फेंकाफेंकी व काठ्या चालल्या होत्या व प्लॅटफार्मवरील पांढरपेशे लोक मंडपाच्या बाहेर झपाट्यानें निघून चालले होते. बळवंतरावांच्या जवळ पोहोंचल्यावर ' आपणास कांहीं इजा तर झाली नाहीं ना ?' म्हणून आम्ही विचारलें. ते म्हणाले " मला कोणी इजा पोहचवू शकत नाहीं. तुम्ही जरा बायकामंडळीकडे लक्ष द्यावे. त्यांना कांहीं दुखापत होऊं देऊं नका व त्यांना सुरक्षित मंडपाच्या बाहेर काढा. " त्या सर्व भयभीत अशा प्लॅटफार्मच्या एका बाजूस गलबला पाहात उभ्या होत्या. मी त्यांच्या जवळ जाऊन " भिऊं नका, व तिकडूनच मंडपाच्या बाहेर निघून जा " असें सांगितलें आणि आमच्या मंडळीपैकीं एकानें त्या तिकडून निघून बाहेर पडण्यास मंडपाची कनात वर करून एक तात्पुरतें दारहि करून दिले. मला त्यावेळेस मोठी काळजी ही कीं, बळवंतरावांच्या मेंदूस हा मोठा ताण बसला तर त्यास कदाचित् घेरी, चक्कर न येवो. म्हणून मी त्यांच्या जवळ जाऊन म्हणालों, "बळवंतराव, आतां आपण बाहेर चला आणि त्या बाहेरच्या तंबूत थोडे स्वस्थ पडा व विश्राति घ्या कदाचित् तुम्ही घेरी येऊन बेशुद्ध व्हाल." बळवंतराव म्हणाले, " अजून मी थकलों नाहीं. अंगात ताकद आहे. आता एकदम घरींच चला, तेथेंच काय ती विश्रांति घेणें बरे. " दोनतीन गाड्या करून आम्ही सर्व घरीं गेलों. बळवंतरावांच्या अंगांत तडफ पूर्वीप्रमाणेच होती.

( ५ ) पुढें त्याच दिवशीं दोन प्रहरीं सरासरी ४ वाजता नेहमीच्या एका देवळांत ( त्या देवळाचें नाव मी विसरलों ) सभा भरली. अध्यक्षस्थानीं बाबू अरविन्द घोष होते अध्यक्षांनीं बळवंतरावांस परिस्थिति समजावून देण्यास विनंति केली आणि बळवंतराव बोलावयास उठले. १॥ तास पर्यंत इंग्रजींत भाषण झालें. भाषेची शैली व आवेश त्या दिवशीं कांहीं विशेष होता. भाषण मोठें

मुद्देसूद झालें. परिस्थितीची मीमांसा फार खोल व स्पष्ट आणि पुढील येणाऱ्या संकटाचें आविष्करण इतकें विशद झाले कीं त्या दिवशींचें बळवंतरावांचें भाषण म्हणजे एक प्रकारची आकाशवाणीच होय असे सर्वांस वाटूं लागले.

बळवंतरावांच्या समोर कांहीं अंतरावर भिंतीशीं मि० नेव्हिन्सन बळवंतरावांच्या भाषणाचें टिपण घेत बसले होते. मी अगदीं त्यांच्या जवळ बाजूस भूईवर बसलों होतों. सबंध भाषणांत इतकी गंभीरता पसरली होती आणि समाजहि इतक्या एकतानतेनें एकत होता कीं, त्या सर्वत्र पसरलेल्या शान्तीमध्ये एक टाचणी जर भूईवर पडली असती तर कदाचित् तिचाहि आवाज ऐकूं आला असता. असो. शेवटीं भाषण संपले. मि० नेव्हिन्सन उठले व त्यांच्या मनावरहि त्या भाषणाचा विलक्षण परिणाम झालेला दिसला. भाषण संपल्यावर उठून जात असताना खिशांत आपले पॉकेटबुक टाकत ते आपल्याशींच एक मोठा सुसकारा टाकून म्हणाले " That is the man "—" हा खरा मनुष्य आहे "—जणुंकाय त्यांस त्यावेळेस वाटत असावे कीं, त्यांच्या या म्हणण्याकडे दुसऱ्या कोणाचें लक्ष नाहीं आमच्या बळवंतरावांसंबंधीं त्या दिवशींच्या परिस्थितींत विलायतेवरून हिंदुस्थानाची परिस्थिति पाहाण्याकरितां मुद्दाम आलेल्या एका सुशिक्षित इंग्रजाच्या तोंडून हे प्रशंसोद्गार ऐकल्यावर माझ्या आंगावर मूठभर मांस अधिक चढलें असें मला झालें. त्या दिवशींचा प्रसंग अशा रीतीनें पार पडला.

( ६ ) ज्या दिवशीं अध्यक्षाच्या वादासंबधानें दोनप्रहरीं हा गोंधळ व मारामारी माजली, मला वाटतें, त्याच दिवशीं सकाळीं समेट होणें शक्य असल्यास पाहावे म्हणून बळवंतराव, मवाळ पुढाऱ्यांच्या भेटीस निघाले. समागमें दादासाहेब खापर्डे, मी व इतर एकदोन मंडळी होती. अर्थात्च स्वागताध्यक्ष सर फेरोजशाहा व डॉ० रासबिहारी घोष याच्या भेटीस जाणे प्राप्त झालें. कोणी स्नानांत तर कोणी उपहारांत गुतले आहेत अशी सबब सांगून या वेळेस आतां भेट होणें शक्य नाहीं असें आम्हांस त्यांच्या बंगल्याच्या आंतून माणसांबरोबर निरोप आले. भेटी झाल्या नाहींत आणि म्हणून समेटाचा प्रयत्नहि झाला नाहीं.

( ७ ) पुढें लवकरच या सुरत कॉंग्रेसच्या भानगडीचा परिणाम संकटरूपानें भोगावा लागेल असें बळवंतरावांस व आम्हां सर्वांसहि वाटतच होतें. त्याप्रमाणें ६ महिन्याचे आतच राजद्रोहाचे आरोपावरून बळवंतरावांवर खटला भरण्यांत आला आणि त्यांना मुंबईत डोंगरीचे जेलखान्यात अटकेत ठेवले. मी व दादासाहेब खापर्डे मिळून एकदां त्यांच्या भेटीस गेलों. जेलर कोणी मद्रासी हिंदु गृहस्थ होते. आम्ही जेलच्या आंत गेल्यावर या जेलरने आमच्या करितां दोन खुर्च्या व एक बळवंतरावाकरितां आणवल्या. बळवंतरावांचे आम्ही स्नेही म्हणून त्यांनीं मोठ्या प्रेमानें व आदरानें आमची विचारपूस केली व आम्ही

भेटीकरिता आलों आहोंत म्हणून बळवंतरावांकडे निरोप पाठविला. बळवंतराव जिना उतरून खालीं आले व ते आल्याबरोबर आम्ही जितक्या प्रेमानें व आदरानें उठून उभे राहिलों त्याचप्रमाणें ते मद्रासी जेलर गृहस्थहि उठून उभे राहले व जोपर्यंत बळवंतराव बसले नाहींत व आपण बसा म्हणून म्हणाले नाहींत तोंपर्यंत जेलर साहेबहि उभेच होते. आम्ही सर्व बसल्यावर, जेलर साहेबानें हळूच आपल्या टेबलाचे एका खणींतून पादरी रोठा सुपारी आणि अडकित्त्या काढून मोठ्या अदबीनें बळवंतरावांसमोर ठेवला ! बळवंतराव ती सुपारी व अडकित्त्या घेऊन हांसत बोलले. " जेलरसाहेब, मी आतां कैदी आहें हे आपण विसरलात वाटतें ! " मी विचारलें, 'जेलरसाहेब आपणांजवळ ही सामुग्री कशी !' ते म्हणाले " मला माहीत आहे कीं, ' आपल्या ' बळवंतरावांना सुपारी खाण्याचा फार शोक आहे. म्हणून ही सामुग्री मुद्दाम मी आणून ठेवली आहे ! आमच्यानें इतकीहि सेवा होऊ नये ! "

नेहमींप्रमाणें बळवंतराव इकडच्या तिकडच्या गोष्टी करू लागले. या आलेल्या अरिष्टाचा कांहीं परिणाम त्याचे मनावर झाला असावा असें कांहीं दिसलें नाहीं. वेळ संपतांच बळवंतराव उठले व जावयास निघाले. जेलरसाहेब मोठ्या अदबीनें म्हणाले " मी जाणून आहे, आपण फार नियम पाळणारे आहांत, परंतु आणखी कांहीं बोलावयाचे असेल तर सवलत आहे. " बळवंतराव जिना चढून वर गेले व आम्ही जेलरसाहेबाचे आभार मानत बाहेर येऊ लागलों. जेलरसाहेब म्हणाले, " बळवंतरावांसारख्यावर असें संकट येणें ही दुःखाची गोष्ट तर खरीच, परंतु दुःखांत सुख आम्हा सारख्याच्या हें कीं, अशा विभूतीच्या आगमनानें हें पापालय (home of Sinners) पुनीत होतें ! "

(८) या खटल्यांत बळवंतरावांना ६ वर्षांची शिक्षा झाली आणि ते १९१४ मध्यें सुटून आले. या सहा वर्षांच्या अवधींत महाराष्ट्राचा आत्मा व चैतन्य स्थगितावस्थेंत होतें. टिळकांचा अनुयायी राष्ट्रीयपक्ष आपआपल्या स्थानीं जीव धरून राहिला होता. टिळकांसारखा धडाडीचा व युक्तिबाज असा म्होरका नसल्यामुळे राष्ट्रीयपक्षास जागचे जागीं, विशेष गवगवा न करतां, आपलें कार्य करीत टिळकाची चातकाप्रमाणें मार्गप्रतीक्षा करीत राहाणेंच शहाणपणाचें होतें. परंतु त्यांनीं आपला पक्ष सोडला नाहीं आणि सुरतेस कै० फेरोजशाहा मेहता यांनीं स्थापलेल्या नवीन कनव्हेन्शन कॉंग्रेसला ते सामिल झाले नाहींत. अशा या स्थितींत १९१४ सालीं बळवंतराव हे सुटून आले. महाराष्ट्रांत नवीन चैतन्य व आवेश संचरल्याप्रमाणे भासू लागला. या अवधींत टिळकपक्ष मेला असावा म्हणून सरकारास जें सुखस्वप्न पडत होतें ते सर्व एका क्षणात लयास गेलें. पुनः राजकारणाची घडी नीट बसवून कॉंग्रेस काबीज करण्याची कल्पना मनात येऊं लागली. अशा वेळेस बेझंट बाईनीं बळवंतरावांस पत्र लिहून कळविलें कीं,

"कॉंग्रेस मधील दोन्ही तटांत समेट होणे अवश्य आहे आणि तशी इच्छा असल्यास मी प्रयत्न करण्यास तयार आहे." बाईनीं हे असे लिहिल्यावरून बळवंतरावांनीं सर्व महाराष्ट्रांतील प्रमुख पुढाऱ्यांस पुण्यास बाईंची भेट घेण्यास पत्रें लिहिलीं. इकडून दादासाहेब खापर्डे व मी गेलों. सातारा--पुण्याचीहि मंडळी हजर होती. बळवंतरावांच्या लायब्ररी हॉलमध्यें आम्ही सर्व जमलों. बैठक देशीच होती. बाई व बाईंच्या समागमे आलेले मला वाटते, श्री० एन्० सुब्बाराव हे दोघे खुर्चीवर बसले होते. इतर मंडळींत रा० शिवरामपंत परांजपे, रा० दादासाहेब करंदीकर, रा० वासुदेवराव जोशी, रा० खाडिलकर, रा० दादासाहेब खापर्डे, मी व आणखी मंडळी होती. बाईनीं समेट केला पाहिजे, या दुहीपासून राष्ट्राचें अतोनात नुकसान होत आहे वगैरे प्रतिपादन केलें. इतर मंडळीहि या गोष्टीस कबूल झाली. बळवंतराव अटी संबधानें बोलावयास लागले; इतके वेळपर्यंत मी गप्प होतों. बळवंतराव बोलूं लागताच मी पुढे सरसावलों व बळवंतरावास म्हणालों--"आपण सहा वर्षे आमच्यात नव्हतां, या अवधींत झालेल्या गोष्टींची आपणास माहिती नाहीं. आपण सध्याचे या भानगडींत पडूं नये. आम्ही बाईशीं समेटाच्या अटीसबंधानें बोलतों. मध्येंच काहीं अडचण उपस्थित झाल्यावर बाई व आम्ही सर्व आपली सल्ला घेऊ. सध्यां आपण बोलूं नये." बळवंतराव स्वस्थ बसले आणि लगेच मी बाईस बोललों, "आम्ही सर्व येथे राष्ट्रीय पक्षांतील आपापल्या मंडळींशीं विचार करून आलो आहोंत. तेथें आपल्यांत जे कांहीं ठरेल ते सर्व आमचा राष्ट्रीय पक्ष कबूल करील. आपण सर फेरोजशाहाशीं बोलून आला आहांत काय ? येथे जे ठरेल ते त्यांस मान्य होईल असा त्यांनीं आपणांस अधिकार देऊन ठेवला आहे काय ?" असे मी बोलत असतां बाईनीं मी कोण आहे म्हणून जवळच्या मंडळींपाशीं विचारपूस केली. मी नागपूरचा डॉ० मुंजे आहे हे कळतांच बाईंच्या कपाळावर आठ्या आल्याशा दिसल्या. बाईनीं थोडे तिरसून उत्तर दिलें कीं, फेरोजशाहा मेहताशीं त्यांचें बोलणें झालें नाहीं व त्यांनीं तसा अधिकारहि त्यांना दिला नाहीं. यावर मी म्हणालो, 'मग उगांच वेळ घालविण्यांत काय हांशील आहे! जेथें सर फेरोजशाहाची कबुली नाहीं तेथें समेट होणें शक्य नाहीं. बाई थोड्या सतापल्यासारख्या दिसल्या व बरे आहे म्हणून उठून जाऊं लागल्या. बळवंतरावहि त्यांना पोंहचविण्यास त्याचेबरोबर जाण्यास उठले व कांहीं वेळानें बाई गेल्यावर मंडळींत परत आले. बळवंतराव मला म्हणाले. "बाईशीं तुम्ही अशा तुसडेपणाने का बोललात ?" मी म्हणालों "हा इंग्रजी मायावीपणा आहे; आपण आपसांत भावाभावाप्रमाणे भांडलो मग आपसातच भावाभावाप्रमाणें समेट कां करूं नये ? तिसरा परकी मध्यें कां येऊं द्यावा ? आपणाला समेट हवाच आहे. चला आपण गोपाळराव गोखल्यांजवळ चलूं आणि त्यांच्या ज्या असतील त्या अटी कबूल करूं आणि आपसांत समेट करून घेऊ.

पुढें मग ज्या रीतीनें होईल त्या रीतीने कॉंग्रेस काबीज करण्याचा प्रयत्न पुनः करूं, परकीयाची मध्यें लुडबुड नको." बळवंतराव म्हणाले "तुमचें म्हणणें खरें; आपणाला जॅं हवें तेंच आपण केले पाहिजे. पण झालं तो थोडासा उद्धटपणाच झाला." मी म्हणालो, " माझ्याकडून चूक झाली असेल तर क्षमा करा." पुढें संध्याकाळीं मग बळवंतराव, दादासाहेब खापर्डे याना व मला घेऊन बाईच्या व गोखल्यांच्या भेटीस Servants of India Society मध्ये गेले. गोखले त्या वेळेस थोडे आजारीच होते.

( ९ ) १९०६ सालची गोष्ट होय. शिवाजी उत्सव त्यावर्षी कलकत्यात झाला होता, त्या उत्सवाकरिता बळवंतराव, दादासाहेब खापर्डे व मी असें मिळून आम्ही कलकत्त्यास गेलो. रस्त्यात ट्रेनमध्यें बऱ्याच गोष्टी झाल्या. त्यापैकीं एक येथें सांगावीशी वाटते. गोपाळराव गोखल्यासबधीं गोष्टी निघाल्या. गोखल्यांच्या राजकीय स्वभावाचा त्यानीं जो निष्कर्ष काढला, तो मला मोठा मार्मिक वाटला. बळवंतराव म्हणाले, "स्वराज्यामध्ये गोखल्यांसारख्या स्वभावाच्या माणसाना Foreign Secretary परराष्ट्रीयमन्त्री नेमण्यांत आलें नसते. कारण त्यांना वाटेल तसे फसवलें असतें; Home Member होण्यास ते उत्तम लायक गणले गेलें असते आणि त्यानीं अन्तर्गत राष्ट्रीय सुधारणा उत्तम केल्या असत्या."

याच उत्सवामध्यें पुढें एके दिवशीं एका बंगाली गृहस्थाने बळवंतरावास आपल्या एका बगाली मित्राच्या घरीं भोजनास बोलावले. हे बगाली गृहस्थ मला वाटतें त्यावेळचे बगाली हायकोर्ट जजाचे चिरंजीव होते. वेळ दुपारची सरासरी एक वाजण्याची होती. बळवंतरावाबरोबर दादासाहेब खापर्डे व मीहि होतो. जेवण झाल्यावर आम्ही पानसुपारी खात बसलों होतो. इतक्यात दुसरे एक बगाली गृहस्थ तेथे घाईघाईंत आले आणि म्हणू लागले कीं, मला वेळ नाहीं, माझा मुलगा अत्यवस्थ आजारी आहे, मला आपणाशीं थोडक्यात काहीं बोलावयाचें आहे, आपण एके बाजूस चलावें. आम्ही लगेच जवळच्या दुसऱ्या खोलींत गेलों ते बगाली गृहस्थ म्हणाले, " मी ज्योतिषशास्त्राचा काहीं थोडा अभ्यास केला; आहे आणि आपण हल्लीं हिंदुस्थानचे अद्वितीय पुढारी ( there is no Second to you ) आहात व मी आपला एक अनुयायी आहे. आपल्या पत्रिकेचा मी अभ्यास केला आहे " असं म्हणताच त्याचा कंठ दाटून आला आणि ते सद्गद्स्वरानें म्हणाले "आपणाला लवकरच ' बंधनयोग ' आहे." असं म्हणत असतां त्या गृहस्थाचे डोळे भरून आले व डोळ्यातून एकदोन टिंपहि पडलीं. पुढें ते गृहस्थ म्हणाले, " पण हा बंधनयोग शेवटच्याच आहे. पण फार लांब व मोठ्या कष्टाचा आहे. मला काळजी ही कीं, या आपल्या थकल्या काळात ( wrong side of your life) आपण याच्यांतून कसे निभावणार! परतु आयुष्य आहे. जीवास धोका दिसत नाहीं." इतके म्हणून मोठ्या प्रेमानें टिळकांस आलिं-

गन दिलें व शेवटीं त्यांच्या पायास हात लावून ते गृहस्थ म्हणाले, 'मी आतां जातो. माझा मुलगा अत्यवस्थ आहे. परमेश्वर आपणांस सुखी ठेवो.' डोळ्यांत आसवें आणून पुनः 'परमेश्वर आपणांस सुखी ठेवो' असें म्हणत ते गृहस्थ निघून गेले. त्यावेळेस नागपूर कॉंग्रेससंबधीं मोठें भांडण होईल व त्याचा परिणाम टिळकांस भोगावा लागेल असें कोणाच्या स्वप्नींहि नव्हतें !

( १० ) ह्याच वर्षी डिसेंबरच्या सुटींत आम्ही पुनः कॉंग्रेसकरितां कलकत्त्यास गेलों. यावेळेस आम्ही देशबंधु दास यांच्या राहात्या घरीं उतरलों होतों. त्यावेळेस दासबाबू कॉंग्रेसमध्ये विशेष भाग घेतांना दिसत नव्हते. परंतु त्यांचा ओढा राष्ट्रीय पक्षाकडेच होता म्हणूनच बळवंतरावांची राहाण्याची सोय यावेळेस दासबाबूकडेच करण्यांत आली होती. दासबाबूंच्या खाजगींतून जेवणें खाणें वगैरेंची सर्व व्यवस्था करण्यांत आली होती. दासबाबूंचे कुटुंब हे ब्राह्मोसमाजी व इंग्रजी शिक्षणांत वाढलेले ( anglicised ) असा लौकिक होता आणि बळवंतराव जुन्या ब्राह्मणी राहणींत वाढलेले. अशा anglicised कुटुंबांत बळवंतराव सारख्यांची राहण्याची सोय कशी होईल याबद्दल आम्ही सर्व थोडे साशंकच असूं. परंतु प्रत्यक्ष अनुभवानंतर असे दिसून आले कीं, दासबाबूंच्या पत्नी जरी नव्या इंग्रजी शिक्षणांत वाढलेल्या होत्या तरी जुन्या प्रतिष्ठित हिंदु घराण्यांतील आदरातिथ्याच्या चालरीतीहि त्यांच्या आंगवळणी झाल्या होत्या. व त्यांनीं मोठ्या आनंदाने व प्रेमळपणाने आम्हा सर्वांचे आदरातिथ्य केले. बळवंतरावांना बहुधा बाहेरून घरीं परत येण्यास बरीच रात्र होत असे. एक दिवस तर रात्रीचे बारा वाजल्यानंतर ते घरीं परत आले. तरी बाईनें मोठ्या आनंदानें स्वागत करावे. केव्हांहि कंटाळा म्हणून दाखविला नाहीं. त्यावेळेस ह्या सर्व मंडळीस गरम ताजें जेवायास मिळत असे. बाई स्वतः तोपर्यंत अन्न ग्रहण करीत नसत ! कुलवधूस उचित अशा विनयानें स्वतः पंक्तीसमोर जमीनीवर बसून बाई सर्व मंडळींचा समाचार घेत असत. असो; कॉंग्रेस सुरु होण्याचे एक दोन दिवसापूर्वी बळवंतराव बाबू सुरेंद्रनाथ बानर्जींच्या भेटीस गेले. समागमे दादासाहेब खापर्डे व मी होतों. मला वाटते लाला लजपतराय हेहि समागमे होते. बाबू साहेबांची भेट त्यांच्या ऑफिसमध्यें झाली. कांहीं गोष्टी झाल्यानंतर बळवंतराव म्हणाले, "बाबूसाहेब, या कॉंग्रेसमध्यें इंग्रजी मालाचे बहिष्कारावद्दल ठराव येईलच.; अर्थात् तो आपणालाच आणावा लागेल. आपल्याशिवाय दुसरा अधिकारी पुरुष नाहीं ही प्रचंड चळवळ ( about Partition of Bengal ) आपणच उभारली आहे आणि हा विषयहि आपणच पहिल्यापासून इतक्या नेटानें आणि त्वेषाने लोकांसमोर आणला आहे. आम्ही सर्व आपल्या पाठीमागें मदतीस आहोतच." बाबूसाहेब म्हणाले, " मला हा प्रश्न कॉंग्रेसमध्ये आणतां येणार नाहीं, आणि कोणी आणलाच तर मला विरोध करणे भाग पडेल (I shall have to oppose it ).

बळवंतराव म्हणाले, " हें विसंगत दिसणार नाहीं काय ? कॉंग्रेसच्या बाहेर बहिष्कारार्चे समर्थन आणि कॉंग्रेसमध्यें विरोध ? (How will it look Consistent ?)" बाबूसाहेबांनीं, थोड्या त्वेषानेंच उत्तर दिले, " It is too much to expect Consistency in politicians, there is some such things as expediency. —राजकारणामध्यें विसंगतपणाकडे कानाडोळाच प्रसंगीं करावा लागतो. समयोचितता म्हणून कांहीं पदार्थ आहे कीं नाहीं !" हें ऐकून आम्ही सर्व थक्क झालो. व आश्चर्य करीत परतलों.

---

## विनायक नारायण पटवर्धन

[ संगीतप्रवण, प्रोफेसर ( गांधर्व महाविद्यालय )
प्रमुख नट–गंधर्व नाटक मंडळी, पुणें. ]

गांधर्व महाविद्यालय-बोर्डिंगच्या इमारतीचा अनावरण समारंभ १९१७ ऑगस्टमध्ये श्रीमंत बाबासाहेब घोरपडे इचलकरंजीकर यांचे हस्तें झाला. त्यावेळीं समारंभाच्या आमंत्रणपत्रिका सर्वांना पाठविल्या होत्या. त्याप्रमाणें लोकमान्यानाहि पत्रिका पाठविली होती .समारंभ सकाळीं असल्यामुळें कांहीं कारणास्तव लोकमान्य त्यावेळीं येऊं शकले नाहींत.

समारंभ आटोपल्यावर ५–१० मिनिटातच लोकमान्यांची स्वारी अवचित् खालीं दरवाजासमोर गाडींतून उतरली. त्यावेळीं मी स्वतः कांहीं कामानिमित्त तेथें उभा होतो. लोकमान्य अवचित् आल्यानें मी गोंधळून गेलों. गु० प० विष्णु दिगंबर हे वर असल्यामुळें लोकमान्य आल्याची वर्दी देण्यास एका विद्यार्थ्याला सांगून मीच पुढे त्याचें स्वागत करण्यास गेलों, व वर येण्याबद्दल विनती केली.

चवथ्या मजल्यापर्यंत वर जाणें असल्यामुळे लोकमान्यांच्या हातांत जरी काठी होती तरी दमल्यासारखें वाटल्यानें ते माझ्या खांद्यावर हात ठेवून जिना चढू लागले. हॉलमध्यें गेल्यावर कोचावर बसले, तोंच एक वृद्ध गृहस्थ तेथें आला व लोकमान्यांच्या पायां पडून त्यांच्यावर कांहीं कविता म्हणूं लागला. लोकमान्यांनीं बराच वेळ त्या गृहस्थाकडे निरखून पाहून त्याला विचारलें 'आपण कोण ?' तेव्हा त्या गृहस्थानें उत्तर दिलें, 'मी आपला दास आहें.' त्यावर लोकमान्य विनोदानें म्हणाले 'आपण माझे दास आहांत कीं सरकारचे दास आहांत !' हे शब्द लोकमान्यांनीं उच्चारतांच तो गृहस्थ अगदीं खजील झाला ! परंतु तो पुन्हां पाल्हाळानें बोलू

लागला तेव्हां त्याला लोकमान्यांनीं सांगितले कीं, ' थोडावेळ आपण खालीं दरवाजांत बसाल तर मी पानसुपारी घेऊन खालीं येतों. ' तो गृहस्थ खालीं गेल्यावर लोकमान्यांनीं सांगितलें कीं, हे गृहस्थ सरकारी नोकर असून सी० आय्० डी० खात्यांतील आहेत ! हें ऐकतांच आम्ही सर्व चकित झालो. ह्यावरून लोकमान्यांना माणसांची पारख कशी होती हें स्पष्ट दिसतें. पानसुपारी घेऊन ते खाली जातात तों हे गृहस्थ पसार झाले होते. !!

---

## गोपाळ गणेश आचवल

[ लोकमान्यांचे एक नातेवाईक, मुंबई. ]

( १ ) लोकमान्य टिळक हे माझे वडील कै० ती० गणेश नारायण ऊर्फ तात्यासाहेब आचवल यांचे चुलत मामेभाऊ होत. लोकमान्य टिळकांचे वडिलांचा माझे वडिलांवर फार लोभ असे. १८८६ सालीं लो० टिळक कोकणांत गेले होते. त्यावेळीं त्यांनीं मी अजनवेलीस येत आहे वगैरे कांहीं न कळवितां दाभोळेस तरींत बसून ते बेळंदुरास उतरले व तेथून एक कोस चालत आले. त्यांना पाहिल्याबरोबर माझे वडिलांस अत्यंत आनंद झाला. माझे वडिलांनीं त्यांस असे सांगितलें कीं, आगाऊ आपण कळविले असतें तर इतका त्रास पडला नसता. लोकमान्यांनीं सांगितले कीं, ' माझा आयतेवेळीं येण्याचा बेत झाला, व आपले घरीं यावयाचें असल्यास आगाऊ कळविण्याचें कांहीं कारण नाहीं.' स्नान केल्यावर संध्येस मांडीं ठेविलीं होतीं. बराच वेळ संध्या करीत बसलेले पाहिल्याचें मला स्मरण आहे. दोन दिवस राहून मग पुण्यास आले.

( २ ) माझ्या दुसऱ्या भावाची स्कूल फायनलची परीक्षा पास झाल्यावर तो मुंबईस सखाराम बापू टिळक यांजकडे होता. त्यानें दहा रुपये सखारामबापूपासून घेतले व पुण्यास आला. वडील कोकणांत होते. मी शनवारांत भाऊसाहेब नातूचे बागेत माझे बिऱ्हाडचे खोलींत न निजतां शेजारीं निजावयास गेलों होतों. आई व दोन बहीणी शुक्रवारांत भाऊमहाराजांचे बोळात आजोबा आबा जोगळेकर यांजकडे गेलीं होतीं. मुंबईहून जो आला तों त्याने माझे खोलीवर थाप मारली. परंतु मी खोलींत नाहीं असें पाहिलें व हौदावर तेथें जाऊन पडला. सकाळीं लवकर उठलेल्या मंडळींनीं त्याला पाहिल्यावर हांक मारली, परंतु एक ना दोन. नंतर मला हांक मारूं लागले. मला एकानें ओढून आणले. मी त्याचें प्रेत पाहिल्यावर गर्भगळित झालों. पुष्कळ मंडळी जमली. दादांना कळल्याबरोबर ते आले व आईला गोविंद बोलावीत आहे असें सांगून फसवून

आणली. दादांनीं त्याचें प्रेत सद्दून इस्पितळांत नेलें व फाडून बघितलें. त्यांचे कनवटीला दहा रुपयांतील एक रुपया नऊ आणे--आगगाडीचे पैसे वजा जातां बाकी सर्व पैसे--होते. नतर ऑकारेश्वरावर दहनविधि आटपला. दादा सकाळीं आठ वाजतां आले तेथपासून दहनविधि होईपर्यंत ५।६ तास इतका त्रास त्यांनीं घेतला; याचें कारण माझे वडील तेथें नव्हते, सखारामबापू टिळक यांस urgent तार करून पुण्यास बोलावून आणलें व वडीलांस लांबलचक सांत्वन-पर पत्र लिहिलें व आमची आई, वहीणी, आईचे वडील व मी याची रवानगी ४।५ दिवसांनीं ज्येष्ठ महिना असल्यामुळे कऱ्हाड मार्गानें केली. मला त्यांनीं सांगितलें कीं, 'तुझे दोन्ही भाऊ येथे वारले आहेत करितां तू येथे शिकावयास येऊं नको. वाटेनें कऱ्हाडचे मुनसफ भावे यास व चिपळूणचें मुनसफ यास पत्रें दिलीं. कोणतेंहि काम हातांत घेतलें म्हणजे तें पुरें करावयाचें, त्यात यत्किंचितहि आळस करावयाचा नाहीं हा त्याचा बाणा असे. ह्या वेळीं त्यांनीं आमचेसाठीं जो त्रास सोसला त्यामुळें मला त्यांची जन्मभर आठवण राहिली. त्यामुळे ते मुंबईस आले तर त्यांना भेटल्याखेरीज मी कधीं राहिलों नाहीं व पुण्यास गेलों तर त्यांना भेटल्याखेरीज राहिलों नाहीं. मात्र त्यांचेकडे जातेवेळीं रिक्त हस्तानें न जातां सुपारीचे रोठे ४०।५० नेऊन त्यास द्यावयाचे. माझे वडील त्यास वर्षांतून दोन तीन वेळां सुपारी पाठवून देत असत!

( ३ ) श्री क्षेत्र काशी येथें कॉंग्रेस होती, त्यावेळीं माझी आई कोंकणातून येथे आली होती. तिला वाईकडे जावयाचें होतें. तिला मी असें म्हणालों कीं, वांई जवळ आहे व पूर्वी तेथें तू जाऊन आलेली आहेस. तिचे मनानें काशीस जाण्याचें घेतलें. वाटेंत घोंडुबाबा विद्वांस भेटले; त्यांना मी माझे आईला काशीस न्याल काय म्हणून विचारिलें. परंतु ते म्हणाले कीं, माझे वडिलांस देखील मी पाठवीत नाहीं. तेव्हां काय करावें ह्या काळजींत मी पडलों. दादाची माझी भेट झाली नव्हती. मला ऑफिसांत जावयाचें होतें. आईला जुन्या सरदारगृहांत नेऊन पोंचविली. दादा तेथें नव्हते. मी ऑफिसांत गेलों. ते आल्यावर तिला त्यांनीं बरोबर नेण्याचें कबूल केलें. कारण दादांचे बरोबर काकू व दोन मुली होत्या. रा० साने यास मजकडे ऑफिसांत पाठवून दिलें व तिचें सामान काय असेल ते घेऊन ये, मी तिला काशीस नेत आहें असा निरोप आला. काशीस जाईपर्यंत आगगाडींत तिनें कांहीं खाल्लें नाहीं. अयोध्या, मथुरा वगैरे ठिकाणें तिला त्यांनीं दाखविलीं. तिला लिहितां व वाचता बिलकूल येत नव्हतें; तथापि तिनें या प्रवासांत केलेल्या कविता दादाचे मुलींकडून लिहून काढ-विल्या, त्या इतक्या सरस आहेत कीं, मी त्या स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध करणार आहें.

प्रयागाहून मला ह्यावयाचे वाडींत माझे विऱ्हाडचे पत्यावर तार आली, कीं अमुक गाडीनें तुझी आई येत आहे तरी अमुक वाजता बोरीबंदरवर येऊन

उतरून वे. काकू व मुलीं हीं नाशकास उतरलीं, दादा पुण्यास गेले व माझे आईला सॉर्टरबरोबर त्यांनीं मुंबईस पाठविली. मी आईला उतरून घेतली. सॉर्टरने मला सांगितलें कीं, दादांनीं आई सुखरूप पोंचल्याचे पत्र पाठवावयास सांगितलें आहे. मी त्या सॉर्टरचें सांगण्याकडे लक्ष दिलें नाहीं. मी दादांना पत्र पाठविलें नाहीं. दादांनीं एक दिवस वाट पाहून दुसऱ्या दिवशीं पुण्याहून पत्र पाठविलें कीं आई पोचल्याचे पत्र नाहीं तरी सुखरूप पोंचल्याचे पत्र पाठव. मी पत्र पाठवून चुकी कबूल केली दादांच्या दक्षतेचे मला आश्चर्य वाटलें.

( ४ ) मडालेहून दादा रात्रीं पुण्यास आले. दुसरे दिवशीं सकाळीं दाजी कानिटकर यांनीं मला दादा सुटून आल्याची तार आल्याचे सांगितले. मी बरोबर पांढरी सुपारी घेऊन रात्रीचे गाडीने पुण्यास गेलो. त्यांचे वाड्यांत प्रवेश होण्यास अतिशय त्रास पडला. कारण त्या दिवशीं अतोनात गर्दी झाली होती. त्यांचे जवळ जाऊन बरोबर आणलेली सुपारी त्याना दिली. त्याबरोबर त्यांना अत्यत आनद झाला मला जरा थांबण्यास सांगितलें. मला खालीं घेऊन आले. आपले मुलांस मी कोण हें सांगितले. माझी आई निवर्तल्याचे त्यास मडालेस जाण्यापूर्वीं कळलें होते. माझे वडिलाचे कुशल त्यानीं विचारिले. ते स्वर्गवासी झाल्याचें सांगितल्याबरोबर त्यांना फार वाईट वाटलें. आतां कोकणांत आल्यास मला जुना जिव्हाळ्याचा आप्त असा कोणी राहिला नाहीं असे ते म्हणाले. त्यांस देवाज्ञा झाली तेव्हां त्याचें वय किती होते असे मला त्यांनीं विचारिले. मी सांगितले कीं, त्यावेळीं त्यांचे वय ६८ वर्षांचें होते. त्यावर ते म्हणाले कीं, आमचे आप्तमडळींत फक्त आमचे काका (गोविंदपत) हे काय ते जास्त जगले. मी फार तर आतां दोन तीन वर्षें काढीन. त्यानतर ते सहा वर्षें होते.

( ५ ) मडालेहून आल्यानतर दादा सरदारगृहांत आले होते व त्यावेळीं त्यांची चुलती चिखलगांवाहून येथें आली होती. ती मला म्हणाली, ' मला बाळाला भेटावयाचें आहे. ' मी सरदारगृहांत गेलों व दादांना विचारिले कीं, आजीला तुम्हांला भेटण्यासाठीं केव्हा घेऊन येऊ कीं ज्यावेळीं येथे तुम्ही असाल. दादा म्हणाले कीं, " ती बोटींतून आली कचीं, तिला तू येथें आणूं नको. मी तिला तिचे बिऱ्हाडीं भेटावयास येईन. तूं केव्हा घरीं असशील तें सांग." मी त्यांना सांगितले कीं, 'उद्यां रविवारची मला सुटी आहे. तुम्ही सांगाल त्यावेळीं मी घरीं आहेंच. ' त्यांनीं सांगितलें कीं, " मी उद्यां सकाळीं येतों. " मी सकाळीं क्रॉफर्डमार्केटमधून हार व द्राक्षें आणविलीं होतीं. सकाळीं टेलिफोन आला कीं, मी सरदारगृहांतून निघत आहें. ते बिऱ्हाडीं आले. चुलतीजवळ १५।२० मिनिटें बसून भाषण केले. थोडीं द्राक्षें खाल्लीं व हार घालावयास लागल्याबरोबर हार घालू दिला नाहीं. "चुलतीचे देखत मी हार घालून घेणें चांगलें नाहीं. व रोजच्या मनुष्यांनीं हार घालावयाचें हें काय ? बाहेर देखील मला हार

घालून घेणें आवडत नाहीं. आतां तुझ्या खोलींत आलेंच पाहिजे काय!" असें ते म्हणाले. 'आपले पाय खोलीला लागल्यास चागलें.' असें म्हणतांच माझे खोलींत आले. माझी मडळी गावीं गेल्यामुळें मी एकटाच होतों. झोंपाळ्यावर बसल्यावर त्यांना त्यांचे वडिलांचीं व माझे आजोबास आलेलीं पत्रें दाखविलीं. तीं पाहून ते असें म्हणाले कीं, "तुजजवळ हें हस्ताक्षर फार जुनें आहे. मजजवळ इतकें जुनें हस्ताक्षर नाहीं." त्यावेळीं मला अजनवेलचे किल्याची हकीकत मिळविण्याचा नाद लागला होता. रा० ब० पारसनीस यांचे ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र श्री० केळकर यांचें 'मराठे व इंग्रज' या व दुसऱ्या पुस्तकांतून बरीच माहिती मिळविली होती. 'केसरीं'तील विश्राम रामजी घोले त्यांच्या मृत्युलेखात कांहीं मिळाली होती. त्यावरून मी दादांस विचारलें कीं, 'घोले यांचा मृत्युलेख कोणी लिहिला होता?' ते म्हणाले कीं, "तो लेख मी लिहिलेला आहे. तुला लागेल ती माहिती देईन." पण पुढें तितक्या स्वस्थपणानें माहिती विचारावयास मला वेळ सांपडला नाहीं.

( ६ ) चि० बापूचे लग्नाचे वेळीं त्यांनीं मुंबईस ज्या गृहस्थांस आमंत्रण करावयास सांगितलें होतें ते गृहस्थ मजकडे आमंत्रण करावयास विसरले. लग्नाकरितां आलेल्या मंडळींत मी नाहीं असें दादांचें लक्षात आलें. त्यावेळीं त्यांनीं एका गृहस्थाबरोबर मजकडे उपरण्याचे पान पाठविलें व त्याचेबरोबर असा निरोप पाठविला कीं, 'तुला आमंत्रण गेलें नाहीं ही माझी चुकी आहे.' मला उपरण्याचें पान व हा निरोप पोंचल्यावर त्या दिवशींच मी सहा दिवसाची रजा घेतली व दादांकडे गेलों. दादांकडे गेल्याबरोबर त्यांनीं मला उपरण्याचें पान पाठविल्याचें सांगितलें व पुन्हा चुकीचा उच्चार केला. मी दादाना सांगितलें कीं, 'आपणास जें वाटत आहे तें वाटण्याचें कारण नाहीं. कारण कितीजणांची आपण आठवण ठेवणार! आपणास हें वाईट वाटूं नये म्हणून तर मी सहा दिवस रजा घेऊन तुमचेकडे राहावयास आलों आहे." असे सांगितल्यावर त्यांना बरें वाटलें. 'आणखी कोणासंबंधाने अशी चुकी झाली असल्यास मला कळव.' असेंहि त्यांनीं सांगितलें. सध्याकाळीं मला असें समजलें कीं, त्यांचे मामीला बोलावणें जावयाचें राहिलें होतें. दादांस मी तसें कळविल्याबरोबर त्यांनीं तिचेकडे लुगडें पाठवून दिले, व लुगडें पाठविलें आहे असें मला सांगितले.

(७) हिराबागेत मी वसतव्याख्यानमालेंतील एका व्याख्यानाला गेलों होतों. त्यावेळीं प्रो० शंकर बाळकृष्ण दीक्षित यांचे व्याख्यान होते व प्रो० जिन्सीवाले अध्यक्ष होते. प्रो० दीक्षित यांनीं विषय इतक्या सुलभ रीतीनें प्रतिपादन केला कीं, तो सर्वांस समजला. मध्यें कांहीं जणांनीं सायननिरयनवादाबद्दल शंका विचारल्या. त्यावेळी दादा सिंहगडावर गेले होते. प्रो० जिन्सीवाल्यांस ह्या शंकांचें उत्तर प्रो० टिळकच तुम्हांस देऊं शकतील असें सांगून सभा विसर्जन करावी

लागली. दुसऱ्या प्रसंगीं प्रेसिडेन्सी असोसिएशनचे विद्यमानें दादांचें Khaldian Literature या विषयावर व्याख्यान झालें. त्यावेळीं सर वाच्छा अध्यक्ष होते. त्यावेळीं त्यांनीं सांगितलेल्या माहितीमुळे ' विद्वानांत हिरा ' त्यांस कां म्हणत त्याचा चांगलाच प्रत्यय आला.

---

## अनंत वासुदेव फडणीस

[ सातारा येथील सरदार घराण्यांपैकीं एक सुखवस्तु गृहस्थ व अखेरच्या दिवसांतील लोकमान्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी, पुणें. ]

( १ ) अमृतसर कॅांग्रेसला लोकमान्य गेले होते त्यावेळीं त्यांची राहण्याची व्यवस्था एका स्वतंत्र बंगल्यांत केली होती. अमृतसर येथें थंडी फार होती, यामुळें प्रतिनिधींचे फार हाल झाले. त्या प्रतिनिधींत पुण्याहून कै० रा० करमरकर बी. ए. हे एक गेले होते. हे तरुण असून होमरूल लीगचे उत्साही व मेहनती प्रचारक होते. परंतु अत्यंत अशक्त असत. त्यांच्या कित्येक स्नेही मंडळींनीं पुण्यास 'तुम्हांस अमृतसरची थंडी सहन होणार नाहीं, तुम्ही न गेल्यास बरें' असें सांगून पाहिले, परंतु ईश्वरी नेमानेम असेल तो चुकत नाहीं. ते कोणाचें न ऐकतां कॅांग्रेसला गेले व दोन दिवसांतच न्युमोनियानें आजारी झाले. ते ज्या कँपमध्यें राहात होते तेथील बरोबरच्या मंडळींनीं त्यांचेकरितां बरेच श्रम घेतले; परंतु कँपमध्यें त्यांस ठेवण्यापासून अपाय जास्त होईल असें वाटूं लागल्यावरून त्यांस त्यांनीं लोकमान्यांचे बंगल्यात पोंचविलें. ते बंगल्यांत आल्यावर दोन दिवस अहोरात्र लोकमान्यांनीं डॅाक्टरचे सल्ल्यानें औषधोपचार व त्याची शुश्रुषा घरच्या मनुष्याप्रमाणें चालविली होती. ते स्वतः वरचेवर त्यांचे जवळ जाऊन त्यांस शेकणें, औषधोपचार देणें वगैरेचा तपास करून व मंडळीकडून करवून घेत. परंतु त्यांस कांहीं गुण वाटेना व प्रकृती जास्तच बिघडत चालली. तेव्हां डॅाक्टरांनीं त्यांस तेथील सिव्हिल हॅास्पिटलमध्यें ठेवण्याचा सल्ला दिला. डॅाक्टरचे सल्ल्याप्रमाणें लोकमान्य स्वतः करमरकरास घेऊन हॅास्पिटलमध्यें गेले व तेथील डॅाक्टरची गांठ घेऊन त्यांजवर नीट लक्ष ठेवण्याबद्दल त्यांस सांगितलें. या कामीं कमजास्त खर्च आला तर त्याची तरतूदहि त्यांनीं केली होती. इकडून कँग्रेसला गेलेल्या एका दक्षिणी गृहस्थास त्यांचेजवळ दवाखान्यांत ठेविलें. इतकी सर्व तजवीज करून पुन्हा अमृतसरहून निघण्यापूर्वी दवाखान्यांत जाऊन करमरकरांस धीर देऊन व डॅाक्टरांस काळजी घेण्याबद्दल सांगून तेथून निघाले. लोकमान्यांनीं दवाखान्यांत पोहचविलेला रोगी सबब त्यांची शुश्रुषा व व्यवस्था

तेथील डॉक्टर व इतर मंडळींनीं अत्यंत काळजीपूर्वक केली, परंतु दोन दिवसांत करमरकरांचे दुखणें विकोपास जाऊन त्यांतच त्याचा अंत झाला. अमृतसर येथील डॉ० किश्चलू वगैरे मंडळींनीं लोकमान्याजवळील मनुष्य या भावनेने त्याचा अंत्यविधि मोठी मिरवणूक काढून केला.

( २ ) विलायतेस जाण्यासाठीं शिष्टमंडळ मुंबईहून कोलंबोस जाण्यासाठीं निघालें. वाटेंत जेथे जेथे गाडी थांबली त्या त्या स्टेशनवर पानसुपाऱ्या, मानपत्रें, वगैरे सन्मानाचे प्रकार कोलंबोपर्यंत सारखे चालले होते. रामेश्वरचे स्टेशनवर तिकडील धार्मिक रिवाजाप्रमाणे तेथील वेदाध्यायी भिक्षुक मंडळी मोठमोठे जलाचे कलश डोक्यावर घेऊन लोकमान्यांचे दर्शनास आली होती. आमचे तीर्थावरून परस्पर आपण जात आहां तेव्हा येथें उतरून श्रीरामेश्वराचें दर्शन घेऊन आपण पुढें जावे अशी सर्वांची ईच्छा आहे, असा आग्रह करू लागले. परंतु लोकमान्यांनीं पुढील जाण्याची आगाऊ झालेली व्यवस्था व निकड, आणि कामाचे महत्त्व हें त्यांच्या मनात नीट उतरविलें व पुढें येण्याचे आश्वासन देऊन आपण मला न उतरल्याबद्दल माफी कराल अशी विनंति केल्यावर त्यांनीं आपला हट्ट सोडला व लोकमान्यास योजिलेल्या कार्यास यश येण्यासाठीं वेदोक्त आशीर्वाद दिले. त्यावेळीं रामेश्वरचे स्टेशनवर वेदघोष ऐकण्याचा समारंभ संस्मरणीय झाला. शेवटीं लोकमान्यांनीं तेथील जमलेल्या सर्व ब्राह्मणांस रौप्य दक्षणा देऊन संतुष्ट केलें.

( ३ ) पुण्याहून मुंबईस लोकमान्यांची स्वारी प्रकृतिस्वास्थ्याकरिता सरदार-गृहांत येऊन राहिली होती. एके दिवशीं श्री० चिंतामणरावजी वैद्य त्याजकडे आले व त्यांनीं नवीन लिहिलेल्या एका पुस्तकाचीं प्रुफें लोकमान्यांनीं पाहावीं व त्यासंबधाने आपलें मत द्यावें असा आग्रह धरला. त्यांनीं त्यास कबुली दिल्यावरून वैद्यांनीं बरोबर आणिलेलीं प्रुफें ते ठेवून कल्याणास गेले. जातांना लोकमान्यांनीं " मी उद्यां वाचून पाहीन. आपण परवाचे दिवशीं या म्हणजे आपले मत देतों" असे म्हणाले. लोकमान्यांची प्रकृती बरीच क्षीण झाली होती. तोंडास अरुची असल्यामुळे अन्नहि जात नसे. दुसरे दिवशीं सकाळीं नित्याप्रमाणे चहा होताच मजजवळ प्रुफें मागितलीं. तीं दिल्यावर वाचण्यास सकाळीं ७॥ ला सुरवात केली. मध्यतरीं फक्त जेवण व स्नान यात अर्धा तास दवडला असेल. रोज दुपारीं थोडीशी निद्रा घेण्याची त्यांना अलीकडे सवय असे, म्हणून मी मुद्दाम त्यांनीं विश्रांती घ्यावी या उद्देशाने 'आज झोप येत नाहीं काय?' असे विचारतां, त्यांनीं ' मजला हें काम आज संपविले पाहिजे, उद्यां चिंतामणराव येतील.' असें उत्तर दिलें. सायंकाळपर्यंत सर्व प्रुफें वाचून पेटींत ठेवण्यास दिलीं व देतांना " उद्यां चिंतामणराव आल्यावर त्यांची खोटी नको, " असें म्हणाले. 'त्या दिवशींच्या या श्रमामुळे त्यांचे दुखण्यांत भरच पडली. कारण

त्याच दिवशीं रात्रीं त्यांस ज्वर आला. रात्रभर झोंप आली नाहीं. दुसऱ्या दिवशीं दुपारीं चिंतामणरावजी वैद्य येतांच त्यांस त्यांनीं "काल मी आपलें सर्व पुस्तक वाचलें. आज ज्वर आल्यामुळें मला त्या संबंधानें आपल्याशीं बोलण्याची ताकद नाहीं" असें सांगितलें. अखेर चिंतामणरावजींची इच्छा अपुरीच राहिली. कारण लोकमान्यांची प्रकृती जास्त जास्त बिघडून त्यांतच त्यांचा अंत झाला. चिंतामणरावजीस पुस्तकासंबंधीं त्यांचें मत कळलें नाहीं, याबद्दल हळहळ वाटली. लोकमान्य काम करण्यास बसल्यावर त्यांस तें पुरें होईपर्यंत नित्य व्यवसाय, तहान, भूक याचेंहि स्मरण होत नसे. त्यांचें अगदीं शेवटचें उदाहरण म्हणून हें दिलें आहे.

(४) लोकमान्यांच्या कारकीर्दीतील श्रीमंत जगन्नाथ महाराजांकरितां अखेरच्या हायकोर्टमधील केसची मुण्यास सर्व तयारी करून लोकमान्य मुंबईस आले. तेथें आल्यावर महाराजांचे बॅरिस्टर कांगा व जिना यांस त्यांच्या चेंबरमध्यें जाऊन केसबद्दल Instructions दिल्या. केस सुरू होऊन दुसरे दिवशीं निकाल जगन्नाथ महाराजांचे बाजूनें झाला. ही बातमी हायकोर्टमधून दुपारीं आली. त्यावेळीं ते ज्वरानें बिछान्यावर पडून होते. ती बातमी नुसती ऐकून समाधान न झाल्यामुळें त्यांनीं रा० बखले ( महाराजांचे वकील ) यांस निरोप पाठविला कीं, ' आपलें काम आटोपतांच घरीं जाण्यापूर्वीं मजकडे येऊन भेटून जावें, व निकालाची नक्कलहि तावडतोब मिळवावी.' रा० बखले घरीं जाण्यापूर्वीं सरदारगृहांत आले. त्यांनीं जजांनीं दिलेला निकाल सांगितला त्यायोगें समाधान झालेसें दिसलें, तरी निकालाची नक्कल दुसरें दिवशीं कोर्टांत जातांच पाठविण्याबद्दल त्यांस बजाविलें. त्यावेळीं लोकमान्यांचे अंगांत १०३ डिग्रीपर्यंत ताप होता. दुसरे दिवशीं नकला रा० बखले यांजकडून हायकोर्टमधून आल्या, परंतु त्यावेळीं तापाचा जोर व रात्रभर निद्रा न आल्यामुळें अस्वस्थ असल्यामुळें त्या पेटींत ठेवण्यास सांगितल्या, व उद्यां पाहूं म्हणाले. दुसरे दिवशीं सकाळीं नकला मागितल्या, निजल्या निजल्याच त्या वाचण्याचा बराच प्रयत्न करून पाहिला, परंतु कांहीं जमेना. तेव्हां परत ठेवण्यास देऊन म्हणाले, " कांहीं जमत नाहीं, स्मरणांत येत नाहीं. द्या ठेवून " पुढें प्रकृती जास्त बिघडून तसेंच राहिलें. यावरून त्यांची श्री० जगन्नाथ महाराजांबद्दलची काळजी व कळकळ आणि हातीं घेतलेलें काम कसें काय पार पडलें हें पाहाण्याची तळमळ अखेरपर्यंत कशी होती हें व्यक्त होतें.

(५) बनारस येथें ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची बैठक होती त्यासाठीं लोकमान्य गेले असतां ते गंगास्नानाकरितां श्रीमनकर्णिकेचे घाटावर गेले. बरोबर श्री० दादासाहेब करंदीकर, तात्यासाहेब केळकर आदिकरून त्यांचे बरोबरची मंडळी होती. घाटावर गेल्यावर त्यांस इतर मंडळीबरोबर पोहण्याची इच्छा उत्पन्न झाली. सर्वांचे बरोबर कांचा मारून एकदां पोहून आल्यावर पुन्हां जास्त

पोहोण्याची इच्छा झाल्यामुळें त्यांनीं गंगेत उडी टाकली व बरेच पोहून आले. तेथील मंडळींनीं त्यांचे समवेत नांव पोहताना ठेविली होती. इतक्या उतारवयात त्याची ही पोहण्याची हौस अवलोकन करून शे० जमनादास द्वारकादास वगैरे तेथे असलेल्या व जमलेल्या मंडळींस फार अचंबा वाटला. त्यावेळीं लोकमान्यांनीं मंडळींस तरुणपणीं बनारस कॉंग्रेसचे वेळीं पोहून गंगापार गेल्याची गोष्ट सांगितली. स्नानानंतर मनकर्णिका घाटावरील पंड्यानीं लोकमान्यांस गौरवपूर्वक मानपत्र समर्पण केले व प्रसाद अर्पण केला व त्या प्रसंगास अनुरूप असें छोटेसें लोकमान्यांनीं भाषण केले.

---

## पांडुरंग काशिनाथ पेंडसे

[ बी. ए. एल्. एल्. एम्., ॲडव्होकेट, मुंबई. ]

( १ ) माझे वडील श्री० कै० काशिनाथ बळवंत उर्फ बाबासाहेब पेंडसे यांचा व लोकमान्यांचा संबंध, वडील सन १८७१–७२ सालीं डेक्कन कॉलेजांत दक्षिणा फेलो असताना आला. त्यावेळीं लोकमान्य प्रिव्हियसचचे ( लिटल् गोचे ) क्लासांत विद्यार्थी असत. सार्वत्रिक नियम म्हटला तर बहुतेक विद्यार्थीगण यथाश्रुतग्राही पक्षाचा असतो. लोकमान्यांची गणना पहिल्यापासूनच चिकित्सक बुद्धीच्या व तीक्ष्ण मतिमान् विद्यार्थ्यांमध्यें होत असे असें वडील सांगत.

( २ ) सन १८८६ चे सुमारास वडील मध्यभागचे असिस्टंट कमिशनर असतांना क्राफर्ड प्रकरण उपस्थित झालें. या चळवळींत माझे वडील व लोकमान्य यांचा एक जुटीने काम करण्यांत विशेषच परिचय जडला व तो शेवटपर्यंत वृद्धिंगतच होत गेला. या चळवळींत लोकमान्यांची अलौकिक चिकाटी, निरालस्य व निःस्वार्थीपणा हा प्रकटपणें लोकांचे नजरेस आला. त्यांनीं अविश्रांत श्रम करून 'केसरी,' 'मराठा' व जाहीर सभा यांत लेख व व्याख्यानें या रूपानें हिरमुसलेल्या मामलेदारांची बाजू उचलून धरली. मामलेदारांचे प्रकरणात सरकार खाजगी रीतीनें वचनबद्ध झाल्यामुळें मामलेदारांवर लाच दिल्याचे खटले उपस्थित करणें म्हणजे “ राजाचे नाव वापरून विश्वासघात करण्यासारिखें होय ” ( Breach of faith in the Queen's name ) असें लोकमान्यांनीं प्रतिपादन केले. या चळवळीनें लोकमान्यांनीं मामलेदार लोकांवर बहुत उपकार केले. याची उतराई करण्याकरितां माझे वडिलांचे पुढाकारानें मामलेदार लोकांनीं लोकमान्यांचे वडील मुलाचे मौंजीबंधनाचे वेळेस हजार पांचशें रुपयांपर्यंत त्यास अहेर

करावा असा बेत केला व त्यास अनुसरून वडिलांनीं लोकमान्यांस अहेर घेण्याविषयीं आग्रहपूर्वक विनंति केली. परन्तु लोकमान्यांनीं ती साफ नाकारली. व अत्याग्रहास्तव व वडिलांची अत्यंत मीड पडल्यामुळें एक वळ्याळ तेवढें स्वीकारण्याचें त्यांनीं कबूल केलें. ह्या एका अत्यंत निःस्वार्थीपणाच्या गोष्टीवरून वडिलांची लोकमान्यांवर विशेष आदरपूर्वक भक्ति जडली; व अशा स्वार्थरहित देशकार्यास वाहून घेतलेल्या पुरुषास प्रत्येक सरकारी बिनसरकारी माणसानें मदत करणे हें त्याचें कर्तव्य आहे, अशी गांठ वडिलांनीं आपल्यापाशीं बांधली. सन १८९० सालापुढें वडिलाचा व लोकमान्यांचा जास्तच परिचय जडत चालला. त्यांचीं बहुतेक सामाजिक, धार्मिक व राजकीय बाबतींत मतें जमत असत. आठवड्यांतून एकदोन वेळां तरी त्यांची आमचे घरीं गांठ पडत असे. आम्हां मुलांना जरी फारसे समजत नसे, तरी वडील ज्या पुरुषास इतका मान देतात व ज्यासबधीं नेहमीं आदरानें बोलतात तो कोणी तरी अलौकिक पुरुष असला पाहिजे अशी आमची पक्की खात्री झाली. लोकमान्यांचें व वडिलाचें संभाषण चालले असतांना आम्ही सर्व मुले दडून एकचित्तपणानें ऐकत बसत होतों. अभ्यासाकडे अथवा खेळाकडे सुद्धां आमचे लक्ष इतके वेधलें जात नसे. व आम्हास असें वाटे कीं, जणुंकाय सर्व जगाचे हिताहिताचे प्रश्न यांचे संभाषणावर अवलबून आहेत. या दोघांच्या भाषणप्रसगांतील पुष्कळ लहान मोठ्या गोष्टी मला आज आठवतात, परतु त्यांतील कांहींचा मासला पुढें देतों.

( ३ ) डेक्कन एज्युकेशन सोसायटींतून अग काढून घेण्याचीं कारणें विचारतां लोकमान्य म्हणत कीं, " शिक्षण सस्था मुंबईंचे जेसुईट लोकाचे तत्त्वावर चालविली पाहिजे. सस्थेंतील प्रत्येक व्यक्तीने आपलें तन मन आणि विशेषतः धन सस्थेस अर्पण केलें पाहिजे व आपली सर्व मिळकत सस्थेचे सामान्य द्रव्यांत ठेविली पाहिजे. स्वतःकरितां कोणत्याहि रीतीनें द्रव्यसचय करितां कामा नये." या तत्त्वास बऱ्याचशा सभासदांनीं विरोध केल्यामुळे लोकमान्यांस सोसायटींतून निघून जावें लागले. खुद्द माधवराव रानड्यास सुद्धां लोकमान्यानीं असा प्रश्न केला कीं, " आपण सरकारी सोन्याची बिडी तोडून टाकून शिक्षणसस्थेंत याल तर देशाचें अलोट कल्याण होईल. " या प्रश्नास माधवराव रानड्यांचे एकच उत्तर असे कीं. ' सरकारी नोकरींतच राहून मला देशाचें जास्त हित करितां येईल. ' तेव्हा रानड्याचें मन वळविण्याचे लोकमान्यांनीं सोडून दिलें. आपणासबधानें लोकमान्यास माझे वडील असें सांगत कीं, "अनेक वर्षें माझी नोकरशाहीचे दास्यांत गेलीं व या सेवाश्ववृत्तीचा आत्म्यावर इतका परिणाम होतो कीं, सेवाधर्म ही प्रकृति बनून जाते व कितीहि निग्रह केला तरी प्रारब्धकर्माप्रमाणें हिचा 'भोगादेव क्षयः' तेव्हां जें प्रथमच चुकलें त्याची निष्कृति म्हणजे सरकारी नोकरींत राहून_ तुमच्यासारख्या लोकांचें देशकार्यांत उपयोगी पडणें.

विषकृमिन्यायेन विषांतील किड्यास विषाची बाधा होत नाहीं व विषच त्याचा जीवनोपाय होऊन असल्यामुळें त्यास गोड लागतें; तद्वत्‌च आम्हा सरकारी नोकराची स्थिति आहे. सरकारी पदव्या अथवा असामान्य बढती याचा मी लोलुप नाहीं. परतु आज जर कोणी मला म्हणाले कीं, ' सरकारी नोकरी सोडून दे,' तर असें करण्यास मात्र माझी तयारी नाहीं." याप्रकारें वडील लोकमान्यांपाशीं प्राजलपणें कबूल करीत. असिस्टट कमिशनर या नात्यानें पुष्कळ सिव्हिलियन लोकांचा वडिलांशीं सबध येत असे व बऱ्याच राजकीय विषयावरील खरें धोरण वडिलास समजत असे. माहितीचे रूपाने व चर्चेचे रूपानें वडिलाची लोकमान्यास पुष्कळ मदत होत असे. 'केसरी'तील कडक टीका वाचून सिव्हिलियन आपआपसांत म्हणत कीं, ' टिळकांची नवीन शिवाजी होण्याची इच्छा दिसते.' ( Mr, Tilak wants to be the New Shivaji )

( ४ ) सन १८९४ मध्यें स्पेन्ससाहेब कमिशनर होते. त्याची व लोकमान्यांची मुलाखत वडिलांनीं घडवून आणिली. मुलाखतीचेवेळीं लोकमान्यांनीं " ओरायन " हे आपलें पुस्तक साहेबबहादुरांस नजर केलें. मुलाखतीचे वेळीं वडिलानीं कमिशनर साहेबांस स्पष्ट सागितलें कीं, 'बळवतराव टिळक हे माझे परम मित्र आहेत, व ते मध्यभागतर्फे निवडून आलेले सभासद या नात्यानें व आपले पुस्तक नजर करण्याकरिता आपली भेट घेत आहेत.' मुलाखतीनतर कमिशनर साहेब फार खुष झाले व वडिलापाशीं त्यानीं स्पष्ट बोलून दाखविलें कीं, " टिळक हे बोलण्यांत फारच चतुर गृहस्थ आहेत. "

( ५ ) १८९७ मध्यें राणीचे ज्युबिलीनिमित्त गणेशखिंडींत सरकारी बडा खाना रात्रीचे समयीं झाला. या समयीं लोकमान्य व माझे वडील हे गणेशखिंडींत हजर होते. मीहि केवळ मजा पाहाण्यास त्याचे बरोबर गेलो होतो. सर्व समारभ आटोपून रात्रीं बाराचे सुमारास आम्ही सर्व शहरांत परत आलो. दुसरे दिवशीं सकाळीं रँड साहेबाचा खून गणेशखिंडीचे वाटेवर झाल्याचे सर्व गांवभर झालें. पुढें आठदहा दिवस रँड मर्डर शिवाय दुसरी गोष्ट लोक बोलत नसत. कांहीं नेटीव सरकारी नोकर लोकमान्यांकडे येऊन त्यास म्हणू लागले कीं, लोकानीं व तुम्ही पुढाऱ्यानीं तरी या गोष्टीचा जोरानें निषेध केला पाहिजे. परंतु ते स्पष्ट सागत कीं, "कोणत्याहि गोष्टीचा सबध नसता निषेध करणें म्हणजे आपणावरच परपरेनें सशय ओढून घेण्यासारखें आहे गुन्ह्याची जबाबदारी गुन्हा करणाऱ्या व्यक्तीवर आहे. त्याचा यत्किंचित्‌हि दोष बहुजन समाजावर लागू नाहीं, असे आधुनिक व्यवहारशास्त्र आपणांस सांगते. तेव्हां ज्या अर्थी गुन्हा कोणी केला हे कोणासच माहित नाहीं, अशा प्रसगीं गुन्हा करणाऱ्या व्यक्तीचा सरकारी नोकरांनीं, पुढाऱ्यानीं अथवा प्रजेनें निषेध करणें हें अत्यत अप्रयोजकपणाचे होईल. ' प्रतियोगि प्रमितिं विना निषेधानुपपत्तेः ' या न्यायास अनुसरून

गुन्ह्याचा कांहींहि पत्ता नसतां गुन्हेगार व्यक्तींचा निषेध करणें हें युक्तीस धरून नाहीं."

( ६ ) येरवडें येथील कारागृहवासानंतर लोकमान्य १८९९ चे सुमारास नाशकास प्रथम आले. त्यावेळीं वडील तेथें सिटी मॅजिस्ट्रेट होते; त्यावेळीं लोकमान्य आमचेकडे आले असतां वडिलांची व त्यांची बगल्याचे खुल्या व्हरांड्यांत कडकडून भेट झाली, व दोघांचेंहि डोळ्यांस पाणी आले. आम्ही सर्व विद्यार्थी मडळी लोकमान्यांचे सेवेंत तत्पर होतों; व ते काय बोलतात तो प्रत्येक शब्द वरचेवर झेलीत होतो. आमच्या येण्यापासून आपणांस कांहीं उपसर्ग होतो कीं कसें असा प्रश्न लोकमान्यांनीं वडिलांस केला असतां वडिलांनीं उत्तर दिलें कीं, 'त्याची काळजी आपण तिळमात्र करूं नये. आज मला आपण जास्त पूज्य आहांत व जुने स्नेहसबधांत व परिपाठींत फरक करण्याचें बिलकूल कारण नाहीं. आपला व माझा दाट स्नेह आहे हे सरकारास पूर्णपणें ठाऊक आहे व तेवढ्यावरूनच सरकारास माझें काहींहि वाईट करितां येणें शक्य नाहीं.'

( ७ ) मडालेहून लोकमान्य घरीं पुण्यास परत आल्यानतर लोकमान्यांचे भेटीस गायकवाड वाड्यांत मी गेलो. व त्यांचे पायावर डोके ठेविलें. त्यावेळीं स्त्रीपुरुषांच्या झुडीच्या झुडी लोकमान्यांचे दर्शनास येत होत्या व पायांवर डोकीं ठेवीत होत्या. स्त्रियांस लोकमान्य दुरून नमस्कार करण्यास सांगत. मी एक तासभर लोकमान्यांशीं बोलत होतो व त्या अवधींत मला असें दिसून आले कीं, हा दर्शन–नमस्काराचा फार्स लोकमान्यांस मनापासून अगदीं बिलकूल आवडत नव्हता. परतु निरुपायास्तव लोकाचे मन मोडूं नये म्हणूनच ते या दर्शन–नमस्कारांस कष्टाने समति देत.

( ८ ) पुढे लोकमान्य आमचे घरीं एकदां आले होते. त्यावेळेस माझ्या वृद्ध मातामही तेथें होत्या. त्यांस लोकमान्यानीं नमस्कार केला. त्यावेळेस त्या म्हणाल्या कीं, "राम राजा वनवासास गेला त्यावेळेस जितकें दुःख व खेद प्रजेस झाला तितकाच खेद व दुःख आपण ब्रह्मदेशास जाते वेळीं प्रजेस झालें!" एका जुनाट म्हाताऱ्या माणसाच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच लोकमान्यांस गहिंवर आला व डोळ्यांस पाणी आले. ही लोकमान्याची स्थिति पहातांच मनांत विचार आला कीं जो पुरुष इतक्या दृढ अतःकरणाचा व कठोर निश्चयाचा कीं, तोफेच्या तोंडीं उभा केला तरी आपलें ब्रीद चळूं देणार नाहीं. व अगीकृत कार्याचा अभिमान तिळभरहि सोडणार नाहीं, त्याच पुरुषाचे अतःकरणास प्रसग विशेषीं लोकांचें प्रेम पाहून चटकन् द्रव फुटतो! तेव्हा "वज्रादपि कठोराणि मृदुनि कुसुमादपि" असेच लोकमान्य आहेत, हेंच खरें!

( ९ ) क्रि० प्रो० कोड चॅप्टर आठ खालील जामीनकी प्रकरणाचे कामांत पुण्यास लोकमान्यांचे विरुद्ध निकाल झाला व यावर अपील करण्यांत कांहीं

फायदा नाहीं असा सल्ला मिळाला असतांहि लोकमान्यांनीं स्वतःचे जबाबदारी-वर मुंबई हायकोर्टाकडे तपासणीअर्ज केला. व तो मजूरहि झाला. 'सरकारी भाषांतरें बरोबर आहेत ना?' असें कोर्टानें त्यांस विचारलें तेव्हां 'कांहीं अपवादात्मक ठिकाणें वगळून बाकी सरसकट सरकारी भाषान्तर ठीक आहे.' अशी कबुली लोकमान्यांनीं तावडतोब दिली. कांहीं वकील बॅरिस्टरांस अशी तावडतोब कबूली देणें हें आवडलें नाहीं. परतु लोकमान्यांस कबुली देण्याचें कारण विचारतां ते म्हणाले कीं, "हीं भाषणें मी नगर, बेळगांव वगैरे ठिकाणीं स्वतः केलेलीं आहेत व माझा आशय त्या भाषान्तरांत बरोबर आहे आणि तशीच तीं सरकारी रिपोर्टात छापलीं जावीं अशी माझी इच्छा आहे. कारण अशी संधी पुन्हां मिळणें शक्य नाहीं व माझे 'केसरी'कडूनही एवढा मोठा प्रसार होणे शक्य नाहीं. तेव्हा या खटल्यापलीकडची कामगिरी सरकारी भाषातर मला समत आहे असें म्हणण्याने अनायासें होणारी आहे. म्हणून भाषांतरात बारिक सारिक दोष काढण्यांत मुळींच अर्थ नाहीं."

( १० ) न्यायमूर्ति बॅचलर व शहा यांचा जामिनकी प्रकरणातील निकाल व लोकमान्याची कॉंग्रेस क्रीडवर सही, यामुळें प्रजेचें व राजाचें अतिशय कल्याण झाले. मी मात्र लोकमान्यास मुद्दाम असा प्रश्न केला कीं "आता आपली चळवळ नेमस्त अथवा मवाळ बनली व लोक जर आपणास ' मॉडरेट ' म्हणू लागलें तर त्यांत आश्चर्य काय?" लोकमान्यांनीं उत्तर दिले कीं, "आपल्या मतें मी केव्हाहि ' इम्मॉडरेट ' अथवा बेताल नव्हतो. काहीं मित्रे व आत्मप्रयत्नहीन लोक माझें राजकीय मागण्यास गैरशिस्त समजत असतील व मला एक्स्ट्रीमिस्ट अथवा जहाल समजत असतील. परतु मी आपल्या मतें प्रथमपासूनच राजकीय ध्येयात ' नेमस्त ' अथवा ' मॉडरेट ' च आहे! तेव्हां लोकांनीं मला मॉडरेट म्हटले तर त्यात विषाद मानण्याचे मुळींच कारण नाहीं!"

( ११ ) मांटेग्यु साहेबाची दिल्लीस मुलाखत झाल्यावर लोकमान्य मुंबईस आले असतां त्यांस मुलाखतीची हकीकत विचारली तेव्हा ते म्हणाले. "व्हायसरॉयसाहेब सिंहासनावर स्वस्थ बसले होते. व भेटावयास आलेले गृहस्थाकडे क्वचित्च दृष्टी फेकीत. माटेग्यूसाहेबांचे बोलणें चालणें मात्र पूर्ण आदरपूर्ण होते. मला कमी ऐकू येत असल्यामुळे मी आपली खुर्ची जरा पुढें नेण्याचा प्रयत्न करूं लागलों. परतु दिल्लीचे गव्हर्मेंट हाऊसमधील ती जड खुर्ची माझ्याने यत्किंचितही हालवेना. तेव्हा माटेग्यु साहेब चटदिशी स्वतः पुढें येऊन त्यांनीं ती खुर्ची आपले जवळ खेचली. व्हायसरायसाहेब मात्र ही धांदल तटस्थ वृत्तीनें पाहात होते. शेवटीं शेवटीं मांटेग्यूनें एक प्रश्न विचारला तो हा कीं, 'आम्ही जे हक्क तुम्हांस देऊ त्यांचा हिंदी प्रजा स्वीकार करील कीं, सरसकट त्याग करील?' त्यांस मी उत्तर दिले कीं, " जे काय हक्क ब्रिटिश लोकसत्ता हिंदी प्रजेस देईल

त्यांचा आम्ही स्वीकार करूं व राहिलेले सर्व हक्क मिळविण्याबद्दल एकसारखी जोरानें खटपट चालूं ठेवूं." तेव्हां मांटेग्युसाहेब म्हणाले कीं, 'एकट्या तुम्हींच मला या प्रश्नाचें चटकन व निर्णायक उत्तर दिले आहे !'

---

## नारायणराव भवानराव ऊर्फ नानासाहेब पावगी

[ बी. ए., पे० मामलेदार, लोकमान्यांचे स्नेही, 'भारतीय साम्राज्य' वगैरे ग्रंथांचे कर्ते, पुणें. ]

मी छात्रदशेंत असल्यावेळीं, व राजश्री बळवंतराव टिळक लोकमान्य होण्यापूर्वीं, किंबहुना ते पदवीवर झाल्यावर लागलींच, त्यांच्या अलौकिक बुद्धिवैभवाचा सुकीर्तिपरिमल इतस्ततः सुटूं लागला; त्यांच्या अष्टपैलू गुणांचे झणझणायित क्वणित सर्वत्र श्रुतिपथावर थडकत चाललें; आणि केवळ भविष्यत्कालींच चमकणाऱ्या त्याच्या प्रखर तेजाचें पूर्वस्वरूप, म्हणजे उषःकाल, अथवा प्रातःप्रभा, यांचाहि अविर्भाव सत्वरच झाला.

इ० स० १८९४ सालापूर्वी, लोकमान्य टिळकांचा व माझा विशेष परिचय नव्हता. फक्त आम्ही त्यावेळीं, परस्परांना ओळखीत होतों. यापलीकडे, त्या परिचयाची जास्त मजल गेली नव्हती. परन्तु, तदनंतर, ह्या परिचयांत जास्त भर पडून, मजसारख्या अगदीं सामान्य जनासंबंधीं, केवळ आस्थापूर्वक सदिच्छा होण्याला, लोकमान्यांचें मन एकदम वळलें जाऊन, मद्विषयक त्यांची अगदीं स्निग्धशीलवृत्ति बनण्याला, सहजगत्याच एक कारण झालें. हे दिसण्यांत निःसंशय क्षुल्लक, तथापि परिणामीं नितांत महत्त्वाचें असल्यामुळें, त्याचा येथेंच उल्लेख केल्यास तो अकालिक होणार नाहीं असें वाटून त्याची थोडीशी हकीकत मी येथें देतों.

पौष वद्य ३ शके १८११ गुरुवार रोजीं. भारती साम्राज्य नांवाचा ऐतिहासिक ग्रंथ लिहिण्यास मी प्रारंभ केला; आणि सुमारे चार वर्षांच्या आंतच, भारतीय साम्राज्य मालेंतील भिन्नभिन्न विषयात्मक पहिलीं सहा पुस्तकें लिहिलीं. हें सर्व काम मी नोकरीवर असतांनाच केले. परन्तु, पुढें माझ्या प्रकृतीस स्वास्थ्य नसल्यानें, मी रजा घेऊन, इ० स० १८९३ अखेर पुण्यास आलों, व भारतीय साम्राज्य ग्रंथाचीं जीं सहा पुस्तकें मी लिहिलीं होतीं, त्यांची हस्तलिखितें बरोबरच आणिलीं. येथे आल्यावर, माझ्या प्रकृतीस आराम वाटतांच, हीं पुस्तकें छापण्याच्या तजविजीस मी लागलों आणि रा० रा० वासुदेवरावजी जोशी, चित्र-

शाळा छापखान्याचे मालक, माझ्या ओळखीचे असल्यानें, त्यांस छपाईच्या खर्चाबद्दलची वगैरे सर्व हकीगत विचारली. त्यावेळीं, हस्तलिखितें पाहिल्यावर मी काय तें सांगेन, असें त्यांनीं मला आश्वासन दिल्यावरून, त्यांस मी तीं सर्व प्रस्तावनेसहित दाखविलीं. तदनतर, त्यांनीं ही सर्व हकीकत लोकमान्यांस निवेदन केली: आणि हे इतिहासाचे पुरे ज्ञाते व वाङ्मयाचे चांगले मर्मज्ञ, अशी खूणगांठ आपल्या मनांत बांधून, त्यांस घेऊन, रा० वासुदेवराव जोशी मी रहात असल्या ठिकाणीं, एके दिवशीं सकाळीं आले, आणि सदरहु सर्व हस्तलिखितें त्यांस दाखविण्याविषयीं त्यांनीं मला सूचना केल्यावरून मी तीं प्रस्तावनेसहित लोकमान्यांजवळ रुजू केलीं. पुढें, तीं त्यांनीं सूक्ष्मदृष्टीनें व औत्सुक्यानें वाचून पाहिलीं; आणि तीं वाचीत असतां स्वानुमोदनस्मित व संमतिमन्दहास्य त्यांनीं मधून मधून व्यक्त केलें. तदनंतर, हें स्वीकृत कार्य आटोपल्यावर, लोकमान्यांनीं सर्व हस्तलिखितें माझ्या स्वाधीन केलीं. ही गोष्ट सुमारें तारीख १४ फेब्रुवारी १८९४ रोजीं घडली असावी, असें मला स्मरतें. यानतर, लोकमान्यांची व माझी कर्मधर्मसंयोगानें आकस्मिक गांठ पडली. तेव्हां, प्रसंगानुसार बोलण्याच्या ओघांत ते म्हणाले, "नाना, तुमच्या मानेवर सरकारी नोकरीचें जूं सदैव असतां आणि सेवाधर्मान्तर्गत हमालखान्याच्या जात्यांत तुम्ही अहोरात्र चिरडले जात असून देखील, तुमचें स्वदेशप्रेम कायम आहे; एवढेंच नव्हे तर, तुम्ही आपल्या देशासंबंधी इतकी कळकळ वाळगून, भारतीय साम्राज्यासारखा आवाढव्य ग्रंथ लिहिण्याचा उपक्रम केल्याचें पाहून, मला कौतुक व आश्चर्य वाटतें आणि आनंदहि होतो."

पुढें लोकमान्यांच्या मुखांतून वरील शब्द निघाल्याला दोन आठवडे झाले न झाले तोंच, भारतीय साम्राज्य ग्रंथासंबंधीं त्यांचा अभिप्राय, केसरीच्या तारीख ६ मार्च १८९४ च्या अंकांत प्रसिद्ध झाला.

ह्यानंतर, इ० स० १८९५ पासून १९०० पर्यंत, मी लोकमान्यांकडे भारतीय साम्राज्य पुस्तक २ ते ९ अशीं एकदर आठ पुस्तकें वेळोवेळीं पाठविलीं, व त्यांवर त्यांनीं आपले अभिप्रायहि दिले. अभिप्रायांचा मुद्दाम उल्लेख करण्याचें कारण असें कीं ते लोकमान्यांच्या प्रत्यक्ष लेखणींतूनच उतरलेले शब्द, अथवा त्यांच्या मुखांतूनच निघालेले उद्गार असल्यामुळें, ते आपणांस तत्कालीन सुसबद्ध व अविच्छिन्न स्मरण देतात, आणि त्या योगानें ते त्यांच्या केवळ मुर्तिमत आठवणीच होऊन बसतात. एवढेंच नव्हे तर, त्यांत कित्येक आनुषंगिक गोष्टींचा प्रादुर्भाव होत गेल्यानें, ज्या विषयांच्या संबंधानें स्वमत देण्यांत येतें त्यांचें अवलोकन अनेक अंगांनीं झाल्यानें, तदंतर्गत निरीक्षण कौशल्याची देखील ते स्वयमेव साक्ष पटवितात, यांत शका नाहीं.

तारीख २१ आगष्ट इ० स० १९०० च्या अभिप्रायांत, लोकमान्यांनीं "आर्यभाषेची जन्मभूमि भरतखंडच असावी, असें नाना पावगींचें मत आहे," इत्यादि सांगून, "हें मत अलिकडील शोधाच्या कसोटीस कितपत टिकेल, याची शंका आहे," असेंहि ध्वनित केलें. त्यामुळे उघडच, वरील प्रतिपादनांत आणखी एक मुद्याचा अंतर्भाव झाला. तो हा कीं, आर्यांची अथवा आर्यभाषेची जन्मभूमि भरतखंडच असल्याविषयीं शंका उद्भवल्यानें, ती तद्दितर कोणती तरी अन्यत्र आहे, असें मानणे प्राप्त येते. तेव्हां, ह्या शंकेला बिलगून, पुढें प्रसंगानुसार अनेक वेळीं, माझ्या प्रतिपादनास पोषक परन्तु आर्यावर्तेतर कोणत्याहि जन्मभूमीविषयक वादास प्रतिबंधक, मारक, व हानिकारक असे असंख्य आधार मी लोकमान्यांपुढे मांडले; आणि ते स्वतः उत्तरध्रुव मतवादी असल्यानें, त्यांचीं देखील तद्विषयक प्रमाणें मला कळविण्याविषयीं मी त्यास विनंति केली.

तदनन्तर, वेदान्तर्गत उत्तर ध्रुवाकडील जन्मभूमी अथवा 'Arctic Home in the Vedas' नांवाचा ग्रंथ लिहिण्याचा लोकमान्यांनीं उपक्रम केला, व त्यांतील मुद्याची हस्तलिखितें सुद्धां त्यांनीं मला दाखविलीं. परन्तु, त्यांतील कोणत्याहि प्रमाणांनीं आर्यावर्ताबाहेर किंवा थेट उत्तर ध्रुव प्रदेशांतच आर्यांची जन्मभूमि असल्याबद्दल, माझी खात्री झाली नाहीं. आणि त्यांनीं मजकडे पाठविलेलीं हस्तलिखितें मी त्यांजकडे परत केलीं. पुढे इ० स० १९०३ सालीं, हा ग्रंथ छापून बाहेर पडल्यावर, त्याची एक प्रत लोकमान्यांनीं प्रेमपूर्वक मजला दिली. मी लोकमान्यांची भेट घेतली व या बाबतींत मी केलेले शोध, वाचलेले आधार, आणि उपलब्ध झालेलीं सर्व प्रमाणें त्यांच्यासमोर रुजूं केलीं.

ऋग्वेदांतील सप्तसिंधूचा प्रान्त अथवा आर्यावर्तांतील आमची जन्मभूमि आणि उत्तर ध्रुवाडील आमच्या विस्तीर्ण वसाहती या विषयावर माझें ता० २९-५-१९०६ रोजीं व्याख्यान झालें. अध्यक्षस्थानीं लो० बाळ गंगाधर टिळक हे होते. तेव्हां ते म्हणाले, "आजच्या सारख्या विषयासंबधानें मतभेद असणें अगदीं साहजिक व शक्य आहे. सुमारे दहा बारा हजार वर्षांपूर्वींच्या वस्तुस्थितीचा आज विचार करणें म्हणजे, त्यांत मतवैचित्र्य असणे साहजिक आहे. रा० नानासाहेब पावगी यांच्या व्याख्यानावरून त्यांचें मत मी प्रतिपादन केलेल्या सर्व मतांशीं जुळतें. फक्त आर्यांचें मूळस्थान उत्तर ध्रुव किंवा ज्यास आपण आज आर्यावर्त म्हणतों तो प्रदेश, येवढाच कायतो त्यांच्यांत व माझ्यांत मतभेद आहे. त्या संबधाने मीं दिलेलीं कारणें माझ्या पुस्तकांत नमूद केलेलींच आहेत. व्याख्यात्यांनीं जीं कारणे दिलीं आहेत, त्यांचा शांतपणानें विचार करणें जरूर आहे. त्यांनीं आपल्या मताच्या समर्थनार्थ म्हणून जे मंत्र वगैरे काढिले आहेत, त्यांचा काळ, स्थळ, व परिस्थितीच्या मानानें अवश्य विचार केला पाहिजे."

इ० स० १९०७ सालीं, भूस्तरशास्त्राचा ओनामा, हा भूस्तर विषयक लेख, त्यावेळीं अस्तित्त्वांत असलेल्या 'श्रीसरस्वतीमंदिर' मासिकाच्या शके १८२० च्या चैत्र महिन्यांत मी दिला. ह्यांत भूस्तरशास्त्राच्या योगानें, असें ठाम कळून येतें कीं, चैतन्याचा उद्भव प्रथमतः आर्यावर्तांतच म्हणजे पंजाबाकडील सिंहपुर तेथील सैंधव श्रेणींत प्रागुविन्ध्यकाळांत झाला; व पुढे एक दोन युगें दरम्यान गेल्यावरच, विन्ध्योत्तर काळांत, उत्तर ध्रुव प्रदेशाकडे चैतन्यदशा उद्भवली. ह्यावरून आर्यांची जन्मभूमि उत्तर ध्रुव प्रदेशच असल्याविषयीं लोकमान्याची एक बाजू लटकी पडली; व त्यामुळें दुसऱ्या आक्षेपांसंबंधीं, लवकरच विचार करणें अवश्य झालें. असो. मी पाठविलेल्या निबंधाचा लोकमान्यांनीं परामर्श घेतला, आणि आपला अभिप्राय मजकडे पाठविला.

सोमाच्या उत्पत्तीचें स्थान फारच महत्त्वाचें असून सुद्धां, त्याचा तपशील लोकमान्यांनीं आपल्या Arctic Home in the Vedas ग्रंथांत दिला नाहीं. याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतें; आणि तो कां गाळाळ आहे, यद्वा त्याला कोणत्या हेतूनें काट दिला, याविषयींचा मला कांहींच बोध होत नाहीं. निदान, हा तपशील व तो वर्जिल्याचें कारण मला तरी कोठेंहि त्यांच्या वरील ग्रंथात आढळलें नाहीं, इतकी गोष्ट कबूल करणें भाग आहे.

पुढें लोकमान्य मंडालेहून आल्यावर मी सधी साधून त्यांची भेट घेतली; व त्यांची वृत्ति आनंदांत असल्याचें पाहून, मुद्रणार्थ दिलेल्या Aryavartic Home and its Arctic Colonies या माझ्या ग्रंथाची सर्व हकीकत मी त्यांस निवेदन केली. शिवाय मी त्यांस अशीहि विज्ञप्ति केली कीं, "ह्याचे जे १०।१२ फर्में छापून बाहेर निघाले आहेत, त्यांजवर आपण नजर टाकावी, आणि त्यांतील कोणताहि प्रतिपादित विषय निराधार आहे असें सप्रमाण आपण दाखवून दिल्यास, मी छापावयास दिलेला सर्व ग्रंथ परत घेईन. सबब, आपली आज्ञा होईल तर आतांपर्यंत निघालेले सर्व फर्में मी आपणांकडे घेऊन येतों." ह्या विनंतीस लोकमान्यांनीं रुकार दिल्यावर, मी त्यांच्याकडे ते सर्व रुजू केले. लोकमान्यांनीं मला चार दिवसांनीं बोलाविल्यावरून, मी त्यांच्याकडे गेलों. त्यावेळीं, ते म्हणाले "तुम्हीं आर्यावर्तवादी आहां, हें मला ठाऊक आहे. त्याच-प्रमाणें, मी उत्तरध्रुववादी आहे, हें सुद्धां तुम्हाला माहीत आहे. एवढेंच नव्हे तर, दोघांनीं, आपापलें मत प्रतिष्ठापित करण्याच्या हेतूनें, नानाविध प्रमाणें आपल्या ग्रंथांत दाखविलीं आहेत. तेव्हां अशा स्थितींत, हा वाद मिटावा कसा?" मी म्हणालों, "आपण आग्रह सोडून समतोल बुद्धीनें व केवळ न्याय म्हणून, ज्या गोष्टी निर्विवाद आहेत, त्यांचा स्वीकार करण्यास तयार असाल तर, त्या मी आपणांपुढें मांडतों." त्यांनीं अनुमोदन दिल्यामुळें, मी मुद्याच्या गोष्टी त्यांच्या पूर्ण विचारार्थ रुजू केल्या. मी त्यास म्हणालों, "माझी प्रमाण-श्रेणी

आपणास ग्राह्य असो वा नसो, ती आपणांस खचितच नाकबूल करतां येणार नाहीं, असें मला वाटतें. किंबहुना, श्रुतिप्रमाणांनीं व पाश्चात्य विद्वानांच्या शोधांनीं, सोम वनस्पतीचा उद्भव आर्यावर्तांतच झाल्याचें मुस्तकीम सिद्ध होतें. कारण, उत्तरध्रुववादी किंवा मध्यआशियावादी, सोमाची उत्पत्ति उत्तरध्रुव प्रदेशांत, युरोपखंडांत, किंवा मध्यआशियांत, कोठेंहि झाल्याचें सांगत नाहींत; इतकेंच नव्हे तर, सर्व ठिकाणीं सोमाची, सोमाभिषवाची, आणि सोमयज्ञाची आवश्यकता भासे, ही गोष्ट उत्तरध्रुववादी, युरोपखंडवादी, व मध्यआशियावादी सुद्धां कबूल करतात. तेव्हां, एकंदर प्रमाणांचा साधकबाधक रीतीनें विचार केल्यावर सोमोत्पत्तीची जी आर्यावर्तजन्मभूमि, तीच आर्यांची देखील जन्मभूमी ठरते. व तदितर वादांस सोमाचा प्रचंड, दुस्तर, आणि अनुद्धार्य ग्रह लागल्यामुळें ते वाद जेथल्या तेथेंच जमीनदोस्त होतात, आणि त्यांना अन्यत्र हालचाल करण्याला मार्गच राहात नाहीं." माझें हे सर्व म्हणणे ऐकून लोकमान्य टिळक सानुकूल स्मित करून म्हणाले, "नाना, मी जें लिहिले आहे आणि प्रतिपादन केले आहे, त्यांत आतां मला लेशमात्रहि बदल करणे शक्य नाहीं. तुम्ही मला दाखविलेला व इंग्रजींत लिहिलेला तुमचा ग्रंथ उपयुक्त आहे. सबब, तो तुम्ही जरूर छापवून पुरा करा." नंतर लोकमान्यांची रजा मागून, मी घरीं आलो.

---

## गणेश महादेव नामजोशी

[ लोकमान्यांचे परम स्नेही कै० माधवराव नामजोशी यांचे चिरंजीव;
यांस आपणाबरोबर लोकमान्य विलायतेस घेऊन गेले होते.
मे० इंजीनिअर, पुणें. ]

( १ ) चिरोलकेसचा निकाल लागल्यानतर, लगेच दुसरे दिवशीं स्वराज्याचा हप्ता कसा व केवढा असावा ह्यासंबंधीं एका खाजगी सस्थेंत वादविवाद होणार होता. तेथे दादा गेले होते. आपल्या लोकांची बाजू पुढें मांडण्याकरितां आपल्यापैकीं लोकांनीं फारसा प्रयत्न केला नाहीं. ज्यांनीं केला त्यामध्यें मुद्देसूदपणा नव्हता. शेवटीं ती० दादांना बोलण्याची परवानगी मिळाली. विरुद्ध बाजूचे मुद्दे म्हणजे ठरलेलेच होते. अठरा पगड जाती, लोकसत्ता सत्तासंबंधीं अज्ञान, मागासलेल्या लोकांचें हितसंरक्षण व हिंदुमुसलमान यांच्या आकांक्षा, असले मुद्दे पुढें आणून सुधारणा फारच आस्ते आस्ते (step by step) द्याव्यात असा मुद्दा

पुढें येई. बाकीच्या प्रश्नांचीं उत्तरें वाचकाना माहीत आहेतच. ( step by step ) सबधीं बोलतांना दादा म्हणाले कीं, " इर्लंडच्या सुधारणेच्या मनूत साध्या गोष्टींतहि जेथें उच्च शिखर गाठण्याला वेळ लागत नाहीं तेथे हळूहळू सुधारण्याच्या गोष्टी बोलणें म्हणजे इंग्रज लोकांची नालायकीच सिद्ध करण्यासारखें आहे. विमानासारख्या अशक्य गोष्टी ज्यानीं शक्य करून दाखविल्या त्यांना हिंदुस्थानसारखें राष्ट्र एकदम स्वराज्याला लायक करण्याला एक शतक पुरलें नाहीं. यावरून हिंदुस्थानची नालायकी सिद्ध होण्यापेक्षां इंग्लंडचीच होते. " शेवटीं शेवटीं तर सर्व लोकाना हसवून दादा खालीं बसले. असल्या सभापासून इष्ट तो परिणाम म्हणजे दुसऱ्या सभांना आमत्रणें येण्यात झाला.

( २ ) ट्रेडयूनियन कॉंग्रेस ग्लासगो येथे भरली होती. या कॉंग्रेसपुढे आपलें म्हणणें काय आहे हें समजावून सांगण्याची परवानगी दादाना मिळाली होती. स्वयनिर्णयाचे तत्त्वावर 'कॉंग्रेस–लीग–स्कीम' आम्हास द्या अशा अर्थाचें तेथें भाषण झालें. आपल्यापुढे समाज कोणता आहे, त्याला आपले म्हणणें कसे पटवून द्यावें ह्या गोष्टी दादांना कशा समजत याचें तेथील काहीं लोकाना आश्चर्य वाटत असे. अर्थात् दादाच्या जवळच मी नेहमीं असल्यामुळें, मला अशा गोष्टी नेहमीं ऐकावयास मिळत. सभा सपली कीं, काहींना काहीं मडळी दादाजवळ हस्तांदोलन करावयास येत असत. यावरूनहि या गोष्टीची सत्यता पटे. ही सभा झाल्यानतर तेथील एका हिंदु गृहस्थानें दादास स्पष्ट विचारले कीं, " तुम्ही मजूरपक्षाच्या जें एवढे मागे लागता त्याचा काय उपयोग ? " याला दादानीं उत्तर दिलें कीं, " जो पक्ष सरकाच्या विरुद्ध असतो त्याच्या कच्छपी लागण्यापासूनच काहीं फायदा झाला तर होईल. शिवाय जर लवकरच मजूरवर्गाचे मत्रिमडळ बनलें तर निदान त्याना त्याच्या वचनाला स्मरून पछिहाटीचें धोरण तरी स्वीकारता येणार नाहीं. जें आम्हाला मिळावयाचें तें नुसत्या येथल्या चळवळीवर अवलबून राहणार नाहीं; तर हिंदुस्थानातल्या चळवळीवरहि अवलबून राहील.

( ३ ) विलायतेत आचारविचारांत पुष्कळ स्वातत्र्य असल्यामुळे व लढाईच्या काळामध्यें दोन पैसे मिळविण्याचें साधन प्राप्त झाल्यामुळे हिंदी लोक हिंदुस्थानास परत येण्यास नाखूष असत. अशा लोकांशीं गांठी पडल्या म्हणजे नेहमीं त्यांना दादांचा असा प्रश्न असें कीं, एकट्यांनीं स्वातत्र्याचा उपभोग घेण्यापेक्षां आपल्या मातृभूमीला जाऊन आपल्या बांधवाचा उद्धार करण्याचा प्रयत्न कां करीत नाहीं ? कित्येकांना आपली प्राप्ती कमी होईल अशी भीति, तर कित्येकांना आमच्या राहणीचा कटाळा ! अशा लोकांना दादा आपले स्वतःचें उदाहरण देऊन सांगत कीं, "लोकाची निरपेक्ष सेवा केली तर पैशाला कांहीं कमी पडावयाचे नाहीं. इमानें इतबारें सेवा करणाऱ्याला कांहींहि कमी पडत नाहीं. आपल्या देशांत राहून त्याच्या प्रीत्यर्थ झटण्यांत जो मान आहे तो इंग्लडात

राहून मिळणे शक्य नाहीं. कारण बोलून चालून काळा अदमी ! घरांत स्वातंत्र्य असल्याशिवाय बाहेरचें स्वातंत्र्य फुकट आहे.

( ४ ) पार्लमेंटरी कमिटीपुढें दादांची साक्ष व्हावी अशी मॅटिग्यू साहेबाची इच्छा आहे व तुम्ही आपलें म्हणणें अमुक दिवशीं लेखीं पाठवा म्हणजे तुमची साक्ष कोणत्या तारखेला घेतली जाईल तें कळेल असें एक गृहस्थ दादांना सांगूं लागले. पण तुमची साक्ष होऊं नये असे कमेटींतील कांहीं इसमांना वाटत आहे, असेंहि ते दादांना म्हणाले. शेवटीं दादांची लेखी जबानी ज्या दिवशीं गेली व साक्षीची तारीख ठरली त्यावेळेला कमिटीच्या त्या मेंबराची व मॅटिग्यू साहेबांची खडाजंगी उडाली. शेवटीं असें ठरलें कीं, सदर्हु गृहस्थानें टिळकांच्या साक्षीच्या वेळेस हजर राहू नये, व त्यांची उलट तपासणी करू नये. खरोखरीच ज्यावेळेस साक्ष झाली त्यावेळीं सिडनहॅमप्रभृति लोक तेथून उठून गेले व दादांची उलट तपासणी झाली नाहीं. यावरून त्या गृहस्थाने सांगितलेल्या गोष्टींत तथ्य असावेसें वाटते.

अलबर्ट हॉलमध्ये दादांच्या व्याख्यानाच्या वेळीं मि. हॉर्निमन यांनीं व कांहीं तरुण विद्यार्थ्यांनीं भर सभेंत दादांना आडवे तिडवे प्रश्न विचारून गप्प बसविण्यास लावण्याचा कसा प्रयत्न केला, पण त्याचीच उलट कशी फजिती झाली ही हकीगत त्यावेळच्या वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालीच आहे. सदर्हु सभा संपल्यानंतर दादांच्या समर्पक उत्तरानें व विलक्षण कोटिक्रमाने अखेर त्यांच्या भाषणावर सर्व मंडळी खूष झाली, व त्यांच्या भोंवतीं घोळका करून त्यांच्याशीं कुशल प्रश्न करू लागली. तेव्हां एका गृहस्थाजवळ बोलतांना दादा म्हणाले, " मला आतां विचारण्यांत आलेले प्रश्न येथील सभेंत विचारण्यापेक्षां हिंदुस्थानांत विचारण्यांत आले असते तर त्यांचीं उत्तरें देणें कसें विकट होते याची कल्पना तुम्हांस होणार नाहीं. राजकारणांत मी पडलों त्यावेळेस स्वराज्य हा शब्द तोंडावाटे नुसता उच्चारण्याचीहि लोकांची ताकद नव्हती. अशा लोकांतर्फे होमरूलची मागणी करूं लागण्यास आम्हांस किती अडचणींतून दिवस काढावे लागले हें ह्या तरुण पिढीला कसें कळणार ?"

( ५ ) विलायतेंत असतांना राजकारणाबरोबरच आपल्या आवडत्या विषया-संबंधीं ( ओरायन व आर्टिक होम ) जास्त माहिती मिळवून आणखी त्यावर एखादा स्वतंत्र निबंध लिहावा म्हणून दादांचा अभ्यास सुरूच होता. इंडिया ऑफिसच्या लायब्ररींत ते तासच्या तास जाऊन बसत. तेथें विद्वान लोकांशीं वादविवाद करीत. एकदां डॉ० थॉमस यांच्यामार्फत एका असीरिअन भाषा-कोविदांची ओळख करून घेऊन दादा त्यांच्या भेटीला गेले होते. या विद्वानाच्या घरात आमच्या प्राच्य तऱ्हेप्रमाणें दारिद्र्य चांगलेंच डोकावत होतें. असो. या दोघां विद्वानांची गांठ पडल्यावर एकमेकांनीं आपापल्या अडचणी व अनुभव

परस्परांस सांगितले, व एकमेकांनीं एकमेकाला मदत करून दोघांनीं मिळून कांहीं बिकट सिद्धांत सोडविले. त्यावेळीं त्या प्रोफेसराची बायकोहि त्यांच्याबरोबर वादविवाद करी व त्यांस लागतील तीं पुस्तकें काढून त्यातून नेमका मजकूर चटकन वाचून दाखवी ! विच्यान्याची साधू मात्र चहा थंड होत चालला म्हणून चार चार वेळ जांवयास लागे. शेवटीं तिनें त्यांच्या 'रेफरन्स' पुस्तकाच्या टेबला-वरच तो आणून ठेविला तेव्हां कोठें त्यांना चहाची आठवण झाली. चहा झाल्यानंतर एकमेकांनीं एकमेकाला आपलीं पुस्तकें नजर केली व उठतेवेळेस त्यांनीं खरोखरच प्रेमाचें आलिंगन दिलें ! त्या दिवशीं दादा दुपारचे जेवले नव्हते. ही गोष्ट त्यांचें अन्न फुकट गेल्याचें घरच्या नोकरानें कळविल्यानंतरच मग दादांच्या लक्षांत आली !

( ६ ) दादांच्या मनांत विलायतेहून अमेरिकेला जावयाचें फार होतें. व ते देखील पार्लमेंटांत रिफॉर्म अॅक्टचे वाचन होऊन त्यावर मजूरवर्गाकडून आप-ल्याला इष्ट अशा उपसूचना आणून त्या पास करून घेण्याचा अगदीं आटोकाट प्रयत्न केल्यानंतर जावयाचा विचार होता. पण एके दिवशीं हिंदुस्थानचें टपाल आले. त्यात कोणाचें कांहीं लिहून आल्यावरून एकदम हिंदुस्थानला जाण्याचा त्यांनीं विचार ठरविला. पासपोर्ट व पॅसेज यासबधीं तर त्यांना इतकी घाई झाली कीं, काहीं विचारूच नका. कॉंग्रेसमध्यें आपल्या राष्ट्रीय पक्षाला चांगलाच विरोध होणार म्हणून इष्ट दिशेनें कॉंग्रेसचें धोरण ठरविण्यास व तें पार पाडण्यास हिंदु-स्थानांत आपण जातीनेंच असलें पाहिजे असें दादानीं ठरविलें.

( ७ ) परदेशांतील चळवळीसंबधीं एकदां ना० खापर्डे व दादा यांचें बोलणें चाललें होतें. मोठमोठ्या स्वतन्त्र राष्ट्रांतून लजपतराय सारखीं माणसें ठेवून त्यांना डॉ० हर्डीकरासारख्यांची मदत देऊन आपलीं माणसें तयार करावयाचीं व नंतर थोड्या वर्षांनीं त्यांना, त्याचे जागेवर तशींच दुसरीं माणसें ठेवून, हिंदुस्थानांत प्रांतोप्रांतीं शिस्तीनें ठेवावयाचे व अशीं माणसे ठेवलीं म्हणजे त्यांना शिस्त लागून आपली चळवळ खेडोपाडींहि पोहोंचवावयाची अशा अर्थाचें बराच वेळ बोलणें चाललें होतें. त्यावेळीं दादा म्हणाले "परदेशीय शिक्षणाकरिता लायक माणसेंच मिळविलीं पाहिजेत. नुसतीं पगारी माणसें मिळविण्यात अर्थ नाहीं. आपल्या पक्षांत मला विशेष शिस्त पाहिजे. शिवाय पांच--दहा वर्षांत बडींबडीं घेडेंहि पेन्शनींत काढण्यांत नोकरशाहीचा तरी उद्देश हाच असतो कीं, आपल्या लोखंडी फ्रेमीला अनेक माणसांचा आधार घ्यावयाचा. त्याचप्रमाणें आपल्यालाहि केले पाहिजे.

( ८ ) डेप्युटेशनच्या कामाकरतां ज्या बोटीने रा० केळकर विलायतेस आले, त्याच बोटीनें ना० शास्त्रीहि आले होते. केळकराना आणण्याकरतां

जेव्हां मी बोटीच्या धक्क्यावर गेलों तेव्हां नामदारांची उतरण्याची सोय कोठें झाली नसल्यास त्यांस आपल्या बिऱ्हाडीं अवश्य आणण्याबद्दल केळकरांच्या मार्फत आग्रह कर, असें दादांनीं मला निक्षून सांगितलें होतें. पण शास्त्रीबोवांची व्यवस्था दुसरीकडे झाली होती म्हणून ते आले नाहींत ही गोष्ट वेगळी.

( ९ ) ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी ही कॉंग्रेसनें आंखलेल्या मार्गांवरून जात नाहीं असें तेथें जाताच दादांना दिसून आलें. इतकेंच नव्हे तर नुसते कॉंग्रेसनें केलेले ठरावहि ती प्रसिद्ध करीत नाहीं, याबद्दल दादांना फार वाईट वाटे, व खेदहि होई. म्हणून कमिटीच्या मेंबरांपैकीं प्रत्येकाला वेगवेगळे गांठून त्याला आपलें म्हणणें नीट पटविण्यास लावण्याकरतां दादांना कमींत कमी पंधरा पंधरा हेलपाटे घालावे लागले आहेत ! अध्यक्षांच्या मनाची तर सर्वस्वी खात्री होण्यांतच तीनचार महिने गेले ! पण कॉंग्रेसचें डेप्युटेशन जेव्हां विलायतेस येऊन पोहोचलें त्यावेळेपर्यंत कॉंग्रेस कमिटी हस्तगत करण्याची दादांची पूर्ण तयारी झाली होती.

(१०) आपल्या कामाकरतां छापखान्यांत वरचेवर जात असतां, 'डेली हेरल्ड' छापला जात असे तो प्रेस पाहण्याकरतां दोनचार वेळां दादा गेले होते. याचवेळीं त्यांना पुण्याहून बाबा विद्वांस यांचेकडून नवा प्रेस घेण्याबद्दलचीं पत्रें येत असत. व चांगला प्रेस मिळविण्याच्या खटपटींतहि पण दादा होतेच. घरीं कधीं कधीं कोणत्या प्रकारचा प्रेस घ्यावा यासबधीं वादविवाद चाले. अशा वेळीं दादांचें सर्व लक्ष जेणेंकरून पुणे येथें आपल्या छापखान्यांत टपालाच्या कामाला लोक कमी लागतील अशा प्रकारचें मशीन घ्यावें, इकडे विशेष असें. मशिनरीची किंमत भलतीच वाढलेली असल्यामुळें व शिवाय नवीन मशीन तावडतोब मिळण्यासारखें नसल्यामुळें संपूर्ण दुरुस्त केलेलें मशीनच घ्यावयाचें असा त्यांचा नक्की बेत झाला होता. अशा तऱ्हेचें मशीन दिसल्याबरोबर विशेष हुज्जत घालीत न बसतां त्यांनीं घेण्याचें ठरवून टाकलें. पण अर्थात्च त्यामध्यें एवढी सोय मात्र दादांनीं अवश्य पाहिली होती कीं, वर्तमानपत्र रोज काढतां यावें, कागद लावण्यापासून त्याची घडी पडेपर्यंत मध्यें कांहीं पाहावयास लागूं नये, कागद दुहेरी छापावयास न लागतां एकाच वेळीं दोन्ही बाजू छापून निघाव्या व लागेल तेव्हां लागेल तो अंक संपला असतांना विशेष श्रम न पडतां आणखी हव्या तितक्या प्रति काढतां याव्या. याचवेळेस इंजिनसंबंधीं व विजेच्या दिव्यासंबधीं दादांनीं सर्व सूचना ऐकून घेतल्या व आपला कारखाना पूर्णत्वास आणण्याकरतां त्यांना जीं जीं साधनें जरूर वाटलीं तीं तीं सर्व त्यांनीं खरेदी केलीं.

या नवीन यंत्राकरतां लागणारा कागद खरेदी करण्याविषयीं जेव्हां प्रश्न आला तेव्हां ते निरनिराळ्या कंपन्यांतून हिंडले व आपल्याला लागणारा कागद स्वतः ठरवून आले. यावेळीं मधल्यामध्यें कमिशन उपटण्याचा प्रयत्न तेथें एका

महत्प्रयासानें केला. परंतु त्या प्रयत्नाची सुगावा कुणकुण त्यांस लागतांच दुसरीकडे जाऊन, भाग नवी करून, जगाऊ मगाणा अंगावर देऊन, सौद्याचे कागदपत्र पुरे करून मग त्या दिवशीं दादा घरीं आले!

---

## यशवंत गणेश कुलकर्णी

[ ताईमहाराज व श्रीजगन्नाथमहाराज यांचे माजी कारभारी, 'केसरी' कचेरींतील एक कामगार, पुणें ]

( १ ) लोकमान्य सन १८९८ सालीं कारागृहांतून सुटून आले त्या रात्रीं मी विंचूरकरांच्या वाड्यांत त्यांच्या दर्शनास गेलों. लोकांची पुष्कळच गर्दी होती; त्यांस नमस्कार करून उभा राहिलों. इतक्यांत कै० अप्पाराव वैद्य वकील यांनीं मी कै० श्री० बाबामहाराजांचे वाड्यातील कारकून आहे असें लोकमान्यांना सांगितलें. अप्पारावाचें बोलणें संपताच वाड्यांतील कामकाज कसें काय चाललें आहे, श्री० ताईमहाराजांची प्रकृति कशी आहे वगैरे अनेक प्रश्न विचारूं लागले. त्यावेळीं त्यांची प्रकृति अत्यंत क्षीण झालेली होती. बोलण्यानें त्यांना श्रम होत होते हें पाहून त्यांच्या जवळ नामदार दाजीसाहेब खरे बसले होते ते त्यांना म्हणाले 'अहो, तुम्ही आताच सुटून आलां. प्रकृतीहि बरी नाहीं, प्रकृति थोडी बरी झाली म्हणजे मग ट्रस्टचें काम पाहा, आता या वेळीं घाई का!' तेव्हां ते म्हणाले 'अहो, आम्हीं पतकरूं नये तें पतकरलें आहे; आतां कोणत्याहि स्थितींत असलों तरी तें शरीरधारणाप्रमाणें केलें पाहिजे. उद्यां वाड्यांत मी ताईमहाराजांना भेटण्याकरतां येणार आहें असें त्यांना कळवा" असें सांगून मला निरोप दिला. ठरलेप्रमाणें दुसरें दिवशीं वाड्यांत येऊन श्री० ताईमहाराजास भेटून ट्रस्टीवर ट्रस्ट कामाची जबाबदारी कशी असते हें तपशिलानें समजावून सांगून व इतर कामाची चौकशी करून गेले.

( २ ) कै० श्री० बाबामहाराजांचा बाग पुण्यांत खजिन्याचे विहिरीजवळ आहे. त्या बागेच्या देखरेखीचें काम मजकडे असतां, मी एकदा माळ्याबरोबर भाजी लोकमान्यांच्याकडे ( ते त्यावेळीं श्री० विंचूरकरांचे वाड्यात राहात असत ) पाठविली. माळी भाजी घेऊन प्रथम घरांत गेला; त्याची तेथें दाद लागेना, म्हणून तो स्वतः माडीवर लोकमान्यांकडे गेला व त्यानें त्यांच्यापुढें भाजी ठेविली.

त्यांनीं माळ्यास भाजी कोठली असें विचारतांच माळ्यानें महाराजांच्या बागेतील आहे असें सांगितलें. तेव्हां ते म्हणाले " तुला इकडे कोणी पाठविलें, त्यांना माझेकडे घेऊन ये. " माळी मजकडे आला व त्यानें झालेली हकीकत कळविली. मी माळ्याच्याबरोबर लोकमान्यांच्याकडे गेलों. मला त्यांनीं बागेंत कोणकोणत्या भाज्या आहेत त्याची माहिती विचारली व म्हणाले ' तर मग तुमच्या बागेपेक्षां आमच्या बागेंतच भाज्या पुष्कळ आहेत ! ' ' आपला बाग कोठें आहे त्याची मला माहिती नाहीं ' असें मी म्हणतांच लगेच हसंत म्हणाले, " तुमच्या वाड्या-शेजारीं जें मोठें रे मार्केट आहे तो आमचा बाग ! त्यांत सर्व प्रकारच्या भाज्या आहेत कीं नाहीं बोला ? " मी अगदीं निरुत्तर झालों. मी स्वस्थ तोंडाकडे पाहात उभा राहिलों. तेव्हां ते म्हणाले कीं, " मी महाराजांच्या इस्टेटीचा ट्रस्टी आहें; तेव्हां ट्रस्टप्रॉपर्टी मी घेणें इष्ट नाहीं व तुमच्या इस्टेटीपैकीं कांहींहि घ्यावयाचें नाहीं असा माझा संकल्प आहे, तेव्हां ही आणलेली भाजी तुम्ही परत न्या ! " मी पुष्कळ प्रकारें आग्रह केला तरी कांहीं मानेना; माझा विशेष आग्रहच पाहून म्हणाले, " आतां उभयतांमध्यें एकच तोड आहे व ती अशी कीं, तुम्ही आणलेल्या भाजीचे पैसे तरी घ्या, नाहीं तर भाजी परत न्या. " अखेर मला भाजी परत न्यावी लागली ! !

( ३ ) लोकमान्यांना सुपारीचें व्यसन होतें हे प्रसिद्धच आहे; ते कै० श्री० बाबामहाराजांच्या वाड्यांत ज्या ज्या वेळीं येत, त्या त्या वेळीं त्यांच्यापुढें सुपारी केली असतां त्यांनीं ती चुकूनसुद्धा घेतली नाहीं. प्रत्येक वेळीं जेव्हां त्यांच्यापुढें सुपारी येऊं लागे तेव्हां ते म्हणत " मी ट्रस्टी आहें; व ट्रस्टीनें ट्रस्टप्रापर्टीच्या सुपारीच्या खांडासुद्धां शिवतां कामा नये ही सामान्य गोष्ट तुमच्या ध्यानांत न येतां मजपुढें सुपारी करतां, तेव्हां तुम्हांस काय म्हणावें ? " या निस्पृह वागण्याचें फळ पुढें ताईमहाराज प्रकरणांत दिसून आलें. फौजदारी खटला चालला असतां, मि० क्लेमट, स्पेशल मॅजिस्ट्रेट, यांनीं श्री० ताईमहाराजांस असा सवाल केला कीं, ' टिळकांनीं स्वतःच्या फायद्याकरितां सर्व काम केलें ना ? ' त्यावर बाईनीं उत्तर दिलें कीं, ' टिळकांनीं जें जें केलें तें सर्व इस्टेटीच्या फायद्याकरतां केलें, स्वतःकरितां कांहींहि केलें नाहीं ! ' या उत्तराने साहेब बहाद्दुरांचें समाधान झालें नाहीं; व त्यांनीं बाईंना ' तुम्हाला माझा प्रश्नच समजला नाहीं, प्रश्न नीट समजून घ्या व मग उत्तर द्या ' असें सांगून व तोच प्रश्न त्यांस तीन वेळ समजून सांगून प्रश्न समजला अशी कबूली घेतली तरीहि उत्तर विचारतां प्रथमचेंच उत्तर कायम, हें पाहून निरुपायानें त्यांनीं तें उत्तर लिहून घेतलें ! !

( ४ ) सन १९०८ सालच्या 'केसरी'वरील खटल्याचे वेळीं लोकमान्यांना हायकोर्टाच्या चौथ्या मजल्यावर आणून ठेवलें होतें. तेथें रोज मी त्यांचें जेवण घेऊन जात असे. एके दिवशीं ते मला म्हणाले, "मला सरकारनें येथें कां आणून

ठेवलें आहे याचे कारण तुम्हाला माहीत आहे कां ?" मीं नाहीं असे म्हणतांच ते म्हणाले, " हल्लीं ज्या जजापुढें माझा खटला चालला आहे त्या ज० दावरला मी सीनियर आहें म्हणून जज तिसरे मजल्यावर तर मला, मी सिनीयर म्हणून, चौथे मजल्यावर आणून ठेविलें आहे ! "

( ५ ) ताईमहाराज खटल्यात सेशन कोर्टाच्या निकालावर हायकोर्टात अपील दाखल होऊन लोकमान्याची जामिनावर सुटका झाली. त्यावेळीं जामिनाची आर्डर घेऊन एरवडा येथें मी व श्री० तात्यासाहेब केळकर लोकमान्यांना आणणेसाठीं गेलों होतों. लोकमान्यांना जेलच्या दारातून बाहेर पडलेले पाहून आमचे नेत्र भरून आले व कंठ दाटून कांहीं बोलवेना. अशी आम्हा उभयतांची स्थिति पाहातांच लोकमान्य स्वतः तात्यासाहेब केळकरांना म्हणाले " अहो, तात्या हें पहा, माझ्या उपरण्यावर नाव घातलें आहे. ( जेल अधिकाऱ्यानीं त्यांचे सर्व कपडे एके ठिकाणीं करून ते उपरण्यात बांधून त्यावर त्याचे नाव घातले होतें. ) आतां माझें उपरणे कोठेंहि बदलणार नाहीं ! " लोकमान्याचे ते शब्द कानीं पडताच तात्यासाहेब म्हणाले, ' हे धारिष्ट ईश्वराने आपणासच दिलें आहे ! '

( ६ ) लोकमान्यांच्याबरोबर प्रवास करीत असता मी त्याना एकदां विचारलें कीं, ' स्नानसंध्यादि कर्में व देवतेची उपासना केल्याशिवाय चित्तशुद्धि होत नाहीं आणि चित्तशुद्धीनंतर मग मनास शांती प्राप्त होते हा क्रम बरोबर आहे का ? ' तेव्हां ते म्हणाले, ' पुढें काय बोला; ' तेव्हां मी म्हटलें ' आपली उपासना दिसत नाहीं. परंतु चित्तशुद्धी व त्याच्या पुढील कार्यें आपल्या जवळ दिसतात हें कसें ? ' तेव्हां ते म्हणाले " स्नानसंध्यादि कर्में व देवतेची उपासना वगैरेंचा चित्तशुद्धी होण्यास एक मार्ग आहे; परंतु यापेक्षाहि सोपा असा दुसरा एक मार्ग श्रीकृष्णांनींच सांगितला आहे तो असा कीं, प्रत्युपकाराची इच्छा न ठेवतां, परोपकार करण्याच्या सवयीनें फार लौकर चित्तशुद्धी होते. व मला हा मार्ग पसंत असल्यामुळें मी या मार्गानें जनतादेवीची उपासना करीत आहें. "

( ७ ) सन १९०८ सालीं फौजदारी खटल्याच्या वेळीं डोंगरीच्या तुरुंगांत खटल्याच्या डिफेन्सची तयारी करण्याकरितां लोकमान्यांच्या वकिलांना व कांहीं स्नेह्यांना रोज भेटण्याची परवानगी होती व पुस्तकांची नेआण करण्यासाठीं मलाहि वकिलाबरोबर जाण्यायेण्याची परवानगी होती एके दिवशीं सकाळीं नित्याप्रमाणें कज्ज्याचें तयारीचे काम आटोपून इतर गप्पा मारीत असतां श्रीयुत दादासाहेब करंदीकर लोकमान्यांस म्हणाले, 'खटल्याचा परिणाम आमच्याप्रमाणें किंबहुना आमच्यापेक्षां जास्त आपण ओळखलाच असेल; या प्रसंगांतून निभावून परत आपली भेट होईल तो सुदीनच ! आपल्या हल्लीच्या प्रकृतीच्या

मानानें असा सुदीन येईलच अशी आशा दिसत नाहीं, आपण मोक्षाची उत्तम प्रकारे तयारी केली आहे. आतां ईश्वरापाशीं वेगळी प्रार्थना करण्याचें कारण नाहीं.' तेव्हां लोकमान्य, म्हणाले " मला मोक्षाची अपेक्षा नाही. हा देह केव्हां तरी जाणारच आहे; मी ईश्वरापाशीं इतकेंच मागेन कीं, जोपर्यंत माझे तेहतीस कोटी देशबांधव पारतंत्र्याच्या नरकांत आहेत तोपर्यंत मला एकट्याला मोक्ष नको, इतकेंच नव्हे तर देशाचा उद्धार होईपर्यंत मला याच भूमींत हल्लींपेक्षांहि जास्त बुद्धि-सामर्थ्य व शक्ति देऊन वारवार जन्मास घाल. " हे त्यांच्या तोंडचे शब्द ऐकतांच दादासाहेब करंदीकर व दादासाहेब खापर्डे यांना व आम्हां सर्वांना अत्यंत गहिंवर आला.

( ८ ) सन १९०२ सालीं प्लेगच्या कहरांत लोकमान्यांचे थोरले चिरंजीव विश्वनाथपंत वारले त्याच्या तिसरे दिवशीं श्रीयुत बावा विद्वांस याचे बंधु रा० नारायणराव प्लेगनें वारल्यामुळें बावा कोंकणांत गेले. स्वतः लोकमान्यांच्या गुडघ्यास जबर जखम झालेली होती. गांवांत प्लेगचे मान जास्तच वाढूं लागल्या-मुळें, आर्यभूषण छापखान्यातील बरेच कंपाझीटर गैरहजर असत, त्यामुळे कै० हरिपंत गोखले, आर्यभूषणचे मालक, हे सोमवारीं सकाळचे नऊ वाजतां लोकमान्यांच्या झोपडीवर आले. ( झोपडी हल्लींच्या सर्व्हंट ऑफ इंडिया सोसा-यटीच्या जागीं होती ) व लोकमान्यांस म्हणाले, ' आज बरेच कंपॉझिटर कमी आहेत, तेव्हां कंपोजचें काम आटोपण्यास बराच उशीर होईल व त्यामुळें 'केसरी' छापण्यास बराच वेळ लागेल. सबब उद्याचा अंक गांवांत वाटण्यापुरतां रात्रीं छापून काढतों व बाहेरगांवीं जाणारा 'केसरी' उद्यां छापून परवां टपाल करीन. त्यावर लोकमान्य रागावून म्हणाले कीं, " तुमचे छापखान्यांतील कंपॉझीटर नाहींत तर दुसरे छापखान्यांतील बोलवा. तुम्ही आर्यभूषणचे मालक व मी 'केसरी'चा एडिटर दोघेही वारलो तरी आमच्या चौदा दिवसपर्यंत केसरी मंगळवारचा मंगळवारींच पोष्टात पडला पाहिजे ! तुम्हांस कंपॉझीटर मिळत नसतील तर मी आणून देतों. " ह्यावर रा० गोखले म्हणाले, 'मी तपास केला, परंतु मला मिळत नाहींत.' त्यावर त्यांना "तुम्हीं जा, मी कंपॉझीटर आणून देतों" असें सांगून मला बोलावून सांगितलें कीं, ' मजबरोबर आतांचेआतां गांवांत चला, आज कंपॉझिटर गोळा करून आणावयाचे आहेत. " मी गांवांत जाऊन टांगा घेऊन येतो म्हणून सांगितलें. त्यावर ते म्हणाले " आतां दहा वाजण्यास आले आहेत; तुम्ही गांवांत जाऊन टांगा आणून आपण जाईपर्यंत वेळ होणार. छापखान्याच्या मालकांनीं एकदां आपले कंपॉझिटर लोकांना काम नेमून दिलें म्हणजे मग आपणास माणसें मिळणें कठीण पडेल. तेव्हां जेथें टांगा मिळेल तेथें करू, तेथपर्यंत पायींच जाऊं" असें म्हणून आम्ही निघालो. त्या दिवशीं बुधवार चौकापर्यंत टांगा मिळाला नाहीं. तेथपर्यंत लंगडत लंगडत ते आले ! तेथें टांगा

करून आम्ही ४।५ छापखान्यांत जाऊन प्रत्येक ठिकाणाहून एकदोन अर्धी माणसें मागून त्या सर्वांस बारा वाजण्यापूर्वी हरिपंताकडे नेऊन कामास लावलें. व त्या दिवशींचा 'केसरी' वेळेवर काढला, इतकेंच नव्हे, तर मुंबईचें पार्सल सोमवारीं रात्रीं मद्रास मेलनें पाठवून पुण्यास व मुंबईस मंगळवारीं सकाळीं 'केसरी' लोकांस मिळाला.

---

## वासुदेव रामचंद्र फणसळकर

[ बी. ए, शिक्षक स्वावलंबन राष्ट्रीय पाठशाळा, चिंचवड ]

( १ ) चिंचवड स्वावलंबन राष्ट्रीय पाठशाळा येथील 'टिळक—गांधी मंदीर या मुख्य इमारतीच्या पायाचा दगड लोकमान्यांच्या हस्तें सन १९१८ सालीं बसविण्यांत आला. या समारंभाच्या प्रसंगीं लोकमान्यांचें राष्ट्रीय शिक्षणावर भाषण झालें. भाषण संपल्यावर संस्थेला जागच्याजागीं मिळालेल्या देणग्यांची यादी सभेपुढें वाचण्यासाठीं लोकमान्यांच्या हातात दे० म० बाळुकाका कानिटकर यांनीं दिली. सदर यादी वाचतांना श्री० दाते यांची रुपये दहाची देणगी लोकमान्यांनीं नजरचुकीनें रुपये नव्वद अशी वाचली. दे० म० कानिटकर यांनीं आकडा नव्वद नसून दहा आहे, अशी दुरुस्ती सुचविली. दुरुस्तीप्रमाणें लोकमान्यांनीं दहा असें वाचलें व आपल्या नेहमींच्या प्रसंगोचित विनोदानें ते म्हणाले कीं, "माझी चूकहि वाढाव्यानेंच झाली आहे!" इतकें होत आहे तों, श्री० दाते यांनीं 'आंकडा नव्वदच करा' असें सांगितलें. यावर लोकमान्य म्हणाले कीं, "दात्यांनीं आम्हाला संतच बनविलें आहे; कारण 'वाचमर्थोनुधावति' अशी आमची स्थिति झाली आहे. वाणीमागें अर्थ धावत आला."

वरील प्रसंगानें लोकमान्यांच्या शब्दाला लोक केवढा मान देत असत व त्यांच्या सहज शब्दानें कोणाच्याहि अंतःकरणामध्यें स्फूर्ति कशी जागृत होत असे हें दिसून येईल. लोकमान्यांनीं संस्कृत वचन प्रसंगाला अत्यंत साजेसें देऊन 'अर्थ' शब्दावर जातां जातां केलेला श्लेष फारच मार्मिक आहे.

( २ ) याच प्रसंगीं लोकमान्यांशीं संभाषणाच्या ओघांत रावसाहेब गोविंदराव कानिटकर म्हणाले कीं, 'या शाळेच्या उद्देशाप्रमाणें येथून विद्यार्थी देशभक्त

निघतील.' लोकमान्यांनीं उत्तर केलें कीं, " अशीच केवळ अपेक्षा धरून चाल-णार नाहीं. चिपळूणकर व आम्ही इतरांनीं काढलेल्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें एकदां रे गव्हर्नर आला होता. त्यानें एका वर्गांत विद्यार्थ्यांना उद्देशून 'सरकारी नोकऱ्या कोणाला पाहिजेत?' म्हणून प्रश्न विचारला. उत्तरा दाखल बऱ्याच जणांनीं हात वर केले," काम करणारानें फाजील अपेक्षा मनांत धरून पुढें निराशा पावूं नये म्हणून लोकमान्यांनीं व्यवहारांतील अनुभव दिला. शाळेच्या उद्देशानुरूप 'देशाचें नेतृत्व करणारा एखादा मुलगा याच विद्यार्थीगृहांतून निघेल' अशी स्फूर्तिजनक व मगल अशी वाणी त्यांनीं याच वेळीं शाळेसबंधीं काढली आहे.

---

# जनार्दन सखाराम करंदीकर

[ बी. ए. एल्. एल्. बी., प्रोफेसर टिळक महाविद्यालय, उपसंपादक 'केसरी' पुणें. ]

( १ ) टिळकांना लोकमान्य ही पदवी प्रथम कोणी व केव्हां दिली याविषयीं वाद असून त्याविषयीं अनेक जण आपापला अग्रहक्क सांगत असतात. या संबधात स्वतः लोकमान्यानाच एकदा प्रश्न केला असतां त्यांनीं पुढील अर्थाचें उत्तर दिलें. " लोकमान्य ही पदवी प्रथम कोणी उपयोगांत आणली हें कांहीं आतां मला नक्की स्मरत नाहीं. १९०० सालापूर्वी कांहीं लेखकांनीं अगर वक्त्यांनीं ती पदवी वापरली असेल. परंतु ती कोणाच्या लक्षांत येण्याइतकी रूढ झाली नव्हती. पण १९०० सालीं शिवरामपंत परांजपे यांनीं आपल्या 'काळ'पत्रांत 'लोकमान्य आणि राजमान्य' या विषयावर अग्रलेख लिहिला आणि तो लेख वाचून कित्येकांनीं मला पत्र लिहितांना 'राजमान्य राजश्री' ह्या नेहमीचा मायना न लिहितां 'लोकमान्य' म्हणून लिहिण्याचा संकल्प केला असावा असें दिसतें. कारण त्या वेळेपासून मला 'लोकमान्य' या मायन्याचीं पत्रें येऊं लागलीं; आणि तो शब्द पूर्ण रूढ होण्याला ५ वर्षे लागलीं; 'राष्ट्रमत' पत्रानें तो शब्द कायमचा रूढ केला.

( २ ) श्री० सरदार बाळासाहेब नातू वारल्यानंतरच्या केसरीच्या अंका-करितां बाळासाहेबांचा मृत्युलेख लिहावयाचा होता. तो लिहिण्याकरितां बोला-वल्यावरून मी जाऊन बसलों व लोकमान्यांनीं स्वतः तो लेख सांगितला व मी लिहिला. लेख संपविल्यानंतर टिळकांनाच तो लेख अपुरा वाटला असावा;

कारण, ते मजकडे वळून म्हणाले, " बाळासाहेबांची एवढी माहिती पुरे झाली ना ?" त्यावर मी म्हटलें, ' बाळासाहेबांनीं राष्ट्रीय पक्षाला किती तरी तऱ्हेनें मदत केली असेल व त्या मानानें पाहातां त्यांची ही स्तुति अपुरीच वाटते. ' त्यावर लोकमान्य म्हणाले, ' कांहीं अर्थी तेंहि खरेंच; पण हा पडला सरदार घराण्याशीं संबंध. आम्ही थोडी अधिक उणी स्तुति केली कीं, सरकारला नसते संशय यावयाचे; त्यापेक्षां लेखणी थोडीशी आवरून धरलेलीच बरी; तेवढ्यामुळें बाळासाहेब कांहीं माझ्यावर रागावणार नाहींत खास ! "

( ३ ) कै० XXX यांच्या मृत्युसंबधाचे स्फुट लोकमान्य टिळकांनींच सांगून लिहविले; तें लिहितांना मी तेथें नव्हतों. पुढें मुद्रितें तपासताना त्यातला कांहीं भाग माझ्या कानाला बरा लागेना. तेव्हां तो भाग गाळावा किंवा दुरुस्त करावा म्हणून तो घेऊन मी लोकमान्याच्याकडे गेलों. त्यावरून मृत्युलेख कसा असावा या मुद्यावर चर्चा सुरु झाली. लो० म्हणाले, " मृत्युलेख वाचताच त्या मनुष्याचे गुणदोष, चालचलणूक, बुद्धिमत्ता या विषयीं यथार्थ कल्पना वाचकाच्या डोळ्यापुढें उभी राहिली पाहिजे." मी म्हटले, ' हे खरें; पण ही कल्पना दोन प्रकारानीं आणून देता येते. दोषांचे प्रत्यक्ष विवरण करून किंवा त्या गुणाविषयीं मुग्धता स्वीकारून; यांतला दुसराच प्रकार असल्या प्रसगीं उचित नव्हे काय ?' त्यावर लोकमान्य जरा ठासून म्हणाले, " हे एवढे बी. ए. झालेले व शिक्षणखात्यात जन्म घालविलेले गृहस्थ; यांनीं XXXX पुस्तकाहून अधिक महत्वाचे कांहीं लिहू नये काय ?" त्यावर मी सुचविलें कीं, ' तसे असल्यास मृत्युलेख न लिहिणेंच बरें. लेख लिहून त्यांत असा टोमणा मारणें बरे दिसणार नाहीं. ' हे ऐकून किंचित् विचार करून त्यांनीं मधले एक वाक्य गाळून टाकण्यास समति दिली. त्यांचा स्वभाव दुराग्रही होता असें म्हणतात; पण या अनुभावावरून तो आरोप निर्मूल होय असे माझ्या प्रत्ययास आलें.

( ४ ) कार्यनिष्ठेपुढें लो० टिळकांना जेवणखाण, झोप वगैरे कांहीं एक सुचत नसे व हीच निष्ठा प्रसगविशेषीं ते इतरांवर लादीत असत! अमृतसरच्या राष्ट्रीय सभेला जातांना स्पेशल ट्रेनची दोनतीन ठिकाणीं अदाजाबाहेर खोटी झाली. गाडी अमृतसरला पोंचण्याला निदान अकरा वाजतील आणि कॉंग्रेसच्या कामाला तर साडेबाराला सुरवात होणार असें जाहीर केलें होतें. तेव्हां स्पेशल ट्रेन अमृतसरला पोंचल्यावर जेवणखाण आटोपण्यास वेळ राहाणार नाहीं हें जाणून सूर्योदयाबरोबर टिळकांनीं त्या गाडींतील सर्वांस निरोप कळविला कीं, ' सर्वांनीं आपापलें स्नान–भोजनादि व्यवहार वाटेंतच आटोपून घ्यावेत. अमृतसर स्टेशनवर पोंचतांच सामान स्वयंसेवकांच्या ताब्यांत देऊन आपण परभारें कॉंग्रेसच्या मडपांत जावयाचें. ' लोकमान्यांचा हा निरोप ऐकतांच सर्वांनीं आपापलें आन्हिक वाटेंतच आटोपलें व सर्व मडळी जेवणाखाणाची पर्वा न करतां परभारें कॉंग्रे-

सच्या मंडपाकडे जाण्यास सिद्ध झाली. परंतु अमृतसरला पोंचतांच आदले दिवशीं पावसानें झोड उठविल्यामुळें कॉंग्रेसचा मंडप जलमय होऊन गेला आहे व त्यामुळें कॉंग्रेसची बैठक एक दिवस पुढें ढकलली गेली असें कळलें. अर्थात्च मंडळींना उपासपोटीं कॉंग्रेसला जाण्याचा प्रसंगच आला नाहीं. पण लोकमान्यांची त्याला तयारी होती: व सर्वच मंडळी त्यांच्या सांगण्याबरहुकूम वागणारी असल्यानें त्यांनींहि हूं कां चूं न करितां लोकमान्यांची आज्ञा अक्षरशहा पाळण्याची तत्परता दर्शविली.

( ५ ) अमृतसरच्या कॉंग्रेसची सुरवातच एक दिवस उशिरा झाली. त्यानंतर विषयनियामक कमिटींतला वादहि बराच लांबला. त्यामुळे तिसरे दिवशींहि मुख्य ठराव पास होऊ शकला नाहीं. या कारणानें कित्येक प्रतिनिधी चौथे दिवशीं जाण्याच्या तयारीला लागले. त्याच दिवशीं सकाळीं विषयनियामक कमिटींत अखेरचा कडाक्याचा वाद झाला आणि लो० टिळक व म० गांधी यांच्यांत तडजोड न झाल्यानें मुख्य ठरावावर भर कॉंग्रेसमध्यें मतें घेण्याचा प्रसंग येणार असे दिसूं लागलें. त्याबरोबर लोकमान्यांनीं महाराष्ट्रीय कॅपांत निरोप पाठविला कीं, 'आजच्या ठरावावर मतें मोजण्याची पाळी येणार असें दिसतें. यास्तव आजची बैठक संपेपर्यंत कोणीहि कॉंग्रेस सोडून जावयाचे नाहीं.' हा हुकूमवजा निरोप पोंचताच ज्यांनीं निघण्याची तयारी केली होती त्यांनीं ती रहित केली: आणि कित्येकांना तर स्टेशनवर गेलेलें सामान परत आणावें लागलें! पण लोकमान्यांची कदरच अशी कीं, त्यांच्या इच्छेविरुद्ध एकहि महाराष्ट्रीय त्या दिवशीं अखेरपर्यंत कॉंग्रेसचा मंडप सोडून हलला नाहीं. पुढें तडजोड होऊन मते घेण्याचा प्रसंगच टळला हें निराळें. पण लोकमान्यांची दूरदृष्टि व तयारी इतकी कडेकोट असे.

---

## विष्णुशास्त्री बापट

[ वेदशास्त्रसंपन्न, विद्वान् ग्रंथकार, संपादक 'आचार्य,' पुणें. ]

( १ ) लोकमान्य मंडालेहून आपल्या घरीं सुखरूप येऊन पोंहोचले. त्यानंतर आठ दिवसांनीं माझे स्नेही बडोदा बापटकमिशन मधील सुप्रसिद्ध श्री० वासुदेवराव बापट यांजबरोबर मी त्यांना भेटावयास गेलो. त्यावेळीं श्री० वासुदेवरावांनीं त्यांना माझी ओळख करून दिली तेव्हां "मीं तुमचीं तत्त्वानुसंधानसार व सविवरण पंचदशी हीं पुस्तकें पाहिलीं आहेत" असें त्यांनीं म्हटलें आणि "विंचुरकराच्या वाड्यांत १८९८ सालीं श्रीशुकचरित्र द्यावयास तुम्हीं

आलों होतों, हें मला आठवतें" असेंहि सांगितलें. हें ऐकून त्यांच्या स्मरणशक्तीचें मला मोठें कौतुक वाटलें. पुढें "कोठे रहातां, काय उद्योग चालला आहे," इत्यादि थोडेसें समाषण झाल्यावर 'आपण गीतारहस्यांत मुख्यतः कोणता सिद्धान्त प्रतिपादिला आहे?' असें मीं त्यांस विचारिलें, तेव्हां "मीं त्यांत ज्ञानकर्मसमुच्चयाचे प्रतिपादन केलें आहे" असें त्यांनीं उत्तर दिलें. त्यावर 'तर मग आपण एका मृतपक्षाचेंच उज्जीवन केलें आहे म्हणावयाचें! पण या आपल्या प्रतिपादनावर बराच मोठा वाद माजेल असें मला वाटतें. कारण आचार्यांनीं या पक्षाचें सविस्तर व सप्रमाण खंडन केलें आहे.' असें मी बोललों. ते म्हणाले कीं, "हें मला ठाऊक आहे; तथापि मला जो पक्ष योग्य वाटला तोच मीं आपल्या पुस्तकांत प्रतिपादिला आहे. तज्ज्ञांनीं त्याची छाननी करावी, हीच माझी इच्छा आहे." 'आपल्या ग्रंथाची लेखी प्रत येथे आहे कां?' असें जेव्हां मीं विचारिलें, तेव्हां ते म्हणाले "माझी लेखी प्रत सरकारांत गेलेली आहे. आठपधरा दिवसांत येईल, ती आल्यावर मी तुम्हाला दाखवीन. त्यात कांहीं सूचना करावयाच्या असल्या तर त्या खुशाल कराव्या."

पुढें बहुतेक एकदोन दिवसांनीं मी त्यांच्याकडे जात असें व गीतेंतील निरनिराळ्या श्लोकांची चर्चा आम्ही करीत असूं. कांहीं दिवसांनीं त्यांचीं पेन्सिलीनें लिहिलेलीं चार पुस्तकें सरकारांतून परत आलीं. त्यांतील पहिलेंच पुस्तक त्यांनीं मला वाचावयास दिलें. मी तेथेंच बसून तें वाचीत असें. पण तीं इतकीं गिजबिज लिहिलेलीं होतीं व त्यांत इतके शोध होते कीं, तीं वाचणें मोठ्या परिश्रमाचेंच काम होतें. रोज मी पुस्तक मिटून येऊं लागलों म्हणजे "काय, कोणता भाग वाचलांत?" असा ते मला प्रश्न करीत, व मीहि त्यात जो भाग मला आक्षेपार्ह वाटे, तो त्यांना सांगत असे. त्याचें ते आपल्यापरी समर्थन करीत.

कांहीं दिवसांनीं गीतारहस्य हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. 'केसरी'त त्याची जाहिरात येण्यापूर्वीं एक दिवस 'कर्त्याकडून सप्रेम भेट' म्हणून ग्रंथ मजकडे आला. तो छापण्याचें काम सुरू असतांना मी केव्हां केव्हां त्यांच्याकडे जात असे व प्रत्येक वेळीं कांहीं तरी विषय निघून वादविवाद होत असे. पण प्रत्यक्ष पुस्तक हातीं आल्यावर त्याला विशेष स्वरूप आलें. कारण सूर्यंजयद्रथन्यायानें रहस्यातील प्रत्येक दोष बोट ठेवून दाखवितां येणें आतां सुकर झालें होतें. १ सांप्रदायिक दृष्टि सदोष, म्हणून ती सोडून ग्रंथतात्पर्य काढण्याची रीत, २ गीतेचा उपक्रमोपसंहार, ३ गीता हें स्वतंत्र कर्मयोगशास्त्र, ४ कर्म व योग या शब्दांचा अर्थ, ५ गीतेतील योगशब्दांचा बहुतेक सर्व ठिकाणीं कर्मयोग हा अर्थ, ६ गीतेचा उपक्रम व उपसंहार, ७ अर्जुनाकडून केवळ युद्ध करविण्यासाठींच गीतेची प्रवृत्ति, ८ आत्मज्ञानानंतर प्रत्येक ज्ञानी पुरुषानें जगांतील व्यवहार

कसा करावा या प्रश्नांचा निर्णय करण्यासाठीं गीता आहे, ९ गीतेतील निष्काम-कर्मयोग ही प्रवृत्ति आहे, १० कर्मयोग हे ज्ञाननिष्ठेचें साधन नसून स्वतंत्र मोक्ष-मार्ग आहे, ११ धर्म म्हणजे पत्करलेला धंदा, १२ कर्मयोगाच्या सिद्धीसाठीं ज्ञान व भक्ति, १३ गीतेंत सांख्य व वेदान्त यांची जोड घातली पण योग मात्र गीतेंत नाहीं, हे व अशाच स्वरूपाचे दुसरेहि कांहीं मुद्दे आणि गीतेतील बऱ्याचशा श्लोकांचा अर्थ यांवर आमचा वादविवाद होत असे. गीतारहस्य प्रसिद्ध झाल्या-पासून सुमारें दीड वर्षांत अजमासें पन्नास साठ वेळां तरी त्यांचे व माझे या विषयावर संभाषण झालें आहे. प्रायः संध्याकाळीं सहा पासून सात साडेसात पर्यंत आमचा हा वाद चालत असे. त्यावेळीं लोकमान्यांपाशीं कोणी नसेच, आणि कदाचित् कोणी आलेच तरी ते फार वेळ बसतहि नसत. एकदा आमचें हें संभाषण चाललें असतांना चित्रशाळेचे मालक रा० वासुकाका जोशी तेथें आले. दहा पंधरा मिनिटें उभे राहिले व मुकाट्याने परत जाऊं लागले; तेव्हां लोकमान्य म्हणाले "कांहो, निघाला कां ? यांत कांहीं तुमच्या ओळखीचे शब्द नाहींत म्हणून कीं काय ? यात टाईप, कागद, व फॉर्म किंवा भाव यांतील कशाचेच नांव ऐकू येत नाहीं म्हणून कंटाळला वाटतें ?" यावर वासुकाका म्हणतात 'आपल्याला बुवा ही कर्म-कटकट नको; त्यांत कांहीं 'तत्त्वमसि' दिसत नाहीं' असें बोलून ते सरळ निघू-नच गेले. कांहीं वेळां ते माझें म्हणणें कबूल करीत, कित्येकदां उडवाउडवी करीत व कांहीं वेळां थोडेसें चिडूनहि जात व म्हणत कीं, "तुम्ही ज्ञानमार्गी लोक आमचें म्हणणें कधींहि कबूल करणार नाहीं हें मला ठाऊक आहे. पण हा माझा हा प्रयत्न ज्ञानमार्गी विरक्तासाठीं मुळींच नाहीं." त्यावर मीहि म्हणें कीं, 'जर विरक्तासाठीं गीता नाहीं तर निष्कामकर्मयोग कशाला ? निष्कामता हें अनु-रक्ताचें लक्षण आहे कीं काय ? ' ह्या आमच्या संभाषणांत अशा प्रकारचीं गम-तीचीं प्रश्नोत्तरें होत असत !

संन्यासमार्गीयांवरील त्यांच्या कडक टीकेसंबंधानें बोलतांना "त्यांत तुम्हांला जो जो भाग जहाल आहे असे वाटत असेल त्याचें मला टांचण करून द्या. दिसऱ्या आवृत्तींत मी त्यांत सुधारणा करीन" असें लोकन्यांनीं एकदोनदां म्हटलेलें मला आठवतें. या वादप्रसंगावरून त्यांची बहुश्रुतता माझ्या चांगलीच प्रत्ययास आली. श्रुति-स्मृति-पुराण-मीमांसादि कोणताहि विषय जरी काढिला तरी तो त्यांना अवगत आहे, असेंच प्रत्ययास येत असे. एकदां तर ते असेंहि बोलले कीं, "आचार्य ज्ञान कशाला म्हणतात, कोणत्या ज्ञान-कर्मसमुच्चयाचें खंडन करितात, कोणत्या कर्मयोगावर त्यांचा कटाक्ष आहे, हें सर्व मी जाणतों. पण मला गीतेतील प्रवृत्तिमार्गच पुढे आणावयाचा आहे. लोकांना आळशी बन-विणारा निवृत्तिमार्ग हल्लीं कांहीं कामाचा नाहीं. हल्लींचे सन्यासी आमच्या काय कामाचे ? आमच्या मताने आचार्यहि कर्मयोगीच आहेत. आम्ही त्यांना संन्यासी

म्हणत नाहीं " वगैरे. त्यावर मी म्हटले, " पण आपला हा उद्देश गीतेंतील ज्ञानपर श्लोकांची सर्वथा उपेक्षा करून कर्मपर श्लोकांच्या व्याख्यानानेंहि साध्य झाला असता. पण सर्व गीता कर्मपर लावण्यांत वेदान्तशास्त्र, सन्यास ऊर्फ ज्ञान-मार्ग, स्वतः आचार्यांचें तत्त्वज्ञान इत्यादि सर्वांशीं विनाकारण विरोध करण्याचा प्रसंग आला आहे. हल्लींचे सन्याशी आपण म्हणतां तसे कदाचित् झाले असतील; पण त्यासाठीं सन्यासमार्गावर तुटून पडणें केव्हांहि योग्य होणार नाहीं. आपण आचार्यांना कर्मयोगी जरी समजत असलां तरी स्वतः आचार्य आपल्याला कर्म योगी कधींच म्हणवून घेणार नाहींत, ते स्वतःला ' परमहस परिव्राजक'च म्हणवितील. " वगैरे.

लोकमान्यांच्या गीतारहस्याशीं मी अगदीं आरंभापासून जरी विरोध करीत होतों तरी हा व्यक्तिविरोध नसून केवळ शास्त्रविरोध आहे, हे त्यांना अव-गत होतें. म्हणूनच ते माझ्याशीं खासगी रीतीनें अगदीं सरळ मनानें वागत. मी त्यांच्या ग्रंथावर प्रतिकूल टीका करीत आहे, हे माहीत असतानाहि मला एखादा श्लोक माझ्या जवळच्या मूळ ग्रंथात सांपडत नसल्यास व पुस्तक त्यांच्या-कडे पाठविल्यास तो श्लोक तावडतोब नेमका काढून व त्यावर पेन्सिलीची खूण करून पाठवीत. सुरेश्वराचार्यांचें ' नैष्कर्म्यसिद्धि ' हें पुस्तक मजपाशीं नव्हतें. तें त्यांनीं आपल्या लायब्ररींतून निरोप पोंचतांच पाठवून दिलें. व " तुम्हांला चार-आठ दिवस लागल्यास ठेवून घ्या " असेंहि कळविलें.

गीतारहस्यांतील कांहीं दोष सप्रमाण दाखविल्यास ते, ते कबूल करीत. गीतारहस्य आवृत्ति १ ली, पृ० ३९, यांत त्यांनीं परिणाम व विवर्त यांतील भेद दाखविताना ' यस्तात्त्विकोन्यथा भावः० ' इत्यादि श्लोकाचा जो अर्थ दिला आहे, तो चुकीचा आहे, असें जेव्हा मी त्यांना दाखविलें तेव्हां त्यांनीं ती गोष्ट कबूल केली व फारच थोड्या अवकाशांत निघालेल्या रहस्याच्या दुसऱ्या आवृ-त्तींत त्याची अर्थात सुधारणाहि केली. गी० र० पृ० २२–२३ यांवरील टीपेंत त्यांनीं अनुवाद, गुणवाद व भूतार्थवाद यांचा अर्थ दिला आहे. पण तो बरोबर नाहीं, असें मी त्यांस कळविले. तेव्हा त्यांनीं दुसऱ्या आवृत्तींत फार्म मशीनवर चढला असतांहि मला बोलावून घेऊन त्यांत शक्य तितकी सुधारणा केली! याप्रमाणें माझी ही विरोधीभाक्तिहि त्यांना मान्य होत असे.

(२) लोकमान्य मंडाल्याहून परत येण्यापूर्वी नागपूरचे डॉ० मुंजे यानीं 'केसरीं'त सर्व धर्मशास्त्र ग्रंथांचें आलोडन करून धर्मशास्त्रावर विवेचक बुद्धीनें ग्रंथ लिहि-णारास एक हजार रुपये बक्षीस देण्याचें जाहीर केलें होतें. पण प्रस्तुत कार्य बरेंच कठिण असल्यामुळें ते करण्यास कोणीहि विद्वान् शास्त्री पुढें आले नाहींत. अर्थातच लोकमान्य परत येईपर्यंत डॉ० मजकुरांचा उद्देश सफल झाला नाहीं. लोकमान्य परत आल्यावर कांहीं महिन्यांनीं त्यांना भेटण्यासाठीं डॉक्टर स्वतः

पुण्यास आले. तेव्हा त्यांनीं आपला उद्देश लोकमान्यांस कळविला व ' आपल्या पसं-तीनें आम्हांस एक शास्त्री या कामासाठीं पाहून द्या ' अशी त्यांना विनंति केली. त्यावेळीं लोकमान्यांनीं मला बोलावलें. या कामीं लागणारीं पुस्तकें पुरविण्याचे कबूल केलें व कामाची दिशा आखून दिली. यानंतर आठच दिवसांत लोकमान्यांनीं 'केसरी' ऑफिसाच्या तिसऱ्या मजल्यावर स्वतंत्र जागा देऊन लेखनसामुग्री व धर्मशास्त्रांच्या ग्रंथांचें कपाट माझ्या स्वाधीन केलें. मी रोज सध्याकाळीं चार ते सहा तेथें जाऊन काम करू लागलों. सुमारे महिना दीड महिना याप्रमाणें काम केलें; पण वर म्हटल्याप्रमाणें अंशतः गीतारहस्यावरील वादाला कांहीं कारणानें वितंडपणाचे स्वरूप प्राप्त झाल्यामुळें व अंशतः मलाहि नियमित वेळ मिळेनासा झाल्यामुळें तें काम बंद ठेवावें लागलें. माझ्या वतीनें मी एक दोन गृहस्थांचीं नांवें सुचविलीं व लोकमान्यांच्या समतीनेंच त्यांतील एका सद्गृहस्थांनीं ते काम पत्करिलेंहि होतें. पण पुढें ते कां बंद पडलें, तें मला कळलें नाहीं.

(३) मी गीतारहस्याशीं जो विरोध करीत होतों तो आचार्यांचा सिद्धान्त निर्दोष आहे, या शुद्ध भावनेनें व आचार्यांवरील उत्कट भक्तीनें करीत होतों. तथापि आचार्यभाष्य व गीतारहस्य यातील एकाचेंहि प्रमेय तत्त्वतः न जाणणारे सामान्य टिळकभक्त व हस्तक माझ्याकडे जसे असूयेनें पाहूं लागले होते. तसेच व तितक्याच योग्यतेचे टिळकद्वेष्टे माझ्याकडे अनसूयेनें पाहू लागले ! अशा लोकांचा भरणा अर्थात्‌च कोल्हापुरास जास्त होता. करवीर—संकेश्वर आचार्य पिठांमध्ये बखेडा उत्पन्न करणाऱ्या व्यक्ति यांत प्रमुख होत्या. आचार्य पाक्षिकांतून " या पीठांच्या व्यवस्थेंत सुधारणा झाली पाहिजे, त्यांतील दोष घालविले पाहिजेत, त्याचें संकुचित स्वरूप गेलें पाहिजे, योग्य अधिकाऱ्यांचीच पीठावर योजना झाली पाहिजे, पीठासंबधींचा हल्लींचा बखेडा मोडला पाहिजे," अशा अर्थाचे लेख वारंवार येत असत. त्याचा फायदा घेऊन करवीर पीठाच्या अधिकाऱ्यांनीं मला मोहक अभिवचनांनीं आपल्या जाळ्यांत अडकविण्याचा प्रयत्न केला. त्यावेळच्या महाभागवत कुर्तकोटींचा व माझा परिचय झाला. आम्हीं दोघेहि त्यांच्या थापास पुष्कळ अशी भुललों व आचार्य पीठाला कांहीं तरी निराळें वळण लावावें याच उद्देशानें आम्हीं दोघांनींहि करवीर मठांत जाण्याचें ठरविलें. या कामीं लोकमान्यांचा सल्ला घेण्यासाठीं आम्ही दोघेहि त्यांच्याकडे गेलो. आमचा उद्देश शांतपणें ऐकून घेऊन " तुम्ही या कामांत पडू नका, तुम्हाला यांत यश येणार नाहीं, यापेक्षा स्वतत्र राहूनच तुम्हांला आपलें इष्टकार्य चांगल्या रीतीनें साधतां येईल; याउपर तुम्ही गेलांत तर तुमची मर्जी. पण तुम्हांला मागून पश्चात्ताप होईल " असा त्यांनीं आपला स्पष्ट अभिप्राय आम्हांला सांगितला. आणि शेवटीं त्यांचेंच भाकित खरें ठरलें ! कोल्हापुराहून परत आल्यावर लोकमान्यांनीं मला आपल्या सल्ल्याचें स्मरण दिलें. याप्रमाणें कोल्हापुराहून दोन-चार महिन्यांतच

परत आल्यावर आम्हीं इकडे सकेश्वर पीठ सुधारण्याचा प्रयत्न चालविला. कै० ज० वि० ओक, श्री० बापुकाका जोशी, वगैरे बडी बडी मंडळीं त्यांत होती. आम्ही मोठाले व्यूह रचिले, योजना तयार केल्या. गुरु शिष्य स्वामींना येथें आग्रहानें आणविलें. पुष्कळ ' भवति न भवति ' होऊन लोकमान्यांच्या समतीनें जाहीर समारंभ करून त्यांत लोकमान्यांच्या समक्ष ती योजना जाहीर केली, ती 'केसरी'त अंशतः प्रसिद्ध झाली. पण शेवटीं तें सर्व स्वप्नच ठरलें. तेव्हां लोकमान्य म्हणाले, " अहो, हे स्वामी-जहागीरदार बनले आहेत, ते काय आपली जहागीर सोडून तुम्हांला मध्यें ढवळाढवळ करूं देतील ! मला हें भविष्य पूर्वीच ठाऊक होतें, पण तुम्हाला नाउमेद करूं नये म्हणून मी पहिल्यानें कांहीं बोललों नाहीं. तुमच्या हेतूप्रमाणें घडून आलें असतें तर चांगलें झालें असतें. "

सारांश, लोकमान्य हे मोठे थोर व भाग्यशाली पुरुष होऊन गेले, याविषयीं कोणाचाहि केव्हांहि मतभेद होण्याचा संभव नाहीं. गीतारहस्याच्या बाबतींत विशेषतः श्रुतिसिद्ध ज्ञानमार्गाला गौणत्व दिल्यामुळें त्यांच्या-माझ्यामध्ये शास्त्रीय मतविरोध जरी झाला तरी त्यांच्याविषयींचा आदर केव्हांहि कमी झाला नाहीं व तो होणें शक्यहि नाहीं. त्यांच्याशीं वाद करतांना मला मोठी गमत वाटे. मी नेहमीं तो मोठ्या उत्साहानें व हंसत करीत असें.

---

## सर गंगाधरराव चिटणवीस

[ के० सी० आय० ई., मध्यप्रान्त कौन्सिलचे माजी प्रेसिडेन्ट,
मालगुजार, नागपूर ]

( १ ) कलकत्यास मी असतांना तेथें एकदां एका मोठ्या भोजनप्रसंगीं दोनतीन मोठ्या गव्हर्मेंट ऑफ इंडियाच्या अधिकाऱ्यांशीं लोकमान्यांविषयीं माझें बोलणें झालें. त्यांनीं प्रांजलपणें मला सांगितलें कीं, टिळकांविषयीं जसा इंडियन लोकांचे मनांत आदर आहे तसाच किंवा त्यापेक्षांहि जास्त आदर युरोपियन लोकांचे मनांत आहे. टिळकांचेहि मनांत चांगल्या युरोपियनांविषयीं व त्यांचे राज्यकारभाराविषयीं अतिशय आदर असे. फक्त साम्राज्य कायम राहून राज्यपद्धतींत इंडियन लोकांचें अधिकार वाढविण्याच्या संबंधानें त्वरित सुधारणा व्हावी असें त्यांचें मत असे. महायुद्ध झाल्यावर आपण निकराची मागणी केल्यास

जास्त हक्क मिळतील असें त्यांचें मत होतें. व जबाबदार राज्यपद्धति मिळेल असें त्यांनीं लढाई चालली असतांनाच १९१७ मे पूर्वी कित्येक दिवस भाकीत केलें होतें.

(२) लढाईचा शेवट होण्याचे वेळीं ते दिल्लीस आले होते दिल्लीच्या लोकांनीं त्यांचा मोठा गौरव केला. मतें भिन्न होतीं तरी पण महाराष्ट्रांतील एका प्रमुख गृहस्थाचा उत्तर हिंदुस्थानांत असा गौरव होत आहे, हें पाहून, मला विशेष आनंद झाला व अभिमानहि वाटला. मीं एका दुकानांत बसून लोकांनीं काढलेली लोकमान्यांची मिरवणूक पाहात होतों. लोकमान्य व दादासाहेब खापर्डे चार घोड्यांच्या बग्गींत बसले होते. लोकांचा जमाव वीस हजारांवर होता! लोकमान्यांचें माझेकडे लक्ष गेलें तेव्हां मतवैचित्र्याचा किंवा इतर गोष्टींचा विचार न करतां गाडींत उभे राहून त्यांनीं सानंद दृष्टीने वांकून मला नमस्कार केला. लोकमान्यांची मान्यता, विद्वत्ता, लोकप्रियता, अलौकिक विचारसरणी, लोकसेवा, स्वार्थत्याग ह्या सर्व गोष्टींचा विचार करता ते माझ्यापेक्षां कितीतरी मोठे ( उच्च ) होते; तरी पण त्यावेळीं त्यांनीं जो माझा विनयपूर्वक आदर केला तो विनय त्यांच्या मोठेपणालाच शोभण्यासारखा होता. मी त्या आदरास योग्य नव्हतों हे मी जाणून आहें; पण त्यामुळें मला किती तरी आनंद झाला व धन्यता वाटली. ही आठवण मी आपल्या योग्यतेचे द्योतक म्हणून देत नसून, लोकमान्यांचा मोठेपणा व उदारपणा दाखविण्यासाठीं म्हणून देत आहे.

(३) लोकमान्य दिल्लीस असतांना मी जेव्हां त्यांचे भेटीस गेलों तेव्हां "लढाईचे नंतर जर आपण सर्वांनीं कसून प्रयत्न केला तर जरूर जास्त हक्क मिळतील" असें ते म्हणाले. जातीजातींत वैमनस्य वाढलें न पाहिजे असें त्यांचं मत होतं. मराठी साम्राज्याचा म्हणजे श्रीशिवाजी महाराजांचा त्यांना मोठा अभिमान असे. आपल्या हिंदुस्थानी राज्यांत सुयन्त्रित राज्यव्यवस्था राहावी अशी त्यांची फार इच्छा असे. हल्लींच्या काळात इंग्रजांचे अनुकरणानें आपण जास्त हक्क मागून आपली उन्नति करून घ्यावी असें त्यांना वाटत असे श्रीशिवाजीमहाराजांचें सर्व जातींविषयीं सर्वसाधारण व प्रेमाचें जें धोरण होतें तसेंच धोरण असावें असें त्यांचें म्हणणें होतें. परन्तु सुधारणेची प्रगति अतिशय जोरानें चालली तर ती प्रगति सर्व जातींतील जनसमूहाला आटोपणार नाहीं व ह्यापासून कदाचित् जास्त कलह माजेल असेंहि त्यांना वाटे. परन्तु अन्य जातींशीं भोजनप्रसंगाच्या वेळीं किंवा त्याच्या संबंधानें बोलतांना ते कधींच अन्य जातीला वाईट वाटेल अगर मनं दुखावतील असे वागले नाहींत हें मी स्वतःचे अनुभवावरून सांगू शकतों.

( ४ ) कारोनेशन दरबारानंतर दिल्लीहून बादशहा कलकत्ता येथें गेले. त्यावेळीं मींहि कौन्सिलचे कामाकरितां हजर होतों. ज्याप्रमाणें बंगाल, बिहार

व पंजाब वगैरे प्रांताचे लोकांस संतोषविले व गौरविले त्याप्रमाणें महाराष्ट्राकरितां कांहीं तरी करून महाराष्ट्राचें समाधान करावें असा बादशाहा व लॉर्ड हार्डिंग्ज यांचा हेतु होता. लोकमान्यांची मुक्तता ही त्यावेळीं एक प्रमुख बाब होती. या संबंधीं जेव्हां कांहीं अधिकाऱ्यांनीं मला विचारिलें तेव्हां मी 'लोकमान्यांच्या मुक्ततेमुळें महाराष्ट्रास खास आनंद होईल' असें सांगितलें. परंतु पुढें तें कां घडून आलें नाहीं हे मला कळलें नाहीं. तसें घडलें असतें तर महाराष्ट्राला आनंद झाल्याशिवाय राहिला नसता. ही आठवण देण्याचें कारण इतकेंच कीं, लोकमान्यांविषयीं राजकर्त्यांचे मनांत कसा आदर असे व त्याचे काय विचार चालत हें सर्वांस कळून यावें.

( ५ ) मंडाल्यास जेव्हा कॉलरा सुरू झाला होता तेव्हा लोकमान्यांना दूषित प्रदेशांतून दुसरीकडे न्यावें अशा विचारांनीं त्यांना दुसऱ्या जागीं नेले होतें. तेव्हांहि कांहीं थोड्या शर्तींवर त्यास सोडण्याचे विचारात सरकार होतें. पण लोकमान्यांना तसें विचारण्यांत आलें असतां त्यांनीं ती गोष्ट साफ पत्करली नाहीं ! मला चांगल्या विश्वसनीय अधिकाऱ्याकडून त्यावेळीं ही गोष्ट समजली होती, म्हणून या गोष्टीचा येथें उल्लेख करणे जरूर आहे, असें समजून ती गोष्ट येथें दिली आहे.

---

## Joseph Baptista.

*(B. A, LL B., L. C E., Bar-at-Law, M. L. C, President Bombay Corporation, Bombay).*

In November 1899 I first met Tilak Napoleonic in stature he was a "prize for his size." He came to thank me for the proposition I moved at the Cambridge Union, stigmatising the policy of Government in prosecuting editors for sedition as unwarranted and unwise. He was somewhat surprised to learn that, the under-graduates of Cambridge discussed politics in the presence of Masters, Dons and Bull Dogs, and that even Cabinet Ministers annually took part in the discussion It is interesting to record that the Late Mr Montague and Lord Lytton were present at the debate whereat I had the temerity to anticipate that the pen would change to pen-knife, if the policy were pursued. Tilak confined the conversation to education in England, but his admiration of Gladstone emboldened me to suggest the formation of A Home Rule League for India after the model of the Irish League. "Too-early may be too late" was the prompt response in tones that betrayed the anguish of his heart

So we sat in silence for some minutes before we parted. The second time I broached the subject, was at the time of the memorable Congress at Calcutta, in 1906, when Lord Curzon's Partition of Bengal had transformed Macuaulay's Bengalees into militant Mazinis "Too early yet, but not too late" he observed. Evidently Tilak had travelled from despair to hope My third venture was in 1915 after his return from exile in Mandalay when he singled me out for the Presidentship of the Bombay Provincial Conference to be held at Poona. "The time is ripe now" said I. "Yes" said he, "but would it be right to raise the issue of Home Rule now while the war is raging" "So long as we perform our duty and render all help we can, to win the war, we can proclaim our rights with a clean conscience" said I "In fact we are only hastening the advent of 'the proudest day in the History of England' according to Maucaulay." "I am afraid we shall be hastening the advent of the day of my return journey to Mandalay" said he. "However the prospect is worth the risk. You should suggest it in your Presidential address." I did so. It

bore good fruit as Mrs. Besant took it up with characteristic enthusiasm and energy. *But the Congress fought shy of it although* Dadabhoy Naoroji had blessed it. Mrs. Besant then began negotiation with the Committee, the Poona Conference had appointed I happened to be in England at this time. Nothing came out of it. So we started the Indian Home Rule League at the Belgaum Conferénce in April 1916 with myself as President.

In point of time it was the first League of the kind in India though Mr. Montague has given the palm to Mrs Besant Tilak celebrated the inauguration with a brilliant exposition of the meaning of Home Rule. News reached me that the Government of Bombay contemplated prosecuting Tilak for the speech I took the liberty of representing to Lord Willingdon personally the unwisdom of the step. He was evidently reluctant to prosecute and consented to reconsider the matter in Council while I was to ascertain the attitude of Mr. Tilak towards possible peace with honour. Lord Willingdon's Government meanwhile resolved to take legal action, but it was a great relief to me that it was to be under the C. P. C., and not the Penal Code. Tilak was manifestly pleased "The Lord is with us" said he. "Home Rule will now spread like wild fire." So it did Within 6 months the Home Rulers captured the Congress at Lucknow in 1916. At the Congress Tilak declared "we have had luck in Lucknow and we have united in United Provinces," alluding to the Hindu-Moslem Compact.

Lord Pentland unwillingly gave an enormous impetus to the cause of Home Rule by confining Mrs Besant at Ootacamund. Tilak seized the opportunity to appeal to the British people for the liberty of Mrs. Besant and Home Rule for India. I was deputed to prepare the way for the intended deputation by the Congress, or the Indian Home Rule League. Just as I was embarking we learnt that Mr. Montague had displaced Mr. Chamberlain. Mr. Montague's extraordinary denunciation of the Government of India had created great hopes of a new era So I asked Tilak what answer I was to make in case I was questioned within what time Home Rule was to be fully in operation "Say fifty years." "Not fifty." said I. "Yes; fifty. Who is going to give us Home Rule even in fifty years?" Strange

to say, almost the first question put to me by Mr. Montague was "what time limit." "A generation" said I. "A generation! that is a practical proposition" said Mr. Montague Mrs. Besant was released and Mr. Montague embarked for India after the historic declaration in the House of Commons. While in India the Labour Party in England at the Conference at Nottingham made Home Rule for India a plank of its platform. The intended deputation was held up at Ceylon. I was detained in London for the civil suit against Sir Valentine Chirol

*Responsive Co-operation*

It is commonly assumed that Tilak was an arch enemy of Social Reform, Islam and England. The truth is that anything that did not accord with his burning patriotism was anathema with him. Once I dined with him in the most sacred temple in Belgaum. It appeared almost incredible to Mr. M. R. Jaykar. At his instance I asked Tilak whether it would not scandalize the orthodox. "There was nothing unorthodox" said he. "I put an extra inch between you and me than between Brahmin and Brahmin; but I put you two inches nearer my heart than any Brahmin who ever got there" In London we lived together in the same house and dined together at the same hotel at the same table. The question of dining together was raised in the days of Shivaji and the Peshwas "We have countless ways of circumventing orthodoxy, and orthodoxy will never stand in the way of social reform if it be necessary for Swaraj." This was his creed.

As for Islam the charge of hostility is founded on the movements attributed to him concerning Cow-protection, Ganapati Melas and Shivaji Cult He often used to protest that Cow Protection did not originate with him but with the Bunias of Bombay, but he added "The cow is sacred to a Hindoo. Could any one in reason be justified in finding fault with a Hindoo who strives to save the sacred Cow." It appears to me an absolutely unanswerable argument. As for the Shivaji Cult, "would you as a Christian object to it? If not, why should any one else?" As for the Ganapati Melas he confessed that religion and politics got mixed up. "But no one would complain if it were not for the foreign Rule. Every effort to rouse the dormant Nationalism of the

Mahratta was bound to incur the displeasure of the Rulers and *lead to misrepresentations in order to Divide and Rule.*" "My religion is sacred to me, but as for the destribution of loaves and fishes of office, I am ready to give the friends of Islam more than their share." I mentioned this once to Moulavi Rafiuddin Ahmed in 1915 as we were travelling together from Poona to Bombay. After the generous and decisive attitude of Mr. Tilak at Lucknow, Moulavi Rafiuddin confessed to me that the Muslims had misjudged Tilak. I have never come across any man so imbued with the spirit of religious toleration as Mr. Tilak. This is natural as Hinduism is not a militant or proslytizing Religion " Have not the Peshawas decreed salaries for Catholic priests in Bassein and Thana ? Has the Christian Rule of England treated you better than the Hindoos did ? "

Tilak knew the Bible by heart as it were One night in London he kept me listening till 3 in the morning to an enchanting discourse on the 'Identity of Jesus and Jehovah'. He was a master of philology. I may mention Tilak's performance as an examinee which he related to me that morning At the B. A, Examination he was asked to give the root of some English word He said " I was floored. He then asked me for the root of another word. It then occured to me to give the Sanskrit root. The Examiner was floored. He knew no more about the Sanskrit than the man in the moon. So I came out with flying colours " His discourses on the " Mistletoe and Honeymoon " would have fascinated all the fashionable Ladies in England.

As for his being the arch-enemy of England, his response to His Majesty's Proclamation of 1919 ought to give the quietus to a plausible charge. But the turning point was the historic proclamation by Mr. Montague in 1917 He was enamoured of his International Ideal of the brotherhood of mankind more than the national Ideal of Independence. He believed that the transfer of Education to Ministers was the most tangible proof of the sincerity of the people of England and of the Parliament of Great Britain in the proclaimed policy of Swarajya within the British Commonwealth He appealed to history in support of this. He said "*Chercez les infants*" of Ignatius Loyola was far more efficacious than Napoleon's "*Chercez les femmes*". He was satisfied that Parliament meant surrender by gradual transfer of

political power and that our duty was to hasten the day by liberal measures. Hence his Manefesto of Responsive Co-operation. Its origin is now an open secret. We were on our way to the Congress at Amritsar in 1919 On the way we learnt of the proclamation of His Majesty the King Emperor. In consultation with Mr. Kelkar and others Tilak drafted the Response and then came to me. "I do not like this, Tilak," said I "Then draft one yourself," said he and left me alone I did so and sent for him We discussed it for half an hour. He was charmed with the expression 'Responsive Co-operation.' He examined analytically all it conveyed and contained. He concluded "Responsive Co-Operation. It 's Divine Revelation"

In May 1908 Prof. Paranjpe, the editor of 'Kal' was arrested in Bombay on a charge of sedition Immediately Tilak called on me to consult me on the prospects of acquittal I expressed the opinion that aquittals were once rare in England, and must be rarer in India until some Erskins gave us the benefit of the British system of trial by Jury, for then there was every likelihood that at least one of the twelve compatriots would share or sympathise with the political opinion of the prisoner But whatever be the verdict, a political defence would convert the High court into a corner of Hyde Park. "Hyde Park! What is Hyde Park?" asked Tilak. Ten years later I personally took Tilak to Hyde Park, the famous centre of gravity of the orators of England.

Tilak was to entrust me with the defence of Mr Paranjpe. The next morning, after Tilak left, I went to the Taj Mahal Hotel, where Mr Sheppord, the Municipal Commissioner was celebrating the conclusion of my chairmanship of the Standing Committee by a banquet with musical honours. Upon my arrival Mr. Gell, the Commissioner of Police greeted me with "Do you know that Mr Tilak was arrested after he left your place" "Not a bad joke!" said I smilingly I thought it was a joke as Mr. Tilak's movements were carefully watched at the time and his visit to me must have been reported to Mr Gell The next morning Tilak was placed before the Chief Presidency Magistrate and Paranjpe managed to defend himself so well that Davar J. felt almost disposed to acquit him Meanwhile Davar junior appeared for Tilak in the Police Court. He was applying for leave for Tilak to consult a couple of his legal friends I sent in my

name. It was declined by Tilak. Later I saw him in the lock-up. Again he politely declined. I suspected that his arrest after leaving my bunglow was an ominous phenomenon and that I had best keep myself at a respectable distance under the circumstances.

Some days later he sent for me in the Oomarkhady Jail and complained that Counsel had declined to object to a special Jury where the majority would be of Europeans. Ordinarily the Jury would be a common Jury where the majority would be Indians. He asked me if I would undertake to object to a special Jury or at least to insist that the majority should consist of Indians. "Certainly" said I. "It is the constitutional bulwork of the British Liberty to be tried by a Jury of one's peers." Mr. Justice Davar observed that he would direct the clerk of the Crown to summon Indians in sufficient numbers to meet my object. But inspite of all challenges only two Indians were empanelled. Both of them pronounced Tilak as "Not Guilty." Under the British system of trial by jury Tilak would have been discharged as honourably as the seven Bishops. When his birthday came round, a public meeting was held So demoralised had the prominent leaders become that not one of them would preside at the meeting. So I was placed in the chair as a *Deus ex machina*. It did not then occur to me that it was not quite proper for a Justice of the Peace of the Town and Island of Bombay to preside at the birthdate of a patriot, while serving his time in Jail—more especially as his incarceration had caused bloodshed in Bombay. A week before the expiry of my term of office, I was removed from the Bench of Justices of the Peace by Lord Sydenham. "The Lord hath given, the Lord hath taken away, blessed be the name of Lord Sydenham" said I.

The course of true patriotism never runs smooth. Tilak was confident of a favourable verdict as the article in question had been censored by an eminent criminal lawyer. Government apprehended the same, for later they added a fresh charge on another article, which had neither been seen by Tilak nor had it been censored. Misjoinder of charges was the result of this duplication. This was practically conceded by the Appellate Court as it recommended Government to cancel the sentence of fine passed by Mr. Justice Davar. This was eventually *done* by

the Government of Bombay. I was then full of hope that the Privy Council would have quashed the sentence. Tilak was grieved when he heard that I was not instructed to go to England for the appeal. For the appeal I saw Tilak in Jail at Ahmedabad. He was clothed in His Majesty's Jail uniform. The gaoler had kept only one chair in the room. I offered it to Tilak. "O no," said he," "it would make you standing counsel in a double sense." So we both sat on the floor. He insisted that no point should be made of the severity of the sentence of six years' imprisonment. He said, "Most likely I will give them the step long before six years unless God in his design has work for me on earth."

*Tilak Vs Sir Valentine Chirol.*

Initially I had nothing to do with Tilak's action for libel against Sir Valentine Chirol. But when the Commission for taking evidence appeared on the scene, Tilak did me the honour of consulting me. I thought the time was ripe for an amicable settlement. I discovered through the intervention of mutual friends that Sir Valentine Chirol was willing to withdraw all allegations reflecting on Tilak's personal honour and character. This was really all Tilak wished. The matter was left for Counsel in England to settle the terms, but I have never been able to ascertain why no settlement was effected In England I took part in several conferences with Sir John Simon. We were all anxious to put in evidence, Tilak's libel action against the *Globe* and the *Times of India* and their resultant apologies. Sir John was of opinion that the evidence was inadmissible unless Tilak were cross-examined upon these cases It so happened that Sir Edward Carson put a question which gave an opening for Tilak of which he took full advantage with consummate skill. The whole evidence went in to the chagrin of the Defendants. It was evident that Sir Edward Carson was not fully prepared for the case. Fortunately for him the same night Mr. Justice Darling caught the Influenza and was unable to try the case for a week Sir Edward was now in his element.

There were several sparring matches between Tilak and Carson in which counsel came off second best. One encounter is very notable. Counsel, with the object of making the requisite impression upon the jury, quoted passages after passages from the

Kesari or the Mahratta and asked in *crescendo* voice "Is not this sedition?" "No. It is legitimate criticism" was the invariable cool reply. At last filled with holy wrath he asked "Well, what language do you really consider sedition?" Prompt came the answer, "Quotations from your orations on Irish Home Rule" Sir Edward was completely floored. "Second battle of the Boyne" whispered Sir John Simon. To the last moment Tilak was sanguine of success. The verdict shocked him After the verdict we drove home in sad silence Till midnight we sat silent and then went to bed The next morning he was in my room as if nothing had happened with his usual "awake, arise or be forever fallen."

*Dyarchy*

During the pendency of the Libel Action Tilak abstained from political propaganda except interviewing Labour Leaders and Oriental Scholars and attending social functions The reception was usually cordial But one comical episode is worth recording. Tilak was invited to a Tea Party given by the British India Society. Its Secretary presented Tilak to "Lord Sydenham Ex-Governor of Bombay." He betrayed no sign of resentment, but Lady Sydenham looked furious As the secretary rushed to attend to another guest Lady Sydenham pursued her. "How dare you present a convict to Lord Sydenham" and so on. The unwilling offender was profuse in her apologies having been scared out of her wits by the fireworks

After the suit was dismissed with costs and the seals of silence imposed by the passport were broken by Mr Montague, Tilak turned to the press of England to present his case for India before the bar of public opinion. He first set right our friend '*India*' which had gone astray under our friend Mr. Polak. He next sent a short article consisting chiefly of facts and figures culled from the Blue Books without comment to a few conservative and liberal papers. Not one would find space for it although it would not have occupied more than a quarter of a column Lansbury's Weekly Herald alone published it Someone suggested the method of advertisement. The estimated cost of three insertions in 60 papers 3" × 6" was about £ 10,000 Tilak resolved to spend £ 1000, and gave orders to send a leaflet of facts and figures taken from Blue Books to as many leading journals as possible within

the budget. Only one provincial paper consented to publish it. This intense and idiotic partisanship was incomprehensible to Tilak.

Baffled in this direction he flooded the polling booths with his leaflets as the General Elections were then convulsing the British Isles of the sea. The results were inadequate So he hit upon a new plan of campaign. He sent for the defeated rival of Mr. Montague and arranged with him to run me as the Labour candidate, but an obliging Parliament dispensed with the necessity of seeking re-election on taking office and thus frustrated the design. The time was now fast approaching for the delegates of India to appear before the joint Committee of Parliament. The Horoscopes were propitious. The people of England were extremely well disposed. Their gratitude was profound at the loyalty of India and her services throughout the war The Anglo-Indian Cassandras were ignominiously falsified. Mr. Montague could, if he would, pilot the most liberal measure of Home Rule for India without difficulty There were two obstacles. Mr. Montague was committed to dyarchy. It was the price he had to pay for his extravagant and exasperating condemnation of the bureaucratic Government of India. But then dyarchy was a novelty no Englishman understood, and no constitutional lawyer commended The most formidable obstacle, however, was discussions in India Tilak realised that the only hope of a more liberal measure was a united India with a united front speaking with one resonant voice. He expressely sent me to secure the co-operation of Mrs Besant. But she was obdurate. She complained that Tilak was really at the bottom of the insults heaped upon her by Mr. Khaparday—all my assurances and protestations fell on a lacerated and hardened heart The result as anticipated, was that the original draft Bill with negligible modification became the Reformed Constitution of India. The Provincial Executive was partly responsible and partly irresponsible to the representatives of the people. Two antagonistic principles were expected to work harmoniousy. Personally I am convinced that the unworkability of the scheme could be far more effectually demonstrated by working it for all it is worth than by the wrecking tactics of the Swarajists without the moral force to back it.

* * *

## Rev. N. Macnicol.

*( M A., Dr. of Divinity, Poona )*

My connection with Mr. B. G Tilak was slight and had mainly to do with an active agitation in the cause of temperance in which he took a leading part. Some of those of us who associated ourselves with him in this cause were considered to have been made use of by an astute politician for his sinister ends. We, poor, innocents, had been led astray by a wily intriguer. I had never any reason to suspect that Mr Tilak was guilty of any such duplicity. He always appeared to me to be genuinely concerned for the protection of his countrymen against intemperance I remember, for example, when the agitation culminated in something approximating to a disturbance in the city, largely due to the foolish action of a young civilian, I found crowds of excited young men rushing through the streets shouting, " To Gaikwad's Wada. " There was material there for trouble, and hysteria was being automatically produced by their own actions. But when the danger was pointed out to Mr Tilak and he was urged to use his influence to get the excited young men to go home instead of going to Gaikwad 's Wada ( Mr Tilak 's residence ), he at once did so and needless to say, he was immediately obeyed. Mr. Tilak's policy may have been right or it may have been wrong, but every one who knew him was aware that he himself was a man of high personal character and one as averse as anyone could be from methods of violence and anarchy. His power lay in his nearness to the people and his understanding of their point of view, as well as in his intense pride in his people's past. He was not an idealist and, perhaps, from the point of view of the foreign ruler, he was the less dangerous on that account He sought what he thought were practical ends by what seemed to him practical means and it might have been the path of wisdom on the part of the Government, in his case, as in the case of others also to have condescended to treat with him and to come to an agreement with him as to how to adjust to each other their policy and the people's demands.

* * *

## Rt. Hon. V. S. S. Shastri.

*( Member of the Privy Council ; President of the Servants of India Society : formerly Member of the L. A., and the Council of State.)*

The death of Mr. Bal Gangadhar Tilak removes a great figure from Indian politics. For a quarter of a century and more, he had been the ideal of his followers and the dread of his opponents. Of Government, he had been an unrelenting and consistent foe except during his stay in England, during which he scandalised young Indians by his studied moderation of tone. Clear-sighted and tenacious, he kept an eye on India's freedom and would not rest or let Government rest till it should be won. Concessions and reforms he would take, for they only added to the strength of the people, but he would not have the public be too thankful or contented while the end was still far-off. Audacious in the beginning alike in aim and plan, he showed the true caution of Maharashtra in late life when he discountenanced the suicidal policy of rejecting the reforms or abandoning the constitutional position gained By training, if not also by nature, he seemed more fitted to be in opposition than to hold the reins of Government Bold he was and willing to take risks, but he was wary withal and liked to test the ground of battle before he ventured on it. Left to himself, he would never break the law openly and invite its rigours— like Ma hatma Gandhi Neither is it possible to conceive that he would, like Mr Gandhi, throw down the gage to Government and, all unarmed, take the vow of victory or death. His foremost intellectual quality was an alertness which bordered on restlessness. Even in confinement, his mind was occupied with problems of philosophic or antiquarian interest. One has heard of English politicians of mark who, after an interview or two with Mr. Tilak, have given him a place among the greatest minds they have known. Disputants have testified that he was master of all the arts of controversy. Towards these he seldom showed tenderness, as he certainly expected none from them. He was trained in a hardy school. If he was not the founder, he was the most powerful exponent of virile journalism in the vernacular. There is good reason to believe that Mr. Tilak knew the good points of his rivals

and could appreciate them fully when he cared. Mr Gokhale who had a rare gift of seeing the true quality of his rivals, used to say that Mr. Tilak was born out of his time and that his genius would have found congenial scope a century or so ago. It was the example of Mr. Tilak that first drew Mr. Gokhale to the service of the Deccan Education Society. Not in politics alone, but in the ethics of public life, in social reform, in educational ideals, in attitude towards Government and the British race generally, they were as wide apart as the poles. Each recognised, however, the burning patriotism of the other! Both loved the people and made sacrifices in their services But how diverse their paths! The one passed through suspicion from Government and from people to the pinnacle of fame when he died, honoured and lamented by both. The other ended as he began, the enemy of Government and the victim of its wrath, but the idol of his country-men!

* * *

## Henry W. Nevinson.

*( Tourist, Journalist, Author, and Friend of India, London )*

Bal Gangadhar Tilak appeared to be about ten years older than Mr. G. K. Gokhale, but it was difficult to tell his age, for if ever he took off his Mahratta turban, one could see his head shaven to the back, where the hair grew in a long, black tuft, as was the fashion of his race or caste. His full, brown eyes were singularly brilliant, steady with daring, rather aggressive But his general manner was very quiet and controlled, and both in conversation and public speaking he talked in brief, assured sentences, quite free from rhetoric, outwardly passionless even in moment's of the highest passion, and seldom going beyond the statement of facts, or, rather of his aspect of facts at the time His apparent calmness and self-command might arise partly from courageous indifference to his own future, partly from prolonged legal practice at his own trials. At first one would say, his was the legal mind, subtle, given to fine distinctions, rather capable of expressing thought than of thinking, and quick to adapt both the expression and the thought to the audience of the moment. But there was

